

# कुलदैवत

संपादिका - डॉ. सरोजिनी बाबर

# कुलदैवत

संपादिका

**डॉ. सरोजिनी बाबर**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिति



महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला, पुष्प १९ वे

भारतीय संस्कृतीच्या उपासक

श्रीमती इंदिरा गांधी

यांच्या

पवित्र स्मृतीस सादर

# प्रास्ताविक
## (द्वितीय आवृत्ती)

लोकसाहित्य समितीने प्रकाशित केलेला 'कुलदैवत' हा ग्रंथ लोकांना एवढा आवडला की, त्याची पहिली आवृत्ती बघता बघता संपून गेली! .... आणि त्याचवेळी या ग्रंथाबद्दलची मागणीही एवढी वाढत गेली की, हवी ती किंमत असूं देत पण ग्रंथ उपलब्ध करून द्या असा एकसारखा तगादा सुरू झाला! ...

लहान मोठी, गरीब श्रीमंत, सुशिक्षित अशिक्षित, अशी कोणत्याही थरातील माणसं असूंदेत त्यांना आपल्या कुलदैवताच्या दर्शनाला जाताना हा ग्रंथ वाचून व पदरी बाळगूनच पाऊल उचलायचा मोह झाल्या-कारणानं या ग्रंथाची लोकप्रियता वाढत गेली ही वस्तुस्थिती आहे.

त्यामुळेच आज हा ग्रंथ पुन्हा प्रकाशित होतो आहे. जनलोकांच्या उदंड अपेक्षेची परिपूर्ती करताना म्हणूनच आम्ही आज सुखावून गेलो आहोत.

हा ग्रंथ तसा मोठा आहे. सहजासहजी न पेलणारा. पट्कन वाचून हातावेगळा न करता येणारा. पण सर्वांग सुंदर असा, काळजाचा ठाव घेणाराही.

आमचे असंख्य वाचक या ग्रंथाचे सानंद स्वागत करतील याबद्दल खात्री आहे. म्हणूनच आज ही दीपावलीची मंगल भेट!

दीपावली
१९९२

पारोशी [signature]



# प्रास्ताविक

आपापल्या कुलदैवतांच्या संबंधीची सामान्य लोकांची जवळीक आगळी आहे आणि कुलदैवतांबद्दलची कथागीतंही अमाप आहेत हे लक्षात आल्यापासून लोकसाहित्य समितीच्या वतीने या विषयावर एखादा ग्रंथ प्रकाशित व्हावा ही अनेकांची अनेक दिवसांची अपेक्षा होती. त्यामुळे गेली तीन चार वर्षे या समितीच्यावतीने या विषयावरील लोकसाहित्य मिळविण्यासाठी अनेक प्रकारचे प्रयत्न केले गेले. निरनिराळ्या लोकांच्या गाठीभेटी घेण्यात आल्या. पत्रव्यवहार झाला. विनंती केली गेली. हळूहळू आमच्या प्रयत्नाला यश येत गेले. आमच्या नेहमीच्या संग्राहकांनी मनावर घेऊन कथा पाठविल्या. गीते धाडली. पाठोपाठ नामवंत लेखकांनी लेख लिहायचे मनावर घेतले. संशोधकांनीही हातभार लावायचा बेत केला.

त्यामुळे 'कुलदैवत' हा ग्रंथ तयार होऊ शकला. महाराष्ट्रातील प्रमुख कुलदैवतांचा विचार या ग्रंथात झाला असून त्यासाठी जवळपास शेसव्वाशे लोकांचा हातभार लागलेला आहे.

या ग्रंथात संशोधनात्मक लेखांचे बरोबरच कुळाचार व यात्रावर्णनेही आलेली आहेत. स्थळवर्णनाबरोबरच स्थानमाहात्म्यही सांगितले गेले आहे. कहाण्यांच्या जोडीला गीतेही आली आहेत. सामान्यांच्या जोडीलाच असामान्यांनीही भाग घेतलेला आहे. देवदेवतांची माहिती देताना ती सचित्र करण्यात आलेली असून प्रत्येक विभागाला वेगवेगळ्या प्रस्तावनाही दिल्या गेल्या आहेत. शिवाय शेवटी सूचीही जोडण्यात आली आहे.

आमच्या परीने हा ग्रंथ सर्वांगसुंदर करण्याचा प्रयत्न झालेला असला तरी अद्यापही काही उणिवा जरूर राहून गेल्या आहेत याची लोकसाहित्य समितीला जाणीव आहे. हे कामच न संपणारे असे असल्याने हे राहून गेले, ते पहायचे राहिले असा अपुरेपणा हा ओघानेच येणारा आहे. तथापि या अपुरेपणातही एक प्रकारचा आगळा आनंद आहे. कारण हा ग्रंथ वाचीत असताना अनेकांना आपापल्या कुलदैवतांचा आठव येऊन त्या नोंदीतूनच आणखी एक याच तोडीचा ग्रंथ तयार होण्याची शक्यता आहे !

तथापि फूल नाही फुलाची पाकळी या न्यायाने का होईना आमच्या या प्रयत्नाचे स्वागत होईल या खात्रीनेच आम्ही आज रसिकांच्या हाती हा ग्रंथ सानंद देत आहोत.

हा ग्रंथ तयार होत असताना ज्या ज्या लहानमोठ्या अनेक सुहृदांचे हातभार लागले त्या त्या सर्वांची लोकसाहित्य समिती अत्यंत ऋणी आहे.

घरात मंगल कार्य निघाले की, माणसे कुलदैवताच्या दर्शनाला आवर्जून जात असतात. त्यावेळी घरादाराची एवढी धांदलगडबड उडून जाते की, काही तरी हमखास बरोबर घ्यायचे राहूनच जाते. तेव्हा महाराष्ट्रातील प्रमुख कुलदैवतांचा विचार करताना आमच्या हातूनही अशीच काही आगळीक घडून गेली असेल तर आमच्या वाचकांनी त्याबद्दल आम्हाला उदार मनाने क्षमा करावी. आमची चूक आमच्या पदरात घालून या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी ती होऊ नये यासाठी आम्हास कार्यप्रवृत्त करावे. जय देवा !

पुणे, २६ जानेवारी १९७४




उधळत्या बैलगाडीचे दणके खात खात पाच-सहा कोसांचा पल्ला गाठताना त्या दिवशी जीव रडकुंडीला आलावता, तरी आमची गाडी डोंगरकपारीच्या वळणात घुसली म्हणताना कसं हायसं वाटलंवतं. जिकडं बघावं तिकडं माणसांनी फुलतेल्या चारी वाटा गजबारल्यावत्या आणि शिंग फुंकीत जातेल्या पाऊलवाटेच्या लोकांनी डोंगर दणाणून सोडलावता. आपल्या भक्तीची ओंजळ देवाच्या पायाशी वाहून देवाला जिंकायला निघालेल्यांची धांदलगडबड उडून गेलीवती. माणसं झम्माट्यानं धावत होती. गाड्या उधळल्या जात होत्या. वाटेतल्या धुरळ्यानं दुनिया रंगत होती. गुजगोष्टींना ऊत आलावता. घामेजलेल्या नव्या कोऱ्या कपड्यांची दरवळ सुटलीवती. डोंगर चढताना ईर्षेनं घर केलंवतं जिथं तिथं. मोह, माया, चिंता, वासना, दंभ, अहंकार, मत्सर पार कुठल्या कुठं गेलेवते. माणसांना एकच ध्यास लागलावता. देवदर्शनाचा. त्यासाठी शांती, क्षमा, दया या तिघींना हाताशी धरीत देवानं भक्तांना प्रेमानं पालवलं होतं. म्हणून माणसं देवाकडं धावत होती. पळत होती. भांबावल्या नजरेनं इकडं तिकडं पहात स्वतःशीच बोलत होती. त्यावेळी त्यांचं मन आणि शरीर देवाच्या जयघोषानं भारून गेलंवतं. देवाच्या अखंड नामोच्चारानं त्यांची काया गदगदून गेलीवती. केव्हा एकदा देवाला भेटीन असं त्यांना झालेलं. त्याकारणानं 'दास डोंगरी रहातो । यात्रा देवाची पाहतो ॥' या साधु संतांच्या बोलाचा साक्षात्कार घडून येतेला पहायला मिळत होता .... देव भेटला की, देवाला काय मागायचं या विचारानं प्रत्येकाला भुलायला झालंवतं.... आपल्या कुलदैवताला भेटायचं म्हणून प्रत्येकानं संगं पानफूल, ऊदकाडी,

कापूर, होय नव्हं असलं काय काय आणलेलं. त्यामुळं कित्येक दिवस देवाचं दर्शन घडलं नाही म्हणून उदासलेल्या जिवाला सगळं जग धवळल्याचा आनंद झालेला. म्हणताना जिथं तिथं दाटलेल्या तोबा गर्दीतून पुढं सरकताना ज्याला त्याली खुळ्यागत झालंवतं, तरी उमेदीनं पुढं व्हावं असं वाटतेलं. आमचंही ध्यान त्यातच घुसत एकेक पाऊल मोठ्या सायासानं उचलतेलं!.... देवाच्या महापूजेसाठी जीव कसा उतावीळ होऊन गेलेला!....

आम्ही म्हणजे नंबर एकचे आळशी. सकाळी सकाळीच रोज उठून अभ्यंगस्नानासह देवाची पूजा करावी म्हणून घरात रोज तगादा असला तरी नेमकी त्यातच कसूर झालेली. त्याकारणानं देव दर्शन देईल का नाही हीच मोठी धास्ती!.... पण आमची आत्या मोठ्या आशेनं पुढं पुढं सरकतेली. भरारा गर्दीतून वाट काढतेली. देवावर तिची नितांत श्रद्धा. देवपूजा म्हणजे तिचा जीव की प्राण. त्याकारणानं देवदर्शन होणारच होणार ही तिला खात्री! आमचं घोडं मेलं नेमकं इथंच पेंड खातेलं!....

भल्या पहाटेला उठावं, आडाचं ताजं पाणी शेंदून स्नान करावं, सडा रांगोळी घालावी, परसदारीची पत्री फुलं तोडून परडी सजवावी, दंडबाह्या दुखस्तोवर सहाणेवर चंदनाचे खोड उगाळावं, देवकापूस पिंजून घेत देखण्या वाती वळाव्यात, निरांजनं धुऊन पुसून पाजळावीत, देवाला अभ्यंगस्नान घालावं, महावस्त्रं अर्पण करावीत, गंधाक्षता न् फुलं वाहून पूजा बांधावी, महानैवेद्य रांधून दाखवावा यातलं कोणतं एक अंगवळणीच पडलेलं नाही, तर आत्याबरोबर आलो आपण देवदर्शनाला म्हणून देवानं दर्शन दिलंच पाहिजे, अशी अपेक्षा कशाच्या आधारावर बाळगायची होती आम्ही? नाही का? म्हणताना असंख्य दिव्यांनी पाजळलेलं देवाचं शिखर पहात मोठ्या खुषीनं धाधावतेल्या भक्तांना बघून आमच्या मनात संकोचानं प्रवेश केला आणि सांगायचं म्हणजे उगीचच आमची नजर आसूसून गेली .... वारं प्याल्यागत झालेल्या जिवाला आमचा आम्हीच मग प्रश्न केला, 'आत्यानं देवपूजेच्या वेळी देवाला स्नान घालताना अगर धूप, दीप, नैवेद्य दाखवताना कधी घंटी तरी वाजवलीवती का?' तशी आपोआप नकारार्थी मान हलली खरी पण हलत्या ओठांनी आमचा आब राखला, 'केशर कस्तुरींनी सुगंधित झालेल्या गंधाची उटी लावून घेतलीवती अनेकदा!.... पत्री न् फुलं तोडून आणलीवती. वेळप्रसंगी पूजा करायची वेळ आलीच तर पाना-फुलांची आरास

देठ देवाकडे करूनच केलीवती. धूपाचा धूर हातानं पसरवीत देव्हाऱ्याच्या खोलीभर पसरून टाकलावता. निरांजनं पाजळताना देवाच्या तोंडावर उजेड जाईल हे पाहिलंवतं. पूजा संपवून देवाला प्रदक्षिणा घालताना जागा नव्हती तर मोठ्या माणसांप्रमाणं स्वतःभोवती फिरून प्रदक्षिणा पुरी केलीवती. एवढंच नाही तर दोन्ही हात, दोन्ही पाय, डोकं, छाती आणि दोन गुडघे जमिनीला टेकवून साष्टांग नमस्कारदेखील घातलावता!' .... त्यासरशी एकदम मनाला प्रसन्नता आली आणि आम्ही पण गर्दीतून वाट काढीत पुढं पुढं सरसावलो .... तमाम भरलेल्या जत्रेतून होणारी आमची हालचाल आमची आम्हालाच कळत नव्हती .... आम्ही तसेच पुढं चाललोवतो. आपोआप! ....

त्यावेळी देवाच्या पूजेसाठी लागणारं सगळं काही जवळ नीट आहे किंवा नाही याची चाचपाचाचप उगीचच होत होती. इथं देवाची महापूजा बांधताना षोडशोपचार साधतील किंवा कसं याबद्दल मन धास्तावलंवतं ....

पाद्यपूजेसाठी शंखानं पाणी घेतलं पाहिजे, आचमनासाठी पाण्याचं भांडं बाळगलं पाहिजे, अर्घ्यासाठी काही तरी जवळ असलं पाहिजे, पंचामृत स्नानासाठी दूध, दही, तूप, मध आणि साखर असणं आवश्यक आहे, महावस्त्र आणलंय किंवा कसं? गंध, हळद, अक्षत आणि कुंकू आणायचं विसरलं तर नाही ना? फुलं न् पत्री आहेत ना नीट जवळ? ऊदकाडी किंवा ऊद आणायचा विसर तर पडला नाही? नीरांजनं नीट पाजळून ओवाळणं फक्कड व्हायला हवं, नैवेद्यासाठी फळ अर्पण केलं पाहिजे, देवाला विडा दिला पाहिजे, दक्षिणा मोजली पाहिजे, प्रदक्षिणेची वाट मळली पाहिजे, नमस्कार घालून मंत्रपुष्पासह आरती झाली पाहिजे, प्रार्थना म्हटली पाहिजे, असलं आमच्या आत्याच्या मनातलं काय काय आमच्याही मनात कल्लोळले, म्हणताना रेटारेटीतला जीव गुदमरून गेला .... त्यासरशी मनात आलं, 'इथं आपण उगीच आलो. आपलं मन शुद्ध असलं की, देवदर्शनाची गरजच काय?'.... आणि पाणी प्यावं तशी ही भावना आम्ही घुटकली .... ही कल्पना मनात डोकावायची ही वेळ नव्हती. जत्रेयात्रेत असं होतं हे ठाऊक असूनही येण्याचं धाडस केल्यानंतर आता या कुरकुरीला अर्थ नव्हता! ....

देह देवाचं देऊळ मानून आणि आपलं अन्नपाणी म्हणजेच आपला देव अशी समजूत असलेली माणसं इथं आलीवती. त्यांच्याजवळच्या देवाबद्दलच्या श्रद्धेला दुसरी तोड नव्हती. त्यातून कुलदैवताच्या दर्शनाला वार्षिक तिथी साधून आलेली

ही माणसं असल्या दाटीवाटीची पर्वा करीत नव्हती. त्यांच्या काळजात देवाबद्दलचं अपार प्रेम नांदत होतं. आम्ही त्या दृष्टीनं खुजे ठरलोवतो!....

• • •

'आमच्या घरी घट बसत नाहीत. नवरात्रातही रोजच्याप्रमाणंच देवीला स्नानासाठी म्हणून खाली ताम्हनात घ्यायची. मात्र रोज पंचामृताचं स्नान घालायचं. दिवा लावायचा. सप्तशतीची पोथी वाचायची. रोजच्या महानैवेद्याला गव्हल्याची खीर, भजी आणि पोळी हवी. अखंड तेवणारा नंदादीप पाहिजे. या नंदादीपाची वात मोठी करतात. दहा दिवस ती पुरली पाहिजे. दसऱ्याला महापूजा, दहा नैवेद्य आणि बोडण. या नैवेद्यासाठी मोरेश्वर, वेळणेश्वर, काशी विश्वेश्वर, महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती, जानूबाई, गोग्रास, हत्यारं आणि घोडा या देवता असतात. बोडणाला तीन सवाष्णी, एक कुमारिका आणि घरची बाई असावी. या पाचजणी बसायच्या. त्यांनी देवींची प्रतिकृती करायची. महानैवेद्य करायचा. विशिष्ट रांगोळी घालायची. त्या रांगोळीवर पितळेची परात ठेवायची. परातीला कल्हई चालत नाही. भोवती पाच पाट मांडायचे. घरचीचं तोंड उगवतीकडे हवं. तिच्या उजव्या हाताला कुवारीण बसवायची. पुरणाच्या बारकाल्या पाच पोळ्या परातीत ठेवून त्यांवर सगळे पदार्थ वाढायचे. शिवाय एक नैवेद्य पानावर वाढायचा. तो कुवारणीला द्यायचा. प्रथम गणपतीची पूजा करायची. मग देवी ताम्हनात ठेवून तिला पंचामृताचं स्नान घडवायचं. त्यासाठी दूध, दही, तूप, मध व साखर अनुक्रमानं घ्यायचे. हे सर्व झालं की, मग देवी पुसून परातीतल्या कणकीच्या बैठकीवर ठेवायची. त्याला लोणारती म्हणतात. या वेळच्या पूजेची पद्धती म्हणजे कणकीत हळद घालून ती चांगली भिजवायची. या पिठाचे मग पाच दिवे, पाच भंडार (मुरड घालून कणकीच्या केलेल्या चकत्या), वेणी, मणी-मंगळसूत्र, वेढणी, बिरुदी, चौरंग व हराडेरा एवढे प्रकार करायचे. पूजा झाल्यावर पानाचा नैवेद्य. कणकीच्या दिव्यात फुलवाती पाजळून मग आरती, आरतीचे दिवे परातीत ठेवायचे. मग सगळे जिन्नस एकत्र कालवायचे. त्यावर पंचामृत घालायचं. त्यासाठी दही-दूध पावशेर पावशेर तरी हवंच. मग कुवारणीला "घालीस का?" विचारायचं. ती "हो" म्हटल्यावर हे कालवणं थांबवायचं. नंतर

पुरण लावून देवीचे व सर्वांचे हात धुवायचे. त्यातला ओला अंगारा वाटीत काढून घ्यायचा. तो अंगारा देवीला नमस्कार करून स्वतःला लावायचा. परात मग झाकून ठेवायची. जेवणं झाल्यावर हे बोडण गाईला द्यायचे अगर गंगेत नेऊन विसर्जन करायच. आम्हा कोकणस्थांचा हा कुळधर्म आहे.'

नवरात्रातल्या आठव्या माळेला देवीच वाहन पहायला गेलेल्या आणि दर्शना-साठी भल्या पहाटेच स्नान करून गारठ्याचं रांगेत उभ्या राहिलेल्या मला एकजणीन पुढं पुढं सरकताना ही हकीगत सांगीत अडवली आणि भली दांडगी रांग पुढं सरकून गेली तरी आम्ही वाटेतच थांबून गेलो !.... पहातोय तर मघा पाहिलेले चेहरे बदलून नव्याच कोणी मागं पुढं तरंगतेल्या !.... त्यामुळं हा कुळधर्म ऐकून भुलायला झालेल्या मी सहजीच बोलणं केलं, 'आमचं फार वेगळं असतं.' माझी समजूत त्यावर भागेल. पण नाही. त्या बाईनं मोठं आश्चर्य व्यक्त करीत मोठाले डोळे करून माझ्या काळजाचा ठाव घेत विचारलं, 'वेगळं म्हणजे कसं ?' आता आली का पंचाईत ? काय उत्तर देणार मी ? 'आमच्याकडे पत्रावळी-वर माती पसरून ती भिजवून तीमध्ये बी पेरतात व त्या मातीवर पाणी भरून मातीचा एक घट ठेवतात. पेरलेले बी उगवून वर कोंब येतात. त्याला "धान" म्हणायचं असतं. नंतर रोजच्यासारखी पूजा होते. रोज वाढत्या क्रमानं फुलांच्या माळा देव्हाऱ्याला बांधतात. पाचव्या माळेला कडकणी बांधतात. घरात नवरात्राचा उपास स्त्रिया करतात. फलाहार फक्त असतो. त्यामुळं नातेवाईक उपास करणाऱ्या स्त्रीसाठी खण, नारळ, केळी, पेरू आणि खजूर घेऊन येतात. अंगणात सडा रांगोळी असते. बस्स !.... आणि हो, दसऱ्याला सोनं दिलं घेतलं जातं. घरच्या लोकांना ते शिलंगणावरून आल्यावर सवाष्णी ओवाळतात. कडकणी खायला देतात. झालं !'

ठाऊक असलेलं हे सगळं मनातल्या मनात घोकीत माझे ओठ हलले. पण त्या बाईला ऐकू जाईल असा आवाजच फुटला नाही ! म्हणताना 'काय म्हणालीस ? पुन्हा बोल !' असा तगादा त्या बाईंनी सारखा लावला. त्या नादात आम्ही दोघीपण अशा भांबावून गेलो की, रांगेत उभ्या राहिलेल्या बायका झटक्यानं पुढं सरकल्या आणि रांग मोडून आम्ही दोघीच तेवढ्या एका अंगाला मधल्या मधेच राहिलो !....

तेवढ्यात मला संगं घेऊन आलेल्या आमच्या शेजारीणबाई कुठून तरी गरजल्या, 'कुठं हाईस तूं आकले ? म्होरं याचं न्हाई काय ?'.... आणि मग ह्या बाईंना

सोडून मी पण पुढं सटकले .... गर्दीतून मला मग शेजारणीनं पोतं ओढावं तशी पुढं ओढली आणि मानेला धरून माझं मस्तक देवीपुढं टेकवलं!....

प्रदक्षिणेच्या वाटेवरली हळदकुंकवाचा सडा सांभाळीत पावलं उचलताना मात्र त्यांनी मला बजावलं, 'देवाधर्माला आल्याव उगीच कुनालाबी कुळधर्म न्हाई तर काय पन विचारूनी!.... धरला जावावं त्येच्या नं मग बोलत बसावं, हितं पैला देवदेव. बाकीचं सारं मग!'.... तशी मी पटकन् बोलून गेले, 'एरवी कोणच काही सांगीत नाही. असंच गाठलं तर होतं नाही तर मोपळा!'....

पण त्यांना ते आवडलं नाही. देवळाच्या भोवतालच्या भिंतीतून बसलेल्या अनेक देवांचं कुंकू हाताच्या बोटानं टिपीत न् ते स्वतःसह माझ्या कपाळाला लावीत त्या पुटपुटल्या 'देवीचा कुळधर्म करायचा तर नीट मन लावून करावा. अष्टमी, चतुर्दशी, पुनव ही टिपनं बगून कुळधर्म करत्यात आनिक चैत्र, श्रावण, पूस न् माघ म्हईन्यात त्येचं लई माहात्म्य हे सांगाय येत न्हाई दुसऱ्याला! उगं आपलं काय काय विचारीत सुटायचं ते? देवाची वटी मनापसनं भरली की, पाक येतंया'....

मी मग मुकाट्यानं गप्प राहिले. बोलायची सोय नव्हती. बाई कडक होत्या. लोकांच्या देखत हजेरी घ्यायला मागं पुढं न पहाणाऱ्या. म्हणून म्हटलं रहावं गप्प गप्प. तर तेही त्यांना खपेना. त्यांनी पुन्हा एक वेळ देवीची ओटी घेऊन लोढण्यागत त्यांच्या मागून फिरणाऱ्या मला दुसऱ्या देवळांत नेलं आणि सारे सोपस्कार माझ्याकडून करून घेतले तेव्हा कुठं माझी सोडवणूक झाली ....

त्या प्रसन्नवदना महादेवीच्या भर्जरी वस्त्रातील सालंकृत दर्शनानं त्या दिवशी जीव एवढा सुखावला होता की, बदामीच्या देवीचा साठ भाज्यांचा कुळधर्म करून पौषी पूर्णिमेचा उत्सव साधायलादेखील मी तयार झाले!.... मावशीनं बोलावलं होतं तर तिच्याकडे जाऊन राजळा देवीच्या कुळधर्माची पण माहिती आवर्जून मिळवली!

त्यवेळी घेवड्याच्या पानावर या राजळा देवीच्या सात आकृती रक्तचंदनानं काढून रीतीभातींप्रमाणं पूजा करताना 'श्रीराजराजेश्वरीदेवीप्रीत्यर्थं' असंसुद्धा म्हटलं!.... रीजळा, काजळा, सोजळा, तेजळा, सहादेवी, महादेवी, मन्मथादेवी या सगळ्यांचा आठव धरून वर माहितीसुद्धा दिली की, 'हा कुळधर्म शाळिग्राम, ढेकणे, आठ घरे वैद्य, टिल्लू, पारखी, चिंचवडकर, पंतसचिव इत्यादींच्या घराण्यांतून

पुरातन काळापासून चालू आहे!.... या कुळधर्मास एक घरचं मेहूण, एक विकेशा विधवा व एक मुंजा मिळून साडेतीन माणसं आवश्यक असतात. म्हणून या कुळधर्माला साडेतीन माणसांचा कुळधर्म मानतात .... या कुळधर्माचा सैपाक साडेतीन किंवा साडेसात माणसांपुरताच करतात. अधिक अन्न झाल्यास ते जमिनीत पुरून टाकतात. घरातील लोक दुसरा वेगळा सैपाक करतात. पण कुमारिकांच्या दृष्टीलाही हा कुळधर्म पडू देत नाहीत! कुठं कुठं हा नैवेद्य गाईला दाखवितात किंवा नदीतही विसर्जित करतात.'

एकदा तर गंमत म्हणून पाच घरी जाऊन मी देवीचा 'जोगवा' मागितला तशी माझ्यावर आयाबायांचा विश्वास बसला आणि आपल्या मनानं कुळधर्माच्या चालीरीती माझ्या परिचयाच्या होत गेल्या!.... पुढं पुढं तर देवता स्थापन, नंदादीप, मालाबंधन, देवता पूजन, पाठ वाचन, ब्राह्मण सुवासिनी व कुमारी भोजन, उपास-तापास, कथा-कीर्तन या कार्यक्रमाला हजर रहाताना मन रमू लागलं .... सामान्य लोकांच्या जीवनातील कुळाचार अंगवळणी पडू लागले आणि महानैवेद्यासाठी होणाऱ्या पुरणा-वरणाच्या तयारीत ही चित्ताची एकतानता साधता आली!....

• • •

कल्लोळल्या हरिनामाचा गजर मुखी नांदवून दिंड्या पताकांच्या भाराखाली झोकात नाचणाऱ्या दिंडीच्या दर्शनानं सुखावलेला जीव घेऊन त्या दिवशी राउळात आमचं जाणं झालं त्यावेळी एकजण आपल्या केसांची केरसुणी करून राऊळ झाडताना दिसली तशी दचकून मी मागं सरकले. काय चाललंय हे कळेचना म्हणून चौकशी केली तर कळलं की, नवस फेडला जातो आहे! बाळाची आई आपली कूस उजवली गेली म्हणून अशी वागते आहे आणि बाळाचे वडील आपल्या करंगळीचं बोट छाटून ते दान करीत देवावर रक्ताचा अभिषेक करीत आहेत!.... शाबास! या बातमीनं माझ्या मनाला एवढा धक्का दिला की, विचारू नये. लगबगीनं पुढं जाऊन देवाचा गाभारा गाठला न् हे सारं खरंच होतेलं बघून मी उभ्यानंच होतेल्या नमस्कारासरशी माघारी वळले.... प्रदक्षिणेच्या वाटेला येऊन एका ओवरीचा आधार घेत तिथं घुटमळले.... या अघोचारीपणानं माझा जीव पार हादरून

गेलावता!.... मती कुंठित झालीवती .... नवसासायासाच्या कल्पनेच्या भोवऱ्यात फिरताना भोवळ आल्यागत होत होतं आणि अक्कल थंडावलीवती!....

देवानं आपल्यावर प्रसन्न असावं, देवाचा आपल्या घराण्यावर वरदहस्त असावा आणि कोणत्याही कारणानं देवाचा कोप आपल्यावर होऊ नये या कल्पनेनं देवाला खूष करण्याचा हा अविचारी मार्ग बघून मनाला कसं अस्वस्थ अस्वस्थ वाटलं .... म्हणून डोक्यात एक कल्पना चमकून गेली की, असा हा देव देव म्हणणारा आहे तरी कोण तेव्हा त्याच्याबद्दल माणसाच्या मनात एवढी भीती असावी?

आम्ही पाहिलेला देव होता देव्हाऱ्यातल्या धातूंच्या मूर्तींमधला!.... देवळा-तल्या दगडांच्या मूर्तींमधला!.... चित्रातल्या चित्राकृतीमधला!.... पण .... पण ह्या देवाला एवढं भ्यायचं कशाला? ह्या देवाची जडण-घडण तर माणसानंच केलेली. त्यासाठी त्यानं आपलीच कल्पना चालवलेली. मग ही धास्ती कशा-साठी?.... या विचारचक्रात गवसलेलं मन सुन्न होऊन गेलं म्हणताना उभ्या उभ्याच देवाला नमस्कार करून मी गाभाऱ्यातून बाहेर पडले. राउळातल्या प्रदक्षिणेच्या मार्गावरील एका ओवरीला टेकून उभी राहिले.... देवाचा शोध कसा घ्यायचा या विचारानं मनात जसा हलकल्लोळ उडून गेलेला!....

आम्ही उगवतीला देव मानतो, मावळतीला हात जोडतो, सूर्याला नैवेद्य दाखवितो, चंद्राला ओवाळतो, दाही दिशांना अर्घ्य देतो, सागराची पूजा करतो, नदीची ओटी भरतो, विहिरीला हळदकुंकू वहातो, धरित्रीची महापूजा बाधतो म्हणजे आमच्या देवाबद्दलच्या कल्पनानी फारच मोठा विस्तार मांडलेला आहे. याचा अर्थ असाच होतो की, निसर्गामधील प्रचंड उलाढालींनी माणसाला आपल्यात देव आहे असं समजायला लावलं असावं!.... एवढ्या मोठ्या प्रचंड उत्पाती शक्तींना काबूत ठेवणारी आणखीही कुणी अव्यक्त अशी अगम्य महाशक्ती असली पाहिजे असं स्वाभाविकच माणसाला वाटलं असावं आणि त्या गूढ शक्तीलाच देवपणा प्राप्त झाला असावा!....

पुढं पुढं माणसानं देवालाही आपल्यासारखेच मानवी आकार देऊ करून दगडाधोंड्यांच्या आणि निरनिराळ्या धातूंच्या सहाय्यानं देवाच्या मूर्ती तयार केल्या असाव्यात आणि त्या मूर्तींवर आपली सुखदुःखं शिंपली असावीत!.... कल्पनेतल्या या देवांचा मग अमाप विस्तार होऊन या देवाला खूष करण्यासाठी

 वाट्टेल ते करायची तयारी माणसानं केली असणं सहज शक्य आहे, हे ध्यानात

आल्यावर या नवसासायासातल्या अघोचारीपणावर आघात करायला धास्तावलेलं माझं मन सबुरीनं घ्यायला तयार झालं....

अनेक प्रकारच्या देवदेवतांच्या पसाऱ्यात गवसलेल्या माणसानं अखेरशेवटी एकाच मोठ्या देवाची अपेक्षा धरली आणि हा देव त्या माणसाच्या घराण्याचा कुलदेव झाला, देवाधिदेव ठरला .... आम्ही त्या देवाला आपलं कुलदैवत मानलं. आमच्या घराण्याच्या संरक्षणाची जबाबदारी त्याच्यावर सोपवली. त्यामुळं कुल-संरक्षण हे ह्या देवाचं मुख्य काम मानलं गेलं ....

त्यामुळं घराण्यातील कुणालाही आर्थिक नुकसान, रोगराई वगैरे पीडा पोचू नये ही खबरदारी माणूस घेऊ लागला. कुलदैवताच्या अवकृपेनं हे होतं असं मानू लागला. म्हणून कुलदैवताला नवस बोलण्याची प्रथा पडत गेली .... तो नवस फेडण्यासाठी मग याच माणसानं जिवाचं रान केलं!....स्वतःच्या बलिदानासही तो तयार झाला!!....देवात आणि आपल्यात एकतानता साधण्यासाठी त्यानं सदैव अविश्रांत अशी धडपड चालू ठेवली .... आम्ही या सगळ्या धडपडीपासून मुक्त होतो जसे!.... आपण मनापासून आपलं नियोजित काम केलं की, देव पावतो ही आमची श्रद्धा होती .... म्हणून नवस फेडण्यातला अघोचारीपणा आम्हांला मनस्वी खटकत होता .... खुपत होता .... पटत नव्हता .... हा खुळेपणा आहे असं वाटत होतं!.... तरीदेखील बदाम कुटून, खोबरे खिसून, ओले वाटाणे सोलून अगर खायला प्यायला भरपूर देऊन परगणा लुटून येतेल्या राजसाला चांगला धष्टपुष्ट करायला धडपडावं त्या रीतीनं आम्ही आमच्या मनाला देवाबाबतच्या अप्रूपाला संभाळून घ्यायला लावलं .... सामान्य लोकांच्या मनातील या अपार श्रद्धेला विचारात घेतली आणि दिलं वचन पाळावं माणसानं या निर्धाराला येऊन ठाकलो!....

जुन्या काळच्या ऋषिमुनींनी, साधुसंतांनी आणि विचारवंतांनी आभाळाच्या विशाल मंडपाखाली येऊन पृथ्वीच्या आसनावर बसत या संदर्भात केलेला विचार त्यावेळी आठवला. कधीमधी कुठं तरी ऐकलेलं, वाचलेलं, सांगितलेलं असं सारं सारं आठवणींच्या घोळक्यात येत गेलं .... त्या नादात ब्रह्मानंदी टाळी लागली ....

देवाच्या दारात आपपर भाव नाही. तुपलं मपलं नाही. हेवादावा नाही. भेदभाव नाही. इथं सगळी सारखी. लहान असो, मोठा असो. स्त्री असो पुरुष असो. सर्वांना वागणूक सारखी मिळावी म्हणून देवाची धडपड असते.

देवाचा हा मनोभाव पुरा व्हावा म्हणून भक्तांच्या जिवाचा आटापिटा चाललेला असतो. देवाच्या चरणी आपली सेवा रुजू व्हावी ही त्या माणसाची अपेक्षा असते. म्हणून कुलदैवताच्या दर्शनासाठी माणूस हपापलेला असतो. गावशीव सोडून लांबचा पल्ला गाठीत धावत असतो ....

पण आमचं वेगळं. घरातील सगळीच देवदर्शनाला जातात म्हणून आम्ही देवाला येतो जातो. आमच्याजवळ ही श्रद्धा नसते. आम्हांला देवाची पूजा बांधायची असते ती गंधाक्षतांची, फळाफुलांची अगर वस्त्रालंकारांची नसते. त्यामुळं देवाच्या दाराशी आम्ही तोरण बांधू पहातो ते भावफुलांचं, कल्पना-सौष्ठवाचं, वैचारिक धनाचं. त्यासाठी आमच्या पुढं आधार असतो तो ज्ञानदेवांचा—

'अर्थ बोलाची वाट पाहे। तेथ अभिप्रावो अभिप्रायातें विये।
भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी ॥'



# अनुक्रम








अपाळच्या वडाची सावली. जपाळच्या वडाचा डेरा. डेऱ्याखालचं कोतमिरी पान. दुरून दिसणारं हिरवं रान. हिरव्या रानाचे पिवळे ठसे. त्या खुणेमुळं माहेर दिसे. शेजारचा सोनारवाडा. वाक्या घडीवणारा सोनारदादा. त्या पलीकडं आपल्या भारानं डुलणारा हुंबर. शेंडचा बुडक्याची त्याची लाल लाली. तर तिथल्या उंचेल्या हवेलीत रहाणाऱ्या आईवडिलांना भेटून यावं ही पार्वती गौरीची दांडगी इच्छा. म्हणून साजूक तूप भिनवलेल्या तांदळाचा भात, मुगाचं वरण, तुपात तळलेल्या खिरी धारी, गव्हलेबोटवे, लिंबाचं लोणचं हे काय काय खाताना डोल्लाऱ्यावर बसून जिभेवर घोळतेली चव तिला स्वस्थ बसून देईना. त्याकारणानं नाकी कळस असलेला शेला पांघरून आणि पैठणी नेसून माहेरी जायची धांदल करताना तिनं शंकराला विचारलं की, 'मी आईकडं जाऊन येऊ का चार दिवस?'

पण हे महाराज कुठले ऐकायला? 'मला गमायचं नाही' या सबबीवर त्यांनी नकार दिला. ही त्यासरशी गेली हिरमुसून. बसली फुगून. आणि मग—

**राना भागली तुळस पानाफुलांनी सजली**
**पैंजणाच्या भारूभार गवर कशी ग लवली**

हा रुबाब गेला विरघळून. हौसेमौजेला जसं विरजण लागलं. जीव वाराहुरा झाला. लागली फुंदायला. आपल्या माहेराला दुबळं म्हणणाऱ्या पतिदेवाचा तिला राग आला. म्हणताना ही राधिका अवचितच उठली न् लागली की चालायला! . . . त्यामुळं काय झालं की—

**ताडावरची माय गौराय येगू जी लागली**
**म्हायाराची वाट गौराय पाहू जी लागली**

तिकून आला शंकर त्येनं पदर जी धरीला
सोडा सोडा पदर मला जाऊंद्या म्हायारी
म्हायारी जाऊन काय ग खाशील
तूप शेवाया, दूध शेवाया मी खाईन
दोन दिवस राहीन मग मी येईन
सोडा सोडा पदर मला जाऊंद्या म्हायारी
न्हाई सोडित पदर काय ग तू करशील
बैराग घेऊन जाई मी होईन
जाई होऊन मळ्याला जाईन
मग मी माळी होऊनी येईन
पाणी घालून तुजला भेटीन
झाड होऊन फुलं मी आणीन
फुलं तोडून हार मी गुंफीन
देवाला घालून मग मी तुमाला भेटीन

सगळ्या गावानं यातलं सुखदु:ख बघितलं. गावभर बोभाटा झाला. देवमाणसं-देखील भांडतात ही आवई उठली. पण म्हणून ह्या राजसानं तिला 'जा' काही म्हटलं नाही. तशी तिला आणखीनच खुळ्यागत झालं हं! बिचारीची नजरदेखील पाणावली. पण करणार काय? बसली आपल्याशीच विचार करीत. मनातल्या मनात झुरत. आठवणींचं गाठोडं सोडीत. एकलीच. तशी तिला आठवलं आपलं बालपणातलं ध्यान. राहिली त्यालाच सजवीत. बसली आंजारत गोंजारत.

केवड्याच्या पानाची काया, बाळ्या बुगड्यांनी भरलेले कान, नाकातली सूर्व्याची नथ, गळ्यातलं सरी डोरलं, दंडांतले बाजूबंद, हातांतले बारी गोट, बोटांतल्या जडिताच्या अंगठ्या, पायांतले वाजते पैंजण, झिणकारती जोडवी आणिक भरजरी साडी चोळी हे सगळं आठवलं, तशी ही राणी गजबारानं सरसावली. बसलीवती एका खोनपाड्यात जाऊन ती उठली. आणि सांगायचं म्हणजे तिच्या कानात त्या वेळच्या शिणंजोडीच्या पोरीबाळींनी ज्याच्या त्याच्याजवळ अपूर्वाईनं केलेली—

माझी गवर ग आली भांग भरून गेली
भांग न्हवं ग भंडारा खिडकीत पडला अंगारा
खिडकीच्या ग कपाटा न्हवं बाई माझा परवंटा
परवंटा माझा हाटाबू शेला माजा पाटाबू
बाई मग माजी हासली शेतं तिची डोंगरी
डोंगर जळं धडधडा हरीण रडतंय खळखळा
हरणीबाईचं दूध ग बाळपणाची सूद ग
बाळपणीचं नक्षत्र नशीब घडली पवित्र

चांदा तुज्या टिपुऱ्या चांदणी उभी राहूंदे
शिपीदादा शिवी चोळी अंबरनाडा गुंफूंदे
अंबरनाडा पडे सांदी
त्याच्या दांडीव घोडयाची मांडी
घोडयाच्या मांडीव फिरे भोगरा
एक कळी तोडला वास गेला नगरा
नगराच्या राजानं नगराई केली
भोळ्या म्हादेवाला पारूबाई दिली
पारूबाई येऊनी यशवंत झाला
दिवटया लावूनी घराशी आला

ही भाषा घुमली. त्यासरशी तिला आणखीनच जड गेलं. चांदीच्या साखळ्या नाही मिळाल्या तरी हिन्नाच्या का होईना घडवून आई देईलच या आशेवर भिस्त ठेवून तिनं पुन्हा माहेरी जावं म्हटलं. आपल्या छत्रीला सोन्याची किरीमिरी लावलेल्या, चौरंगी शालजोडी पांघरलेल्या बिननात्यागोत्याच्या शंभुदेवाला आपण लगीनमाळ घातली, तर तो आपलं ऐकेल ही तिची भावना. म्हणून चंदनाचे उभे केलेले भुईवरचे खांब, त्यावर सोडलेल्या माणकांच्या वेली, गगनाला शोभा देणारा मंडप, आपल्या हातातील पोवळ्यांची माळ, आणि लाजत मुरकत आपण ह्या देवाचा केलेला स्वीकार तिला आठवला. त्यामुळं हा आपला शब्द मोडणार नाही म्हणाली. म्हणून तिनं शंकराजवळ ही भाषा काढली मात्र न् त्यानं जसं भांडणच काढलं बाई! नाही नाही ते आळ घेतले गेले न् मग ह्या राणीनं पण शब्दाला शब्द दिला . . . चिरडच आली तशी तर काय करील मग?

भली भली ग पारबती
शब्दाला उतार देती
ऐकावं महादेवा समद्याचा उतार द्यावा

कुणाला ग सोडित होती
कुणाला ग बांधित होती
कुणाला हाती धरूनी रंगम्हाली जात होती

गाईला मी बांधित होते
वासराला मी सोडित होते
दुधाची चरवी घेऊनी रंगम्हाली जात होते

कुणाला ग हाडपित होती
कुणाला ग दडपित होती
कुणाच्या मुखाकडं बघूनी वारा घालीत होती

दाराला मी हाडपित होते
इस्त्याला मी दडपित होते
दिव्याच्या मुखाकडं बघूनी वारा घालीत होते

कुणाला ग वारित होती
कुणाला ग बुडवित होती
कुणाच्या गळ्यावरी हात ठेवून चालत होती

पाण्याला मी वारित होते
घागरीला मी बुडवित होते
घागरीच्या गळ्यावरी हात ठेवून चालत होते

कुणाला ग दिलावता हात
कुणाला ग दिलावता पाय
कुणाच्या गादीवरी राज तू करीत होती

कासाराला दिलावता हात
सोनाराला दिलावता पाय
देवाच्या गादीवरी राज मी करीत होते

शब्दाला शब्द असा भिडत गेल्यावर शंभुदेवाची गाळण उडाली. बोललाच नाही पुढं मग. अंहं! तशी मग हिनं आता आपण माहेरी जायला हरकत नाही असा विचार केला. मी गेल्यावर खुळ्यागत वागू नका म्हणाली. तेवढ्यात कुणी तरी अवचितच गुणगुणलं हिच्या मनातलं——

तात्या कुणब्याचं शात शात पिकलं अमरावती
म्हादेव गेल्याती चोरी पाच कणसं मोडिली
कुणब्यादादानं देखीली कुणबी धावत पळत
गोसावी जटासी धरीला हासडून धरणी पाडीला
धरून माळ्याला बांधीला चिपाड घेऊन बडविला
तात्या कुणब्याची राणी आली भरतारा शिव्या देती
गोसावी चोरी का करील गोसावी माळ्याचा सोडीला
गोसावी धावत पळत आला अपुल्या मठाला
पारबतीशी बोलता झाला ऐक ऐक ग रानी
तात्या कुणब्याचं शात पिकलं हुतं अमरावती
मी गेलोवतो चोरी पाच भेंडांनी मारीला
धरून धरणी पाडीला धरून माळ्याला बांधीला
पारबती ऐकती झाली पारबती बोलती झाली
भोळ्या माज्या म्हादेवा कुणब्याचा का मार खावा

म्हणून ती कावरीबावरी झाली. पुन्हा असं खुळ्यागत करू नका म्हणाली. चंद्रकळा नेसली. भिंगाची चोळी ल्याली. बाळ्या बुगड्या, मोत्यांचे काप ल्याली.

गोट पाटल्या कंगण्या घातल्या. मोत्यानं भांग भरला. भाळी कुंकू ल्याली. नेत्रांत काजळ माखलं. गळसुरी डोरल्यांनी गळा सजवला. कंबरी दाब घातला. पैंजण जोडवी ल्याली आणि शंभर वेळा मागंपुढं पहात पहात दाट चिंच बनीतून माहेरी निघाली. तशी नको जाऊस म्हणून भरल्या गळचानं तिचा पदर ओढीत हाही तिच्या मागून निघाला! पण मग हिनं लगेच येते म्हणून त्याची समजूत घातली आणि मला पण खुळचागत झालंय ह्या भरवशावर स्वत: आंब्याच्या राईत शिरली.

सोन्याच्या रथात बसावं, आंब्याच्या राईतून जावं, चिंचेच्या बनातून निघावं म्हणजे नक्की माहेरी जाणं होतंय याची पार्वतीला खात्री. पण असं असूनही बिचारी भुलून गेलीवती. रथ लांबवर गेला तरी शंकर वाटेवर उभा आणि जाऊ नको म्हणतेला! . . .आणि आईकडं तर केव्हा जाईन असं हिला झालेलं! त्यामुळं इकडं आड न् तिकडं विहीर अशातली गत झालेली. जगावेगळी शंकराची प्रीत पदरी बांधून आपण निघालोय तरी स्वारी रागावेल ह्या भीतीनं तिचा जीव उडून गेलेला. म्हणून पदर धरलेल्या हातानं पालवीत ती त्याला घरी जा म्हणतेली. शंभर वेळा वळून वळून बघतेली. त्याकारणानं उशीर होतेला. आणि—

**आली आली गवराय येतच हुती**
**आंब्याच्या वनी गुतली हुती**
**आंब्याचं आंबे तोडीत हुती**
**सईच्या वट्या भरीत हुती**

माहेरघरी हा बोभाटा झालेला. त्यातूनच कुणी तरी मुद्दामच—

**शंभूदेव मोटा हाणी गिरजा नार दारं धरी**
**पाणी झुळूझुळू चाले दवण्यांच्या रोपावरी**

अशी चुगली केल्याकारणानं सखीच्या मैत्रिणी फिदीफिदी हसतेल्या. हिच्या मनाला या शंकेनं भुलीवलेलं. भोळा शंकर दवण्यासाठी अल्याडपल्याड गेलावता म्हणून खोळंबा झाला ह्या मनात ठरवलेल्या थापेनं हिला आणखीनच खुळं केलेलं. तशात एकदा उंच शिखरावर तर एकदा पार तळ्याच्या काठी उभं रहात शंकर हिला पालवतेला. सोन्याच्या वेसणी आणि मोत्यांच्या कसणी लावलेले नंदी तळ्यात पोहायला घालून हिला माघारी फिर म्हणतेला! आणि त्याचं ऐकलं नाही तर मग तेल्याच्या कावडीला तांब्याचे रांजण लावून हा सजण मुंगीचा घाट चढायला कमी करणार नाही ही काळजी तिला डिवचतेली! म्हणून पिवळ्या झुलीच्या नंदीला ह्या राजाची काळजी घ्यायला सांगून ही राणी एकदाची माहेरी पोचते हं! तर केवढा आनंद म्हणावा देवा—

गवर आली गजबारीनं पाय भरले पैंजणानं
तुज्या गुल्लालाच्या भार माजे पैंजण झाले लाल
गवर आली गजबारीनं पाय भरले जोडव्यानं
तुज्या गुल्लालाचा भार माजी जोडवी झाली लाल

ह्या समाधानानं उभं घर तंबतेलंच जसं. त्याकारणानं उशीर का झाला म्हणून विचारीत ओल्या भाकरीचा तुकडा हिच्यावरून ऐलीकडं न् पैलीकडं फेकला गेला! . . .तशी एकजण हिच्या मनचं बोलून गेली—

साती शंकर वनामंदी
एकला गनप्या वनामंदी
गणूच्या आईला सांगून धाडा
गणूनं तोंडे गमीवलं
गमीवलं तर गमवूंद्या
गणूला घराला घेऊन या

पण आपल्याला हिनं वाटेत बघितलं तर नसेल या शंकेनं ही राधा कावरीबावरी झाली. साती आसरांच्या मदतीनं उभ्या वनात धिंगाणा घालून गणपतीच्या तोंडाचं कारण काढलेला शंकर जर खरंच हिनं पाहिला असेल तर ती सगळं सांगून घरात शंकराबद्दल वाईट मत करील या भीतीनं ही दचकली.

पण मग तिला विचार करायला वेळ होताच कुठं? घरच्या आईनं हळद कुंकवाच्या ठशांची पायघडी घालीत हिला घरात आणली. सुखासमाधानाच्या, धन-दौलतीच्या, हिऱ्या-माणकांच्या, आरोग्य आबादीच्या, हौसमौजेच्या पावलांनी हिला घरात ये म्हटलं. तर त्या डामडौलानं ही घरात आली. बोलत बसली. जेवली खावली. तशी हिच्या इष्टमैत्रिणींची कळी खुलली. गमती जमती निघाल्या. आमचे भाऊजी कसे आहेत हे विचारताना त्यांनी हिला सपाटून चिडवली. हिच्याभोवती फेर धरून त्यांनी हिला विचारलं कसं—

| | |
|---|---|
| आलं गिरजाला मागणं | पावना घ्यावा पारखून |
| टाका बसाया पिडपाट | पुसा याची जात गोत |
| याची जात धनगराची | गंगा आमची बामनाची |
| याची आमची सोयरीक न्हाई | गंगा आमची द्याची न्हाई |
| जागा पाहू जागाचीत | मळा पाहू बागाईत |
| नवरा पाहू रूप शाई | तिथं देऊ गंगाबाई |
| गंगा ऐकेनाशी झाली | गेली आईच्या जवळी |
| अग अग माझे आई | आपल्या बारवेच्या तीरी |
| एक जोगी नवलापरी | घेतो सोन्याची किनरी |
| वाजवीतो नवलापरी | मी तर जाते त्याच्या घरी |

तर मग आता का ग तक्रार गौरी? आपल्या अंगुपती नवरा बधितलास. जोग्याच्या घरी गेलीस. गंगेला आपल्या जटेत न् तुला मुठीत ठेवणारा हा तुझा नवरा आणला का नाहीस बरोबर? तशी हिच्या आईनं डोळा घातला न् पोरी गप्प झाल्या. त्यासरशी—

**पुढं पुढं शंकर मागं मागं पारबती**
**जनलोक हसती तुम्हा कैलासाच्या पती**

आपली ही शोभा झाली नाही हेच बरं झालं या समाधानानं ही हसली. त्यातल्या त्यात—

**अर्धांगी पारबती मस्तकी वाहे गंगा**
**उजव्या मांडीव गणेश समोर उभा कोण सांगा**

ही भाषा कुणी केली नाही, त्यातच सगळं आलं या कल्पनेनं ती सुखावली. आपल्या भिरभिरत्या जिवाला तिनं सावरलं. सगळ्यांच्या बरोबर खेळायला गेली. खेळ गाण्यानं अंगण घुमूंदे म्हणाली. पण बाई शंकराचं नाव चुकून यायचं गीतात न् आपल्याला कुणी नावं ठेवायच त्यापेक्षा गीत गाण नकोच म्हणून स्वत: गप्प राहिली. आवाजदेखील काढला नाही हं! त्यामुळं काय झालं की, हिला खुलवावी, खेळवावी म्हणून घरच्या पोरीबाळी नटून सजून आल्या. पानाफुलांचा तांब्या हाती घेऊन पावलोपावली अमृत शिंपीत निघाल्या, त्यांनी मग गीत काढलं—

**अंगणी तापतं दूध दूधा पिवळी शाई**
**ये ग गवरी बाई एवढं जिवूनी जाई**

त्यासरशी हिला पण कंठ फुटला हं—

**आता काय करू बाई माता ग**
**दारी शंकर उभा ग**
**शंकर साळा राजा भोळा**
**नगरी सोडून जाय ग**

म्हणताना पोरींनी खदखदून हसत न् मोठमोठ्यानं टाळ्या वाजवीत हिच्याभोवती पिंगा घालताना हिला साफ सांगून टाकलं—

**नगराला लागलं निशाण ग**
**कापूराची वात ग**
**दिवा जळी दिवाटी**
**कापूर जळी आरती**
**गौरायसारखी पावणी**
**खेळू साऱ्या राती**

तशी ही धाम्याधूम झाली. बघतेय तर खरंच हिला घरी लवकर घेऊन जायला म्हणून आलेला शंकर दारात उभा होता आणि झिपरं कुत्रं सोडून त्याला कुणी घरात येऊ देत नव्हतं! . . . तर ते बघून ही सखूबाई साजणी उठली की गजबजून! पण हिला सोडणार कोण खेळत्या धोळचा-मेळचातून अवचितच? म्हणताना वेडीपिशी झाली. नेत्रखुणांनी शंकराशी बोलू लागली. . .

तेवढयात पालथ्या परातीवर वस्त्रगाळ केलेल्या राखेच्या पसाऱ्यातून रवीचं न् डावेचं टोक धुमायला लागलं न् वडीलधाऱ्यांचा गळा शंकराच्या कानावर येऊन आदळला—

गवरी ग बाई जागरान तुजं
जागता जागता पडल्या झोपाडी
एवढया निजची पिरत केवढी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
नारळीच्या गोण्या झोकील्या अंगणी
सुपारीच्या गोण्या लोटील्या अंगणी. . .

त्यामुळं हे महाराज दात ओठ खात न् आदळआपट करीत मुकाटयान माघारी फिरले! . . .

गिरजाराणी ते बघून मनात चरकली. त्याच्या वाटेकडं एकटक बघत झुरोक्याशी येऊन बसली. आता हा नक्की वैताग धारण करील म्हणाली. आणि मग होता होता आपसूकच नीजबाईनं घेरल्याकारणानं आपला डोळा कधी लागला हे तिचं तिला पण कळलं नाही. . .

खेळूनमाळून गिरजाराणी दमली न् झोपी गेली खरी पण दुसऱ्या दिवशी सासरघरी त्याएकी नको ती चर्चा झाली—

सकाळी उठली शंकराची माया
ते गेले स्वर्गलोकी गाऱ्हाणे
ऐका ऐका ग स्वर्गीचे दिवाणे
अजुनी गौराय उठली नाही

त्यामुळं चिडाचीड झाली. राग क्रोध वर आले आणि मग—

शंकर राजा उठला सभेतून
तोडला जी चिंचेचा फोक
त्याच फोकांनी मार वो दिला
मारली कवाडासी लाथ
पाडलं पारण्यासी खाली
सर्व्या अंगी लाल झाली

हा प्रकार घडला. माहेरची माणसं आचारी का विचारी झाली. शंकराचा हा शहाणपणा कुणाला खपला नाही. माणसांनी आश्चर्यानं तोंडात बोटं घातली. गौरी निजली ती काय न् हा ह्याचा तेगारा तो काय? वाऱ्याच्या झोतानं या वार्तेसरशी घर न् घर टिपलं.

पण ही शहाणी मार सोसून उठली. कामाला लागली—

हाती घेतला खराटा
झाडला माईचा की गोठा
भरल्या शेणाच्या पाट्या
घेतली वेताची चुंमर
घेतली मोत्याची घागर
पाणी भरे गौराय नार
जनलोक पुसती लेक कोणाची
न्हवं जी मी सावकाराची
लेक मीपल्या पित्याची

पण मग तिला शंका आली. हे काम गंगेचंच असावं म्हणाली. तिनंच शंकराचे कान भरले असावेत अशी तिची खात्री पटली. त्यामुळं—

पार्वती म्हणे तूं गंगे पातक करणी
तूं अखंड होतिस गे विष्णूच्या चरणी
भुलविली शिवाला कशी केलीस करणी
राहिलीस मस्तकी मजला चोरोनी
तूं फार अमंगळ सवती
तुज नाही मुळी कुळजाती
मी आदिशक्ति आदिमाया अर्धांगा
घर रिघे जारिणी किती करशील दंगा

तिनं हे भांडण उकरून काढलं. सवतीसवतींची मग ही जुंपली. एकमेकींचे वाभाडे निघाले. दोघीही एकीपेक्षा एक वरचढ व्हायला लागल्या. त्याकारणानं हे शंकर-महाराज ध्यानस्थ बसले. त्यासाठी त्यांनी स्मशानातील जागा निवडली. उजळ माथ्यानं त्यामुळं ह्या दोघींनाही बाहेर तोंड काढणं कठीण होऊन बसलं. शंकर कैलासी जायला तयारच होईनात! त्याचा परिणाम वाईट झाला. गावभर चर्चा निघाली. ज्याच्या त्याच्या तोंडी एकच भाषा चालली की—

श्रीशिव शंकर सांब सदाशिव
जय शंकर श्रीहरी
लाविला बुक्का निजमंदिरी
स्मशानामधी शंकर बैसले
डमरू वाद्ये वाजत आली

गंगा पार्वती दोघी सवती
नित्य नव्याने दोघी भांडती
गंगा म्हणे मीच वरती
म्हणे पार्वती मीच खालती
दोघींच्या पुढे नाचे गणपती
लावुनी बुक्का निजमंदिरी
दोघींचे भांडणही मिटेना
शंकर कैलासी येईना

पार्वतीच्या माहेरी त्यामुळं खिन्नता आली. ह्या घरी लेक देण्यापेक्षा पर्वकाळ बघून गंगेत तिला लोटून दिली असती तर बरं झालं असतं या कल्पनेनं तिथं मान वर केली. काय पाहिलं न् शंकराला हिनं पसंत केलं याबद्दलचा वाद निघाला. गोधडयांचं अंथरूण, बसके गाल, पिचके डोळे, गळकं नाक, भेसूर दात न् दाढा, अंगावर भस्माचे पट्टे, गळ्यात रुंडमाळा हे ह्या शंकराचं ध्यान हिला पसंत पडलं तरी कसं अशी बोलाचाली झाली.

पण मग पार्वतीनं विचार केला. आपलं आपल्याला लखलाभ म्हणाली. घरी गेली. मिळतं जुळतं घेत संसार करावा म्हणाली. झाकली मूठ तिनं सव्वा लाखाची मानली.

आरशाच्या भिंगाकडं बघून हसणारी, दिव्याच्या मुखावर पालव टाकणारी आणि डेऱ्यातल्या रवीच्या छंदाकडं बघून नाचणारी पार्वती माघार घ्यावी म्हणाली. तिनं मग शंकरानं कोही जरी विचारलं तरी आपण मात्र मोजकंच बोलायचं ठरवलं आणि—

नागाचं भूषण काय काठी कटीसूत्र
सर्वांग कुंडल माळा झळके गळा
संभा तुम्ही कैलासी जाऊनी पहावं

भस्माचं उटणं काय गळा रुद्रमाळा
त्रिवेणी जटा आणि जटामधी गंगा
संभा तुम्ही कैलासी जाऊनी पहावं

अर्धांगी पार्वती मस्तकी गंगा
उजव्या मांडीवर गणपती सांगा
संभा तुम्ही कैलासी जाऊनी पहावं

हरिहर शब्द नाथ दिगंबर
नंदीवर स्वारी तो काय
संभा तुम्ही कैलासी जाऊनी पहावं

पुढं पुढं शंकर मागं मागं पार्वती
जनलोक हसतील काय
संभा तुम्ही कैलासी जाऊनी पहावं

मग ह्या एका उत्तरानं ज्याचा त्याचा प्रश्न दडपून टाकायचा बेत केला तेव्हा कुठं मग तिनं सुटकेचा श्वास सोडला.

होता होता मग घटकेत राग तर घटकेत अनुराग धारण करणाऱ्या शिवशंकरानं एक दिवस कैलासातल्या महालात येणं केलं. गिरजाला बोलावलं. सोंगटयाचा डाव मांडला. आनंदानं खेळ सुरू झाला. पण तेवढयात तिथं अवचितच फेरी मारायला आलेल्या नारदानं कळ लावून दिली. जो डाव जिंकील त्याचं दैव मोठं म्हणून स्वतः नामानिराळा झाला. तशी काय झालं की, शंकरानं डाव टाकावा न् गिरजानं तो जिंकावा अशातलीच गत होत गेली! . . .आता रे देवा? गिरजाला जोर चढला खरा पण हे शंभुमहाराज रुसून गेले. बोरी बाभळीच्या न् सब्जातल्या दाट बनातून न् ताडामाडांच्या अस्मानी झाडीतून कठीण वाट काढीत गेले की खुशाल निघून! त्यामुळं स्वाभाविकच कैलासावर——

शिव रुसून गेले वनी
गिरजा उदास झाली मनी

ही आवई उठली. त्यासरशी ज्यानं त्यानं——

महादेवाच्या देवळात मी तर गेले सजागती
सोंगटया खेळती दोघं महादेव पारबती
सोंगटया खेळामधी पैला डाव गिरजाचा
जिंकून नेला शुभ्र नंदी शंकराचा
सोंगटया खेळताना पडले उलटे तीन फासे
भोळे महादेव गिरजा मनामधी हसे
सोंगटया खेळतानी देव झाले दानादीन
जिंकलं पारबतीनं महादेवाचं आसन

ह्या कळल्या गोष्टीची कोण भेटेल त्याच्याजवळ वाच्यता केली. पार्वतीला वाईट वाटलं. तिनं विचार केला. आपणही कुठं तरी निघून जावं म्हणाली. आणिक सांगायचं म्हणजे मग——

रुसले शंकर गेले हिमानच्या डोंगरा
खिल्लीम झाली गिरजा नक्षी काढीली पदरा
गाठीवर पेटी चोळी त्याली उफराटी
शंकराकारणं गिरजा डोंगर पालटी

अशातली गोष्ट घडून गेली. भिल्लिणीचं रूप धारण करून ही स्वत: त्याची समजूत काढायला गेली. शंकरानं डोंगरावर मांडलेल्या तपाचा मग चक्काचूर झाला——

डोंगरी गिरजानं जाऊन मांडीलं गायन
भोळ्या शंकराचं हरपलं सारं भान

म्हणताना शंकरानं ह्या भिल्लिणीला जवळ करावं म्हटलं. पण हिनं नकार दिला. म्हणाली की, माझा भिल्ल येईल न् गोफणीतून दगड भिरकावीत मला बडवून काढील. तशी शंकराला हसू फुटलं. म्हणाला कसा——

महादेव म्हणे भिल्लिनी तूं किती वेडी
चल कैलासाला तुला दावीतो महालमाडी

पण मग त्यावरून दोघांची पुन्हा जुंपली न् खऱ्या गोष्टीचा उलगडा झाला. भोळ्या महादेवाच्या सगळ्या करामती खोट्या ठरल्या आणि 'होय', 'नाही' करता करता——

शंकर पारबती भांडत आले घरी
महादेव म्हणती माझी पारबतीच खरी

या कल्पनेनं सरशी केली. तरीदेखील सह्य बनात उपाशी देवाला जेवण घेऊन गेलेल्या भिल्लिणीला समोर उभी करीत शंकरानं——

शंकरदेव बोले उभी उभी तूं भिल्लिणी
दंडकुसरी पाटल्या माझ्या गिरजेची चालणी

ह्या गोष्टीचा तपास घेतलाच. त्यासरशी तिथल्या बनातली नऊ लक्ष झाडं खदखदून हसली. दवणा दरवळला आणि देवापुरीच्या तुळचाला गेलेल्या ढवळ्या-पवळ्या नंदीनं उजवा कान देत शंकराला पुन्हा बोलावं देवा म्हटलं. पण मग तेवढ्यात शहाण्या शंकरानं गिरजाला संगं घेतली आणि थेट घर गाठताना——

शंकराचा रथ चालला दणादणा
सोन्याचा कळस गुंतला चिंचबना

अशी गंमत घडली तरी मागं वळूनदेखील पाहिलं नाही तर! छे!

परंतु पार्वतीच्या मैत्रिणींनी ह्या बाबतीत करायची ती गंमत केलीच ह्यांच्या रुसण्याफुगण्यावरून! म्हणाल्या कशा——

अल्याड शंकर धोतरं धुतोय
पल्याड गौराय नाय गो
न्हाऊन धुवून उभीच केली
एवढा शिनगार काय गो

माय बोले लाडिक लेकी
बुगड्या लेवुन जाय गो
आता गे माय कवा लेवू
शंकर वाट पाय गो

पार्वती हे ऐकून त्यांच्यावर खूप भडकली. खूप रागावली. रुसली. चिडली. हवं ते बोलून घ्यायला लागली. कसला नवरा पदरात पडला म्हणून तिनं वैतागही धारण केला. त्यासरशी तिच्या गडयिनींनी इंद्रसभेच्या पद्मिनी होत तिला घेरली आणि तिच्यापुढं झिम्मा घालीत तिचे कान फुटून जातील अशा दणक्यानं तिला ऐकवलं—

सोन्यानी सुतई न् पानी काडे कोन्ता
शंकर हरी व माय
केसर दंदनी

पानी काडे शंकर हरी न् तठे मनी
गौराय न्हायनी व माय
केसर दंदनी

तठे मनी गौराय न्हायनी न् पिवया
पितांबर नेसनी व माय
केसर दंदनी

पिवया पितांबर नेसनी न् कपाळी
कुंकवाची चिरी व माय
केसर दंदनी

कपाळी कुंकवाची चिरी न् भांग सये
गुलालीचा भरी व माय
केसर दंदनी

गुलालीचा भांग भरी न् डोळी काजळ
झिरीमिरी ल्याली व माय
केसर दंदनी

डोळी काजळ झिरीमिरी न् हाती
चंदनाची छडी व माय
केसर दंदनी

हाती चंदनाची छडी न् गौराईचं
माहेर फुलझडी व माय
केसर दंदनी

गौराईचं माहेर फुलझाडी न् तठला
सुतार नांदे भारी व माय
केसर वंदनी

तठला सुतार नांदे भारी न् त्यांना घरी
रंगीत पायना व माय
केसर वंदनी

त्यांना घरी रंगीत पायना न् त्याले
रेशीमन्या दोऱ्या व माय
केसर वंदनी

त्याले रेशीमन्या दोऱ्या न् त्यामां
मसूरनी गादी व माय
केसर वंदनी

त्यामां मसूरनी गादी न् त्यानामां
निजना शंकर हरी व माय
केसर वंदनी

त्यानामां निजला हरी न् झोका देये
गिरजा नारी व माय
केसर वंदनी

म्हणताना शंकरासकट सगळ्यांचा असा काय हशा पिकलाय की सांगणारानं काय सांगावं न् ऐकणारानं तरी काय ऐकावं बाई! . . .



# विविध लेख



## अनुक्रम

# शिंगणापूरचा शंभुमहादेव

लेखक : श्री. स. के. कुलकर्णी

'हर हर महादेवा'च्या अखंड गजराशी स्पर्धा करणारी लांबच लांब माळरानं; त्यात मध्येच अस्ताव्यस्त अंग टाकून दिलेल्या दगडाधोंड्यांच्या राशी, त्यापलीकडे डोकावणारे डोंगर-सुळके, आणि या साऱ्यांना भाजून काढणारं चैत्राचं ऊन! अशा परिसराची सोबत करीत गेली शेकडो वर्षे एक लोकगंगा नव्हे भक्तिगंगा वाहात आली आहे. 'शिखरीच्या राजाचं' दर्शन घ्यायची ओढ या गंगाप्रवाहाला वेग देत रहाते. त्या वेगात ती सारी सपाटी पार करीत, डोंगर-सुळके ओलांडीत जाते. मनी ध्यास असतो एकल्या शंभूचा! डोंगरमाथा गाठला की, ही गंगा सुखावते. तळ्याच्या पाळी विसावते. 'ठिकाणी' पोहोचलो याचा आनंद मनी जागविते.

असं कोणी म्हणतात की, सातारा आणि सोलापूर जिल्ह्यांच्या भौगोलिक सीमा मिळतात ते हे ठिकाण! पण या भक्तिगंगेला तसल्या सीमा-सरहद्दी माहिती नाहीत. तिला एकच गोष्ट ठाऊक आहे, हा सारा शंभुदेवाचा परिसर! शंभु महादेवाचा डोंगर, आणि तसंचे तिच्या मनीचं बोलायचंच तर समोर



शिंगणापूरच्या देवालयातील
शिवपार्वती

दिसतात तसे ते डोंगरही नाहीत, की त्यांचे सुळकेही नाहीत! तर मग 'कैलासा'हून निघून हे ठिकाण 'दक्षिण कैलास' म्हणून प्रसिद्ध करण्यासाठी आलेल्या श्रीशंभुसांगातीचे हे सारे 'गण'च होत. कुणी डोंगराचं, कुणी कड्याचं, कुणी सुळक्याचं, कुणी झाडा-झुडपांचं, अशी नानापरींची रूपं घेऊन आलंय! त्यांनी सारा परिसरच शंभुमय केलाय!

कुणी कधी आपुलकीनं विचारपूस केली की, ही लोकगंगा गावाबद्दलही बोलू लागते, 'शंभूच्या सेवेसाठी यादव कुळीच्या सिंघण राजानं हा गाव वसविला, म्हणून नाव पडलं शिंगणापूर, आणि शिखरींचा राजा येथे नांदतो म्हणून हे झालं शिखर-शिंगणापूर! देव, देवता, ऋषी, मुनी, सुंदर पक्षी, छोटे-मोठे कळस, पार विलक्षण सर्व! झालंच तर त्यांचे राक्षसी डोळे, त्या सर्वांच्या माथी विशाल डेरेदार घुमट आणि अतुलनीय सजावट अशांनी नटनटून गेलेलं शिखर! कितीही परिसर धुंडाळला तरी असं शंभुराजासारखं शिखर कुठं मिळायचं नाही! म्हणून तर हा इथला शंभुदेव "शिखरींचा राजा" बनलाय.'

पण शंभू इथं आला कशासाठी? असा प्रश्न या भक्तिगंगेला सहसा कोणी करीत नाही, केलाच तर त्यातला जाणकार हसून आपल्या मनातलं बोलू लागतो, 'त्याचं काय झालं, शंभू अन् पार्वतीमाय खेळत होते सारिपाट, त्यावेळी शंभूवर उलटला डाव. तसा रागावून तो निघाला आणि त्यानं थेट गाठला कोथळा पर्वत (शंभु महादेवाचा डोंगर)!' मग पार्वतीमायलाही उमगलं की, सारिपाट हे सोंगच होतं. 'शंभूला जायचं होतं महाराष्ट्रात.' ती शोध घेत आली आणि इथं तपाला बसली! तप पाहून शंभू प्रसन्न झाला. तसं दर्शन दिलं. शंभू दिसला अन् पार्वतीचा आनंद गगनात मावेना. तिनं त्याच्या जटाच धरल्या आणि विचारलं, 'कसं गाठलं आपणाला?' तिच्यातला अहंकार पाहून, शंभू पुनः गुप्त झाला. ते झालं बघा गुप्तलिंग! (गुप्तलिंग किंवा जटातीर्थ मुख्य देवळापासून अडीच किलोमीटर अंतरावर आहे.) आता काय करावं? पार्वतीमाय खिन्न झाली. मग ती पुन्हा लागली शोधाला. ती जिथं जिथं शंभूला शोधू गेली तिथं तिथं 'लिंगे' प्रकट झाली. अखेर चंद्रभागेच्या काठी उभ्या राहिलेल्या पांडुरंगानं समेट घडविला. आणि पुन्हा 'लोककल्याणासाठी' लगीनसोहळा मांडला. चैत्र शुद्ध पंचमीच्या हळदी, अष्टमीला मध्यान् रात्री लगीन! मग पार्वतीनं नात्यापुत्याला (शिंगणापूरपासून सोळा किलोमीटर अंतर, जिल्हा सोलापूर) गौरीहर पुजला! तिथं आता सुरेख मंदिर आहे शिवाचं. त्याला म्हणतात गौरीहर. हळदी लागल्या, लगीन झालं. त्या जागी सुंदर देऊळ बांधलं. ते म्हणजे शिखरासाठी प्रसिद्ध असलेलं मुख्य मंदिर. शंभ-उमेची भेट झाली ना तिथं, म्हणून इथं दोन लिंगे

दिसतात. या देवळाच्या उजव्या बाजूला खाली पायऱ्या उतरून गेलं की, अमृतेश्वराचं देऊळ लागतं. हेही शिवपार्वतीचंच.

गुप्तलिंग, गौरीहर, अमृतेश्वर, डोंगरमाथ्यावरील मुख्य मंदिर, यांशिवाय उमा विसावली आणि जेथे लिंगरूपानं शंभू प्रकट झाला अशा ठिकाणी म्हणजे पिंपरीस 'उंबरदेव', मोहीगावी 'बिलवलिंग', वावरहिरे गावी 'पाणलिंग', भदाळे येथे 'उदितेश्वर', कोथळ्यात 'खामलिंग' अशी (पाच ते पंधरा किलोमीटर परिसरातील) शंभूची मुख्य मंदिरं आहेत. यात्राच करायची आहे त्यानं चोवीस तासांत पायी जाऊन या साऱ्यांचं दर्शन घ्यायला हवं अशी प्रथा आहे.

महाराष्ट्रांत घृष्णेश्वर, औंढ्या नागनाथ, परळी वैजनाथ, भीमाशंकर, त्र्यंबकेश्वर अशी ज्योतिर्लिंगे असता शिखर-शिंगणापूरला एवढं महत्त्व कसं आलं? हा प्रश्न कितीकांना तरी सहजगत्या पडतो. त्याचीही उत्तरं ही भक्तिगंगाच देऊ शकते.

पुणे प्रांतीच्या पुरंदर भागातील सासवडजवळचा मूळ तेल्याभुत्या. शंभूवर त्याची अनन्य भक्ती. लहानपणापासून शंभूचा ध्यास. कऱ्हेचं पाणी तांब्याच्या निमुळत्या रांजणात भरून घेऊन, सन्मित्र सांगाती घेत, अनवाणी, चैत्राच्या रणरणत्या उन्हातून उभी चढण असलेला 'मुंगीघाट' पार करीत तो शिंगणापूरला येई आणि कऱ्हेच्या पाण्याची धार 'शंभू'वर धरी! यात्रेला निघताना मागे आशापाश राहू नयेत म्हणून घरकुलं पेटवून देई. यात्रेहून माघारा परतून आला की, नवं कोरं घर उभं दिसे! तेल्याभुत्याच्या या कावडीनं कावडींची प्रचंड परंपरा निर्माण केली. अगदी मोजक्या शब्दांत सांगायचं तर 'पंढरीच्या पांडुरंगाची पताका वाळवंटी नाचवीन', ही जशी पंढरीच्या वारकऱ्यांची परंपरा तशी 'कावडीनं पाणी आणून धार धरणं' ही शिंगणापूरच्या शंभूची परंपरा. त्यात खरा मानकरी तेल्याभुत्या. आज त्याच्या म्हणून दोन कावडी येथे येतात. मुंगीघाटातून चैत्र शुद्ध द्वादशीला दुपारच्या प्रहरी कावडींचा सोहळाच चालतो. सहा एकशे फुटांची (दोन एकशे मीटर) चढण चढून कावडी येथे आणतात. खालच्या टोकाशी निमुळते होत जाणारे दोन तांब्या-पितळेचे रांजण, ते बनविलेला आडवा अवजड लाकडी दांडा, त्यावर सुरेख नक्षीकाम, अशा कावडी दोर लावून दोनदोनशे माणसं त्या वर आणीत असतात. पण तेल्याभुत्याच्या कावडी लोक हातांच्या साखळ्या धरून आणतात. दोर वापरीत नाहीत. या साऱ्यातून मुंगीघाट तीर्थक्षेत्र बनला. 'शंभूची कावड वाहणं' कुलव्रत बनलं. महाराष्ट्रातील ती एक सांस्कृतिक परंपरा बनली.

शिंगणापूरचं हे जसं भक्तिमाहात्म्य मोठं तसंच त्याचं ऐतिहासिक माहात्म्यही मोठंच. छत्रपती श्रीशिवाजीमहाराजांचं हे कुलदैवत. त्यांचे आजोबा मालोजीराजे



शंभु महादेवाच्या स्नानासाठी येणारी कावड

आणि त्यांचे बंधु विठोजीराजे येथे नित्य दर्शनाला येत. मालोजीराजे यांनी येथील यात्रेकरूंचे पाण्याचे हाल दूर व्हावेत म्हणून दीड किलोमीटर परिघाचे विशाल तळे बांधले. मालोजीराजे यांच्यापासून महाराष्ट्रातील सर्व थोर पुरुषांनी अपवाद वगळता या स्थानास भेट दिली आहे. त्यामुळे उभ्या महाराष्ट्राचेच हे कुलदैवत बनले आहे. छत्रपती शिवाजीमहाराज आणि त्यांचे थोरले बंधु संभाजीराजे यांच्या नावाची एक शिलाही येथील मुख्य मंदिराच्या वेशीचे पायागती पहावयास मिळते. त्यावर 'श्रीशिवाजीराजे भोसळे' व 'संभाजीराजे भोसळे', असे शब्द कोरलेले आहेत. पूर्वी 'ल'चे जागी 'ळ' वापरीत असत. त्यावरून ही त्याच काळातील असे मानावयास जागा आहे.

महाराष्ट्रातील सारेच भाग येथील श्रीशंभूच्या पायी मस्तक ठेवीत असले आणि मनी भक्तिभाव बाळगीत असले, तरी विशेषकरून मराठवाड्याचे पाचही जिल्हे येथे येत असतात. त्यातील काही थोडे दर अमावास्येची वारी करणारे आहेत. पण बहुसंख्य चैत्र शुद्ध पंचमी ते पौर्णिमा या दहा दिवसांच्या यात्रेत सामील होणारे आहेत. यात्रेच्या अमाप गर्दीतही शंभूला प्रिय असणारी अभिषेक पूजा साधण्यात ते स्वतःला धन्य मानतात. यात्रेत विशेषतः अष्टमी ते द्वादशी

या काळात जेवढ्या अभिषेक पूजा होतात, तेवढ्या वर्षभरात मिळून क्वचितच होतात. शंभूसाठी म्हणून दर सोमवारी बाजूस ठेवला जाणारा 'पै-पाव आणा', 'मुडूप' किंवा 'कानगी' या नवसाखातर या वेळी शंभूस अर्पण केला जातो. दिवसमानानुसार एकादशीच्या 'समयांती' बांधल्या जाणाऱ्या पूजा कमी झाल्या आहेत. पण शंभूला प्रिय असणाऱ्या 'दवणा' या सुगंधी वनस्पतीने सारा परिसर या काळात दरवळून जातो. नांदेड-परभणी या भागातील लोक 'शीतल पूजा' बांधण्यासाठी येत असतात. पण यात्रेच्या काळात ही पूजा बांधली जात नसल्याने इतर वेळी त्यासाठी ते येतात. शीतल पूजा म्हणजेच दहीभात पूजा. मूल व्हावे यासाठी अमृतेश्वराच्या देवळात नवस बोलणारे कावडीबरोबर मूल घेऊन चढतात, तर काही शंभूला यात्रा काळात 'कठाळ्या' (गोऱ्हा) जोडतात, तर कुणी पायऱ्यांना दगड बसवितात. यात्राभर अशी भाविकांची धांदल चालू असते. त्यातच पताका, कावडींची अखंड माळ लागून रहाते. 'चारी वाटा फुलून' जातात. सारा परिसर शंभूच्या गजरांनी भरून आणि भारून जातो. त्याच धांदलीत इथं येऊन सुखावलेली लोकगंगा पुढल्या वर्षी पुन्हा परत येण्यासाठी म्हणून माघारी फिरते.



# छत्रपतींचे कुलदैवत

लेखिका : डॉ. सरोजिनी बाबर

छत्रपती भोसल्यांचे कुलदैवत म्हणजे शिखर शिंगणापूरचा शंभु महादेव. 'हर हर महादेव'च्या रणगर्जनेसह शत्रूवर तुटून पडणाऱ्या शिवछत्रपतींच्या मराठ्यांना पूज्य असलेले हे देवस्थान. सातारा जिल्ह्यातील दहिवडीपासून अंदाजे १२-१३ मैलांवर असलेले हे स्थळ. महादेवाचा हा डोंगर सह्याद्रीचा एक भाग असून एकांतात रहाण्यासाठी सोयीस्कर असा आहे. ठाण्याच्या तुरुंगातून पळून आलेल्या त्रिंबकजी डेंगळ्यांनी याच डोंगरात आपला गुप्त वास ठेविला होता. पश्चिम बाजूला कृष्णा, उत्तरेला नीरा, पूर्वेला भीमा आणि दक्षिणेला वेरळा अशा नद्यांच्या मध्यभागी असलेला हा डोंगर चढत चढत उंच होत गेलेला आहे. येथे पायथ्याला आहे गाव शिंगणापूर आणि शिखराला आहे देव महादेव. शंकराच्या



शिखरावरील नक्षीकामाचा नमुना

कैलासावरील निवासस्थानाप्रमाणे ही जागादेखील उंचावर असल्याने या ठिकाणास 'दक्षिण कैलास' म्हटले जाते.

देवगिरीच्या यादववंशातील महापराक्रमी व धर्मनिष्ठ राजा सिंघण हा सातारा भागामध्ये बरेच दिवस तळ ठोकून होता. इ.स.च्या तेराव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्र जिंकल्यानंतर त्याचे येथे वास्तव्य झाले होते. या राजाला देवपूजेचा नाद होता. देवळे बांधण्याची आवड होती. मायणी गावी असलेले संगमेश्वराचे देऊळ हे त्यानेच बांधलेले आहे. सध्याचे शिंगणापूर (सिंघणापूर) हे गाव त्यानेच वसविले व शिखरावरील महादेवाचे देऊळही त्यानेच बांधले आहे. या देवळाच्या शिखरावरील नक्षीकाम प्रेक्षणीय असून चुन्यातील नक्षीकामाचा तो एक अप्रतिम नमुना मानला जातो. या सिंघण राजाचे वेळेपासूनच हे गाव प्रसिद्धीस येत गेले.

देवगिरीला लखूजी जाधवाच्या पदरी असलेल्या मालोजी भोसल्याला ज्या वेळी राज्यवैभव प्राप्त झाले त्या वेळी त्याने आपल्या कुलदैवताचे, शंभु महादेवाचे, स्मरण केले. सिंघणापूर येथे पाण्याचे दुर्भिक्ष असल्याने तेथे पाण्याचा एक मोठा तलाव बांधला. त्या संदर्भातील उल्लेख अनेक ठिकाणी सापडतात.

मालोजी राजा हा शिवभक्त असल्याने शंकराला प्रसन्न करून घेण्यासाठी म्हणून त्याने सागराप्रमाणे विस्तीर्ण असा गोड पाण्याचा तलाव शंभुपर्वतावर खणविला असल्याची माहिती कवींद्र परमानंदाच्या शिवभारतामध्ये पहिल्या अध्यायात सातव्या पृष्ठावर आली आहे ती अशी :

> **दक्षिणस्यां दिशि श्रीमान् मालवर्मा नरेश्वरः ।**
> **स शंभुः प्रीतये शंभोर्भक्तरसागरसन्निभम् ।**
> **मधुरं खानयामास तडागं शंभुपर्वते ॥**

अशाच प्रकारचा आणखी एक उल्लेख वेदकृत 'साहित्यमकरंद' या ग्रंथामध्ये आलेला आहे. या ग्रंथाचे संपादन तंजावरच्या पं. वैजनाथशास्त्री यांनी केलेले आहे.

> सौराष्ट्रदेशात् समुपागतोसौ श्रीसोमनाथः प्रमथाधिनाथः ।
> अधित्यकां वीक्ष्य गिरेर्विशालां चकार वासं किल चन्द्रचूडः ॥
>
> सुशीलभक्तस्य च भक्तितुष्टः तत्राधिवासस्य महादयालुः ।
> न तत्र नीरं न तरुप्रचारः न कोऽपि लोके वसतिं करोति ॥
>
> तत्रापि शंभुर्निजभक्तलोभात् कैलासवासंमनुते महेशः ।
> तस्मिन्स्थले सूर्यकुलावतंसो मालोजिनामा कृतवान् तटाकम् ॥*

*भारत इतिहास संशोधन पत्रिका, वर्ष १० वे, अंक २ रा, पान १४१.

महाराष्ट्राचे एक थोर संशोधक कै. श्री. वि. का. राजवाडे यांनी संपादित केलेल्या जयराम पिंडयेकृत 'राधामाधवविलासचंपू' या ग्रंथाच्या पान २३० वरही याच प्रकारचा मजकूर आलेला आहे—

**श्रीमन् मालनृपालनंदन महादेवैकेभक्त त्वया ।**
**चक्रे यच्छिखरे निरंबुकुहरे पीयूषतोयं सरः ॥**

**तद्दृष्ट्वा तृषितः स याचिकजनः सानंदमित्युक्तवान् ।**
**अंभोधिजलधिः पयोधिरुदधिर्वी रान्निधिर्वारिधिः ॥**

याचा अर्थच असा की, शिखर शिंगणापूरच्या महादेवाच्या स्थळी पाण्याची केली गेलेली ही व्यवस्था लोकांना विशेष वाटल्याने या कृत्याची नोंद जाणकारांनी आवर्जून केली आहे.

छत्रपती श्रीशिवाजीराजे यांच्या बखरीमध्ये पान २ वर या संदर्भात आलेला मजकूर असा आहे :

'राजियांचे बाप थोरले महाराज राजश्री शहाजीराजे यांचे बाप म्हणजे राजियांचे आजे राजश्री मालोजीराजे व विठोजीराजे भोंसले, हे निजामशाही वजीर दौलता करून तोलदारीने होते. त्यांची निष्ठा श्रीशंभुमहादेव यांचे भजनी बहुत होती. त्यास शिखरी यात्रा चैत्रमासी भरते. पाच सात लक्ष माणसे मिळतात. पाणियाचे बहुत संकट. उदक नाही. तीन कोशांवरून उदक आणतात. लोक श्रमी बहुत होतात. म्हणून राजश्री मालोजीराजे यांनी तेथे जागा पाहून तळे एक थोर बनविले. तळे संपूर्ण उदकाने भरले. हे करिताच रात्रौ श्रीशंभुमहादेव स्वप्नास येऊन प्रसन्न होऊन बोलिला जे "तुझ्या वंशात आपण अवतार घेऊ. देव ब्राह्मणांचे संरक्षण करून म्लेंच्छांचा यज्ञ करतो. दक्षण देशाचे राज्य देतो." म्हणोनि त्रिवार वचन करून वर दिला. त्याजवरून राजे यांस बहुत संतोष होऊन दानधर्म बहुत केला.'*

राजाराम छत्रपतींच्या आज्ञेने जिंजीस लिहिलेल्या सभासद बखरीतही थोडाफार फरकाने हाच मजकूर आलेला आहे. छत्रपती शिवाजीमहाराजांचे आजे मालोजीराजे यांनी बांधलेले हे तळे 'शिवतीर्थ' या नावाने प्रसिद्ध आहे. या तलावाची बांधणी सुंदर व घाटदार आहे.

शिंगणापूरच्या महादेवाच्या दर्शनासाठी म्हणून शिखरावर जाण्यासाठी चांगल्या दगडी पायऱ्या आहेत. या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना नांदती घरे आहेत. थोडीशी चढण चढून वर गेल्यानंतर येथे शांतिलिंग स्वामींचा मठ लागतो. या स्वामींनी स्वतःजवळ काहीच धनदौलत नसल्याकारणाने आपले पुण्यच गहाण

*छत्रपती श्रीशिवाजीराजे यांची बखर, पान २
संपादक : शं. ना. जोशी, प्रकाशनकाल १८ ऑक्टोबर १९६०.



देवदर्शनाचा एक मार्ग

ठेवले व काशीयात्रा केली असे सांगतात! या मठानंतर पुढच्या चढणीवर खडकेश्वराचे देऊळ आहे. तेथील महादेवाचे दर्शन घेऊन पुढे गेल्यावर पहिला मोठा दरवाजा लागतो. हा दरवाजा किल्ल्याच्या मुख्य दरवाजाप्रमाणे दिसतो. हा दरवाजा सोलापूरकडील एका धनगराने सुमारे दोनशे वर्षांमागे बांधलेला आहे. असाच एक मोठा दरवाजा मंदिराच्या वरच्या भागामध्ये आहे. शंभु महादेवाच्या या मुख्य दरवाजाच्या पायरीवर शहाजी भोसले व शिवाजी भोसले अशी नावे कोरलेली आहेत.

शंभु महादेवाचे व अमृतेश्वराचे अशी दोन देवळे शिंगणापुरी आहेत. पैकी अमृतेश्वराचे देऊळ हे अलीकडे छत्रपती शाहूराजाचे कारकिर्दीत बांधले आहे. दीपमाळेवरील 'विरूबाई' या नावावरून आणि जागोजाग 'श्रीचरणी तत्पर बसवंतराय निरंतर' अशा कोरलेल्या मजकुरावरून हे सिद्ध होते. त्याचप्रमाणे सोलापूर जिल्ह्यातील नातेपुते गावच्या श्री. नाईक पाथरवट यांचेकडील कागदपत्रांवरून शंभु महादेवाच्या देवळाच्या बांधकामाविषयीही बरीच माहिती मिळते. या कागदपत्रातील हा मजकूर असा :

'श्रीशंभु महादेवाच्या शिखराचे काम पुरातन होते. ते पाडून नवे राजश्री बसापा खोजे यांनी करावयास आरंभ केला. त्यावर हवलदार बाजी गोळे व

कारकून बयाजीपंत ठेविले होते. त्यांच्या हाताखाली राजश्री महादाजी बाजी चाडगे देशमुख कर्याति मलवडी यांनी कारेगार पाथरुटाचे नाईक तिघे दिले. त्यांची नावे बाळाजी नाईक बळवंते व गंगाजी नाईक उबाळे व तिसरा सलुतानजी नाईक शिखरे ऐसे दिले. लोणारीयाचे नाईक दोघे दिले. त्यांची नावे मानाजी नाईक कर्चे व शाबाजी नाईक कर्चे ऐसे पाचजणे दिले. काम चालीस लागले. दरमहा रुपये एक हजार खर्चत होते. शके १६५७ राक्षस नाम संवत्सरे श्रावण वद्य १४ बुधवारी दोन घटकांत मोजे मोहीच्या मार्गी श्रीबेलदेवा-सन्निध पुष्य नक्षत्री पहिले तासी गूळ वाटून प्रारंभ केला. त्या खाणीतील देवळीची चौकट व खांब कर्णख्याले किरकोळी धोंडे पाडिले व कारोंडे येथील खाणीचे तुळवट मात्र आणिले. कित्येक थोर धोंडे येथे मिळत नव्हता तो तेथून आणीत होते. शके १६५८ नळनाम संवत्सरे चैत्र वद्य १२ रविवारी पूर्वा भाद्रपदा नक्षत्री अभिजित मुहूर्ती दोन प्रहरा देवालय पाडावयास आरंभ केला. अडीच महिने पाडावयास लागले. चैत्र वद्य १२पासून अधिक मासासह ज्येष्ठ शुद्ध एकादशीपर्यंत पाडिले. उपरांतिक पाया देवळाचा घालावयास मुहूर्त ज्येष्ठ शुद्ध १२ सहत्रयोदशी अनुराधा नक्षत्री चतुर्थ प्रहरी मुहूर्त पायाचा चिरा मांडावयास राजश्री महादाजी बाजी चाडगे देशमुख व सप्तऋषीहून नागजोशी व कित्येक ब्राह्मण येतेसमई राजश्री बसवंतराव खोजे घेऊन आले. क्षेत्रीचे ब्राह्मण परशराम काळो बडवे व गंगाधरभट जोशी व समस्त क्षेत्र उभयता होते. पुण्याहवाचन याज्ञिक करून धोंडयाचे पूजन करून गर्ता खाणून धोंडयाचा डबा केला होता. त्यात रुप्याचे संपुष्ट घालून त्यात पंचरत्ने व एक मोहोर व एक रुपया ऐसा संपुष्टात घालून निक्षेपण केले. वरील मुहूर्त करून चिरा मांडिला. उपरांतिक श्रीदेव व ज्योतिषी बडवे व देशमुख देशपांडे यांस वस्त्रे दिली. तद्दिनी अन्नसंतर्पण केले. शके १६६२ रौदीनाम संवत्सरे श्रावण शुद्ध ८ सोमवारी विशाखा नक्षत्री चतुर्थ प्रहरी ध्वजी समाप्त करून वरी कळस मुलाम गिरीचा बैसविला. एकूण चार वर्षे दोन महिने देवालयाच्या कामास लागले. शके १६६२ रौद्रनाम संवत्सरे शशीऋतौ माघ शुद्ध १३ रविवारी श्रीशंभूच्या देवालयाचे उद्यापनास प्रारंभ केला. चतुर्दशीस सोमवारी संध्याकाळी श्रीशंभू आच्छादित होता. त्याचे उद्धरण केले व शांत्यर्थ नवकुंडी विधान केले. देवालयाच्या पश्चिमभागी सन्निध लक्ष होम केला. माघ वद्य ५ रविवारी यज्ञ समाप्त झाला. ज्यावरी लिंग होते ते तळचीत जलप्रवाह केला. उद्धरण लिंगासी दहीभात घातला. मण ११ व पंचयक्षपरमान्ने नैवेद्य ५ मणाचा केला. दही व दूधतूप व उसाचा रस घागरीने पंचामृत स्नान करून एक अतिरुद्र अभिषेक केला. कर्म वेदोक्त केले. ब्राह्मणास दक्षणा व गोप्रदाने द्रव्यद्वारा दिली. ऋत्विज ब्राह्मणास सहस्त्र मुद्रा कर्ण मुद्रा सोवळी घशाला . . . दिली . . .'

यापुढील मजकूर महत्त्वाचा असूनही हा कागद अर्धवट फाटका हाती आल्याने संपूर्ण असा देता आलेला नाही. तथापि एवढ्यावरूनही पुष्कळशी कल्पना येते.

श्रीशंभु महादेवाच्या देवळाला चांगल्यापैकी तट असून बाहेर येण्याजाण्यासाठी म्हणून चार दरवाजे ठेविलेले आहेत. त्याचप्रमाणे शिलालेख असलेल्या लहानमोठ्या दीपमाळाही देवळाच्या प्रांगणात आहेत.

देवळाच्या मुख्य मंडपात चार खांबांच्यामध्ये पाच नंदी आहेत. या खांबांच्यावर नाचगाणी, शिकारी व लढाया यांची चित्रे कोरलेली आहेत. येथील छतावरील नक्षीकामही सुरेख आहे. मंडपाला चार लहान लहान असे कळस चोहो बाजूंना असून मधला गाभाऱ्यावरील कळस एखाद्या गोपुराप्रमाणे साठएक फूट उंचीचा असा आहे.

गाभाऱ्यात दोन स्वयंभू लिंगे आहेत. भगवान शंकर व आदिमाया पार्वती यांची ही प्रतीके आहेत. त्यांच्या दर्शनासाठी छत्रपतींच्या घराण्यातील थोर थोर भक्त शिखरी येऊन गेलेले आहेत. छत्रपती संभाजी व छत्रपती राजाराममहाराजांनी दिलेल्या दानपत्राच्या प्रारंभी—

> नमस्तुंगशिरश्चुंबिचंद्रचामरचारवे ।
> त्रैलोक्यनगरारंभमूलस्तंभाय शंभवे ॥

असा श्लोक याच कुलदेवतेच्या नमनाच्या निमित्ताने आलेला आहे.

शंभु महादेवाचे मंदिर असलेल्या या स्थळास 'शंभु महादेवाचा डोंगर' असे म्हटले जाते व या महादेवास 'मोठा महादेव' म्हणून संबोधिले जाते. कोणी कोणी या डोंगरास 'शिखर' असेही म्हणतात.



गाभाऱ्यातील नंदी

शिखर शिंगणापूरच्या या देवळात तीन घंटा असून रोमन लिपीत १६३०, १७१६ व १७२९ असे इसवी सन कोरलेले आहेत.

मुख्य देवळाच्या आग्नेय दिशेला भटांची विहीर आहे. या विहिरीत उतरताना डाव्या बाजूच्या भिंतीत असलेल्या एका दगडावर—

**श्रीनृसिंहप्रपौत्रो यो दक्षिणामूर्ति पोत्रकः ।**
**शंभोः सुतश्च योगींद्रः सखारामाय ते नमः ।।**
**श्रीशंभोः स तया तावत् सख्यश्चापांगवी क्षणात् ।**
**अर्कभट्टाभिधेनेयं रचिता दीर्घवापिका ।।**

असा श्लोक आढळून येतो.*

इ.स. १७४० मध्ये तयार झालेल्या शंभु महादेवाच्या देवळाच्या आग्नेय दरवाजाने बाहेर आल्यानंतर बळी महादेवाचे (अमृतेश्वराचे) देऊळ लागते. या देवळाचे बांधकाम यादवकालीन थाटाचे आहे. या देवळाच्या दक्षिण बाजूस शहाजी, शिवाजी व संभाजी छत्रपती यांच्या स्मरणार्थ बांधलेल्या समाधींच्या इमारती आहेत.

चैत्री पौर्णिमेला व शिवरात्रीला शिखर शिंगणापुरीला फार मोठी यात्रा भरते. समर्थ तीर्थावळीत त्यासंबंधीचा उल्लेख—

**माणदेसी महादेव । तेथे उदंड मोहोछाव ।**
**मिळे यात्रा समुदाव । सिखरीचा संभया देव रे ।।**

असा आलेला आहे. संत तुकाराममहाराजांच्या कावडयांच्या अभंगात—

**या रे वंदूं शिखरातळ । चैत्रमास पूर्णकाळ ।।**

असा हाकारा आलेला आहे. श्रींच्या उत्सवासाठी मातोश्री जिजाबाई आई-साहेबांनी शके १६०१ मध्ये नेमणूक करून दिल्याचीही इतिहासात नोंद आहे.

शिंगणापूरच्या एका कोष्टी जमातीच्या कुटुंबातर्फे दर वर्षी चैत्र शुद्ध अष्टमीला शिवपार्वतीचा विवाहसोहळा साजरा केला जातो. त्यावेळी मिरवीत आणल्या जाणाऱ्या पागोटयाचा एक पदर मुख्य देवळाच्या कळसास बांधतात व दुसरा पदर अमृतेश्वराच्या कळसास बांधण्यात येतो. दर सोमवारी सकाळपासून संध्याकाळपर्यंत हे पागोटे वर्षभर विणण्यात येते. हे काम पिढयान्‌पिढया भक्तिभावाने पार पाडले जाते.

**वाहे शंभूची कावडी । पुण्य अवघे सावडी ।।**

या मध्वमुनींच्या सांगण्याप्रमाणे शंभु महादेवाची कावड वाहण्याचे पुण्यही काही भक्त पदरी पाडून घेत असतात.



*श्री. ग. ह. खरे, भा. इ. सं. मं. त्रैमासिक, अंक ४था, वर्ष ११वे, पान ३ व ४.

सोरटी सोमनाथाप्रमाणेच महादेवाचे हे स्थानही पूज्य मानले गेल्याने 'सोरटीचा देव माणदेसा आला' अशी भाषा श्रीसमर्थ रामदासांनी केली आहे. शंभु महादेवाच्या या देवळामध्येच मोठी क्रांतिकारक अशी घटना घडून गेल्याचे सांगतात.

निजामशाहीशी वितुष्ट निर्माण झाल्यावर शहाजीराजे विजापूरकरांच्याकडे नोकरीसाठी जावयास निघाले. पाठीवर गनीम होताच. अशा अवस्थेत गरोदर असलेल्या जिजाऊसाहेबांना शिवनेर गडावर पोचवून ते वाटेत शिखर शिंगणापूर येथे मुक्कामास राहिले. राजे चिंतागत अवस्थेत होते. तेथे रात्री झोपी गेले असताना त्यांना शंभु महादेवाचा दृष्टांत झाला. 'चिंता करू नको, सगळे व्यवस्थित होईल.' असे देवाने सांगितले. सकाळी जागे झाल्यावर शहाजीराजांनी शंभुदेवाचा प्रसाद समजून त्या क्षणापासून आपल्या जरीपटक्याबरोबरच भगवा झेंडा स्वीकारला.

फलटणच्या बजाजी निंबाळकराला विजापूरच्या बादशहाने बाटवून आपली मुलगी दिली होती. त्यापूर्वी याच बजाजी निंबाळकराची बहीण सईबाई ही शिवाजीराजांना दिली होती. त्यामुळे मातोश्री जिजाबाईने या बजाजी निंबाळकरास शिंगणापुरी परत बोलावून शुद्ध करून घेतले. तो मुसलमान होण्यापूर्वी झालेल्या त्याच्या मुलाला आपली नात व शिवाजीराजांची कन्या सखूबाई ही दिली. हे धर्मांतर व ही सोयरीक याच देवळात फार दूरदृष्टीचे राजकारण घडविणारी अशी क्रांतिकारी घटना म्हणून इतिहासात नोंदविली गेली आहे.

शिखर शिंगणापूरचा हा मोठा महादेव महाराष्ट्रातील जनसामान्यांचे कुलदैवत आहे. या कुलदैवताची यात्रा फार मोठी भरत असून माणसांनी चारी वाटा फुललेल्या आढळून येतात. छत्रपतींच्या घराण्यातील वंशजांकडून आजही या दैवताची मनोभावे पूजा बांधिली जाते.






लेखक : **श्री. डी. डी. रेगे**

**शिवाजीमहाराजांचा कुलस्वामी**

एका स्वयंभू दैवताच्या कृपाप्रसादाने आपण शककर्ता झालो, आपले यशापयश ज्याच्या पवित्र चरणांवर शिवछत्रपतींनी वाहिले आणि ज्याला ते आपला कुलस्वामी मानीत आले, असा श्रीशंभु महादेव आणि त्याच्या जागृत वास्तव्याचे निसर्गरम्य शिखर शिंगणापूर साऱ्या महाराष्ट्राला परिचित आहे. पुण्याहून हे शिखर ८६ मैलांवर असून फलटणहून या ठिकाणी यायला गाड्या सुटतात. तसेच नातेपुते व दहीवडी मार्गेही इकडे येण्यासाठी मोटारची सोय आहे. शिंगणापूरचा परिसर उघड्या बोडक्या, लहानमोठ्या टेकड्यांनी वेष्टित असून, आजूबाजूला रखरखीत रूक्ष पठारे आणि शेतजमिनी मैलोमैल दुतर्फा पहुडलेली दिसतात.

कोथळा घाटातील नागमोडी वाटावळणांवरून मोटार धावत असता, उंच शिखरावर विराजमान झालेले शंभु महादेवाचे सुंदर मंदिर जेव्हा दृग्गोचर होऊ



शंभु महादेवाचे मंदिर

लागते, तेव्हा प्रवासी भक्त आजूबाजूची रूक्षता विसरून एका प्रासादिक सृष्टीत आपोआप रममाण होतो. तिथे जाऊन केव्हा एकदा देवाच्या पायावर डोके ठेवतो असे त्याला होऊन जाते. जणू एखादी प्रदक्षिणा घालावी अशा वक्राकार गतीने उंच उंच टप्पे घेत वाहन पळत असता किती तरी वेळा लपंडाव खेळत हे पवित्र शिखर भाविकांची उत्कंठा शिगेला पोहचवीत असते. खुद्द शिंगणापूरच्या हद्दीभोवती मोगली निवडुंगाची असंख्य झाडी जागजागी उभी असून, डोंगरा-भोवती वेढलेले हे शिखर नजीक येताच त्याची भव्यता, तशीच रम्यताही विलोभनीय भासते. इकडून तिकडे बागडणारे वानरांचे कळप तर या साऱ्या दृश्याला रोमांचकारी सजीवता आणतात.

शिखराच्या पायथ्याशी एक छोटासा एस.टी. स्टँड आहे. पायथ्याच्या पायऱ्यांपाशी पोहोचेपर्यंत, साधारण दोन फर्लांग दुतर्फा एकसारखी लहानमोठी झाडे पसरलेली दिसतात. सपाट पट्ट्यावरून चालावे लागते. तिथून थोड्याशा पायऱ्या चढून गेल्यावर समोरच मध्यभागी छोटेसे गजानन मंदिर आहे. या ठिकाणी भागवत सप्ताह लाऊड स्पीकरवर चालू असतो. इथून अगदी नजीकच एक प्रचंड असा कमानदार दगडी दरवाजा आहे. शेंडगे नावाच्या धनगराला देवाने दृष्टांत देऊन त्याची मनीषा पूर्ण केली म्हणून त्याने तो उभारला. याची उंची १६ मीटर आहे. याच्या वरच्या गच्चीवरून पंढरपूरची चंद्रभागा दिसते. दरवाजाच्या दोन्ही देवडींत सुंदर दगडी हत्ती आहेत. या कमानीतून श्रीशंभु महादेवाच्या मंदिराचे स्पष्ट दर्शन व्हावे अशा कलापूर्ण रीतीने हा दरवाजा बांधला आहे.

### पाच भव्य नंदींचा दरबार

इथून दिसणारी शंभु महादेवाची भव्यता आणि त्याचे गजबजलेले अस्तित्व पाहून छाती दडपून जाते. उंच उंच अशा किती तरी लहानमोठ्या दीपमाला आणि मंदिरावरील बारीक बारीक नक्षीकाम पाहून डोळे अक्षरशः फिरू लागतात. एखाद्याच्या भव्य मुकुटावर पुरोभागी चक्राकार नक्षी काढावी अशी त्याची सुंदर रचना आहे. कळसाखाली मध्यावर नंदीवर बसून चाललेला महादेव व त्याच्या मागे असलेली उमा हे शिल्पकाम अतिशय रमणीय भासते.

मंदिराच्या सभामंडपात तर हेमाडपंती पद्धतीच्या नक्षीदार अशा असंख्य स्तंभाच्या चौकात तांब्या-पितळीने मढविलेल्या पाच भव्य नंदींचा दरबार मोठ्या थाटात भरलेला दिसतो. तेथे उभे राहून देवाला नवस करण्याची प्रथा आहे. गाभाऱ्यात हरिहरांची दोन स्वयंभू अशी लहानमोठी लिंगे असून, त्यांना तांब्याची टोपणे आहेत. लिंगासमवेत त्यांचीही पूजा करतात. मंदिराच्या उजव्या बाजूस

खाली अमृतेश्वराचे ऊर्फ बळीचे अतिशय पुरातन असे दुसरे देऊळ आहे. बळीने या ठिकाणी तपश्चर्या केल्याची आख्यायिका सांगण्यात येते.

मंदिराच्या डावीकडे शहाजी, संभाजी व शिवाजी यांची स्मृतिमंदिरे असून त्यांच्या खालून मंदिराकडे जाण्यासाठी भुयार असल्याच्या खाणाखुणा स्पष्ट दिसतात. शिवाजीच्या स्मारकाशेजारी कोल्हापूरच्या हिराबाई नामक राणीचे स्मारक बांधल्याचा उल्लेख सातारा गॅझेटियरमध्ये आढळतो. बळीच्या देवळा-पासून थोड्या अंतरावर खोल दरीप्रमाणे उतरलेले पर्वताचे अगदी उभे, भयानक कडे असून पर्वताच्या एका उतरणीला मुंगीघाट अशी संज्ञा आहे. या घाटातच एका अवघड जागी कड्यातले स्वयंभू असे शिवलिंग आहे. सासवडची भुत्यातेल्याची प्रसिद्ध कावड या घाटातूनच वर चढते. ती चढण चढत असता शंकराला 'हे म्हाद्या धाव, मला सांभाळ' अशा एकेरी शब्दाने ओरडण्याची प्रथा आहे. भुत्यातेल्याला १०० पासांचा व खळदच्या कावडीला ३५ पासांचा मान आहे. त्यामुळे त्यांना वंशपरंपरा यात्राकर द्यावा लागत नाही. अशा लहानमोठ्या अनेक कावड्या असतात. कळकांच्या भक्कम काठ्यांच्या तिकाटण्यावर पाण्याने भरलेल्या घागरींना कावड अशी म्हणण्याची चाल आहे.

### मंडपातील फिरते दगडी खांब

सातारा जिल्ह्यातील माण तालुक्याच्या माळावर समुद्रसपाटीपासून २९०० फुटां-वर शिखर शिंगणापूर गाव आहे. येथील देऊळ चालुक्यकालीन असून त्याचा जीर्णोद्धार शिवाजीमहाराजांनी केला. स्थापत्यशास्त्राचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. या देवळाच्या मंडपात फिरते दगडी खांब आहेत. शिंगणापूरच्या

शिखरावरची वस्ती



पायथ्याशी असलेला प्रचंड चौफेर तलाव शिंगण राजाने बांधला, परंतु तो कच्चा असल्याने शिवाजीमहाराजांचे आजोबा मालोजीराजे यांनी तो स्वखर्चाने बांधून गावकऱ्यांच्या पाण्याची मोठी सोय केली. या तलावात नानाविध प्राण्यांची सुंदर अशी दगडी शिल्पे चौफेर आहेत. मुंगीघाटाची भयानकता, मंदिराची कलात्मकता व या पुष्करतीर्थाची भव्यता प्रेक्षणीय आहे.

बडवे, जंगम, कोळी इत्यादी लोकांची या ठिकाणी वस्ती असून, महादेवाच्या पूजेअर्चेवर त्यांचा योगक्षेम चालतो.

**यात्रेचा भव्य सोहळा**

शिखर शिंगणापूरची यात्रा चैत्र शुद्ध पंचमीपासून पोर्णिमेपर्यंत भरते. सुमारे दोन लाख यात्रेकरू तरी येतात. सर्वांत जास्त भरणा मराठवाड्यातील परभणी, नांदेड, उस्मानाबाद, औरंगाबाद, बिदर, बीड या भागातील लोकांचा असतो. प्रवेशपत्रिकेचे ग्रामपंचायतीला ४०,००० रुपये उत्पन्न होते. माणसी कर ४० पैसे असतो. येथील जंगमदीक्षा घेतलेले माळी दोन वेळा देवाला नैवेद्य दाखवितात. ते अविवाहित असतात. त्यासाठी त्यांना उजनी व चोराड या ठिकाणी जमिनी आहेत. पंचमीस देवाला हळद लागते व अष्टमीस लग्न असते. याचे मानकरी बडवे, पाटील, चौधरी व शेटे आणि मंदिराचे मालक स्वतः साताऱ्याचे महाराज त्याचप्रमाणे कोल्हापूरचे नरेश असतात. आवसगाव व खांबसवाडी येथील साळी लोकांनी आणलेले पागोटे शिंगणापूरचे कोळी महादेव बळीच्या शिखरांना बांधतात. हे पागोटे साळी लोक दर सोमवारी वर्षभर तयार करीत असतात. या दोन देवळांतील अंतर ५५० फूट आहे. चैत्र शुद्ध एकादशीला घोड्यावर बसून व पायांत जोडे घालून थेट देवळात जाण्याचा मान नागपूरकर भोसले यांना आहे. त्यांचे आगमन पाहण्यासाठी हजारो लोक दुतर्फा जमतात.

महादेवाच्या देवळाला मजले असून त्याचे काम चुनेगच्ची आहे. त्याच्याशी स्पर्धा न व्हावी यासाठी गावात एकही माडीचे घर नाही. तसेच या घरांच्या भिंतीही मातीच्या कामातल्या आहेत. हे इथले एक वैशिष्ट्य आहे. शिखर परिसरात बैरागी मठ, शिपलागीर आखाडा, दसनामी आखाडा, हे आखाडे आहेत. शंकराला दवणा ही सुगंधी वनस्पती फार आवडते म्हणून ती मोठ्या प्रमाणावर शेतीमधून लावली जाते.






लेखक : श्री. कृ. भा. बाबर

त्र्यंबकेश्वर हे भगवान शंकराचे, महादेवाचे, नाव. अमरकोशामध्ये महादेवाची नावे पुढीलप्रमाणे दिलेली आहेत :

शंभू, ईश, पशुपति, शिव, शूलिन्, महेश्वर, ईश्वर, शर्व, ईशान, शंकर, चंद्रशेखर, भूतेश, खंडपरशु, गिरीश, गिरिश, मृड, मृत्युंजय, कृत्तिवासस्, पिनाकिन्, प्रमथाधिप, उग्र, कपर्दिन्, श्रीकंठ, शितिकंठ, कपालभृत्, वामदेव, महादेव, विरूपाक्ष, त्रिलोचन, कृशानुरेतस्, सर्वज्ञ, धूर्जटि, नीललोहित, हर, स्मरहर, भर्ग, त्र्यंबक, त्रिपुरांतक, गंगाधर, अंधकरिपु, क्रतुध्वंसिन्, वृषध्वज, व्योमकेश, भव, भीम, स्थाणु, रुद्र, उमापति.

ह्यांपैकी काही नावे सर्वसामान्य लोकांच्या परिचयाची आहेत, सर्वच नाहीत. ह्या नावांत त्र्यंबक हे एक नाव आहे. त्र्यंबक आणि त्र्यंबकेश्वर एकच.



श्रीत्र्यंबकेश्वर

महादेवाला ज्योतिर्लिंगही म्हणतात. आपल्या देशात अशी बारा ज्योतिर्लिंगे आहेत. त्र्यंबकेश्वर हे त्यांपैकीच एक आहे. महादेवाला त्रिनेत्रही म्हणतात. त्र्यंबक आणि त्रिनेत्र यांचा अर्थ एकच–तीन नेत्र असलेला. महादेवाला तीन नेत्र आहेत अशी कल्पना आहे. त्याचा तिसरा डोळा कपाळावर असतो. हा डोळा अदृश्य आहे. पण महादेवाला जेव्हा संताप येतो, तेव्हा तो हा तिसरा नेत्र उघडतो. आणि मग साऱ्या जगाची जाळून राख करून टाकतो!

ब्रह्मा, विष्णू व महेश ह्या तीन देवतांपैकी, महेश किंवा महेश्वर हे दैवत जगाचा संहार करणारे आहे, अशी कल्पना आहे. महादेव हा दयाळू आहे, भोळा सांब आहे आणि तो भक्ताच्या हाकेला धावून जाणारा आहे, अशीही कल्पना आहे.

भारतामध्ये महादेवाची देवळे सर्वत्र आहेत; गावोगाव आहेत आणि उंच डोंगरावर व नद्यांच्या काठी किंवा बेटांवरही आहेत. सामान्यतः पर्वताचा किंवा डोंगराचा उंच भाग असला, शिखर असले की, तेथे हटकून महादेवाचे देऊळ असते. शिवाचे किंवा महादेवाचे दर्शन सहजासहजी घडू नये, त्यासाठी कष्ट पडावेत, ह्या हेतूने प्राचीन काळापासून ह्या देवाची मंदिरे अवघड जागी उभारण्यात आलेली आहेत.

त्र्यंबकेश्वर हे देवस्थानही असेच थोडे अवघड जागी असलेले असे आहे. हे ठिकाण नाशिक शहराच्या पश्चिमेला अठरा मैलांवर आहे. आज त्याचे अवघडपण



त्र्यंबकेश्वर मंदिर

कमी झालेले आहे. कारण तेथवर चांगला रस्ता झालेला आहे. पण पूर्वीच्या काळच्या दंडकारण्यात मंदिरापर्यंत जाणे इतके सोपे नव्हते.

त्र्यंबकेश्वर हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असले, तरी येथील लिंगाचा एक विशेष आहे. हे लिंग तीन उंचवट्यांच्या आकाराचे आहे, म्हणजे ते ब्रह्मा, विष्णू व महेश अशा त्रिमूर्तींचे आहे ; आणि त्याच्या भोवताली सतत निर्मळ पाणी वाहत असते. शिवाय ह्या पवित्र क्षेत्रात प्रत्यक्ष गंगानदी अवतरली आहे आणि तीही उत्तरेत प्रकट होण्यापूर्वी. म्हणून शेजारच्या ब्रह्मगिरी डोंगरावर उगम पावलेल्या गोदावरी नदीस आदिगंगा असे म्हणतात. पुराणात तसा उल्लेख आढळतो.

त्र्यंबकेश्वर आदिगंगा गोदावरी हिच्या उगमाजवळ असल्याने या क्षेत्राला अधिक पावित्र्य प्राप्त झालेले आहे.

गोदावरी नदीला 'गौतमी गंगा'ही म्हणतात. ह्या संबंधातील एक पौराणिक कथा अशी आहे :

प्राचीन काळी गोदावरीच्या उगमाच्या ह्या प्रदेशात गौतमऋषी रहात असे. त्या काळी ह्या प्रदेशात कुशाचे म्हणजे दर्भाचे रान माजलेले होते. ह्या दर्भाचा गौतमऋषीला उपयोग होत होता. एकदा एक गाय ह्या रानात शिरली. गौतमऋषीला ते बरे वाटले नाही. त्याने रागाने एक दर्भ त्या गाईच्या अंगावर फेकला. दर्भ टोचताच त्या गाईचे प्राणोत्क्रमण झाले. गाय मेली. गौतमाची परीक्षा पहाण्यासाठी देवानेच गाईचे रूप घेतलेले होते. गौतमऋषीच्या हातून गोहत्या घडली. गोहत्येचे पातक त्याच्या हातून घडले. आता हे पातक कसे नाहीसे करावे म्हणून त्याने त्या काळच्या काही जाणत्या लोकांचा सल्ला घेतला. तेव्हा त्याला गंगेत स्नान करण्याचा सल्ला देण्यात आला. गंगेत स्नान केल्याने गोहत्येचे पातक नाहीसे होते, असे त्याला सांगण्यात आले. आता तेथे जवळपास गंगा नव्हती. म्हणून भगवान शंकराची प्रार्थना करून तेथे गंगा प्रकट व्हावी, असा प्रयत्न गौतमऋषीने चालविला. पुष्कळ दिवस तपश्चर्या केल्यावर गौतमाला शंकर प्रसन्न झाले आणि त्यांनी गौतम रहात होता त्या ठिकाणी गंगा निर्माण केली. तेथे गंगा वाहू लागली. पण आपणाला आपल्या इच्छेविरुद्ध येथे यावे लागले म्हणून ती गौतमाला त्रास देऊ लागली. तो ऋषी पात्रात उतरून स्नान करू लागला की, ती प्रवाह बदलत असे. तेव्हा गौतमऋषीने आपल्या मंत्रसामर्थ्याने दर्भ मंत्रून तेथे चौरसाकार जागा केली व त्या जागेत गंगेचा प्रवाह वाहू लागेल असे केले. तेव्हापासून ह्या जागेला कुशावर्त हे नाव पडले ; व ह्या कुशावर्तात स्नान केल्याने पुण्य लागते, अशी समजूत प्रचलित झाली.

त्र्यंबकेश्वराचे मुख्य जलतीर्थ म्हणजे हे कुशावर्त कुंड. ते ८० फूट लांब व ७२ फूट रुंद असून काटकोन चौकोनाच्या आकाराचे आहे. चारी बाजूंना उतरण्यास पायऱ्या आहेत. मात्र त्याची पूर्व बाजू मोकळी असून बाकीच्या तिन्ही बाजूंना प्रवाशांसाठी ओवऱ्या बांधलेल्या आहेत. ह्या ओवऱ्यांत अनेक देवदेवतांच्या मूर्ती आहेत. एका कोनाड्यात शेषशाईची मूर्ती आहे.

गोदावरी नदीचा उगम झालेल्या ब्रह्मगिरीच्या पायथ्याला त्र्यंबकेश्वराचे देवालय आहे. हल्लीचे चांगले देऊळ श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनी बांधलेले आहे. हे मंदिर श्रीयंत्राकार असून हेमाडपंती बांधणीचे आहे. मंदिराभोवती चिरेबंदी तट आहे. मंदिरातील शिवासमोर शुभ्र पाषाणाचा नंदी आहे. हे मंदिर गोपुरासह पाच दालनी आहे. महाद्वार पूर्वाभिमुखी आहे.

त्र्यंबकेश्वराच्या परिसरात गंगा मंदिर (गंगालय), श्रीकृष्ण मंदिर, परशुराम मंदिर, श्रीराम मंदिर इत्यादी मंदिरे आहेत.

ह्या परिसरात ब्रह्मगिरीच्या पायथ्याशी गंगासागर तलावाच्या पश्चिम भागी श्रीनिवृत्तिनाथांचे समाधिमंदिर आहे. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरमाउलीचे वडील बंधू व गुरू. निवृत्तिनाथ हे नाथपंथी होते. नाथपंथी प्रसिद्ध सत्पुरुष गोरखनाथ यांचे शिष्य गहिनीनाथ हे निवृत्तिनाथांचे गुरू. गहिनीनाथही त्र्यंबकेश्वराचे परिसरात रहात होते. नाथसंप्रदायाचे आद्य गुरू भगवान शंकर मानले जातात. निवृत्तिनाथ हे स्वाभाविकपणेच त्र्यंबकेश्वराचे भक्त. त्यांची समाधी येथेच आहे, हे एक वैशिष्टयच आहे.

बारा ज्योतिर्लिंगांपैकी हे एक असल्याने त्र्यंबकेश्वराच्या दर्शनास लोक सततच येत असतात. तथापि सिंहस्थाच्या वेळी येथें नाशिकप्रमाणेच मोठी यात्रा



त्र्यंबकेश्वर मंदिराचे प्रवेशद्वार

भरते. बारा वर्षांनी गुरूचा (गुरु ग्रहाचा) जेव्हा सिंह राशीत प्रवेश होतो, तेव्हा सिंहस्थास आरंभ होतो. सर्वसाधारणपणे हा काल एक वर्षाचा असतो. ह्याविषयीची एक कथा अशी आहे:

देव आणि दानव यांनी मिळून समुद्रमंथन केले, तेव्हा त्यातून चौदा रत्ने बाहेर पडली. अमृतकुंभ हे त्यांपैकीच एक. ह्या अमृतकुंभाच्या मालकीबद्दल जेव्हा देव आणि दानव यांच्यामध्ये भांडण जुंपले, तेव्हा विष्णूने गरुडाला तो कुंभ दूर नेऊन ठेवण्यास सांगितले. गरुड तो कुंभ घेऊन निघाला, तेव्हा त्याच्या मागे दानव लागले. त्यांच्या त्या झटापटीत अमृतकुंभातील अमृताचे काही थेंब गोदावरीत पडले. त्र्यंबकेश्वर–नाशिक परिसरातही पडले. तसेच ते उज्जैन, हरिद्वार, अलाहाबाद येथेही पडले. तेव्हा ह्या चारी ठिकाणी सिंहस्थाच्या काळात सगळ्या भारतातील भक्त जमा होतात आणि गोदावरी, क्षिप्रा, यमुना व गंगा ह्या नद्यांत स्नान करून पुण्य पदरात पाडून घेतात.

त्र्यंबकेश्वर हे एक खेडेगाव आहे, तरी तेथे नगरपालिका आहे. यात्रेकरूंच्या सोयीसाठी येथे अनेक धर्मशाळाही आहेत. येथील उपाध्यायांच्याकडे रहाण्याची व जेवणाची सोयही होते.

एक तीर्थ म्हणून त्र्यंबकेश्वराला महत्त्व आहेच. पण येथील हवापाणीही चांगले असल्याने काही काळ येथे वास्तव्य करण्यासाठी म्हणूनही काही लोक येतात.





# भीमाशंकर

लेखक : श्री. चिंतामणराव नामदेव मोरभारे

भीमाशंकर हे पुणे जिल्ह्यातील खेड-आंबेगाव तालुक्यात सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर गर्द राईच्या वनात वसलेले बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असे रम्य व पवित्र ठिकाण आहे. पुराणात या क्षेत्राचे वर्णन 'डाकिन्यां भीमशंकरम्' असे केलेले आढळते.

हे पवित्र क्षेत्र पुण्यापासून १२० कि.मी. अंतरावर असून पुणे-नाशिक रस्त्याला आंबेगाव तालुक्यात या ठिकाणी जाण्यासाठी मंचर-भीमाशंकर हा जिल्हा प्रमुख रस्ता जातो. हा रस्ता १८९६ साली पडलेल्या दुष्काळाला तोंड देण्यासाठी म्हणून तयार केला असून या रस्त्याचे डांबरीकरणाचे काम महाराष्ट्र शासनाने नुकतेच हाती घेतलेले आहे. पुण्याहून सकाळी ६-१५ वाजता एक व तळेगावाहून दुपारी १-३० वाजता एक अशा दोन एस.टी.च्या गाड्या सध्या या क्षेत्राकडे जाण्या-येण्यासाठी सुटतात. हिंदूंचे एक पवित्र क्षेत्र व थंड हवेचे रमणीय ठिकाण म्हणून महाराष्ट्रात हे क्षेत्र प्रसिद्ध आहे. या ठिकाणीच भीमानदीचे उगमस्थान असून हीच नदी पुढे पंढरपूर क्षेत्री चंद्रभागा या नावाने ओळखली जाते. या क्षेत्राबाबत पुराणात जी कथा सांगितली आहे ती अशी:

त्रिपुरासुर नावाचा एक दैत्य होता. त्याने देवदेवतांस अतिशय त्रास दिला म्हणून ब्रह्मदेव व देवांचा राजा इंद्र यांनी एक हजार वर्षे तपश्चर्या केली व त्यानंतर भगवान शंकर प्रसन्न झाले. त्यांनी ब्रह्मदेवाला व इंद्राला आदिमाया शक्तीची आराधना करावयास सांगितले. त्यांनी कमंडलूत पाणी आणून कमलपुष्पाने पूजा करून आदिमाया शक्तीची स्थापना केली. हीच शक्ती या क्षेत्री श्रीकमलजादेवी म्हणून प्रसिद्ध आहे. इंद्र आणि ब्रह्मदेव यांना केलेल्या आराधनेनंतर भगवान शंकर व श्रीकमलजादेवी यांनी एकरूप होऊन त्रिपुरासुर दैत्याशी महाभयंकर युद्ध केले. सर्व देवांना बरोबर घेऊन एक पाय नदीच्या काठावर व

भरते. बारा वर्षांनी गुरूचा (गुरु ग्रहाचा) जेव्हा सिंह राशीत प्रवेश होतो, तेव्हा सिंहस्थास आरंभ होतो. सर्वसाधारणपणे हा काल एक वर्षाचा असतो. ह्याविषयीची एक कथा अशी आहे:

देव आणि दानव यांनी मिळून समुद्रमंथन केले, तेव्हा त्यातून चौदा रत्ने बाहेर पडली. अमृतकुंभ हे त्यांपैकीच एक. ह्या अमृतकुंभाच्या मालकीबद्दल जेव्हा देव आणि दानव यांच्यामध्ये भांडण जुंपले, तेव्हा विष्णूने गरुडाला तो कुंभ दूर नेऊन ठेवण्यास सांगितले. गरुड तो कुंभ घेऊन निघाला, तेव्हा त्याच्या मागे दानव लागले. त्यांच्या त्या झटापटीत अमृतकुंभातील अमृताचे काही थेंब गोदावरीत पडले. त्र्यंबकेश्वर–नाशिक परिसरातही पडले. तसेच ते उज्जैन, हरिद्वार, अलाहाबाद येथेही पडले. तेव्हा ह्या चारी ठिकाणी सिंहस्थाच्या कालात सगळ्या भारतातील भक्त जमा होतात आणि गोदावरी, क्षिप्रा, यमुना व गंगा ह्या नद्यांत स्नान करून पुण्य पदरात पाडून घेतात.

त्र्यंबकेश्वर हे एक खेडेगाव आहे, तरी तेथे नगरपालिका आहे. यात्रेकरूंच्या सोयीसाठी येथे अनेक धर्मशाळाही आहेत. येथील उपाध्यायांच्याकडे रहाण्याची व जेवणाची सोयही होते.

एक तीर्थ म्हणून त्र्यंबकेश्वराला महत्त्व आहेच. पण येथील हवापाणीही चांगले असल्याने काही काळ येथे वास्तव्य करण्यासाठी म्हणूनही काही लोक येतात.





# भीमाशंकर

लेखक : **श्री. चिंतामणराव नामदेव मोरमारे**

भीमाशंकर हे पुणे जिल्ह्यातील खेड-आंबेगाव तालुक्यात सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर गर्द राईच्या वनात वसलेले बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असे रम्य व पवित्र ठिकाण आहे. पुराणात या क्षेत्राचे वर्णन 'डाकिन्यां भीमशंकरम्' असे केलेले आढळते.

हे पवित्र क्षेत्र पुण्यापासून १२० कि.मी. अंतरावर असून पुणे-नाशिक रस्त्याला आंबेगाव तालुक्यात या ठिकाणी जाण्यासाठी मंचर-भीमाशंकर हा जिल्हा प्रमुख रस्ता जातो. हा रस्ता १८९६ साली पडलेल्या दुष्काळाला तोंड देण्यासाठी म्हणून तयार केला असून या रस्त्याचे डांबरीकरणाचे काम महाराष्ट्र शासनाने नुकतेच हाती घेतलेले आहे. पुण्याहून सकाळी ६-१५ वाजता एक व तळेगावाहून दुपारी १-३० वाजता एक अशा दोन एस.टी.च्या गाड्या सध्या या क्षेत्राकडे जाण्या-येण्यासाठी सुटतात. हिंदूंचे एक पवित्र क्षेत्र व थंड हवेचे रमणीय ठिकाण म्हणून महाराष्ट्रात हे क्षेत्र प्रसिद्ध आहे. या ठिकाणीच भीमानदीचे उगमस्थान असून हीच नदी पुढे पंढरपूर क्षेत्री चंद्रभागा या नावाने ओळखली जाते. या क्षेत्राबाबत पुराणात जी कथा सांगितली आहे ती अशी:

त्रिपुरासुर नावाचा एक दैत्य होता. त्याने देवदेवतांस अतिशय त्रास दिला म्हणून ब्रह्मदेव व देवांचा राजा इंद्र यांनी एक हजार वर्षे तपश्चर्या केली व त्यानंतर भगवान शंकर प्रसन्न झाले. त्यांनी ब्रह्मदेवाला व इंद्राला आदिमाया शक्तीची आराधना करावयास सांगितले. त्यांनी कमंडलूत पाणी आणून कमलपुष्पाने पूजा करून आदिमाया शक्तीची स्थापना केली. हीच शक्ती या क्षेत्री श्रीकमलजादेवी म्हणून प्रसिद्ध आहे. इंद्र आणि ब्रह्मदेव यांना केलेल्या आराधनेनंतर भगवान शंकर व श्रीकमलजादेवी यांनी एकरूप होऊन त्रिपुरासुर दैत्याशी महाभयंकर युद्ध केले. सर्व देवांना बरोबर घेऊन एक पाय नदीच्या काठावर व

दुसरा पाय रथात ठेवून भीमरूप (उग्ररूप) व शिवपार्वती यांनी एक होऊन त्रिपुरास ठार मारले. म्हणून या स्थानास 'भीमशंकर–भीमाशंकर' हे नाव प्राप्त झाले. हे भीमरूप धारण करताना शंकराच्या अंगातून ज्या घामाच्या धारा वाहिल्या तीच भीमानदी होय. त्रिपुरास मारले त्यावेळी भगवान शंकराने विष्णूचा बाण व वासुकीचे धनुष्य करून ब्रह्मदेवास रथाचा सारथी केले होते. हा दिवस कार्तिक शुद्ध पौर्णिमेचा होता म्हणून ह्या दिवसास त्रिपुरी पौर्णिमा म्हणतात. या दिवशी येथे देवाचा जन्मदिवस मोठ्या समारंभाने साजरा केला जातो. या परिसरात रहाणारी आदिवासी महादेव कोळी मंडळी बायकामुलांसह दूध तांदूळ घेऊन मोठ्या संख्येने या क्षेत्री हजर रहातात. सार्वजनिक नैवेद्य तयार करून मोठ्या भाविकतेने तो देवाला दाखविला जातो. सर्वजण एका पंगतीत बसून चांद्याचे पानावर नैवेद्य घेऊन बसतात. पौर्णिमेच्या रात्री दुधातुपाने न्हाऊन निघालेले सुंदर देवालय पाहिले व देवालयाच्या शिखरावर जागोजागी तेवणाऱ्या पणत्या दिसल्या म्हणजे लोकांच्या जीवनात नवा आनंद निर्माण होतो. येथील लिंग हे स्वयंभू असून देवालय हेमाडपंती आहे. पिंडीवर घातलेले नाना प्रकारचे अलंकार, भोवताली तेवणाऱ्या समयांचा झगझगाट, उदबत्यांचा धुंद सुगंध, देवळातील घाटांचा खणखणाट व टाळयांचा गजर यामुळेही हे सारे क्षेत्र धुंद होऊन जाते. त्रिपुरी पौर्णिमेचा सोहळा हा या ठिकाणचा एक आगळा सोहळा आहे.

या क्षेत्री बरीच दैवते जागोजागी आहेत. पूर्वेस व दक्षिणेस विठ्ठल मंदिर असून ते अनादिकालापासूनचे आहे. भीमानदीचे काठी गुप्तलिंग म्हणून एक शंकराचे स्थान आहे. येथे गणपतीचेही एक स्थान असून त्यास साक्ष विनायक म्हणून पुराणात संबोधले आहे. कुश अरण्यात शंकराचे आणखी एक स्वयंभू स्थान आहे. जवळच व्याघ्रपाद नामक स्थान असून वंध्यातीर्थ म्हणून एक प्रसिद्ध तीर्थ आहे.

पश्चिमेस हनुमान तलाव म्हणून एक रम्य ठिकाण असून या ठिकाणी अंजनी मातेने तपश्चर्या केल्याची माहिती पुराणात आहे. पतन स्थान म्हणून सह्याद्रीचा एक नागफणीसारखा कडा असून त्याला हल्ली नागफणी पॉईंट म्हणतात. या नागफणी पॉईंटच्या खाली शंखिनी-डाकिनी नावाचा गोल डोंगर आहे. त्यास कळवातणीचा महाल (कलावंतिणींचा महाल) असे म्हणतात. वर नमूद केलेल्या ठिकाणी कलावंतिणींचे वास्तव्य पूर्वी होते. ह्या कलावंतिणींची अशी ख्याती होती की, जो यजमान प्रथम तिच्या घरी येईल त्यास सर्व सुखोपभोग देऊन त्यास पती मानून त्याची ती सेवा करीत असे. अशा या पतिव्रता वेश्येचा लौकि स्वर्गापर्यंत पोहोचला तेव्हा तिची परीक्षा घेण्यासाठी देवाने एका अतिशय वृ म्हाताऱ्याचे रूप घेतले व तो तिच्या घरी गेला. त्याने आपली शेवटची इच्

प्रदर्शित केली. कलावंतिणीने शेजेची संपूर्ण तयारी करून त्या वृद्धास पलंगावर बसवीत असतानाच तो पलंगावरून खाली पडून गतप्राण झाला. अशा या मानलेल्या पतीबरोबर ह्या कलावंतिणीने सती जाण्याची तयारी केली. चिता पेटल्यावर तिने चितेत उडी घेतली. हे पाहून भगवान शंकर प्रसन्न झाले व त्यांनी तिला वरदान दिले. अशा ह्या पतिव्रता वेश्येच्या मूर्ती आजही त्या ठिकाणी आपणांस पहावयास मिळतात. या ठिकाणी उभे राहिले असता कुलाबा, ठाणे व रत्नागिरीचा परिसर दिसतो. (किंबहुना कोकण प्रदेश पोटाखाली येतो.) येथून मुंबई सुमारे ३० मैल आहे.

भीमाशंकर क्षेत्रापासून गणपतीघाट व बैलघाट असे दोन घाटरस्ते कोकणात जातात. पौषी पौर्णिमेला ठाणे जिल्ह्यातील म्हसे या क्षेत्री मोठी यात्रा भरते. नगर, नाशिक, पुणे, ठाणे, कुलाबा या जिल्ह्यांतून लक्षावधी बैल यावेळी येथे बाजारात येतात. या यात्रेत बैलांच्या खरेदी व विक्रीचे जे भाव ठरले जातात त्यावरच वरील जिल्ह्यांचा वार्षिक खरेदी विक्रीचा भाव रहातो. पुणे जिल्ह्यातील आंबेगाव व खेड या तालुक्यांतील जनावरे याच बैलघाटाने म्हसे गावी आणली जातात. बैलघाट हा कुलाबा जिल्ह्यातील नांदगाव या ठिकाणी जातो.

उत्तरेस वर नमूद केलेल्या कमलजादेवीचे स्थान असून देवळाचे जवळूनच बैलघाट व गणपतीघाट जातात. देवालयाचे पाठीमागे पेशव्यांनी बांधलेली एक विहीर असून तिची डागडुजी आंबेगाव पंचायत समितीने केली आहे. शेजारी पुणे जिल्हा परिषदेची एक धर्मशाळा असून माघ वद्य १३ स महाशिवरात्रीस जी यात्रा भरते त्या यात्रेचे मुख्य कार्यालय या ठिकाणी असते. भाषादेवीचे एक स्थान येथे असून पापमोचनी या नावाचे एक तीर्थही आहे. येथून जवळच गर्द झाडीत डोंगराचे माथ्यावर ब्रिटिशांनी बांधलेला एक सुंदर बंगला असून त्याची व्यवस्था महाराष्ट्र शासनाचे जंगल खाते पहाते. येथून देशावरील सर्व भाग पोटाखाली येतो. विशेषत: ठोकळवाडी धरणाचे पाणी चांदीच्या ताटा-सारखे चकाकताना दिसते. या क्षेत्राची माहिती पुराणातील सह्याद्री खंडातील रथचक्र भागात सहाव्या अध्यायात व गुरुचरित्रातही मिळू शकते. वर नमूद केलेल्या म्हसे या गावी यात्रेपूर्वी एक-दोन दिवस सर्व शिवारात पाण्याचे झरेच झरे निघून सर्व खाचरे पाण्याने तुडुंब भरतात व यात्रेच्या कालावधीत या ठिकाणी जनावरे पाणी पितात. यात्रा संपली की पाण्याचे झरेही नाहीसे होतात. सर्व रान उजाड होते. भीमाशंकर हे स्थान लोकांना कसे माहीत झाले त्याची एक लोककथा खालीलप्रमाणे सांगितली जाते :

या भागात एक गौळी राजा (गुरव) होता. त्याची घरची एक गाय दूध न देता रानात आल्यावर एक वेळूचे बेट होते त्या ठिकाणी आपले दूध सोडीत

असे. ही गाय फक्त आपल्या वासरास पाजीत असे. बरेच दिवस असे चालले असता एके दिवशी त्या राजाच्या मुलाने पाहून ही हकिगत आपल्या वडिलांना सांगितली. राजाला भगवान शंकराने स्वप्नात दृष्टांत दिला की, 'राजा माझे येथे वास्तव्य आहे. मला मोकळे कर. व माझी पूजाअर्चा कर' अजूनही याच गुरव घराण्यात पूजेचा वारसा चालत आलेला आहे. राजाने हे वेळूचे बेट तोडून टाकले तेव्हापासून लोकांना हे स्थान माहीत झाले.

श्रीभगवान शंकराचे हे देवालय संपूर्ण दगडी असून हेमाडपंती आहे. देवळावर सोन्याचा सुंदर असा मोठा कळस होता. परंतु १०-१२ वर्षांपूर्वी तो चोरीस गेला. त्या ठिकाणी तशा प्रकारचा दुसरा कळस लोकांनी आता बसविला आहे. देऊळ कोणी बांधले याचा इतिहास अद्याप मिळाला नाही. परंतु आता जो गाभारा



भीमाशंकर मंदिराचे दर्शन

व कळसाचे देऊळ आहे ते इ.स. १२०० मध्ये विनायकराव सावकार नावाच्या इसमाने बांधल्याचा उल्लेख आढळतो. पुढे त्याचे हातून सभामंडपाचे काम होऊ शकले नाही. पण जो छोटा सभामंडप तयार केला त्याचा दरवाजा, पिंडी व मोठा नंदी ही वेगवेगळ्या दिशेस होती. चार-पाच वर्षांपूर्वी पुणे येथील इंजिनियर असोसिएशनने पाहणी करून त्यांचा प्लॅन तयार करून तहसीलदार, खेड यांच्या

अध्यक्षतेखाली जीर्णोद्धार कार्यासाठी एक ट्रस्ट निर्माण केला आहे. देवळासमोर साजेसा सुंदर सभामंडप तयार केला आहे. नंदी, दीपमाळ ही अतिशय सुंदर व सुबक आहेत. आजही कसबी कारागिरांमार्फत ही कामे चालू आहेत. या ट्रस्टने आतापर्यंत वरील कामे, तीर्थाची, विहिरीची दुरुस्ती व देखभाल उत्तम प्रकारे चालविली आहे. श्रीकमलजादेवी देवालयाच्या जीर्णोद्धाराचे कामही आदिवासी पुजारी लोहोकरे मंडळी यांनी हाती घेतले असून हेही देवालय कळसाचे करण्याचा प्रयत्न चालू आहे. या देवालयात पेटलेला अग्नी हा अनादिकालापासून असून तो अद्यापही तसाच आहे असे सांगतात.

या ठिकाणी प्रभु रामचंद्र, संत ज्ञानेश्वर, संत नामदेव येऊन गेल्याचा उल्लेख आहे. श्रीछत्रपती शिवाजीमहाराजही या ठिकाणी येऊन त्यांनी पूजाअर्चा करून येथील गवांदे घराण्यास एक गावही इनाम दिल्याचा उल्लेख सापडतो. हे गाव म्हणजे खेड तालुक्यातील खरोशी हे गाव होय. अजूनही हे गाव देवस्थान इनाम म्हणून चालू आहे. श्रीमंत अहिल्यादेवी होळकर येथे येऊन गेल्याचा पुरावा म्हणजे त्यांनी या ठिकाणी बांधलेली धर्मशाळा होय. पेशव्यांनी या ठिकाणी थोडाफार खर्च केला असून त्यांनी बांधलेली विहीर ही राघोबादादा विहीर म्हणून प्रसिद्ध आहे.






लेखक : **श्री. वि. स. कामत**

कोण जाणे किती काळ लोटला या घटनेला. कदाचित काही शतके किंवा त्याहूनही अधिक काळ लोटला असेल. काळाची पावले फार झरझर पडतात. इतकी वेगाने की, त्याची मोजदाद ठेवणे मानवाला अशक्य होऊन बसते. परंतु स्मृती चिरंतन असतात. अशीच एक संस्मरणीय घटना फार प्राचीन काळात घडली. त्रिपुर नावाचा एक राक्षस होता. अतिशय महत्त्वाकांक्षी. त्याची जिद्द म्हणे सर्व दुनिया काबीज करायची. परंतु त्यांच्या पूर्वजांप्रमाणे त्याने रक्तलांछन कृतींचा अंगीकार केला नाही. तर शांततेच्या मार्गाने परंतु हमखास यश मिळेल अशा रीतीने पावले टाकली. त्याने कडक तपश्चर्या केली. इतकी कडक की, सर्व आयुष्यात अन्नपाण्याचा लवलेशही प्राशन केला नाही मग सुखासीन वस्तूंचा उपभोग तर दूरच राहो. मेरु पर्वतावर दोन हात आकाशाकडे जोडून तो अखंड स्थिर राहिला. हवेशिवाय जगण्यासाठी दुसरे तिसरे काहीच त्याने घेतले नाही. अशा स्थितीत शतकानुशतके घालविली परंतु त्याचे स्थैर्य अजिबात ढळले नाही. उलट त्याचे आत्मिक बल वाढले व त्यामुळे देवांनाही भीती वाटू लागली म्हणून त्यांनी इंद्राला याचना केली की त्रिपुराची प्रचंड शक्ती ही एक भयग्रस्त घटना आहे व या संकटातून आम्हांला वाचविण्यासाठी ताबडतोब इलाज व्हावा. म्हणून तो विचारमग्न झाला व स्वत:शीच काही योजना आखू लागला, परंतु त्या अवधीत त्रिपुराने बराच यशाचा पल्ला गाठलेला होता. काम, क्रोध, भय, मद, मोह, मत्सर या षड्रिपूंना त्याने केव्हाच आपलेसे करून टाकले होते. त्यामुळे त्याच्या हातून कोणतेही पाप घडण्याची शक्यता उरली नव्हती. इंद्राला दुसरा कोणताच मार्ग उरला नाही. त्याने ब्रह्माकडे धाव घेतली. या वयोवृद्ध तपस्वीने व स्वर्गाधिपतीने इंद्राची तक्रार शांतपणे ऐकून घेतली व सर्वांचे संरक्षण करण्याची उपाययोजना करण्याचे आश्वासन दिले. ब्रह्मदेव निमिषात त्रिपुर ज्या स्थळी होता त्या ठिकाणी

प्रकट झाले व त्रिपुराच्या भयंकर तपास अनुलक्षून म्हणाले, 'हे त्रिपुरा, तुझी तपश्चर्या पाहून मी बेहद्द खूष झालो आहे. तुझ्या इच्छा सफल होतील.' असुराने क्षणार्धात उत्तर दिले, माझ्या तीन मागण्या आहेत. त्या अशा : (१) मी देव-दैत्यांना तसेच यक्ष-गंधर्वांना अजिक्य व्हावा, (२) सर्व पृथ्वीभर आकाशात व जलात मला स्वैर संचार करता यावा, (३) त्याचे 'तीन पुर' हे दुसऱ्यांना जिंकण्यास अवघड व्हावे, परंतु त्याला स्वतःला कोणतेही 'पूर' अजिंक्य न व्हावेत किंबहुना इंद्र व त्याची अमरावतीही. ब्रह्मदेवांनी 'तथास्तु' म्हणून वचन दिले, परंतु ते म्हणाले, 'तुझा मृत्यू एका माणसाकडून होईल, की जो एका बाणात तीन पुरांचा संहार करील.' त्रिपुराला ही गोष्ट अशक्य कोटीतील वाटून अपण आता अजिक्य ठरलो म्हणून तो उन्मत्त झाला. त्रिपुराचे पाठीराखे त्याच्याहीपेक्षा उद्धटपणे वागू लागले व 'राक्षसी' राज्य यंत्रणेचा वापर सुरू झाला. त्यामुळे वेद-वेदादी-धार्मिक कार्ये नाश पावली. यज्ञ बंद झाले. ब्राह्मणांचा अपमान होऊ लागला व लोक व्यसनाधीन, सुखलोलुप बनू लागले. सर्वत्र दंग्याधोप्यांचे वातावरण निर्माण झाले. यापूर्वी कधीही धर्माची अधोगती इतक्या कनिष्ठ थराला जाऊन पोहोचली नव्हती. देव व ऋषिमुनी या भयभीत व दुःखद परिस्थितीमुळे शिव-शिष्टाईचे प्रयत्न करू लागले. इंद्र त्यांचा पुढारी. एका मोठ्या तपास प्रारंभ झाला. या तपश्चर्येत त्रिपुराविरुद्ध इंद्र, देव व सर्व ऋषिमुनी सामील झाले. या सर्व देवादिकांच्या भक्तिपूर्ण सहकारी सामर्थ्यामुळे भगवान शंकरांना आनंद झाला व त्यांनी आशीर्वाद दिले. त्रिपुराचा वध करण्यास भगवान शंकरांनी इंद्राला एक अट घातली, की सह्याद्रीतील एका ज्योतिर्लिंगासमोर इंद्राने तपस्वी आराधना केली तरच ते शक्य आहे. इंद्राने सह्याद्रीतील ज्योतिर्लिंगस्थळी जाऊन कडक तपश्चर्या केली. भगवान शंकर तपश्चर्येच्या सातव्या दिवशी प्रकट झाले व त्यांनी त्रिपुरासुराला मारण्याचे आश्वासन दिले. भगवान शंकर उग्र रूप धारण करून नंदीवर आरूढ होऊन एका हातात त्रिशूल व दुसऱ्या हातात डमरू ही आयुधे घेऊन सहस्र रवींच्या तेजाने तळपत असुर सान्निध्यात आले. असुराच्या दुर्वर्तनाचा क्रोध येऊन भगवान शंकरांनी त्याच्या जटा ओढण्यास सुरुवात केली. भगवान शंकराशी सामना देण्याच्या तयारीने त्रिपुराने आपले सैन्य गोळा केले. याच वेळी भगवान शंकरांनी भीमरूप धारण करून भीतिप्रद वातावरण तयार केले. यावरूनच या स्थळाला 'भीमाशंकर' हे नाव प्राप्त झाले असावे असा तज्ज्ञांचा कयास आहे. भीतिप्रद वातावरणामुळे पृथ्वीला हादरे बसू लागले. रक्तपात व संघर्ष बराच झाला. त्रिपुराने निकराने शत्रूशी सामना दिला. त्रिपुराने भगवान शंकरांना हीन लेखून शिव्याशाप देण्यास प्रारंभ केला. परंतु भगवान शंकरांनी आपल्या सामर्थ्याने त्रिपुराच्या अग्निबाणांचा वर्षाव हवेतल्या हवेतच विरून टाकला. त्रिपुरावर

त्रिशूल फेकला. परंतु त्रिपुर ब्रह्मदेवाच्या आशीर्वादामुळे मेला नाही. नुसताच जायबंदी झाला. त्रिपुराने आकाशाकडे धाव घेऊन दारूगोळ्याचा भडिमार केला. भगवान शंकरांनी आपल्या त्रिशूलाने 'त्रिपुरा'चा व त्याच्या तीन पुरांचा समूळ नायनाट केला. असुरांचा नाश तृतीय नेत्राच्या अग्निसामर्थ्याने केला. शिव-त्रिपुर सामना अटीतटीचा झाला. परंतु त्रिपुराचा अंतिम नाश झाल्यामुळे देव व ऋषिमुनींना एका महान संकटातून मुक्त झाल्याचे सुख प्राप्त झाले.

भगवान शंकर या युद्धात अतिशय थकून गेले. त्यांच्या शरीरातून घामाच्या धारा वाहात होत्या. सर्व देव, ऋषिमुनी त्यांना भेटले. त्यांना वंदन करून त्यांनी प्रार्थना केली व त्यांची स्तुतिस्तोत्रे गायिली. देवांनी सुखसमृद्धीचे वातावरण निर्माण केले. दुष्टांचा संहार केला. ह्या जागी नदीच्या रूपाने आजही हे घामरूपी पाणी वाहाताना दिसते. त्या नदीला 'भीमरथी' असे नाव आहे. भीमाशंकराला भेट देणारा प्रत्येक इसम या नदीत स्नान करून पापक्षालनाचे पुण्य पदरात पाडून घेतो.

**एक रमणीय स्थळ**

सह्याद्रीच्या एका उंच टेकडीवर वसलेले हे भीमाशंकराचे मंदिर एक रमणीय स्थळ आहे. येथे सत् आणि असत् यांच्यामधील संघर्षातून विजयी झालेल्या सत्प्रवृत्तीचा आविष्कार दृष्टोत्पत्तीस येतो. भीमाशंकराची प्रतिकृती ही जुन्या मंदिराचे जीर्णोद्धार केलेले देवालय आहे. हे मंदिर आकाराने फारसे मोठे नाही.

भीमाशंकर मंदिराची आणखी एक दर्शनी बाजू



गर्भगृह व अंतर्गृह वेगवेगळी आहेत. तदनंतर मोकळी जागा व विस्तीर्ण आकाश. जुन्या देवालयाचे अवशेष इतस्तत: विखुरलेले आढळतात. प्रवेशद्वालनातच एक दगडी कमान आढळते. ती विशेष कलापूर्ण वाटत नाही. शिवलिंगाच्या नजीकच मंडप आढळतो. तोही मोडकळीस आलेला आहे. मंदिराचे शिखर पाडून त्याचा विनियोग मंदिर दुरुस्तीसाठी केलेला दिसतो व नवीन देवालय बांधणीसाठी त्याच्या उपयुक्त भागाचा वापर केलेला आढळतो. त्यापुढे विस्तीर्ण जागा व जवळच नंदी बसलेला. हे अवशेष पुरातन असून ते इ.स.च्या सातव्या शतकातले असावेत असा तज्ज्ञांचा अभिप्राय पडतो. मूळ मंदिर भतीराव नावाच्या इसमाने बांधल्याचा उल्लेख जिल्हा निर्देशिकेत सापडतो. पण तो खरा नव्हे. येथे शिवलिंग कसे उत्पन्न झाले याची कथा मनोरंजक आहे :

कोणे एके काळी एका जंगलात लाकूड तोडण्यास एक मनुष्य गेला. तो त्याचा केवळ धंदाच, परंतु तो दिवस काहीसा चमत्कारिक ठरला. ज्यावेळी त्याने झाडावर कुऱ्हाड चालविली तेव्हा त्यातून भळभळा रक्त वाहू लागले. तो लाकूड-तोड्या विस्मयचकित होऊन थोडासा गोंधळला आणि काय करावे हे त्याला सुचेना. त्यानेही त्याच्या लहानपणी अशीच आख्यायिका ऐकली होती. ज्यावेळी तो गाईचे दूध काढीत होता त्यावेळी दुधाची धार या जखमेवर पडल्यावर रक्तस्राव बंद झाला. दुसऱ्या दिवशी ज्या जागी हा प्रकार घडला तो पहाण्यास तो गेला असताना त्याला त्या झाडाच्या जागी शिवलिंग आढळले. शिवलिंग निर्माण झालेले पाहून तो त्याच क्षणी परम शिवभक्त झाला व त्या स्थळी एक देवालय बांधले. ही घटना इ.स. १३५० मध्ये घडली असा पुरावा सापडतो.

या देवालयाचा नंतर मोठा विस्तार झाला व त्या सभोवार मंडप बांधण्यात आला. कालांतराने हा मंडप अंतर्धान पावला. गर्भगृह व अंतर्गृह केव्हा बांधले याचा नक्की पुरावा उपलब्ध नाही. परंतु त्यांच्या बांधणीवरून ती इंडो-आर्यन पद्धती अथवा जैन देवालय धर्तीची दिसतात. या देवालयाचे स्तंभ व दरवाजाच्या पट्ट्या अलंकृत कलाकृतीने कोरलेल्या आढळतात. या देवालयावरील कलाकृती नेवासे व टोके येथील देवालयांच्या कलाकृतीसमान तयार केलेल्या आढळतात. येथील मनुष्याकृतीचे पोषाख व अलंकार पाहिले म्हणजे त्याचे कलावंत उत्तरे-कडील असावेत असा निष्कर्ष काढता येतो. हेमाडपंती अथवा यादवशैली ही उत्तरेकडील अथवा दाक्षिणात्य शैलीपेक्षा वेगळीच. भीमाशंकराच्या कलाकृती-वरून हे देवालय इ.स. १७५० च्या आधीचे निश्चितच नाही. शिवलिंगावर अभिषेकपात्रातून पाण्याचा वर्षाव सतत होत असलेला आढळतो.

या देवालयाचा जीर्णोद्धार मराठेशाहीत प्रामुख्याने झालेला आढळतो. पुणे शहरातील दोन मोठ्या धनाढ्य गृहस्थांनी या देवालयाची सुधारणा घडवून

आणली. देवालयातील एका मराठी शिलालेखावरून हे देवालय चिमणाजी अंताजी भिडे-नाईक या इसमाने इ.स. १७३३ मध्ये पूर्णपणे बांधून काढले असा उल्लेख सापडतो. दीक्षित-पटवर्धन यांनी १७३६ मध्ये या देवालयाची नव्याने बांधणी करण्यासाठी आर्थिक सहाय्य दिल्याचे उल्लेख आढळतात ग पेशवाई अखेरपावेतो कोणत्या ना कोणत्या दानशूराने या देवालयाची देखभाल केल्याचे आढळते. रघुनाथराव पेशव्याने येथे विहीर खोदल्याचे व मंदिराचे शिखर नाना फडणिसाने ५०,००० रुपये खर्च करून पुरे केल्याचे दाखले पेशवे दप्तरात मिळतात. या क्षेत्राचा प्रथम ऐतिहासिक उल्लेख शिवकालीन कागदपत्रात सापडतो. शिवछत्रपतींनी खरोसी ग्राम या देवालयास इनाम दिले. दैनंदिन पूजाअर्चा या गावच्या महसुलातून चाले व ही सनद पुढे पेशव्यांनीही चालू ठेवली. याशिवाय अगणित भक्तगणांकडून या देवालयास उदार देणग्या मिळालेल्या आहेत.

महत्वाचे शिवस्थान म्हणून भीमाशंकराचे अखिल महाराष्ट्रात नाव अनन्य-साधारण आहे. पंढरपूर, गाणगापूर क्षेत्रांप्रमाणेच या क्षेत्रांभोवती भीमरथी नदीचे पवित्र वास्तव्य या क्षेत्राचे महत्त्व प्रस्थापित होण्यास कारणीभूत झाले आहे. शिवमंदिराव्यतिरिक्त त्रिपुराचा नाश करणारे येथील गण, शक्ती, डाकिनी यांचे दर्शन घेण्यास यात्रिक लोक विसरत नाहीत. तसेच कमलजादेवीचे देवालयही महत्वाचे मंदिर आहे. या देवीच्या प्रभावाने त्रिपुराचा नाश होऊन सर्व प्रजाजन सुखी झाले. खुद्द ब्रह्मदेवाने या देवीच्या शौर्याचे अभिनंदन करून स्तुतिसुमने वाहिली. ज्या कुंडातून भीमरथी नदीचा उगम झाला ते एक पवित्र स्थळ दाखविण्यात येते. हे चौकोनी आकाराचे असून पाच फूट खोल आहे, त्याच्या तळाशी जिवंत पाण्याचा झरा असल्याचे सांगतात. मोक्षकुंडापासून नदीचा उगम झाला. कौशिक नावाच्या ऋषीच्या पुण्याईने हे कुंड निर्माण झाले. अशी आख्यायिका आहे की, हा ऋषी आपल्या पत्नीसह भीमाशंकर टेकडीजवळ तपश्चर्येस बसला असता रिशिका नावाचा ब्राह्मण त्याच्या आश्रमात आला. तो भटक्याश्रमी होता. कौशिकाने त्याचे आगतस्वागत चांगले केले व त्याची विचारपूस केली. त्याने आपली कथा कथन केली ती अशी :

तो कडक ब्रह्मचारी असून सर्व वेळ पवित्र क्षेत्रांना भेटी देण्यात घालवी. त्यामुळे त्याचे नैतिक बळ वाढले. तो स्वर्ग, भू, पाताळ लोक यांत फिरू लागला. लोकांतील दु:खितांचे आवाज तो जाणू शकला. त्याने बऱ्याच जणांचे सांत्वन केले. आपल्या पूर्वजांना मोक्ष मिळावा म्हणून त्याने भीमरथीच्या मोक्षकुंडातील केलेल्या स्नानाच्या अनुभवाचा प्रत्यय आजही सर्वांना येतो.

मोक्षकुंडाजवळच एक सर्वतीर्थ नावाचे कुंड आहे. ते भशितादेवी मंदिरानजीक आहे. या मंदिराच्या दक्षिणेस कुशारण्य तीर्थ आहे. जवळच ज्ञानकुंड दिसते.

ते श्रीदत्तात्रेयांनी निर्माण केले असे सांगतात. भीमाशंकर माहात्म्यातील 'गुप्त भीमेश' कथा सुप्रसिद्ध आहे. ही कथा अशी :

फार पुरातन काळी प्रियश्व नावाचा राजा नेपाळमध्ये राज्य करीत होता. तो अतिशय बलाढ्य व नेहमी युद्धप्रसंगांत गुंतलेला असे. थोड्याच अवधीत त्याने आजूबाजूचा प्रदेश पादाक्रांत केला. तो जन्मजातच क्षत्रिय असल्यामुळे त्याच्या या वागणुकीविषयी गैर वाटण्याचे काहीच कारण नव्हते. परंतु त्याच्याही पुढे जाऊन त्याने लूट व स्वैराचार यांच्या आहारी गेल्यामुळे त्यांचे प्रजाजन संतप्त झाले व एकत्र येऊन त्यांनी राजास पलायन करावयास लावले. भीतीने राजाने जंगलाची वाट धरली. जंगलात पडणाऱ्या काबाडकष्टामुळे राजाला आपल्या वागणुकीचा पश्चात्ताप झाला व त्याने उर्वरित आयुष्य संन्यासी म्हणून घालविले. गोमील येथील एका महान ऋषीच्या आश्रमाचा आसरा ह्याने घेतला. महामुनीने राजाची दुःखदायक कथा श्रवण केली व त्याला 'गुप्त भीमेश' भीमाशंकर याची आराधना करण्यास सांगितले. त्याप्रमाणे राजाने भीमाशंकर येथे जाऊन पापक्षालनार्थ देवाची याचना केली. देव प्रसन्न होऊन राजास गेलेले राज्य मिळवून दिले.

मोक्षकुंडाजवळील 'ज्ञानतीर्थ' व 'सर्वतीर्थ' या तीर्थांशिवाय भीमाशंकर येथे आणखी तीन तीर्थे आहेत : (१) क्रीडातीर्थ, (२) व्याघ्रपदतीर्थ, (३) एकांतवासतीर्थ. यांपैकी पहिले तीर्थ शिवगौरी क्रीडातीर्थ म्हणून प्रसिद्ध आहे. दुसऱ्या तीर्थाच्या ठिकाणी व्याघ्र तृष्णा भागविण्यास येतात म्हणून नाव पडले असावे व तिसरे तीर्थ शांत ठिकाणी देवभक्तीत मन व्यग्र रहावे म्हणून योजना केली असण्याचा संभव आहे. याशिवाय 'पतनस्थळ' नावाचा एक रमणीय

भीमाशंकर येथील मोक्षकुंड



धबधबा आहे. देवळाच्या पश्चिमेस एका शंभर फूट खोल दरीतून पाण्याचा सतत प्रवाह वाहात असताना दिसतो. या स्थळाविषयी एक दंतकथा सांगतात की, या खोल दरीत उडी घेतली तरी मनुष्य दगावत नाही. याचे कारण काय तर शंकराने त्याचा विद्यार्थी जबाली याला हे वरदान दिले होते. पतनस्थळाला जो भेट देतो त्याचे पापक्षालन होते, असा प्रवाद आहे. ही दंतकथा अशी :

जबाली नावाच्या एका ऋषीचा आश्रम भीमाशंकराजवळ होता. तो लिंगपूजा दररोज दुधाच्या अभिषेकाने करीत असे. त्याच्यासाठी त्याने एक गाय पाळली होती. गाय चरायला गेली की त्याच्या विद्यार्थ्यांपैकी एक तिच्यावर लक्ष ठेवीत असे. त्या गाईचे वासरू आपल्या आईच्या मागोमाग असे. एक दिवस ते वासरू घसरून दरीत पडले म्हणून त्याला वाचविण्यासाठी गाईने उडी घेतली, पण गाय व वासरू दोन्ही दगावली. ही घटना त्या विद्यार्थ्याच्या फार उशिरा ध्यानात आली. त्याला वाटले की आपल्या हलगर्जीपणामुळे गाईचा मृत्यू झाला. गोवधाचे पाप भयंकर असते. त्यामुळे प्रायश्चित्त म्हणून त्यानेही कड्यावरून उडी घेतली. परंतु तो दगडाधोंड्यावर न आपटता एका बलवान माणसाच्या बाहुपाशात सापडलेला आढळला. या घटनेचे त्या विद्यार्थ्याला आश्चर्य वाटले आणि त्याने त्याचे आभार मानले. त्या बलवान माणसाने ही सर्व हकिगत ऐकून घेतल्यावर आपले खरे स्वरूप धारण केले. तो दुसरा तिसरा कोणी नसून शिव अवतारच होता. देवदयेने गाय व वासरू जिवंत झाली. त्यावेळी त्या मुलाने शिवाकडून वर मागून घेतला की, या टेकडीवरून चुकून एखादा इसम पडला तर त्यास इजा होऊ नये व तो जिवंत रहावा. देवाने 'तथास्तु' म्हटले.

### तीर्थक्षेत्राचा परिसर

या भीमाशंकराचा परिसर मनमोडा लेणी, शिवनेरी व बुद्ध भिक्षूंच्या वास्तव्याने पुनीत झालेला आढळतो. भीमाशंकर हे अगदी लहानसे खेडे आहे. तेथील गुरव, पुजारी ब्राह्मण आहेत. पुण्यापासून ७० मैलांवर उंच टेकडीवर वसलेले हे पुरातन शिव मंदिर बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असून येथे महाशिवरात्रीचा उत्सव उत्साहाने साजरा होतो. शेकडो यात्रेकरू तीन दिवस अगोदर मुक्काम करून असतात. येथे पाण्याचा पुरवठा मुबलक. त्यामुळे गावकरी यात्रेकरूंचे आगतस्वागत अगत्याने करतात. भीमाशंकर टेकडीवरून कोकण प्रदेशाचे दृश्य प्रेक्षणीय दिसते. या क्षेत्राचा परिसर सह्याद्रीच्या सौंदर्याने व घनदाट अरण्याने आच्छादिलेला आहे व या ठिकाणी देवांनी आपले चिरवास्तव्य करणे अगदी स्वाभाविक आहे. या क्षेत्रप्रदेशाचे सुंदर वर्णन समर्थ रामदासांनी पुढील पंक्तींत केलेले आढळते :

लवथवती विक्राळा ब्रह्मांडीं माळा,
वीषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा,
लावण्यसुंदर मस्तकीं बाळा,
तेथुनियां जल निर्मळ वाहे झुळझुळां,
जय देव जय देव जय श्रीशंकरा,
आरती ओवाळूं तुज कर्पुरगौरा ॥ १ ॥
कर्पुरगौरा भोळा नयनीं विशाळा,
अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा,
विभूतीचें उधळण शितिकंठ निळा,
ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ॥ २ ॥ जय देव जय देव ॥
देवीं दैत्यीं सागर मंथन पैं केलें,
त्यामाजीं अवचित हलाहल जें उठिलें,
तें त्वां असुरपणें प्राशन केलें,
नीळकंठ नाम प्रसिद्ध झालें ॥ ३ ॥ जय देव जय देव ॥
व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी,
पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी,
शतकोटीचें बीज वाचें उच्चारीं,
रघुकुलतिलक रामदासा अंतरीं ॥ ४ ॥ जय देव जय देव ॥

संत एकनाथांनी भीमाशंकराचे दर्शन घेतल्यावर त्यांना शिव अवतार कसा दिसला याचे वर्णन खालील अभंगात केलेले आढळते :

आरोहण ज्याचे नंदीवरी, वामांकीं शोभे गिरिजा नारी,
त्रिशूळ डमरू शंख कपाल, मस्तकीं गंगा चंद्र भाल,
अंकीं षडानन गजवदन, सदा प्रसन्न ज्याचें ध्यान,
भुतें वेताळ शोभती, हर्षयुक्त उमापति,
अंगीं विभूति लेपन, सदा समाधि तल्लिन,
मुखीं राम नाम छंद, एका जनार्दनी परमानंद ॥

संत महंतांनी वर्णिलेल्या क्षेत्र भीमाशंकराचे माहात्म्य त्रिकालाबाधित असून मनःशांतीसाठी प्रत्येक यात्रेकरूला या क्षेत्रास एकादशीस व महाशिवरात्रीस भेट दिल्याशिवाय राहवत नाही.






लेखक : श्री. कृ. भा. बाबर

शंकराची जी बारा स्थाने बारा ज्योतिर्लिंगे म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीच भीमाशंकर हे एक आहे.

भीमाशंकर म्हणून आज प्रसिद्ध असलेले हे ठिकाण पूर्वीच्या काळी भीमशंकर म्हणून प्रसिद्ध होते.

> सौराष्ट्रे सोमनाथं च श्रीशैले मल्लिकार्जुनम् ।
> उज्जयिन्यां महाकालं ओंकारममलेश्वरम् ॥ १ ॥
>
> हिमालये तु केदारं डाकिन्यां भीमशंकरम् ।
> वाराणस्यां च विश्वेशं त्र्यम्बकं गौतमीतटे ॥ २ ॥
>
> परल्यां वैद्यनाथं च नागेशं दारुकावने ।
> सेतुबन्धे तु रामेशं घृष्णेशं च शिवालये ॥ ३ ॥

ह्या बारा ज्योतिर्लिंगांत भीमशंकर हे नाव डाकिन्यां म्हणजे डाकिनी वनात असलेले म्हणून वर्णन केलेले आहे.



ज्योतिर्लिंग :
भीमाशंकर

आज हे ठिकाण पुणे जिल्ह्यातील आंबेगाव व खेड ह्या तालुक्यांच्या सरहद्दीवर—सह्याद्रीवर आहे. पुण्यापासून सुमारे ७५ मैलांवर हे स्थान आहे. पुण्याहून निघून मंचर, घोडेगाव, शिणोली, डिंभे वगैरे मार्गांनी पोखरी घाटातून या ठिकाणी जाता येते. कोकणातून कर्जत किंवा नेरळच्या बाजूने यायचे झाले तर करवत घाटाने येता येते. आज मंचरवरून एस.टी.नेही जाता येते, पण पूर्वी हा रस्ता चांगला नव्हता. फार पूर्वी तर अत्यंत अवघड वाट होती. दाट झाडी होती आणि डाकिनी वन होते. डाकिनी ही एक मानलेली देवी आहे. डाकिनी शाकिनी ह्या देवी जंगली आहेत.

भीमाशंकर हे सह्याद्रीच्या उंच पठारावर समुद्रसपाटीपासून ३,४५४ फूट उंचावर आहे. हिमालयात केदारलिंग हे यापेक्षा जास्त उंचावर आहे. पण महादेवाची पुष्कळ स्थाने उंच डोंगरावरच आहेत. त्याची बायको पार्वती ही पर्वताची कन्या असल्यामुळे जावयीलाही पर्वतावरचीच ठिकाणे आवडत असावीत! शंकर हा उग्र तपश्चर्या केल्याशिवाय पावणारा देव नाही. तेव्हा असले तप करावयाचे तर ते सहजासहजी तसे करता येणार नाही. महादेव हा योगेश्वर आहे. तो स्मशानात रहाणाराही आहे. आणि शृंगीभृंगी किंवा वेताळ हे त्याचे गण आहेत. तेव्हा त्याची तपश्चर्या ही कठीणच आहे. भीमाशंकर हे एक असे कठीण ठिकाण आहे.

महादेवाची नावे निरनिराळ्या प्रसंगांनी निरनिराळी पडलेली आहेत. त्याचे भीम हे नाव येथे कसे पडले आहे, त्यासंबंधीची एक कथा अशी :

डाकिनी वनामध्ये पूर्वी त्रिपुरासुर नावाचा एक राक्षस रहात होता. पुर म्हणजे मोठे गाव, नगर, शहर. त्रिपुर म्हणजे तीन नगरे. तीन मोठ्या नगरांचा मालक असा हा त्रिपुरासुर होता. हा असुर पुढे फार माजला होता. लोकांना त्याचा त्रास व्हायला लागला. तेव्हा तेथील जनता महादेवाला शरण गेली. भक्ताच्या हाकेला धावणाऱ्या भोळ्या सांबाने त्या लोकांचे संकट दूर करण्याचे ठरविले व तो डाकिनी वनात त्रिपुरासुराला ठार मारण्यासाठी आला पण तो असुर सहजासहजी बधण्यासारखा नव्हता. त्याच्याजवळ सैन्य होते. चांगले शूर वीर होते. म्हणून मग शंकरानेही भीम म्हणजे मोठे रूप धारण केले व पुष्कळ सैन्यही निर्माण केले, आणि त्या प्रबळ राक्षसाचा नाश केला. शेवटी जनतेच्या इच्छेवरून ह्याच ठिकाणी रहायचे महादेवाने कबूल केले. तेव्हापासून तो भीमशंकर म्हणून प्रसिद्धीस आला.

असे म्हणतात की, त्रिपुराबरोबर लढाई करताना महादेवाला बरेच श्रम पडले, त्याच्या अंगातून घामाच्या धारा वाहू लागल्या. ह्या धारांनाच पुढे नदीचे रूप प्राप्त झाले. शंकराच्या भीमरूपातून निघालेल्या ह्या नदीला भीमानदी

असे लोक म्हणू लागले आणि तेव्हापासून ह्या नदीच्या उगमाला कारण झालेल्या ह्या देवाला भीमाशंकर म्हणू लागले.

महादेवाची ठिकाणे जेथे आहेत, तेथे नदी किंवा पाण्याचे झरे आहेतच. महादेवावर पाण्याची संतत धार सोडावी लागते. देव आणि दानव यांनी समुद्र-मंथन केले तेव्हा त्यातून जसे अमृत निघाले, तसे हलाहल विषही निघाले. हे विष जर जगात पसरले असते, तर जगाचा तेव्हाच अंत झाला असता म्हणून महादेवाने ते विष प्राशन केले ; आणि जगाचा नाश टाळला. पण हे विष फार उष्ण असल्याने तेव्हापासून महादेवाला डोक्यावर गंगेची धार घ्यावी लागली आहे; आणि गळ्याभोवती थंडगार सापाचे वेटोळेही धारण करावे लागले आहे.

डाकिनी वनात ज्या ठिकाणी महादेवाने वास करायचे ठरविले, त्या ठिकाणी भीमानदी निर्माण झाली, हे स्वाभाविकच झाले. किंवा ही नदी जेथून उगम पावली आहे, तेथेच येऊन भीमशंकराने ठाण मांडले असेल व मग त्या नदीला भीमा असे नाव पडले असेल. काही असले तरी पुणे जिल्ह्यातील सह्याद्रीवरचे भीमाशंकर हे स्थान व भीमा नदी ह्यांना लोक पवित्र मानीत आले आहेत, यात शंका नाही.

भीमाशंकर हे स्थान पुरातन आहे. संत नामदेवांनी आपल्या अभंगात—

> **वंदूनिया गंगाद्वार ब्रह्मगिरी । मग भीमाशंकरी आनंदला ॥**
> **देखोनिया भीमा आठवे पंढरी । विठ्ठला अंतरी पांडुरंग ॥**

असे म्हटलेले आहे.

भीमानदीचा उल्लेख पूर्वीच्या काळी 'भीमरथी' ह्या नावाने होत होता, असे शके ५५६ म्हणजे इ.स. ६१४ मधील राजा दुसरा पुलकेशी याच्या होळ शिलालेखात आलेला आहे.

भीमाशंकराचे देऊळ हे हेमाडपंती आहे. महाराष्ट्रातील बहुतेक ठिकाणची महादेवाची देवळे याच जातीची असलेली आढळतात. भीमाशंकराच्या देवळावर देवाच्या दहा अवतारांतील सुबक मूर्ती कोरलेल्या आहेत.

हल्ली भीमाशंकर क्षेत्रामध्ये दोन देवळे दिसतात. एक जुने आहे आणि एक नवे. एकात महादेव आहे, तर एकात नुसता नंदीच आहे. १९२९ साली बांधलेली मोठी घंटा ह्या देवळामध्ये आहे.

भीमाशंकर डोंगरावर महादेवाशिवाय इतर अनेक दैवते, तीर्थे, कुंडे, अरण्ये, राया आहेत. शंकराच्या देवळाजवळ मोक्षकुंड व ज्ञानकुंड आहे आणि पश्चिमेला पापनाशक तीर्थ आहे. दक्षिणेस सर्वतीर्थ, साक्षीविनायक, आल्यातीर्थ, व्याघ्र-पादतीर्थ इत्यादी पवित्र ठिकाणे आहेत. ह्यांमध्ये कमलजादेवीचे स्थान प्रसिद्ध आहे.

इतर ठिकाणांप्रमाणे भीमाशंकर येथेही महाशिवरात्रीला मोठी यात्रा भरते. पुणे जिल्ह्यातील व आसपासच्या प्रदेशांतील भक्त मोठ्या संख्येने तेथे जमतात.

भीमाशंकराच्या डोंगराला जवळपासचे लोक भवरगिरीचा डोंगर म्हणतात. डोंगराच्या पायथ्याला भवरगिरी नावाचे एक लहानसे खेडे आहे. वर डोंगरावर फार थोडी वस्ती आहे.

पण भीमाशंकर हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक स्थान असल्याने महादेवाच्या भक्तांमध्ये ह्या स्थानाला फार महत्त्व आहे.






लेखक : श्री. शंकर नारायण जोशी

भीमशंकर ही मूळची रुद्रदेवता आहे, व ती वेदप्रतिपाद्य आहे. ह्या देवतेचे रूपगुण भयानक व संहारक असे ऋग्वेदामध्ये वर्णिले आहेत. हीच रुद्रदेवता पुढे विष्णुतुल्य होऊन त्रिमूर्तीत जाऊन बसली. आर्यानार्यांच्या झगड्यानंतर भयनाशक, संरक्षक झाली. शंकर झाली. शंनाम सुख करणारी ती शंकर ह्या दोन्ही गुणांचे निदर्शन 'रुद्राणां शंकरश्चस्मि' ह्या भगवद्गीतेच्या उक्तीत आले आहे. शंकराची काही नावे जशी रूपदर्शक (नीळकंठ, चंद्रशेखर, गंगाधर, त्रिलोचन) आहेत तशी काही नावे निवासस्थानक आहेत (कैलासनाथ, गिरीश, इत्यादी) आणि काही आप्तपरिवारसूचक (पशुपती, उमापती, भूतेश, रुद्राधिप) तर काही कार्यकथक (त्रिपुरांतक, स्मरहर) अशी आहेत. तसेच भीमाशंकर हे नाव प्रथम 'भीमशंकर' ह्या प्रकारे रूपदर्शक होते, पुढे त्याचेच भीमाशंकर ह्या नावाने ते कार्यकथक आणि साहचर्यसूचक होऊनही द्वादश ज्योतिर्लिंगांत मूळ रूपातच समाविष्ट झाले. 'डाकिन्यां भीमशंकरम्' हे ते नाव. ह्यातील 'डाकिनी' शब्दाचा उलगडा श्रीशंकराच्याच स्तोत्रात पुढीलप्रमाणे आला आहे :

**यं डाकिनी–शाकिनिकासमाजे निषेव्यमाणं पिशिताशनैश्च ।**
**सदैव भीमादिपदप्रसिद्धं तं शंकरं भक्तहितं नमामि ॥ १० ॥**

(बृहत्स्तोत्ररत्नाकर)

### डाकिनी वन व समाज

ऋग्वेदकाली ह्या मुख्य रुद्रदेवतेचे निरनिराळे उपासक व भक्तगण असून त्यांच्या अघोरी (अगोचरी) अशा वेगवेगळ्या उपदेवता होत्या. त्यांतीलच डाकिनी व शाकिनी (दारुका) ह्या देवता. ह्यांचा अघोर कार्य व मांसाशनादी सेवन करणारा समाज होता. त्या समाजाची ओळख त्या देवतांच्या नावांवरून होऊ लागली, आणि ते ते स्थलही 'डाकिनीदेवीचे वन' म्हणून लोक ओळखू लागले.



भीमाशंकर : उत्सवमूर्ती

पुढे हा समाज शंकराच्या दंडसामर्थ्यामुळे शंकराचा सेवक बनला आणि तोही शंकराप्रमाणे ग्राम, नगर, अरण्य ह्यांचा पालक व रक्षक बनला. गावोगावी जी भैरवाची (बहिरोबाची) स्थाने आहेत, तसेच डोंगर-अरण्यातील वाटांतून जी लहान लहान देवस्थाने आहेत ती ह्याप्रमाणे संरक्षक शंकरगणांचीच आहेत. वर जो शंकराच्या स्तोत्रातील दहावा श्लोक उद्धृत केला त्यातील 'भीमादिपदप्रसिद्धं' ह्या शब्दामधीलही भीमादी शब्दविग्रह, भीमा आदी असा नसून भीम आदी असा आहे.

पुणे जिल्ह्यातील आंबेगाव पेटा व खेड तालुका यांच्या सीमेवर हे स्थान आहे. सह्य पर्वताच्या उत्तर-दक्षिण दिशेस पश्चिमेकडे पसरलेल्या मुख्य सह्याद्रीच्या रांगेत उंच डोंगरावर हे दैवत आहे. ह्या डोंगराचे भीमाशंकराचा डोंगर हेच नाव लोकप्रसिद्ध आहे. अगदी जवळचे लोक भवरगिरीचा डोंगर असे म्हणतात. हा डोंगर ३,४५४ फूट उंच आहे. इतिहासकाली कोकणातून देशावर येण्याचे जे १४ मार्ग प्रसिद्ध होते त्यातील एक मार्ग ह्या भीमाशंकर डोंगरातून आहे. म्हणजे अगदी नाक्यावर व महत्त्वाच्या जागी हे स्थान आहे.

डोंगराच्या पायथ्याशी दक्षिण अंगास भवरगिरी म्हणून एक खेडे, त्या गावच्या गावदैवतांपैकी हे इतिहासकालीन देवस्थान. त्या गावखर्चातून ह्याचा थोडा खर्च चाले व त्या गावचा गुरव ह्याची पूजापाखाळणी करी.

प्रतिवर्षी महाशिवरात्रीला येथे मोठी यात्रा भरते. कोकण, देश, मावळ इत्यादी ठिकठिकाणांहून निरनिराळ्या मार्गांनी भक्तगण येत असतात.

भीमानदीचे प्राचीन व पौराणिक उल्लेख पुष्कळच सापडतात. संतवाङ्मयात ह्या भीमाशंकराचा आणि भीमानदीचा उल्लेख आदरपुरःसर येतो. अनेक संतांनी ह्या देवस्थानचे दर्शन घेतल्याचाही आढळ होतो.

नामदेवांचा 'तीर्थावळी' म्हणून जो स्वप्रवासवर्णनाचा भाग आहे त्यात ह्या तीर्थाचा महिमा येथील कथाभागासह चांगला विस्तृत आला आहे:

स्कंदासी उपदेशस्थान। लोहोगिरीस येथून।
पुरूरवा पुण्यक्षेत्र महिमान। पूर्वी येथूनचि जाले॥ ९॥
येथून भीमरथी नदी। भीमाशंकरी घेऊनि गेला नंदी।
तेथूनि उगमी पडली सर्वा आधी। मग शंकरे तेथे स्थान केले॥ १०॥
ते भीमामाहात्म्य प्रसिद्ध। तो हा सिद्धेश्वर अगाध।
महायोगेश्वर निजबोध। अलंकापूर पाटणी॥ ११॥

ह्याचप्रमाणे नरहरी माला ह्यांनीही या स्थानाचा मोठा कौतुकपूर्ण उल्लेख आपल्या भूपाळीत केला आहे व तो सर्वजनमुखी आहे:

सत्य ज्योतिर्लिंगे बारा। प्रातःकाली स्मरण करा॥
कोटि कुळे ही उद्धरा। भव हा तरा बाप हो॥
भीमा उगमी भीमाशंकर। घृष्णेश्वर वेरूळी॥

भीमा नदीचा ऐतिहासिक उल्लेख 'भीमरथी' ह्या नावाने शक ५५६ मधील म्हणजे सुमारे १५०० वर्षांपासून सापडतो, तो पुलकेशी राजा दुसरा ह्यांच्या ऐहोळ शिलालेखात—

लब्ध्वा कालं भुवमुपगते जेतुमाप्यायिकाख्ये।
गोविन्दे च द्विरदनिकरैरुत्तरां भैमरथ्याः॥

असा आला आहे.

तसेच सोमेश्वर देवविरचित अभिलाषितार्थ चिंतामणि-मानसोल्लास ग्रंथात (इ.स. ११२७–११३८)—

पञ्जरा भीमरथ्या च कृष्णवेणी बृहन्नदी।
मलापहारिणी यत्र सङ्गता लोकविश्रुता॥

असा निर्देश आहे.

शके १३५६ (कलिवर्ष ४५३५) मध्ये गंगाधर पंडित ह्या ज्योतिर्विदाने चांद्रमान ह्या नावाचे एक तंत्र केले आहे. ह्या तंत्रग्रंथात ग्रंथकाराने स्वतःचे ठिकाण सांगताना एकीकडे कृष्णवेणी आणि दुसरीकडे भीमरथी ह्यामधील समार-नगर ही माहिती दिली आहे.

शके १५३१ च्या पत्रात भीमाशंकराचा उल्लेख येथे डोंगराच्या पायथ्याशी भवरगिरी म्हणून एक खेडे आहे त्या खेड्याचे एक दैवत म्हणून आला आहे. ह्या खेड्यावरून भवरगिरीचा डोंगर असे नाव भीमाशंकराचा डोंगर ह्या नावा-ऐवजी त्या खेड्याच्या गाव दफ्तरात आढळते. खाली गावात श्रीकोटेश्वर, देवहाडा अशी आणखी काही गावदैवते आहेतच. पण त्या गावच्या हद्दीत हाही

डोंगर धरला जात असल्यामुळे डोंगरावरील दैवतही गावदैवतांत धरले व त्याची पूजाअर्चा गावगुरवाकडून होई.

ह्या दैवताचा ह्यानंतरचा उल्लेख मात्र छत्रपती राजारामाच्या राजवटीत आढळतो व एव्हापासून ही देवता अधिक विख्यात झाली आहे. हे देवस्थान स्वयंभू व भोवताली खूप झाडी असे डोंगरावर आहे. ह्या डोंगरावरील ह्या स्थितीचा फायदा सपाटीवरील आलेल्या आपत्तींच्या वेळी लोकांनी घेतला. इ.स. १६९२मध्ये म्हणजे दिल्लीवर औरंगजेब जेव्हा सर्व महाराष्ट्रभर धुमाकूळ घालून हे 'महाराष्ट्र राज्य' नष्ट करण्यासाठी अत्यंत कष्ट करीत होता त्या वेळी, आसऱ्याकरिता ह्या बाजूचे काही लढवय्ये लोक ह्या डोंगरावर जाऊन राहिले व तेथे राहून त्यांनी मोगल सैन्याशी झुंज दिली. गुणाजी व राजजी सावंत हे दोघे बंधू (ते पायदळ सैन्याचे पंचमहस्री होते) आपले पदाती लोक घेऊन औरंगजेबाच्या पदरीचा एक सरदार अलीबेग याच्याशी लढण्यासाठी सचिव शंकराजी नारायणांच्यातर्फे राहिले होते. ह्या सावंतबंधूंनी येथील जवळचा सिद्धगड तर घेतलाच होता, पण प्रसिद्ध व भव्य जो कोंडाणा ऊर्फ सिंहगड तोही घेतला. ही सर्व कामगिरी ह्या भीमगिरीवर राहूनच त्यांनी केली आहे (सनदापत्रे, पृष्ठ १७१).

ह्यानंतर ह्या देवस्थानाचा निर्देश थोरले नाना म्हणजे बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांच्या वेळचा आहे (इ.स. १७१४). पातशहा औरंगजेब ह्याच्या धुमाकुळी-नंतर महाराष्ट्रात पुनः स्थिरस्थावर करण्याचे व पुनर्वसाहत करण्याचे काम ह्या पुण्याचे सुभेदार व आता प्रधान असलेल्या बाळाजी विश्वनाथांनी केले व ह्यांच्याच मार्फत चासकर जोशांचेकडे ही कामगिरी आली. कृष्णराव महादेव चासकर ह्यांच्या सरंजामी गावात ह्या देवस्थानाकडे इनाम असलेला मौजे खरोसी हा गाव आहे व तो सर्व गाव भीमाशंकर ह्या देवतेकडे चालवावा हे सांगताना ह्या देवस्थानाचा निर्देश आलेला आहे. येथे हे एक अवश्य सांगण्याजोगे आहे की, हा खरोसी गाव ज्या वाडेतर्फातील आहे त्या सर्व तर्फाचीच पुनर्वसाहत रामाजी महादेव चासकर जोशी ह्यांनी केली.

इ.स. १७२४ (शक १६४५) च्या माघात थोरल्या बाजीरावांची आई राधा-बाई ह्या भीमाशंकराच्या दर्शनास गेल्या होत्या. त्यांच्याबरोबर खासबारदार (हुजूरचे बंदूकवाले), जासूद इत्यादी परिवार असून खर्च ३९० रुपयांपर्यंत रोजमुरा म्हणून पडला आहे.

कालदृष्टचा पुढील उल्लेख पेशव्यांचा श्रीवर्धन येथील मुतालीक गोविंद कृष्ण ह्याने श्रीमंत चिमाजीआप्पांना भीमाशंकर येथील कमलजेच्या तळयाच्या दुरुस्तीबद्दल लिहिताना आला आहे.

भीमाशंकर ह्या मुख्य दैवताची नित्यनैमित्तिक, मासिक व वार्षिक अशा पूजा-उत्सवांची व्यवस्था ऐतिहासिक कागदपत्रांतून दिसून येते. नित्य पूजेस पंचामृतस्नान, नैवेद्यपूर्वक रुद्रैकादशिनी होत असे आणि त्यासाठी पंचामृतासाठीच केवळ गाय ठेवलेली असे. नित्य पूजासाहित्यात चंदन, गुग्गूळ, वेलदोडे, साखर, तूप, तेल, फुले, फळे, विडापाने इत्यादी पदार्थ तर असतच पण अडीच गुंजा केशर गंधासाठी, कस्तुरी अर्धा गुंज हेही उंची पदार्थ असत. वर्षाच्या उदबत्त्यांचा खर्च ७३० रुपये पडला आहे. एकंदर खर्च ४,३८० रुपये असल्याचे नमूद आहे.

नैमित्तिक अनुष्ठानेही काही आढळतात. छत्रपती शाहूमहाराज जेव्हा आजारी झाले तेव्हा (इ.स. १७४९) ब्राह्मण, आचारी, खटपटे, गडी इत्यादिकांसह आरोग्यार्थ अनुष्ठान (थेऊर, जेजुरी इ.प्रमाणे) ह्या भीमाशंकरी झालेले आहे. ह्याच वर्षी घृताचा अभिषेक झाल्याची नोंद आहे. मेष संक्रांतीसही स्नानादिकांसाठी छोटी यात्रा येथे भरत असे. सर्वांत महाशिवरात्रीची यात्रा फार मोठी. ह्याच दिवसाकरिता भागीरथीची कावड देवी अहल्याबाईंच्या योजनेप्रमाणे येई आणि देवाला भीमा व गंगा ह्या एकत्र जलाचे स्नान मोठ्या महत्त्वाचे मानले जाई. हा प्रसंग व तीर्थप्रसाद साधण्यासाठी म्हणजे दर्शनासाठी व जलसिंचन आपल्या अंगावर पडावे ह्यासाठी फारच गर्दी होई.

'जलधारा शिवप्रिया' ह्या न्यायाने आजही ज्ञानकुंडामध्ये व मोक्षकुंडामध्ये स्नान करून श्रीशंकराची रुद्रावर्तनपूर्वक पूजा करणे विशेषतः देवाला पाणी घालणे हे मुख्य मानले जाते. तसेच श्राद्धादिक विधीही येथे केले जातात. कमलजादेवीचे दर्शनही तितकेच आवश्यक व महत्त्वाचे गणले आहे. त्रिपुरासुरयुद्धाच्या वेळी शंकरास या शक्तिदेवीचे सहाय्य झाले व तिची पूजा कमलपुष्पांनी केली. ह्यायोगे तिचे नाव कमलजा असे रूढ झाले (भीमाशंकर माहात्म्य अ. ३). पूर्वी भीमाशंकर येथे दीपोत्सव होत असे व दिवे लावण्यासाठीही मजूर रवाना झालेले आहेत.

श्रीभीमाशंकर मंदिराच्या बांधणीविषयी तीन प्रकार झाले व इतकेही करून देवालय अपूर्ण व उघडेच राहिले आहे. मूळ मंदिर कसे, केवढे व केव्हाचे ही



भीमाशंकर : स्वयंभू मूर्ती

माहिती नेमकी मिळाली नाही. आज देवालयाचे तीन भाग दिसतात: (१) गर्भगृह–गाभारा, (२) कूर्ममंडप, रंगमंडप व (३) सभामंडप, पैकी सभामंडपाचे काम पूर्ण झाल्याचे व तो मंडप कोणी बांधला हे सांगणारा पाच ओळींचा शिलालेखच आहे: (१) ॥श्रीशंकर॥, (२) स्वस्ति श्रीनृप-शालिवाहन शके १६५९, (३) ॥पिंगलनाम संवत्सरे मंडपसिध्द शे॥, (४) ॥वक चिमणाजी अंताजी नाईक-भिडे॥, (५) ॥सावकार॥ ह्यावरून इ.स. १७३७मध्ये हा सभामंडप भिडे सावकार (पुणे जोगेश्वरी आळी) ह्यांनी बांधला, हे दिसून येते. त्या मानाने गाभाऱ्यावरील शिखर, कूर्ममंडप व रंगमंडप ह्या कामांच्या बांधणीचे काल पुढले आहेत असे वाटेल, पण असे प्रत्यक्षात नाही. फरक इतकाच की, शिखर, गाभारा, कूर्ममंडप ह्या बांधकामासही तेव्हाच प्रारंभ झाला. पण सभामंडप आधी सिद्ध झाला व मागील बांधकाम नंतरही होत राहिले, परंतु शेवटी ते अपुरेच राहिले. पुणे येथील दुसरे सावकार–ह्यांचा उल्लेख वर प्रसंगाने आला आहे–ह्यांची भिडे यांच्याप्रमाणेच मोठी पेढी होती. तत्संबंधक जमाखर्ची वह्यांतून व त्याजकडील पत्रव्यवहारातून इ.स. १७३५पासून बांधकामासाठी शेकडो रुपये खर्ची पडलेले सापडतात. देवालय बांधण्याच्या आधीचा खर्च तळेबांधणीचा मिळतो. (इ.स. १७३५-३६). आणि ह्याच वर्षी म्हणजे इ.स. १७३६ मध्ये दीक्षित-पटवर्धन यांच्या संग्रहात एक हजार रुपये भीमाशंकर डोंगरी मंदिर इमारतीच्या कार्यासाठी खर्ची पडलेले आहेत. देवालयाचे सर्व बांधकाम पुनरुद्धाराचे आहे आणि एकाच वेळी त्या डोंगरावर विहीर तयार करणे, धर्मशाळा बांधणे हीही बांधकामे चाललेली आहेत. 'कमलजादेवी पलीकडील तळे' आणि 'हनुमान तळे' असे दोन तलाव तेथे बांधलेले आहेत. इ.स. १७६० मध्ये धर्मशाळेचे बांधकाम झाले. रघुनाथरावदादा पेशवे ह्यांनी तेथे विहीर खणविली. पुनरुद्धाराचे बांधकाम नाना फडणीस ह्यांच्या हयातीतील शिखरापुरते आहे. त्यास ५०,००० रुपयांपर्यंत खर्च झाला आहे.

सांप्रत भीमाशंकर क्षेत्री दोन देवळे दिसतात. एक जुने व दुसरे नवे. एकात आहे महादेव तर दुसऱ्यात नुसताच नंदी. या दोन देवळांमधील रिकामी जागा निदान पाच फुटांची तरी आहेच. येथील प्रचंड घंटाही प्रेक्षणीय आहे.

भीमाशंकराचे मंदिर हेमाडपंती बांधणीचे आहे. त्यावर दशावतारांतील मूर्ती कोरलेल्या आहेत. मूर्ती मोठ्या रेखीव असल्यामुळे मनोहर दिसतात.






लेखक : डॉ. म. श्री. माटे

मराठी माणसाने ज्याच्याशी सदैव इमान राखायला पाहिजे, ज्याचे ऋण सदैव स्मरणात ठेवायला पाहिजे असा हा 'शिवा'चा अवतार. बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक म्हणून त्याचा महिमा मोठा. पण आम्ही त्याला जास्त मानतो ते भोसले घराण्याचे दैवत म्हणून. या राष्ट्राला 'महा'राष्ट्र म्हणवून घेण्याचा अधिकार मिळवून दिला शिवाजीराजांनी. त्यांच्या आजोबांची, मालोजीराजांची, सेवा घृष्णेश्वराने सुफलित केली ती अशी. हे दान एवढे मोठे की मागणारा समर्थ हवा तसा देणारा दाताही. असेच दान देणारा हा घृष्णेश्वर.

वेरूळची भूमीच पवित्र. भारतातल्या सगळ्या धर्मांवर आणि पंथांवर छत्र धरलेली. इथल्या पहाडाच्या आश्रयानेच बौद्धांचे आश्रम आणि चैत्य, जैनांची मंदिरे, हिंदूंचे कैलासासारखे प्रासाद साकार झाले. त्यांच्याच आश्रयाने ते पंथ

श्रीघृष्णेश्वर



नांदले, विस्तारले. या पुनीत पहाडाच्या पायथ्याशी चार घरे होती. त्यात होती एक फार भाविक शिवभक्त–'घृष्णा' नावाची. तिला हवा तो वर देण्यासाठी शंकर प्रकट झाले. पण तिला स्वतःला काहीच नको होते. या भूमीवर 'शिवा'चे अस्तित्व सतत रहावे एवढीच तिची प्रार्थना. ती बाजूला सारणे शंकराला कसे शक्य होते? घृष्णेने त्याला इथे आणला म्हणून तो झाला 'घृष्णेश्वर'. पूर्वीच्या काळात कधी तरी ही गोष्ट घडली. या घृष्णेश्वराला विसावा मिळावा म्हणून मालोजीराजांनी त्यावर एक मंदिर उभारले. त्याच्या प्राकारावर आपले स्वतःचे आणि विठोजी बाबाजी यांचे नाव कोरून ठेवले. राष्ट्रकूट घराण्याचा प्रसिद्ध राजा कृष्णराज याने मूळ मंदिर बांधले अशी एक कथा आहे. ती खरी असली तर मालोजीराजांनी त्याचा जीर्णोद्धार केला असे समजावयास पाहिजे. पण 'शिवदिग्विजय' या ग्रंथात मात्र मालोजी राजांनी 'श्रीवेलूरचे देवालय बांधले, सेवाले तीर्थ विस्तीर्ण बांधले' अशीच माहिती आहे. 'सेवाल' म्हणजे 'शिवालय' तीर्थ. हे मंदिर मुगली आक्रमणाच्या वेळी छिन्नविछिन्न झाले. खुद्द औरंगजेब बादशहानेच ते पाडले अशीही एक कथा आहे. ही दुरवस्था फार काळ टिकणे कसे शक्य होते? मल्हारराव होळकरांच्या पत्नी गौतमाबाई यांनी १७३० मध्ये ते पुन्हा बांधविले. आणखी चाळीस वर्षांनी साध्वी अहल्यादेवी यांनी शिवालय तीर्थाची बांधणी केली. आज दिसणारे देवालयाचे रूप या होळकर राण्यांच्या पुण्यशीलतेचेच फळ आहे.

इकडच्या भागात सहसा न दिसणारा तांबूस दगड चांगला घडवून, घोटून बांधकामाला वापरला आहे. समोरचा मंडप तीन बाजूंनी मोकळा आहे, कमरे-इतक्या भिंती आणि त्याच्या वरचा भाग मोकळा. मंडपातले खांब सुघड आहेत पण त्यांच्यावरची कलाकुसर बेताचीच आहे. मंडपातून गाभाऱ्यात गेले म्हणजे दिसणारी पिंडी हे त्या प्राचीन घृष्णेश्वराचे सगुण, साकार स्वरूप. गाभाऱ्याच्या डोक्यावरचे शिखर चौकोनी, पायऱ्यापायऱ्यांचे. चारी बाजूंनी कळसापर्यंत वर पट्टे जातात. त्यांना म्हणतात 'रथ'. यादवराजांच्या काळातल्या मंदिरशिल्पाचे हे एक वैशिष्टय. मराठेशाहीतल्या शिल्पात हा एक स्वतंत्र वास्तुप्रकार आहे. त्याचे आगळेपण कशात म्हणाल, तर ते त्याच्या 'देशी'पणात. अठराव्या शतकात सगळ्या इमारतींवर मुसलमानी इमारतींची लक्षणे ठळकपणे दिसू लागली होती. कोठे कमानी तर कोठे घुमट, तर कोठे मनोरे. पण ह्या मंदिरप्रकारात त्यांना स्थान नाही. खास महाराष्ट्रीय पद्धतीचेच शिखर त्यावर दिसते. शिखर शिंगणापूरचा महादेव, कोल्हापूरची अंबाबाई यांची मंदिरे याच धाटणीची. घृष्णेश्वराचे मंदिर आकाराने मोठे नाही. त्याच्यावर नाव घेण्याजोगे मूर्तिकाम नाही. वास्तू देशी आहे पण डौलदार नाही.



घृष्णेश्वर मंदिर

पण इथे येणारा यात्रिक सौंदर्याच्या शोधात नसतोच मुळी. ही एक भावयात्रा आहे ही जाणीव त्याच्या मनातून पुसली जाऊच शकत नाही. महाराष्ट्राच्या भाग्यविधात्याच्या पालकाचे रूप पाहिला, त्याच्या ऋणाचा मूक उच्चार करायलाच मराठी माणूस इथे जातो. घृष्णेश्वराचे हे ऋण कधीच फिटणार नाही, मात्र त्यांचा आशीर्वाद कायम पाठीशी आहे या समाधानात यात्रिक परत जातो.




लेखक : **श्री. डी. डी. रेगे**

औरंगाबाद जिल्हा म्हणजे संतांचे माहेरघर आणि ज्या ठिकाणी संताचे वास्तव्य तिथे देवदेवतांचा वास असतो असे म्हणतात. या भागात जागोजागी लहानमोठी मंदिरे आहेत, श्रीक्षेत्र वेरूळ येथील घृष्णेश्वराचे पूर्ण ज्योतिर्लिंग याच जिल्ह्याच्या



वेरूळ येथील
घृष्णेश्वर मंदिर

वाट्याला आले असून भारतातल्या स्वयंभू अशा बारा ज्योतिर्लिंगांपैकी ते एक आहे. औरंगाबादपासून सुमारे अठरा मैल अंतरावर हे स्थान असून स्टेशन व शहागंज बस स्टेशनहून एकसारख्या बसेस तिकडे जाण्यासाठी सुटतात. हल्ली वेरूळ सहलीची एक खास बस सुरू करण्यात आली आहे. ती बस औरंगाबाद स्टेशनवरून सकाळी साडेसात वाजता निघते व वाटेतली ऐतिहासिक स्थळे घेऊन वेरूळवरून सायंकाळी पाच वाजता परत येते.

आजपर्यंत आम्ही किती तरी धार्मिक स्थाने आणि त्यांच्या भोवतीचा रम्य निसर्ग पाहिला. पण घृष्णेश्वराच्या दर्शनासाठी जात असता डोळ्यांचे पारणे फेडणारी सुंदर दृश्ये आम्हांस दिसली नाहीत. असे असले तरी घृष्णेश्वराचा परिसर एका वैशिष्ट्याने नटला असून त्या भागाचा प्राचीन इतिहास त्यांच्या सभोवतालच्या जुन्यापुराण्या वास्तुरूपात उभा आहे. आमचे संस्कृतिवैभव दाखविणारी प्रचंड शिल्पे, नक्षीने गजबजलेली कलापूर्ण मंदिरे आणि कष्टाने जतन केलेल्या ऐतिहासिक वास्तूंचा अगदी निर्दयपणे मुसलमानी सत्तेने कसा विध्वंस केला याचे जिवंत दर्शन घडविणाऱ्या गोष्टी या शिवस्वरूप घृष्णेश्वराच्या आसमंतात आहेत.



शिवालय तीर्थ : वेरूळ

वेरूळच्या लेण्यापासून घृष्णेश्वराचे मंदिर नजीक असल्याने काही मिनिटांतच आम्ही तिथे गेलो. सोमवार असल्यामुळे अभिषेकांची धांदल उडून गेली होती. मंदिराच्या आवारात बरेचसे यात्रेकरू घोळक्यांनी बसलेले दिसले. येथील लेण्यांच्या डोंगरातून एलगंगा नदी उगम पावली आहे. तिच्यावरून (एलूर व मग वेरूळ) हे नाव पडले असावे. पुराणांतरी अशी कथा आहे की, एलराजा या ठिकाणी

राज्य करीत होता. त्याच्या नावांवरून एलापूर व त्यावरून वेरूळ हे नामांतर झाले असावे. आणखी एक अशी कथा आहे की, या क्षेत्रास पूर्वी नागस्थान म्हणत. नागांची वस्ती वारुळात असते, म्हणून वारुळावरून वेरूळ हे नामाभिधान लाभले असावे.

सर्व ज्योतिर्लिंगांची यात्रा झाल्यावर पुनश्च या घृष्णेश्वराचे दर्शन घेतल्या-शिवाय यात्रेची सफलता होत नाही असे म्हणतात. हे तीर्थ सुमारे एक एकर क्षेत्रफळात पाषाणाच्या कलापूर्ण जोडणीने युक्त अशा चहू बाजूंच्या ५६-५६ पायऱ्यांनी परिवेष्टित आहे. गाईचे खूर व विष्णुपदापर्यंत ४१ पायऱ्या असून खाली १५ पायऱ्या आहेत. तळाशी काळा पाषाण आहे. तो एलराजाच्या वेळचा आहे असे म्हणतात. यास चार महाद्वारे आहेत. पूर्व बाजूच्या डाव्या कोपऱ्यावर जो एक शिलालेख आहे त्यावरून याचा जीर्णोद्धार महाराणी अहल्यादेवी होळकर यांनी केला असल्याचे दिसते. कैलास लेणे व घृष्णेश्वर मंदिर राष्ट्रकूल घराण्या-तील दंतीदुर्ग व त्याचा चुलता कृष्णराज यांनी इ.स. ७५० च्या सुमारास बांधले. या ज्योतिर्लिंगास पूर्वी कुंकुमेश्वर असे नाव होते. याचे कारण असे की, या तीर्थाच्या पूर्वतीरी पार्वती हातात कुंकू घेऊन मळवट भरण्यास उभी होती. तिने या कुंडातले पाणी घेऊन कुंकू तळहातावर खलले तेव्हा एक ज्योत निर्माण झाली. या ज्योतीला सामर्थ्याने पूर्णत्वास आणून लिंगरूपाने स्थापन केले. तेच हे महान ज्योतिर्लिंग घृष्णेश्वर होय.





# वैद्यनाथ-नागनाथ

लेखक : श्री. राजा यावलीकर

## पुण्यपावळी परळी

मंगल देशा, पवित्र देशा,
महाराष्ट्र देशा ।
तुला प्रभाती प्रसन्न हृदये,
प्रणाम परमेशा ।

प्रातःकाली परमेश्वरास प्रणाम कवी करतो तो मंगल महाराष्ट्र देशाला! अशा महाराष्ट्राचे माहेरघर, सांस्कृतिक माहेर म्हणजे मराठवाडा होय! या मराठवाड्याच्या शामल कुशीत अनेक अशी आभरणे आहेत की, खरोखरच मराठवाड्याने त्यांचा अभिमान मिरवावा! देवगिरीच्या यादवांची राजधानी देवगिरी मराठवाड्यात, सातवाहनाची राजधानी जी प्रतिष्ठान ती मराठवाड्यात. हेमाद्री म्हणजेच हेमाडपंत ज्यांनी वैशिष्ट्यपूर्ण मंदिरांची रचना केली, मोडीलिपी शोधली, धर्मग्रंथ निर्माण केले तेही मराठवाड्यातीलच. धर्मपंडित बोपदेव मराठवाड्याचे. संत ज्ञानदेवांचे आजोळ आपेगाव मराठवाड्यात. संत नाथांचे पैठण मराठवाड्यात, समर्थांचे जांब मराठवाड्यात, दासोपंतांचे, मुकुंदराजांचे 'जोगाईअंबे' मराठवाड्यात. बारा ज्योतिर्लिंगापैकी तीन मराठवाड्यात. माता तुळजाभवानीही मराठवाड्यात. महाराष्ट्राचा शिरपेच म्हणून गणावे लागेल अशी वेरूळ-अजिंठ्याची पाषाणपुष्पेही मराठवाड्यातच! अशा अलंकारित भूमीत वैद्यनाथही टेकले ते एका परळीच्या टेकडीवर! परळी ही राजा श्रीयाळाची नगरी! राजा श्रीयाळ, सति चांगुणा आणि त्यांचा चिरंजीव बाळ चिलिया महाराष्ट्राचा कोणता माणूस विसरेल? अतिथिदेवो भव ही वेदाची आज्ञा खरी आचरली या माता, पिता नि पुत्रांनी. कैलासपतीला जिंकले या श्रीयाळाच्या सती चांगुणाने! चांगुणा अमर झाली आणि तिची कथा उभ्या

महाराष्ट्राची मंगल गाथा ठरली, तेच हे परळी क्षेत्र! मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात हे क्षेत्र येते. आज ते परळी-वैजनाथ या नावाने ओळखले जाते!

**ऐसे माहात्म्य शिवाचे**

घृष्णेश्वराने वेरूळजवळच्या डोंगरकुशीचा आसरा घेतला तर वैजनाथांनी टेकडीमाथ्यावर पसारा मांडला. गंगाधराच्या शोधात गिरिजा वेरूळकडे आली



परळी-वैजनाथ मंदिराचे प्रवेशद्वार

तर जोगाईच्या पाणिग्रहणास्तव वैजनाथ परळीस पातले! भारताच्या बारा ज्योतिर्लिंगांमध्ये परळी-वैजनाथ हे एक असे शिवतीर्थ आहे की, जिथे गौरीसवे गंगाधर नांदतो आहे! गिरिजासमवेत गंगाधराचे दर्शन इथे होते! महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून शिवदर्शनासाठी आलेला भाविक वैद्यनाथाच्या चरणी नतमस्तक होतो. आगळे स्वरूप पाहून डोळ्यांचे पारणे फेडतो नि त्याच्या ओठांत अभंग ओळी विरघळू लागतात:

**हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा।**
**म्हणती जे वाचा तया मोक्ष ।।**

मोक्षदाई वैद्यनाथ जे टेकले ते एका टेकडीमाथ्यावर! मंदिराची रचना हेमाडपंती! आकार चौकोर, चांगला चिरेबंदी! मंदिराच्या तिन्ही बाजूंना प्रशस्त प्रवेशद्वाराचा साराच थाट सरदारी! ओवऱ्यांचा घाटही सरदारीच! मंडप आणि गाभारा एकाच पातळीवर. मंदिराच्या मंडपावर, खांबावर, छतावर, नक्षीकाम, शिल्पसौंदर्य नावालाही दिसणार नाही. जसा एखाद्या सरदारी वाड्याचा घाट तसाच या विशाल मंदिराचा थाट! ही सारी इंदूरच्या

राणीसाहेबांची पुण्याई! राणी इंदूरला राज्य करी पण महाशिवरात्रीला पर्वणी कधी चुकली नाही! त्या दिवशी जवळच्या हरिहरतीर्थात स्नान करावे नि वैद्यनाथाच्या दर्शनाने संसारतापातून मुक्त व्हावे हा या थोर राणीसाहेबांचा अक्षय नियम! पुण्यशीला अहल्यादेवींनी आपली गजांतलक्ष्मी वेचली आणि आपली अनेक श्रद्धास्थाने सालंकृत केली, याची साक्ष देत उभी आहेत महाराष्ट्राची अनेक मंदिरे! महाशिवरात्रीस शिवदर्शनासाठी लोकसागरास नुसती भरती येते! भक्तगणांनी वाहिलेल्या बिल्वदलाचा नुसता खच पडतो! वैद्यनाथ दिसेनासे होतात! शिवस्तुतीने गाभारा घुमू लागतो! मंदिराचे प्रांगण स्तुतिसुमनांनी सुगंधित होते!

शिव शिव म्हणता वाचे।
मूळ न राहे पापाचे।
ऐसे माहात्म्य शिवाचे।
निगमागम वर्णिती॥

## आजि मी गुरू देखिला!

शिव म्हणजे शिखराचा स्वामी. पण नागनाथांनी निवासासाठी निवडले 'दारुकानन'. नागनाथाचे मंदिर प्रथम धर्मराजांनी उभारले. यादवांच्या राज्यात याला हेमाडपंती साज चढला. खालचा भाग पाषाणी नि वरचा विटांनी बांधलेला आणि पांढऱ्या चुनेरी रंगात रंगलेला. सभोवती उंच उंच झाडांचा झुपका, मध्ये पांढऱ्या रंगाचा ठिपका! प्रातःकाली हे मंदिर दुरून फार विलोभनीय दिसते. मंदिराच्या प्रांगणात प्रवेश केला तर देवाचे दर्शन घडत नाही, कारण नागाचा हा कैवारी नागनाथ या गोपुरी पाताळात दडला आहे. भुयारात प्रवेश केला म्हणजे नागनाथाचे दर्शन होते. या ज्योतिर्लिंगाचे महत्त्व वाढले ते महाराष्ट्राच्या थोर थोर संतांच्या भेटींनी. देवाची किंकर मानणाऱ्या नामदेवाला गुरू भेटले ते याच औंढ्याला! 'माझा गुरू पांडुरंग, मानवी गुरू काय कामाचा?' या गर्व-वाणीचा लोप झाला तो विसोबा खेचरांकडून न् तोही याच औंढ्याला. एकदा काय झाले की, ज्ञानदेव गोरोबांना म्हणाले, 'गोरोबा, नामाचे डोके, चांगले भाजले का पहा?' गोरोबा उत्तरले नाहीत! झाले, नामदेव गुरुशोधार्थ औंढ्याला आले. तिथे विसोबा महादेवाच्या पिंडीवर पाय ठेवून बसलेले. देवाचा किंकर जो नामदेव याला हा देवाचा उपमर्द काही पहावेना. त्याने पाय उचलले नि बाजूला ठेवले. पाय ठेवले तिथे पिंडी! पुन्हा दूर ठेवले पण तसेच! मग मात्र त्याच पुण्यशील पायावर नामदेवांनी गुरू म्हणून मस्तक ठेवले! नामदेवाला गुरू भेटल्याची जागा तीहीच! गुरु विसोबा याच मंदिराच्या उत्तर द्वाराच्या शेवटच्या

पायरीजवळ विसावले आहेत. दर्शनास आलेला भाविक प्रथम या समाधीसमोर श्रद्धेने नतमस्तक होतो आणि मगच मंदिराच्या प्रांगणात पाय ठेवतो.

### पुजारी हरले, मंदिर फिरले

प्रांगणी पाय ठेवताच आणखीन एक आख्यायिका भाविकमनी बहरते. अशीच एक शिवरात्र! फार फार वर्षांपूर्वीची, इ.स. १२२० मधली. मंदिराच्या मंडपात यात्रेला आलेले ज्ञानोबा, विसोबा बसले आहेत. नामदेव कीर्तनास उभा आहे, हरिभक्तांनी मंडप नुसता फुलला आहे, नामगजराने दिशा दाटल्या आहेत, नामाचे हरिकीर्तन रंगले नि नागनाथाचे पुजारी पूजेसाठी आले. पाय ठेवायला जागा नाही तर वाट कुठली? पुजारी मंडळी भडकली. त्यांनी नामदेवाला मंडपातून हुसकून लावले. कीर्तन भंगले, नामगजर थांबले! नामदेवांनी आपले कीर्तन मंदिराच्या मागील बाजूस सुरू केले. कीर्तनरंगी नामा रंगले, देहभान विसरले! पूजा आटोपून पुजारी घरी जाण्यास निघाले, उलटमार्गी, पण त्यांना काय दिसले? नामयाच्या कीर्तनासाठी नागनाथाचे मंदिरच फिरले आहे! पूर्वेकडून पश्चिमेकडे. पुजारी ओशाळले. नागनाथ गाली हसले! बरोबर आहे, देवाने पाठ फिरवली तरी चालते पण देवभक्तांनी तसे केले म्हणजे देवच देवालयासह फिरतो! नागनाथाच्या मंदिराच्या मागील बाजूचा पाषाण, हेच बोलत नसेल का आजही?

**हरि तिथे संत, संत तिथे हरि।**
**ऐसे वेद चारी बोलताती॥**

देवालय फिरल्याची, पुजारी हरल्याची ही आख्यायिका इथे सरते आणि नागनाथाच्या दर्शनाची तृषा शमते!

### थोडी कथा गोडी

पण भाविकांच्या मनी जिज्ञासा जागृत होते की, 'नागेश दारुकानने' असे का म्हणतात? पूर्वी येथे दारुकानन होते. मालकी दारुका-दारुक या राक्षस दांपत्याकडे. दारुकाने पार्वतीमातेकडून अभयदान मिळविले की, या वनात तुला कोणाही देवाद्वारे त्रास होणार नाही. मग दारुकाने या वनात नुसता धुमाकूळ मांडला. ब्राह्मणांना, भक्तांना, ऋषिमुनींना सळो की पळो करून टाकले! तिथे एका शिवभक्ताने सर्वांना शंकराचा मंत्रगजर सांगितला. 'ॐ नमः शिवाय'चा घोष सुरू झाला. राक्षसाचा अत्याचार घडे तसा मंत्राचाही जोर चढे! गजराने कैलास हादरले. कैलासपती भूतलावर आले नि त्यांनी दारुका-दारुकास ठार केले. क्षेत्र झाले भक्ताचे पण वरदान मोडले पार्वतीचे! ते दुःखाने दिगंबर अवस्थेत

दारुकावनात फिरू लागले. शेवटी एक दिवस त्यांनी तेथील एका जलाशयात आपला देह समर्पित केला नि ज्योतिर्लिंगरूपाने प्रकटले. पाताळात प्रथम नागांनी पूजा केली. राक्षस संहाराच्या वेळीही त्यांना नागनाथांनीच संरक्षण दिले म्हणून याला 'नागनाथ' असे संबोधितात ! औंढा हे गाव छोटेच पण तीर्थराज मोठे आहे! औंढ्याच्या नागनाथापुढे भक्तगण नतमस्तक होतो. मनोमन म्हणतो:

**शिव भोळा चक्रवर्ती ।**
**त्याचे पाय माझे चित्ती ।।**

शंकराचार्य नागनाथास वंदन करतात.

**रम्यस्थली नांदतसे ।**
**भुक्ती–मुक्ती देत असे ।।**

**भोगभूषी नागनाथ ।**
**तयास मी वंदितसे ।।**






लेखक : **श्री. शं. रा. देवळे**

महाराष्ट्रातील पाच ज्योतिर्लिंगांपैकी जी तीन मराठवाड्यात आहेत, त्यांत श्रीवैजनाथ हे एक प्रमुख आहे. शिवपुराणातील ज्योतिर्लिंगगणनेत या ज्योतिर्लिंगाचा स्थाननिर्देश 'परल्यां वैद्यनाथ' असा आहे, म्हणजे वैद्यनाथ हे ज्योतिर्लिंग परळी येथे आहे. (वैजनाथ हा वैद्यनाथ या नावाचा मराठी अपभ्रंश आहे.) परंतु उत्तरेकडील लोकांना हा स्थाननिर्देश मान्य नाही. बारा ज्योतिर्लिंगांची गणना करताना ते वैद्यनाथाविषयी शंकराचार्यविरचित स्तोत्रातील पुढील श्लोक म्हणतात :

> **पूर्वोत्तरे प्रज्वलिकानिधाने सदा वसन्तं गिरिजासमेतम् ।**
> **सुरासुराराधितपादपद्मं श्रीवैद्यनाथं तमहं नमामि ॥**

[उत्तर भारतात पूर्वेकडील भागात प्रज्वलिका (पर्यलिका किंवा परळी नव्हे) नावाच्या स्थानी गिरिजेसह निवास करणाऱ्या आणि ज्याची पदकमळे सुर आणि असुर या दोघांनीही आराधिली आहेत, त्या श्रीवैद्यनाथाला मी नमन करतो.]

उत्तर भारतातील लोकांच्या मताने हे स्थान म्हणजे बंगालमध्ये पूर्व रेल्वेच्या फाट्यावरील वैद्यनाथम् नावाचे जे स्टेशन आहे, ते होय. तेथे जे वैद्यनाथाचे भव्य मंदिर आहे, तेच वैद्यनाथ ज्योतिर्लिंगाचे ठाणे होय. परंतु ही समजूत प्रादेशिक अभिमानातून दृढावलेली दिसते. कारण शिवपुराणातील त्या सर्व प्रसिद्ध गणनेत परळीचा स्पष्ट निर्देश आहे. तसेच 'सिद्धान्तशिरोमणी' या ज्योतिषग्रंथात भूमध्यरेषेवरील प्रसिद्ध क्षेत्रांत परळीचा समावेश आहे. ही रेषा कन्याकुमारी, कांची, श्रीशैल, परळी, वाशीम, उज्जयिनी या स्थानांवरून मेरुपर्वतापर्यंत जाते, असे म्हटले आहे.

हे परळी क्षेत्र मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात आहे. हे ठिकाण मनमाड-हैद्राबाद लोहमार्गावर पूर्णा जंक्शनच्या अलीकडे असलेल्या परभणी स्टेशनवरून

जाणाऱ्या फाट्यावर आहे. हा फाटा परळीपर्यंतच आहे. याशिवाय बीड, लातूर, उस्मानाबाद येथून परळीकडे जाणाऱ्या मोटारी आहेत. आंबेजोगाई हे मराठीचे महातीर्थ परळीच्या अलीकडे अवघ्या सोळा मैलांवर आहे. तेथूनही परळीला जाता येते.

परळी हे गाव फारसे मोठे नसले, तरी येथे व्यावहारिक उलाढाल बरीच चालते. या गावाची लोकसंख्या तेरा-चौदा हजार आहे. रेल्वे आणि बसेस अशी दुहेरी वाहतुकीची सोय असल्यामुळे येथे या उलाढालींना उत्तेजन मिळाले आहे. सर्व गावात कॉंक्रिटचे रस्ते आहेत. गावात सायकलरिक्षा पुष्कळ आहेत, त्यामुळे यात्रिकांना अल्प खर्चात आणि अल्प वेळात सर्व स्थाने सुकरतेने पहाण्याची सोय होते. दोन-अडीच रुपयांत गावातील आणि गावाबाहेरील सर्व महत्त्वाची स्थाने तीन-चार तासात पाहून घेता येतात.

वैजनाथाचे देवालय एका उंचवटयावर आहे. जवळच एक तलाव आहे, परंतु त्यात पाण्याचे दुर्भिक्षच आहे. मंदिराच्या प्राकारात असलेल्या विहिरीला मात्र मुबलक पाणी आहे. सध्याचे मंदिर देवी अहल्याबाईने उभारलेले असल्यामुळे प्राचीन मंदिराच्या शिल्पाविषयी काहीच कल्पना करता येत नाही. नंदी आणि शिवलिंग फक्त प्राचीन दिसते. या मंदिराभोवती बंदिस्त कोटाच्या आत प्रशस्त प्रांगण आहे. कोटाच्या भिंतीला लागून आत ओवऱ्या आहेत. देवालयात प्रवेश करण्यासाठी उत्तर, दक्षिण आणि पूर्व अशा तीन बाजूंना प्रवेशद्वारे आहेत. या दारांसमोर चढून येण्यासाठी रुंदच रुंद घाटवजा पायऱ्या आहेत. तेथे या पायऱ्यांच्या चढावाला घाटच म्हणतात. नवा घाट, तीर्थ घाट आणि जुना घाट अशी या तीन घाटांची नावे आहेत. जुन्या घाटाच्या बांधणीत वापरलेल्या एका शिळेवर 'शके ११०८' असा कालाचा उल्लेख खोदलेला आहे. म्हणजे ही शिळा प्राचीन मंदिराच्या अवशेषांपैकी असावी. या घाटाच्या वरच्या पायरीवर एक पोकळ स्तंभाकृती शिल्प आहे. या स्तंभाच्या वरच्या भागात एक गवाक्ष आहे. त्या गवाक्षातून चैत्री आणि आश्विनी पौर्णिमेस उगवत्या सूर्याचे किरण शंकराच्या पिंडीवर पडण्याची व्यवस्था होती असे म्हणतात. जीर्णोद्धाराच्या वेळी मंदिराच्या रचनेत काही फरक झाल्यामुळे आता या तिथींना गवाक्षातून किरण येताना दिसत नाहीत. या व्यवस्थेला 'दिशासाधन' असे म्हणतात. हे दिशासाधन पूर्वेकडल्या किरणांसाठी असल्यामुळे हे शिल्प 'प्राची' (पूर्वा) या नावाने ओळखले जाते. आजही चैत्र आणि आश्विन महिन्यात सूर्यकिरण शिवलिंगावर पडतात ; पण त्यांची तिथी अनिश्चित झालेली असून, मंदिरात प्रवेश करण्याचा गवाक्षमार्गही ढळलेला आहे.



मंदिराच्या दक्षिणेकडील घाटावर 'हरिहर तीर्थ' आहे.

मंदिराची घडण चिरेबंदी आहे. समोर भव्य, उंच आणि प्रशस्त असा लाकडी सभामंडप असून तिहेरी दालनाचे गर्भगृह आहे. गर्भगृह आणि सभामंडप सम पातळीत असल्यामुळे सभामंडपातूनही शिवलिंगाचे दर्शन घडू शकते. कोटाबाहेर एक प्रचंड दीपमाळ आहे.

या मंदिराचा जीर्णोद्धार देवी अहल्याबाईने केला आहे. ही साध्वी तीर्थक्षेत्रे पहात पहात आणि देवदर्शने घेत घेत परळीस आली असता, वैजनाथाच्या मंदिराची पडझड पाहून तिचे धर्मपरायण मन अस्वस्थ झाले आणि तिने या मंदिराच्या जीर्णोद्धाराचा संकल्प सोडला. परंतु बांधकाम सुरू करायचे तर जवळपास चांगला दगड मिळेना. या विवंचनेत असता तिला दृष्टांत झाला की, परळी गावाच्या उत्तरेकडे जो त्रिशूला देवीचा डोंगर आहे, त्याच्या पायथ्याशी आवश्यक त्या दगडांची खाण सापडेल. या स्वप्नदृष्टांतानुसार त्रिशूला देवीच्या डोंगरात खाण पाडण्यात आली आणि मंदिराचे बांधकाम चालू झाले. या जीर्णोद्धाराचे काम पूर्ण झाल्याचा कालनिर्देश पूर्वेकडील दरवाजाजवळ असलेल्या एका संस्कृत शिलालेखात आला आहे. त्याचा आशय असा : 'या कांतिपुरी क्षेत्रात म्हणजे परळी येथे शके १७०६ मधील चैत्र शुक्ल पंचमी या तिथीला शुक्रवारी अहल्याबाई होळकर हिने हे मंदिर बांधून पूर्ण केले.'

गाभाऱ्यात जाऊन वैजनाथाचे दर्शन घेत असताना यात्रिकाचे मन या स्थानाच्या माहात्म्याने भारावून जाते. येथे शिव शक्तीसह वास करीत आहे, अशी भाविकांची



दीपमाळ, परळी वैजनाथ

श्रद्धा आहे. तसेच येथे हरिहर तीर्थ आहे आणि गोपीनाथाच्या रूपाने साक्षात हरीही या क्षेत्रात हरशंकराबरोबर निवास करीत आहे, त्यामुळे येथे हरिहरांचे मीलन पहावयास मिळते. हरिहरांबरोबर धन्वंतरीचाही या स्थानाशी संबंध सांगितला जातो. समुद्रमंथनातून जी चौदा रत्ने निघाली, त्यांतील धन्वंतरी हा वैद्यांचा राजा. त्याने विष्णूच्या आज्ञेवरून परळीच्या ज्योतिर्लिंगात प्रवेश केला, म्हणून हे शिवलिंग 'वैद्यनाथ' असे नाव पावले, अशी या नावाची व्युत्पत्ती सांगतात. शिवलीलामृतात आलेली चिलयाबाळाची कथा याच क्षेत्राशी संबंधित आहे, असे म्हणतात. तसेच शिवाची आराधना करून यमाला पराजित करणारा मृत्युंजय-मार्कंडेयही येथीलच. जुन्या घाटाजवळ त्याच्या स्मृतीची साक्ष असलेले 'मार्कंडेय तीर्थ' आहे. असे अनेक पुराणकथांनी गाजलेले हे क्षेत्र आहे. त्याचे दर्शन घेत असताना आपले मन उजळते—पवित्र होते.

वैजनाथ मंदिरात नित्यनैमित्तिक उपासनेचा क्रम अव्याहत चालू आहे. वैजनाथ मंदिराच्या व्यवस्थेसाठी पेशव्यांनी स्थानिक ब्राह्मणास ५,२८० बिघे जमीन इनाम दिली असल्याचा उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रात आढळतो. सोमवार हा शंकराच्या उपासनेतील महत्त्वाचा दिवस. त्या दिवशी नेहमीपेक्षा मंदिरात अधिक वर्दळ असणे स्वाभाविकच आहे. महाशिवरात्रीचा सोहळा येथे इतर शिवस्थानांतल्याप्रमाणेच गाजतो. त्या दिवशी यात्रिक हरिहर तीर्थात स्नान करून वैजनाथाचे दर्शन घेण्यासाठी हजारोंनी लोटतात. याच हरिहर तीर्थातील पवित्र जळ नित्याच्या पूजाभिषेकासाठी वापरले जाते.

महाशिवरात्रीशिवाय वर्षप्रतिपदा, श्रावण मास, विजयादशमी व वैकुंठचतुर्दशी हे दिनविशेष येथे गाजतात. या वेळी वैजनाथ मंदिरातील उपासनेचा सोहळा अनुभवताना यात्रिकांची मने संतृप्त होऊन जातात. वर्षप्रतिपदेच्या दिवशी वैजनाथ मंदिरात गुढी उभारण्याचा समारंभ थाटामाटाने होतो. या वेळी देवाला



परळी-वैजनाथ ज्योतिर्लिंग

वस्त्रालंकारांनी नाना प्रकारे सजवितात. श्रावण मासात रोज दूरचे गोदावरीचे पवित्र जळ कावडींनी आणून देवाला रुद्राभिषेक होतो आणि बिल्वपत्रांची लाखोली वाहिली जाते. या महिन्यात शिवदर्शनाचा लाभ घेण्यासाठी, गंगाजळाने रुद्राभिषेक करण्यासाठी आणि बिल्वपत्रांची लाखोली वाहण्यासाठी दूरदूरच्या ठिकाणांहून भक्तमंडळी येत असतात. विजयादशमीच्या दिवशी भक्तजनांच्या समूहासह देवाची उत्सवमूर्ती पालखीतून वाजत गाजत सीमोल्लंघनाला जाते. तसेच दसऱ्यानंतर कोजागरी पौर्णिमेपासून त्रिपुरी पौर्णिमेपर्यंत एक महिनाभर नित्यपूजेचा सोहळा विशेष प्रेक्षणीय असतो. वैकुंठचतुर्दशीच्या दिवशी मध्य रात्रीच्या वेळी महापूजा होते. त्या वेळी शिवलिंगावर बिल्वदलाचा खच पडतो. या महापूजेचा सोहळा पहाण्यासाठी त्या प्रसन्न गंभीर वातावरणात अनेक भक्त-भाविकजन मंदिरात तिष्ठत उभे असतात. मध्यरात्रीचा एकांत, शिव मंदिरातील गांभीर्य आणि अशा वातावरणात दरवळणारी पूजेची पवित्रता यांच्यामुळे दर्शन घेणारांचे मन हरखून जाते.

वैजनाथ मंदिराच्या परिसरात, परळी गावात आणि गावाबाहेर अनेक तीर्थे, पवित्र स्थाने व मंदिरे आहेत. गोपीनाथाचे मंदिर ब्राह्मणगल्लीत आहे. या मंदिरातील मूर्ती भुयारी गाभाऱ्यात आहे. वैजनाथ मंदिराच्या पूर्वघाटाच्या उत्तरेस असलेल्या गणेश मंदिरातील गणेशमूर्ती भव्य आणि वैशिष्टयपूर्ण आहे. या गणेशाला सोंड नाही आणि त्याने मल्लाप्रमाणे आसन घातलेले आहे, हे या मूर्तीचे वैशिष्टय आहे. या गणेशाचे दर्शन घेऊनच वैजनाथाच्या दर्शनास जावयाचे, असा येथील रूढ संकेत आहे. वैजनाथ मंदिराच्या परिसरात अनेक तीर्थे आहेत. दक्षिण घाटाजवळ हरिहर तीर्थ आहे, उत्तरेकडील नव्या घाटाजवळ नारायण तीर्थ आहे आणि जुन्या घाटाजवळ मार्कंडेय तीर्थ आहे. हरिहर तीर्थ आकाराने मोठे आहे. नारायण तीर्थ चौकोनी असून लहानसेच पण सुबक आहे. मार्कंडेय तीर्थापासून थोडयाच अंतरावरून सरस्वती नदी वाहते आहे. या नदीच्या पूर्वपश्चिम तीरांवर परळी गाव वसले आहे. पूर्व तीरावरील भाग 'कसबा' आणि पश्चिम तीरावरील भाग 'पेठ' या नावाने ओळखला जातो.

या पवित्र स्थानांशिवाय नारायण डोंगरातील वटेश्वर मंदिर, काळया व गोऱ्या रामाची मंदिरे आणि संत जगमित्र नागा यांचे समाधिमंदिर या स्थानांचा उल्लेख करायला हवा. जगमित्र नागा यांचे समाधिमंदिर डोंगराकडील रस्त्यावर गावाला लागूनच आहे. हे समाधिमंदिर अगदी साध्या बांधणीचे आहे. सभामंडप आणि गाभारा अशी त्याची रचना आहे. गाभाऱ्यात जगमित्र नागांच्या समाधीचा चौथरा असून, त्यामागे विठ्ठल-रखुमाईच्या मूर्ती आहेत.



लेखक : श्री. शं. रा. देवळे

पुराणकाळात अनेक राक्षसांनी श्रीशंकराला प्रसन्न करून घेतले आणि त्या वरप्रसादामुळे भयंकर उत्पात करून जगाला त्यांनी 'त्राहि भगवन्' करून सोडले. नंतर त्या दैत्यांचा नाश करण्यासाठी आदिशक्ति पार्वतीने अनेक वेळा अवतार घेऊन जगाला सुखी केले. पण त्याच्या उलट असेही एक विशेष उदाहरण आहे की, दारुका नावाच्या राक्षसीने तप करून देवी पार्वतीला प्रसन्न करून घेतले आणि त्या वरप्रसादाने तिने जगाला पीडा देऊन उत्पात मांडला. तेव्हा सज्जनांच्या आणि भक्तांच्या परित्राणासाठी भगवान शंकराला अवतार घ्यावा लागला. त्या विशेष प्रसंगाचे स्मृतिस्थान म्हणजेच औंढ्या नागनाथ हे पवित्र क्षेत्र होय !

दारुका राक्षसीच्या तपश्चर्येला प्रसन्न होऊन देवी पार्वतीने तिला एक स्वतंत्र वन देऊन टाकले. त्या वनात तिला कोणाही देवदेवतेपासून त्रास होणार नाही, असा वरही दिला. तिला अभय देऊन निर्भय केले. तेव्हापासून दारुका राक्षसी आणि तिचा पती दारुक हे उभयता ऋषिमुनींना आणि देवाब्राह्मणांना छळून त्या वनात आणून बंदिस्त ठेवू लागले. बंदीत पडलेल्या लोकांनी परमेश्वराची प्रार्थना केली, पण त्या ठिकाणी कोणत्याही देवाचा इलाजच नव्हता !

एके दिवशी त्या बंदिजनांपैकी कोणा एका शिवभक्ताने इतर लोकांना शिवभक्तीचा आणि शिवशक्तीचा महिमा सांगून सर्वांनी मिळून आर्त स्वराने शिवाराधना करण्यास सांगितले. 'ॐ नमः शिवाय' ह्या षडाक्षरी मंत्राचा घोष त्या दारुका वनात दुमदुमू लागला त्यामुळे कैलास डळमळू लागले. शंकराची समाधी भंग पावली.

त्या मंत्रघोषाने दारुक राक्षस संतापला आणि पिसाटासारखा धावत येऊन तो त्या सर्व ब्राह्मणांना मारू लागला. त्याच्या त्या मारण्याच्या वेगाबरोबरच

शिवमंत्रघोषांचा वेगही वाढला आणि काय आश्चर्य ! थोडयाच वेळात प्रत्यक्ष भगवान शंकर त्या दारुका वनात प्रकट झाले.

पार्वतीच्या वराने निर्भय झालेल्या त्या निर्दय दारुकदांपत्याला पार्वतीवराने शासन करण्याचे ठरविले. त्या वनात कोणत्याही देवदेवतेपासून त्या राक्षसांना त्रास होणार नव्हता, तरीही देवाब्राह्मणांना आणि शिवभक्तांना त्रास देणाऱ्या त्या उन्मत्त दैत्यांना महादेवाने ठार केले आणि आपल्या भक्तांना संकटमुक्त केले.

कैलासाहून मृत्युलोकावर आलेल्या त्या शंकराच्या ज्योतिर्मय मूर्तीभोवती पाताळातील सर्व नागांनी संरक्षक वेष्टन देऊन विलक्षण योग साधला होता. त्या नागेश शंकराने त्या वेळी दिव्य अवतार घेऊन भक्तांचे रक्षण केले.

भक्तांचा कैवारी भगवान शंकर नागनाथ रूपाने त्या दारुका वनात राहू लागला. त्याने त्या दुष्ट राक्षसीचा नाश केला खरा, पण पर्यायाने पार्वतीच्या वरालाही एक प्रकारचा कमीपणा आणला ; म्हणून तो मनाशी खिन्न होऊन फिरू लागला. दक्षयज्ञात सती भस्म झाली होती, त्या वेळी शंकर जसे विषण्ण होऊन उदास फिरत होते, तसेच या वेळी ते विरक्त होऊन दारुका वनात फिरत होते. काय करावे ते त्यांचे त्यांनाच कळेना. दिगंबर अवस्थेतील त्या नागनाथांभोवती भक्त स्त्रीपुरुषांचे थवे सदैव फिरत होते. त्यांच्या अनुग्रहासाठी ते आसुसलेले होते. अशा स्थितीत एके दिवशी आणखी एक महान चमत्कार झाला.

त्या नागेश शंकराने त्या दारुका वनातील एका जलाशयात उतरून आपल्या देहस्वरूपाचे भस्म करून घेतले आणि त्या ठिकाणी एका दिव्य ज्योतिर्लिंगाच्या रूपाने भक्तांना दर्शन दिले. त्या वेळी तेथे 'जय नागनाथ, जय नागेश' असे जयघोष झाले.



श्रीऔंढ्या नागनाथ

दारुका वनातील जलाशयाच्या अमृतमय उदकात भगवान शंकराच्या प्रकाशमान दिव्य ज्योतिर्लिंगाची पूजा नाग लोकांनी केली आणि लोकांनी त्या नागनाथाच्या भव्य ज्योतिर्लिंगाची त्या स्थळी विधिपूर्वक स्थापना केली.

शंकराच्या बारा ज्योतिर्लिंगांपैकी हे 'नागेशं दारुकावने' आठवे ज्योतिर्लिंग म्हणून भारतात प्रसिद्ध आहे. अमृतोदकातील हे दिव्य ज्योतिर्लिंग नागांकडून पूजले गेले, म्हणून याला नागेश हे नाव आहे आणि त्या स्थळाला अमृत–अमर्दक क्षेत्र–औंढा क्षेत्र हे नाव आहे.

मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यात कळमनुरी तालुक्यात पूर्णाहिंगोली लोहमार्गावर चोंडी स्थानकापासून आठ मैल अंतरावर हे औंढ्या नागनाथाचे स्थान आहे. महाराष्ट्रातील ह्या तीर्थक्षेत्राची यात्रा करण्यासाठी हजारो शिवभक्त नित्य तेथे जातात आणि ह्या दिव्य शिवदर्शनाने जीवन पावन करून घेतात.

श्रीनागनाथांचे हे औंढा क्षेत्र आजही टेकड्याटेकड्यांनी सर्व बाजूंनी वेढलेले असून तेथे सर्वत्र वृक्षवेलींची रेलचेल आहे. ह्या विशाल दारुका वनात सृष्टिशोभेचे आगळेच वैभव आहे.

औंढा क्षेत्राभोवती जुनाट तट असून गावाजवळच श्रीनागनाथाचे मंदिर आहे. ह्या मंदिराला सुमारे वीस फूट उंचीचा तट असून त्याच्या चार प्रवेशद्वारांपैकी उत्तरेकडील प्रवेशद्वार हेच मुख्य प्रवेशद्वार म्हणजे महाद्वार मानले जाते.

मंदिराच्या प्रशस्त प्रांगणाभोवती भक्कम नि भव्य ओवऱ्या बांधलेल्या आहेत. हे सर्व बांधकाम कोणा एका 'तूपकरी' नावाच्या थोर शिवभक्त व्यापाऱ्याने केलेले आहे, असे सांगतात.

पश्चिमाभिमुख असलेले श्रीनागनाथाचे मंदिर द्वादशकोनी हेमाडपंती बांधणीचे आहे. मंदिराच्या मुखमंडपावर सुंदर कळस असून त्यासमोरच नंदीमंडप आहे.

मुख्य द्वाराखेरीज उत्तर-दक्षिण दिशांना आणखी दोन द्वारे असून त्यांच्यावरही छत आहे. हे सर्व मंदिर शिल्पकलासौंदर्याचा अप्रतिम नमुना आहे. मंदिरात ठिकठिकाणी कोरीव मूर्ती आणि शिल्पशिला बसविलेल्या आहेत. हत्ती, घोडे, स्वार, योद्धे, कमळे, यती आणि हर प्रकारच्या शिवमूर्ती या मंदिराच्या शिल्पकामात कोरलेल्या आहेत.

भिंतीवरील कोनाड्यात शिवपार्वतीचे एक सुंदर शिल्प प्रेक्षणीय आहे. रुसलेल्या पार्वतीची समजूत घालणारा शिव म्हणजे कोमल भावशिल्पाचा एक सुंदर नमुना तर आहेच, पण त्यातच दारुका वनात शिवाने केलेल्या आगमनाचा पश्चात्तापही दर्शित केलेला असावा.



श्रीऔंढचा मंदिराच्या भितीवरील शिवपार्वती शिल्प

काही ठिकाणी बुद्धमूर्तीही कोरलेल्या आहेत. त्या पाहून अंजिठा-वेरूळच्या शिल्पकलेची आठवण येते. दक्षिणेकडील भिंतीवर गणेशाच्या बहुविध सुंदर मूर्ती आहेत. एकंदरीत नागनाथाचे मंदिर आणि त्याचा प्रांगणपरिसर फारच प्रेक्षणीय आहे.

मंदिराच्या आतल्या भागात मध्यमंडप असून तो वर्तुळाकार आहे. त्यातील आठही खांब कोरीव कामाच्या नक्षीने सुंदर बनविलेले आहेत. मध्यमंडपातील कासवाजवळ उभे राहून गाभाऱ्यात पहावे तर नागनाथाचे दर्शन होत नाही. कारण त्या दर्शनी गाभाऱ्यात देव नसून तो आतल्या खोल गाभाऱ्यात आहे. त्या छोटचा पण मुख्य गाभाऱ्यात देवदर्शनासाठी जाणाऱ्या भक्तांना अत्यंत नम्रता धारण करावी लागते. ते प्रवेशद्वार कोनाडयासारखे लहान असून तेथे अंधार असतो. तळघरासारख्या त्या गुप्त गाभाऱ्यात श्रीनागनाथाचे भव्य ज्योतिर्लिंग समयांच्या मंद प्रकाशात खुलत असते. त्या पिंडीवर अभिषेकपात्रामधून जलाची सतत धार पडत असते. तेथील वातावरण अत्यंत भावपूर्ण असते. त्या अमृतोदकामधील दिव्य ज्योतिर्लिंगाच्या पवित्र दर्शनाने भक्ताला शांतिसुखाचा अनुभव येतो!

रम्य स्थानी नांदणाऱ्या आणि भक्तिमुक्तीचे देणे देणाऱ्या भोगभूषित नागनाथाला वंदन करताना शंकराचार्यांनी म्हटले आहे :

**याम्ये सदङ्गे नगरेऽतिरम्ये विभूषिताङ्गं विविधैश्च भोगैः ।**
**सद्भक्तिमुक्तिप्रदमीशमेकं श्रीनागनाथं शरणं प्रपद्ये ॥**

हे नागेशाचे जागृत देवस्थान भाविकांच्या नवसाला पावते, याबद्दल अनेक अनुभव आहेत. असे सांगतात की, 'एका स्त्रीने मुलगा व्हावा म्हणून नागेशदेवाला काजळ घालून दूध पाजण्याचा नवस केला होता. पुढे तिला देव पावला! ती नवस फेडण्यास गाभाऱ्यात आली तो काय चमत्कार! तेथे पिंडीवर प्रत्यक्ष नागदेव फडा काढून बसलेला! बाई धाबरली. ओरडली. लोक जमले. तरी तो नागेश तसाच बसलेला! शेवटी कोणालाही त्याच्या डोळ्यात काजळ घालून त्याला दूध पाजण्याचे धैर्य होईना.

अखेरीस कंटाळून रात्री तो नाग फडा आपटून निघून गेला आणि पुनः आश्चर्य झाले की, त्याच वेळी त्या बाईचा मुलगा मरण पावला.

येहळेगावचे सत्पुरुष तुकाराममहाराज येहळेगावकर हे श्रीनागनाथाचे परमभक्त होते. ते त्यांच्या गावाहून रोज औंढचास येत. ते जातीने ब्राह्मण असून शूद्राचे अन्न सेवन करीत. जातीभेद ते मानीत नसत. एकदा नागनाथ मंदिरात ब्राह्मणांच्या पंक्तीत ते जेवायला बसले असता सनातनी लोकांनी त्यांना त्या पंक्तीतून पानावरून उठवले. तेव्हा नागनाथाचा कोप झाला आणि अकस्मात आकाशातून हजारो घारी येऊन त्यांनी ते अन्न उचलून नेले. सगळेच ब्राह्मण उपाशी राहिले. त्यांनी देवाची क्षमा मागितली.

एकदा संत नामदेवमहाराज औंढचास आले होते. त्यावेळी गोरा कुंभार यांच्या घरी संतमेळा जमला होता. तेव्हा मुक्ताबाईंनी हातात थापटणे घेऊन प्रत्येक संताच्या डोक्यावर मारून पाहिले त्यावेळी नामदेवाचे मडके म्हणजे डोके कच्चे आहे, असे त्यांना आढळले. नामदेवाला तो अपमान सहन झाला नाही, पण जेव्हा प्रत्यक्ष पांडुरंगाने त्याला सांगितले की, 'बाबा रे, अहंकार सोड आणि गुरूचा उपदेश घे. गुरू केल्याशिवाय परमार्थ व्यर्थ आहे!'

विसोबा खेचर हे नामदेवाचे गुरू होण्यास योग्य आहेत, असे सर्वांनी सांगितले म्हणून त्या थोर विभूतीचा शोध घेत नामदेव औंढचास आले. पण पहातात तो काय चमत्कार—ते विसोबा खेचर नागनाथाच्या पिंडीवर पाय देऊन खुशाल पडलेले आहेत. 'वाहवा रे माणूस! याला का आपण गुरू करणार?'

नामदेवाला राग आला. त्याने विसोबांना विचारले, तेव्हा विसोबा हसून म्हणाले, 'खरंच की! माझे पाय नागनाथाच्या पिंडीवर आहेत! बाबा नामदेवा, मी वृद्ध आहे. तेवढे माझे पाय उचलून खाली जमिनीवर ठेव!'

नामदेवाने विसोबांचे पाय धरले. ते उचलून दुसरीकडे ठेवले. तोच पुन: आश्चर्य! त्या स्थळीसुद्धा विसोबांच्या पायांखाली महादेवाची पिंडी होती. नामदेवाने पुन: पाय उचलून तिसरीकडे ठेवले. तरीही त्या पायांखाली पुन: पिंडी होतीच!

असे पुष्कळ वेळा केले, पण छे! त्याला तोच चमत्कार सर्वत्र आढळला. तेव्हा नामदेवाचा गर्व गळाला. राग पळाला. त्याला 'खरा' गुरू मिळाला. त्याने त्या सद्‌गुरूचा उपदेश घेतला आणि 'परमेश्वर सर्वत्र आहे, भीतूपण व्यर्थ आहे,' ह्या अद्वैताची साक्ष त्याला पटली. नामदेवाने गुरू केला, तेव्हाच त्याला मोक्षमार्ग मोकळा झाला. ही घटना नागनाथ मंदिरात घडली म्हणून तेथे ती आठवण कायम राहिली.

नागनाथाच्या मंदिरासमोर नामदेव एकदा कीर्तन करीत होते. आत मंदिरात त्याच वेळी ब्रह्मवृंद देवाला अभिषेक करीत होता. त्यांच्या मंत्रघोषात त्या भजनामुळे अडथळा येऊ लागला, तेव्हा ते ओरडून नामदेवाला म्हणाले, 'अरे, टाळ कुटणे बंद कर, नाही तर देवळामागे जाऊन खुशाल भजनाची कटकट कर!'

बिचारा नामदेव! त्याने तेथून तो भजनाचा फड उठविला आणि तो देवळामागे जाऊन उभा केला. तितक्यात देवाने काय नवल घडविले? नामदेवाचे भजन ऐकण्यास देवाने आपले मुख तिकडे वळविले! नागनाथाचे सबंध मंदिर पूर्वेकडून पश्चिमेकडे फिरले. नामदेवासाठी देवाचे देऊळ फिरले!

हा चमत्कार पाहून सगळ्यांनी तोंडात बोट घातले. अलोट गर्दी तेथे लोटली. सर्वांनी त्या थोर भक्ताच्या चरणी लोटांगणे घातली. त्यावेळी जे मंदिर फिरले ते अद्यापही तसेच कायम आहे. त्या आठवणीने देव आणि भक्त यांच्या प्रेमाला उजाळा मिळतो. नागनाथ मंदिराच्या समोरच नंदीमंडपामागे हे नामदेव स्मृतीचे एक छोटेसे शिवालय बांधले आहे. त्याला नामदेव मंदिर म्हणतात.



श्रीऔंढचा
नागनाथाचे मंदिर

नागनाथ मंदिराजवळच 'नागतीर्थ' ह्या नावाचे एक पवित्र तीर्थकुंड आहे. चोहो बाजूंना दगडी पायऱ्यांची मजबूत व सुंदर बांधणी असलेले हे तीर्थकुंड 'सासूसुनेचे कुंड' म्हणून संबोधले जाते. कारण मुख्य नागतीर्थाच्या आतच आणखी बारवेप्रमाणे बांधलेले अतिपावन असे 'ऋणमोचन तीर्थ' आहे. ह्या दोन्ही तीर्थकुंडांतील पाणी पोहऱ्याने शेंदून वर घेऊन यात्रेकरूंना स्नान करावे लागते. ह्या नागतीर्थात सुमारे बारा वर्षांनी येणाऱ्या कपिलाषष्ठीला प्रत्यक्ष गंगा येऊन उतरते. त्यावेळी काही काळ ह्या नागतीर्थाचे मूळचे हिरवे पाणी पांढरे शुभ्र होते. ती पर्वणी साधून तेथे स्नान करणारे लोक पुण्यवान समजले जातात.

ह्याखेरीज हरिहरतीर्थ, मोक्षतीर्थ, गयातीर्थ वगैरे पवित्र जलाशय स्नानतर्पणासाठी प्रसिद्ध आहेत. नागनाथाच्या दर्शनापूर्वी ह्या तीर्थस्नानाचा आणि तेथील हनुमानदर्शनाचा महिमा थोर मानला जातो.

नागनाथ मंदिराच्या दक्षिणेस नागतीर्थाच्या मागील बाजूस एक जुने देऊळ आहे. ते पूर्वाभिमुख असून त्याला तट आहे. तेथील ओवऱ्यांपैकी एका ओवरीत एकमुखी दत्तमूर्ती आहे. छोटचा मंदिरात मुरलीमनोहर आणि दत्तमूर्तीही आहे. मागील बाजूस एक विहीर व ओटा असून तेथे वीणावादिनी अप्सरा, एक मोठे जाते आणि असंख्य शिल्पसुंदर शिळा पडलेल्या आहेत.

औंढा क्षेत्रात अशी किती तरी मंदिरे आहेत की, त्या सर्वांचे दर्शन एकाच यात्रेत प्रत्येकाला घेणे अशक्य आहे! तथापि गावाच्या दक्षिणेस एक मैलावर गोकर्ण पर्वताच्या पायथ्याशी दोग्धा नदीच्या काठी असलेले कनकेश्वरी देवीचे मंदिर पाहून त्या माता पार्वतीचे दर्शन घेतल्याशिवाय ही यात्रा सफलच होत नाही. ह्या मंदिराचा परिसर निसर्गरम्य आहे. ही कनकेश्वरी देवी म्हणजे श्रीनागनाथ शंकराची पत्नी देवी भवानीच आहे. ह्या दारुका वनात तिचे विशेष महत्त्व मानतात. ती अखंड वरदायिनी आहे.

कनकेश्वरी देवीच्या मंदिरापासून दक्षिणेस एक मैलावर डोंगराळ भागात आणि दाट झाडीत आनंदीमहाराज नावाच्या एका निःस्पृह सत्पुरुषाची समाधी आहे. तो भाग निसर्गसुंदर आणि शांत असा आहे. आषाढी एकादशीला दर वर्षी तेथे मोठी यात्रा भरते.






लेखक : **प्रा. रु. पा. पाजणकर**

विदर्भाच्या जनजीवनात महादेवाला फार मान आहे. गावोगाव अन् घरोघर त्याचे भगत आहेत. नंदी हे महादेवाचे वाहन म्हणून प्रसिद्ध आहे. नंदीला वाहन म्हणून प्रेमाने जवळ करणाऱ्या महादेवाविषयी कृषिजीवी वैदर्भीय लोकांच्या मनात अपार आपुलकी आहे. इकडच्या प्रदेशातील 'रेडचांच्या शर्यती' हा फार प्राचीन पण तितकाच लोकप्रिय असा छंद होय. या शर्यतींना 'शंकर पट' म्हणतात. सालबर्डी हे महादेवाचे मान्यता पावलेले स्थान आहे. दर महाशिवरात्रीला तिथे प्रचंड यात्रा भरते. शंकर पट हे या यात्रेचे एक महत्त्वाचे वैशिष्टय आहे. इकडील जनता महादेवाला शंकर या नावाप्रमाणेच संभू आणि ऋषिबुवा किंवा ऋषिदेव या नावांनी मोठचा प्रमाणात ओळखते. श्रावणातल्या सोमवारी गावोगाव ऋषिपूजा होत असते. श्रावण सोमवारी ऋषि-पिंडीला बेलफूल वाहून सोमवार सोडण्याची प्रथा विदर्भात सार्वत्रिक आहे.

महादेवाचे वसतिस्थान गावात किंवा नगरात आहे, त्याप्रमाणेच ते रानातही आहे. हा कैलासीचा राणा लोकभावनेच्या लेखी सातपुडचाच्या कडचाकपाऱ्यांत वास्तव्य करतो. पंचमढीजवळील सातपुडचाचे उंचवटे महादेवाचे डोंगर म्हणूनच मानले जातात. मोठा महादेव तो हाच. त्याच्या दर्शनासाठी श्रावणात दूरदुरून पोहे येतात. रम्य वनश्रीने नटलेल्या या दुर्गम डोंगरात रहाणारा महादेव आपल्या भगताची पूर्ण कसोटी पहाणारा आहे. श्रावण महिन्यात पावसाच्या सरी वरून कोसळत असतात. रानगवत मिजाशीने वाढलेले असते. नदी-नाले भरभरून वाहत असतात. पण यांपैकी कशाचीही पर्वा न करता हजारो 'पोहे' दऱ्या-खोऱ्यांनी बिकट बनलेली मोठचा महादेवाची डोंगरी वाट एका जोशात चढत असतात. 'महादेवा जातो गा, शंकरराया'चा कैफ या भगतांना चढलेला असतो.

मोठा महादेव पंचमढीजवळ तर लहान महादेव सालबर्डीला अर्थात सालबर्डीही सातपुड्यातच. या ठिकाणी सातपुड्याच्या एका भागात एक नैसर्गिक भुयार आहे. ते चांगले दोनतीन फर्लांग तरी लांब असावे. या भुयारात एक पिंडी असून तिच्यावर डोंगराच्या पोटातून बारमहा थेंब थेंब पाणी गळते. महादेवाचे हे स्थान मोठ्या महादेवाच्या तुलनेत लहान खरे पण दर साल महाशिवरात्रीला तिथे जमणारी भाविकांची फार मोठी गर्दी असते.

महादेव हा वन्य आणि नागरी अशा दोन्ही प्रकारच्या लोकांना आदरणीय देव होय. समाजाच्या सर्व थरांत तो सारखाच प्रिय व श्रद्धेय दिसतो. वन्य जमातींतही महादेवाची पूजा फार भाविकतेने केली जाते. डोंगरकपारीत रहाणारा हा देव वन्य जमातींना पूजनीय वाटणे सहज स्वाभाविक आहे. मात्र महादेवाची मूर्ती विदर्भात तरी सर्वत्र पिंडी आणि नंदी याच स्वरूपात आहे. अंगावर भस्म, डोक्यावर गंगा अन् गळ्यात भुजंग अशी या देवाची प्रतिमा इकडे तरी फारशी मूर्तिमंत झालेली दिसत नाही. इकडील गावोगावी असणाऱ्या महादेवाच्या देवळातून नंदी व पिंडी याचेच दर्शन घडते. त्यांनाच महादेव म्हणावयाचे.

डोंगरात महादेवाच्या दर्शनाला भगतगणांचे थवेच्या थवे जातात. श्रावण महिन्यात मोठ्या महादेवाला जातात तसेच महाशिवरात्रीला प्रामुख्याने सालबर्डीला जातात. विदर्भात महादेवाच्या किती तरी जत्रा भरतात. त्या साऱ्या महाशिवरात्रीलाच असतात. महादेवाच्या दर्शनाला जाणाऱ्या भगतांच्या जमावाला 'पोहे' असे पारिभाषिक नाव आहे. गावागावांतून योग्य मुहूर्तावर हे पोहे दर्शनासाठी निघतात. गावकरी मोठ्या भक्तिभावाने त्यांना निरोप देतात. भगतांच्या गळ्यात फुलांच्या माळा घालतात, कपाळाला मळवट लावतात. रस्तोरस्ती लोक त्यांच्या पाया पडतात, वाजतगाजत पोहा गावाबाहेर पडतो. महादेवाची वाट चालू लागतो. पण ही वाट हा पोहा मुक्याने चालत नाही. मुखाने तो महादेवाचे गुणगान करीत असतो. या गुणगानात हा पोहा इतका रमून जातो की, डोंगरी वाटेची बिकटता किंवा दुर्गमता त्याला मुळीच जाणवत नाही. विशेष हे की, महादेवाचे हे गुणगान समूह-गीतासारखे असते. या गुणगानाला एक ठराविक पण भावमधुर अशी लय आहे. एक प्रकारचा गोड हेल काढून आणि मनातला भक्तिभाव ओतून एखादा पोहा महादेवाची गाणी गाऊ लागला म्हणजे सारे चराचर दुमदुमून जाते. सगळा आसमंत भक्तिभावाने भारून जातो. शिवरात्रीला महादेवाचे भगत एकादशीचे व्रत नियमाने पाळतात. श्रावणातही सोमवार मोठ्या धार्मिकतेने पाळले जातात. महादेवाच्या पिंडीला बेलफूल वाहिले की, महादेवाची पूजा पूर्ण होते. डोंगरातल्या महादेवाच्या भेटीला जाणारे पोहे अनेक प्रकारची गाणी गातात.

❀ ❀

# साळबर्डी

लेखक : **प्रा. आ. श्री. बोंडे**

सालबर्डी हे गाव मुलताई या बैतूल जिल्ह्यातील व मोर्शी या अमरावती जिल्ह्यातील तहसिलांच्या सीमेवर आहे. येथे सर्वत्र सालवृक्ष पसरलेले आहेत. धरणीचा रंग लहानसहान टेकड्यांसहित लाल, पिवळा व काळा या रंगांच्या मिश्रणाने बनलेला आहे.

निसर्गदत्त सौंदर्याचा हा प्रदेश एक तीर्थक्षेत्र आहे. या भागात जे खरप व पारीस नावाचे दगड आहेत, त्यांचा इकडच्या लोकांनी आपल्या दैनंदिन जीवनात विविध प्रकारचा उपयोग करून घेतला आहे. हे दगड टिकाऊ व टणक असल्याने लवकर झिजत नाहीत. ओबडधोबड अशा या दगडांतून सुंदर सुंदर वस्तूंना आकार देणारे कलाकौशल्य वाखाणण्याजोगे आहे. याच दगडाच्या अनेक वस्तू तयार करून येथील गोंड व कोरकू हे नागरिक यात्रेच्या वेळी त्या विकायला आणतात. मिळालेल्या पैशांवर जत्रेची मौज लुटून गुजराणही करतात.

अखिल विदर्भातून महाशिवरात्रीला महादेवाची गीते गात गात लोक येथे येतात, नवस करतात व तो फेडतात. प्राचीन काळी महामुनि अगस्ती यांनी आपला आश्रम सालबर्डीच्याच रमणीय व नितांत मनोहर परिसरात स्थापिला होता असे सांगतात. वाल्मीकि ऋषींचा आश्रमसुद्धा येथेच होता आणि रामाने सीतेचा त्याग केल्यानंतरचे तिचे उर्वरित जीवन, लव-कुश यांचा जन्म व बालपणही याच ठिकाणी गेल्याचे सांगतात.

सालबर्डीला 'तातोबाची मढी' म्हणून एक ठिकाण आहे. त्यालाच लोक वाल्मीकींचा आश्रम म्हणतात. आश्रमाच्याच बाजूला गंगा नावाची एक लहान नदी आहे. नदीला बारा महिने तेरा काळ पाणी असते असे सांगतात. गोंड व कोरकू लोक गंगेला देवाप्रमाणे मानतात. मनोभावाने तिची पूजाअर्चा करतात.

तातोबाच्या मढीच्या एका बाजूला पाण्याचा एक साठा आहे. लोक त्यालाच 'सीतेची न्हाणी' असे म्हणतात. या ठिकाणचे सभोवतालचे वातावरण आल्हाददायक आणि मनोरम असे आहे. सीतान्हाणीत येणारे पाणी थंड आणि गरम झऱ्यांचे असल्यामुळे लहान मुलांचे व मोठ्या माणसांचे कातडीचे विविध प्रकारचे रोग या पाण्यात नष्ट होतात. म्हणून बरीचशी माणसे येथे आंघोळ करतात.

सीतान्हाणीच्या एका बाजूलाच पर्वताच्या कड्यात रामाचे मंदिर व जवळच हनुमानाची मूर्ती आहे. तेथील एका खडकावर उमटलेले पाय, पादुका, नंदी आणि गणपती यांबद्दल पुष्कळ ऐकायला मिळते. 'महादेवा जातो गा' असा घोष येथे येणाऱ्या लोकांच्या तोंडून ऐकायला मिळतो. सालबर्डीला महाभयंकर असे दिसणारे महादेवाचे एक भुयार आहे. या भुयारात सर्वत्र भेसूर काळोख असला तरी सर्वच भक्तजन मोठ्या प्रयासाने, श्रद्धेने आणि भक्तीने भारावून महादेवाची आळवणी करतात. मोठ्या उत्साहाने व जिद्दीने येथे येतात. महादेवाचे हे भुयार भीमाने आपल्या गदेने तयार केले होते असे सांगतात.

महादेवाच्या भुयाराच्या जवळच एका ठिकाणी माडू नदीच्या पाण्याचा साठा आहे. त्यालाच तेथील लोक हत्तीडोह म्हणतात. या डोहात भयंकर मगरी आहेत. चक्रधरस्वामी यांचेसुद्धा काही काळ सालबर्डीलाच वास्तव्य होते. योगिनी मुक्ताबाईंची व चक्रधरांची भेट येथेच झाली. तातोबाची मढी म्हणून जी देवळी आहे, तेथील समाधी योगिनी मुक्ताबाईंची आहे.

भवभूतीसारखे थोर कवी व नाटककार याच भूमीत जन्मले असून वाकाटक वंशातील पराक्रमी व निडर राजेही याच भूमीत गाजले. वैदर्भीय मोहक राजकन्या वासवदत्ता आणि उदयनराजा यांचा प्रणयदेखील येथेच रंगला.






लेखक : डॉ. भाऊ मांडवकर

संपूर्ण विदर्भातील सर्वांत मोठी व कठीण यात्रा महादेवाची समजण्यात येते. या जत्रेला साहजिकच सर्व थरातील लोक येत असतात. ही यात्रा आज कठीण नसली तरी एके काळी ती फारच कठीण होती व म्हणून तिच्याशी एक प्रकारची भावनिकता निगडित झाली आहे. या भावनिकेतूनच महादेवाचे वैशिष्टय वाढले आहे.

सातपुडयाच्या महादेव डोंगरातील यात्रा ही मोठ्या महादेवाची तर सातपुडयातील सालबर्डीची यात्रा ही लहान महादेवाची ! दर महाशिवरात्रीला वऱ्हाडातील असंख्य भाविक या दोन यात्रांपैकी कोणत्या तरी एका यात्रेला हजारोंच्या संख्येने जात असतात.

प्रत्येक खेडयातून ५-१० माणसांचा किंवा ४०-५० लोकांचा जमाव या यात्रेला निघतो. निघण्याच्या वेळी मारुतीच्या देवळात सर्वजण निरोप घेतात. महादेवाची भावपूर्ण गाणी म्हटली जातात. ती अलिखित, अपौरुषेय अशी लोकवाणी मनाला भेदून जाते. घरी तान्हे लेकरू असतानाही देवाची ओढ महादेवाला ओढून नेते. म्हाताऱ्याकोताऱ्यांची रीघ महादेवाच्या यात्रेला निघते.

मोठा महादेव नागपूरच्या ईशान्येस पंचमढीजवळ तर सालबर्डी ही अमरावती जिल्ह्याच्या उत्तरेस मोर्शीहून पाच मैलांवर ! यात्रेच्या वेळी अमरावती ते सालबर्डी या ३९ मैलांच्या अंतरासाठी अनेक खास मोटारी सुटतात. त्यामुळे प्रवासाची अडचण जाणवत नाही.

सालबर्डी खेडेही गमतीदारच आहे. या खेडयातून एक लहानशी वाट गेली आहे. ही पूर्व-पश्चिम ५-१० फुटांची पट्टी म्हणजे मध्यप्रदेश व महाराष्ट्र यांची सरहद्द. एक घर तर अर्धे महाराष्ट्रात आणि अर्धे मध्यप्रदेशात आहे. हाच रस्ता यात्रेला पण दुभंगून टाकतो. त्यामुळे यात्रिकाला दोन्ही भागांतील यात्रेला उजव्या-डाव्या बगलेत घालून वाटचाल करता येते.

भक्तांचा जमाव एकदम आल्या आल्याच या यात्रेत जात नाही. प्रथम असंख्य 'भगत' उत्तरेकडे तुकडोजींनी ज्या भूमीवर १९३५ साली महायज्ञ केला होता त्या यज्ञभूमीवरून पुढे होत पहिल्या पायरीजवळ थांबतात. पहिल्या पायरीला वंदन करूनच कठीण वाट चढायची असते. कुणी सांगावे वाचण्या-जगण्याचे ? पहिली पायरी म्हणजे विशाल शिलाखंड! अगदी कड्यासारखा! त्याला शेंदूर लावा, नारळ फोडा, कापूर जाळा नि त्या दगडामागच्या निमुळत्या एकपावली वाटेने पुढे सरका. असा हा प्रवास.

पहिल्या पायरीवरच्या टेकडीवर चढल्यानंतर देवकाबाईची समाधी दिसते. ही देवकाबाई महादेवाच्या भुयारात काही वर्षांपूर्वी रहात होती. तिला लोकांनी त्रास दिला व तिने नजीकच्या हत्तीडोहात जीव दिला म्हणतात! हा हत्तीडोह या समाधीशेजारील मांडू नदीला आहे. या डोहाची खोली पाहून खरोखरी हत्तीसुद्धा पोहणी लागतील याची खात्री पटते. या डोहावरून एका गोष्टीचा खुलासा होतो. या डोहालगतच्या डोंगराला पूर्वी कुंजरपर्वत म्हणत असत. या कुंजरपर्वतावर अगस्तीमुनींचा आश्रम होता. अगस्तीने दक्षिणेची वाट विंध्य-सातपुड्यातून काढल्यानंतर प्रथम सालबर्डी स्थळच निवासासाठी पसंत केले. या कुंजरपर्वताचे हत्तीएवढाले सलग खरपी खडक पाहिले की पहाणारा आश्चर्यचकित होतो.

मांडू नदीच्या खोल काठावरून पुढे गेल्यावर एका नैसर्गिक कड्यात असलेली राममूर्ती पाहून जंगलाची वाट धरावी लागते. कधीच न आटणारी लहानशी गंगानदी पार करून दोन-तीन मैलांचा डोंगर चढावा लागतो. भगत धायकुतेपणाने महादेवाची गाणी गात पुढे जातात, थकतात आणि नवस फेडण्यासाठी फुकट पाणी वाटणाऱ्यांनी दिलेले पाणी पिऊन हिंमतीने पुढे जातात. पायऱ्या कुठेच नाहीत. सगळा रस्ता दगडांतून काढावा लागतो. एके ठिकाणी तर हा रस्ता अगदीच निमुळत्या कपारीतून जातो. शेवटी संभाची टेकडी येते. असंख्य लोकांची गर्दी! पण ओळीनेच भुयारात शिरले पाहिजे. सुशिक्षित-अशिक्षित सारे भेद विसरून क्रमानुसार भुयारात उतरावे लागते. चार-पाच पायऱ्या उतरताच आपण कोणत्या अज्ञात जगात, कोणत्या गर्तेत उतरत आहोत याची कल्पनाच येत नाही. त्यामुळे अनेक म्हातारे व नवखे 'भक्त' धाबरून जातात. पण देवाची ओढ म्हणते, 'चल पुढे!' पायऱ्याही ओबडधोबड, सूर्यप्रकाश नाही. एकाशिवाय दुसरा सरकण्यास अवसर नाही. बरेच वेळा वाकून चालण्याशिवाय गत्यंतर नाही. तरीही जमाव सरकत जातो. शिवाच्या भेटीला! वीस-पंचवीस मिनिटां-नंतर एक वळण मिळते व थोडा सरळ रस्ता आतल्या आत लागतो. आत पेट्रोमॅक्स असतात. त्या रस्त्याने जलद गेल्यावर २००-३०० कदमांवर अंधाऱ्या जागी एका चौकात शंकराचे दर्शन होते. पिंडीवर अखंड जलवर्षाव होत असतो.

जणू डोंगरच ठिपकत असतो. येथे पूर्वी आखाडा असावा. जागा प्रशस्त व प्रसन्न आहे. धुनी लागलेली असते व फोडलेल्या नारळांचे ढीग पडलेले असतात.

संभाचे दर्शन भरल्या व भारल्या मनाने घेऊन पलीकडे भुयारमार्गाने बाहेर पडावे! हा अर्धाएक तासाचा प्रवास म्हणजे एका जादुनगरीतील फेरफटकाच!

सीतेच्या न्हाणीजवळ लोक विश्रांती घेऊन एकादशीचा फराळ करतात. येथून 'ढोलंगशहाचा' दगा पहायला काहीजण जातात. हिंदु-मुसलमानांच्या श्रद्धेचे ते केंद्र आहे. पण हा दगा दूरचा म्हणून बरेचजण टाळतात. काहींच्या मते ढोलंगशहा ही गोंडकोरकूंची कोणी पूज्य देवता आहे!

सीतेच्या न्हाणीवर चढून दुसऱ्या डोंगरवाटेने परतत असताना बाबूखानाचा किल्ला लागतो. हा किल्ला आज उद्ध्वस्त झाला असला तरी त्यातील एक दिवाणखानेवजा इमारत चांगल्या अवस्थेत आहे. इमारतीवर झाडे उगवून ती विशाल वृक्षांत परिणत झाली आहेत. रचना दगडावर दगड ठेवून केलेली आहे. आत बसायला दगडांचे सुंदर चबुतरे आहेत.

किल्ल्याच्या अलीकडे आल्यास लोक 'देवीचे देऊळ' दाखवितात. खरे म्हणजे ही बुद्धगुहा असून या लेणीच्या समोर पूर्वी खडक असल्यामुळे वरून एका विवरातून उड्या मारून लोक जात असत. आतील मूर्ती खंडित आहेत. त्यामुळे मामा-भाच्याच्या लढाईत मामाने भाच्याचे शिर कापून नेल्याची कथा तयार झाली आहे! इथल्या नदीचे पाणी लाल खरपामुळे लाल झाले, तर म्हणे या रक्तानेच झाले! निसरडीवरून जाण्यासाठी किंवा आधारासाठी पाय रुतवायला खड्डे पाडले तर लोक म्हणायला लागले मामा गेल्यावर त्याच्या घोड्यांच्या टापा उमटल्या! बुद्धमूर्तीला खंडित करण्यासाठी मूर्तिभंजकाचे श्रम कारणी पडले असले तरी त्या लेण्याचे दर्शन घेण्याचे भारतीयांनी सोडले नाही! उलट एक भावनात्मक कथा तयार करून करुणार्त ओढ या विहाराबाबत निर्माण करून ठेवली गेली! विहाराला 'घोडपागा' असेही म्हटले जाते. या विहाराचा उपयोग पेंढारी, डाकू वगैरेंनी लपण्यासाठी केला असे लोकवार्तावरून समजते!

सालबर्डीला जैनांचेही निर्वाणस्थान मांडू नदीच्या एका काठावर असावे. महानुभावाचे एक देऊळ बुद्धविहारावर आहे. कुठे तरी कालिदास व उताणी देवी आहे म्हणतात. एका जागी नग्नदेवताही आहे. मांसाहार यात्रेत वर्ज्य आहे. उताण्या देवीच्या भक्तांना मात्र अपवाद ठेवला आहे.

परतताना शूर्पणखेची खंडित मूर्ती आढळते. शिल्प चांदा येथे खाली पडलेल्या भव्य मूर्तीसारखे आहे. या मूर्तीच्या आसपास काही मूर्ती कोरल्या आहेत. त्यावरून येथे एखादे मंदिर होते किंवा तशी योजना होती की काय कळत नाही. हा भाग डोंगराळ व विराण वाटतो.




लेखक : **श्री. गोविंद हरी शिंदे**

घोटण येथील श्रीमल्लिकार्जुनेश्वराचे स्वयंभू ईश्वरनिर्मित लिंग गाईच्या खुरात अडकून वर आल्यामुळे या स्थानाला गोस्थान (गोठाण), घोटण म्हणतात. पांडव वनवासात असताना, वीर अर्जुनाने विजय प्राप्तीस्तव या एकांतात असलेल्या श्रीमल्लिकार्जुनेश्वराची तपश्चर्या केली. सव्वा लाख बिल्वपत्रांची लाखोली वाहिली. 'ॐ नमः शिवाय' हा अक्षय जप केला. म्हणून या महादेवास श्रीमल्लिकार्जुनेश्वर म्हणू लागले. स्कंद पुराणात शिवपार्वतीचे महत्त्व सांगताना हे संपूर्ण जगत शिव आणि शक्तीचे समन्वित रूप आहे असे म्हटले आहे. शिव म्हणजे चांगले, अशिव म्हणजे वाईट. 'त्र्यंबकं यजामहे सुगंधी पुष्टिवर्धन' अशी शिवभक्तीची महती आहे. गावात सोमवारी पोळा आला तर नारळ फुटत नाही. गुरवांना पपईचे फळ कसे असते ते माहीत नाही. महादेवाची पिंडी म्हणून त्यांना ते वर्ज्य आहे. ज्यांनी निष्ठेने भक्ती केली, दर्शन घेतले, नंदादीप लाविला, बिल्व लाखोली वाहिली, शिवरात्र व्रतोद्यापन केले, प्रदोष करून उद्यापन केले, सोळा सोमवार व्रत केले, विभूती चर्चून रुद्राक्ष माला धारण केल्या, त्यांना इच्छित फळे देऊन आनंदित करणारे हे जाज्वल्य आणि जागृत दैवत आहे. एवढेच नव्हे तर 'व्याध गेला शिवपदाप्रती। तारामंडळी मृगे राहाती। अद्यापि गगनी झळकती। जन पाहती सर्व डोळा।।' अशी शिवभक्तीची दिव्यता, भव्यता, शिवलीलामृताच्या दुसऱ्या अध्यायात सांगितली आहे. सोमवारच्या कहाणीत नावडत्या राणीची कथा सांगितली ती शिवामुठी शिवास वाहिल्यामुळे शिवपुजे-मुळे नावडती सुखी झाली. अशी पहिल्या सोमवारी तांदळाची, दुसऱ्या सोमवारी तिळाची, नंतर मुगाची, नंतर जव सातूची वाहावी. असे या कहाणीत म्हटले आहे. 'शिवाशिवा शंभू कैलास महादेवा। माझी शिवामूठ श्रीमल्लिकार्जुनेश्वरा देवा।।' अशा मंत्रात, भक्तीत आणि निष्ठेत रंकाचे राव बनविण्याची शक्ती

असते. महादेवाला महानैवेद्य म्हणजे पाचापाचांनी शोभेल असा हवा व दक्षणाही तशीच हवी. महादेवाला लघुरुद्र महारुद्राचा अभिषेक केला असता सर्व ग्रहपीडा, संकटे दूर होऊन अपघात टळतात. दीर्घायुष्य प्राप्त होते.



श्रीमल्लिकार्जुनेश्वर

श्रीमल्लिकार्जुनेश्वराचे प्रेक्षणीय आणि भव्य मंदिर रामदेवराव यादव घराण्यातील हेमाडपंत प्रधानांनी बांधलेले आहे. सहाशे वर्षांपूर्वी बांधलेले हे मंदिर आजही चांगल्या स्थितीतच आहे. फक्त एका बाजूची भिंत थोडीशी पडलेली आहे. हे मंदिर म्हणजे हिंदु संस्कृतीचे एक अमोल भूषण आहे. हे देवालय म्हणजे स्थापत्यशास्त्राचा एक आदर्श नमुना आणि वास्तुकलेचा एक अमोल अलंकार आहे. पाहिल्याबरोबर अमावास्येच्या रात्रीच्या गडद अंधारात प्रवेश केल्यासारखे दिवसा बारा वाजता वाटते! बारवेवर मंदिर बांधलेले आहे. बारवेत श्रीमल्लिकार्जुनेश्वराचे तीन-चार फूट परिघाचे लिंग असून पिंडी एक फूट उंचीची आहे. लिंगासभोवती तांब्याचे कवच आहे. पिंडीवर तांब्याच्या धातूचा मुकुट आहे. 'फणींद्र माथा मुकुटी झळाळी ।' या उक्तीप्रमाणे कधीकधी शिवलिंगावर नाग खेळत असताना पुजारी व गावकऱ्यांनी पाहिलेले आहेत.

भक्तिनिष्ठेने कधीकधी नागसाक्षात्कारही होतो. सुवासिनी पूजेची ताटे, बिल्वदळे व शिवामुठी घेऊन—

**आला महिना श्रावण। धोटण बनले कैलास भुवन।**
**लक्ष घृत वाती लावीन। एक सुवर्ण वात मी वाहीन।**
**दीपमाळे हाले दैन्य जाईन। आनंदात मी राहीन।**

अशी शिवभक्तीपर गाणी म्हणत शिवगौरी पूजेस दर श्रावण सोमवारी रात्री १० वाजेपर्यंत मंदिरात गर्दी करतात. भोवतालच्या दहा-पंधरा खेड्यांतील स्त्री-पुरुष व जायकवाडी धरणावरील लोक दर्शनास येतात. सकाळी आठ वाजल्यापासून रात्री दहा वाजेपर्यंत गॅस बत्तीचा उजेड असल्यामुळे बारवेत अंधारात उतरून जाण्याचा त्रास वाटत नाही. पंधरा-वीस मैलांच्या परिसरात इतके भव्य दिव्य मंदिर कोठेच नाही. मल्लिकार्जुनेश्वर देवालय म्हणजे हिंदु धर्मातील चैतन्य भक्तीचे श्रेष्ठ माध्यम आहे.

हे हेमाडपंती मंदिर गावाला लागून पूर्व सडकेवर आहे. मोटार मंदिराच्या आवारात आणता येते. भोवताली बारा फुटी रुंदीचा देवालयास तट होता. तो पडून दगड अस्ताव्यस्त पडलेले आहेत. आवाराचे क्षेत्र २५,२५० चौरस फूट असून आवारात हेमाडपंती बळीराजाचे देऊळ आहे. मंदिराच्या पश्चिमाभिमुख दरवाजाच्या पुढे आणि नंदिकेश्वराच्या डाव्या बाजूस शंकराला अत्यंत प्रिय असलेला बिल्ववृक्ष आहे. तसेच २० फूट, १८ फूट, १५ फूट उंचीच्या अशा तीन दीपमाळाही आहेत. चौथी दीपमाळ २५ फूट असून ती तांडवनृत्य करणाऱ्या शिल्पकलेचे कौशल्य दाखविणारी असल्याचा भास होतो. प्रत्येक दगडावर शिवगण मूर्ती आहेत.

श्रीमल्लिकार्जुनेश्वर मंदिर ६० फूट लांब, ४० फूट रुंद आणि १५ फूट उंच असून तेथे विटांच्या वरवंड्या तीन-चार फूट उंचीच्या आहेत. विटांनी बांधलेले पोकळ चार चौथऱ्याचे ३२ फूट उंचीच्या डेरेदार आकाराचे शिखर आहे. पहिला चौथरा साधा आहे. दुसऱ्या चौथऱ्याला सोळा कळस डेरे आहेत. तिसऱ्याला आठ आहेत. शेवटचा चौथा कळस डेरा खालच्याच्या चारपट मोठा आहे. बाहेरच्या सभामंडपास उत्तराभिमुख आणि पश्चिमाभिमुख असा मुख्य दरवाजा आहे. आतल्या गाभाऱ्याचे तीन भाग आहेत. एक प्रकाशाच्या झरोक्याचा, दुसरा बारवेतील लिंगाचा आणि तिसरा पार्वती मंदिराचा. मधल्या दरवाजावर चार प्रकारची सुंदर प्रमाणबद्ध अशी नक्षी कोरलेली आहे. कपाळ-पट्टीवर देवांच्या दहा अवतार मूर्ती कोरलेल्या आहेत. तसेच उजव्या व डाव्या बाजूस चारचार चोपदार, भालदार, सुभेदार अशा मूर्ती आहेत. खांबावरही सुंदर नक्षी व शिवतांडव नृत्य मूर्ती आहेत. लिंगाच्या उत्तर बाजूस शिवशाळुंकाजवळ

मोठे कुंड असून तेथे पाणी आल्याने पावसाळ्यात दर्शन होत नाही. नेहमी बारव भरलेली असते. 'गिरजा बैसे मांडीवर। गंगा वागवितो शिरी ॥' या अभंगाचा प्रत्यय येथे येतो. येथील गुरवांना शिवाचे ब्राह्मण म्हणून ब्राह्मणा-इतकेच पूज्य समजतात. अन्न संतर्पणात एकही गुरव भोजनास नसणे इष्ट मानीत नाहीत. गुरवांना आमंत्रणे दक्षणा देऊन बोलावतात. येथे जटाशंकर, काशी विश्वेश्वर, वनवेश्वर अशी शिव मंदिरे आहेत. जटाशंकर मंदिर खिळखिळे झालेले आहे. त्याचे सर्व दगड व घुमट नक्षीदार असून ते कुशल कारागिरांनी नटविलेले आहेत.

वनवेश्वर मंदिर वनवे वंजारी जमातीच्या नांगराच्या फाळास लागल्यामुळे ते नऊ-दहा फूट उकरून काढले गेले तेव्हा तेथे उत्तम असे शिवलिंग आणि छोटे मंदिर पृथ्वीच्या पोटातून निघालेले दिसले. भोवताली येथे मोसंबीची सुंदर बाग असून दर साल तेथे श्रावणमासात नंदादीप नामसप्ताह करतात.

श्रीमल्लिकार्जुनेश्वराची पहिल्या श्रावण सोमवारी शेळक्यांची महापूजा असते. शेळक्यांचा वंश वाढेना म्हणून त्यांनी मल्लिकार्जुनेश्वराची निष्ठापूर्वक भक्ती केल्यामुळे देवाने त्याला पहिल्या श्रावण सोमवारी दोन आंब्याची फळे दिली. त्यांनी त्यातले एक पत्नीस दिले व एक फळ आपण खाल्ले. त्याला पुढल्या वर्षी दुसऱ्या श्रावण सोमवारी सुंदर मुलगा झाला. तेव्हापासून आज पंचविसाव्या पिढीपर्यंत ते महापूजा करीत आले आहेत. पिंडीची दह्यादुधाने पूजा, रुद्राभिषेक झाल्यावर गोदावरीच्या कावडीच्या पाण्याने शिवलिंग धुऊन स्वच्छ पुसून काढतात. यावेळी पिंडीशेजारी एकावर एक लहान असे गोल वेढ्याचे कपडे बसवून त्यात नंतर गहू भरून भोवताली नागिली पाने ताठ खोचतात. अशी पाच कापडे एकावर एक ठेवून गव्हांनी, पानांनी भरून तांदळाचा नाग काढून सर्व शाळुंकावर हिरव्या, तांबड्या, पिवळ्या, पांढऱ्या तांदळाच्या रंगीत राशी घालतात. नंतर 'जय जय देव जय देव जय श्रीमल्लिकार्जुन महादेवा । पहिल्या श्रावण सोमवारी शेळक्यांची सेवा ॥' अशी आरती होते. नंतर गुरव, ब्राह्मण, भजनी दिंडीवाले यांना भोजन दिले जाते. तशी चैत्र शुद्ध तेरस या दिनी दरसाल मोठी यात्रा भरते. पन्नास गावांचे यात्रेकरू येथे येतात. पैठणाहून गोदावरीच्या कावडी आणतात, कैलासकाठी मिरवणूक बँड, ताशे, इत्यादी वाद्ये वाजवून कावडी गावात मिरवत येतात. नंतर घरोघरच्या स्त्रिया दंडवत घालीत वाजत गाजत येऊन शिवाला नवस नैवेद्यार्पण करतात. रात्री ८ ते १० वाजेपर्यंत शंकरास १½ किलो ते ११ किलोपर्यंत खव्याचे पेढे वाटले जातात. अशा वेळी पिंडीच्या डोक्यावर नागफणा असलेली मूर्ती जणू भक्ताकडे पाहून हसत असते असा देखावा दिसतो. यात्रेस हजार-बाराशे रुपये

वर्गणी जमा होऊन ताम्रमूर्तीची पालखीतून रात्री ११ ते ४ (पहाटे) पर्यंत सर्व गावाच्या मुख्य रस्त्यांवरून मिरवणूक निघून मंदिरात परत येते. गावच्या घरोघरच्या स्त्रिया पंचारती घेऊन मूर्तीस ओवाळतात. दर्शने घेतात. छबिना पहाण्याकरिता पुष्कळ लोक येतात. चैत्र तेरस म्हणजे घोटणच्या स्त्रीमनात भक्तिभावाने धुमारे फोडणारा आनंदाचा प्रसंगच होय. बिल्वपत्रांचा शिवलिंगावर अंथरलेला हिरवा शालू व धूपदीपांचा देखावा आपले चित्त वेधून घेतो. यावेळी 'हर बोला हर बोला हर हर महादेव' अशा ओंकार घोषाने हृदय उचंबळून येऊन भक्तांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागतात.





# कोकणातील कुणकेश्वर

लेखक : **श्री. आ. बा. पाटील**

'कुणकेश्वर' या देवाच्या वास्तव्याचे ठिकाणही कोकणात कुणकेश्वर याच नावाने ओळखले जाते. हे गाव आणि हे मंदिर दोन्हीही समुद्राच्या तीरावर आहेत. मंदिर तर सागराच्या सान्निध्यातच असल्याने कुणकेश्वराच्या पदस्पर्शासाठी सागर आपल्या असंख्य लाटांचे बाहू नेहमी पसरत असतो. देवगडपासून सात-आठ मैलांवर हे प्रसिद्ध स्थान आहे. संगमेश्वर माहात्म्यात या स्थानाचा उल्लेख आला असून दक्षिण कोकणातील प्रसिद्ध स्थानांत याची गणना होते. या स्थानकासंबंधी प्राचीन लेख आढळत नाही, मात्र कुणक (म्हणजे कळक) नावाच्या वृक्षांची राई तेथे असावी आणि त्यावरून त्यास कुणकेश्वर नाव पडले असावे, असा काहींचा अंदाज आहे. देवगड-मालवण असा बोटीतून प्रवास करीत असतानाही हे मंदिर समुद्रातून चांगल्या प्रकारे दिसू शकते. हे मंदिर सुमारे ७० फूट उंचीचे असून ते डोंगराच्या पायथ्याशी सिंधुदुर्गाच्या सान्निध्यात २६ ते ३० फूट चौथऱ्यावर बांधले आहे. समुद्राच्या लाटांनी मंदिराचे नुकसान होऊ नये म्हणून मंदिराच्या पश्चिमेस भक्कम दगडाचा तट बांधला आहे, त्यावर सतत सागरलाटा आपटून तटाचा भाग कोसळून पडत चालल्याचे दिसून येते.

दक्षिण कोकणात कुणकेश्वराच्या मंदिराप्रमाणे विशाल आणि भव्य असे दुसरे मंदिर नाही. त्याची बांधणी या भागातील इतर देवळांप्रमाणे नसून ती द्रविडीयन पद्धतीची आहे. मुसलमानांच्या मशिदीतील पायऱ्यांप्रमाणे कुणकेश्वराच्या आतील दरवाजासमोर काही पायऱ्या अर्धचंद्राकार आहेत. तसेच बांधकामात वापरलेल्या शिला अजस्र असून त्या देवळाचा प्राचीनपणा दाखवितात. बांधकामात मोहकतेपेक्षा मजबुतीकडेच अधिक लक्ष दिल्याने समुद्र-किनाऱ्यावरील हे विशाल मंदिर अद्याप टिकले असावे.

या मुख्य देवालयाच्या उत्तरेस प्राकारातच जोगेश्वरीचे छोटे देवालय आहे. देवालयाच्या समोर दोन दीपमाळा व तुळशीवृंदावन आहे. कुणकेश्वराकडे तोंड करून चबुतऱ्यावर एक भव्य नंदी आहे. नंदीच्या मागे 'श्रीदेव मंडलीक' नावाचे एक लहान शिव मंदिर आहे. तेथून थोडे पुढे गेले की, नारायणाचे मंदिर लागते. श्रीनारायणाची मूर्ती चतुर्भुज असून ती सायुध आहे. देवळात एक जुनी तोफ आहे. त्यापुढे श्रीगणेश मंदिर लागते. या सर्व परिसराच्या मध्यभागी श्रीकुणकेश्वर मंदिर आहे. मंदिराच्या बाहेरच्या बाजूला चार भव्य स्तंभ असून मधोमध वर्तुळाकृती कासव बसविले आहे. मंदिराच्या मोठमोठ्या तुळयांवर उत्कृष्ट प्रकारची कलाकुसर केलेली दिसते. शाळुंका काळ्या दगडाची आहे.

श्रीकुणकेश्वराच्या गाभाऱ्याचे शिखर बरेच उंच असून ते बदामी आकाराचे बांधलेले आहे. बांधणीसाठी त्या ठिकाणी मिळणाऱ्या जांभ्या दगडाचा उपयोग केलेला असून बळकटीच्या ठिकाणी काळेभोर दगड घातले आहेत. कुणकेश्वर गावचे प्राचीनत्व दाखविण्यास त्या गावात या मंदिराशिवाय आणखी पाच जुन्या पद्धतीची देवळे आहेत. तटाबाहेर उत्तरेच्या बाजूस छोटा पण टुमदार असा जुन्या बांधणीचा एक तलाव आहे.

श्रीकुणकेश्वरची मोठी यात्रा महाशिवरात्रीस भरते. या यात्रेच्या वेळी कित्येक ठिकाणचे देव आपापल्या इतमामासह कुणकेश्वराला येतात. यात्रेस व महापर्वकाळी समुद्रस्नानास येणारे अनेक भक्त असतात. त्यामुळे दर वर्षी येथे प्रचंड यात्रा भरते.

या देवाबद्दल एक दंतकथा अशी सांगतात की, एका ब्राह्मणाची एक गाय दररोज चरत या भागात येत असे. ती घरी अजिबात दूध देत नसे. या गाईच्या दुधाचे काय होत असावे याचा शोध घेण्याचा प्रयत्न करण्याचे त्या ब्राह्मणाने ठरविले. म्हणून त्याने गाईवर पाळत ठेवून तो गाईमागून निघाला. त्या कुरणात येताच एका पाषाणावर त्या गाईने पान्हा सोडल्याचे त्याला दिसले. त्याचा त्याला राग आल्याने त्याने हातातील काठी त्या पाषाणावर जोराने मारली. त्यामुळे त्या पाषाणाचा एक तुकडा उडून त्यातून रक्त वाहू लागले. हे पाहून त्या ब्राह्मणास फार आश्चर्य वाटले आणि तो त्या पाषाणास शरण गेला. मग त्याने लोकांच्या मदतीने तेथील स्वच्छता करून दिवाबत्ती, पूजा वगैरे गोष्टी स्वत: सुरू केल्या. अशा प्रकारे तो त्या देवाचा परमभक्त बनला. श्रीकुणकेश्वराचे शिवलिंग अशा प्रकारे निर्माण झाले.

मंदिराच्या बांधकामासंबंधीही अशीच एक दंतकथा ऐकायला येते. फार पूर्वी समुद्रमार्गे इराण व हिंदुस्थानचा व्यापार चालू होता. एकदा इराणचा एक मुसलमान व्यापारी जहाजात माल भरून हिंदुस्थानच्या कोकण किनाऱ्याकडे

येत असता रात्री वाटेत किनाऱ्याच्या जवळपास त्याचे जहाज वादळात सापडले. आपण आता या वादळातून काही जगत नाही, असे त्याला वाटले. परंतु त्याच वेळी लांब अंतरावर त्याला किनाऱ्यावर दिवा दिसला. तेव्हा त्याने नवस केला की, जवळपास जो कोणी देव असेल त्याने आपणास सुरक्षितपणे किनाऱ्यास लावावे, आणि आपले प्राण वाचवावेत. तसे झाल्यास आपण जहाजातील संपत्ती खर्चून त्या देवाचा नवस फेडू. सुदैवाने त्याचे जहाज मालमाणसांसह सुरक्षितपणे किनाऱ्यास लागले. आनंदाने तो व्यापारी किनाऱ्यावर उतरला. त्याच वेळी अगदी जवळ असलेल्या शिवलिंगाकडे त्याचे लक्ष गेले. याच देवाच्या कृपेने आपले प्राण वाचले असे त्या मुसलमान व्यापाऱ्यास त्यावेळी वाटले आणि त्याची या हिंदु देवावर श्रद्धा बसली. त्यानंतर त्याने आपली संपत्ती खर्च करून श्रीकुणकेश्वरावर एक भव्य मंदिर बांधले. हे काम पूर्ण होण्यास सुमारे तीन वर्षे लागली. ज्या देवाने आपले प्राण वाचविले त्याचा सहवास सोडून जाऊ नये असा त्याने निश्चय केला आणि त्या भावनेच्या भरात त्या देवळाच्या उंच मनोऱ्यावर चढून व तेथून उडी टाकून त्याने प्राण दिला. त्याची कबर देवळाच्या उत्तरेस आहे. या कबरीचा वरील भाग घुमटाकृती आहे. मुसलमानाने श्रीकुणकेश्वराचे मंदिर बांधल्याची शक्यता असल्याने त्यावर हिंदु-मुस्लिम संस्कार दिसतात. म्हणूनच या देवळाच्या पायऱ्याही अर्धचंद्राकार असाव्यात असे काहींना वाटते. काहींच्या मते हे मंदिर इ.स. ११०० च्या सुमारास यादवांनी बांधले व छत्रपती शिवाजीमहाराजांनी नीळकंठ बावडेकर यांना सांगून त्याचा जीर्णोद्धार करविला. शिवशाहीतील ते एक प्रसिद्ध शिवस्थान होते. करवीरकर संभाजीमहाराजांच्या आज्ञापत्रातही त्याबद्दल उल्लेख सापडतो.

इतर अनेक प्रसिद्ध मंदिरांप्रमाणे श्रीकुणकेश्वराचे मंदिर कोणी व केव्हा बांधले याचा पुराव्यानिशी इतिहास सापडत नसला तरी ते एक प्राचीन आणि भव्य असे मंदिर आहे.






निवेदक : पंचायत समिती कार्यालय, शाहूवाडी

आंबा रोडवर गाडी गौड वारुळाच्या अलीकडे चार फर्लांगांवर धोपेश्वर पाटी आहे. पाटीपासून दक्षिणेस चार मैल गेल्यावर धोपेश्वर देवालय लागते. रस्ता जंगलातून गेला आहे. डोंगर चढावा लागतो. देवालयाच्या चारी बाजूंना उंच डोंगर आहेत. अशा नैसर्गिक पार्श्वभूमीवर देवालयाचे सौंदर्य उठून दिसते. समुद्र सपाटीपासून उंची अंदाजे दोन हजार फूट आहे.

देवळापासून सुमारे वीस फुटांवर एक रमणीय धबधबा आहे. तेथे पाणी दोनशे फूट उंचीवरून खाली पडते. पिण्यासाठी व स्नानासाठी एका वेगळ्या विहिरीचा उपयोग केला जातो. ही विहीर चांगली बांधीव व पायऱ्या असलेली आहे. पाणी भरपूर व स्वच्छ असते. या विहिरीलाच भक्तजन तीर्थ मानतात. देवासाठी धबधब्याचे पाणी वापरतात.

महादेवाच्या पिंडीवर पाण्याचा नैसर्गिक अभिषेक होत असतो. पिंड स्वयंभू आहे. तीवर तांब्याचा पत्रा बसवितात. दुपारी पिंडीवर सूर्याचे किरण पडतात. त्यासाठी मुद्दाम झरोका ठेवला आहे. देवालय शिवकालीन असून बांधकाम मजबूत दगडांतील आहे. कोरीव काम प्रेक्षणीय आहे. दुसरा मजला लाकडी आहे. महादेवाचे स्थान घुमटात आहे. देवालयात फुले-वेलबुट्टया, वाघाची चित्रे वगैरे नखाने कोरल्यासारखे सुंदर दिसते. नक्षीकाम प्रेक्षणीय आहे. मारुतीची दगडात कोरलेली मूर्ती सुबक आहे. देवासमोर चार फूट उंचीचा बैठक घातलेला नंदी आहे. तो अखंड दगडाचा असून जणू काय तो जिवंत आहे असा भास होतो.

देवाजवळ मधल्या गाभाऱ्यात धोपेश्वर, काळंबा, आंबाई, विठ्ठलाई, भवानी इत्यादींच्या सुंदर पितळी मूर्ती आहेत.

देवालयाचे मूळ ठिकाण येथून चार मैलांवर जुना धोपेश्वर म्हणून प्रसिद्ध आहे. तेथे सध्या फक्त महादेवाची पिंडी व नंदी आहे. पिंडी जीर्ण झाली आहे.

आपला भाऊ वारळेश्वर याला भेटण्यासाठी धोपेश्वर या नवीन ठिकाणी आला अशी दंतकथा आहे.

नव्या धोपेश्वरापासून सुमारे तीनशे फुटांवर विठुलाईचे देवालय आहे. तेथे मांसाहारी प्रसाद असतो. परंतु धोपेश्वर दैवतास मांसाहार पूर्ण वर्ज्य आहे. स्नान केल्याखेरीज धोपेश्वराच्या मंदिरात भक्त प्रवेश करीत नाहीत. देवस्थान अत्यंत जागृत व पवित्र समजले जाते.

सांगली मिरजेपासून दूरदूरचे यात्रेकरू दर्शनास येतात. देव उठवणे, घालणे, चेटूक इत्यादी प्रकार या ठिकाणी चालतात. धोपेश्वराचा कौल घेऊन भाविक लोक विठुलाईची परवानगी घेऊन मग देव उठवणी करतात. या देवाच्या महोत्सवासाठी मलकापूरचे संस्थानिक स्वत: हजर राहून प्रसाद वगैरे करतात. ते हजार-बाराशे पाने स्वत:च्या देखरेखीखाली वाढतात. यात्रेला चार-पाच हजार भाविक जमतात. महाशिवरात्र हा यात्रेचा दिवस असतो.

मलकापूर येथील अंबिकेच्या देवालयापासून यात्रेच्या दिवशी हजारो लोकांच्या समुदायासह पालखी मोठ्या उत्साहाने धोपेश्वर येथे येते. पालखीत सोन्या-चांदीच्या मूर्ती असतात. गुलाल, खोबरे प्रचंड प्रमाणात उधळतात. लेझीम, ढोल यांच्या साथीसह पालखी येते. पालखीबरोबर साठ-सत्तर फूट उंचीची देवाची काठी आनंदाने नाचवत आणतात. या वेळी लोकांचे भक्तिप्रेम ओसंडत असलेले दिसते. पूजा जंगम पुजाऱ्याकडे असते.

दर सोमवारी लोक देवदर्शनास येतात. नवस म्हणून लोटांगण घालतात. मोठी पूजा होते. काही भक्तांच्या अंगात वारे येते. त्यावेळी सर्व भक्तगण 'धोपेश्वराचे नावे चांगभलं' अशा देहभान विसरून घोषणा देतात. महाशिवरात्री दिवशी खऱ्याखोट्याची शहानिशा करण्यासाठी होमाच्या धगधगत्या निखाऱ्यात लोक उड्या घेतात. देवळाच्या सभोवारच्या परिसरात पालखीची मिरवणूक काढतात. पालखीत धोपेश्वराचा मुखवटा असतो.

देवालयाच्या पश्चिमेला उंच कडा असून डोंगर पोखरला आहे. त्यामध्ये पाणी आहे. त्या पाण्यात अनेक देवांच्या मूर्ती आहेत. त्या ठिकाणी दर पौर्णिमा अमावास्येला पाण्यात पणतीच्या आकाराचा दिवा जळत असलेला दिसून येतो. भाविक लोक त्या ठिकाणी ओवाळणी टाकतात.

यात्रेकरूंसाठी देवालयाजवळ शंभर-वर्षांपूर्वी बांधलेली धर्मशाळा आहे. ती सुस्थितीत आहे. तेथे यात्रेकरूंची उत्तम सोय होते. देवस्थानमार्फत यात्रेकरूंना भांडीकुंडी मिळतात.

एकंदरीने धोपेश्वराचे हे ठिकाण अत्यंत रमणीय व मनाला आल्हाद व शांतता देणारे असे आहे.

❀ ❀



# खिद्रापूरचे कोपेश्वर मंदिर

लेखक : पं. वसंत गाडगीळ

कोल्हापूर ही माझी जन्मभूमी. लहानपणापासून सहलीचा व तीर्थाटनाचा खूप नाद. कोल्हापूरच्या परिसरातील लहानमोठी तीर्थक्षेत्रे, देवस्थाने १९४४ मध्ये कोल्हापूर सोडीपर्यंत मोठ्या हौसेने पाहून घेतली. त्यानंतर गेल्या पंचवीस-तीस वर्षांत कोल्हापुराबाहेरील महाराष्ट्राबाहेरचा कोणी मित्र भेटला की, त्याला महाराष्ट्र खरा पहायचा असेल तर नुसते पुणे-मुंबई बघून परतू नका, जरा खाली दक्षिणेला सांगली, वाडी, कोल्हापूर, पन्हाळा, ज्योतिबा, पहा. अस्सल मऱ्हाठी वळणाची संस्कृती तिकडेच पहायला मिळेल, असे आग्रहाने सुचवावे, जमेल तेव्हा बरोबर घेऊन कृष्णा-पंचगंगेच्या त्या पवित्र परिसरात फिरावे असा क्रम चालू आहे. बदरीकेदारपासून कन्याकुमारीपर्यंत आणि सोरटी सोमनाथ ते कलकत्त्याच्या कालीपर्यंत भारताच्या चारही दिशांना विखुरलेली असंख्य देवस्थानेही पाहिली. परंतु माझ्या जन्मभूमीच्याच परिसरात तीस-चाळीस मैलांवर खिद्रापूरला अगदी वेड लावील असे एक प्राचीन शिल्प आहे असे कळताच, आपल्या शेजारी इतके सुंदर शिल्प असता ते न पहाता, देशभर भटकणारे आपण व्यर्थच बढाया मारीत होतो असे वाटू लागले.

आजवर पाहिलेल्या कोणत्याही मंदिरापेक्षा याची रचनाबैठकच निराळी असल्याचे आढळून आली. मंदिरासभोवार विविध अलंकारांनी नटलेले रुबाबदार हत्ती! थोडेथोडके नव्हते, चांगले शेशंभर! चौकशी करता त्यांची अचूक संख्या ९६ असल्याचे समजले. या ९६ गजराजांच्या पाठीवर विमान पद्धतीने बांधलेले हे मंदिर आठ-दहा फूट तरी कृष्णेच्या गाळात बसलेले आहे. कारण गंडस्थळापर्यंत मातीखाली असलेले कित्येक हत्तीच याची साक्ष देत होते, कोणार्कचे सूर्य मंदिर सोडले तर या पद्धतीचे मंदिर भारतात इतरत्र कोठेही नाही. कोल्हापूरच्या अंबाबाईच्या देवळातही दक्षिणेच्या बाजूस सूर्यचंद्र मंदिराजवळ असे दोन हत्ती



खिद्रापूर येथील शारदेची मूर्ती

आहेत, पण ते या खिद्रापूरच्या हत्तींइतके सुबक, रेखीव आणि प्राचीनही वाटत नाहीत. हळेबीडच्या हत्तींनाही या हत्तींचा डौलदार रुबाब नाही. मात्र या हत्तींची प्रचंड प्रमाणावर झालेली मोडतोड मन विषण्ण करून टाकते. रथाकार मंदिराचा भार पेलणाऱ्या या ९६ गजराजांपैकी चारदोनच मोडतोडीपासून बचावले आहेत, असे दिसले.

या गजराजांच्या मोडतोडीने हळहळ वाटत असतानाच, मान वर करून मंदिराचा भाग पाहू लागताच आपण एखाद्या रसिक सम्राटाच्या दरबारात गायक, वादक, नर्तिका यांची एखादी रंगलेली मैफलच पहात आहोत असे वाटले. इतक्या सुंदर, रेखीव, बांधेसूद अंगप्रत्यंगातून कलेचा, सौंदर्याचा आविष्कार घडविणाऱ्या आणि इतक्या मोठ्या आकाराच्या मूर्ती मी भारतात इतरत्र कुठेही पाहिलेल्या नाहीत. जगन्नाथपुरीचे स्मरण मला यावेळी आवर्जून झाले. परंतु तेथील विविधतेचा भाग सोडला तर, येथील मूर्तींच्या आकारामुळे आणि भावाविष्कारामुळे जिवंतपणात याच सरस ठरतील. या मंदिराच्या दक्षिणेस मंगलमूर्ती गणेश, तर उत्तरेला अभंग 'शारदा' वरदहस्त बसलेली आढळून आली.

मंदिराच्या आत जाऊन येथील देवतेचे, कोपेश्वर महादेवाचे, दर्शन घेतले. विशेष म्हणजे या मंदिरात शिवासमोर त्याचा नंदी नाही. दक्षयज्ञासाठी पार्वती नंदीवर बसून निघून गेल्याचे समजताच परमेश्वराने रागावून तोंड फिरविले आणि ते या ठिकाणी उत्तराभिमुख न बसता दक्षिणाभिमुख बसले, अशी आख्यायिका सांगतात. आणि नंदीची स्वारी येथून मैलाच्या अंतरावर असणाऱ्या

येडरगावी जाऊन बसली ती तिथेच! नंदीविना शिव हा येथील असा खास विशेष आहे.

गर्भगृह, सभामंडप आणि स्वर्गमंडप असे या मंदिराचे तीन भाग आहेत. स्वर्गमंडप गोलाकार असून, बारा स्तंभांवर खडा आहे. इंद्र, ब्रह्मा, विष्णू, शंकर यांसारख्या देवतांच्या मूर्ती आपापल्या वाहनासह व देवतेसह या स्तंभांवर कोरलेल्या आहेत. मंदिराच्या अंतर्भागात बाहेरच्या मानाने कलाकुसर बेताचीच आहे. परंतु कोल्हापूरच्या महालक्ष्मी मंदिराप्रमाणेच येथे खडे असलेले गाभाऱ्याबाहेरील जयविजय मात्र कोल्हापूरच्या त्या विशालकाय मूर्तीपेक्षा लहान आहेत, तरीही विविध अलंकारांनी नटलेले, रेखीव आणि सुंदर आहेत. यांपैकी जय हात-पाय-शिर धडावेगळ्या स्थितीत मंदिराबाहेर दक्षिणेच्या बाजूला पडलेला आहे. विजय मात्र जाग्यावर शाबूत आहे. बाहेर भग्न स्थितीत असणारा कमरेपासून कंठापर्यंतचा जयाचा वक्षःस्थळाचा भाग हा सौंदर्याचा एक मूर्तिमंत तुकडाच! त्याच्या जवळून दूर जावेसेच वाटेना. एखादा अंगावर भारी दागिने असणारा सम्राट धारातीर्थी पडला आहे, असेच त्याच्याकडे पाहून वाटले.

मंदिराच्या बाहेरील आजूबाजूची पडझड पाहूनच मात्र उद्वेग वाटला. अरसिक मोगलांनी धर्मद्वेषाने काफरांच्या या मंदिराचा, त्यातील कलाकुसरीचा सत्यानाश करून आपली पाशवी वृत्ती प्रकट केली, हे सारे इतिहासजमा झालेले भूतकालीन वृत्त! पण आज आम्ही वर्तमानात वावरणाऱ्यांनी गेल्या शेपन्नास वर्षांत काय केले?

पेपरवाले खिद्रापूर पहायला आले याचा आज त्या मंदिरासमोर एका खोपीत हॉटेल घालून बसलेल्या गावकरी लोकांना केवढा आनंद झाला! त्यांनी मोठ्या

'खिद्रापूर' येथील मंदिराचे प्रवेशद्वार



उत्साहाने व अभिमानाने आम्हांला शक्य ते सर्व सहकार्य देऊ केले. 'मातीत गाडले गेलेले हत्ती उकरून काढून पाहू या का ?' असा नुसता विचार व्यक्त करताच कुदळ घेऊन मंडळी मंदिराभोवती हत्तींना गाडणारा गाळ उकरायला लागली.

परंतु कलेची, सौंदर्याची जाणच नसलेल्यांनी मंदिराची दुरुस्ती करताना केलेले चुनेबंदी काम म्हणजे मूळ सौंदर्याची नासाडीच. त्यापेक्षा पडझड आहे तशी राहिली असती तरी त्यातून सौंदर्याने डोके बाहेर काढून जगाकडे पाहिले असते.

मंदिराच्याच दक्षिणेला खाली कृष्णा पश्चिमवाहिनी आहे. अशा तीर्थाला विशालतीर्थ म्हणतात. पर्वकाळी येथील स्नान पुण्यकारक मानले जाते. या नदीच्या आणि मंदिराच्यामध्ये नदीतीरावर विशाल पटांगण आहे. त्यावर गाई, घोडे वगैरेसह फिरत्या लोकांनी सहकुटुंब सहपरिवार तळ ठोकला होता.

मंदिराच्या दक्षिणद्वारी देवनागरीत असलेल्या शिलालेखात देवगिरीच्या सिंघणदेवाने या मंदिराला——

'कुंडल कृष्ण वेणी भेणसी संगमे मिरीईच देशमध्ये (मिरज) च्च तिष्ठमान कुंडलदामवाडग्राम सवृक्षमाला कुलं . . . श्रीकोपेश्वरदेवाय सलाङ्ग भोगरङ्ग-परिमल परिपूर्णार्थ अष्टविधार्चननिमित्त शासनोदकेन प्रदत्तवान्।' असे ग्रामदान केल्याचा उल्लेख आहे. शिखर शिंगणापूर स्थापन करणारा सिंघणदेव हाच असेही सांगतात. इ.स. १२१० ते १२३८ हा या सिंघणदेवाचा काळ असून, त्यांचे वरील संस्कृतातील २८ ओळींचे सुंदर आज्ञापत्र आहे. सांगलीचे ज्येष्ठ पत्रकार श्री. गजाननराव हुद्दार यांच्या घरी गेलो असता मला या आज्ञापत्राचा संपूर्ण संस्कृत तर्जुमा वाचायला मिळाला.

या कोपेश्वर देवतेला असणाऱ्या इनाम जमिनीबद्दल श्री. हुद्दार म्हणाले, 'जुगूळ, शिरगुप्पी, शहापूर आणि राजापूर या चार गावात श्रीकोपेश्वर इनाम या नावाच्या जमिनी आहेत. पालखी वाहणारे जंगम, करढोल वाजविणारे व दिवटी धरणारे कोष्टी, वाजंत्री, घडशी आणि गाणारीण नायकीण यांना या जमिनी श्रीकोपेश्वराच्या सेवेसाठी आहेत. प्रत्येक सोमवारी निघणाऱ्या देवाच्या पालखीसाठी सेवा म्हणून या जमिनी सेवेकऱ्यांना दिलेल्या आहेत. यांपैकी एक एकर ते सहा एकरपर्यंत गावोगावी अनेक वाटण्या होऊन सेवक त्या जमिनी भोगत आहेत. गावात राहून नित्य पूजा करणारे एकमेव सेवेकरी मंदिराजवळील त्यांच्या घरी आम्हांला भेटले. ते म्हणजे रामचंद्र पुंडलीक ऊर्फ आप्पाशास्त्री जोशी'

सांगली संस्थानाने शिरगुप्पी गावी खिद्रापूरच्या कोपेश्वराला रोज पक्वान्न-नैवेद्यासाठी १६ एकर जमीन दिलेली आहे. परंतु तेथून कधीच नैवेद्य नसतो, असेही सांगण्यात आले.

बॉम्बे गॅझेटियरमध्ये (१८८१) संकेश्वर शंकराचार्यांची सत्ता असलेले हे मंदिर १०३½', ६५', ५२½' (उंच) लांबी रुंदी, उंचीचे असल्याचा उल्लेख केला आहे. त्यावेळी येथील लोकसंख्या १०३६ असल्याचेही नमूद केले आहे.

आज येथील वस्ती १२०० आहे. सात ब्राह्मणांची, तीन मराठा, पन्नास लिंगायत व बाकी जैन आणि मुसलमानांची घरे आहेत. १९१४ ते १९१८ मध्ये प्लेगाच्या व इन्फ्ल्युएंझाच्या साथीने या गावातील फार मोठ्या लोकवस्तीचा बळी घेतला.

खिदरखान मोकाशी या वतनदाराने हे गाव वसवले म्हणून याला खिद्रापूर नाव पडले. आजही येथे मोकाशी वतनदार आहेत. हा भाग सुपीक असून ज्वारी, तंबाखू, शेंगा आणि ऊस ही पिके निघतात.

पक्का रस्ता आणि वाहतुकीची सोय नसल्यामुळे पावसाचे चार महिने खिद्रापूरचा जगाशी संबंधच तुटतो.

**बुत्ती पूजा**

श्रीकोपेश्वरास दहीभाताची जी पूजा बांधली जाते त्या पूजेस 'बुत्ती पूजा' म्हणतात. 'बुत्ती' हा कानडी भाषेतील शब्द आहे. बुत्ती म्हणजे दहीभात. उन्हाळ्यात शिवरात्रीपासून मृग नक्षत्र निघेपर्यंत म्हणजे पावसाळ्याच्या प्रारंभापर्यंत ही पूजा भक्तजन बांधीत असतात. शक्यतोवर सोमवारी आणि शक्यच नसेल तर मग गुरुवारी या दोन दिवशीच ही पूजा बांधली जाते. चांगला स्वच्छ तांदूळ घेऊन त्याचा भात बनविला जातो. हा भात चांगला शिजलेला फार मऊ नाही फार मोकळा नाही. शिजविलेल्या भांड्याच्या तळास न लागलेला असा असावा लागतो. आदल्या दिवशी रात्री चांगले (म्हणजे पाणी थोडेसेही न घातलेले) दूध चांगले तापवून विरजण घालून ठेवलेले असते. सकाळी तयार



खिद्रापूरच्या कोपेश्वर महादेवासमोर भगवान विष्णू उभे राहिले त्याचे प्रतीक

भात आणि विरजणाचे भांडे देवळात नेतात. भात गरम असतानाच स्वच्छ अशा कपड्यात घालून, हाताने मळून सारखा केला जातो. जरुरीप्रमाणे दही घालून त्याचा एक मऊ असा गोळा केला जातो. थोडेसे निरसे दूधही त्यात घालून जरूर त्या प्रमाणात पातळही करावा लागतो. मग तो भात संपूर्ण शाळुंका, पिंडी आणि पुढील श्रीकोपेश्वर यावर एकसारखा चोपडला जातो. त्या पिंडीवर श्रीशंकर-पार्वती, गणपती, नंदी वगैरे सर्व मूर्ती भाताच्याच केल्या जातात. नंतर मूर्तीला आवश्यक तेथे केस, डोळे वगैरे रंगविले जातात. दहीभाताने लिंपून काढलेली ती मूर्ती जणू संगमरवरीच आहे असे दिसते.

ही पूजा बांधणाऱ्या सध्या खिद्रापुरात दोनच व्यक्ती आहेत. श्री. रामचंद्र पुंडलीक ऊर्फ आप्पाशास्त्री जोशी आणि त्यांचे चिरंजीव श्री. रघुनाथ हेच ही पूजा बांधतात. पूजा बांधण्यास सुमारे तीन तास लागतात. पूजा बांधून झाल्यावर मग पूजा, धूपदीप, नैवेद्य (पुरणाचा), आरती वगैरे होते. संध्याकाळी गुरव मंडळी ती पूजा उतरवितात. देवाच्या ज्या मूर्ती असतात त्यांचे नदीत विसर्जन केले जाते व बाकीचा दहीभात गुरव मंडळी स्वत: प्रसाद म्हणून घेतात आणि वाटतात. या पूजेस पुढीलप्रमाणे साहित्य लागते. सहा किलो तांदूळ, चार लिटर दूध विरजणासाठी आणि सकाळी अर्धा लिटर दूध, रंग वगैरे किरकोळ साहित्य.



# श्रीसिद्धेश्वर मंदिर



लेखक : **श्री. दामोदर जोशी**

बेळगाव नगरीच्या पूर्व दिशेस कणबरगी नावाचे सुमारे चार हजार वस्तीचे एक गाव आहे. या कणबरगी खेड्याचे उत्तर दिशेला सुमारे एक मैल अंतरावर सह्याद्री पर्वताचा एक लहानसा फाटा लागतो. तेथील वनदाट जंगलातील देवालयाच्या परिसरातील सुमारे सहाशे दगडी पायऱ्या चढून गेले म्हणजे उंचावर दगडी कपारीत श्रीसिद्धेश्वराचे सुंदर व जागृत असे एक देवस्थान आढळते. प्रत्येक वर्षी श्रावण मासात दर सोमवारी या सिद्धेश्वर देवालयाची फार मोठी जत्रा भरते. जत्रेस बेळगाव, शहापूर वगैरे दहा मैल परिसरातील दहा-बारा हजार जनसमुदाय उपस्थित असतो. या श्रीसिद्धेश्वराच्या मंदिरात श्रीशंकराची स्वयंभू दगडी मूर्ती प्रकट झाली असून श्रीसिद्धेश्वर हे दैवत नवसास पावणारे असे जागृत दैवत आहे.

श्रीसिद्धेश्वर देवळात श्रीशंकराची पिंडी पूर्वाभिमुख अशी प्रस्थापित झालेली आहे. या पिंडीच्या उत्तर दिशेला कोपऱ्यात एक लहानसा दगडी चौकोनी कोनाडा आहे. या कोनाड्यासंबंधी अशी एक आख्यायिका सर्वसामान्य लोकांत प्रचलित आहे की, या दगडी कोनाड्याखाली एक भले मोठे भुयार असून ते भुयार थेट श्रीक्षेत्र काशीविश्वनाथाचे देवळापर्यंत जाऊन पोचले आहे ! पूर्वी काशीयात्रेस जाणाऱ्या लोकांना चोर, दरोडेखोर यांचा उपद्रव होई. हा उपद्रव होऊ नये, निवांतपणे व निर्धास्तपणे काशीयात्रा घडावी म्हणून श्रीसिद्धेश्वरानेच हा गुप्त मार्ग (भुयार) तयार करून काशीयात्रेस जाणाऱ्या लोकांस उत्तम व सोईचा, जलद मार्ग तयार करून ठेवला आहे.

श्रीसिद्धेश्वराच्या देवळाचे छपरावरील उंच भागी देवळाचे पूर्व दिशेकडील पायवाटेने सुमारे दोन-तीनशे पावले वर चढून गेले की एक सपाट व दगडी फरशीने विभूषित असा विस्तीर्ण डोंगरमाथा लागतो, या सपाट व जाड अशा

फरशीवर एका जागी एका भल्या मोठ्या जाडजूड माणसाच्या पावलाचा ठसा दगडात खोलवर खोदल्यासारखा दिसतो. हा पावलाचा ठसा म्हणजेच पाच पांडवांपैकी जो भीम त्याच्या पावलाचा ठसा असून त्याचे एक पाऊल येथे व दुसरे पाऊल येथून तीन मैलांवरील काकती येथील श्रीसिद्धेश्वराजवळ आढळून येते.

वर नमूद केलेल्या भीमाच्या पावलाजवळच दहा पावले अंतरावर एका सपाट फरशीवर गाडीच्या चाकाच्या आकाराच्या समांतर अशा खुणा खोदल्यासारख्या दिसतात. कुरुक्षेत्राच्या रणांगणावर ज्यावेळी कौरव पांडवांमध्ये तुंबळ युद्ध झाले त्यावेळी पांडवांपैकी अर्जुनाचा रथ भगवान श्रीकृष्णांनी याच जागेवरून हाकला, त्याचीच जणू ही स्मृती या दगडात अद्याप कायम आहे !

अर्जुनाच्या रथाच्या या चाकाच्या समांतर खुणांनजीकच सुमारे दहा-पंधरा पावलांच्या अंतरावर एका सपाट दगडाच्या कपारीवर सोंगट्याचा एक उत्कृष्ट पट खोदलेला स्पष्ट दिसतो. या सोंगट्यांच्या पटासंबंधी श्रीसिद्धेश्वराचे पुजारी म्हणतात की, हा सोंगट्यांचा पट खरीखरीचा व कौरव-पांडवकालीन पुरातन असून याच ठिकाणावर या सोंगट्यांच्या पटावर कौरव-पांडव द्यूत खेळले ! या द्यूतातच पांडव हरल्यामुळे त्यांना बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा लागला !



# गोगावचा श्री कल्लेश्वर

लेखक : **श्री. प्रताप हिंदुराव साळुंखे**

गोगाव हे सोलापूर जिल्ह्यातील एक छोटेसे खेडे आहे. येथे साधारणपणे एक हजार वस्ती आहे. येथील कल्लेश्वर हे दैवत जागृत असून आसपासचे अनेक लोक या देवाला नवस बोलतात. या देवाबद्दलची एक आख्यायिका ऐकायला मिळते ती अशी:

रामाने रावणाचा वध केला खरा पण रावण हा ब्राह्मण होता. रामाचे हातून ब्रह्महत्येचे पातक घडले. त्याकरिता रामाने तप करून शंकराला प्रसन्न करून घेतले. शंकराने सांगितले की, माझ्या पिंडीची स्थापना अशा ठिकाणी



गोगावचा श्रीकल्लेश्वर

करावी की, ज्या ठिकाणी हाकेस प्रत्युत्तर येणार नाही. तेथे आपली ब्रह्महत्येपासून मुक्तता झाली असे मानावे. रामाच्या हस्ते येथील पिंडीची स्थापना झालेली आहे असे मानतात. देवळात रामाची पावले उमटलेली आहेत. तेथे रामाची मूर्ती आहे.

हे देऊळ भव्य असून देवालयाचे बांधकाम प्राचीन काळचे आहे. गाभाऱ्यात पिंडी आहे. त्यावर नागफण्यासह कल्लेश्वराचे मुख बसविलेले आहे. ही पिंडी वाळूची असून सुस्थितीत आहे.

चैत्र वद्य चतुर्थीला या गावाच्या जत्रेस प्रारंभ होतो. या दिवशी 'उंचई' नावाचा लहान रथ केला जातो. तो सजविला जातो. देवळात दिवसभर नारळ वाहणे, नैवेद्य दाखविणे हे कार्यक्रम सुरू असतात. सायंकाळी सात वाजता देवळापासून पालखी निघते. पालखीत देवाची प्रतिमा ठेवली जाते. पालखीसमोर लेझीम, दांडपट्टा हे मर्दानी खेळ सुरू असतात. बऱ्याच वेळाने पालखी देवळात परत येते.

चैत्र वद्य पंचमी हा जत्रेचा दुसरा व मुख्य दिवस. या दिवशी देवाची रथातून मिरवणूक काढतात. या रथाची चाके सहा फूट व्यासाची असून त्यावर पाचखणी मांडणी असते, त्यावर ठराविक आकाराच्या तडच्या बसवतात. त्यावर डेरा व वर मोठा कळस बसविलेला असतो. नेहमीप्रमाणे याही दिवशी देवळात पूजा, नैवेद्य, आरती वगैरे विधी पार पडतात.

सायंकाळी सात वाजता कार्यक्रमास सुरुवात होते. प्रथम उंचईची व पालखीची मिरवणूक गावातील मारुतीच्या देवालयापर्यंत जाऊन येते. नंतर आरती करून रथास मोठे दोर लावतात. नंतर ढोल, सनई, बँड यांच्या वादनाने व हरहर महादेवाच्या जयघोषाने सर्व परिसर दुमदुमून जातो. समोरच्या नदीपर्यंत रथ ओढीत नेऊन पूर्वस्थळी आणतात. याच वेळी देवळावरून मूल खाली फेकून झेलणे वगैरे नवसाचे कार्यक्रम होतात. यावेळी गुरवाच्या अंगात येते व तो भविष्यकथन करतो. रात्री गोंधळ होतो.

जत्रेचा शेवटचा दिवस वद्य षष्ठी या दिवशी कुस्त्या होतात. नंतर जत्रेचे जेवण होते. पाचसहा काहिली खीर शिजविली जाते. सर्व भाविक देवाचा प्रसाद घेतात. रात्री ललिताचा कार्यक्रम होतो.

अशा रीतीने तीन दिवसांच्या कार्यक्रमाची सांगता होते. गोगाव हे अगदी लहान खेडे असूनही येथील जत्रेचे स्वरूप मात्र भव्य असते.



# श्रीक्षेत्र उत्तरेश्वर

लेखक : श्री. जीवन शंकरराव कुलकर्णी

बीड जिल्ह्यामध्ये केज तालुक्यात केज गावाहून बारा किलोमीटर अंतरावर हनुमंत पिंपरी नावाच्या गावात उत्तरेश्वर नावाचे एक भव्य शिवालय आहे. हे मंदिर अगदी जुने आहे.

या देवालयाची कथा अशी आहे की, पूर्वीच्या काळी ज्यावेळी प्रभु रामचंद्र वनवासात होते त्यावेळी ते आपला नित्यनियम म्हणून शंकराची पूजा करीत असत. त्यांच्या मुक्कामाच्या गावी एका रात्रीत नवीन शिवालय-बांधण्याचे काम एका राक्षसाकडे सोपविलेले होते. पण या ठिकाणी तो राक्षस वेळेवर येऊ शकला नाही व



उत्तरेश्वर: वाळूचा महादेव

सूर्योदय झाला. मग प्रभु रामचंद्रांनी स्वतः वाळूचा महादेव तयार केला व आपला नियम पुरा केला. नंतर रामचंद्र पुढे निघून गेले. त्या वाळूच्या महादेवावर वारूळ बनले आणि कालांतराने त्याचे जमिनीत रूपांतर झाले. बरेच दिवसांनी ती जमीन वहिवाटीत आणण्याचे शेतमालकाने ठरविले. त्याप्रमाणे त्याने नांगर चालू केला. शेत नांगरीत असता या ठिकाणी नांगर येताच नांगर एकदम वर आला व त्या ठिकाणाहून रक्ताचा पाट वाहू लागला. तो भाबडा शेतकरी धाबरला व गावकऱ्यांना घेऊन आला. त्यांनी त्याच्या भोवतालची जागा खोदली तेथे वाळूची महादेवाची शाळुंका निघाली. नंतर येथे मंदिर बांधले गेले. ती शाळुंका अद्यापही वाळूचीच आहे.

आता सध्या जीर्णोद्धाराचे काम चालू आहे. सभामंडप बांधून झाला आहे. बाजूच्या आवाराचे बांधकाम संपलेले आहे. अद्याप फक्त मुख्य इमारत बांधलेली नाही. या आवाराला चार दरवाजे आहेत. मुख्य मंदिराचा घुमट अगदी लहान आहे. त्यामध्ये विस्तृत अशी महादेवाची पूर्वीची शाळुंका आहे. आता तिला सिमेंट दिले आहे व एक पितळी मुखवटा तयार करून मध्यभागी ठेवला आहे. त्यालाच पोषाख वगैरे घालतात.

उत्तरेश्वर फार कडक दैवत आहे. या मंदिराचे वैशिष्टय असे आहे की, या मंदिराच्या आवारात दिव्यासाठी किंवा इतर कामासाठी गोडे तेल किंवा रॉकेल याचा उपयोग करीत नाहीत. त्यासाठी संपूर्ण वापर चांगल्या तुपाचा केला जातो.





उत्तरेश्वर:
एक भव्य शिवालय

मुख्य मंदिरात दिवा असतो तोही तुपाचाच. यात्रेच्या वेळीसुद्धा या गाभाऱ्यात विजेचा वापर केला जात नाही.

दुसरे असे की, कोणत्याही प्राण्यास अथवा मानवास सापाने दंश केला तर त्याला येथे मंदिरात नेऊन त्या देवाची मूर्ती पाहिली व भस्म लावले की, अर्ध्या तासात तो प्राणी विषापासून मुक्त होतो. 'चमत्कारावाचून नमस्कार नाही.' या म्हणीप्रमाणे उत्तरेश्वर हा देव प्रश्नाचे ताबडतोब उत्तर देणारा आहे. अनेक भाविक लोक देवाला येऊन आपले मनोरथ पूर्ण करतात. मात्र हे भक्त एकनिष्ठ असले पाहिजेत तरच हा अनुभव येतो.

पुष्कळ लांबचे लोक येथे येऊन धान्य, तूप देतात व येथील भस्म घेऊन जातात. हे भस्म ज्याच्याकडे आहे त्यांना साप वगैरे दंश करणाऱ्या प्राण्याची भीती नाही. 'पाहिली तर राख पण त्याची किंमत लाख.' अशी ही राख कोणत्याही संकटातून मुक्त करणारी आहे. या ठिकाणी दररोज दोन वेळा नैवेद्य व आरती केली जाते. यासाठी पुजाऱ्यांना भरपूर जमीन दिलेली आहे. या उत्तरेश्वराजवळ ताबडतोब चमत्कार मिळतो म्हणून फार लोक याला भजतात. उत्तरेश्वराची शक्ती वर्णन करण्यासाठी शब्दकोशातील शब्द अपुरे पडतात.

**ज्याच्या घरी उत्तरेश्वराची वारी**
**तयाची सर्व विघ्ने पळती दुरी**

या उत्तरेश्वराची महाशिवरात्रीला व श्रावण महिन्यातील चौथ्या सोमवारी अशी वर्षातून दोन वेळा मोठी यात्रा भरते. ही यात्रा जवळजवळ अगोदर व नंतर मिळून आठ दिवस असते. यासाठी कळंब, बार्शी, बीड, आंबेजोगाई येथून व्यापारी लोक येऊन हजारो रुपयांवर व्यापार करतात. शिवरात्रीच्या दिवशी सकाळी सात वाजल्यापासून भक्तांची दर्शनासाठी बारी लागते ती सायंकाळपर्यंत. दर्शनासाठी पाच, सहा तास उभे राहूनसुद्धा भाविक कंटाळत नाहीत. प्रसाद म्हणून देवापुढे साखर जमा होते. तसेच, धान्य वगैरे असते त्याला मदन असे म्हणतात. तसेच चांगले तूप पण दोन दोन ठानव्या भरून साठते. येथे अगणित नारळ पण फोडले जातात.

रात्रीला अकरा वाजता पालखीची मिरवणूक निघते. मिरवणूक संपल्यावर भजन, कीर्तन होते. रात्री बारा वाजता महारुद्राचा अभिषेक असतो. यासाठी अनेक विद्वान ब्राह्मण येथे येतात. सकाळी ब्राह्मण भोजन व गावकऱ्यांतर्फे सर्वांना भोजन दिले जाते.






लेखिका : **कु. रतन ठाकूर**

तुंगारेश्वर हे एक रमणीय असे शिवस्थान ठाणे जिल्ह्यात आहे. वसई रोड या स्थानकाच्या पूर्वेस तुंगार डोंगराच्या दोनतीन रांगा दक्षिणोत्तर पसरल्या आहेत. त्यांची उंची सुमारे सातशे फूट आहे. ह्यापैकी एका रांगेत तुंगारेश्वराचे मंदिर आहे.

हे मंदिर चांगले बांधलेले आहे. मंदिराला लागूनच मोठा सभामंडप आहे. मंदिराचे नक्षीकाम रेखीव आहे. येथील विहिरीचे पाणी व पहाडी हवा

श्रीतुंगारेश्वर, वसई



यात्रेकरूंना उल्हसित करते. जवळच जगन्माता देवी अंबेचे मंदिर व मोठे कुंड आहे.

पूर्वी रेल्वे नव्हती तेव्हा वसईहून पुण्यास जाण्याचा मार्ग याच तुंगारच्या जंगलातून होता. १७३९मध्ये चिमाजी आप्पाने पोर्तुगिजांशी वसई येथे लढा देण्यापूर्वी प्रथम वसईपासून बावीस मैल दूर असलेल्या वज्रेश्वरी देवीला नवस केला होता. चिमाजी आप्पाने तुंगारेश्वर मंदिराभोवतालची चौदाशे एकरांची जमीन तुंगारेश्वर क्षेत्रासाठी इनाम म्हणून दिली. त्यातूनच सध्या या क्षेत्राचा खर्च चालतो.

या क्षेत्रस्थानापासून साडेपाच मैलांवर परशुराम मंदिर व परशुराम कुंड आहे. या डोंगरभागाला आसपासचे लोक मदाग्नी किंवा मंदाग्नी असे म्हणतात. प्राचीन काळी येथे ज्वालामुखी असावा. कारण याच डोंगरशिखरावर भस्म सापडते. तुंगारच्या डोंगरात बॉक्साइटच्या खाणी आहेत असा शोध लागला आहे.

शंकर हा सह्याद्रीचा स्वामी आणि परशुराम हा आसमंताचा. आपल्याला नवे निवासक्षेत्र मिळावे म्हणून परशुरामाने सागराला मागे सरण्याची विनंती केली व ती मान्य करून सागराने शूर्पारकाचा (सोपारे) प्रदेश मोकळा करून दिला. याच शूर्पारक भागातील तुंगारेश्वर पर्वतात परशुरामाने महायज्ञ केला अशी आख्यायिका असून त्याची साक्ष म्हणूनच येथे यज्ञरक्षेचे डोंगर दाखविण्यात येतात. हा डोंगर म्हणजे तुंगारेश्वराची तिसरी ओळ. यालाच पूर्वी चतुरंगण पर्वत म्हणत असावेत. कारण सोपाऱ्याजवळच्या चतुरंगण पर्वतावर परशुरामाचे स्थान होते असा उल्लेख आढळतो. या यज्ञरक्षेच्या डोंगरावर अद्यापिही भस्म सापडते. जवळच्याच एका स्थानाला परशुरामाची वेदी अशी संज्ञा आहे.

तुंगारेश्वराची स्थापनाही परशुरामाच्या काळातच झाली आहे. वसईजवळ जे निर्मळ क्षेत्र आहे, त्या क्षेत्राच्या कथासंदर्भात निर्मल व विमल या दोन राक्षसांचा उल्लेख आलेला आहे. विमल हा राक्षस ब्राह्मणांना वारंवार त्रास देत असे. परशुरामाने त्याचा पराभव केला. तेव्हा तो तुंग पर्वतावर राहू लागला. त्याने शंकराची आराधना केली. ब्राह्मणांना त्रास देणार नाही या अटीवर त्याने शंकरापासून त्रैलोक्यविजयी अमरपद व दिव्य लिंग प्राप्त करून घेतले. या लिंगाची स्थापना त्याने तुंग पर्वतावर केली. हाच तो 'तुंगारेश्वर'.

महाशिवरात्रीस तुंगारेश्वरास यात्रा भरते. या दिवशी ठाणे जिल्ह्यातील विशेषतः वसई-पालघर तालुक्यातील बरेचसे भाविक यात्रेकरू येथे येतात. 'न जाशील तुंगार तर होईल संसार भंगार' अशी एक म्हण वसई-पालघर तालुक्यातील लोकांच्या बोलीमध्ये प्रसिद्ध आहे.




# श्रीतपनेश्वर

लेखक : **श्री. सारंगधर महाडीक**

पाचगणीपासून दीड मैलावर गोडवली या ठिकाणी फार प्राचीन काळचे एक स्वयंभू शिवालय आहे. याँ स्वयंभू स्थानात पूर्वीपासून पवनगंगा गुप्त रीत्या वाहत आहे. या गंगेस बारा महिने निर्मळ पाणी असते. त्या ठिकाणी चार कुंडे अस्तित्वात आहेत. ही कुंडे नेहमी पवनगंगेच्या पाण्याने भरलेली असतात. हे शिवालय गोडवली या ठिकाणी डोंगरावर वसलेले आहे. येथे मोठमोठे पुरातन पिंपळ, फणस, आंबे इत्यादींची गर्द झाडी आहे. या मंदिरात गेल्यावर निसर्ग पाहिल्याचा खरा लाभ होतो. भोवतालचे वातावरण आल्हाददायक आहे. येथे एक आंब्याचा फार जुना वृक्ष आहे. ज्यावेळी अफझलखान शिवाजीच्या भेटीस आला त्यावेळी प्रथम त्याचा तळ वाई येथे होता. अफझलखानाची शक्ती अजमावण्यासाठी शिवाजीमहाराज ज्यावेळी वाईस गेले त्यावेळी शिवाजी-महाराजांनी या गोडवली येथील (मंदिराजवळ) आंब्यांच्या झाडाखाली एक रात्र मुक्काम केला व तेथूनच ते आपला वेष पालटून अफझलखानाच्या भेटीस गेले होते. जाते वेळी त्यांनी शिवालयात जाऊन श्रीतपनेश्वराचे (शंकराचे) दर्शन घेऊन येथील पवनगंगेचे पाणी प्राशन केले असे सांगतात.

सन १९५३ मध्ये श्रीतपनेश्वराचा ५०० तोळे वजनाचा चांदीचा मुखवटा एका अज्ञात इसमाने चोरून नेला होता. त्या बाबतीत फारच खळबळ झाली. त्याचा कसून तपास करण्यात आला. परंतु सर्व प्रयत्न निष्फळ ठरून तो काही सापडला नाही. नंतर दहा वर्षांनंतर विजयादशमीचे दिवशी हा मुखवटा श्रीतपनेश्वराच्या मूर्तीवर जसाच्या तसा आणून ठेवलेला आढळला! या दैवी चमत्कारामुळे येथील ग्रामस्थ महाशिवरात्रीचे दिवशी येथे मोठा उत्सव व सत्यनारायणाची पूजा करतात.



# जयशंकर
## कोकणेर

लेखिका : कु. रतन ठाकूर

जयशंकराचे हे देवालय पुरातन आहे. हे स्थळ अगदी निसर्गरम्य नसले तरीदेखील एकांतामुळे रम्यच भासते. ते एकांतात असल्याने सर्वसामान्य जनतेकडून मात्र उपेक्षित असेच राहिले.

मकर संक्रांतीस व महाशिवरात्रीस येथे मोठा उत्सव असतो. मोठी यात्रा भरते. ठाणे जिल्ह्यातील शेतकरी जनता मोठ्या उत्साहाने या यात्रेत सामील होते. कोकणेरचा आसमंत तंबू-डेऱ्यांनी भरून जातो. या तीर्थक्षेत्राचे मोठे आकर्षण म्हणजे येथील गरम पाण्याची चार कुंडे व जवळून वाहणारी सूर्या-नदी. खुद्द सूर्यानदीतच गरम पाण्याचा एक प्रवाह आहे. चार कुंडांपैकी दोन कुंडांचे पाणी अगदी उकळते आहे. ही दोन कुंडे साधारण तऱ्हेने बांधून काढली आहेत. येथील जमीन पुरातनकाली ज्वालारसाचीच असावी. जयशंकराच्या मंदिराजवळ एक छोटेसे ज्ञानेश्वर मंदिर बांधले आहे.



श्रीजयशंकर मंदिर, कोकणेर, पालघर



# कपर्दिकेश्वर

लेखिका : सौ. प्रमिला अय्यर

पुणे जिल्ह्यातील जुन्नर तालुक्यामधील ओतूर येथे 'कपर्दिकेश्वरा 'चे देऊळ असून शंकराचे ते एक जागृत देवस्थान आहे.

श्रावण सोमवारी या ठिकाणी सात-आठ हजारांवर यात्रा भरते. ओतूर-पासून एक ते दीड मैलाच्या अंतरावर हे शंकराचे देऊळ असून भोवतालचा परिसर अत्यंत रम्य आणि देखणा असा आहे. देऊळ अत्यंत प्रेक्षणीय व फारच उत्कृष्ट रीत्या बांधलेले असून ते पहाताक्षणीच मन अगदी समाधानाने तृप्त होते.

या गावाचे पुरातन नाव आहे उत्तमपूर. या गावापासूनच एक-दीड मैलाच्या अंतरावर सदरहू देऊळ व्हायच्या आधी घनदाट अरण्य होते. या देवळाजवळच मांडवी नावाची नदी वाहत असून ती आकाराने चंद्रकोरीसारखी दिसते. दुष्काळ पडला तरी या मांडवी नदीचे पाणी आटत नाही. या देवळाच्या परिसरातच चैतन्यप्रभूंचे समाधिस्थान आहे.

या देवळाविषयी आख्यायिका सांगतात ती अशी : चैतन्यप्रभूंच्या वंशातील एका सत्पुरुषाला हल्लीच्या देवळाचे जागी येथील शंकराच्या पिंडीवर देऊळ बांध म्हणून दृष्टांत झाला होता. कारण ह्या परिसरात ठिकठिकाणी दृश्य अदृश्य स्वरूपात शंकराच्या पिंडी होत्या. त्या साधुपुरुषाने दृष्टांतानुसार देऊळ बांधले. हा साधुपुरुष नेहमी चैतन्यप्रभूंच्या मंदिरात जात असे. त्यावेळी ह्या सत्पुरुषाला देऊळ बांधण्यासाठी आर्थिक मदत म्हणून एक नाग तेथे येऊन रोज एक मोहर देत असे. त्या साधूने या आर्थिक मदतीनुसार देऊळ पूर्ण केले. ह्या मोहरा त्या ब्राह्मणाला मिळतात तरी कशा याची छाननी करण्याच्या दृष्टीने त्यावेळी मुसलमानांनी पुष्कळ प्रयत्न केला. तथापि समाधीतून (चैतन्यप्रभूंच्या) मोहरा मिळतात असे ब्राह्मणांनी सांगितल्यावरून समाधी पाडण्याच्या उद्देशाने



कपर्दिकेश्वर देवळाची
दर्शनी बाजू

मुसलमानांनी समाधीच्या मुळात घाव घातला. परंतु त्याच क्षणी दैवी योगाने तेथे असंख्य भुंगे निर्माण होऊन मुसलमानांचे पारिपत्य झाले.

कपर्दिकेश्वर हे शंकराचे मोठे जागृत देवस्थान आहे अशी भाविकांची समजूत असून तत्संबंधीचे अनुभव अनेक भक्तांना आलेले आहेत. हा देव 'नवसास' पावतो अशी लोकांची कल्पना आहे.

कपर्दिकेश्वराची यात्रा श्रावण महिन्यात मोठ्या स्वरूपात भरते. गावातील व इतर गाव परिसरातील लोक येथे यात्रेला आलेले असतात. श्रावण महिन्यातील प्रत्येक सोमवारी येथे शंकराच्या मूळ पिंडीवर एक वैशिष्टयपूर्ण व अद्भुत अशी पूजा बांधली जाते. या पूजेसंबंधी असे सांगण्यात येते की, येथील पूजा करणारा गुरव रविवारी रात्री बाराच्या पुढे शुचिर्भूत होऊन देवळात प्रवेश करतो.



कपर्दिकेश्वर देवळातील पिंडीवर बांधल्या जाणाऱ्या तांदळाच्या पिंडी

ध्यानसाधना करून डोळे बांधून लिंबावरती तांदळाच्या पिंडी बांधतो. त्या पिंडी संख्येने पाच असतात. ह्या पिंडी कोरडया तांदळाच्या असून थोडा जरी धक्का लागला तरी तांदूळ पडतील की काय अशी आपल्या मनाला भीती वाटते. दिसायला ह्या पिंडी फारच अप्रतिम असून देवाच्या अगाध लीलेचा प्रत्यय आणून देतात. या पूजेचे तांदूळ मूळ पिंडीवर ठेवल्यावरच आपोआप दुसऱ्या पिंडी तयार होतात. मात्र यातले खरे खोटे करून घेण्याचा कोणी प्रयत्न केला तर बघणाऱ्याचे डोळे जातात असे सांगतात ! या सर्व पिंडीतील तांदळाचे जर वजन केले तर सव्वा मण भरते. या पिंडीतील तांदळाचा प्रसाद म्हणून भक्तजन स्वीकार करतात.

या गुरवाच्या घराण्याचा इतिहास असा सांगतात की, प्रत्येक पिढीत एकच मुलगा होऊन परंपरेने ही पूजा पिढयान्‌पिढया चालत आली आहे.

**नवसाची पिंडी**

शंकराच्या मूळ पिंडीवर दर श्रावणातील सोमवारी लिंबावर पाच पिंडी बांधल्या जातात. पण कोणी नवस वगैरे जर बोलले असेल तर मूळ पिंडीच्या शेजारीच नवसाच्या पिंडीही बांधतात. ह्या पिंडी अर्थातच पुजारी (गुरव) बांधतो. नवस करणाराने फक्त तांदूळ द्यावयाचे असतात. हे तांदूळ वाजत गाजत नेत असताना देवाला वस्त्र, नारळ इत्यादी पूजासाहित्यही घेतात.

येथील यात्रेत कुस्त्यांचा हंगाम फार मोठ्या प्रमाणावर भरतो. गावोगावचे पैलवान येथे कुस्तीला आलेले असतात. कुस्तीची जागा मध्ये व भोवताली टेकड्या असे कुस्तीचे मैदान नैसर्गिक रीत्याच येथे तयार झाले आहे. हे एक येथील मोठे वैशिष्ट्य होय. या मैदानाची व्यवस्था गावातील पंच व मोठे लोक उत्तम रीतीने बघतात.






लेखक : **श्री. रमजानखान महंमदखान**

सोमयाचे कारंजे हे स्थान पुणे जिल्ह्यात बारामती तालुक्यातील सोमेश्वर कारखान्यापासून अवघ्या तीन मैलांवर असून येथे सोमनाथाचे एक शिवालय आहे.

सौराष्ट्रातील सोरटी सोमनाथच सर्परूपाने अवतीर्ण होऊन येथे दर्शन देतात अशी येथे येणाऱ्या भक्तजनांची भावना आहे. डोक्यावर खोमण्याने कुऱ्हाड मारल्याची खूण येथील सर्परूपी शिवावर दिसून येते. मंदिरात जी वाळूची शाळुंका आहे तिच्या मध्यभागी कुऱ्हाडीने मारल्याची ही खूण आहे. तशीच खूण सर्परूपाने निघालेल्या 'स्वारी'च्या डोक्यावरही असते. स्वारी केव्हाही, कुठल्याही क्षणी, निघत असते. श्रावणातल्या सोमवारी तर निघतेच, परंतु ऐकिवात येते की, साखर कारखान्याचा परिसर, शेते अशा ठिकाणी किंवा भक्ताच्या घरी, केव्हाही, कुठल्याही क्षणी ही स्वारी निघते. या वेळी 'देव आले' असे म्हणतात. मात्र प्रत्यक्ष सोमनाथच आहेत, हे ओळखण्याची खूण म्हणून 'कुऱ्हाडीने मारल्याची' खूण असेल तरच 'देव निघाले, देव आले' असे समजतात. हे सोमनाथ सर्परूपाने निघतात. त्यांचा आकार कधी कमी, कधी जास्त, अशा स्वरूपात पण असतो. देवळामध्ये स्वारी निघताच तिला दूध पाजून तिची पूजाअर्चा करण्यात येते. दिवसभर त्या स्वारीचा सन्मान केल्यानंतर रात्री नऊ वाजण्याच्या आरतीनंतर तिला 'चाफ्याचे आळे' येथे सोडण्यात येते. चाफ्याचे आळे हे तेथील एका मंदिराचे नाव आहे. या स्वारीच्या रंगावरून भक्तमंडळी येणाऱ्या संकटाचा, अवर्षणाचा, अगर उत्कर्षाचा, सुबत्तेचा अंदाज बांधतात. काही वृद्ध मंडळी असे सांगतात की, पूर्वीच्या काळी प्लेग व्हावयाच्या आधी स्वारीने प्रचंड रूप घेऊन दाखविले व एकूण वीस दिवस देवळात त्याच स्वरूपात राहून नंतर अंतर्धान पावल्यावर प्लेगचे वातावरण निवळले.

यावरून जेव्हा जेव्हा अवचित अघटित असे घडणार असेल त्यावेळी स्वारी प्रचंड रूप घेऊन अवतीर्ण होते व लवकर गुप्तही होत नाही असे म्हणतात. स्वारीचा रंग काळा आणि आकार मोठा असेल तर दुष्काळाचे सावट येणार असे मानले जाते. रंग हिरवा असेल तर शेतेही हिरवीगार होऊन अन्नधान्य मुबलक होईल अशी भक्तजन खात्री देतात. स्वारीचा रंग सोनेरी असेल तर पीकपाणी जेमतेम होईल असे समजतात.

निपुत्रिक स्त्रिया पुत्र व्हावा या इच्छेने 'स्वारी' जेव्हा निघते त्यावेळी ओटीत घेऊन पूजा वगैरे करतात.

श्रावणातल्या सोमवारी तर कारंजे येथे यात्रा खूप मोठ्या प्रमाणावर भरते. शेवटच्या सोमवारी 'देव निघतात' असे समजतात.

श्रावण महिन्यातील सरत्या सोमवारी यात्रा होईल तेव्हा प्रत्यक्ष सोमनाथ जाऊन खोमण्यांचा सन्मान करतील असा आशीर्वाद दिला असा उल्लेख मालाईच्या कथेत आहे. तेव्हापासून श्रावण मासातील सरत्या सोमवारी सोमयाचे कारंजे येथे यात्रा भरत असून या यात्रेच्या वेळी खोमण्यांना पुजारी मंडळी सन्मानाने आणतात.

आजही सोमनाथांच्या डोक्यावर कुऱ्हाडीने खूण करणारे खोमणे यांचे वंशज आहेत. ते कोऱ्हाळे आणि सुपे-जळगाव येथे रहातात. यात्रेच्या वेळी हे वंशज माळावर येऊन बसतात. त्यांना सोमनाथांची प्रतिमा असलेल्या पालखी-बरोबर मानाने आणावे लागते. काही वर्षांपूर्वी खोमणे मंडळी आणि पुजारी मंडळी यांचे थोडे बिनसले. तेव्हा यंदा त्यांना आणावयास जावयाचे नाही असे पुजाऱ्यांचे घाटत होते. परंतु दुपारी बाराच्या वेळी प्रत्यक्ष सोमनाथांची स्वारी सर्परूपाने निघून स्वतःच माळाकडे निघाली. तेव्हा सोमनाथच आडवे निघाल्यावर आपण कसे थांबावयाचे म्हणून पुजारी व इतर मंडळीही खोमण्यांना आडवी गेली. खोमण्यांचा मान ठेवून सर्परूप धारण केलेल्या सोमनाथांना पालखीतून व खोमण्यांना पालखीबरोबर मानाने आणले.

सोमनाथाचे मंदिर म्हणून जे मंदिर आज उभे आहे त्यात असलेली शाळुंका ही सोमनाथाने दिलेल्या दृष्टांतानुसार उकरून काढली असता सापडलेली आहे. जेथे गाईचे दुग्धपान केले तेथे दृष्टांतानुसार महादू गवळ्याने गावकरी जमवून उकरले. तेथे वाळूची शाळुंका दिसली. तिच्यावर मध्यभागी कुऱ्हाडीच्या घावाची खूण होती. लोकांनी तेथे पैसे जमवून शिवालय बांधले. तेथे आजही सर्परूपाने सोमनाथांचा वावर असतो.

चैत्र महिन्याच्या सरत्या सोमवारी सोमयाचे कारंजे येथे फार मोठी यात्रा भरते. या यात्रेसाठी लाख दीड लाख भाविक येथे गोळा होतात.



## मूळगावचा जागृत श्रीदेव रवळनाथ

लेखक : डॉ. भालचंद्र आकलेकर

### प्रसादी निर्णयाची परंपरा

येथे प्रसादी म्हणजे मूर्तीस प्रसाद लावून कोणत्याही गोष्टीचा निर्णय घेण्याची परंपरा आहे. त्यास कौल असेही म्हणतात. मुलांचे शिक्षण किती होईल, धंदा कोणता करावा, आजारपण येईल काय, लग्न केव्हा होईल, शेतीस प्रारंभ करावा काय वगैरे प्रश्न या देवास विचारले जातात व त्याचे बरोबर उत्तरही देवाकडून मिळते. या देवाला ६४ प्रसादांची मालिका मूर्तीवर लावून दैवी शक्तीचा पडताळा घेतात. कोणत्याही प्रश्नाचे उत्तर सविस्तर व निर्णायक मिळते.

या देवस्थानी पंचायतनात एकूण सात मंदिरे आहेत. पैकी श्रीदेव वेतोबा हे प्रमुख देवस्थान असून श्रीदेव रवळनाथ हे तरंगासाठी प्रसिद्ध आहे. मुख्य जत्रोत्सव श्रीदेव वेतोबा या देवालयात होतो व तरंगावरील दैवी वारे या देवस्थानाकडून तेज मिळवून रवळनाथाच्या मंदिरात होतात. कोणत्याही प्रश्नाचा विचार करून निर्णय दिला जातो. यावेळी तरंग घेतलेले अगर वार-अवसार अंगात असलेले मनुष्य हे जनतेचे प्रश्न ऐकून कौलसमी निर्णय देतात. मनुष्याला देवाबरोबर प्रत्यक्ष बोलता येते अशा प्रकारचे अवसारी कौल फक्त दसऱ्याच्या वेळी दोन दिवस व जत्रेच्या वेळीं तीन दिवस (कार्तिक अमावास्या) असे वर्षातून पाचच दिवस शक्य असतात. यास वर्षणी म्हणतात. इतर वेंळी देवाच्या पायाशी मूर्तीवर प्रसादाने निर्णय घेतात.

### एकोशी गावातून स्थलांतर

श्रीरवळनाथाचे हे देवस्थान प्रथम बारदेश तालुक्यातील शिरोडे गावच्या एकोशी नावाच्या खेड्यात होते. चारशेतीन वर्षांपूर्वी ते मूळगावी आणून स्थापन केले गेले. शिरोडे गाव बारदेशकरांच्या हक्काच्या गावांपैकी (मूळगाव गोवा) एक

असून या गावचे पोर्तुगीज नाव सेखल असे होते. हा गाव फार मोठा असे. त्या वेळच्या राज्यकर्त्यांनी त्याचे तीन भाग पाडले. आजचे भिट्टोप हा त्यांपैकीच एक गट आहे. गोव्यात शिरोडे नावाची चार गावे आहेत. त्यांपैकी खोंडचातील शिरोडे फार प्रसिद्ध आहे.

एकोशी हे निसर्गरम्य गाव म्हापसे व बेती यांच्या साधारणतः मध्यावर डाव्या बाजूस मांडवीच्याच एका फाटयाच्या तीरावर लांबच लांब पसरले आहे. माड-पोफळीची कुळागरे मन मोहून टाकतात. श्रीदेव रवळनाथाचे मूळचे जुने मंदिर आजही पहावयाला मिळते. तेथून सुमारे एक मैलावर वेतोबाचे मंदिर होते. येथील वनदेवीचे मंदिर खरोखरीच वनात होते. तेथील तळयात लाल कमळे उगवतात.

**काळचाभोर वर्णाचा गोपाळकृष्ण**

काळचाभोर वर्णाचा गोपाळकृष्ण हे जणू आज एकोशाचे एक श्रद्धास्थान बनले आहे. मस्तकावर नाम असून त्याच्यामध्ये बसविलेला हिरा मूर्तीचा काळेपणा अधिकच प्रकट करतो. मूर्तीचे सौंदर्य वर्णनातीत आहे. तिच्या मुखाकडे दृष्टी जाताच ती खाली वळावी इतके तेज मूर्तीत एकवटले आहे. तेथे जवळच पडते (फट्टे) यांचे पंचायतन आहे. फाल्गुन वद्य प्रतिपदेस विस्तवावरून चालण्याची प्रथा येथे आहे.

श्रीदेव रवळनाथ मूळगावी आल्यावर तेथे त्याची प्रतिष्ठापना करण्यात आली. या देवस्थानात एकूण तीन मंदिरे आहेत, पैकी श्रीरवळनाथ व श्रीदेवी



मूळगावचा श्रीदेव रवळनाथ

महालक्ष्मी ही एका रेषेत असून पूर्वाभिमुख आहेत तर तिसरे भूतनाथाचे छोटेसे मंदिर पश्चिमाभिमुख आहे. श्रीरवळनाथाच्या मंदिरासमोर दीपमाळ असून देवालय व दीपमाळ यांच्यामध्ये पूरमाराची, यज्ञकुंडाच्या आकाराची दगडी चौकट आहे. दीपमाळेच्या उजव्या बाजूस तुळशी वृंदावन आहे. कुलदैवताची इमारत बाजूलाच आहे. याच इमारतीच्या मागील बाजूस कोठाऱ्यांचे स्थान असून त्याच्या समोरच डाव्या बाजूस थोटच्याचे स्थान आहे. या स्थानावर सुंदर असा दगडी पार बांधला आहे. या थोटचास 'लाकडी मोटच्याची' अंगवण करतात.

## सटवीचा चौक

श्रीरवळनाथाच्या देवळामागे यज्ञकुंडीच्या आकाराची दगडी चौकट आहे. यालाच 'सटवीचा चौक' असे म्हणतात. या सटवीला गोड खिचडीचा नैवेद्य लागतो. जत्रेच्या पर्वणीस सार्वजनिक रीत्या हा गोड खिचडीचा नैवेद्य दाखविला जातो. हा नैवेद्य झांटचे घराण्यातील विवाहित मुलींनी न चुकता दाखवून स्वतःचे कल्याण साधायचे अशी परंपरा आहे. विशिष्ट वर्गाची पिशाचे या चौकावर मानवली जातात. बाकी सर्व पिशाचांसाठी पूरमारचा चौक आहे.

या देवस्थानाची एकूण पाच महान कुटुंबे आहेत : (१) झांटचे-काश्यप गोत्र, (२) शेणई-काश्यप गोत्र, (३) घोटगे-वत्स गोत्र, (४) बोके-शिरोडकर हर्ष गोत्र, (५) तानवडे वैश्य या पाचही घराण्यातील कुलस्वामींची आणि इतर माहिती पुढीलप्रमाणे आहे.

## झांटचे कुलस्वामी

झांटचे घराण्यात प्रभु झांटचे वाड, माईणकर, माडगिरी, शिरोडकर, हेबडे या आडनावांची मंडळी मोडतात. या घराण्यातील कुलदैवत सध्या बालवण येथे देऊळकडयात स्वतःच्या जागेत आहे. त्याची पूजा वगैरे व्यवस्था अभ्यंकर आडनावाच्या ब्राह्मण घराण्याकडे आहे. कार्तिक अमावास्येस तेथे देवास नैवेद्य व समाराधना होत असते.

वेंगुर्ले तालुक्यातील आरवली गावी पूर्वी काही झांटचे कुटुंबे रहात होती. व आजही काही तेथे आहेत. पूर्वी हे कुलदैवत काही काळ तेथे होते. तेथून ते हलविताना त्या दैवतातील राघोबा पुरुषाचे प्रतीक तेथेच ठेवले. तेथे जवळच लहानशी तळी आहे. ती तळी 'राघोबाची तळी' या नावानेच ओळखली जाते. झांटचे घराण्यास आरवलीत त्या काळी प्रमुख स्थान होते. बादगणीची नांगरणी करण्यापूर्वी झांटचे घराण्यातील पुरुषाने बहुमान केल्याशिवाय शेतकरी जमिनीस

नांगर लावीत नसत. राधोबाचा भार पूर्वी झांट्ये घराण्यातच राजी होई. आज मालवण येथे या कुलदैवताकडे प्रसादी कामगिरी होत असते. पाचही कुलदैवते एकाच गावी (मूळगावी) असल्यास सर्वांस ते सोईचे होईल म्हणून श्रीदेव रवळनाथ मंदिराशेजारीच पाचही कुलदैवतांसाठी पाच खोल्या तयार केल्या असून देव स्थापना केली आहे.

**बोके (शिरोडकर) कुलस्वामी**

पूर्वी हे घराणे एकोशीतील बोके नावाच्या वाडीवर रहात होते. पोर्तुगिजांनी एकोशीवर हल्ला केला तेव्हा आपापले देव घेऊन ही सर्व घराणी तेथून निघाली. त्यातच हे घराणे निघून लंगरबाग येथे आले. मूळगावी आणून या दैवताची स्थापना करण्यापूर्वी हे कुलदैवत लंगरबाग येथेच खाजगी जागेत होते. आज ते घर पडून ज्या खोपीत देव होते तेथे एक औदुंबराचे झाड आलेले आहे.

लंगरबाग येथे सध्या राष्ट्रोळी, ब्राह्मण व कोठारी अशी तीन स्थाने आहेत. पैकी कुलदैवते ज्यावेळी मूळगावी आणली गेली त्यावेळीच कोठारी हा त्या दैवताबरोबर मूळगावी आला. त्याला थोटचासमोरच जांभळीच्या झाडावर स्थान दिले आहे. सध्या बोके घराण्यात एकूण तीन भार राजी होतात. कुलस्वामी, पुरुष व ब्राह्मण असे हे तीन भार होत. या दैवतांची अर्चाशुद्धी पाच वर्षांपूर्वी फाल्गुन शुद्ध पंचमीस केली आहे.

**शेणई (ओळकर) कुलस्वामी**

शेणई घराणे आणि झांट्ये घराणे यांचे गोत्र एकच आहे. शेणई म्हणजे हिशेबतपासनीस.

या घराण्यात तारळेकर, ओळकर, शेणई, शिरोडकर या आडनावांची घराणी मोडतात. कोल्हापूर येथील तारळकर घराण्यात हे कुलदैवत होते. त्या घराण्यावर महान संकट कोसळले. त्या भागात कॉलरा सुरू झाला व या घराण्यातील कर्तीसवरती चौदा-पंधरा माणसे एका दिवसात मरण पावली. घरात एक म्हातारी राहिली. या संकटाने म्हातारी संतापली. तिने देवतांच्या मूर्ती उचलून त्यांचे पंचगंगेत विसर्जन केले. अलीकडे या मूर्तींची पुन्हा प्रतिष्ठापना करण्यात आली आहे.

**घोटगे कुलस्वामी**

घोटगे घराण्याने शिरोड सोडल्यावर ते घराणे आपल्या कुलदैवतासह कोरगाव (देवसू) येथे स्थायिक झाले. आजही ही घराणी तेथे आहेत. इ.स. १९३२ मध्ये

सदर कुलदैवत हे मूळगावी आणून फाल्गुन शुद्ध दशमीस त्याची अर्चाशुद्धी केली. दर साल तो दिवस वाढदिवस म्हणून साजरा करतात. या घराण्यात सध्या त्यांचा आकारी व कुलस्वामी असे दोन भार राजी होतात. चारशे वर्षांपूर्वी श्रीदेव रवळनाथाचे मंदिर उभारण्यात धोटगे घराण्याचा मोठा हिस्सा होता. या घराण्याचे पूर्वज पालखी परस्थ होते.

**तानवडे कुलस्वामी**

तानवडे हे वैश्य घराणे पूर्वी व्यापार करी. या घराण्याची कुलदैवते सावंतवाडी तालुक्यातील आरोंदे गावी होती. तेथून दैवताच्या मूर्ती बाहेर नेण्यात आल्या. ही घराणी एकोशी व पीण या गावी जास्त आहेत.

या घराण्यांबाबत एक मजेदार कथा सांगण्यात येते. पूर्वीच्या काळी मालवाहतुकीची कामगिरी बैलांवरून पार पाडली जाई. तानवडे घराणे हे आजच्या दोडामार्ग मार्गे रामघाटातून वाहतुकीचे काम करी. एकदा शिवरात्रीस त्यांचा मुक्काम मूळगावी पडला. जेवणास या लोकांनी कांदा घालून खमंग असे वाटाण्याचे सांभार व वडे केले. सध्या मारुतीचा पार आहे तेथे त्यांचा मुक्काम पडला होता. जेवणास बसण्यास या लोकांनी श्रीदेव रवळनाथाच्या नावाने उदक सोडले व जेवण केले. तेव्हापासून तशाच प्रकारचा नैवेद्य देवास दाखवावा लागतो.

याशिवाय जल्मी पाट्टे (खारवी), मेस्त (सुतार), लाड (वैश्य), शिवलकर, रेवोडकर, पिंगळी, शिरोडकर ही घराणी अजूनही देवस्थानची उपासक कुटुंबे आहेत.

**सालई पानाचे प्रसाद**

श्रीदेव रवळनाथास सालईच्या पानाचे तुकडे प्रसाद म्हणून पाण्याने चिकटवतात. एकंदर प्रसादस्थाने ६४ असून त्यांचे अर्थ प्रश्नांवर अवलंबून असतात. ही कामगिरी भट (पुजारी) करतो. एकादशी, पौर्णिमा व अमावास्या या तिथी तसेच नवरात्र, दसरा, जत्रा, वाढदिवस, शिवरात्र व शिमग्यातील पंधरा दिवस (फाल्गुन वद्य प्रतिपदा ते अमावास्या) प्रसाद लावण्यास वर्ज्य ठरविले आहेत.

आश्विन शुद्ध प्रतिपदेस घटस्थापना होऊन नवरात्र उत्सवास प्रारंभ होतो. आश्विन शुद्ध नवमीस सर्व कुलदैवतांकडे महानैवेद्य दाखविला जातो. घट उठविले जातात. दुसरे दिवशी दसऱ्यास तीनही तरंगे वस्त्रांनिशी सजवून रात्री त्यांचे मिरवणुकीने वाजत गाजत सीमोल्लंघन होते. तेथे तरंगाचे पूजन व शिवलग्न समारंभ होतात. हे स्थान म्हणजे श्रीदेव वेताळाच्या मंदिरासमोर असलेला कदंब वृक्ष होय. याच वृक्षांची पाने सोने म्हणून लुटण्याचा प्रघात आहे. दुसरे

व तिसरे दिवशी तरंगाचे व भारांचे देवपण सुरू होते. या देवपणाची समाधी द्वादशीचे रात्री कवळसाने होते. त्याच्या दुसरे दिवशी चौकावर खेत्राची कामगिरी पार पाडली जाते. त्या दिवशी मंदिराचे मुख्य दरवाजे बंद केले जातात.

### कार्तिकी अमावास्येची महापर्वणी जत्रा

या दिवशी देवास महानैवेद्य दाखवितात. नैवेद्यास एकूण बावीस पाने असतात. श्रीवेताळ आठ, श्रीरवळनाथ आठ व श्रीमहालक्ष्मी सहा. या दिवशी लाड घराण्याने स्वखर्चाने दीपपूजा करायची असते. बारा वाजण्याच्या सुमारास नवदांपत्ये स्नान करून श्रीदेव वेताळाकडे आपापली 'दिवटे' पेटवितात. नंतर रवळनाथ मंदिरात पाच प्रदक्षिणा घालतात. सदर देवस्थान हे वेताळ पंचायतनात समाविष्ट असल्यामुळे व उत्सवाचा मान वेताळास सोपविल्यामुळे मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेस होणारा काला (दशावतारी नाटक) व द्वितीयेस होणारा गौळण काला हे दोन्ही उत्सव श्रीवेताळाच्या मंदिराकडे होतात. अठरा वांगडाचे गोपाळ गाऱ्हाणे होऊन तेथील उत्सव संपतो. उत्सवाच्या निमित्ताने देवाच्या अंगावर चढविलेली कवचकुंडले तशीच असतात. ती उतरविण्याची प्रथा नाही.

मार्गशीर्ष शुद्ध तृतीयेपासून सदर देवस्थानाकडे तरंगाचे देवपण सुरू होते. यावेळी दसऱ्याप्रमाणेच जमलेल्या सर्व लोकांस देव कौल करार होत असतो. चतुर्थीस रात्रौ कवळास होतो. पंचमीस सकाळी क्षेत्र व रात्रौ रंगपूजा होऊन महापर्वणी उत्सव संपतो. तरंगाचे देवपण दोनदा होते.

### आकेरीच्या काळ्या पाषाणावरही प्रतिमा

श्रीदेव रवळनाथाची आजची अधिष्ठित मूर्तीही सावंतवाडीतील आकेरी या गावाहून मुद्दाम नेलेल्या कृष्ण शिळेपासून मूळगावीच बनवली आहे. या मूर्तीची प्रतिष्ठापना माघ शुद्ध पंचमी शके १७९२ बुधवार तारीख २५ जानेवारी १८७१ रोजी केली आहे. पूर्वीची मूर्ती देवचाफ्याच्या लाकडाची होती. ती नावेच्या पंचतीर्थावर विसर्जित करण्यात आली. हा दिवस वाढदिवस म्हणून साजरा होतो. मंदिरात श्रावणी सोमवारही पाळतात.

या देवस्थानात एकंदर अठरा वांगडी आहेत. ते खालीलप्रमाणे आणि त्यांच्याकडील व्यवस्था अशी :

१. श्रीदेव वेतोबाकडील महाजन :

(१) कीर, (२) शिनारी, (३) मंत्री.

२. श्रीदेव थोरली वनदेवता :

(१) म्हांबरे, (२) काळोखे.

३. श्रीदेव रवळनाथ महालक्ष्मी .

(१) झांटचे, (२) शेणई, (३) घोटगे, (४) बोके (शिरोडकर), (५) तानवडे.

४. श्रीदेव धाकटी वनदेवता :

(१) धोंडे, (२) राय, (३) शेटचे, (४) कापडी, (५) पडवळ, (६) डांगी, (७) भांगले.

५. भगवती :

(१) दलाल.

६. पुरुषोत्तम देवस्थान :

सर्वांचेच आहे.

या सर्व कुटुंबांचे हे पंचायतन आहे. मुख्य जत्रा वेतोबाकडे तिकडून तेज घेऊनच तरंगे श्रीरवळनाथ मंदिराकडे पर्वणीसाठी येतात. दसऱ्याच्या वेळी शिवलिंगासह वेतोबाच्याच देवळात जातात.

भूत पिशाचबाधा नाहीशी करण्यासाठी हे देवस्थान फार प्रसिद्ध आहे. या देवस्थानात महाजनांपैकी धर्मांतर झालेले ख्रिस्ती व इतर ख्रिस्ती लोक तसेच मुसलमानही फार मोठ्या प्रमाणात येतात.



# बारा ज्योतिर्लिंगे

लेखक : **श्री. कृ. भा. बाबर**

ज्योतिर्लिंग म्हणजे ज्योती किंवा ज्योत हेच ज्याचे लिंग (खूण) आहे ते. अशी ज्योतिर्लिंगे आपल्या देशात बारा ठिकाणी आहेत. ही बारा ठिकाणे शिवपुराणात पुढीलप्रमाणे दिलेली आहेत:

**सौराष्ट्रे सोमनाथं च श्रीशैले मल्लिकार्जुनम् ।**
**उज्जयिन्यां महाकालमोंकारममलेश्वरम् ॥**

**हिमालये तु केदारम् डाकिन्यां भीमशंकरम् ।**
**वाराणस्यां च विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे ॥**

**परल्यां वैद्यनाथं च नागेशं दारुकावने ।**
**सेतुबन्धे तु रामेशं घृष्णेशं शिवालये ॥**

याचा अर्थ, सौराष्ट्रात वेरावळजवळ सोमनाथ, आंध्र प्रदेशात श्रीशैलावर मल्लिकार्जुन, उज्जयिनीत महाकालेश्वर, नर्मदा नदीच्या काठी ओंकारमांधाता येथे ओंकार अमलेश्वर, हिमालयात केदारनाथ, डाकिनी क्षेत्रात म्हणजे पुणे जिल्ह्यातील खेड तालुक्यात भीमाशंकर, काशीला (वाराणशी क्षेत्रात) विश्वेश्वर, नाशिकजवळ गोदावरीच्या काठी—उगमाजवळ—त्र्यंबकेश्वर, मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात परळी येथे वैद्यनाथ (वैजनाथ), मराठवाड्यातीलच परभणी जिल्ह्यात—दारुकावनात—औंढा येथे नागनाथ, तामीळनाडूमध्ये सेतुबंधाजवळ रामेश्वर आणि मराठवाड्यातील औरंगाबाद जिल्ह्यातील वेरूळजवळ शिवालयात घृष्णेश्वर, अशी ही ज्योतिर्लिंगाची म्हणजे भगवान श्रीशंकराची बारा स्थाने आहेत.

भगवान श्रीशंकर म्हणजे महादेव. सगळ्या देवांत मोठा देव. त्यामुळेच आपल्या देशातील सगळ्या गावांत महादेवाची देवळे आहेत.

आज काही देवळांतून महादेवाची मूर्ती दिसत असली, तरी संगळीकडे महादेवाची पिंडीच मुख्यतः असते. खाली शाळुंका व मध्ये उभे लिंग अशी ही पिंडी असते.

आज हिंदु लोक ब्रह्मा, विष्णू आणि महेश असे तीन देव प्रमुख मानतात ; आणि विश्वाची—जगाची—उत्पत्ती करणारा देव म्हणजे ब्रह्मदेव, ह्या जगाचे पालन करणारा देव म्हणजे विष्णू आणि ह्याच जगाचा संहार करणारा देव म्हणजे महेश किंवा महादेव, असे समजतात. ह्याच तीन देवांना त्रिमूर्ती समजतात.

देवाची ही तीन रूपे फार प्राचीन काळची नाहीत. केव्हा तरी अलीकडेच निर्माण झालेली आहेत.

ब्रह्मदेवाचे देऊळ आपल्या देशात मध्यप्रदेशात अजमीरजवळ पुष्कर तीर्थामध्येच फक्त एका ठिकाणी आहे. आणि दिवाळीच्या सुरुवातीस धनत्रयोदशीच्या दिवशी काही लोक ब्रह्मपूजा करतात. ह्या ब्रह्माची प्रथम कल्पना उपनिषदांच्या काळात झालेली दिसते. मुंडक उपनिषदात आणि केन उपनिषदात ह्याचे सविस्तर विवरण आहे. मुंडकोपनिषदाच्या दुसऱ्या भागातील पहिल्या खंडाचा पहिलाच श्लोक असा आहे:

**तदेतत्सत्यम् । यथासुदीप्तीत्पावकात्**
**विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः ।**
**यथाक्षराद्विविधाः सौम्य भावाः प्रजायंते**
**तत्र चैवापियन्ति ॥**

[हे पुढे जे सांगितले आहे ते अगदी खरे आहे. ज्याप्रमाणे चांगल्या रीतीने पेटलेल्या विस्तवातून, त्यासारखेच हजारो विस्फुलिंग (ठिणग्या) उत्पन्न होतात, त्याप्रमाणे त्या अक्षरापासून अनेक प्रकारच्या वस्तू उत्पन्न होतात आणि त्यातच जाऊन मिळतात.]

अक्षर हे ब्रह्माचे स्वरूप. जग त्याच्यापासूनच उत्पन्न होते आणि त्यातच विलीन होते. ब्रह्म हे असे विश्वव्यापी आहे. आपण परमात्मा किंवा परमेश्वर समजतो तेच हे रूप.

विष्णू शब्दाचा अर्थ तर विश्वाला व्यापून रहाणारा असाच आहे, तेही परमेश्वराचेच रूप.

आणि महेश तर महा ईश म्हणजे मोठा ईश्वर. जगावर सत्ता चालविणारा. सर्वांत मोठा. म्हणजे तोही ईश्वरच.

म्हणजे ब्रह्मा, विष्णू, महेश ही कोणी तरी आणि केव्हा तरी एकाच ईश्वराची मानलेली रूपे आहेत.

'एकम् सत्विप्रा बहुधा वदन्ति' म्हणजे सत्य एकच आहे, शहाणे लोक त्याला निरनिराळ्या नावांनी संबोधतात, असे म्हटलेले आहे, तेच खरे.

ब्रह्मा, विष्णू, महेश ही त्रिमूर्ती निर्माण करणारांनी महेशाचे काम जगाचा संहार करण्याचे आहे असे म्हटलेले आहे, ते काही बरोबर नाही. ही कल्पनाही अलीकडचीच आहे.

वेदकाळात ह्या आजच्या त्रिमूर्तीला स्थान नाही. तरी पण महादेव वेदांच्याही अगोदरचा आहे.

आर्य लोकांनी वेद रचलेले आहेत ; आणि आर्य लोक इसवी सनापूर्वी दोन-तीन हजार वर्षे आपल्या देशामध्ये आलेले आहेत. हे आर्य लोक येथे येण्यापूर्वी येथे द्रविड लोक आणि काही आदिवासी लोक रहात होते. ते महादेवाचे भक्त होते. ते लिंगोपासक होते. म्हणून तर वेदामध्ये ह्या लिंगोपासकांची निंदा केलेली आढळते.

द्रविड लोक चांगले शेतकरी होते आणि त्यांनी चांगली पुरे म्हणजे नगरे वसविलेली होती. त्यांनी चांगले बैल पाळलेले होते आणि धष्ट पुष्ट बैल हे त्यांचे पूजास्थान होते. म्हणूनच महादेवाच्या बरोबर नंदीचीही पूजा त्यांच्यामध्ये प्रचलित होती. 'इतकेच नव्हे तर महादेवाच्या आधी नंदीची पूजा' म्हण प्रचलित झालेली आहे आणि महादेवाच्या देवळात गेल्याबरोबर प्रथम नंदी लागतो आणि मग महादेवाचे दर्शन होते. ह्या नंदीचे दर्शन घेताना लोक त्याच्या अंडाला हात लावतात. अंडामध्ये वीर्य असते आणि ते प्रजोत्पत्तीचे प्रमुख साधन असते, म्हणून ही प्रथा पडलेली आहे.

नंदी आणि महादेव हे दोन्हीही जगदुत्पत्तीस कारण होत असल्याने महादेवाची पिंडी ही त्याचीच खूण म्हणून आरंभापासून चालू राहिलेली आहे. यावरून दिसून येईल की, महादेव जगाचा संहार करणारा देव नसून जगाची उत्पत्ती करणाराच देव आहे. आता हा जगदात्माच उत्पत्ती आणि लय दोन्ही करीत असल्याने—त्याच्याच शक्तीने हे सारे होत असल्याने—संहाराचे काम महादेवाकडे आपोआपच येते. पण केवळ संहारकर्ता असा तो नसून उत्पत्तीकर्ताही तो आहे.

महादेव हा भोळा सांब म्हणून प्रसिद्ध आहे. कोणाही भक्ताचे सारे अपराध पोटात घालून त्याच्यावर कृपा करण्याचे कार्य महादेव करीत असतो. म्हणून शंकर आणि पार्वती नंदीवर बसून वरचेवर जगामध्ये संचारास निघालेले व पुण्यकर्म करणाराला प्रसाद देत असलेले अनेक कथांतून आढळते. उग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेणाऱ्या अनेक दैत्यांच्या किंवा राक्षसांच्याही कथा प्रसिद्ध आहेत.

असा हा महादेव इतर कोणत्याही देवाच्या आधीपासून भारतीय लोकांचे पूज्य दैवत बनलेला आहे. आर्य लोक भारतात येण्यापूर्वी प्रसिद्ध असलेल्या मोहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खननात ह्याची साक्ष पटलेली आहे.

महादेवाच्या लिंगाची पूजा होण्याआधी त्याची पूजा केवळ ज्योतीवरून होत असली पाहिजे. कारण प्राचीन काळच्या लोकांचा पहिला देव अग्नी हाच होता. 'अग्निरस्य मुखमासीत्' असे म्हटलेले आहे. आर्य लोकांमध्ये प्रचलित असलेल्या यज्ञयागामध्ये देवाला आहुती देताना ती अग्नीमध्येच टाकली जाते. कारण अग्नी हे देवाचे तोंड आहे, असे मानले जात होते. तोंड हा पवित्र भाग. प्राण्यांच्या तोंडावाटेच अन्न, पाणी त्यांच्या शरीरात जाते व मग शरीरातील अग्नी प्रज्वलित होत असतो.

ज्योत ही अग्नीची शिखा. शिखा म्हणजे शेंडी. ज्योतीचे वर आलेले टोक. अर्थात ज्योत म्हणजे अग्नीच. म्हणून पहिल्या मोठ्या देवाचे—महादेवाचे—स्वरूप अग्नीरूपच असावे.

कोल्हापूरचा—रत्नागिरी ज्योतिबा—हे महादेवाचेच रूप आहे. हा देव प्रथम सिंध प्रांतातून महाराष्ट्रात आला. सिंध प्रांतात त्याची पूजा केवळ ज्योतीच्या रूपानेच होत होती आणि म्हणूनच त्याला ज्योतिबा—ज्योतिर्लिंग म्हटले जाते.

भारतात प्रसिद्ध असलेल्या बारा ज्योतिर्लिंगांची मूळ कथा ही अशा स्वरूपाची आहे.






लेखक : **श्री. वि. स. कामत**

यवनांच्या छळातून प्रजेची मुक्ती करण्यासाठी सतराव्या शतकात शिवछत्रपतींच्या रूपाने महाराष्ट्रात एक प्रचंड शिवशक्ती निर्माण झाली. मात्र त्या शक्तीचे स्वरूप संकुचित नव्हते. सर्व भारतीयांचे परचक्रापासून संरक्षण करण्याचे कंकणच शिवछत्रपतींनी बांधले व वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी तोरणा किल्ला पादाक्रांत करून स्वराज्याचे तोरण बांधण्याचा बहुमान मिळविला. त्यानंतर स्वतःच्या बळावर राजगड, पुरंदर, सिंहगड, प्रतापगड, प्रचंडगड, रायरेश्वर हे किल्ले ताब्यात घेतले. यांपैकी प्रत्येक गडावर शिव मंदिराचा जीर्णोद्धार केला. रायरेश्वरी जेथे स्वराज्याची शपथ घेतली तेथे महादेवाच्या पिंडीवरच आपल्या सहकाऱ्यांसह महाराजांनी रक्ताचा टिळा लावल्याचा सोहळा इतिहासप्रसिद्ध आहे. पुरंदरावर केदारेश्वराचे मंदिर असून रायगडावरील 'जगदीश्वर' जगप्रसिद्ध आहे.

शिवछत्रपतींनी पुणे, सातारा, रत्नागिरी, कुलाबा या जिल्ह्यांतील शत्रूंशी सामना देण्यात आपले बरेचसे आयुष्य वेचले. या भागातील सर्व प्रमुख स्थानी शिव मंदिरे असल्याचे आढळून येते. त्यांपैकी बहुतेक पौराणिक कालापासून अस्तित्वात असली तरी त्यांचा जीर्णोद्धार शिवछत्रपतींनी केल्याचे दाखले इतिहासात सापडतात. शिवशाहीतील रणमर्दानी 'हर हर महादेव' ही रणगर्जना अत्यंत स्फूर्तिदायक होण्याचे कारण म्हणजे महाराजांनी प्रत्येक खेडोपाडी शिवमंदिराची स्थापना केली. शिवोपासनेचे क्षात्रतेज प्रजेत निर्माण व्हावे या सद्हेतूने शिवछत्रपतींनी त्यास सक्रिय सहानुभूती दर्शविली. त्यायोगे संघटना व राष्ट्रीय ऐक्य निर्माण केले.

**श्रीपंचलिंग**

श्रीपंचलिंग हे श्रीशंकराचे पुरातन स्थान शिवनेरी किल्ल्याच्या उत्तरेस पायथ्यापाशी आहे. निसर्गरम्य निवांत सान्निध्यात हे पंचलिंगाचे मंदिर आहे.

या मंदिराचे प्रवेशद्वार पूर्वाभिमुख असून मंदिराभोवती भव्य प्राकार आहे. अगदी पुढच्या बाजूस यात्रेकरूस उतरण्यासाठी मोठा सोपा बांधलेला आहे. हा सोपा ओलांडून मंदिरात जावे लागते. शिव मंदिर व पुढचा सोपा यांमध्ये एक लहानशी पुष्करणी आहे. तिचे पाणी शीतल व अत्यंत मधुर आहे. पुष्करणीच्या पूर्वेस तिला टेकूनच नंदी आहे. गर्भागारात उतरण्यास पायऱ्या आहेत. या ठिकाणी पाच लिंगे आहेत म्हणून त्यास पंचलिंग हे नाव पडले. ही सर्व लिंगे काळ्या पाषाणाची आहेत. श्रावण सोमवारी येथे यात्रा भरते. मंदिराच्या परिसरात अंबा-अंबिका, सुवर्ण लेण्याद्री (गणेश लेणी) इत्यादी अनेक प्राचीन लेणी आहेत. सातवाहनांच्या काळात जुन्नर नगरी वैभवाच्या शिखरावर होती असे इतिहासकार सांगतात. या पवित्र क्षेत्री शिवछत्रपतींचा जन्म शिवनेरी गडावर झाला.

### श्रीसिद्धेश्वर

सातारा जिल्ह्यातील हे पुरातन शिव मंदिर कुरोलीचा सिद्धेश्वर या नावाने ओळखले जाते. बहामनी राज्याचे पाच तुकडे झाल्यानंतर कुरोली हे गाव विजापूरच्या आदिलशाहीत आले. पर्यायाने त्याची व्यवस्था राजे शहाजी भोसले यांच्या हाती आली. पुढे शिवछत्रपतींनी खटावचा भाग आदिलशहाकडून जिंकून स्वराज्यास जोडला. त्यावेळी या मंदिराची व्यवस्था दादोजी कोंडदेव याने लावून दिली. नंतरच्या काळात रामदासपंत दिटवीकर यांनी या देवस्थानाची व्यवस्था उत्तम ठेवली. देवाचा मंडपही त्यांनीच वाढविला. पुढे श्रीमंत शाहू छत्रपतींनी देवालयास इनाम देऊन लाकडी मंडपही बांधून दिला. त्यानंतरच्या काळात परशरामपंत प्रतिनिधी व त्यांच्या मावशी यांनी देवालयाच्या खर्चासाठी वार्षिक तीन सहस्र रुपयांची देणगी दिली.

अल्लाउद्दीन खिलजीचा सरदार मलिक काफूर याने हे देवालय पाडून टाकले व त्यानंतर आलेल्या बहामनी राज्यातील एका देशमुख सरदारास हे गाव इनाम मिळाले. त्यानेच या देवालयाचा जीर्णोद्धार केला. देवालयाच्या गाभाऱ्यात श्रीसिद्धेश्वरांची पिंडी आहे. शाळुंका स्वयंभू असून ती काळ्या पाषाणाची आहे. पिंडीसभोवती चांदीची जाळी आहे. या मंदिरात नित्य दोन वेळा व सोमवारी तीन वेळा चौघडा झडतो. महाशिवरात्रीला मूर्तीची मिरवणूक काढण्यात येते.

### शिखर-शिंगणापूर महादेव

हे शिव मंदिर सातारा जिल्ह्यातील दहीवडी गावापासून तेरा मैलांवर वसलेले आहे. हे अतिप्राचीन मंदिर असून बाराव्या शतकाच्या अखेरीस तत्कालीन 

यादव राजांनी बांधले असल्याचे तेथील रहिवासी सांगतात. हे स्थान उंचावर असून अत्यंत रमणीय आहे. शिव-पार्वतीचा विवाह येथे झाला अशी एक दंतकथा येथे प्रचलित आहे. छत्रपती शिवाजीराजे भोसले यांचे आजोबा मालोजीराव यांनी इ.स. १६०० च्या सुमारास येथे एक मोठे तळे बांधून पाण्याचे दुर्भिक्ष दूर केले. सध्या ज्याला 'शिवतीर्थ' म्हणतात ते हेच होय. या तळ्याच्या दक्षिणेस शिंगणापूर गाव वसलेले आहे. या मंदिराच्या उजव्या अंगास एक-दीड फर्लांगावर एक जुनी इमारत असून तेथे शहाजीराजे, शिवाजीराजे व संभाजीराजे यांच्या समाध्या असल्याचे सांगतात. छत्रपती शिवाजीमहाराजांनी शिंगणापूरच्या एका माळ्यास असे सांगितले होते म्हणतात की, 'आपल्या मृत्यूनंतर आपल्या समाधीवर महादेवाच्या पिंडीमधील निर्माल्य नित्य ठेवावे'. त्यानुसार ही प्रथा अद्याप चालू असून शिंगणापूरचे एक माळी श्री. फुलारे ही कामगिरी नियमितपणे बजावीत असतात. शिव मंदिरात जाण्यासाठी ४०० हून अधिक पायऱ्या चढून जाव्या लागतात. प्रथम थोड्या पायऱ्या चढून गेले म्हणजे एक मठ लागतो. तेथे शांतिलिंग स्वामींची समाधी आहे. पुढे खडकेश्वर महादेवाचे मंदिर आहे. त्यानंतर जवळजवळ १२५ पायऱ्या चढून गेले की, मुख्य शिव मंदिराचा भव्य दगडी दरवाजा दिसू लागतो. दोनशे पन्नास वर्षांपूर्वी एका धनगराने हा दरवाजा बांधला असे सांगतात. हा दरवाजा ८० फूट उंच असून १५ फूट जाड व ४० फूट रुंद आहे. या दरवाजापासून ३०० पायऱ्या चढून गेले की, दुसरा दरवाजा लागतो. हा दरवाजा छत्रपती शहाजीराजांनी बांधला. यानंतर ३०-४० फूट अंतरावरच श्रीशंकराचे भव्य मंदिर दिसते.

देवालयाभोवती दगडी तट असून या तटास चार दरवाजे आहेत. आग्नेय दिशेस नगारखाना आहे. पूजेच्या चारही वेळा हा नगारा झडतो, देवालयाच्या प्रांगणात भक्तगणांनी बांधलेल्या अनेक दीपमाला आहेत. मुख्य मंडपात पाषाणाचे पाच नंदी आहेत. छतावरील नक्षीकाम व चित्रे आकर्षक असून मंदिराच्या गाभाऱ्यात दोन शिवलिंगे आहेत. ती शिव-पार्वतीची असून स्वयंभू आहेत. पिंडीजवळ दीड फूट उंचीचा एक नंदी आहे. मंदिरात मोठ्या आकाराच्या तीन घंटा आहेत. त्या पोर्तुगिजांकडून मिळाल्या असाव्यात असे दिसते. घंटेवर इ.स. १६३० हा पोर्तुगीज भाषेत लिहिलेला असून 'हर हर महादेव' ही अक्षरे कोरलेली आढळतात. दुसऱ्या दोन घंटांवर इ.स. १७१६ व १७२१ कोरलेले दिसतात, बहुधा या घंटा पेशव्यांच्या आमदानीतील असाव्यात. या मंदिराच्या पश्चिमेस बलिमहादेवाचे मंदिर असून ते हेमाडपंती धाटणीचे आहे. त्याचा जीर्णोद्धार शिवशाहीत झाला. या देवालयाचा उत्सव चैत्र शुद्ध दशमीस साजरा होतो.

### श्रीरायरेश्वर

हे शिवस्थान भोरनजीक असलेल्या रोहिडेश्वर किल्ल्यावर वसलेले असून शिव-छत्रपतींनी त्याचा जीर्णोद्धार केल्याचे सांगतात. छत्रपती शिवाजीमहाराजांनी आपल्या सहकाऱ्यांसह येथे स्वराज्याच्या संकल्पाचे उदक सोडले, ज्या शिवाला आपल्या रक्ताचा टिळा लावला तोच हा रायरेश्वर. हे इतिहास प्रसिद्ध स्थान भोरच्या नैऋत्येस चौदा मैलांवर व अंबवड्यापासून पाच मैलांवर वसलेले आहे. रायरी डोंगराच्या विस्तृत पठारावर हे मंदिर बांधलेले असून ते अतिप्राचीन असल्याचे तेथील रहिवासी सांगतात. त्याचा जीर्णोद्धार शिवछत्रपतींनी केला व वर्षासन ठरवून दिले असे उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रांत सापडतात. येथे महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.

### कनकेश्वर मंदिर

हे शिव मंदिर कुलाबा जिल्ह्यातील अलिबागेपासून सात मैलांवर वसलेले आहे. मुंबईहून रेवस बंदरात उतरून तिथून पुढे एस.टी.ने या ठिकाणी जाता येते. मापगावपासून कनकेश्वर डोंगराचा पायथा सुरू होतो. डोंगर चढण्यासाठी ७०० पायऱ्या आहेत. या पायऱ्या श्री. गोविंद देवराज नावाच्या मुंबईच्या एका व्यापाऱ्याने बांधल्या असून या पायऱ्यांच्या दुतर्फा झाडे लावण्याचे कामही त्यांनी केल्याचे सांगतात. या सोयीमुळे डोंगर चढताना थकवा घालविण्यासाठी झाडांच्या सावलीचा आश्रय अधूनमधून घेता येतो. साधारणपणे १००-२०० पायऱ्या चढून गेल्यावर गायमंडी नावाचे स्थान लागते. या ठिकाणी एका मोठ्या शिळेवर गाईचे चित्र कोरण्यात आलेले आहे. यासंबंधी अशी आख्यायिका सांगण्यात येते की, पुरातनकाली वालुकेश्वराहून एक गाय नित्यनेमाने कनकेश्वरी जात असे व आपल्या दुधाच्या चारी धारा कनकेश्वरावर सोडून परतत असे. ही गोष्ट ज्यावेळी त्या गाईच्या धन्याला समजली तेव्हा त्याने तिच्या हालचालीवर पाळत ठेवून तो तिचा पाठलाग करू लागला. आपला पाठलाग होतो असे जेव्हा गाईच्या ध्यानात आले तेव्हा तिने कनकेश्वराहून जी उडी घेतली ती त्या ठिकाणी गुप्त झाली. 'गायमंडी' म्हणजे त्या गाईचे स्मारक. गायमंडीला गेल्यावर उजव्या हातास ब्रह्मकुंड व विष्णुकुंड अशी दोन तीर्थे आहेत. ब्रह्मकुंडाच्या चारी बाजूंना तांबड्या चिरांची भिंत असून आत उतरण्यास दोन कमानींचे दरवाजे आहेत. श्रीकनकेश्वराचे मंदिर पंचकोनी असून कमलाकार आहे. हे फार पुरातन असून त्याची घाटणी हेमाडपंती आहे. सभामंडप कौलारू असून देवालयाच्या प्रांगणात भव्य दीपमाला आहेत. देवालयाच्या गाभाऱ्यात कनकेश्वराचे लिंग असून ते स्वयंभू असल्याचे सांगतात. लिंग टोकदार असून

ते काळ्या पाषाणाचे बनविलेले आहे. लिंगाभोवती सदैव पाण्याचा झरा असतो. त्रिपुरी पौर्णिमेस व महाशिवरात्रीला येथे मोठी यात्रा भरते. या देवालयाची पूजा-अर्चा नियमित व्हावी म्हणून शिवछत्रपतींनी एका गुरवाची नेमणूक केल्याचे उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रात सापडतात.

### श्रीकुणकेश्वर मंदिर

हे रत्नागिरी जिल्ह्यातील देवगड तालुक्यापासून अवघ्या चार मैलांवर पश्चिमेस सिंधुदुर्गाच्या सान्निध्यात कुणकेश्वर गावी असलेले पुरातन शिवस्थान आहे. हे स्थान समुद्रकिनारी असल्याने सिंधुसागराच्या लाटांनी या मंदिराचा पश्चिम तट नित्य प्रक्षाळला जातो. हे मंदिर सुमारे ७० फूट उंचीचे असून देवगड-मालवण असा बोटीतून प्रवास करीत असताना समुद्रातही चांगल्या प्रकारे दिसू शकते. देवालयाच्या उत्तरेस प्राकारातच जोगेश्वरीचे छोटे देवालय आहे. या देवालयाच्या समोर दोन दीपमाळा व तुळशी वृंदावन आहे. कुणकेश्वराकडे तोंड करून चबुतऱ्यावर एक भव्य नंदी आहे. नंदीच्या मागे 'श्रीदेव मंडलीक' नावाचे एक लहानसे शिव मंदिर आहे. तेथून थोडे पुढे गेले की, नारायणाचे मंदिर लागते. श्रीनारायणाची मूर्ती चतुर्भुज असून ती सायुध आहे. देवळात एक जुनी तोफ आहे. त्यापुढे श्रीगणेश मंदिर लागते. या सर्व परिसराच्या मध्यभागी श्रीकुणकेश्वर मंदिर आढळते. मंदिराच्या बहिरंगाला चार भव्य स्तंभ असून मधोमध वर्तुळाकृती कासव बसविले आहे. मंदिराच्या मोठमोठ्या तुळयां-वर अप्रतिम कलाकुसर केलेली आढळते. श्रीकुणकेश्वराचे शिवलिंग स्वयंभू असून जांभ्या दगडाचे आहे. शाळुंका काळ्या पाषाणांची आहे. हे मंदिर इ.स. ११०० च्या सुमारास यादवांनी बांधले व छत्रपती शिवाजीमहाराजांनी नीळकंठ बावडेकर यांना सांगून त्याचा जीर्णोद्धार करविला. महाशिवरात्रीला येथे मोठी यात्रा भरते.

### बृहदेश्वर मंदिर–तंजावर

या मंदिराचे शिल्प भव्य असून मंदिरावर १९० फूट लांबीचे विमान दगडात कोरण्यात आले आहे. या विमानाची उंची तेरा मजली आहे. विमानावर घुमटाकार शिखर असून ते अखंड शिलेत खोदलेले आहे. इ.स. १३३६ मध्ये पहिल्या महंमद बहामनीने या मंदिरातील शिवलिंग मुळासकट उपटून ते मातीत पुरले. विजयनगरच्या पहिल्या बुक्करायाने हा कलंक धुऊन काढला व सप्तकोटीश्वर सन्मानित झाला. पोर्तुगिजांच्या अमदानीत पुन्हा या शिवाच्या कपाळी अप्रतिष्ठा आली. सप्तकोटीश्वराचे भग्न मंदिर पूर्णपणे नष्ट करण्यात

आले व त्या जागी 'कॉन्देलारिअ चॅपल' उभारले गेले. शिवालयाचे सप्त-कोटीश्वर लिंग एका विहिरीवर पाणी भरण्याचे वेळी पाय देण्याचे पाषाण झाले. नारायण सूर्यरायाने त्याची प्रतिष्ठापना केली. मंदिराचा गाभा खडकात खोदून काढला व डाव्या बाजूला प्रशस्त विहीर आणि अग्रशाळा बांधली. दीपस्तंभ उभारला व प्राकाराबाहेर प्रशस्त तलाव खोदला. शके १५९० (सन १६६८). या मंदिराचा जीर्णोद्धार शिवछत्रपतींनी केल्याचा उल्लेख नव्या मंदिराच्या महाद्वारावर कोरलेल्या शिलालेखात आढळतो.

**परळी-वैजनाथ**

मराठवाड्यात बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक महत्त्वाचे शिवस्थान म्हणून याचा लौकिक आहे. वेरूळगाव पिढीजाद पाटीलकीचा असल्याने या स्थानाचे माहात्म्य शिवछत्रपतींच्या अभयपत्रात दृष्टोत्पत्तीस येते. हे अभयपत्र पुढीलप्रमाणे आहे: 'स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ६ सीधार्थी नाम संवत्सरे कार्तिक बहुल पंचमी बुधवासरे क्षत्रिय कुलवतंस श्री राजा सीवं छत्रपति यानी, देशमुखानी व समस्त ब्राह्मण व प्रजा कसबे परळी यासी केली आज्ञा दील्हे अभयपत्र येसाजे श्री देवस्थान येथे आहे. क्षेत्रीचा गाव याकरिता येथे स्वामीचे सेनेचे लोक आलीया कोन्हा उपद्रव करू नये. खंडनी घेऊ नये येसी आज्ञा आहे. आजी परीयंत कोन्ही उपद्रव दीधला नाही. पुढे देनार नाही. तुम्हास अभयपत्र दील्हे असे. आमचे लोक सेना या मार्गी येतील जातील त्याकरिता तुम्ही गाव सोडून जाण्याची गरज नाही. सुखे गावी असत जावे. वरा कौलाचा कागद दाखवित जाणे म्हणजे कोन्ही तुमचे वाटेस जाणार नाही. अभय असे जानीजे—लेखनालंकार.'

परळी-वैजनाथ शिवछत्रपतींच्या खास आश्रयाखाली नावलौकिकास आले. या क्षेत्राचा चरितार्थ योग्य रीतीने चालावा म्हणून पुजाऱ्यास हा गाव इनाम दिला. दर महाशिवरात्रीस येथे मोठी यात्रा भरते.

**श्रीघृष्णेश्वर**

श्रीघृष्णेश्वर हे शिवस्थान द्वादश ज्योतिर्लिंगांपैकी एक असून ते छत्रपती शिवाजीमहाराजांच्या पूर्वजांचे कुलदैवत होय. मालोजी व विठोजी यांचे वास्तव्य वेरुळास असे, वेरुळाची पाटीलकी पण त्यांच्याकडेच होती. मालोजीने कुल-दैवताची आराधना करून शिवरुद्रास प्रसन्न करून घेतले होते. त्यानेच घृष्णेश्वर मंदिराचा जीर्णोद्धार केला. महाशिवरात्रीस येथे मोठी यात्रा भरते. छत्रपती शिवाजीमहाराजांनी या मंदिराला वर्षासन नेमून दिले आणि त्यातून मंदिराची देखभाल होत असे.

**श्रीजगदीश्वर**

रायगडावरील श्रीजगदीश्वर हे शिवछपतींचे उपास्य दैवत. छत्रपती शिवाजी-महाराज भगवान शंकराचे परम भक्त म्हणून त्यांचा अंत्य संस्कारही या मंदिरा-समोर झाला. शिवछत्रपतींची समाधी व जगदीश्वराचा गाभारा एकमेकांसमोर बांधलेली आढळतात. चिरेबंद काळ्याकभिन्न पाषाणाचे हे मंदिर अंतर्बाह्य मोठे रमणीय आहे. मंदिराभोवती १५० फूट लांब, १५० फूट रुंद व १० फूट उंचीचा भक्कम दगडी प्राकार असून त्याच्या उत्तर-दक्षिण भागाच्या कोपऱ्याची उंची ४० फूट आहे. मंदिराच्या पश्चिमेकडील द्वार ६ फूट उंच व ४ फूट रुंद असून मंदिराचे (शिवछत्रपतींच्या समाधीजवळचे) पूर्वेकडील महाद्वार ८ फूट उंच व त्यावरील कमानीची रुंदी ५ फूट व चौथऱ्यासह एकंदर उंची २५ फूट आहे. त्याव्यतिरिक्त प्राकाराच्या उत्तर-दक्षिण अंगाला ४′ × २½ मापाचे दोन लहान दरवाजे आहेत. प्राकाराच्या आतील मंदिरासभोवारच्या अंगणास फरसबंदी केली असून त्याच्या दक्षिण-उत्तर अंगाच्या प्राकारास लागून पडव्यांचे लांबच लांब चौथरे आढळतात.

मुख्य मंदिराची लांबी ३५ फूट, रुंदी २५ फूट व उंची २५ फूट असून त्यावरील घुमट हेमाडपंती घाटाचा आहे. घुमटाच्या चारी कोपऱ्यांस कमळाच्या कळ्यांच्या आकाराचे चार कळस आहेत. मंदिराच्या प्रांगणात शिवलिंगाभिमुख बसलेला काळ्या पाषाणाचा भव्य नंदी आहे. शिवदर्शनाच्या रूढीनुसार नंदीला वंदन करून जगदीश्वराच्या गाभाऱ्यात प्रवेश करावा लागतो. जगदीश्वराच्या महाद्वारावर एका बाजूस बाहेरच्या अंगाला एक शिलालेख आहे. तो खालीलप्रमाणे आहे:

> **प्रासादो जगदीश्वरस्य जगतां-**
> **मानन्ददोऽनुज्ञया ॥**
>
> **श्रीमच्छत्रपतेः शिवस्य नृपतेः**
> **सिंहासने तिष्ठतः ॥**
>
> **शाके षण्णव-बाण-भूमि-**
> **गणनादानन्द संवत्सरे ॥**
>
> **ज्योतीराज मुहूर्त कीर्तिसहिते**
> **शुक्लेश सार्पे तिथौ ॥**
>
> **वापी कूपडागराजी रुचिरं।**
> **रम्यं वनं वीतिके ॥**
>
> **स्तम्भैः कुंभिगृहे नरेन्द्र-**
> **सदनैरभ्रं लिहैर्मोहीते ॥**

श्रीमद्रायगिरौ गिरामविषये
हीराजिना निर्मितो ॥

यावच्चन्द्र दिवाकरौ विलसत
स्तावत्सुमुजृम्भते ॥

मंदिराच्या सूर्यद्वाराच्या उंबरठ्यावर 'सेवेचे ठाई तत्पर हिरोजी इटलकर' अशी अक्षरे कोरली आहेत. हिरोजी इटलकराचे हे शिल्पकार्य शिलालेखातील दुसऱ्या श्लोकाच्या शेवटच्या ओळीत व्यक्त केलेल्या आकांक्षेप्रमाणे 'यावच्चंद्र दिवाकरौ' अखंड उभे राहील अशी आशा करण्यात हरकत नसावी.






लेखक : डॉ. वाय. जी. बोधे

सुमारे दोन वर्षांपूर्वी मी जगप्रवासासाठी गेलो होतो त्यावेळी एक हेतू मनामध्ये होता की, जगाच्या निरनिराळ्या भागांमध्ये सनातन हिंदु धर्माची किंवा वैदिक परंपरेची व्याप्ती कोठेकोठे व कसकशी असू शकेल आणि त्याचे स्वरूप काय असेल ते पडताळून पहावे. त्याप्रमाणे निरनिराळ्या देशांतून आणि प्रदेशांतून फिरत असताना तेथे हिंदु धर्माचे अस्तित्व आहे एवढेच नव्हे तर तेथे हिंदु धर्माचे, देवदेवतांचे व उपासनादी कर्ममार्गांचे रक्षणही केले जाते आहे, हे लक्षात आल्याने मोठा आनंद वाटला.

फार प्राचीन काळापासून ज्यावेळी उत्तर ध्रुवाकडे आर्य संस्कृतीचा उगम झाला त्यावेळी कालांतराने तो समाज खाली दक्षिणेकडे येत गेला. त्यापैकी काही वस्ती वाढत वाढत युरोपमधून दक्षिणेकडे आली तशीच ती खाली येत येत भारतातही स्थिर झाली. त्यातलीच काही माणसे अमेरिकेतही दक्षिण भागात स्थिर झाली.

भारतातून जे व्यापारी व क्षत्रिय लोक आपल्या औद्योगिक प्रसाराच्या हेतूने पूर्वापार दूरवर जात होते त्यांनी संरक्षणासाठी म्हणून त्या त्या देशात राजाश्रय घेतला. आपल्या नित्य धार्मिक कार्यासाठी सनातनी विद्वान लोक बरोबर नेले. इतकेच नव्हे तर स्थानिक जे राज्यकर्ते होते त्यांना हिंदु धर्माचे वैशिष्टय पटवून दिले. त्यासाठी भारतातून काही विद्वान पंडितांना बोलावून व त्यांना राजाश्रयी ठेवून तेथील स्थायिक बनविले.

या दक्षिणेकडील देशांतून पूर्वेकडे पसरत गेलेली आपल्याकडील आर्य संस्कृती सध्याच्या ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया व इंडोनेशियामधील जावा, सुमात्रा व बाली या बेटांतून विस्तार पावली.

भारतामधील आर्य लोकांनी येथील अनार्यांशी पूर्णपणे एकजीव होण्याच्या दृष्टीने त्यांना आपल्यात ओढून घेतले. इतकेच नव्हे तर त्यांच्या काही देवदेवताही

आर्यांनी आपल्या धर्मकर्मात सामावून घेतल्या. शिव आणि शक्ती या त्यांपैकीच असाव्यात असेही म्हटले जाते. वैदिक परंपरेमध्ये शैव आणि वैष्णवांचे वितुष्ट येऊ नये किंवा कोणत्याही देवतांच्या उपासकांमध्ये वाद उत्पन्न होऊ नये म्हणून आणि कोणत्याही देवतेची उपासना करावयाची असली तरीही ती आर्य संस्कृतीत समाविष्ट केली जावी म्हणूनही श्रीजगद्गुरु आद्य शंकराचार्यांनी पंचायतन पूजेची (गणपती, विष्णू, देवी, सूर्य व शंकर यांची पूजा) प्रथा सुरू केली. वैष्णव पंथ किंवा आजचा भागवत धर्म हा राम व कृष्ण यांच्या अवतारांनंतर प्रचलित झालेला दिसतो. परशुराम अवतारापर्यंत 'शिवोऽम्' हे एकच सूत्र आर्य-अनार्यांचे किंवा ब्राह्मणादी चतुर्वर्णांचे होते. पुढे त्याचेच दोन भाग पाडले गेले. एक पंचायतन पूजा करणारा व दुसरा लिंग पूजा करणारा. लिंग पूजा करणारा समाज फक्त शैववादी आहे, कालांतराने वृषभमुनींनी एक ज्ञान पंथ निर्माण केला. तो ज्ञान पंथ म्हणजेच जैन पंथ होय.

वास्तविक वृषभमुनी हे वैदिक परंपरेचे कट्टे चाहते, परंतु संसारात गुरफटणाऱ्यांना ज्ञानमार्गाकडे आकर्षित करण्यासाठी काही विधी, कडक नियम तयार करून त्यांनी त्यांचा जनसमूहात प्रसार केला. त्यामुळे मूळचा हिंदु सनातनी जैन सांप्रदायी बनला. त्याचे एक कारण म्हणजे त्यांनी मानलेली उपास्यदेवता—आदिनाथ ही होय. आदिनाथ म्हणजेच शिवशंकर महादेव. तथापि जैन सांप्रदायी स्वतःस हिंदु धर्मापासून निराळे समजू लागले.

जैनानंतर बुद्धाचा अवतार होऊन त्यांच्या शिष्यांचे प्रचारकार्य सुरू झाले. परंतु भारतात त्यांचा प्रभाव फार न पडल्याने बौद्ध सांप्रदायाचा प्रसार पूर्वेकडे म्हणजेच ब्रह्मदेश, श्रीलंका, जपान, चीन व इतर जवळील बेटांतून अधिक झाला. हा सांप्रदाय नंतर तेथेच रुजला गेला. मात्र बौद्ध धर्माचा प्रभाव जावा, सुमात्रा, बाली व इतर जवळच्या बेटांमधून झालेला नाही. त्याचे एकच कारण असावे की, जे आर्य तेथे स्थायिक झाले ते तिथल्या जनसमूहाशी आता एकरूप झाले होते त्यामुळे तेथे कोठल्याही इतर धर्माचा प्रवेश होऊ शकला नाही.

मुसलमान व ख्रिस्ती लोकांच्या स्वाऱ्या या पूर्व प्रदेशांतून झाल्या. सयाम, कंबोडिया, इंडोनेशिया येथे त्यांना धर्मांतर करण्यात बरेच यश आले. त्यामुळे जावा-सुमात्रा येथील हिंदु संस्कृतीचे अभिमानी विखुरले गेले; बरेच धर्मभ्रष्टही झाले. जे धर्माभिमानी होते त्यांनी मात्र या बाली व जवळील लोंबा बेटातून त्यावेळी आश्रय घेतला. या बेटांतून मुसलमान धर्मभ्रष्टांना वाव मिळाला नाही. या हिंदूंना जावा हिंदू व बाली हिंदू म्हणून ओळखले जाते.

त्यांच्या धार्मिक चालीरीती जरी जवळजवळ आपल्यासारख्याच असल्या तरी काही ठिकाणी थोडाफार फरक जाणवतो. मुख्यतः सर्व शैवपंथी आहेत.

ज्याप्रमाणे आपल्या देशातून मूर्तिपूजा दिसते त्याप्रमाणे तिकडे कोठेच दिसत नाही. त्यांचेकडे त्रिमूर्तीही शिवात विलीन होते. बुद्ध अनुयायी हे शैवपंथ निराळा न समजता सर्व धार्मिक कृत्यांचे वेळी व कार्यक्रमांचे वेळी या लोकांशी सहभागी होतात. मात्र तेथील पूजक हे बुद्धाला शिवाचा लहान भाऊ संबोधतात.

वर सांगितलेल्या बेटांमध्ये चतुर्वर्णात्मक स्वरूप असूनही किंवा तेथे रामायणातील उत्सव पार पडत असूनही मुख्य देवता मात्र महादेव हीच मानली जाते.

आपल्याकडे विश्वकर्मा, सृष्टिकर्ता म्हणून ब्रह्मास जितके महत्त्व आहे तितकेच महादेवासही आहे. सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वसाक्षी परंतु निर्गुण निराकार हे महादेवाचे श्रेष्ठ स्वरूप धरूनच उपासनादी धर्मकृत्ये केली जातात. या बाली बेटांत सध्या ९० टक्क्यांपेक्षा अधिक हिंदू आहेत व त्यांचे हेच कुलदैवत आहे.

हिंदुस्थानात शिव मंदिरांतून लिंगपिंडी व शाळुंका हे महादेवाचे प्रतीक दाखविले जाते. आपण त्यांचीच पूजा व आराधनाही करतो. पण प्रतीक म्हणजे प्रत्यक्ष महादेव नव्हे किंवा त्यास सगुण स्वरूपही समजता येत नाही. महादेव म्हणजेच परमेश्वर असे दुसरे कोठल्याही देवास म्हटले जात नाही. राम अगर कृष्ण यांनाही परमात्मा म्हणतात. परंतु परमात्मा म्हणजे परमेश्वर नव्हे हे लक्षात ठेवावे लागते. परमेश्वर निर्गुण असल्याने त्यास सगुण स्वरूप घेता येते. तो अव्यक्त असल्याने व्यक्त होऊ शकतो. तो अनाशक असल्याने आश्रय देऊ शकतो. तो स्वतंत्र सर्वतंत्र असल्याने जगाला आपल्या ताब्यातही ठेवू शकतो. अशा या परमेश्वराचे निर्गुण स्वरूपाचे ध्यान व धारणादी क्रिया मनुष्य आपल्या भावनेने करीत असतो. याच भावनेने सर्व बाली देश शिवपूजक बनलेला आहे.

बाली देशात हिंदु धर्म कसा प्रस्थापित झाला याबद्दल बऱ्याच आख्यायिका आहेत. त्यांपैकी 'उषाण' यांची आख्यायिका सांगितली जाते ती अशी:

कुलपती हा मजपहित (मयपवित). त्याने बाली देशात येऊन 'विशाखी' मंदिराची मुख्य मंदिर म्हणून स्थापना केली, तेथे मंत्र पूजाअर्चा करण्यास तो स्वतः राहिला व त्याने पशुपतीस प्रसन्न केले. पशुपती प्रसन्न होऊन त्यांनी आपल्या दोन मुलांना तिकडे पाठविले शिवाय आपला महामेरु पर्वताचा एक भागही तिकडे पाठविला, त्या दोन अपत्यांची नावे बालीत महादेव व देवी दानू अशी ठेवली गेली व महामेरू गुणुंग आगुंग झाला. तेव्हापासून सर्व धार्मिक कृत्ये व पूजाअर्चा व्यवस्थित सुरू झाली.

एकदा बेडाहालू (Bedahalu) येथील मयदानव राजाने पूजाअर्चेस व धार्मिक कृत्यांत अडथळा आणण्यास सुरुवात केली. कुलपती विषण्ण झाला. त्याने महादेव व देवदानव यांची हा त्रास बंद करण्यास मदत मागितली. महादेवाने 'जंबुद्वीप'

(म्हणजेच सध्याचे हिंदुस्थान) येथील देवांना, इंद्र आणि इतरांना, पाचारण केले. स्वतःचा पिता पशुपती याचीही दैत्य मयदानव याचा पाडाव करण्यास मदत मागितली. महादेव, आलेल्या सर्व देवांना घेऊन, दैत्य मयदानव यांच्यावर चालून गेला व घनघोर लढाई करून त्यात त्याने दैत्यास ठार मारले. जेथे जेथे देव-दैत्यांच्या चकमकी व लढाया झाल्या ती ती सर्व ठिकाणे पवित्र मानली गेली. त्या त्या ठिकाणी देवळे बांधली गेली. पशुपतींनी नंतर स्वतः येऊन धर्मविधीची घडी बसविली व तो जंबुद्वीपास (हिंदुस्थानास) परत गेला. तेव्हा-पासूनच गुणुंग आगुंग हा महामेरू म्हणजेच कैलास पर्वताचा भाग समजला गेला. हा पर्वत बालीमधील सर्वांत उंच पर्वत होय. त्याच्या आग्नेयेस सर्वश्रेष्ठ अशा 'विशाखी' मंदिराची स्थापना झाली.


बालीतील देऊळ

'बाली हिंदू' हे आर्यपूर्वीच्या संस्कृतीप्रमाणे पूर्वजपूजक होते व त्याचाही त्यांनी आपल्या हिंदु धर्मात समन्वय करून घेतला. रोजच्या पूजेतही आपल्या-पेक्षा पूर्वजांना जास्त मान दिला. देऊळ बांधणीत व तेथील पूजाव्यवस्थेतही त्यांनी त्यांनाच अग्रमान दिला.

तेथील समाजरचना आपल्याप्रमाणेच चातुर्वर्णीय आहे. मंदिराची व्यवस्था, विधी, पूजाअर्चा यांचा मान ब्राह्मण पंडित म्हणजे तिकडच्या पेडंड वर्गाकडे आहे. यात दोन प्रकारचे पेडंड आहेत. एक पेडंड शिव व दुसरा पेडंड बोध. एक शैवपंथी व दुसरा बुद्धपंथी. यात फारसा फरक नसून त्याच्या साधनेमध्ये एक दक्षिणमार्गी व दुसरा वाममार्गी आहे. दोघांनाही अधिकार सारखेच.

आपल्याप्रमाणेच त्या देशात असंख्य देवळे आहेत. वैयक्तिके, घरोघरी, प्रत्येक गावी, महत्त्वाचे ठिकाणी, नदीकाठी, डोंगरावर अशा सर्व ठिकाणी देवळे आढळतात. काही राजाश्रयाची देवळेही आहेत. पण राष्ट्रीय अशी फक्त सहा देवळे समजतात. त्या देवळांना बालीमध्ये शद्-काह्यांगण (sad-kahyangan) म्हणतात. ही सर्व देवळे शिवाचीच आहेत. त्यांत सर्वश्रेष्ठ विशाखी मंदिर आहे. ही देवळे एका विशिष्ट हेतूने व वेगळ्या तऱ्हेने बांधली गेली आहेत. आपणाकडे निरनिराळ्या देवदेवतांनी, खंडोबा, ज्योतिबा, घाटुबाई-राजाई यांना प्राधान्य देऊन त्या मूर्तीभोवती देवालयाची इमारत बांधली जाते. पण बालीमध्ये गावातील अगर प्रदेशातील एखाद्या उंचवटयाच्या जागेला प्रतिविश्व समजून त्या ठिकाणी देवळे उभारली गेली आहेत. शिव, विष्णू वगैरेंची निरनिराळ्या जागांवर उभारणी केली आहे. त्याच जागेत पूर्वजांचे देऊळ, महाजपीत पुरुषाचे देऊळ, अशी अनेक देवळे एकाच ठिकाणी ठरलेल्या प्रतिविश्व भूमीवर सापडतात. विश्वरूपी महादेव हा विश्वकर्मा शिव होय. हा शिव अमूर्त, अदृश्य व अव्यक्त असा समजलेला आहे.

> **नानारूप विधाता त्वं भक्तानां ध्यान हेतवे ।**
> **येणु रूपेणु यत्प्रीतिस्तत्तद्रूपं विभर्षि च ॥**
> **त्वमीश्वरो गुणातीतो ज्योतिरूपः सनातनः ।**
> **प्रकृतः प्रकृतीशश्च प्राकृतः प्रकृते परः ॥**

सर्व देवालये आत रिकामी असतात ! काही देवळांच्या बाहेरील गाभ्यांतून देवाच्या मूर्तिरूपी दगडी कलाकौशल्याचे कोरीव काम असलेले पुतळे मांडलेले असतात. आपल्या देशात दिसतात त्याप्रमाणे शिवलिंग व शाळुंका तिकडच्या देवळांतून कोठेही दिसल्या नाहीत व नंदीचाही मागमूस कोठे आढळला नाही !

तेथील देवळांची वर्णने विस्ताराने सांगणे म्हणजे एक मोठा ग्रंथच होईल. प्रत्येक घराच्या आवारात एक लहानसे देऊळ बांधलेले असते. त्यात शिव, कुलपुरुष आणि पितर असे विभाग पाडलेले असतात. आपल्याकडील तुळशीवृंदावनाप्रमाणेच वरच्या बाजूस वृंदावनासारख्या आकृतीची बांधणी करतात. या वृंदावनाचा उपयोग तिथल्या कुटुंबातील व्यक्ती रोज सकाळी एका पानावर शिजवलेला

 शिधा, फुले असा नैवेद्य त्यावर ठेवण्याकरिता करतात. एरवी तेथे पूजाअर्चा

करीत नाहीत. त्यातही जे जास्त धार्मिक असतात ते आपल्या पेडंड ब्राह्मणाकडे जाऊन शुद्धीकरिता तोय तीर्थ घेतात. या पेडंडांची उत्पत्ती म्हणजे शिवदंड असलेला पंडित अथवा प्रदंड होय.

गावचे मंदिर इकडे मोठे असते. प्रादेशिक त्याहूनही मोठे असते. येथे इमारतीला महत्त्व नसून सबंध भूमीला व त्या परिसराला महत्त्व आहे. या पवित्र जागेत देवाचे निवासस्थान नसून ठराविक वेळेलाच ते देवांचे तात्कालिक वास्तव्यस्थान समजले जाते! मंत्र नैवेद्य वगैरे दिल्यावर देव त्या ठिकाणी येतात व मानवाशी संपर्क साधतात अशी बाली लोकांची समजूत आहे! म्हणून येथे देऊळ हे संपर्क-स्थान व मंत्र-पूजा हे संपर्कसाधन मानले जाते. त्या वेळेस तेथील लोक येथील वातावरणास उत्सवाचे स्वरूप देतात. असे उत्सव वर्षातून एकदा अथवा दोनदाच करतात. आपल्याप्रमाणेच येथेही संवत्सर शक मानतात व निर्यन पंचांगाप्रमाणे एका विशिष्ट तिथीस तो उत्सव साजरा करतात. शिवाय तेथे बाली प्रविष्ट दुसरे पंचांगही आहे. त्याचे २१० दिवसांचे वर्ष असते. म्हणून त्यांच्या सप्तांगा-प्रमाणे दुसरा उत्सव किंवा 'ओदलम' साजरा करतात, त्यावेळी भाताचा नैवेद्य देतात. गावातील शुभ कार्ये वगैरेही याच देवळातून पार पडतात. आपल्याकडे बहुतेक खेडेगावांतून काही अंशी अशाच तऱ्हेने जत्रा करण्याची पद्धत रूढ आहे.

बहुतेक लहानमोठी सर्व देवळे एका विशेष तऱ्हेने बांधलेली आहेत. मोठ्या देवळांचा परिसर मोठा असतो. या ठिकाणी स्वयंपाक करण्याची सोय, गर्दी मावण्याइतका सभामंडप, नृत्य व इतर ललितासारख्या मनोरंजन कार्यक्रमासाठी गोपुराची सोय केलेली असते. या परिसराचे तीन भाग पडतात. पुढील जंब, मधला जवतिबा व पाठीमागील मुख्य भाग जिराम. हे तिन्ही भाग निरनिराळ्या धर्मविधींकरिता वापरले जातात. बाहेरील बाजूस बऱ्याच ठिकाणी चौथरा बांधलेला असतो व दगडी पायऱ्या चढून गेल्यावर कलाकृती केलेले प्रवेशद्वार असते. हे प्रवेशद्वार वरच्या बाजूने उघडे किंवा अपूर्ण कमानींचे (split gate) बांधलेले असते. याला 'चंदीबंतर' म्हणतात.

आत शिरल्यावर एका कोपऱ्यात एक उंच मनोरा बांधलेला दिसतो. या मनोऱ्यास खुळखुळ (bale kulkul) म्हणतात. त्या मनोऱ्यात एक लाकडी फळी

बाली विशाखी मंदिर



असते. या लाकडाच्या फळीचा उपयोग घंटेसारखा करतात. हा आवाज खूप लांबवर ऐकू येतो. आपल्याकडील नगारखान्याशी या बाले खुळखुळचे साम्य दिसते. आपल्या देवळातील घंटेसारखी धातूची घंटा इकडे कोठल्याही देवळातून दिसली नाही. या घंटेचा उपयोग (लाकडी फळीचा) उत्सवाचे व इतर आणी-बाणीचे वेळी लोकांना इशारा देण्याकरिता केला जातो. देवळातून एका भागामध्ये एक खोली देवळाच्या मालकीच्या कोठारासाठी व दुसरी खोली वाद्यवृंद व ललित नृत्याकरिता लागणाऱ्या वस्तू ठेवण्याकरिता बांधलेली असते.



बाली पदुरक्षा

दुसऱ्या भागाचा उपयोग सभामंडप म्हणून केला जातो. त्यात एका बाजूस वाद्यवृंद बसण्याकरिता चौथरावजा बांधकाम केलेले असते. याच ठिकाणी नृत्य, ललित वगैरे इतर कार्यक्रम करतात. काही देवळांतून चंदीबंतरच्या बाहेरील जागेतही असा सभामंडप बांधलेला आढळतो.

पुढे गेल्यावर एक आवार लागते. त्याला कमानी दरवाजा असतो. या प्रवेशद्वारास 'पदुरक्षा' म्हणतात. दरवाजासमोरच थोड्या अंतरावर आतील

काही दिसणार नाही अशी एक भिंत असते. प्रवेशद्वार व भिंत यांमधून पलीकडे जाण्यास वेगळा मार्ग असतो. पदुरक्षेतून आत गेल्यावर डावे बाजूस एक दगडी खोली व बाहेर पडवी असते. त्यास 'तक्षू' म्हणतात. या तक्षूला या देवालयाच्या भूमीचा प्रतिविश्वरक्षक देव मानतात. पडवीत बरेच कोरीव पुतळे व मूर्ती ठेवलेल्या असतात. या तक्षूला लागूनच इतर देवळेही निरनिराळ्या देवांकरिता बांधलेली असतात. अर्थातच ती आत रिकामी व मूर्तीशिवाय असतात. अशीच मजपहिंत पूर्वपित्याकरिता, पूर्वजांकरिता आणि इतर पितरांकरिताही अनेक देवळे त्या परिसरात बांधलेली असतात. त्याचप्रमाणे ब्रह्मा, विष्णू, सूर्य यांची लहानमोठी देवळेही मूर्तीशिवाय असतात. काही देवळांचा फक्त चौथराच असतो. या देवळांना गवती छप्पर असते. पगोडाप्रमाणे एकावर एक अशी छपरे कळसवजा बांधण्याची पद्धत आहे. उत्सवाच्या वेळी या मोकळ्या चौथऱ्यावर तात्कालीन देवळे बांधतात. यावर पगोडाप्रमाणे गवताचे छप्पर बांधतात. नेपाळमधील पशुपतीचे मंदिर ज्यांनी पाहिले आहे त्यांना या कळसाची चांगली कल्पना येईल. या छपरी कळसांना मेरू म्हणतात. प्रत्येक देवाला ठराविक संख्येचे मेरू बांधण्याची पद्धत फक्त बालीमध्येच आहे. ईश्वराचे देवालयास पाच मेरू असतात, ब्रह्माचे देवळास सात, विष्णूचे देवळास नऊ व शिव किंवा महादेवाचे सर्वश्रेष्ठ देवास अकरा मेरूंचा कळस असतो. त्यामुळे आतल्या गाभाऱ्यात शिरल्यावर कोठल्या देवाचे हे मंदिर आहे हे लगेच लक्षात येते. ही मंदिरे चारी बाजूंनी कूर्मपृष्ठावर (कासवाचे पाठीवर) उभारलेली आहेत. आपल्याकडे फक्त सभामंडपात कासवाची प्रतिकृती असते.

या देवळांच्या आतल्या गाभाऱ्यांतच देवाचा नैवेद्य शिजविण्याकरिता एक पडवी बांधलेली असते. तसेच येणाऱ्या यात्रेकरूंकरिता नैवेद्य ठेवण्याकरिता म्हणून एक चौथरा असतो. तेथे ठेवलेला नैवेद्य देवास मंत्राने देऊन व तोच प्रसाद म्हणून यात्रेकरूंस परत देतात.

मध्यभागी एक चौकोनी देवालय असून त्यात अष्टपाळ म्हणून देवाच्या मूर्ती प्रत्येक दिशेस लावलेल्या असतात. पूर्वेच्या बाजूने दरवाजा असतो. उत्तरेस विष्णू, ईशान्येस शंभू, पूर्वेस ईश्वर, आग्नेयेस महेश्वर, दक्षिणेस ब्रह्मा, नैऋत्येस रुद्र आणि पश्चिमेस महादेव यांचे मूर्तीवजा देवाकृती पुतळे बाहेरील खांबावर दिसतात. मध्यभागी अमूर्त स्वरूपाचा शिव समजला जातो. या देवालयात (zenith) छपराचे दिशेस परमशिव व पाताळात सदाशिव असल्याचे मानतात. यालाच तेथे नवसंग म्हणून संबोधतात किंवा अकरा रुद्र असेही म्हणतात.

या चौकोनी देवालयाच्या आत कोणतीही मूर्ती नसते. बालीतील लोकांच्या व पेडंडच्या दृष्टीने जेथे देव अवतरतात तेथे कोठेही सगुण मूर्ती ठेवलेली नसते.



बाली शिव मंदिर–अष्टपाल

मात्र या मध्य नवसंग देवालयांमध्ये एक फरक दिसतो. पश्चिमेच्या कोपऱ्यात आतल्या बाजूस एका उंचवटयावर भिंतीत चौकोनी खांबवजा शिळा असते. काही देवळांतून त्या ठिकाणी लिंगाकृती दगडाची शिळा ठेवलेली असते व त्याच्याखाली भिंतीचा कोनाडा दिसतो. या कोनाडयात चंदन ठेवले जाते. या नवसंग जागेत (अष्टपाल आणि शिव) उत्सवाचा मुख्य सोहाळा होतो. पेडंड (मंदिराचे पुजारी) मंत्र, प्रार्थना यांच्या घोषाने अमूर्त, अव्यक्त अणि अदृश्य विश्वेश्वर शिव यांची, त्यास निर्गुण म्हणजेच अदृश्य स्वरूपातच मानवतेशी संपर्क देण्यासाठी, याचना व प्रार्थना करतात.

उत्सवाचा दिवस मोठा असतो. प्रत्येक देवळाचा उत्सव ठराविक निरनिराळ्या दिवशी ठरविलेला असतो. बालीतील पंचांगकर्ते आपल्या पंचांगासारखे शकसांवत्सरिक निर्यन पंचांग तयार करतात आणि तिथीवरून उत्सवाचा दिवस ठरवितात.

ज्या दिवशी उत्सव असतो त्या दिवशी आजूबाजूचे सर्व भाविक दुपारी या देवालयात येतात. येताना नैवेद्य शिजवून आणतात. काही वेळा देवालयाच्या आवारातच नैवेद्य शिजवितात. पेडंड ब्राह्मणही स्वतःच्या व देवालयाच्या वतीने आतल्या गाभाऱ्यात नैवेद्य शिजवितात. हा नैवेद्य देवालयातील ब्राह्मणाकडे

दिला जातो व तो शिवास अर्पण केला जातो. नैवेद्य गाभाऱ्यातील त्या 'पलंग' मंचकावर धूप, चंदन सुवासाने लक्षात येणाऱ्या दैवतास दाखवितात! दैवताने त्यातील 'सरी' ग्रहण केल्यावर नैवेद्य भाविकांना परत दिला जातो.

हा नैवेद्य सोहळा संपल्यावर लोक त्या दालनात येतात व तेथे विभूती देण्याचा सोहळा सुरू होतो. तेथे एक तोय तीर्थाने भरलेला रांजण असतो. तेथे ओणवे झालेल्या मंडळींवर पेडंड त्या रांजणातील पाण्याने भाविकांचे हात धुतात, दर्भाने डोक्यावर याच रांजणातील तीर्थ शिंपडतात, नंतर भाविकांच्या हातात तीन वेळा फुले देतात. या तोय तीर्थाचे भाविकांनी आचमन केल्यावर थोडे तीर्थ त्याच्या कपाळावर शिंपडतात, नंतर तांदूळ आणि कुंकू कपाळास लावतात. हा विभूतिविधी संपल्यावर भाविक परत सभामंडपात जमतात व तेथे नृत्य मनोरंजन कार्यक्रम पहातात. काही भाविक पुढे देवळाबाहेरील जत्रेमध्येही सामील होतात.

सर्वांत जागृत व सर्वोच्च दैवत हे बालीतील विशाखी मंदिर आहे. या मंदिराचा उत्सव कार्तिकी पौर्णिमेस करतात. या मंदिरात ब्रह्म, विष्णू आणि शिव या त्रिमूर्तीला विशिष्ट स्थान दिले गेले आहे. या मंदिरात जे तोय तीर्थ दिले जाते त्यास एक विशिष्ट अर्थ आहे. गुणुंग पर्वतापासून निघालेली नदी

बाली ललित नृत्य



या मंदिराजवळून जाते व या तीर्थास तोय सिंधुतीर्थ म्हणून समजतात. ही नदी आपल्या देशातील वैदिक सिंधु नदीचे प्रतीक आहे! दुसऱ्या एका देवळाजवळील नदीस गंगेचे प्रतीक मानले आहे.

तेथील धर्मकृतीत जे निरनिराळे उत्सव आणि धार्मिक कार्ये करतात त्यात मुख्य म्हणजे कार्तिकी पौर्णिमेस साजरा होणारा 'विशाखी' उत्सव. हा विशाखी उत्सव वृश्चिक संक्रमण ज्या महिन्यात होते त्या महिन्यातील पौर्णिमेस करतात. दुसरा 'नेपी' हा सोहळा विषुवदिव म्हणजेच मेष संक्रमण होते त्या चैत्र महिन्यात त्या दिवशी करतात. ही दोन्ही धर्मकार्ये दर वर्षी होत असतात. परंतु 'एकादश रुद्र' आपल्याकडे ज्याप्रमाणे आपण करतो तसा विधी तिकडे होत नसतो. दर शंभर वर्षांनी हा एकादश रुद्र तेथील महापंडित सभेच्या आदेशानुसार साधारणतः मार्च महिन्यात करतात असे समजते. हा एकादश रुद्र फक्त विशाखी देवळातच होत असतो. आपल्याकडे जितके यज्ञयाग होतात तितके तेथे अस्तित्वात नाहीत. परंतु ही संस्कृती आता बाली देशात पोहोचली आहे त्याचे प्रत्यंतर म्हणजे 'एकादश रुद्र' यज्ञ होय. हा यज्ञ विशाखी मंदिरात दर शंभर वर्षांनी केला जातो.

गेल्या दोनशे वर्षांत असा यज्ञ झाला नव्हता, त्यामुळे विशाखी मंदिरातील 'राजपुराण' या धार्मिक ग्रंथात सांगितल्याप्रमाणे तेथील महापंडितांनी, संस्थांनी व राज्यकर्ते यांनी तो ८ मार्च १९६३ फाल्गुन हुताशनी पौर्णिमा या तिथीस धरून करण्याचे योजले होते. त्याप्रमाणे या यज्ञाची सर्व तयारी करण्यात येत होती परंतु गंमत अशी की, १८ फेब्रुवारी १९६३ रोजी गुणुंग पर्वतातील ज्वालामुखी जागृत होण्याची लक्षणे दिसू लागली! तरीही या यज्ञाच्या तयारीत कोठलीच कमतरता केली नाही. ज्वालामुखी डोळ्यांसमोर दिसत असूनही ८ मार्च रोजी सर्व लोक जमा झाले व यज्ञ सुरू झाला. परंतु थोड्या वेळाने त्या पर्वतातून पिवळा झोत व आवाज येऊ लागला! लोकांनी त्याची पर्वा न करता यज्ञाचे उत्सवकार्य तसेच चालू ठेवले. यज्ञाचे पौरोहित्य करणारे महापंडित जत्रावजा जमलेल्या लोकांसमोर येऊन आश्वासने देऊ लागले. त्यातच मुख्य पंडित स्त्रीने दृष्टान्त झाल्याचे सांगितले, 'या ज्वालामुखीतून बाहेर पडणारी राख तोय तीर्थाप्रमाणे शुद्ध असून ती विशाखीच्या परिसरास पवित्र करणारी आहे.' जुन्या लोकांनीही माना डोलावल्या व पूर्वी १३५० साली असाच उद्रेक झाल्याचे सांगितले. त्यावेळी विशाखीच्या परिसरात शेतीची सुबत्ता झाली होती. तशीच ती आताही होईल अशी आशा दाखविली गेली. त्यामुळे यज्ञमंडपातून कोणीही हलले नाही किंवा मंदिर सोडून गेले नाही.
 परंतु उद्रेक वाढल्याने राज्ययंत्रणेने जत्रेस मागे हटविले. मात्र मंदिरातील यज्ञ

तसाच चालू ठेवला. संतप्त ज्वालामुखी वाढला तरी न घाबरता यज्ञ पूर्ण केला गेला! 'एकादश रुद्र' रौद्र स्वरूपात साजरा झाला.

या सर्व बेटांत शिव हेच दैवत मानले गेले आहे. पुरातन काळापासून हिंदु धर्माची वैदिक परंपरा किती दूरवर व किती खोलवर पसरली आहे याचे हे महत्त्वपूर्ण दृश्यस्वरूप बाली बेटात दिसून येते. याची सांगता बाली बेटात सापडलेल्या प्राचीन ताडपत्रीवरील पुढील स्तवनीत दिली आहे:

**महादेव स्तवन**

ॐ नमोस्तु ते महादेवं पीतवर्णं पीतांबरम् ।
पद्मासनं महादेवं शची देवां नमोस्तु ते ॥
महासूक्ष्मं महाकालं महासूक्ष्मं महाव्रतम् ।
महास्कंधं महाकायं नमोस्तु ते महादेवम् ॥
ब्रह्माविष्णुरीश्वरश्च महादेवं नमोस्तु ते ।
सर्वकार्यं प्रसिध्यंतां क्षमानुग्रहकारणम् ॥



# कथा-कहाण्या



अनुक्रम



# शिवलिंगाची पूजा

निवेदिका : **सौ. शरदिनी मोहिते**

एक आटपाट नगर होतं. तिथं एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याच्या घरी श्रावणातल्या अवसेच्या दिवशी बापाचं श्राद्ध असे. इकडे दर वर्षी काय होई, की ज्या दिवशी श्राद्ध त्या दिवशी सकाळपासूनच त्याच्या सुनेचं पोट दुखू लागे व ब्राह्मण जेवावयास बसण्याचे वेळी ती बाळंत होऊन पोर मरून जाई. असं झालं म्हणजे ब्राह्मण तसेच उपाशी जात. असं चागलं सहा वर्षं तरी झालं. पण सातव्या वर्षीही असंच झालं. तेव्हा सासरा रागावला. त्यानं ते मेलेलं पोर सुनेच्या ओटीत घालून तिला रानात हाकलून लावलं. पुढं जाता जाता ती एका मोठ्या अरण्यात गेली. तिथं तिला झोटिंगाची बायको भेटली. ती म्हणाली, 'बाई बाई, तू कोणाची कोण? इथं कशाला आलीस? आलीस तशी लवकर जा नाही तर माझा नवरा झोटिंग येईल व तुला मारून खाऊन टाकील.' तेव्हा ब्राह्मणाची सून म्हणाली, 'तेवढ्याकरिताच मी इथे आले आहे.' तशी झोटिंगाची बायको म्हणाली, 'बाई बाई, तू जिवावर इतकी उदार का?' म्हणून ब्राह्मणाची सून आपली हकिगत सांगू लागली, 'मी एका ब्राह्मणाची सून. दर वर्षी मी श्रावणी आवसेचे दिवशी बाळंत होते व मूल मरून जाते. त्याच दिवशी माझ्या आजेसासऱ्याचे श्राद्ध असते. माझं असं झालं म्हणजे श्राद्धाचे ब्राह्मण उपाशी जातात. अशी सहा बाळंतपणं माझी झाली. सातव्या खेपेसही असे झाले. तेव्हा मामंजींना माझा राग आला. ते म्हणाले, 'माझा बाप तुझ्या बाळंतपणामुळे सात वेळा उपाशी राहिला, तर तू घरातून चालती हो,' असे म्हणून मेलेलं मूल माझ्या ओटीत घालून त्यांनी मला हाकलून दिलं. नंतर मी इथं आले. आता मला जगून तरी काय करावयाचे आहे?' इतकं सांगून ती रडू लागली. तेव्हा झोटिंगाची बायको तिला म्हणाली, 'बाई बाई, तू भिऊ नको. घाबरू नको. अशी थोडी पुढं जा. तिथं तुला एक शिवाचं लिंग दृष्टीस पडेल.

बेलाचं झाड लागेल. तिथं एका झाडावर बसून रहा. रात्री नागकन्या, देवकन्या, सती, अप्सरा बरोबर घेऊन तिथं पूजेला येतील. पूजा झाल्यावर खीर पुरीचा नैवेद्य दाखवितील आणि अतिथी कोण आहे म्हणून विचारतील. असे विचारल्यावर मी आहे म्हणून सांग. त्या तुला पहातील. कोण, कोठची वगैरे म्हणून चौकशी करतील. तेव्हा तू सर्व हकिगत सांग.' ब्राह्मणाच्या सुनेनं 'बरं' म्हणून सांगितलं. तेथून उठली, पुढे गेली. तो तिथं तिनं एक बेलाचं झाड पाहिलं. तिथंच उभी राहिली. इकडे तिकडे पाहू लागली. तशी जवळच एक शिवलिंग दिसलं. म्हणून ती शेजारच्या झाडावर बसून राहिली. इतक्यात रात्र झाली. तशी नागकन्या, देवकन्या, अप्सरा अशा स्वाऱ्या आल्या. त्यांनी शिवलिंगाची पूजा केली. नैवेद्य दाखविला आणि अतिथी कोण आहे म्हणून विचारले. त्याबरोबर ही खाली उतरली व म्हणाली, 'मी आहे.' तेव्हा सगळ्यांनी मागं पाहिलं, त्यांना आश्चर्य वाटलं. हिची कोण कोठली म्हणून चौकशी केली. हिनं सर्व काही सांगितलं. नागकन्या, देवकन्यांनी आणखी चौकशी केली. तेव्हा अप्सरांनी पण विचारपूस केली. पुढ त्यांनी तिच्या साती मुलांना जिवंत केलं आणि तिच्या हवाली केलं. नंतर तिला एक व्रत सांगितलं. चौसष्ट योगिनींची पूजा करण्यास सांगितली. आणि मृतलोकी हे व्रत प्रकट कर म्हणाल्या. तिनं विचारलं, 'यानं काय होतं ?' अप्सरांनी सांगितलं, 'हे व्रत केलं म्हणजे मुलंबाळं दगावत नाहीत, सुखात रहातात.' नंतर ती त्यांना नमस्कार करून व 'बरं' म्हणून निघाली. आपल्या गावी आली. लोकांनी तिला पहाताच ब्राह्मणास जाऊन सांगितले. 'भटजी भटजी, तुमची सून घरी येत आहे.' त्याला ते खोटं वाटलं. अर्ध्या घटकेन पाहू लागला, तो मुलंबाळं दृष्टीस पडू लागली. पाठीमागून सुनेला पाहिलं तसा उठला. घरात आला. मूठभर तांदूळ व तांब्याभर पाणी आणलं. तांदूळ सून व मुले यांचेवरून ओवाळून टाकून दिले. हातपाय धुऊन घरात आला. सर्व काही सुनेला विचारलं. तिनं सर्व नीट सांगितलं. सर्वांना आनंद झाला आणि मुलाबाळांसुद्धा ती सर्वजण नीट नांदू लागली. ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफल संपूर्ण झाली.





# मधुर मीलन

निवेदिका : **सौ. शरदिनी मोहिते**

शंकराच्या घरी एक दिवस असा उजाडला की, त्याच्या दारातील नंदीच्या पाठीवर गौरी उभी राहिली. तिनं नंदीला जागोजाग फिरवून झाडावरची सुंदर फुलं तोडली. काही हाताला येतील ती गोळा पण केली. त्या फुलांपैकी चांगल्या फुलांचा गजरा करून तिनं आपल्या वेणीत घातला. उरलेली कसलीबसली फुलं कुरापत काढावी म्हणून तिनं आपली सवत गंगा हिच्या महालात गड्याजवळून पाठवून दिली.

गंगा बिचारी निर्मळ मनाची. प्रेमळ अंतःकरणाची. कधी कुणाच्या वाटेला जायची नाही. कधी कुणाची आपण होऊन कुरापत काढायची नाही. पण भारी स्वाभिमानी. कुणी डिवचलं तर मात्र गप्प रहायची नाही. शंकराची लाडकी म्हणून गौरीचा तिनं कधी राग केला नाही. पण आता तिनं असली फुलं पाठविल्यावर मग मात्र तिला वाईट वाटलं. फुलांचं निमित्त करून भांडण काढणाऱ्या गौरीचा तिला थोडा राग आला. आपल्यावर वरचढपणा करण्यासाठी तिनं काढलेल्या या युक्तीमुळं ती नाराज झाली. ती फुलं तशीच माघारी देऊन तिनं गौरीला विचारलं, 'सुकलेली, कसलीबसली फुलं धाडणारी तू कोण आहेस? चुरगळलेली फुलं देणारी तू कोण आहेस? चांगली फुलं फार नसतील तर असतील तेवढीच एकमेकींत वाटून घेऊ या!'

हे ऐकून गौरी फार संतापली. आगीत तेल ओतावं तसं झालं. तिला पाहिजे होती ती वेळ चालून आली. तिखटपणानं गंगेवर डोळे फिरवीत तिनं विचारलं, 'माझ्या बरोबरीनं वाटणी मागणारी तू ग कोण एवढी? तू का माझी बरोबरी करणार?'

गंगा शांत मन राखून म्हणाली, 'मी जर तुझ्या बरोबरीची नसते तर महादेवांनी मला इथं आणलीच असती कशाला? सांग ना ग ताई, जग त्यांना कोणत्या नावानं ओळखतं? गंगाधर म्हणूनच ना?'

गौरीचा तोल सुटला. दातओठ खात तिनं गंगेच्या छातीत लाथ मारली! पण गंगेनं मनाची शांतता ढळू दिली नाही. स्वतःला सावरून मातीत बसत ती म्हणाली, 'ताई, तुझ्या पायानं जी धूळ आता झडली आहे, ती जमवून तिच्या सडका तयार करीन. बाळ वीरभद्रासाठी सुंदर किल्ला तयार करीन. सुनेसाठी महाल बांधीन. नंदीला विसावा म्हणून ओटा बांधीन. महादेवांच्या पूजेसाठी सिंहासन करीन, आणि तुला व मला बरोबरचे चांगले मंत्रक निर्माण करीन.'

गंगेच्या तोंडून पुन्हा बरोबरी बाहेर आल्यावर गौरीच्या तळपायाची आग मस्तकात शिरली. ती खवळून उठली. तिनं गंगेच्या दातांवर जोरानं लाथ मारली. गंगेचे दात पडले. रक्त भळाभळा बाहेर आलं. तरीही बिचारी शांत राहिली. नम्रतेने म्हणाली, 'ताई, तुझ्या पायाच्या धक्क्यानं झडलेली फळं बसल्या बसल्या झेलून घेईन. उभी राहून भांड्यात ठेवीन. राहिलेली तोडून आणीन. मग आपण दोघी मिळून ती सर्वांना देऊ या. तू मोठ्यांना दे. मी लहानांना देईन.'

पण गौरीच्या मनावर याचा काही परिणाम झाला नाही. तिच्या मनात सवतीबद्दलचा भडकलेला राग वाढतच होता. फणकाऱ्यानं भुवया उडवीत तिनं विचारलं, 'अग, पण माझी बरोबरी करणारी तू कोण? लाज नाही वाटत माझी बरोबरी करताना?'

गंगा बिचारी अजूनही शांतच होती. आपल्या महालाकडे निघून जाताना तिनं हिला एवढंच सांगितलं, 'मी कोण? महादेवाची लाडकी राणी, तुझी धाकटी बहीण. जर बरोबरीची नसते तर इथे आलेच कशी असते ग?'

गौरीच्या अंगाचा थरकाप उडाला. गंगा निघून गेली तरी ती रागातच. तिचं तोंड अखंड चालू होतं.

त्यानंतर दुसऱ्या दिवशी असं झालं की, गौरी बाहेरची बसली. गंगा जलराणी होती. तिला हे समजताच तिनं जगातलं सारं पाणी लपवून ठेवलं. मोठी तळी, विहिरी, नद्या, समुद्र या साऱ्या ठिकाणी पाण्याचा टिपूसही उरला नाही! गौरीला तर डोक्यावरून आंघोळ करावयाची होती. पण पाणी कुठंच दिसेना. ती घाबरून गेली. आपल्या मुलाला, वीरभद्राला बोलावून ती म्हणाली, 'बाळ, केवढं रे आश्चर्य? पाणी गेलं कुठं? एक थेंबही कसा कुठं दिसत नाही? जरा जाऊन शोध कर. पाणी मिळतं का पहा बरं?'

आईची आज्ञा होताच वीरभद्र शस्त्रास्त्रानिशी बाहेर पडला. कोपरा न् कोपरा हिंडून त्यानं सारी दुनिया पालथी घातली. पण पाणी कसलं ते गवसेना! बिचारा थकून भागून अपयश पतकरून माघारी आला. करणार काय दुसरं?

गौरीनं ओळखलं, हा सारा सवतीचा खटाटोप असावा. माझा बदला घेते काय? पण म्हणावं 'मी शरण यायची नाही. वाटेल ते कर.' तिचा गर्व

उफाळून वर आला. तिनं अपल्या बापाकडे, दक्षाकडे, वीरभद्राकरवी निरोप धाडला. 'आजोबांना म्हणावं, आईनं चार दिवस आंघोळ केली नाही. तिला त्यासाठी पाणी हवं आहे. महादेवाची पूजा तिनं सोडली आहे. स्नानाखेरीज पूजा व्हावी कशी? म्हणून पाण्यासाठी मला आपणाकडे धाडलं आहे.'

झालं. वीरभद्र आजोबांकडे गेला. मुलीची ही अवस्था बघून प्रजापती दक्षाला वाईट वाटलं. तो स्वतः पाण्याच्या शोधासाठी निघाला. पण त्यालाही अपयश आलं. गंगेच्या कारस्थानाबद्दल तोही म्हणाला, 'महादेवानं डोक्यावर घेतलेली ही कालची पोर! हिचा दिमाख एवढा! माझ्या पोरीशी एवढी मस्ती? पाणी नाही तर नाही. माझी मुलगी दुधानं आंघोळ करील. महादेवाची पूजा दुधा-तुपानं करील. कावडी भरून दही, दूध, तूप पाठवितो. आहेस कुठं म्हणावं?'

त्यानंतर दुधा-तुपाचा कावडीनं महाल भरून गेल्यावर गौरीनं त्याचीच स्नान पूजा केली. पण त्याचा परिणाम वेगळा झाला. डास, मुंग्यांनी तिचा जीव हैराण केला. साऱ्या अंगाचा आगडोंब उसळून गेला. त्यामुळे वीरभद्राला तिनं महादेवाकडे धाडलं. पण गंगेकडे जाऊन तिची क्षमा मागायला ती तयार होईना.

मुलानं ही सर्व हकिगत सांगितल्यावर महादेव म्हणाले, 'बाळ, अरे माझ्याकडे कशाला आलास? तुझ्या आईपेक्षा माझ्याजवळ अधिक ते काय आहे? गौरी सर्व व्रतांची मुख्य. तशीच पाण्यावरची एकमेव अधिकारी गंगा. तिच्याशी भांडण्यापेक्षा तुझ्या आईनं मिटतं घेऊन वागावं. मी काय करणार? जा, आईला म्हणावं की, गंगेची क्षमा माग. तिची मनधरणी कर.'

वीरभद्र आईकडे हा निरोप घेऊन आला. पण गौरीला तो पटला नाही. गंगेकडे जायचं तिनं साफ नाकारलं. तिनं वीरभद्रालाच तिच्याकडे धाडला. बिचारा फिरून थकला. आईसाठी गंगेकडेदेखील गेला.

गंगेनं त्याला जवळ घेऊन विचारलं. 'काय हवं बाळ?' त्यावर वीरभद्रानं सर्व काही झालं गेलं तिला सांगितलं. तशी ती म्हणाली, 'अरे, तुझ्या आईपेक्षा मी कशात श्रेष्ठ? तिच्यापुढं माझा तो काय पाड? पाणी कुठं गेलं मला काय माहीत?'

वीरभद्र भडकला. गंगेला मारण्याची त्यानं धमकी दिली. पण शहाणी गंगामाई फक्त हसत राहिली. रागावली नाही. भ्याली नाही.

शेवटी पराजय कबूल करून गौरी हातपाय आपटीत पुढं वीरभद्र, मागं गणेश आणि स्वतः मध्ये अशी गंगेकड गेली.

गौरी येत आहे असे दिसताच गंगा तिच्या स्वागताला उठली. गर्विष्ठ सवतीचा नक्षा उतरावा म्हणून तिनं वाटेत कच्च्या माशांच्या पायघड्या घातल्या. सुक्या पानाफुलांच्या कमानी उभारल्या. मेलेल्या बेडकांच्या वासाचा सडा घातला.

मेलेल्या माशांच्या वासाचं पाणी प्यायला ठेवलं. आणि गौरी येताच सामोरी होऊन ती म्हणाली, 'अं! आज ताईसाहेब इकडे कुठं?'

गौरी आता वरमली होती. आपली दुर्दशा सांगून तिनं पाण्यासाठी गंगेजवळ पदर पसरला. ती म्हणाली, 'माझा मुलगा वीरभद्र देईन तुला. पण पाण्याचा पत्ता सांग.'

'अग बाई! तो तर माझाच मुलगा! पाणी बिणी मला नाही माहीत!' गंगेनं खुलासा केला.

'माझी सून तुला देते. पाणी कुठाय सांग.'

'अग, ती तर माझीच सून! . . . ताई, पाणी मला नाही बाई ठाऊक.'

'माझ्या मौल्यवान साड्या तुला देते. सांग, पाणी कुठाय ते सांग.'

'अं! मला भरपूर साड्या आहेत!'

'बरं बाई माझे सारे दागिने देते. कुठं आहे पाणी?'

'मला काय दागिने नाहीत की काय?'

'हे बघ, माझं सर्वस्व म्हणजे शिवदेव. तर तेही तुला देते. मग तर झालं? आता तर दाखवशील पाणी?'

'ताई, हे दिले वचन आता फिरवू नकोस. याला साक्षीला कोण ठेवतेस?'

'साक्षीला? जमीन आणि आकाश! दोन्हीही. खेरीज समोरचे हे भले अर्जुन नि बिल्ववृक्षही आहेत. शिवाय सर्व देवदेवतांनाही साक्षी ठेवते. मग तर झालं?'

गौरीचं असं आश्वासन मिळताच गंगा आनंदली. तिनं क्षणार्धात जिकडे तिकडे पाणीच पाणी करून सोडले. नद्या, विहिरी, तळी, समुद्र पाण्याने तुडुंब भरले. उभ्या दुनियेत नवचैतन्य निर्माण झालं.

गौरीनं मनसोक्त स्नान केलं. पूजेची तयारी केली. शंकर मनातून आनंदित झाला. आपण होऊन तो गौरीच्या महालाकडे गेला. अपमानानं भाजून गेलेल्या गौरीच्या मनात शंका आली, 'ह्या खटाटोपीत ह्यांचा पण हात असावा.' म्हणून शिवदेव येताच तिनं दरवाजा बंद करून घेतला. गंगेनं शिवाला हाताला धरून स्वतःच्या महालाकडे नेलं. जाताना ती म्हणाली, 'गौरीताई, अग तू दार बंद करून घेऊन माझं काम सोपं केलंस. ऐकावं भगवन्, ताईनं तुम्हांला मला देऊन टाकलंय. आणि याला साक्षीदार जमीन, आकाश, अर्जुन व बिल्ववृक्ष आणि साऱ्या देवता आहेत. आता आपण माझ्या महालात चलावं. तुम्ही सर्वस्वी माझे झालात.'

अखेर गंगेला व गौरीला एकत्र बोलावून महादेवांनी त्या दोघीत समेट घडवून आणला. तेव्हापासून त्या दोघी बहिणीबहिणीप्रमाणं सुखासमाधानानं वागू लागल्या.

आमची कहाणी संपली. तिनं स्वर्गलोकीची गोष्ट दिली. ✾ ✾



# घृष्णेश्वर (दंतकथा)

निवेदिका : **सौ. मालतीबाई दांडेकर**

[१] एकदा सारिपाट खेळत असता पार्वतीने डाव जिंकला व श्रीशंकर हरले. तेव्हा ते रुसून गोदावरीच्या परिसरातील काम्यवनात येऊन बसले. तेव्हा त्यांना भिल्लिणीच्या रूपाने पार्वतीने वश करून घेतले. ते काम्यवन म्हणजेच वेरूळ व त्याच्या आसपासचा भाग. याच ठिकाणी एक शिवतन नावाचे तळे आहे. पार्वतीला तहान लागली म्हणून प्रत्यक्ष शंकरांनी पाताळात त्रिशूल खोचून भोगावती नदीचे पाणी वर आणले तेच हे तळे. त्याच वेळी पार्वती डाव्या तळहातावरची केशराची उटी मळीत असता त्यातून एक लिंग उत्पन्न झाले तोच हा घृष्णेश्वर. घृसुण म्हणजे केशर, त्यातून उत्पन्न झाला तो घृसुणेश्वर. त्याचेच छोटे सोपे रूप घृष्णेश्वर.

[२] एकदा सुधर्म नावाच्या ब्राह्मणाला मूल होईना, तेव्हा त्याची पत्नी सुदेहाने त्याचे दुसरे लग्न स्वतःच लावून दिले. या दुसऱ्या बायकोचे नाव होते धुसुमा. तिला लवकरच मुलगा झाला. त्यामुळे ब्राह्मणाचे प्रेम तिच्यावर व तिच्या मुलावरच जास्त जडले. याचा त्या सुदेहाला इतका संताप झाला की, तिने त्या मुलाचा झोपेतच वध केला. बिचाऱ्या धुसुमेला ह्याचा काहीच पत्ता नव्हता कारण यावेळी ती व तिचा पती मातीची शिवलिंगे करून पूजा करण्यात गुंतलेली होती. पूजा चालू असतानाच कुणी तरी धुसुमेला ही दुष्ट वार्ता येऊन कळविली. पण ईश्वरपूजेतून ती दोघेही उठली नाहीत. ही मातीची लिंगे धुसुमा पूजेनंतर एका खड्ड्यात टाकीत असे. तेथेच त्या दुष्ट सुदेहाने तिच्या पुत्राचा देह टाकून दिला होता. धुसुमेचा भक्तिभाव पाहून महादेव प्रसन्न झाला व त्याने तिच्या पुत्रास जिवंत केले. मुलगा व आईवडील भेटले तीच ही घृष्णेश्वर देवालयाची जागा. धुसुमाने प्रार्थना केली, देवा आपण येथेच रहावे अशी इच्छा आहे. तेव्हा शंकर प्रकट झाले व तथास्तु म्हणाले. धुसुमेश्वर हे नाव घेऊन ते तेथे राहिले. धुसुमेश्वर नावाचेच हे दुसरे रूप घृष्णेश्वर होय. 




निवेदक : **डॉ. ग. मो. पाटील**

गौतम बुद्धाच्या वेळी लाल दगडात कळसापर्यंत हे देऊळ कोरले गेले आहे. त्यावर ३३ कोटी देवांच्या मूर्ती कोरल्या आहेत. त्यास फक्त सभामंडपात दोन बोट रुंदीचा चिरा आहे. पूर्वेकडे पिंडीचे तोंड असून महाद्वार दक्षिणेस आहे. कळसावरील महादेवाची मूर्ती वाघावर बसलेली आहे. रात्री १२ नंतर चिरा एकीकडे होऊन त्यातून एक वाघ महादेवाच्या दर्शनास येतो. बाहेर त्याची चाहूल येते आणि वास सुटतो. तसेच मंत्राप्रमाणे घुरघुरण्याचा आवाज येतो. तो परत गेल्यावर चिरा जसा होता तसा बसतो.

मुसलमानांच्या काळात गाईचा छळ आणि वध होई. नंदिनीने महादेवास नवस केला. तिने महादेवाच्या पिंडीवर खूर ठेवून स्वतःच्या दुधाने महादेवास न्हाऊ घातले. ते चार खूर अजून पिंडीवर दिसतात.

शिवरात्रीच्या रात्री अभिषेकाच्या उदकाचे वाहल्यावर दूध होते, आणि नंदिनी आपला नवस पूर्ण करते.

कळसावरील महादेवाच्या मूर्तीपर्यंत जाण्याचा रस्ता फक्त दररोज दर्शनास येणाऱ्या वाघासच माहीत आहे. तो चिऱ्याखालून आहे.



# काशी विश्वेश्वर

निवेदिका : श्रीमती लक्ष्मीबाई बंगाळे

तुळजापूर गावात एक देवीचा भक्त होता. तो पूजाअर्चा नियमाने करीत असे. त्याची भक्ती पाहून देवी त्याला केव्हा केव्हा दर्शन देत असे. एकदा काशीला जाऊन येणाऱ्या लोकांची व त्याची भेट झाली. काशीहून जाऊन येणाऱ्या लोकांनी त्याच्याजवळ काशीतील विश्वेश्वराचे व भागीरथीचे फार वर्णन केले. हे सर्व ऐकताच त्याला आताच्या आता काशीला जाऊन यावेसे वाटले. परंतु देवीची आज्ञा घेतल्याशिवाय जायचे कसे ? म्हणून त्याने भीत भीत जगदंबेला विचारले, 'हे अंबे, मला काशीला जायचे आहे, तेव्हा परवानगी दे, विश्वेश्वराचे दर्शन व भागीरथीचे स्नान करण्यासाठी जीव तळमळतोय माझा.' हे ऐकून देवी म्हणाली, 'तुळजापूर हीच काशी आहे. गायमुखाखाली स्नान केले, म्हणजे भागीरथीचे स्नान केल्यासारखे होईल.' हे ऐकून भक्ताच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याच्या डोळ्यांपुढे काशीच दिसत होती. म्हणून त्याने परत तोच प्रश्न देवीला केला. तेव्हा मात्र देवीने त्याला काशीला जा म्हणून सांगितले. मात्र जाताना माझा एक निरोप घेऊन जा म्हणून सांगितले. हे ऐकून त्याला फार आनंद झाला. जाताना निरोप घेण्यासाठी देवीजवळ आल्यावर देवीने त्याच्याजवळ एक नारळ, हातभर वेताची छडी व गजरा एका ठिकाणी बांधून दिला व सांगितले की, 'तू जेव्हा भागीरथीच्या स्नानाला जाशील तेव्हा हा नारळ, छडी व गजरा तुळजापूरच्या देवीने दिला आहे असे सांगून नदीत सोडून दे.' त्यावर 'बरं!' म्हणून हा भक्त काशीला जावयास निघाला.

मग तो भक्त काशीला गेला. विश्वेश्वराचे दर्शन घेतले. भागीरथी नदीत जाऊन स्नान केले व देवीने सांगितल्याप्रमाणे दिलेला नारळ नदीत सोडून दिला. हा सर्व सोहळा संपल्यावर तो परत तुळजापूरला आला. आल्याबरोबर देवीच्या देवळात दर्शनासाठी आला. तेव्हा देवी म्हणाली, 'गायमुखाखाली स्नान करून

मगच ये.' त्याप्रमाणे तो गायमुखाखाली आंघोळीसाठी गेला व ओंजळीत पाणी धरण्यासाठी ओंजळ धरली तर त्याच्या हातात तो नारळ, फुलांची माळ व वेताची छडी पडली! हे सर्व पहाताच त्याला पश्चात्ताप झाला. खरोखरच मला देवीने सांगितले होते की, गायमुखाखाली स्नान केले असता भागीरथीचे स्नान केल्यासारखे होईल. आपण देवीचे ऐकले नाही हे चुकले. त्याची चूक त्याला कळून आली म्हणून तो अत्यंत निराश होऊन देवीच्या दर्शनासाठी गेला, तोच देवी त्याला म्हणाली, 'आता माझ्या दर्शनाला येऊ नकोस.' पण भक्ताने देवीला हात जोडले, अपराधाची क्षमा कर म्हणाला. तेव्हा मग देवीने त्याला सांगितले, 'तू फक्त दर मंगळवारीच माझ्या दर्शनाला येत जा.'





# सासुरे येथील महंकाळेश्वर

निवेदक : **श्री. दा. गो. बोरसे**

सोलापूर जिल्ह्यात बार्शीपासून चौदा मैलांवर वैराग हे ठिकाण आहे. आणि तेथून एक मैलावरच 'सासुरे' नावाचे एक छोटेसेच पण धनधान्यांनी समृद्ध असे गाव आहे. या गावाजवळून 'नागझरी' नावाची नदी वाहात जाते. या छोट्याशा टुमदार गावी 'महंकाळेश्वर' नावाचे लिंगायत दैवत प्रसिद्ध आहे. हे दैवत अद्यापही जागृतावस्थेत आहे. या गावाच्या सीमेच्या परिसरात जेवढी शेते आहेत, त्यांपैकी एकाही शेतात अद्याप विहीर नाही. विहीर खणण्याचे प्रयत्न झाले. पण उपयोग झाला नाही. एकदा तर विहीर खणली आणि त्यावर मोट धरली. पण दैवदुर्विलास असा की, ती मोट, बैल आणि मोटकरी सर्व त्या विहिरीत गडप झाले. कारण विहिरीचा 'वरवंटा' एकदम ढासळला. असे आणखी एकदोन प्रकार घडले. एका शेतकऱ्याने तर अट्टाहासाने विहीर खणली, मोट धरली, शेताला पाणी दिले, पण दुर्दैवाने एका महिन्याच्या अवधीत त्याचे कुटुंबच्या कुटुंब नष्ट झाले. तदनंतर मात्र विहीर खणण्याचा अद्यापपर्यंत कोणीही प्रयत्न केला नाही.

महंकाळेश्वर नामक जे दैवत आहे, ते जागृत आहे. साप चावलेला माणूस या देवालयाच्या गाभाऱ्यात आणल्याबरोबर नगारे मोठमोठ्याने वडवून देवाची आरती करतात आणि देवाला जागृत करतात. नंतर त्या सर्पदंश झालेल्या इसमास कडुलिंबाच्या पाल्याचा रस पाजतात आणि देवालयासभोवती प्रदक्षिणा घालावयास लावतात. शिवाय चमत्कार असा की, अवघ्या अर्ध्या तासाच्या उपचारानंतर सर्व विष उतरते आणि तो माणूस पूर्ववत होऊन हसतखेळत गप्पा मारायला लागतो.

महंकाळेश्वराची यात्रा कार्तिक पौर्णिमेस भरते. अद्यापही तेथे सर्प चावलेले लोक जातात आणि बरे होऊन येतात.





# नवशीचा गोटेश्वर

निवेदिका : **सौ. कुमुदिनी पवार**

कुलाबा जिल्ह्यातील गोरेगावापासून सुमारे ३-३½ मैलांवर नवशी या नावाचे एक खेडेगाव आहे. तेथे गोटेश्वर या नावाचे शंकराचे एक स्वयंभू लिंग असून, त्याबद्दल पुढीलप्रमाणे आख्यायिका तेथील व आजूबाजूच्या गावांतील गावकरी सांगतात.

नवशीची हद्द नांदवी या गावाला लागून आहे. नांदवी येथील कारभार पेशव्यांतर्फे कोकणे आडनावाच्या घराण्याकडून चालत असे. या कोकण्यांचा मोठा चौसोपी वाडा नांदवी येथे १५-२० वर्षांपूर्वीपर्यंत सुस्थितीत होता. आता तो पडून गेला आहे. या कोकण्यांकडे नवशी गाव खोती हक्काने होता. त्यांची बरीचशी गुरे असत आणि ती नवशीस चरावयास जात असत.

त्या कोकण्यांची एक गाय नुकतीच व्याली होती. ती गाय भरपूर दूध देणारी होती. पण काही दिवसांनी असा प्रकार घडून आला की, संध्याकाळी चरून आल्यावर गाईची कास रिकामी असल्याचे आढळून येऊ लागले. ती गाय संध्याकाळी वासरालाही पाजीना की दूधही देईना. तेव्हा गुराखीच त्या गाईचे दूध काढून पीत असावा, असा त्या कोकण्यांना संशय वाटू लागला. पण गुराखी शपथेवर नाही म्हणे. मग गाईचे दूध जाते कोठे? शेवटी, एक दिवस गुराख्यावर पाळत ठेवावयाचे ठरवून, गुराख्याच्या नकळत पाठीमागून एक मनुष्य पाठवला. पण त्याला गुराखी दूध काढताना मुळीच आढळला नाही. पण गाईची कास मात्र रोजच्यासारखीच रिकामी झालेली दिसून आली.

मग दुसऱ्या दिवशी त्या गाईवरच पाळत ठेवली. ती गाय एका झुडपाआड जाऊन तेथे आपल्या चारी आचळांतून दुधाच्या धारा सोडीत उभी असल्याचे आढळले. तेव्हा तेथे काय आहे याबद्दल कुतूहल निर्माण झाले व श्रीमंत कोकणे यांच्या अनुज्ञेने तेथे खणून पहाता शंकराचे स्वयंभू लिंग असल्याचे आढळून आले.

तेथून ते लिंग खणून काढावे व चांगल्या प्रशस्त जागी त्याची स्थापना करून देऊळ बांधावे म्हणून ते लिंग तेथून उखळण्याचा खूप प्रयत्न केला, पण त्यात यश न येता त्या लिंगातून रक्ताच्या धारा मात्र वाहू लागल्या ! मग ते लिंग खणून काढण्याचा नाद सोडून देऊन ते लिंग सापडले होते त्याच जागी एक लहानसे देऊळ बांधले.

सध्या त्या जागी नवशीच्या गावकऱ्यांनी एक साधारणसे देऊळ पुन्हा बांधले आहे. हा स्वयंभू गोटेश्वर नवसाला पावतो अशी आजूबाजूच्या गावच्या लोकांची श्रद्धा आहे. खणताना कुदळीने वार बसून रक्त वाहात होते ती खूण अजूनही स्पष्ट दिसते !





# अमेणीचा केदारलिंग

निवेदक : **डॉ. जी. व्ही. तगारे**

अमेणी हा छोटा गाव कोल्हापूरकडील शाहूवाडीच्या उत्तरेला पाच मैल अंतरावरील डोंगरावर वसला आहे. या गावात सहा वाड्या असून गावाच्या मध्यवर्ती ठिकाणी जी आठ-दहा घरे आहेत, त्या वस्तीला 'अमेणी' गाव म्हणतात. या ठिकाणी पूर्वी घनदाट अरण्य असे व त्यात हिंस्र पशूंचा भयंकर उपद्रव असे. असे असूनही एक वाणी आपल्या बैलांच्या उदरनिर्वाहाकरिता येथे येऊन राहिला होता. सदर ठिकाणी चरावयास म्हणून बिळाशी (जि. सांगली) येथील महाराची गाय येत असे. परत जाते वेळी ती हंबरून एका दगडाच्या मूर्तीवर दुधाची धार सोडीत असे.

एके दिवशी काही कारणामुळे गाय घरी आली नाही. म्हणून तो महार गाईच्या शोधार्थ येथे आला. गाईने दुधाची धार आपण होऊन सोडल्याचे पाहून त्याने त्या ठिकाणचा पालापाचोळा बाजूला करताच आत दगडाची मूर्ती आढळली.

ही बातमी सगळीकडे पसरताच देवाच्या भक्तीसाठी भणग्याच्या वाडीचे, येडेकरवाडीचे, खोग्याच्या वाडीचे असे निरनिराळ्या गावांहून लोक आले. मूळगाव महार व गुरव हे सेवेला राहिल्यामुळे वसला. देवावर प्रथम गवताचे छप्पर होते. पण कालांतराने त्याचे छानदार मंदिर झाले. देवांची मोठी यात्रा चैत्र पौर्णिमेला व छोटी यात्रा आश्विन शुद्ध तृतीयेला भरते.






निवेदक : **श्री. दत्तात्रेय दामोदर जोशी**

बेळगाव शहरापासून बारा मैल अंतरावर बेळगावच्या पश्चिम दिशेला श्रीवैद्यनाथाचा सुप्रसिद्ध डोंगर आहे. या डोंगरावर आयुर्वेदशास्त्री वैद्य लोकांना दुर्मिळ अशा सुंदर वनस्पती सहज उपलब्ध होतात. सर्वसामान्य लोक या डोंगरास वैजनाथाचा डोंगर म्हणतात.

या डोंगरावर उंच अशा सपाट जागेवर श्रीशंकराचे एक फार पुरातन असे देऊळ आहे. या देवळाचा दर वर्षी माघ वद्य १४ ला मोठा उत्सव साजरा होतो. पंधरा-वीस हजारांचा जनसमुदाय या उत्सवाचे वेळी जमलेला असतो. या जत्रेच्या दिवशी म्हणजे महाशिवरात्रीचे दिवशी मध्यरात्री एक अघटित घटना घडते असे लोक म्हणतात. ही घटना अशी की, मध्यरात्रीचे वेळी अमावास्येच्या अंधाऱ्या रात्री डोंगरातून एक वाघ गुपचूपपणे श्रीशंकराच्या देवळात नंदीपाशी येतो व तेथे पुढचे दोन्ही गुडघे जमिनीवर टेकतो. नंतर आपले डोके श्रीशंकराच्या पिंडीपुढे लववून तो चटकन क्षणार्धात दाट जंगलात निघून जातो व तेथे तो अदृश्य होतो.





# भाग्य उजळलं

निवेदक : श्री. भगवान देशमुख

फार वर्षापूर्वी एका गावात एक पारधी र्‍हात व्हता. त्यो शिकार करून आपलं पोट भरीत व्हता. असाच एका दिशी त्यो शिकारीला गेला. बराच येळ झाला तरी त्येला शिकार गवसली न्हाई. कंटाळून त्यो एका झाडावर बसला. ते झाड बेलाचं व्हतं. तेला कडाडून भूक लागली. पण शिकार न मिळाल्यामुळं खायला काहीच नव्हतं. त्यो रागानं उजव्या हातानं झाडाची पानं तोडून टाकू लागला. त्या झाडाखाली एक पिंडी व्हती. तोडलेली पानं त्या शिवलिंगावरच पडत व्हती. त्यामुळं आपसूकच महादेवाची पुंजा व्होत व्हती. बरीच रात्र झाली इतक्यामंदी एक हरणी पळत पळत आली व पाणी पिऊ लागली. त्यो तिला बाण मारणार इतक्यात ती माणसावानी बोलू लागली. ती म्हणाली, 'तू मला मारणार आहेस पण आताच मारू नगस. मी घरी माझ्या नवऱ्याला, लेकरांला भेटून येते. मग तू मला खुशाल मार.' पारध्याला वाटलं ही एवढी माणसावानी बोलतीया तवा कशापायी खोटं म्हणील. खरंच वापस येईल. ती हरणी गेल्यावर दुसरी आली. तिलाबी पारधी मारू लागला. तवा ती म्हणाली, 'आता मला मारू नको. माझ्या पोटात बाळ आहे. आता जर मला मारलंस तर दोन जिवांची हत्या होईल म्हणून आता मारू नगं, मी थोड्या वेळानं येते.' ती हरणी गेल्यावर तिसरी आली. तिलाबी शिकारी मारू लागला तवा ती बोलू लागली की, 'अरे बाबा, मला आताच मारू नगस. घरी माझं न्हानं बाळ आहे. त्याला पाजवून मी येते.' मग तीही गेली. त्यो शिकारी आता येतील म्हणून वाट बघत बसला. अन् म्हणल्या-परमान खरोखरच त्या तिंघी हरणी व त्यांच्या संगं एक हरण व एक पाडस इतकेजण त्या झाडापाशी आले. पारधीबी खाले उतरला. त्यो एका हरणीला मारू लागला तर परतेक जण मला आधी मार म्हणू लागली. त्या शिकाऱ्याला

पंचाईत पडली. ते लहान पिल्लू म्हणू लागलं की, मला आधी मार. शेवटी त्यानं विचारलं, 'अरे तुम्ही हायेत तरी कोण? बोलतायत मानसीवानी पर दिसायला हरन! काय परकार त्यो तरी मला सांगा.' मंग परतेकानं आपली हकिगत सांगितली. त्या हरणी व्हत्या स्वर्गीच्या अपसरा अन् त्यो हरिण एक गंधर्व व्हता. पर त्याला शापामुळे पिरतीमीवर यावं लागलं व्हतं. योगा-योगानं त्याच दिवशी त्यांचा शापित काळ संपला व्हता. त्यो दिवस म्हणजी माव्हच्या महिन्यात वद्य त्रयोदशी ह्यो व्हता. म्हणजेच महाशिवरात्रीचा दिस व्हता. त्यांना सगळ्यांना शंकर परसन्न झाला. कारण पारध्याच्या हातानं त्याच्या पिंडीवर बेल पडत व्हता व हरणांची वागणूक तर माणसाला लाज वाटण्यापरमाण व्हती. म्हणून शंकराची त्येच्यावर मर्जी बसली. हा परकार घडे पास्तोर रात्रीचे बारा वाजले व्हते. इतक्यामंदी एक इमान उतरलं व त्या झाडापाशी थांबलं. त्याच्यातून शंकराचे दूत बाहेर आले व ते म्हणू लागले की, तुम्हाला नेण्यासाठी आम्हाला धाडलं आहे. अशा परकारे ते सगळेच जण देवाच्या इमानात बसून स्वर्गाला गेले. त्या हरणामुळे पारध्याचंही भाग्य उजळलं!






निवेदक : **श्री. सदाशिव दांडेकर**

माघ महिन्यातील कृष्ण चतुर्दशीला महाशिवरात्र म्हणतात. शंकराच्या देवालयात लोक मोठ्या भक्तिभावाने शिवरात्रीच्या दिवशी पूजाअर्चा करतात. ज्या देवाच्या नावाची अंत्याक्षरे 'ईश्वर' अशी असतात, ती शंकराची नावे होत. जसे घृष्णेश्वर, जीवनेश्वर, विश्वेश्वर, हरेश्वर इत्यादी. कुलाबा जिल्ह्यात समुद्र किनाऱ्यावर हरेश्वर येथे शंकराचे जागृत देवस्थान आहे. या क्षेत्रास 'दक्षिण काशी' असे म्हणतात. हरेश्वर येथे महाशिवरात्र, कार्तिकी एकादशी व काळभैरव जयंती हे उत्सव मोठ्या प्रमाणात साजरे होतात. यात्रेकरू महाशिवरात्रीचे दिवशी प्रथम शुक्लतीर्थात जाऊन समुद्रस्नान करून येतो. शंकराच्या पिंडीवर पाण्याची बारीक धार पडत राहील अशी कळशी टांगून ठेवण्यात येते. नंतर शंकरावर रुद्राभिषेक केला जातो. इच्छेप्रमाणे भाविक लोक 'लघुरुद्र' किंवा 'महारुद्र' करीत असतात.





# खुलभर दुधाची कहाणी

निवेदक : **श्री. दा. मा. कानडी**

आटपाट नगर होतं. तिथं एक महादेवाचं देऊळ होतं. तर तिथं भाविक लोक येत. भजन म्हणत. आरती म्हणत. त्यातच एक म्हातारी होती. भोळी भाबडी बिचारी! ती महादेवाची भक्ती करी. रोज आंघोळ करून महादेवाची पूजा करी. देवाला निवद दाखविल्याशिवाय जेवण घेत नसे.

एकदा काय झालं, महादेवाचा कोप झाला. दुष्काळ पडला. पाऊस गेला. नद्या नाले आटले. लोकांनी कष्ट केले. जमिनीत धान्य पेरले. ते सुकू लागले. लोक घावरले. राजाच्या तोंडचे पाणी पळाले. तिथला राजा उठला. ज्योतिषाकडे गेला. भविष्य पाहू लागला. ज्योतिषानं सांगितलं. 'देवाचा कोप झाला. गाभारा रिता झाला. तेवढा भरून दूध पाहिजे त्याला.' राजाला गर्व झाला. उद्या दुधानं भरतो म्हणाला. नोकर चाकर बोलाविले. त्यांना सांगितले उद्या आपल्या सर्व गाईम्हशींचे दूध काढा. हंडेच्या हंडे, टिपंच्या टिपं भरून गाडचा भरा आणि महादेवाच्या गाभाऱ्यात ओतून द्या. दुसरे दिवशी राजाच्या सर्व गाईम्हशींचे दूध काढले. शेकडो टिपं भरली आणि शेकडो गाडचांची रस्त्याने थेट देवळापर्यंत रांग लागली. सर्व दूध गाभाऱ्यात ओतले. पण गाभारा भरला नाही.

राजाला नवल वाटले. त्यानं घरोघर नोकर पाठविले. प्रत्येक घरचे सर्व दूध काढून आणले. गाभाऱ्यात ओतले तरी गाभारा रिकामाच! राजा धाबरला. लोक धाबरले, कोणास काही सुचेना.

म्हातारी उठली, स्नान केलं, अंगी भस्म चर्चिलं, ओल्या वस्त्रांनी देवळात गेली. बरोबर खुलभर दूध घेऊन आली. तिनं देवाला स्नान घातलं. भस्म लावलं. वाटीतील खुलभर दुधाचा निवद दाखवला. तेवढंच दूध गाभाऱ्यात ओतलं. देवाची प्रार्थना केली, 'हे माझ्या भोळ्या शंभुराया, कर आमच्यावर दया, आम्ही तुझीच लेकरं, तूच आमचा मायबाप, पाऊस दे आणि आम्हांला वाचव.'

देवानं म्हातारीचा धावा ऐकला. तो खडबडून जागा झाला. गाभारा भरला. राजा पहातच राहिला. त्याला मोठं नवल वाटलं. त्यानं म्हातारीचं दर्शन घेतलं. सर्वांनी म्हातारीचं दर्शन घेतलं. राजानं म्हातारीस विचारलं, 'आजी, आजी, आम्ही इतकं दूध ओतलं. गाभारा भरला नाही. तुझ्या एवढ्याशा दुधानं गाभारा भरला कसा? तू कशी केली देवावर माया? काय दाखवली किमया?

म्हातारी बोलली, 'मी वसा घेतला तो देवाला आवडला. तो प्रसन्न झाला, गाभारा भरला.'

राजा बोलला, 'कोणता वसा घेतला? मला सांग. मी तसा वसा घेईन. देवाला प्रसन्न करीन.'

म्हातारी बोलली, 'उतशील मातशील घेतला वसा टाकून देशील.'

राजा बोलला, 'उतणार नाही, मातणार नाही नि घेतला वसा टाकणार नाही.'

म्हातारी बोलली, 'ऐक, मुक्या प्राण्यावर करावी दया. गरिबावर करावी माया. जुलूम करू नये. गर्व करू नये. प्रजा मुलासमान मानावी. न्याय द्यावा सर्वांना सारखा. गुन्हेगारास द्यावी शिक्षा. सज्जनाची करावी रक्षा. देवावर ठेवावा भाव. पुजावा महादेव. देव भावाचा भुकेला. नुसतेच दुधाचे हंडे नकोत त्याला.'

राजा उठला. म्हातारीच्या पाया पडला. देवाच्या पाया पडला. म्हातारीचा वसा घेतला. राजा दयाळू बनला. प्रेमानं वागू लागला. जुलूम नाहीसा झाला. गर्व कोठल्या कोठे मावळला.

लोक आनंदले. राजाला धन्यवाद देऊ लागले. देवाला आनंद झाला. त्याचा कोप नाहीसा झाला. त्यानं धो धो पाऊस पाडला. प्रजा आनंदली. पिके डोलू लागली. लोकांनी हंगामात मोत्यांची रास भरली. सर्व नगरी सुखी झाली. आनंदानं नांदू लागली. तसेच तुम्ही आम्ही पण आनंदात नांदू या.

ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण.









# नशिब उजाडलं

निवेदिका : **श्रीमती जानकीबाई पाटील**

असंच आपलं एक गाव होतं. तिथं एक लई गरीब माणूस रहायचा. रोज जंगलात जावं. लाकूडफाटा गोळा करावा. मोळी बांधावी. ती विकून पैका यील त्यावर संसार भागवावा. असं आपलं त्याचं चालायचं रोजचं.

तर एक दिवस काय झालं की, ह्या माणसाच्या बायकूनं त्येला दिलं माडगं करून गाडगंभर. म्हटली की, न्ह्या जावा. तान लागली तर प्या जावा. ठेवा झाडाला अडकवून. त्यावर ह्यो बरं म्हटला. ते गाडगं घेऊन गेला जंगलात. बांधलं एका झाडाला न् गेला लाकूडफाटा गोळा करायला. गेला तर तेवढ्यात काय झालं की, शंकर-पार्वती तिकडून चाललेवते विमानानं ते थांबले. पार्वती म्हणाली, 'वास कसला येतोय चांगला ?' आणि उतरली की खाली विमानातनं! बघतीया तर झाडाला एक गाडगं टांगल्यालं. गेली पुढं. काढलं गाडग्याचं झाकण न् प्याली की ते माडगं! किती चांगली चव. तिच्या मनाची झाली खुशी. तिनं मग त्या गाडग्यात ठेवले पाच भूक लाडू, तान लाडू. त्या गाडग्याच्या मालकाला दुवा दिला आणि गेली शंकरासंगं निघून कैलासाला.

इतक्यात तिकडून तो माणूस आला धावत पळत, त्याला तान लागलीवती, म्हणून गाडग्याला हात घालतोय तर माडगं कुठाय? गेला भुलून, लागला गदागदा गाडगं हालवायला. बघतोय तर आत लाडू! अरेच्या? ही काय भानगड? त्याचा जीव उठून गेला; नव्हं स्वप्नात दिकून जे मिळायचं न्हाई ते पुढ्यात आल्यावर काय गा होनार? लागला टकामका बगायला न् मग हळूच त्यातला एक लाडू उचलून त्येनं तोंडाला लावला! बघतोय तर झक्कास चव! लागला खायला चवीनं, आणि एकामागून एक लाडू फस्त करीत सुटला! पण गाडग्यात पाच लाडू आपले जसेच्या तसे! कितीही खा तुम्ही लाडू म्हणून

संपणार नाहीत. अंहं! त्या कारणानं खाणारा भुलून गेला. गोळा केलेला लाकूडफाटा तसाच घेऊन न् गाडगं पोटाशी धरून त्यो घरी पळत सुटला.

त्याला असा पळत आलेला बघून बायकोला नवल वाटलं. काय झालं म्हणाली. तर मग ह्यानं अशानं असं हाय म्हटलं. मग घरातल्या पोराबाळांनी सगळ्यांनी पोटभर लाडू खाल्ले. आत्मा जसा काय तृप्त होऊन गेला त्यांचा. म्हणतांना एक दिवस ह्या गरिबानं काय केलं की, गावजेवण घातलं. आपल्या-जवळ जे आहे ते दुसऱ्याला द्यावं म्हणाला न् दिलं उभ्या गावाला जेवणाचं आमंत्रण.

पण गंमत काय की, त्या गावात एक लाखोपती सावकार होता. त्याचं डोकंच उठलं हे ह्याचं सगळं बघून. म्हणून गेला पंक्ती बघायला तर गाडग्यातले लाडू आपले कितीही वाढले तरी तसेच! ह्याला मग पडली भूल. आपली बायको ह्या माणसाच्या घरी पाठवून काय भानगड आहे ती बघावी म्हणाला न् तसं केलं पण! तर अशानं असं म्हणून कळलं. तशी ह्याच्या तोंडाला पाणी सुटलं. मनात स्वार्थ दाटला. हाव सुटली. हिरेमाणिक रत्नं मिळतील ह्या आशेवर त्यानंही जंगलात माडग्याचं गाडगं नेऊन बांधलं! पण जंगलातलं काम ह्यानं कधी केलंच नाही तर घाबरून लांबच्या झाडामागं लपून बसला.

इतक्यात तिकडून शंकर-पार्वती आले. पार्वतीने ते माडगं पुन्हा पिऊन टाकलं. पण आता तिला इथं दुष्टपणाचा, कपटपणाचा वास आला. मग तिनं त्या गाडग्यात भरल्या लाथा न् बुक्क्या आन् वर झाकण लावून गेली निघून. शंकराला पण या सावकाराचं आवडलं नाही.

पण तो सावकार हळूच पुढं झाला. हलकेच त्यानं गाडगं उघडलं तर झाला की लाथाबुक्क्यांचा सुकाळ? कुठले लाडू न् कुठली रत्नं? गेला पार हाडबडून न् सुटला आरडत ओरडत. भल्या चपळाईनं त्या गाडग्याचं झाकण मग त्यानं लावलं न् ह्या दंगलीतून आपली सुटका करून घेतली.

सावकार मग ते गाडगं घेऊन घरी गेला. बायकामुलांना एका खोलीत कोंडून त्यांना पण लाथाबुक्क्यांचं सुख भोगाय लावलं. पण मेला दांडगा कपटी माणूस. उभं गाव त्यानं जेवायला बोलावलं न् ह्या गाडग्यातील लाथाबुक्क्यांच्या दणक्यानं माणसं हैराण करून सोडली?

शंकर-पार्वतीनं मग हलकेच ते गाडगं काढून घेतलं न् त्या माणसाचा गर्व हरण केला. त्याच्या घरातील संपत्ती नाहीशी केली न् गेले कैलासावर निघून. जो दुसऱ्याचं वाईट चिंतील त्याला शिक्षा केलीच पाहिजे म्हणाले. त्यावेळी त्या गरिबाचं मातुर त्यांनी मोठं कल्याण केलं. त्याच्या घरी लक्ष्मी कायमची नांदती ठेवली न् त्याला कधी ग ची बाधा होऊ दिली न्हाई.



# भावाची भैंन

निवेदिका : **श्रीमती जानकीबाई पाटील**

एकदा काय झालं की, भावाची एक भैंन एका झाडाखाली फुंदत होती. रडत होती. तिच्या ध्याईचा जसा काय आगडोंब उसळलावता, पार्वतीला तिची दया आली. तिनं तिच्या काखेचं आपल्या काखेत घेतलं न् काय झालं म्हणाली. तशी ही भैंन आणखीनच गळा काढून रडत सुटली. म्हणताना शंकरानं का रडतीस म्हणून आपल्या उपरण्यानं तिचे डोळे पुसले. त्यासरशी ती बोलती झाली. म्हणाली कशी, 'लईदी भाऊ भेटावा वाटत होता तर गेलेते म्हायारला. भावजयीनं न्हाई बा पटवून घेतलं. मी गरीब तर भाकरी झुणका न देता शेण्यांची चवड न् फाटयांची ढपलं की वो धोतरात बांदून दिली! . . .पोरास्नी काय वाढू आता मी? भुकेनं पोरं कालावल्यात जी'. . .आणि लागली की पुन्हा धसमसून रडायला.

पार्वतीला तिची कणव आली. रडू नको म्हणाली. तिला सांगितलं, 'त्या तिकडच्या बागेत जा. तिथला मोठ्ठा भोपळा घे. घराला घेऊन जा. फोडून घे. एकदम एका हंडयात शिजव. कुणाला हात लावून देऊन नकोस. तुझं भलं होईल.'

भैंन होती शहाणी. शंकरपार्वतीचे पाय तिनं शिवले. आशीर्वाद मिळाला म्हणाली. पार्वतीनं सांगितलं तस्सं मग तिनं केलं. तर काय चमत्कार म्हणावा देवा? भोपळ्याचं सोनं झालेलं! लक्ष्मी हिच्या घराला चालून आलेली! ती बघून तिचा आनंद गगनात मावेना.

तितक्यात वार्ता आली की, भावजयीनं या नणंदेवर चोरीचा आळ घेतलाय न् भाऊ हिच्या डोक्यात दगड हाणायला माळीतल्या तुळीवर चढून बसलाय.

झालं. पार्वतीनं बसल्या जागेतूनच एक सोळा पाकळ्यांची समई धाडली न् खरं खोटं करीत भावाचे कान उघडले. तशी भाऊ झाला आच्यारी का विचारी न् भावजय गेली पार काळी ठिक्कर पडून. भाऊ मग भैनीला भेटला. आनंदी आनंद झाला.





# अभ्यंग स्नान

निवेदिका : डॉ. सरोजिनी बाबर

त्यावेळी ऐन थंडीचे दिवस होते. भल्या पहाटेचं उठून लोक गंगेवर स्नानाला येत जात. नदीच्या गार पाण्यात उडी मारून लोक म्हणत, 'गंगामाई, पुण्य पदरात घाल. पाप नाहीसं कर. सुखाची सावली दे.'

लोकांची गंगामाईला अशी रोज प्रार्थना. पार्वतीनं एक दिवस या प्रार्थनेचा अर्थ विचारावा म्हणून शंकराला म्हटलं, 'नाथ, गंगास्नान, अभ्यंग स्नान, लोक रोज रोज का करतात?'

पार्वतीच्या या प्रश्नाचं शंकराला हसू येऊन तो म्हणाला, 'सांगतो. पण थांब, सांगण्यापेक्षा प्रत्यक्षच पहा.'

पार्वतीला खरं खोटं कळावं म्हणून शंकरानं दिवाळी दिवशी एकदा तिला गंगेच्या काठावर आणली. दोघंही वेष बदलून आली. पार्वती एका दगडावर बसून राहिली. घडेल ते बघायचं एवढंच तिला काम. शंकरानं स्वतः एका म्हाताऱ्या भिकाऱ्याचा वेष घेतला. नदीला जाणाऱ्या रस्त्याच्या कडेला एक खोल दरी होती, तिथं स्वतःला त्यानं लोटून दिलं. आणि जो येईल जाईल त्याला दीनवाण्या नजरेनं, काकुळतीच्या गळ्यानं, 'महाराज, मला वर काढा. देव तुमचं भलं करील.' अशी गळ घालायला सुरुवात केली.

इकडे तोवर काय झालं की, भल्या पहाटे लोक घरची दिवाळीची आंघोळ उरकायच्या आधी सारं पाप धुऊन जावं म्हणून गंगेवर येऊ लागले. त्या सर्वांना शंकरानं हाटकलं. पण एकानंदेखील ढुंकून पाहिलं असेल तर शपथ. जो तो आपल्याच नादात. तोंडानं काही तरी गुणगुणत, धावत पळत ज्याची त्याची धांदल उडालेली. धाईगर्दीत प्रत्येकाचं स्नान चाललेलं. घरची आंघोळ वेळेला व्हावी म्हणून सर्वांची तारांबळ झालेली. मग शंकराचं ऐकतो कोण? सवड आहे कोणाला? दिवाळीसारख्या मंगल दिवशी भिकाऱ्याला हात लावावा तरी कोणी?

शेवटी कितीक आले आणि तसेच गेलेही. बिचारा शंकर ओरडून ओरडून थकून गेला. फटफटीत उजाडलं तरी कोणी ढम्म म्हणेना!

होता होता एक उमदा पण गरीब माणूस अखेरीस आला. इतरांच्यासारखाच तोही नदीवर स्नानाला निघालेला. पण अगदी शांत, धिम्या पावलांनी चाललेला. त्यानं शंकराचं विव्हळणं ऐकलं मात्र आणि हातातलं धोतर फेकून देऊन चटकन 'थांब! . . .आलो' म्हणीत दरीत उडी घेतली. हां हां म्हणता शंकराला त्यानं वर काढलं. अंगाला ठेचलं, रक्त निघालं, तरी त्यानं उच्चारही केला नाही. तो फक्त समाधानानं हसला. म्हणाला, 'आणखी कोणती सेवा हवी का?' त्यामुळं शंकर त्याच्यावर प्रसन्न झाला. त्यानं त्याच्यासमोर आपलं खरं रूप प्रकट केलं.

प्रत्यक्ष शंकर भेटल्यानं तो माणूस आनंदला. शंकराला लोटांगण घालून त्यानं आपल्या मनातलं समाधान व्यक्त केलं. शंकरानं त्याच्या मस्तकावर हात ठेवून अभयदान दिलं, 'तू मोठा पुरुषोत्तम आहेस. तुझं भलं होईल.' आणि पार्वतीसह तो अदृश्य झाला.

कैलासावर जाता जाता त्यानं पार्वतीला म्हटलं, 'पाहिलस? लोक भारी ढोंगी, स्वतःचं खंडीभर पाप गंगेच्या ओटीत घालून पुन्हा मान वर करायला तयार! पण खरा पुण्यवान त्या माणसासारखा एखादाच. बाकीचं सारं सोंग. रोजची वागणूक पचावी म्हणून वरकरणी गंगास्नान!'

त्यावर पार्वती म्हणाली, 'आता कळलं देवा. आनंद झाला. हारखले खरं खोटं बघून.'

आणि मग ती दोघेही आपल्या महालात निघून गेली.

इकडे तो भला माणूस गंगेत स्नान करीत होता. कोवळी उन्हं त्याला न्हाऊ घालीत होती. मनातून तो देवदर्शन घडलं, देवाला मदत देता आली, या भावनेनं खुषीत होता. आनंदानं त्याचं तोंड उजळलं होतं. आज आपल्याला शंकर-पार्वतीनं खरं अभ्यंग स्नान घडवलं, या आनंदानं त्याचा ऊर भरून आला होता. देवांनी आपला पोरकेपणा घालवला, म्हणून त्याला अस्मान ठेंगणं झालं होतं. घरचं आपल्याला कुणी नाही म्हणून खचून गेलेलं त्याचं मन आता शांत झालं होतं. त्याला नवी उभारी आली होती. दिवाळीचा आनंद अपूर्वाईनं तो एकटाच लुटत होता. गंगामाई कौतुकानं त्याला न्हाऊ घालीत होती.






निवेदिका : डॉ. सरोजिनी बाबर

एकदा काय झालं की, कैलासावर भगवान श्रीशंकर ध्यानस्थ बसलेवते. त्याच वेळी अयोध्या नगरीत श्रीरामचंद्रांचा जन्म झाला. शंकरांची नजर अयोध्येकडे गेली. बाळ रामचंद्राला बघून शंकरांना आनंदाचं भरतं आलं. बाळराजाच्या बाळलीला ते कौतुकानं बघू लागले. रामाच्या दर्शनानं त्यांचा जीव सुखावला. हालाहल पिऊन उडालेला त्यांच्या अंगाचा भडका आता निवला. त्यांची काया समाधान पावली. रामचरित्राचं गुणगान त्यांनी मग ज्याच्या त्याच्याजवळ मांडलं. कांचबंद न्हाणीत न्हातेला, राजवाड्यात रांगतेला, दरबारात कवतिकानं खेळतेला, धनुर्विद्या- शिकतेला, विश्वामित्राच्या यज्ञाचं रक्षण करतेला, शिव-धनुष्य मोडून जानकीचं पाणिग्रहण करतेला असा राम त्यांनी लोकांच्यापुढं सांगितला. पण अवचित कैकयीच्या मनात दुस्वास येऊन तिनं रामाला वनवासात धाडायची काढलेली हिकमत ऐकवताना त्यांचा ऊर दाटून आला. वल्कलं नेसून वनवासात जातेल्या रामाला पहाताना त्यांचं काळीज फाटून गेलं.

रामाच्या मागोमाग सीता निघाली. लक्ष्मणही निघाला. दंडकारण्यात ही मंडळी गेली. तिथल्या पंचवटीत रहायला लागली. रावणाच्या मनात कपट आलं. सुवर्णमृगाच्या रूपानं आपल्या मारीचमामाला सीतेपुढं धाडलं. सीता त्याच्या रूपाला भाळली. काचोळीसाठी तिनं या मृगाच्या कातड्याचा हट्ट धरला. राम-लक्ष्मण त्यासाठी शिकारीला गेले.

इकडे रावण भिक्षेकरी होऊन सीतेकडे आला. त्यानं सीतेचं हरण केलं.

राम-लक्ष्मण परत येतात तो पंचवटीत सीता कुठं होती? त्यांनी सीतेच्या नावाचा टाहो फोडला. रानंवनं दणाणून गेली. पण सीतेचा शोध लागेना. राम भ्रमिष्टागत भटकू लागला. हे बघून शंकर व्याकुळले. पार्वतीला मात्र रामाचं हे वागणं खपलं नाही. ती शंकरांना म्हणाली, 'देवा, हाच का तुमचा पूर्ण परब्रह्म

राम? बायकोसाठी हळहळणारा कुठं देव असतो? छे! हा तर साधा माणूस. कशाला त्याला डोक्यावर घेता? कशाला त्याचं ध्यान करता? शोभतं का हे देवा तुम्हांला?'

शंकर म्हणाले, 'नाही उमा. असं नाही. माझा राम पूर्ण परब्रह्मच आहे. मानवदेह धारण केल्यान त्याला माणसाची सुखदु:खं चिकटलीत! आपलं देवपण लपवून ठेवीत तो याच वेषात अपूर्व कामगिरी करून दाखवील. तू निचिंत ऐस उमे.'

'छे छे! मी त्याला आता फसवून दाखवते. बघायचं आहे?' पार्वतीला राग आला.

'नाही. तुझी ही घमेंड खोटी आहे. तो जगातल्या कोणत्याही शक्तीला फसायचा नाही.' शंकरांनी पार्वतीची समजूत घातली. पण ती ऐकेना. शंकरांनाच दोष देत ती दंडकारण्यात उतरली. तिनं सीतेचं रूप धारण केलं.

त्यावेळी रामराया एका झाडाखाली बसला होता. सीतेच्या नावाचा जप चालू होता. लक्ष्मण विझणवारा घालीत त्याला धीर देत होता. सुखदु:खाच्या गोष्टींनी दोघेही व्याकुळ झाले होते. एवढ्यात पार्वती सीतेच्या रूपानं समोर आली. लक्ष्मणाचा आनंद गगनात मावेना. तो आनंदानं ओरडला, 'दादा, ती पहा सीतावहिनी!'

पण रामानं ढम्म म्हटलं नाही. त्याची नजर हलली नाही का तो जागचाही उठला नाही. उलट या सीतेकडे पाठ करून तो म्हणाला. 'आई जगदंबे, तू आपलं खरं रूप सोडून इथं का आलीस? का हे कपट नाटक केलंस तू? मी तुला शरण आलो आहे, जगदंबे, खरं दर्शन दे, मी तुझ्या चरणावर मस्तक ठेवीन.'

झालं. हे ऐकून पार्वतीचा नखरा उतरला. तिनं आपलं खरं रूप धारण केलं. ती रामचंद्राला शरण गेली. म्हणाली, 'रामराया, श्रीरामा, माझा अभिमान गेला. हरले मी. उगाचच तुझ्याएकी मी वेडंवाकडं बोलले. तू पूर्ण परब्रह्म आहेस. खात्री पटली.'

रामाला आनंद झाला. त्यानं पार्वतीचे पाय आदरानं शिवले. म्हणाला, 'जगदंबे, माते, अग हे वृक्ष, हे पाषाण कोण आहेत ठाऊक आहे का तुला? सीतेच्या वियोगामुळं व्याकुळ होऊन मी ज्यांना आलिंगन देतोय, कवटाळतोय ते हे वृक्ष-पाषाण आहेत पूर्वीचे ऋषिमुनी. मी अवतार घेणार या आशेवर ते वनवासी होऊन इथं आले. केवळ माझा स्पर्श व्हावा या हेतूनं. नाही तर त्यांची तपश्चर्या दांडगी. बळ मोठं. चैतन्यमूर्ती आहेत ते. पण माझ्यासाठीच केवळ वृक्ष-पाषाण होऊन इतकी वर्षं इथं बसलेत. मी त्यांना नको भेटू तर कुणाला?'

पार्वती हे ऐकून गहिवरली. तिनं रामाला आशीर्वाद दिला. 'तुझं कल्याण होवो' म्हणाली आणि निघाली. तशी रामानं तिला अडवीत म्हटलं, 'आई, एक वर दे. चौदा चौकड्यांच्या रावणाला मारून व त्याच्या बंदिवासातील देवांना सोडवून माझ्या सीतेला आणायचं आहे. मी हे काम करून येस्तोवर तू इथं रहा. तुझ्या सेवेसाठी चौसष्ट योगिनींना व साती आसरांना बोलावून घे. आणि जगदंबे, इथं जे जे कोणी येतील, तुझं दर्शन घेतील, त्यांना आशीर्वाद दे. त्यांच्यावर प्रसन्न हो. गुणांची चाहती हो. द्वेषाची शासनकर्ती हो. ही जागा, ही भूमी, तुझं एक आदिपीठ होऊ दे.'

पार्वतीला 'हो' म्हणणं भाग पडलं. तिनं रामाला वर दिला. 'तथास्तु' म्हणाली.

त्या दिवसापासून या ठिकाणी तुळजा भवानीची स्थापना झाली. पार्वतीनं या देवीचा अवतार धारण केला. ती रामवरदायिनी ठरली.





# श्री केदारेश्वर

(दंतकथा)

निवेदक : **श्री. शार्ङ्गधर महाडीक**

पाचगणी परिसरापासून जवळ असलेली धोडेघर, राजपुरी व गोडवली ही स्थाने प्राचीन काळापासून जागृत आहेत.

पाचगणीपासून दोन मैलांवर धोडेघर हे खेडेगाव आहे. तेथे एक मोठे महादेवाचे मंदिर आहे. या मंदिराची कथा पुढीलप्रमाणे आहे:

फार वर्षांपूर्वी धोडेघर येथे खिंगरमधील दुधाने आडनावाचे लोक रहात असत. खिंगर हे गाव पाचगणीपासून तीन मैलांवर आहे. तीन चार मैलांच्या आसपासचा प्रदेश पूर्वी जंगलमय होता व तेथे तुरळक लोकवस्ती होती. फार वर्षांपूर्वी दुधाने लोक गाई चरावयास घेऊन येत. त्यांपैकी एका शेतकऱ्याजवळ चारपाच गाई होत्या. पैकी एक काळी गाय आता ज्या ठिकाणी स्वयंभू शिवलिंग आहे तेथे चरत चरत आली, तिला येथे काही तरी दैवी चमत्कार झाला. मग त्या ठिकाणी पायाने माती उकरून त्या खड्डयात आपल्या कासेतील दूध सोडले व परत त्याच्यावर माती लोटली. असा प्रकार जवळजवळ पाच सहा महिने चालला होता. ही गाय घरी दूध देईनाशी झाली. म्हणून ती कळपातून एकटीच कोठे जाते याचे शोधार्थ त्या गाईचा मालक तिचे पाठोपाठ जाऊन एका झुडपाआडून पाहू लागला. त्याला चमत्कार दिसला. आपली गाय त्या ठिकाणी जाते, माती उकरून दूध सोडते, परत त्याचेवर माती लोटून कळपात सामील होते. हे पाहिल्यापासून दुसऱ्या दिवशी त्याने गाईला दावणीला बांधून ठेवले. तिला चरावयास नेले नाही. मग ठराविक वेळेस त्या गोमातेने आपले दावे तोडून ती त्या ठिकाणी हजर झाली. नियमाप्रमाणे तिने तो सर्व प्रकार केला व ती परत कळपात सामील झाली. त्या शेतकऱ्याला गाईस पाहिल्यावर काही तरी विचित्र प्रकार आहे असे वाटू लागले.

दुसरे दिवशी त्याने आपल्या सर्व सवंगड्यांना हा प्रकार दाखविला. हातात एक कुदळ घेऊन ते लोक त्या ठिकाणी गेले. त्यांनी तेथे खोदण्यास सुरुवात केली. फूट दीड फूट खोदल्यावर रक्त वाहण्यास सुरुवात झाली. असा प्रकार झाल्यावर त्या शेतकऱ्यांना सदर प्रकार दैवी चमत्कार असावा म्हणून देवाची आराधना केली. आमच्या हातून काही चूक झाली असेल तर क्षमा कर अशी प्रार्थना केली. मग तेथून रक्तऐवजी दूध वाहू लागले. काही वेळाने दुधाऐवजी पाणी वाहू लागले. तेच पाणी तेथे आजतागायत चालू आहे.

नंतर शेतकरी व त्याचे सवंगडी या दोघांत वाद सुरू झाला. एक म्हणायचा की, हा देव माझा आहे. दुसरा म्हणायला लागला हा माझा देव. असा वाद चालला असताना अवचितच एक वाटसरू तेथे आला. हा वाटसरू कोठून आला हा मोठा प्रश्न उपस्थित झाला. कारण तेथे जवळपास कोणतीच वाट नव्हती. त्या वाटसरूने दोघांचा वाद ऐकला आणि तो म्हणाला की, मी तुमचा वाद मिटवितो. जवळच एक आंब्याचे झाड होते (आजही ते तेथे आहे). तो म्हणाला, तुम्ही फुलांचे दोन हार करा व त्या आंब्याच्या झाडावर दोन फांद्या आहेत त्या दोन फांद्यांना दोघेजण दोन हार घाला. ज्या कोणाच्या फांदीला मोहोर व आंबे येतील त्यांचा हा देव होईल ! अशा तऱ्हेने दोघांनी दोन हार त्या फांद्यांना घातले. एकाने लाल फुलांचा हार व एकाने पिवळ्या फुलांचा हार घातला. हार घातल्यानंतर थोड्या अवधीतच सर्व ठिकाणी मोहर व आंबे लटकू लागले.

सर्व झाडांवर आंबेमोहर आल्यावर त्या वाटसरूने सांगितले की, हा देव सर्वांचाच आहे. परंतु पूजेचा मान हा खिगर येथील दुधाने यांचा आहे. कारण गाय त्यांची होती. झाडाला आंबेमोहर ज्यावेळी आला त्यावेळी आंब्याचा मोसम नव्हता तरी दैवयोगाने त्या झाडाला आंबे आले. आजपर्यंत जवळजवळ या गोष्टीला दोन-अडीचशे वर्षे झाली तरीदेखील या झाडाला आंबेमोहर याच वेळेला येतो. त्या वेळेला दोन्ही गावचे लोक (कळंबे व दुधाने) आश्विन महिन्याच्या शेवटच्या मंगळवारी आंबे व मोहर जमा करतात. या यात्रेचे वेळी देवाची तीन वेळा आरती करतात. पहिल्या आरतीला झाडाला पालवी फुटते, दुसऱ्या आरतीला मोहर येतो व तिसऱ्या आरतीला आंबे लटकलेले दिसतात. हे झाड आजतागायत तेथेच आहे. आंबेमोहर देण्याची प्रथा त्याने अजून ठेवली आहे. ज्या ठिकाणी पाणी वाहते तेथे काही दिवसांनी स्वयंभू शिवलिंग अवतीर्ण झाले. या ठिकाणी आता देऊळ बांधण्यात आले आहे.

या शिवालयास श्रीकेदारेश्वर म्हणून ओळखतात. या ठिकाणी लांबलांबचे लोक या तीर्थक्षेत्राचे दर्शन घेण्यासाठी येतात व तेथील गंगेत स्नान करतात.



# बारा ज्योतिर्लिंगे



निवेदक : **श्री. रा. वि. अधिकारी**

एकदा सर्व देव आणि ऋषी मिळून महाबळेश्वरच्या अरण्यात महान यज्ञ करावयास सिद्ध झाले होते. ब्रह्मदेव हा यजमान होता. यज्ञाच्या सुरुवातीचा ठरविलेला मुहूर्त जवळ आला म्हणून मुख्य यजमानीण ब्रह्मदेवाची पट्टराणी सावित्री हिला लवकर सोवळे नेसून यावयाची ऋषींनी आज्ञा केली. त्याप्रमाणे ती सोवळे नेसावयास आत गेली. पण ती बराच वेळ बाहेर येईना. आता नियोजित मुहूर्त चुकणार अशी ऋषींना शंका वाटू लागली. म्हणून ब्रह्मदेवाची दुसरी पत्नी गायत्री, ती सोवळे नेसून बाहेर आलेलीच होती, तेव्हा मुहूर्त साधण्यासाठी तिला ब्रह्मदेवाजवळ बसावयाची आज्ञा देऊन, ऋषिमंडळींनी संकल्प सांगून पुण्याहवाचनाला सुरुवात केली. लगेच आपले नेसणे आटोपून व सज्ज होऊन सावित्री बाहेर आली आणि आपली सवत आपल्या पतीजवळ बसली असून यज्ञाला सुरुवातही झाली आहे हे दृश्य पाहून ती संतापली. तिने या कृत्याचा जाब सर्व देवांना आणि ऋषींना विचारला. सावित्री रागाने लालभडक झाली होती. तिचे सर्वांग थरथर कापत होते. तिच्या डोळ्यांतून बाहेर पडणाऱ्या क्रोधाग्नीने हे सर्व ब्रह्मांड जळून जाईल की काय अशी भीती सर्व देवांना आणि ऋषींना वाटू लागली.

त्यांनी नम्रपणाने तिला मुहूर्ताची अडचण सांगितली आणि गायत्रीने पाटावरून उठून तिचे पाय धरले, क्षमाही मागितली. पण सावित्रीचा राग शांत होईना. ती संतापाने म्हणाली, 'मुहूर्त कसा टळला असता? माझ्या आज्ञेने माझे आटोपेपर्यंत सर्व ग्रह आणि तारे स्थिर राहिले असते. पण हे सगळे तुमचेच कपट-कारस्थान आहे. माझ्या सवतीचा सन्मान करून माझा अपमान करण्याच्या या तुमच्या कारवाईची मी तुम्हांला कधीच क्षमा करणार नाही. तुम्हाला याचे घोर प्रायश्चित्त भोगलेच पाहिजे.'

नंतर तिने सर्व देवांना तुम्ही नदीरूप व्हाल असा शाप दिला. लगेच भगवान विष्णू हे कृष्णा, ब्रह्मदेव हे वेण्णा आणि श्रीशंकर कोयना असे नद्या होऊन वाहू लागले व इतर देव आणि ऋषिमंडळी निरनिराळे ओढे आणि ओहळ होऊन वाहू लागले! त्या ऋषिमंडळींतही काही लोक तापट होते. त्यांनी मग तिलाही उलट शाप दिला की, 'तूही नदीरूप होशील.' झाले. लगेच सावित्रीलाही नदीचे रूप प्राप्त झाले. असो.

मग भगवान विष्णूने मध्यस्थी करून तिचा राग कमी करण्याचा प्रयत्न केला. अशाने हे जग कसे चालेल ही अडचणही तिला सांगितली. तेव्हा कुठे तिचा राग थोडा कमी झाला. तिने तुम्ही संपूर्ण रूपाने नाही पण अंशरूपाने नदीरूप रहाल, असा उःशाप दिला व जगावरील एक मोठे संकट टळले.

पण सावित्रीचा राग काही पुरता गेला नव्हता. त्यामुळे बाकीचे देव नदीरूप घेऊन पूर्व समुद्राला मिळावयास वाहत निघाले, पण सावित्रीने त्यांना न अनुसरता पश्चिमेस खोल कड्यावरून उडी मारली आणि ती पश्चिम समुद्राला मिळण्यासाठी निघाली. तिचे हे कृत्य शंकराला मुळीच आवडले नाही. म्हणून त्याने तिची समजूत घालून तिला पूर्वेकडेच चलण्याचा आग्रह केला, शिवाय 'गंगा, गोदा वगैरे सर्व महान नद्या पूर्व समुद्रालाच मिळाल्या आहेत. हा पश्चिम समुद्र अपवित्र आहे, म्हणून तू त्याला मिळावयास जाऊ नको. तू येथून परत फिर, मी तुला डोंगर फोडून पूर्व सागराकडे जाण्यासाठी वाट देतो.' असे पदोपदीने आणि खात्रीपूर्वक सांगितले. पण ती हेकट स्त्री शंकराची अवज्ञा करून तशीच पुढे चालली. अशा तऱ्हेने शंकराने बारा वेळा तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण तिने एकदाही त्याचे ऐकले नाही. महाबळेश्वरच्या पायथ्यापासून तो देवळे, कापडे, पोलादपूर, सवाद, काळसावित्री संगम, महाड वगैरे ठिकाणी व अखेरचे ठिकाण म्हणजे सावित्री जेथे पश्चिम समुद्राला मिळाली आहे तेथे हरिहरेश्वर रूपाने शंकराने अगदी आडवे पडून, सावित्रीला अडविण्याचा प्रयत्न केला. पण ती त्याला दाद न देता अखेर पश्चिम समुद्राला मिळाली.

अशा तऱ्हेने शंकराने जेथे जेथे सावित्रीला परतवण्याचा प्रयत्न केला तेथे तेथे स्वयंभू लिंगे निर्माण झाली आहेत. सावित्रीच्या काठी अशी बारा स्थाने आहेत. त्यातील शेवटचे श्रीहरिहरेश्वर हे कोकणातील एक तीर्थ समजले जाते. याच बारा स्वयंभू स्थानांना 'सावित्रीच्या काठची बारा ज्योतिर्लिंगे' असे म्हणतात.






निवेदक : श्री. रा. वि. अधिकारी

कुलाबा जिल्ह्यात पश्चिम समुद्राच्या काठी हरिहरेश्वर अथवा हरेश्वर नावाचे एक तीर्थक्षेत्र असून आजूबाजूचे पुष्कळ भाविक लोक तेथे जात असतात. तेथे हरिहरेश्वराचे व काळभैरवाचे अशी दोन सुप्रसिद्ध देवालये आहेत. सर्वत्र काळ-भैरवाची मूर्ती दक्षिणाभिमुख असते अशी पद्धती आहे पण हरेश्वरचा काळभैरव मात्र उत्तराभिमुख आहे. त्याबद्दल पुढीलप्रमाणे दंतकथा सांगितली जाते.

हरेश्वरच्या काळभैरवाची जागृत देवस्थान म्हणून मोठी प्रसिद्धी आहे. भूतबाधा झालेले अनेक लोक तेथे येऊन बरे होऊन जातात असा अजून भाविक मंडळींचा विश्वास आणि अनुभवही आहे. हरेश्वरच्या काळभैरवाची ख्याती चोहोकडे पसरली ती सर्व काळभैरवांतला मुख्य जो काशीचा काळभैरव त्याच्याही कानावर गेली आणि हरेश्वराच्या काळभैरवाचे माहात्म्य आपल्या डोळ्यांनी पहावे या उद्देशाने काशीच्या काळभैरवाने हरेश्वरास जाऊन यावयाचे ठरविले. रात्रीच्या रात्री हरेश्वरास जाऊन उजाडावयाच्या पूर्वी काशीस परत जावयाचे असे ठरवून, काशीचा काळभैरव काशीहून निघाला.

हरेश्वरच्या काळभैरवाला हे वृत्त कळताच काशीच्या काळभैरवाचे स्वागत करण्यासाठी तो उत्तरेस तोंड फिरवून उभा राहिला. कारण, काशीहून अर्थात उत्तर दिशेकडून तेथील काळभैरव येणार, तेव्हा त्याच्या स्वागतासाठी उत्तरा-भिमुख होणे हरेश्वरच्या काळभैरवाला भाग पडले. पण काशीचा काळभैरव श्रीवर्धनपर्यंत आला आणि पहाटेचा कोंबडा आरवला. त्यामुळे काशीचा काळभैरव श्रीवर्धन येथेच स्थिर झाला आणि त्याच्या स्वागतासाठी उत्तराभिमुख झालेला हरेश्वरचा काळभैरव मात्र अद्यापपर्यंत उत्तरेस तोंड करूनच उभा आहे !

श्रीवर्धनचा काळभैरव हा काशीचाच काळभैरव असून काशीला केलेले नवस श्रीवर्धन येथे फेडलेले चालतात, असा तेथील लोकांचा विश्वास आहे.




निवेदक : **श्री. वि. रं. सोनार**

पिंपळवडी (ता. पाटोदा) ह्या गावच्या पूर्व शिवारात चार-पाच फर्लांगावर अश्वलिंगाचे प्रसिद्ध देवालय आहे. त्या देवळात महादेवाची मोठी पिंडी आहे. त्या पिंडीवर अभिषेकपात्रातून सतत पाण्याची धार पडण्याची सोय केलेली आहे. ती पाहिल्यास नैसर्गिकच आहे असे वाटते. नंतर पिंडीसमोर बाहेरच्या मंडपात एक मोठा दगडी नंदी आहे. त्या नंदीचे तोंड आणि पिंडी पूर्वी दोरी टाकल्याप्रमाणे दक्षिणोत्तर अशा सरळ रेषेत होती. परंतु, आता नंदीचे मुख थोडे पूर्वेकडे झुकलेले आहे. ज्यावेळी नंदीचे मुख (कलून) पूर्व दिशेस होईल, त्यावेळी हे सर्व जग बुडणार आहे, अशीही आख्यायिका सांगतात. तसेच, येथे सोमवारी नंदीकडून (बैलाकडून) कोणत्याही प्रकारचे काम करून घेतले जात नाही. शिवाय त्या दिवशी कोणत्याही कारणाने नंदीस मारीतसुद्धा नाहीत.

त्या देवळाशेजारीच एक मोठा मठ आहे. तेथेही देवाची गादी आहे. तेथे **काशीहून** आलेले **एक** मोठे साधू रहातात. ते नेहमी आपल्या ध्यानात मग्न असतात. तसेच जनावरे चुकल्यास कुठे सापडतील किंवा नाही, अशा किंवा इतर बाबतीतलेही भविष्य सांगून ते एक मोठे लोकोपयोगी आणि परोपकारी कार्य करतात. तेथे माघ महिन्यात महाशिवरात्रीच्या दिवशी मोठी यात्रा भरते. त्यावेळी फार लांबलांबचे लोक येथे अश्वलिंगाच्या यात्रेस येतात. तसेच, नेहमीच्या दर सोमवारी व एकादशीचे दिवशीही अश्वलिंगाचे दर्शनास बरीच गर्दी दिसून येते.





निवेदक : श्री. वि. रं. सोनार

एकदा भर दुपारी अश्वलिंगावर सोडलेला नंदी (देवास वाहिलेला) चरत चरत एका माळयांच्या शेतावर आला असता, त्याने तो नंदी देवाचा आहे हे न ओळखून, त्यास मार देऊन हाकून लावले. नंदी माळ्याच्या भीतीने पळत असता त्याने अचानकपणे कड्यावरून खाली उडी घेतली. (कडा कमीत कमी १५० फूट उंचीचा आहे.) तेव्हा नंदीची चारही पावले खाली खडकावर उमटली. ती अजूनही दिसतात. पुढे नंदीस अश्वलिंगावर नेण्यात आले. परंतु काही दिवसानंतर तो नंदी मेला. नंतर लोकांनी त्याचे प्रतीक म्हणून एक मोठी काळ्या पाषाणाची नंदीची मूर्ती बनवून देवापुढे ठेवली. त्या मूर्तीच्या दाढेखाली एका माळ्याची व शेतात भाकरीची पाटी घेऊन जाणाऱ्या एका माळणीची, अशा दोन लहान मूर्ती पण आहेत. त्यावरून वरील गोष्टीचा बोध होतो, आणि म्हणून त्या कड्यास नंदीचा कडा असे लोक म्हणू लागले.





निवेदक : पं. महादेवशास्त्री जोशी

अमरपुरीत देवेंद्राचा दरबार भरला होता. देवांचा राजा इंद्र आपल्या रत्नजडित सिंहासनावर बसून सुखोपभोग घेत होता. अप्सरा त्याच्या मस्तकावर छत्रचामरे ढाळीत होत्या. उजव्या बाजूला देवगुरु बृहस्पती आपल्या आसनावर विराजमान झाला होता. त्याच्यापुढे अनेक ऋषिमुनी सभागृह शोभवीत होते. दुसऱ्या अंगाला राजर्षींच्या मस्तकावरची किरीटकुंडले लखलखत होती. समोर संगीताचा साज जमू लागला होता. देवेंद्राची मुद्रा प्रसन्न आणि उत्सुक होती. नृत्य आणि गायन यांचा आनंद तो आज मनसोक्त लुटणार होता.

पण एवढ्यात अष्टदिक्पाल देव जमावाने दरबारात दाखल झाले आणि त्यांनी देवेंद्राला नम्र अभिवादन केले. इंद्राने त्यांच्यावर नजर टाकली. ते सगळे घाबरलेले दिसत होते. त्यांच्या मुखावर कळा नव्हती. दृष्टीत तेज नव्हते. मनात उत्साह नव्हता. कसल्या तरी भयंकर चिंतेने त्यांचे शरीर आणि मन ग्रासलेले आहे असे दिसत होते. या त्यांच्या अवस्थेचा इंद्राला काही उमज पडेना. त्याने विचारले,

'देव हो, तुम्ही असे मलूल का दिसता ? काय झाले तुम्हांला ? देवराज्यावर कसल्या तरी संकटाची छाया पडू लागली आहे काय ?'

देवेंद्राला आपली स्थिती उमगली आणि त्याने नेमका प्रश्न विचारला हे ऐकून देवांना बरे वाटले. त्यांच्यापैकी एक जण हात जोडून आणि वाणीत कारुण्य आणून बोलू लागला,

'देवेंद्र, देवराज्यावर फार मोठं संकट कोसळू पहात आहे. त्रिपुरासुर दैत्य मेरु पर्वताच्या शिखरावर अति उग्र तप आचरीत आहे. त्याने कामक्रोध जिंकले आहेत. इंद्रिये आवरली आहेत. आहार-विहार सोडला आहे. दोन्ही भुजा उंच उभवून आणि पायाच्या एका अंगठ्यावर उभा राहून तो मंत्र जपीत आहे. त्याची

एकटक दृष्टी सूर्याकडे लागलेली आहे. त्याला देवराज्य मोडायचं आहे. दैत्यराज्य जोडायचं आहे. त्रैलोक्याचं आधिराज्य मिळविण्याची त्याची इच्छा आहे.'

इंद्राने हे ऐकले आणि तो तुच्छतापूर्वक म्हणाला,

'एवढंच ना, मग त्याची काळजी नको. आपण त्याचा तपोभंग करू. मी आता एखाद्या अप्सरेला त्याच्याकडे पाठवतो. तो तिला भुलेल आणि कुत्र्यासारखा तिच्यामागून येईल.'

'देवेंद्र, आपण भलती समजूत करून घेऊ नका. त्रिपुरासुर त्या जातीचा नाही. तो ज्या पर्वतावर बसला आहे, तो मेरू एक वेळ भंगेल, पण त्रिपुरासुर भंगणार नाही. महाराज, स्वर्गावरचे हे संकट सामान्य नाही. आपण ताबडतोब पण योग्य दिशेने त्याच्या प्रतिकाराला उभं राहिलं पाहिजे.'

त्यावर देवेंद्र पुढे काही बोलला नाही. तो स्तब्ध झाला. मनातून घाबरलासुद्धा. ताबडतोब त्याने सभा विसर्जित केली. तो जड पावलांनी आणि अस्वस्थ मनाने स्वस्थानी आला. त्रिपुरासुर त्याच्या मनात भिनला. विचार करकरूनही त्याला प्रतिकाराचा मार्ग सुचेना.

मग त्याने सरळ ब्रह्मलोकाचा मार्ग धरला. विधात्याचे चरण वंदून तो त्याला 'रक्ष रक्ष' म्हणाला. 'तुला कुणी गांजले' म्हणून ब्रह्माने त्याला विचारले. इंद्राने त्रिपुरासुराच्या तपाची आणि महत्त्वाकांक्षेची दुष्ट वार्ता त्याला कथन केली. 'त्या दैत्यपतीचा वध करा किंवा मला पुढची गती दाखवा.' अशी त्याला गळ घातली. ब्रह्मदेवाचे चित्त द्रवले. 'निश्चिंत रहा' असा देवेंद्राला आशीर्वाद देऊन ब्रह्मदेव मेरु पर्वतावर उतरला आणि त्रिपुरासुरापुढे प्रकट झाला.

'दैत्यनाथा, मी तुला प्रसन्न आहे. हवा तो वर माग.'

त्रिपुराने डोळे उघडले आणि समोर ब्रह्मदेवाला पाहिले. तो वरदायी होऊन आला आहे, हे समजून त्याला हर्षाचे उधाण आले. त्याने नमस्कार करून वरदान मागितले,

'माझ्यापाशी सोन्याचे, रुप्याचे आणि लोखंडाचे अशी तीन पुरे आहेत. ती उडती विमाने होतील आणि कोणत्याही शस्त्रास्त्राने त्यांचा भंग होणार नाही, असा मला वर द्या. मी त्या गगनगामी पुरांच्या साह्याने त्रैलोक्यात अजिंक्य होईन.'

ते ऐकून ब्रह्मदेव त्याला प्रत्युत्तर बोलला,

'तू मागतोस तसा वर मी तुला देतो. पण त्यात एकच छिद्र राहील. जो कोणी एकाच बाणाने ही पुरे विंधील, तो त्यांच्यासह तुझाही नाश करील.'

एवढे बोलून ब्रह्मदेव अंतर्धान पावला. त्रिपुरासुराने तप सोडले. मेरु पर्वतावरून तो खाली उतरला. प्रथम त्याने संपूर्ण पृथ्वीचे राज्य मिळविले. पण

तेवढ्याने त्याची भूक शमली नाही. त्याने स्वर्गात जाऊन देवेंद्राला युद्धाचे आव्हान दिले. अष्टदिक्पालांसह सर्व देवांचा थोड्याच काळात पराभव केला. इंद्राला राज्यसिंहासनावरून खाली लोटले. जी गत स्वर्गाची तीच पाताळाचीही केली. तो त्रैलोक्याचा राजा झाला. आता काही जिंकायचे शिल्लक उरले नाही.

मग तो सर्व प्रकारचे उपभोग घेऊ लागला. लोकांना निरर्थक पीडा देऊ लागला. उन्मत्त होऊन त्याने ऋषिमुनींचे आश्रम मोडले. यज्ञयागादी सारी पुण्यकर्मे बुडविली. स्वाहाकार, स्वधाकार बंद पाडले.

स्वर्गातून भ्रष्ट झालेला इंद्र पृथ्वीवर उतरला. भणंग भिकाऱ्यासारखी त्याची दशा झाली. कुठे अन्नपाणी मिळेना. कुणी विचारीना. आपले राज्य परत कसे मिळेल, त्रैलोक्य त्रिपुरासुराच्या पीडेतून कसे मुक्त होईल, याची त्याला विवंचना लागली. तो सगळीकडे वणवण भटकला. फिरता फिरता सह्याद्रीवर आला. तिथे त्याला एक स्वयंभू शिवलिंग दिसले. तो घटकाभर तिथे विसावला. तिथे नाना प्रकारचे वृक्ष दाटीवाटीने उभे होते. त्यांच्या अंगांना बिलगून वेली वर चढल्या होत्या. त्यांच्या फुलांचा सुगंध सगळीकडे दरवळत होता. मंद वारा वहात होता. शितळ झरे झुळझुळत होते. सगळीकडे छाया पसरली होती. आकाश अगदी हाताला लागावे इतके ते गिरिशिखर उंच होते. सगळा निसर्ग निवांतपणे, निश्चिंतपणे आभाळाच्या निळ्या छताखाली नांदत होता.

इंद्राचा आत्मा त्या ठिकाणी प्रसन्न झाला. त्याला वाटले की, हे महादेवाचे स्थान आहे. ऊन, पाऊस, वारा, दव, धुके यांच्या रूपाने सदाशिव इथे क्रीडा करतो आहे. त्याने तिथल्या शिवलिंगाला साष्टांग नमस्कार करून तिथेच तप करावयाचे ठरवले. महादेव या ठिकाणी लवकर प्रसन्न होईल आणि तो प्रसन्न झाल्यावर आपले सर्व मनोरथ पूर्ण करील, असा त्याला विश्वास वाटला. लगेच पद्मासन घालून त्याने शिवमंत्राचा अखंड जप सुरू केला.

काही वर्षे त्याला अनुष्ठानात घालवावी लागली. पण अखेरीस कैलासराणा चंद्रमौळी इंद्रापुढे उभा झाला. इंद्राच्या मस्तकी वरदहस्त ठेवून त्याने त्याला उठवले. इंद्राने आपले गाऱ्हाणे त्याच्या कानी घातले. सदाशिव त्याला म्हणाला,

'तू मुळीच चिंता करू नको. त्रिपुरासुराची मरणघटिका आता जवळ आली असे समज. आजपासून सातव्या दिवशी मी त्याचा निःपात करीन.'

आणि त्याच क्षणी शंकराने भीमरूप धारण करून नंदी आणि शिवगण यांना पाचारण केले. हातामध्ये त्रिशूल घेऊन उभा राहिलेला शंकर काळाग्नीसारखा प्रज्वलित दिसू लागला. त्याने जटाजूट सोडून झटकताच जिकडे तिकडे विजाच विजा चमकू लागल्या. भूतगणांनी आरोळ्या ठोकल्या. सगळे वातावरण दणाणून गेले. त्या धाकाने भूमीवर प्रलयकाळ ओढवतो की काय, असे लोकांना वाटू लागले.

पण त्रिपुरासुराशी झुंजायचे म्हणजे शंकराला एक प्रचंड रथ हवा होता. तो कुठे मिळणार आणि कोणता विश्वकर्मा बनवणार? रुद्राने मग सह्याद्रीचाच रथ बनवला. सूर्यचंद्रांची चक्रे त्याला जोडली. ब्रह्मदेवाला सारथी म्हणून पाचारले. विष्णू बाणरूप होऊन त्याच्या भात्यात शिरला.

त्रिपुरासुराला हे वर्तमान समजले. त्याने दानवसैन्य गोळा केले. आपली तिन्ही पुरे सज्ज केली. अशी सर्व सिद्धता करून तो शंकराबरोबर झुंज घ्यायला निघाला. दोन्ही सैन्ये एकवटली. शंख, दुंदुभी, काहाळा, मांदळ, इत्यादी रणवाद्ये वाजू लागली. सगळीकडे कोल्हाळ माजला. तुंबळ युद्ध सुरू झाले. उभय दळींचे वीर 'धरा, मारा' अशा हाका फोडू लागले. कोणाच्या लोहशृंखला आदळू लागल्या. कोणाच्या तलवारी तळपू लागल्या. कोणाच्या गदा, कोणाचे परशू, कोणाचे त्रिशूल अशी शस्त्रास्त्रे शत्रूंची मस्तके चूर्ण करू लागली.

एवढ्यात त्रिपुरासुर शिवासमोर येऊन थडकला आणि गर्वाने छाती पिटीत शिवाची निंदा करू लागला. 'तू बैलावर बसतोस. स्मशानात निजतोस. भुतांखेतांबरोबर वागतोस. तू रे काय माझ्याशी लढणार?' अशा दुष्ट वचनांनी आपली जिव्हा विटाळीत त्याने शिवावर शस्त्र सोडले. शिवानेही 'घे घे' म्हणत परिघ भिरकावला. त्रिपुराने त्याचे निवारण केले. नीलकंठ क्रोधाने तप्त झाला. त्याने त्रिशूल सोडला. तो प्रलयकालीन विजेसारखा त्रिपुराच्या हृदयावर आदळला. तो मूर्च्छा येऊन धरणीवर कोसळला. एक प्रहर त्याची हालचाल थांबली.

सावध होताच त्याने युद्धाचा पवित्रा बदलला. आपली तिन्ही पुरे त्याने आकाशात वेगवेगळ्या ठिकाणी मांडली. कधी यात, तर कधी त्यात जाऊन तो तिथून बाणांचा वर्षाव करू लागला. सगळे देवसैन्य जर्जर झाले. शिवगणांमध्ये हाहाकार उठला. शिव भीमरूप झाला. त्याचे डोळे खदिरांगारासारखे झाले. विष्णुरूपी बाण त्याने बाहेर काढला. तो पिनाक धनुष्याला जोडून त्याने तिन्ही पुरांवर एकदम नेम धरला. एकाच बाणाने ती फोडून जमिनीवर पाडली. शिवाच्या तृतीय नेत्रातून जे आगीचे लोळ निघाले, त्याने ती तिन्ही पुरे भस्म झाली. त्रिपुरासुरही त्याच आगीत जळून मेला. दैत्यसेना दशदिशा पळाली. युद्ध थांबले. सर्वत्र शांती झाली.

पण या युद्धकर्माने शिवाला खूप श्रम झाले. त्याच्या अंगातून घामाचा पूर लोटला. क्षणमात्र तिथेच बसून त्याने विश्रांती घेतली. एवढ्यात सगळे देव सभोवती जमले आणि शिवाचा जयजयकार करू लागले. 'जय जय भवानीरमणा' म्हणून त्यांनी गायन मांडले. शंकर संतुष्ट झाला. 'इच्छेला येईल तो वर मागा' असे त्याने सर्वांना म्हटले. देव हर्षभरित होऊन म्हणाले,

‘शिवशंकरा, तुझे घर्मोदक जिथून वाहिले, ती सरिता होऊ दे. जगाला पावन करणारे हे तीर्थ बनू दे.’

ते ऐकून शिव म्हणाला,

‘मी आता जलरूप होऊन या प्रवाहात मिसळतो. नदीच्या रूपाने सागराला भेटतो. या पर्वतरूपी स्थावर या सरितेचा उगम झाला म्हणून हिचे भीमरथी असे नाव ठेवा. हिच्या स्मरणमात्रेच मुक्ती मिळेल. या तीर्थात जे स्नान करतील ते अंती कैलासाला पोहोचतील. भीमशंकर हे माझे ज्योतिर्लिंग या ठिकाणी आहे. त्याची प्रेमभावे पूजा करावी आणि संसारात सुखाने नांदावे.’

एवढे बोलताच पर्वतशिखरावरून पाण्याचा लोंढा फुटला. तो खळाळत फेसाळत, वळणावळणांनी पायथ्याकडे निघाला. ताबडतोब त्या ठिकाणी देव, मानव व ऋषी गोळा झाले. त्या सरितेच्या उगमावर स्नान करताना त्यांना परम उल्हास वाटला. आणि त्या दिवसापासून ‘भीमाशंकर’ हे स्थान महान पुण्यक्षेत्र म्हणून पुराणामध्ये गाजू लागले.






# गौतमी गंगा

निवेदक : **पं. महादेवशास्त्री जोशी**

गणपती हा पार्वतीचा लाडका पुत्र. पार्वती त्याचे लडिवाळ हट्ट पुरवी आणि परोपरीने कौतुक करी. त्यामुळे गणपतीला आईचा लळा फार लागला होता. तो तिच्या अर्ध्या वचनात असे. तिचे कोणतेही काम करायला त्याचा पाय नेहमीच पुढे असे. आईवर त्याची विशेष भक्ती होती. तिला थोडेसे जरी दुःख झाले तरी गणपती मनात कष्टी होत असे. आपली आई सदैव आनंदी असावी असे त्याला वाटे.

एक दिवस कैलासाच्या शिखरावर इतस्ततः हिंडून जेव्हा तो घरी आला, तेव्हा पार्वती चिंताक्रांत बसलेली त्याला दिसली. गणपतीला पाहताच तिचे डोळे पाण्याने भरले आणि मुद्रा अधिकच म्लान झाली. गणपतीला काही उमजेना, तो जवळ गेला आणि तिच्या गळ्यात हात घालून म्हणाला,

'आई, काय झालं तुजला? तू अशी कष्टी का? तुझं दुःख काय असेल ते मला सांग, मी ते चटकन निवारून टाकतो.'

पार्वतीने त्याचे मस्तक कुरवाळले आणि त्याला म्हटले,

'बाळ गजानना, अलीकडे भगवान शंकर गंगेच्याच नादात निमग्न असतात. ती त्यांच्या जटाजुटात ठाण देऊन राहिली आहे, त्यामुळे कैलासपती माझ्याकडे लक्षच देत नाहीत.'

'एवढंच ना? मी त्याचा बंदोबस्त करतो. संधी साधून वडिलांचा जटाजूटच मी कापून टाकीन, म्हणजे गंगा आपोआपच त्यांच्याकडून चालती होईल.'

'वेडा आहेस तू! असलं अघोरी काही करायचं नाही. त्यामुळे महादेव खवळतील आणि त्रैलोक्याचे भस्म करायला निघतील.'

'ठीक आहे आई. मी नाही तसं करणार. काही तरी निराळ्याच युक्तीने मी गंगेला घालवीन आणि तुझं दुःख निवारीन. मग तर झालं?'

गणपती विचार करीतच तिथून निघाला. काय करावे, कसे करावे अशा विवंचनेत काही काळ घालवल्यावर त्याला एक नामी युक्ती सुचली. त्याने वरुणाला बोलावून आज्ञा केली की, पृथ्वीतलावर सर्वत्र अवर्षण करायचे आणि फक्त एकोच प्रदेशात पाऊस पाडायचा. आणि तो प्रदेश म्हणजे ज्यात गौतमाचा आश्रम आहे, असा ब्रह्मगिरीच्या आसपासचा भाग.

गौतमऋषी, तपस्वी तसाच शेतकरीही होता. तो त्या प्रदेशात अनेक ऋषिमुनींच्या सहाय्याने मोठ्या प्रमाणावर भातशेती करी. त्याच्या शेतात भरपूर पीक येत असे आणि तो आल्यागेल्या अतिथिअभ्यागतांना मुक्त हस्ताने अन्नदान करीत असे. वरुणाने गणपतीची आज्ञा पाळली. सगळीकडे अवर्षण पाडले. शेतेभाते करपून गेली. प्यायला पाणीही मिळेनासे झाले. ऋषींचे यज्ञयाग थांबले. त्यांना आपापले आश्रम सोडण्याची वेळ आली. सगळे देशांतराला निघाले. गौतमाचा आश्रम समृद्ध आहे, त्याचे शेत महामूर पिकत आहे आणि तिथे कोणालाही दैन्यदु:खाची झळ लागलेली नाही. असे कळल्यावर चहू बाजूंनी तापस मंडळी त्याच्या आश्रमात लोटू लागली. गौतमाने कोणालाही विन्मुख न दवडता उदार अंत:करणाने सर्वांची सोय केली.

एवढे मनाजोगते करून घेतल्यावर गणपतीने आपणही ऋषीचे रूप घेतले आणि तोही गौतमाच्या आश्रमात दाखल झाला. जया नावाच्या एका दासीला त्याने शिष्येचे रूप देऊन आपल्या बरोबर घेतले. या नव्या ऋषीचे ओज आणि तेज पाहून सगळे तपस्वी दिपले. आपले नाव गणेशऋषी असे त्याने सर्वांना सांगितले. अगदी थोड्याच काळात गणेशऋषीचे बस्तान तिथे उत्तम तऱ्हेने बसले. सर्व लोक त्याच्याच तंत्राने चालू लागले. त्यालाच ते आपला पुढारी समजू लागले.

गणपती मग पुढच्या उद्योगाला लागला. एक दिवस गौतममुनी सकाळीच स्नानसंध्या उरकून शेतात गेला होता. भात अगदी कापणीस आले होते आणि डुकरे, भेकरे इत्यादी वन्य पशूंपासून त्याची राखण करणे भाग होते. गौतमऋषी मुखाने वेद म्हणत शेत राखीत बसलेला पाहून गणपतीने जयेशी कानगोष्ट केली. तिने तत्काल गाईचे रूप धारण केले. थोड्याच वेळात एक म्हातारी, मोडक्या शिंगाची आणि पाठपोट एक झालेली अशी एक गाय शेतात उतरून आडव्या जिभेने घोसदार लोंब्या खाऊ लागली. गौतमाने ते पाहिले. त्याला वाटले, ही रोडकी गाय इथे कुठून उपटली? तिने हवा तर पेंढा खावा, पण भात खाण्याचा तिला काय अधिकार? 'हैक, हैक' करून त्याने तिला हाकलण्याचा प्रयत्न केला, पण ती मुळीच हलेना आणि भात फस्त करायचे सोडीना.

गौतमाला तिचा राग आला. पण गाय अगदीच मरतुकडी असल्यामुळे दगडधोंडा मारायची सोय नव्हती. त्याच्या हातात काही दर्भाच्या काड्या होत्या. त्यातलीच एक उचलून त्याने ती गाईवर फेकली. पण दुर्दैव बिचाऱ्या गौतमाचे. त्या दर्भाच्या काडीचा तो ओझरता स्पर्शही गाईला सहन झाला नाही. ती तिथल्या तिथे धरणीवर कोसळली. गौतमऋषी धावतच तिथे गेला, तर गाईने हातपाय ताणलेले आणि मान टाकलेली. धडधडत्या काळजाने त्याने तिच्या नाकाशी हात नेला तो सगळे थंड! फट् म्हणता गोहत्या झाली.

गौतमाला अत्यंत दुःख झाले. त्याच्या सगळ्या कळा एकदम मावळल्या. सारे तपस्तेज एकाएकी लोपले. गोहत्या म्हणजे केवढे महापातक. तो खालच्या मानेने कसाबसा आश्रमात आला. आपल्या हातून घडलेले पापकर्म त्याने सर्वांना निवेदिले. ऋषिमुनी स्तंभित झाले. 'महापाप' असे उद्गार त्यांच्या तोंडून उमटले. इतके दिवस जो पुण्यपावन आश्रम होता, तीच एकाएकी पापभूमी, शापभूमी ठरली. यापुढे क्षणभरसुद्धा इथे रहाणे म्हणजे गौतमाच्या पापाचे वाटेकरी होणे असा विचार त्यांच्या मनात आला. त्यांनी आपली मृगासने, कडासने कवळली, कमंडलू उचलले आणि ते गौतमाचा आश्रम सोडून जायला निघाले.

सगळे मुनी या आपत्प्रसंगी आपल्याला सोडून जात आहेत, आश्रम सुना होत आहे, हे पाहून गौतमाच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू टपटपू लागले. हात जोडून करुण वाणीने तो त्यांना म्हणाला,

'भूदेवहो, मला निराधार करून जाऊ नका. मला या पापापासून मुक्त करा. माझा उद्धार करा. काही तरी मला उपाय सांगा.'

ते पाझरते बोल ऐकून तपस्वी थबकले. सर्वांनी गणेशऋषीकडे पाहिले. त्या सर्वांच्या मते तोच काही तरी उपाय सांगू शकला असता. गौतमही गणेश-ऋषीकडे आर्त भावाने पाहू लागला. गणेशाने त्याला सांगितले,

'गौतमा, तू ब्रह्मगिरी बसून त्र्यंबकेश्वराची आराधना कर. तो प्रसन्न झाला म्हणजे त्याच्या जटेत असलेली गंगा मागून घे. मग त्या गंगेत विधियुक्त स्नान-दान-तर्पण कर. म्हणजे तू गोहत्येच्या पापातून मुक्त होशील.'

गौतमाने मग वेळ लावला नाही. तो ब्रह्मगिरीवर चढला आणि देहाची क्षिती न बाळगता उग्र तप करू लागला. काही दिवस तो वृक्षावरून गळलेली पाने भक्षण करी, काही दिवस पाणीच पिऊन राही. तर काही दिवस केवळ वारा पिऊन निराहार दिवस कंठी. दिवसानुदिवस त्याचे तप वाढू लागले. गंगेला हे समजले. तिचे शिवमस्तकावरचे स्थान डळमळू लागले. गौतमाकडे जाण्याचा दुर्धर प्रसंग आपणावर येऊ नये, म्हणून तिने त्याचा तपोभंग करण्यासाठी अनेक

क्लृप्त्या योजल्या. पण त्यांचा काहीच उपयोग झाला नाही. शेवटी निर्वाणीचा उपाय म्हणून तिने जटिका नावाच्या आपल्या दासीला ब्रह्मगिरीवर पाठविले.

जटिका तिथे आली ती गौतमपत्नी अहल्येचे रूप घेऊन. तिने गौतमाची विनवणी सुरू केली. 'मी आश्रमात एकटी पडले आहे. मला भय वाटत आहे. सर्व बाजूंनी आपली दैन्यावस्था आली आहे. तेव्हा तुम्ही कृपावंत होऊन माझ्या-बरोबर आश्रमात चला.' असा तिने सारखा धोसरा लावला. इतर कोणी नव्हे, तर आपली धर्मपत्नी बोलत आहे, असे समजून गौतमाने डोळे उघडले.

पण थोडा वेळ तिच्याकडे टक लावून पहाताच त्या प्रकारातले कपट त्याच्या निदर्शनास आले. ही आपली पत्नी नसून भलतीच कोणी त्या रूपाने आली आहे, हे लक्षात येताच गौतमाच्या क्रोधाचा अंगार फुलला. त्याने कडाडून तिला म्हटले,

'दुष्टे, अशा रीतीने माझं तप मोडायला आलीस काय? जा नदी होऊन पड.'

गौतमाची ही शापवाणी ऐकून जटिका घाबरली. तिने त्याच्यापुढे निजरूप प्रकट केले आणि त्याचे पाय धरले.

'ऋषिश्रेष्ठा, माझ्या अपराधाची क्षमा करा. मला उःशाप द्या. मी गंगेच्या घरची दासी आहे. तिच्या आज्ञेमुळे मला ही नको असलेली गोष्ट करावी लागली.'

गौतमाचे दयार्द्र अंतःकरण लगेच विरघळले.

तो म्हणाला, 'ज्या वेळी भगवान शंकर प्रसन्न होऊन आपली गंगा इथे वाहवील, त्यावेळी तू तिच्यात मिसळून जा म्हणजे पावन होशील व उद्धरून जाशील.'

नंतर काही कालाने एक दिव्य तेजाचा झोत ब्रह्मगिरीच्या शिखरावर पडला आणि त्यातून साक्षात कैलासराणा शिवचंद्रमौळी गौतमापुढे प्रकट झाला. त्याच्या हातात त्रिशूल-डमरू होते, मस्तकी जटाजूट होता. त्यात पार्वतीच्या मनाला व्यग्र करणारी ती गंगाही होती. गौतमाने त्याला डोळे भरून पाहिले आणि 'धन्य दिवस उगवला' अशा हर्षयुक्त भावनेने साष्टांग प्रणिपात केला.

'गौतमा, ऊठ! मी तुला प्रसन्न आहे, तुला इष्ट तो वर मागून घे.' शिवशंकर बोलला.

'भगवन, माझ्या हातून गोहत्येचं महापातक घडलं आहे. त्यातून मुक्त होण्यासाठी तुमच्या जटेतली पापहारिणी गंगा मला द्या.'

गौतमाला 'बरे' म्हणून शंकर गंगेला बोलला, 'तू या पर्वतशिखरावर उतर आणि गौतमाला पापमुक्त कर.'

गंगेला ते मोठे संकट वाटले. तिने निराळाच मुद्दा पुढे केला, 'महादेवा, मी तुमची स्त्री आहे. भक्त झाला म्हणून काय झाले? त्याला आपली स्त्री द्यायची? हे काय दान झाले का रीत झाली?'

 'ते काहीही असो. माझ्या भक्तांचं काम तू केलंच पाहिजेस.'

पण गंगा काही केल्या ऐकेना. ती शिवाच्या जटेत खोलवर जाऊन बसली. शंकराला क्रोध आला. त्याच्या सर्व अंगप्रत्यंगातून चैतन्य नुसते थरथरू लागले. सहजच त्याचा एक पाय उचलला आणि चारी भुजा उंच झाल्या. त्याने तांडव सुरू केले. 'तत् थै तत् थै' अशा ठेक्यात पावले पडू लागली. ब्रह्मगिरी कंपित झाला. भूमीला हादरे बसले. वृक्षवल्लींवरची फळे-फुले पटापट गळू लागली. त्याच्या बाजूबंदांचे आणि गळ्यातले नाग भोवंड येऊन विष ओकू लागले. सूर्याचे तेज मंद पडले. आकाशाला तडे जातील की काय, असे वाटू लागले. गौतम ते पहाता पहाता भ्याला, स्तब्ध झाला. स्वर्गातल्या देवांचीही आसने डळमळू लागली. 'महारुद्रा शांत हो' असा स्वर्गातून दीन आक्रोश उठावला. मग शंकराने प्रथम गुडघे टेकले, नंतर कोपर टेकले, आणि ब्रह्मगिरीच्या शिखरावर आपल्या जटा आपटल्या.

त्यासरशी जटेतली गंगा पर्वतावर पडली आणि खाली झुळझुळू लागली. त्या दिवशी माघ शुद्ध दशमी ही तिथी होती आणि भर मध्यान्हाची वेळ होती. कृतयुगाची दोन लक्ष वर्षे लोटून गेली होती. भगवंताचा कूर्म अवतार चालू होता आणि देवगुरु बृहस्पती सिंह राशीत होता.

अशा प्रकारे ब्रह्मगिरीवर गंगा प्रकट झालेली पाहताच स्वर्गात दुंदुभी वाजू लागल्या. देवांनी पुष्पवृष्टी केली. शिवाचा क्रोध शांत झाला. गंगेला गौतमाच्या स्वाधीन करून त्र्यंबकराज शंकर कैलासाला निघून गेला. पार्वतीचे मन प्रसन्न झाले. मातृभक्त गणपतीने योजलेला कार्यभाग सिद्धीस गेला. मातेची मुखमुद्रा उल्हसित पाहून तो कृतार्थ झाला.

पण नाइलाजाने मनाविरुद्ध ब्रह्मगिरीवर उतरलेली गंगा गौतमाला सुखासुखी उद्धरील, ही गोष्ट शक्य नव्हती. शिवाची पाठ फिरताच ती तिथल्या तिथे गुप्त झाली. गौतमाच्या वाट्याला हे सगळे आरशातले धन ठरले. आली ती काय आणि एकदम नाहीशी झाली काय, याचा त्याला अत्यंत खेद झाला. तो तिथेच खाली बसला आणि त्या अदृश्य गंगेला मनोभावे प्रार्थू लागला.

'हे शंकरप्रिये, शंकराने आपल्या जटेतून बलात्कारानं काढलं म्हणून तू रागावलीस काय? माते, तू रागावलीस तर माझं मरणच ओढवलं, माझा उद्धार करायचं सामर्थ्य तुझ्यावाचून दुसऱ्या कोणालाही नाही. देवी, कृपा कर, पुन्हा प्रकट हो. तुझा प्रवाह खळाळू दे. त्यात स्नान करून मला मुक्त होऊ दे.'

ही तळमळीची प्रार्थना ऐकल्यावर मग मात्र गंगेला रहावले नाही. ती तिथल्या औदुंबराच्या मुळात प्रकट झाली. गौतमऋषी हर्षाने उचंबळला. त्याने आपल्या पत्नीला, शिष्यांना, ऋषिमुनींना सर्वांना बोलावणे धाडले. सर्वांच्या समक्ष तीन प्रदक्षिणा करून गंगेत बुडी मारली. तो सतेज होऊन तिच्यातून बाहेर आला.

आपण पापमुक्त झालो म्हणून त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू खळाळले. नंतर तिथे जमलेल्या सर्वांनी 'हर गंगे' म्हणून तिच्यात बुड्या मारल्या. गौतमाने खूप दानधर्म केला आणि गंगेला हात जोडून म्हटले,

'आजपासून तुझे नाव गोदावरी. तू इथून पूर्ववाहिनी होऊन सागराला भेटायला जा. सर्वांचं पाप–ताप दूर कर. सर्वांचं दैन्य दारिद्र्य नष्ट कर. आणि तुझ्या दोन्ही तीरांवर सर्वत्र समृद्धी नांदव.'



## अनुक्रम

संग्राहिका : **सौ. सुभद्रा पाटील**

सोमवारा दिशी कोण पापीन न्हाली
देवा माझ्या शंकराची पूजा बेलाची ढासळली

देवाच्या देवळात उभी राहिली एका कोनी
देवशंकरा ईनन्तिी नेत्र उघडा देवा दोनी

देवाच्या देवळात उभी राहिली सवळचानं
देवा माझ्या शंकराला करी इनंती जिव्हाळ्यानं

सोमवारा दिशी मी ग वार त्यो गाथीयीला
बंधु महादेवाला गेला दुरडी बेलाची विसरला

ईश्वर पूजियीला कुणी पूजीला उनायाचा
कंत देवाच्या गुणायाचा

ईश्वराच्या पिंडीवरी बेल वाहिला कुणी ताजा
पुत्र मागूनी गेला राजा

ईश्वराच्या पिंडीवरी बेल वहाती मी जाता जाता
जोडा संचिता संगं हूता

वरतामधी वरतं वरतं (व्रत) सोमवार आवडीचं
शंकराच्या पिंडीवरी बेल वहाती मी तोकटीचं

सोमवार दिस मला सोन्याचा उगवला
देवा माझ्या शंकराला पूजा बेलाची महादेवाला

उन्हाळ्याचं ऊन पाणी मिळेना पाखराला
देवा माझ्या शंकराच्या झरा लागला डोंगराला

देश सारा धुंडीला सपनी गोसाव्याची जट
देवा माझ्या म्हादेवाचा उंच डोंगर पाच फूट

वर संभूचं शिखईर खाली बळीचं देवईळ
शंकराचे गिरजाबाई तुझं माहेर जवईळ

तेल्या भुत्याची कावईड चढती मुंगी घाट
शंकराची गिरजाबाई पाया पडाया बिगी ऊठ

चालल्या बारा मोटा शिंगणापूरच्या तळ्यायाला
देवा माझ्या शंकराचा ववणा आलाय कळयायाला

शिंगणापूरचा कुळस्वामी मला लागला कशापायी
देवा माझ्या शंकराला नवस केल्याती बाळापायी

शिंग वाजलं शिंगणापूरी कर्णा वाजला कोल्हापूरी
देव जोतिबा काळभैरी मुजरा करीतो किल्ल्यावरी

नवस करू गेली शंभू नवस तुला ठावं
देवा माज्या शंकरा बाळ दिल्याला सुखी ठेव

आठ दिसाच्या सोमवारी लई आनंद माझ्या घरी
देव माजा कुळस्वामी बेल फुलाच्या गादीवरी

आठ दिसाच्या सोमवारी देव शंकर नंदीवरी
टाकी नजर खेड्यावरी

आठ दिसाच्या सोमवारी माजी शिल्लक नव्हती सोजी
शंभू जेवाय झालं राजी माजी आवडीनं खाल्ली भाजी

कोरी ग सवाशीण मला मिळंना खेड्यापाड्या
शंकराच्या गिरजायीला चिट्ट्या धाडीती तिच्या वाड्या

शंकराच्या पिंडीवरी बेल वहातो मी तोकटीचा
पोटीच्या बाळायाला औक मागीती दुपटीचा

असलं ठावं असता लेकी जलमा आली नसती
शंकराच्या बागेमंदी झाड बेलाचं झाली असती

संभू देव ग म्हातायीरा गिरजा बोलती आईयीला
जोडा कुणी ग पाहीयीला

सोमवारा दिशी नगं पापीणी पाणी न्हावू
पोटी पुतर (पुत्र) पाठी भाऊ

सोन्याच्या करंडाला त्येला झाकणं चांदीयीची
हळदी कुंकवासाठी सेवा करीतो शंकराची

बारा कोसांची प्रदक्षिणा बाई मी उभील्या ताठ्यीली
देवा माझ्या शंकराची भेट धेवूशी वाटयीली

म्हादेवाला गेले सया म्हणत्या काय केलं
बारा मोटांच्या तळ्यायात भांडं ध्यायीचं उजाळलं

सकाळी उठूयीनी माझी नजर खालयीती
देव शंकर कुळस्वामी ध्वज वाऱ्यीनं हालयीती

तेल्याभुत्याची कावईड मुंगी घाटाला थटईली
शंकराची गिरजाबाई पाया पडाया उठईली

कुळस्वामीच्या दरबारात बाई मी मुठीनं पेढे वाटी
नवस पोटीच्या बाळासाठी

सोमवारा दिशी नीट जाती मी म्हादेवाशी
हाती दुधायाचा तांब्या उभी राहिली नंदीपाशी

हातात बेलतांब्या कोण शिखरावरनं गेला
पाठीच्या बंधूजीनं देव शंकर गुरू केला

शिंगणापूरच्या वाटं आंबा लागला इसाव्याचा
देवा शंकराचा चढती डोंगर गोसाव्याचा

गिरजाबाईयीची तिची सदर सोन्यायाची
देवा माझ्या शंकराची येती कावड मानायाची

देवा संभूच्या देवळात सोन्यायाचं काटं
कुळस्वामीच्या पिंडीयीला बाळ नवसाचं घाली खेटं

कोण शंभूच्या पिंडीवरी बेल व्हातीया एकयीली
माझी ग मैनाबाई माता पुत्राला मुक्याल्याली

संभूच्या शिखराला बया मालन माझी गेली
हळदी कुंकवाची रास लंडूनी मला दिली

सकाळी उठूयीनी धर्म करावा पीठायीचा
शंकर माझा देव साधू आलाय जटायीचा

संभूच्या शिखराला धज लावीली धोतराची
शंकर देवायाला जोडी मागीती पुतराची

संग्राहिका : **श्रीमती शांताबाई मंत्री**

चला जाऊ पाहू भोळ्या शंकराचा वाडा
त्याच्या ग मस्तकी पडला नागिणीचा येडा

सारीपाटाचा डाव मांडीला ग हौसेनं
पारबतीनं जिंकीयेला भोळा सांब खुबीनं

गिरजानारीसाठी येडा झालाय सांब भोळा
भिल्लिनीच्या मागोमाग आपुन नाचतूया खुळा

चला जाऊ पाहू भोळ्या सांबाची ग खोली
भिल्लीण झाली नार तिथं पारबती निजली

भोळा म्हनू भोळा कसा बाई ह्या शंभूला
पारबतीच्या काळजात त्यानं बांधिला बंगला

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

राजा मंदी दक्ष राजा करीत होता कारभार
त्या राजाला सात कन्या ऐका त्यांचा विचार

राजा विचारी कन्येला भाग्य कुणाचं खातो
तुम्ही सांगा हो मजला खरं
आम्ही खातो तुमचं भाग्य कन्या बोलल्या सत्वर

सातवी कन्या गिरजाबाई रुसून बसली सुंदर
त्या राजाला राग आला राजा झाला लाल नंबर

प्रधानजीला हुकूम केला जावं तुम्ही देशावर
भलता सलता आणा म्हातारा करा गिरजाचं स्वयंवर

धुंडीत धुंडीत प्रधान गेले गाव लागलं शिंगणापूर
उघडे संन्यासी देव तिथं निजले होते राखेवर

त्या समयी ते उठून बसले सत्वर नंदीवर
गांजा तंबाखू आणा म्हणाले गुडगुडी लौकर

गिरजाबाईचं वराड आलं ऐका चार हजार
डमरू त्रिशूळ नाचू लागले मातेच्या समोर,

तीच माता पार्वती आदिशक्तीचा अवतार
ब्रह्मा विष्णू महेश्वर महादेव अवध्याहुनी थोर

हर हर हर शिव शिव शिव स्वार झाले नंदीवर
गिरजाबाईचं लगीन झालं सरला वेडा अवतार

भर विशीच्या भरात शंकर रूप दिसे दाणेदार
त्या रूपाला भाळून पडती नारी धरणीवर

गिरजाबाई सुंदर बारा का वर्साची उमर
नेसली पिवळा पितांबर अंगी चोळी बुट्टेदार

पायामंदी बिचव्याचा झंकार
गळ्यामंदी नवरत्नाचा हार

कपाळी कुंकवाची कोर
नाकात नथनी सर्जेदार

डोळ्यामंदी काजळ भारोभार
शिरी मोत्यांची झालर

चुंबळीवर सोन्याची घागर
बारा वर्साची सुरत दाणेदार

गिरजाबाईची साडी सव्वीशेर नाजूक कंबर
निरी पडली शंभर नाजूक चुडा लेणार

संबूदेव नवरा झाला चिठ्ठ्या गेल्यात देशावरी
नवरा झालाय शिखरावरी

म्हातारा महादेव काठी घेऊन बसला
संबूदेव नवरा झाला

संबूदेव नवरा झाला हालती त्येची दाढी
गिरजा दवन्याची काडी

संबूदेव नवरा झाला जटा लोळती भुईला
वर पित्यानं पाहिला

संबूदेव नवरा झाला हलती त्येची मान
गिरजा केवड्याचं पान

आंब्याला आंबे आले चिंचेला फुलवरा
संबू झालाया नवरा

महादेव पारबती बसल्यात गाडीत
वाट बेलाच्या झाडीत

संग्राहिका : **श्रीमती राधाबाई कुळकर्णी**

आठा दिसाच्या सोमवारी दिवस सोन्याचा उगवला
भोळा माझा महादेव बेलानं गर्द झाला

आठा दिसाचा सोमवार मनात आठवा
महादेवाच्या पूजेला दुरडी बेलाची पाठवा

आठा दिसा सोमवारी बेलाचा गुंफी हार
मामंजी सासऱ्यांना शिवाची भक्ति फार

आठा दिसा सोमवारी दर्शनाला येती जाती
भोळ्या ग शंकराच्या अर्ध्या अंगी पारबती
जटेतून गंगा व्हाती

अर्ध्या अंगी पार्वती जटेतून गंगा व्हाती
भोळ्या ग महादेवाच्या मांडीवरी गणपती

संग्राहिका : श्रीमती शांताबाई आंग्रे

पहिली माझी ववी मी का गाईन नाजुक
संभूदेवाच्या पूंजला फुलं चढली साजुक

संभूदेव म्हणीती ग गिरजा नारीला येतो राग
भिल्लीणी तुजं रूप डोंगरी झाला बाग

माझ्या घरी पाव्हणा कैलासीचा आला पती
त्येला बसायाला घालीते चंदनाची पाटपेटी

देवाला निजायाला घातला पितळी पलंग
गिरीजानारीच्या हातात रेशमी दुपट्टा सणंग

हात मी जोडीते साळ्याच्या त्या मागाला
सोमवारी गुंफीयलं एक मुंडासं दोघांला

आंबल्या बारशीला दवणा वडीती गोड्यानं
संभू पावावं जोड्यानं

संग्राहिका : सौ. मालतीबाई दांडेकर

गिरजा माळ्याची गंगाबाई कोळ्याची
सख्या दयाळाची नाव चाले सत्वाची

शंभूचं शिखर बेळीरायाचं देऊळ
हिंगनापुरचा बाजार गिरजा नारीला जवळ

हात मी जोडीते साळ्याच्या मागाला
एक मुंडासं दोघांला

संग्राहिका : सौ. गंगूबाई बोबर

महादेव पारवती बसलेत गाडीत
वाट बेलाच्या झाडीत

चिंचेला आल्या चिंचा आंब्याला आले घोस
केला संबाला नवस गिरजा नारीला दिवस

महादेव पारबती जोडा दोहींचा संगीन
देवळाच्या पुढं भेट मोडिली नंदीनं

चला जाऊ पाह्या भोळ्या शंकराचा वाडा
त्याला नागीनीचा येढा

चला जाऊ पाह्या भोळ्या शंकराची खोली
शंकराला विडे देता पार्वती झोपी गेली

उजेड पडला हिंगनापुराच्या तळ्याला
गिरजा पुशिती माळ्याला आला दवना कळ्याला

उजेड पडला हिंगनापुर नगरात
चंद्रावळी महालात दिवा जळं सारी रात

संबूचं शिखर दिसतं आर पार
नवा रतनाचा हार संबू झोको गिरजावर

संबूचं शिखर शेंड्याला वाकडं
मधी दवन्याचं झाड गिरजा नारीनं काढीलं

संबूच्या शिखरावरी दवना येली गेला
गिरीजानारीच्या पातळाला करारी रंग देला

संबाचं शिखर दिसतं पिवळं
वाळतं शिखरावरी गिरजा नारीचं सवळं

संभाच्या शिखरावरी चरताती ढवळ्या गाई
अंदान दिल्याल्या तुजला गिरजाबाई

जोड मोटेचं पानी संबू देवाच्या मळ्याला
गिरजा नार बोलती दवना कशानं वाळला

कोळी मनू कोळी कशानं ह्याय उना
शिकारी लावितो चुना संबू देवाचा मेव्हना

शिखराचा संबू भोळा मनू नाही
आयाशी गंगाबाई त्याच्या जटामधी हाई

भोळ्या महादेवा भोळ्या तुमच्या करामती
अर्ध्या अंगी पारबती जटामंदी गंगा न्हाती

अर्ध्या अंगी पारबती जटेत गंगा न्हाती
देवा शंकराचं कवतीक सांगू किती

शंकरानं धावा केला जसा पहाड कोरून
देशात गंगाबाई आली कैलासावरून

देवा या शंकरानं जटा कैलासी आपटिली
देशात प्रगटली गंगा माय

गंगाबाईचं पानी जशा दुधाच्या उकळ्या
देवा या शंकरानं जटा सोडिल्या मोकळ्या

भरली गंगामाय पानी ढवळं ग कशानं
आंघोळ केली सये जटेच्या गोसायानं

दोघी बायकांचं संबूदेवाला सुख
गिरजा नारीला दुख झालं या सवतीचं

गंगा ग गिरजा दोघी भांडती सवतीपन
संबाजी राजा माजा ऐकितो कवतीकानं

गंगा ग गिरजा भांडती सवती हेवा
गिरजाच्या शिरजोरपना ऐका तुम्ही महादेवा

गंगा ग गिरजा दोघी भांडती सवती
गंगोच्या पान्याला गिरजा वडील लवती

भयान्या वनामंदी शंकर मांडी डाव
पार्बती करी न्याव जितीला महादेव

महादेव पारबती खेळती येकी बेकी
गिरजा नार पक्की संबाचे डोळे झाकी

सोंगटी खेळताना पहिला डाव गिरजाचा
जितून नेला बाई ढवळा नंदी शंकराचा

हाक जी मारली शिकरीच्या संबाजीनं
कान देला बाई निरवाङ्गीच्या नंदीनं

सोंगटी खेळताना सोंगटीला बारा फासे
भोळा महादेव गिरजा मनामधी हसे

सोंगटी खेळताना सोंगटीला बारा डावू
भोळ्या शंकराला नको गिरजा येड लावू

झाडाची सावली झाडाला अभिमान
भोळ्या माझ्या संभाजीला गिरजा घालती हुमान

रुसला संबूदेव वनी बांधिला मठ
याला समजाया चालली गिरजा गवळ्याची धट

भयान्या वनामंदी शंकर सोडी जटा
पार्वतीच्या मोटा जाऊन धरीला आंगोटा

महादेवा जाया भाला भाला वन
गिरजा गोंडनीनं संभा काढिला धुंडून

अरून्या वनामंदी देव बसले जाऊन
भिल्लनीचं रूप गेली गिरजा घेऊन

बारा वर्स झाली संबूदेवाचं तप
इनविती देवाला गिरजा भिल्लनीचं रूप

संबूदेव या मनीती दम दम भिल्लिनी
तुझ्या केसाचे आकोडे मला वाटती गिरजावानी

संबूदेव गेला रागं गिरजा नार त्याच्या मागं
येका कपारीला दोघं

भोळ्या महादेवा भोळं तुझं देनं
सापडलं बाई मला बेलामंदी सोनं

संग्राहक : **श्री. ब. गं. चौधरी**

महादेव म्हणे उभी ग उभी ग भिल्लणी
दंडावरी वेळा माझी गिरजा तुझ्यावाणी

महादेव म्हणे नार कुणब्याची आभांड
सोमवारी न्हाली ओली झाली माझी पिंड

भोळानी महादेव भोळी आहे तुझी भक्ती
मस्तकी वाहते गंगा शेजेला पारबती

भोळानी महादेव याला भोळानी म्हणू नयी
यांच्या जटामंधी गुपीत गंगामाई

लंबे लंबे जटा कोण वागवितो जोगी
योच्या जटामंदी गंगा भागीरती दोघी

महादेवाने जटा आपटल्या ठायी ठायी
याला आकळेना आभांड गंगाबाई

श्रावणमासात पहिला सोमवार पडे
महादेवाच्या पिंडीवरी सव्वा लक्ष बेल चढे

संग्राहक : **श्री. भगवंत ठाकरे**

महादेवाच्या वाटेनं नाही खडे गोटे
पोहा गरजत येते शंभूच्या नावाचा

महादेवाच्या वाटेनं कापराचा पुडा मुंगयानं येळला
जन्मजन्मी जोडा पाण्यानं तोडला

कापराची पुडी धाडू कोण्या हाती
शंभूच्या भेटीसाठी येणं केलं रातोराती

महादेवाच्या वाटेनं सांडीयलं जीरं
पोहा चाले थीर थीर

महादेवाच्या वाटेनं सांडीयले जवस
नेते जोडयानं नवस

महादेवाच्या वाटेनं सांडीयल्या तुरी
भक्ती केली पुरी

महादेवाच्या वाटेनं सांडं पोहा याचा
पोहा चांदियाचा शंभूच्या नावाचा

महादेवा पारबती चौरस खेले राती
भोळे शंकर पडले हाती
सोडला सोडला पोटीचा पोहरा
शंभू मायबाप दिल्लीचा सोयरा

सोडली सोडली पोटीची सकी
तुले वाहू केली खारकेची मुठी
सोडला सोडला शेजीचा भरतार
तुले वाहू केला नवा रतनांचा हार
संभाजीची शाल हिरवी कंकर
धवडया घोडयावर शंकर
पारबतीचा चुडा कशानं टिचकला
चौसर खेळता हात दुमता पडला
पारबतीचा चुडा केसाहुनी बारिक
शंभू महादेवा लेण्याची तारीफ

संग्राहक : श्री. पां. द. खांडगीर

अंगण भरूनी वाळती साळी दाळी
देवा शंकराचा आला उत्सव जवळी
उशीर लागला शंकराचे देवळी
बोलत व्हत्ये गुज पारवती जवळी
जिवाला जडभारी नका आणू वैदवाणी
देवा शंकराच्या न्हाणीचं आणा पाणी
शंभू शंभू म्हणून हाका मारिते दांगट
हातात बेल तांब्या गिरजा येगं सुंगी घाट
माहेरीचा देव आम्हा लेकीला कशासाठी
बाईनं माज्या केले नवस भाच्यासाठी

संग्राहिका : सौ. शुभा वाजपेयी

महादेव पार्वती खेयती एकी बेकी
पाखंडी पार्वती महादेवले लिघं जिकी
सोया रे महादेव भोयी तुनी माता
तुना चलमले नही पूजी जय गाथा
बियाबानमधी उतरनं भीलवान
पार्वती कशी म्हने देवा तुनं गोतं उनं
महादेव पार्वती दोघी करिती विचार
पुतराबीगर कसा जाईल संवसार
महादेव कसा म्हने कसं हुईन पारवती
पोटे पुत्र नही कोनी करेना उजरागती
पार्वती कसी म्हने कसं हुई रे महादेवा
पोटना पुत्रबिना कोन करनार सेवा

संग्राहक : **श्री. बाजीराव पाटील**

व्रतामंदी व्रत सोमवार व्रत भारी
बेलाचं झाळ दारी शिवाच्या माथ्यावरी

व्रतामंदी व्रत शिवरात्री व्रत भारी
बेलाची तीन पानं चांदीची सुपारी

चला जाऊ पाहू काशीतलं तयं
सोन्याचं सीताफय पान्याच्या वरती खेयं

चला जाऊ पाहू काशीतला नंदी
बाळापूरचा किल्ला बांधला पान्यामंदी

चला जाऊ पाहू काशीतली रेती
इशीनाथाच्या देवळाले सोनं लागलं किती

जाते ईश्वरा तुले सुपारीचा डाव
शिवरात्री पारन्याले झाले नवरे महादेव

वलवले गहू दयतो कारनाले
महादेव झाले नवरे शिवरात्री पारन्याले

संग्राहक : **श्री. ये. स. झांबरे**

म्हातारा संबुदेव दाडी लोळती भुईला
गिरजा बोलती माईला

म्हातारा संबुदेव दाडी लोळती केरात
गिरजा जानीच्या भरात

म्हातारा संबुदेव हालती त्याची मान
गिरजा बेगडाचं पान

म्हातारा संबुदेव गळती त्याची लाळ
गिरजा मसुराची डाळ

वळीच्या शिकरावरी संबुदेव सोडी जटा
गिरजा नारीचा हिय्या मोटा

संग्राहिका : **सौ. लीला खन्नाडे**

संसार खेयथीता पैला डाव गीरजाचा
जिकावून नेला ढवळा नंदी शंकराचा

संसार खेयथीता संसाराचे बारा फासे
गिरजीव आला डाव शंकर मनामंदी हासे

अरन्या वनात शंकर सोडे जटा
समजाया आला गेला गिरजाचा हिय्या मोठा

अरण्या वनात शंकर करे तप
समजाया आल्या गेल्या गिरजा भिल्लनीची रूपं

चंद्रना सेनायाच्या हिऱ्या पलंगाना सईजाई
वचन देऊ गेली गिरजारानी सई

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

महादेवाला जाता सरके चंदन
संबाचं नाव घेता अवघे तुटले बंधन

महादेवाच्या वाटेनं खारकाचे बाई घोस
मह्या बाळराजाला कावडधाला येकादस

बळी महादेवाचा दोहींचा एक रस्ता
मधी राहिला गुमास्ता

महादेवा जाया झाली दर्शनाची दाटी
शेजी तू माजे बाई दवना घे आळवटी

संबूच्या शिकरावरी बेल दवना वाहिला
देवाच्या नारीनं संबू जोडयानं पाहिला

शिकरीचा संबू मानदेसीला गेला कंदी
हारपला त्याचा नंदी

गिरिजाबाई माळियाची गंगाबाई कोळियाची
सख्या मह्या दयाळाची नाव चाले सतवाची

देसामंदी देस मानदेस बरवा
बारीक दवन्याचा गिरजा येचिती सरवा

माळी मोट मारी गिरजा नार दार धरी
पानी जातं बाई दवन्याच्या रोपावरी

संबू मनू संबू हाका मारितो कोळी
संबू शिकराजवळी दवन्याला पानी वळी

संबू मनू संबू हाक मारितो बळी
संबू शिकराच्या तळी वाटीतो दवना गोळी

पाचा कनसासरी महादेव गेला चोरी
काय सांगू गिरजा बळी आलाय अंगावरी
गोफनीनं गुंडे मारी

शिपायाचा साज केलास गिरजाबाई
वानीचा हुरडा कुनबी मोडू देत न्हाई

शिकरीचा संबू मानदेशीचा मोकाशी
करतो दवन्याच्या राशी

देसामंदी देस मानदेस काटवन
गिरजा आपलं वतन

संग्राहक : श्री. रमजानखान महंमदखान

वेरूळ ह्या गावाची काय मी सांगू ख्याती
घ्रुश्णेश्वराच्या देवळात सांज सकाळ वाजंत्री

घ्रुश्णेश्वराच्या देवळात कोरीव काम फार
महादेवाच्या ग पिंडीवर चार गाईचे खूर

तिन्ही ग सांजा झाल्या उभी दारात कपिला
तिचे दूध देते घ्रुश्णेश्वराच्या नैवेद्याला

वेरूळ गावची बढाई सांगते मी ज्याला त्याला
आपल्या दुधाचा अभिषेक घ्रुश्णेश्वराला

संग्राहिका : कु. शालिनी देशमुख

आठा दिसा सोमवारी गंगा येती परळीला
देवा माझ्या वैजूबाच्या गोसायाच्या आंघुळीला

हे ग फुलारीनबाई बेलाचे ग गुंफ हार
देवा माझ्या वैजूबाचा गोसायाचा सोमवार

केशरी ग लावी गंध अक्षत न झळझळी
देव वैजुबा ग माझा राजा पहावा संध्याकाळी

हरिहर तीर्थ काठ वल्ला कशानं झाला
देव वैजुबा माझा जटा नियळीत गेला

परळी गावामध्ये कोन भाग्याचा नांदतो
देवा माझा वैजूबाचा नित्य चौघडा वाजतो

परळी गावामध्ये कोन नांदतो खुशाल
देवा माझ्या वैजूबाची दिवसा जळती मशाल

काय सांगू बाई परळीची महिमा मोठी
देवा माझ्या वैजूबाच्या देऊळाला गारगोटी

देवाच्या देऊळात ही ग पारबती बसंना
अशी कापूर भस्माची तिला गरदी सोसंना

गोपीनाथ भोयऱ्यात वैजनाथ ग उभाटी
अशी जगमित्र नागांनी देली मैदानी राहुटी

महाशिवरात्रीच्या दिशी घरोघरी ग बि-हाड
देवा माझ्या वैजूबाचं दीनानाथाचं व-हाड

सकाळी उठूनी लोक जाती ग भुज-याला
देवा माझ्या वैजूबाला झोप लागली राजाला

पारवतीच्या सरीचं सोनं आहे शेरभर
देव वैजूबा माझा परळीचा जहागीरदार

माय माझ्या पारवतीची सखे जोडवी वाजती
देवा माझ्या वैजूबाच्या नंदी गढीचे बुजती

संग्राहक : डॉ. भाऊ मांडवकर

कापराची जोत करते लाही लाही
चव-याच्या गडाकर मामामाश्याची लढाई

कापरची जोत कवळी लस लस
गेला परिमळ दूर भोळा शंकर झाला खूस

उदाकापराचा परिमळ सुटला सुटला
चव-याच्या गडावर देव गादीचा उठला

चव-याच्या वाटीनं भले भले आजन
गिरजा करे ताट संभा करे भोजन

देव महादेव सालाचा नवरा होते
हळदी कुंकवाचे थापे पाहाडले देते

शिवरातीच्या राती जिवाले काचनी
सांगा सांगा भक्तजन संभाची बातनी

शिवरातीच्या दिशी गिरजाई उपासी
कशा सोडू मी बारशी

काळं काळं कुट समुदुराचं पानी
झ्यारी बुडवता थराळली गिरजा रानी

काशी काशी करता काशीत काम हाये
अत्मा सोधुनिया पाहे गंगा जटातुन वाहे

काशी काशी करे काशीतला गोटा
शंकरावाचून देव कोनी नाही मोठा

काशी काशी करे काशीत काळं पानी
शंकरावाचून देव नाही कोनी ग्यानी

तान्या माह्या बाळा ये माह्या जवळी
तुले ठेवतो घरी मी जातो धवळागिरी

तान्या माह्या बाळा लडू लडू आला
गिरजा मातेनं तुले केला दूधपेढा

येतो देवा येतो संगं लेकरं लेकरं
चवऱ्याच्या गडावर तुह्या पायाचे चाकर

येतो देवा येतो अज्ञान लेकरू
चवऱ्याच्या गडावरी माही दैना नोको करू

येतो देवा येतो येतो तुह्यावरी
सोनियाची सुरी नोको ठेवू शातीवरी

सोनियाची सुरी मारली छातीत
आतड्याचे घोस गिरजाच्या वटीत

गोंगलाची पाटी गिरजाच्या डोक्यावरी
रूप झाला होता थोर भारी नईवरी

गिरजाईचा मोती हारपला राती
घेते खाऱ्याची नडती

गिरजाईचा मोती हारपला काल
घेते पोह्यावर जाल

तुझीया वाटेनं येळपाच्या रांज्या
आपल्या तलपीले मांगे भगताले गांजा

कलारनी बाई भट्टी लाव बेगी
दारूच्या पान्यासाठी आला कैलासाचा जोगी

कलारनी बाई भट्टीवर घोडा
दारूच्या पान्यासाठी संभू झाला येडा

चाला जाऊ पाहू मुलताई बजार
चुडा भरते वं तिथं भोळ्या शंकराची नार

पह्यल्या पायरीले शेंदराचं बोटं
येड्या तू भगताले रस्ता सांगजो नीट

बारा बारा कोस शंकराच्या जटा
गिरजाचा हिय्या मोठा जाऊन धरला आंगुठा

बारा बारा कोस वाघ आसुलीचं भेव
चौऱ्याच्या गडावर परभू नांदते महादेव

गडावरी गड असे गड बारा
दुरून दिसे जशा तलवारीच्या धारा

गडावरी गड असे गड किती
दुरून दिसते नदी नर्मदीच्या भिंती

खांद्यावरी खाऱ्या घेतो वैतागानं
घरी हाये लेक सून भांडन करे रात्रंदिन

खांद्यावरी खाऱ्या घे माह्या मुला
का असा कोमावला गुलाबाच्या फुला

खांद्यावरी खाम्या घेतल्या घाईघुई
पाळन्यात तानी बाई तिची आशा मले नाही

खांद्यावरी खाऱ्या घेतल्या का मून
घरचा वैताग पाहून

निबानारळाच्या खाऱ्या झाल्या जड
कशी चढ्याडू चौऱ्यागड

निबानारळाच्या खाऱ्या झाल्या भारी
कशी चढ्याडू पायरी

मारून झोडून घे माह परान
कलीजा काहाडून देवा बांधीन तोरन

पह्यला नमस्कार संभाले सांग जा
निजला उठव जा

महादेवी जातो खोबरं खायले
नारळाची बुची चौऱ्याच्या बाबाले

महादेवा जाता एक दिवस मोलाचा
चौऱ्याच्या गडावरी नाही देहाचा भरोसा

महादेवी जाता नाही पुसलं बापले
जातो संभाच्या तपाले

महादेवी जाता नाही पुसलं भावाले
जातो संभाच्या गावाले

महादेवी जाता नाही पुसलं भायले
जातो संभाच्या भेटीले

महादेवाच्या वाटीनं सांडला लसन
पोहा चालला ठेसून

महादेवाच्या वाटीनं भक्तिनी येलाच्या
शेंगा खाते वालाच्या नाही वाटीनं चालाच्या

महादेवाच्या वाटीनं भक्तिनी साध्याभोळ्या
बांधे कंवरीले चोळ्या

महादेवाच्या वाटीनं भक्तिनी डोंबडचा
खाते भाताव कोंबडचा

महादेवाच्या वाटीनं भक्त हाये ताने
धवळ्या नंद्यावर पाळने

महादेवाच्या वाटीनं भगत ठकले
रामाकोन्यावरी नंदी पाठवा आपले

महादेवाच्या वाटीनं भक्तिनी ठकल्या
रामाकोन्यावरी धाडा पालख्या आपल्या

महादेवाच्या वाटीनं मुंग्यांचं सैन चाले
लाडाची गिरजा बोले इतके भक्त कसे आले

महादेवाच्या वाटीनं येळवाच्या रांज्या
पारबती असून मांगे गिरजाले गांजा

महादेवाच्या वाटीनं दवन्याचं रोप
संभाचं नाव घेता हारपलं दुख

संभा संभा करे संभा नाही दिसे
भयान वनामंधी पोथी वाचत तो बसे

संभा संभा करे संभा नाही घरी
संभा गिरजाच्या माहेरी

संभाच्या पागुटीले पाहाडाचा येढा
अहेरी बसला माह्या नाजुक केवढा

संभाच्या लगनाच्या अक्षीदा आल्या मले
न्याचारी संवसार काय घेऊ अहीराले

देव महादेव सालाचा नवरा होते
हळदी पाहाडाले देते कुकवाचे थापे

चवऱ्याचा गड चहेडता बिल्लण
उतरल्या पायरीले झीला दुसरा जलम

शाईचे तांदूळ अवध्या देवाईले
उरले तांदूळ चवऱ्या बाबाले

गडावरी गड गड चवऱ्याचा भारी
उतरल्या पायरीले आली डोळ्याले अंधारी

गड चवऱ्याचा दिसे सोभिवंत
खाली उतरता लागे नाही त्याचा अंत

महादेवा जाता गा जानं नोह्यतं मनी
सपनी येऊनी कशी टाकली मोह्यनी

संग्राहक : प्रा. कृ. पां. पाजणकर

महादेवाच्या वाटेनं देवा गा आडवी बेलगंगा।
रामतीर्थावर भेट देजो पांडुरंगा।

महादेवाच्या वाटेनं देवा गा आडवी बंधान
गीरजा माही माय तोडे पापाचे बंधन

महादेवाच्या वाटेनं देवा गा आडवी बेल नार
दुरून दिसते नदी नर्मदेची धार

महादेवाच्या वाटेनं देवा गा आडवी भयसा
संबाच्या दर्शनाले जाऊ देसीन काइसा

माहा नमस्कार देवा गा निशान गडाले
नाही येनं झालं सीवरातीच्या परिन्याले

माहा नमस्कार देवा गा पाह्यरीला केला
कैलासीचा पोहा दरबारी गेला

देवामंधी देव देवा गा नागदुवर पावला
पाचा नारयाचा झेला तोरनी लावला

झाडी वऱ्हाडाची देवा गा जागा हे थोपची
चिंतामनीपासी जोत जये कापुराची

पश्चमदार देवा गा पश्चम करजो
लाह्याऱ्या मोठ्यावर देवा किरपा ठेवजो

अगीन दार देवा गा अगनीचं दार
भोया भक्तिवाली तू गा दुरून पाया पर

सुतायाची कांडी देवा गा उडे वरच्यावर
वडाची पारंबी चित्र शायेवर

पोहा गेला देवदरबारी देवा गा झाला पारोपारी
चित्र शायेवर भरली देवाची कचेरी

गडावरी गड देवा गा कितीक रचले
कैलासीचे राजे जाऊन सिखरी बैसले

गडामधी गड देवा गा चवऱ्याचा बाका
तोंडी आला थुका तुम्ही धुनी टाकू नका

चला जाऊ पाहू देवा गा गिरजाची रांधनी
तिच्या सयपाकाले आहे सुक्कीर चांदनी

चला जाऊ पाहू देवा गा गिरजाचा ईरोला
सव्वा खंडीचा रोठ केला अवघा कैलास जेवला।

गडावरी गड देवा गा गडाखाली आड
रेसमाचा दोर पानी भरे गिरजा नार

सव्वा मनाची कुदयी देवा गा मनाचा वासला
अवधापर्यंत तासला वर चवऱ्या बसोला

मायची घेतली चोयी देवा गा बापाचा घेतला सेला
कैलासी राजा लेक तीर्थासी गेला

खांदावरी पडशी देवा गा घे माह्या चातुरा
घे माह्या चातुरा तुही पह्याली यातरा

निंबानारश्यानं देवा गा पडशी झाली जड
पडशी झाली जड कैसा येंगू चवऱ्या गड

महादेवाच्या वाटेनं देवा गा दवना मोठा दाट
भगत अरवट दवना मोडून केली वाट

महादेवाच्या वाटेनं देवा गा दवना आला फुला
दवना आला फुला बास शंकराले गेला

महादेवाच्या वाटेनं दवना आला गोंडा
कैलासीच्या राजा तुहा तिही लोकी झेंडा

नदीले आला पूर देवा गा जाब मारे थोप
भोया शंकुर टाके गयातलो गोफ

पानी पडू पडू गा देवा हिरवं झालं रान
हिरवं झालं रान सुटलं गवयाचं धन

पानी पडू पडू गा देवा हिरवा झाला चारा
हिरवा झाला चारा सुटला गवयाचा गोऱ्हा

सकायच्या पाह्यरा देवा गा गिरजाले चेव येते
गिरजाले चेव येते चवदा भुवान झाडते

महादेवा राजा देवा गा जातीचा बनिया
सोन्याचा ताजवा त्यानं तोलली दुनिया

महादेवा जातो देवा गा आखीन येईन
तुह्या सतवानं चवदा भुवान पाहीन

येतो देवा येतो रे देवा गा येतो तुयावरी
सवर्नाची सुरी नको ठेवू गयावरी

भुईकुंडावरी देवा गाय चितीन पसरली
गिरजा आंगोईले गेली साडी चोयी इसरली

महादेवाच्या वाटेनं देवा सांडलं खाखस
सांडलं खाखस पोहा चालला हासत

महादेवा जातो देवा गा संगं काय नेता
घरी माता पिता आहे सोन्याच्या मुदता

गिरजा मायेचा चुडा, देवा गा कोऱ्या कागदात
उजीड पडला त्याईचा चवदा भुवनात

गिरजा मायेचा चुडा देवा गा कशानं टिचला
चवसर खेळता हात दुमता पडला

गिरजा मायेचा चुडा देवा गा दुधाची उकयी
गिरजा माही माय मनाची मोकयी

सकायच्या पाह्यरी देवा गा कोमावला बाग
कोमावला बाग गिरजा पानी वळू लाग

पानी वळू वळू देवा गा हिरवा झाला बाग
केयीच्या पानावर लेहेरा मारे डोम्या नाग



## अनुक्रम

संग्राहिका : सौ. शशिकला पाटील

## शंकर-पार्वती

पन्हाळ्याच्या दुर्गाला येळूसेन राजा
पुत्र नव्हता म्हणून बैरागी झाला
आणि मग अरण्याच्या ठायी गेला
दुपारच्या वेळी वृक्षाच्या छायेला
तिथं जागा लोटायला लागला
त्याला महादेवाची पिंडी लागली हाताला
त्या पिंडेची सेवा करायो लागला
पिंडीवर टिपका झारी बांधली
अशी बारा वर्षे सेवा केली
इंद्रसभेला भोळ्या शंकराला कोडे पडले
शंकर इंद्र सोडून मानवखंडात आले
अरण्याच्या ठायाला बैरागी झाले
पायात खडाव, अंगात जडाव
अंगात भगवे, तिरसूळ हातात
जटा सोडल्या, शंख वाद्याला आणि देव निघून चालला
येळूसेन राजाच्या जवळ वृक्षाच्या छायेली
त्यानं सांगितलं सेवा पुरं कर आता
शिरी हात ठेवायला पाहिजे
इमान भाग द्यायला पाहिजे
शिरी हात ठेविला इमान भाग दिला
काय पाहिजे ते मागून घे मला

येळूसेन राजाने पोटी संतान मागितले
देवाने बेलाच्या झाडाचे बेलफळ तोडले
त्या बेलाच्या फळाचे दोन भंग केले
येळूसेन राजाच्या हातात दोन भंग दिले
देवाने सांगितले येळूसेन राजाला
तुझ्या अस्तुरीला उजवा भंग दे खायला
उजव्या हातचा भंग दिलास तर पोटी पुत्र होईल तुला
डाव्या हातचा भंग दिलास तर कन्यारत्न जन्मले तुला
दोन्ही भंग घेऊन येळूसेन राजा निघून चालला
गेला परत आपल्या वाड्याला
घरच्या अस्तुरीला सांगू लागला
उजव्या हातचं भंग खायला पाहिजे याच वेळेला
घरच्या अस्तुरीनं काय केले त्या वेळेला
फळ खाऊन मुलं होणार नाहीत मला
राणीनं रागाच्या भरात दोन्ही भंग घेतले
ते दोन्ही भंग तुळशीवृंदावनात ठेविले
येळूसेन राजा परत आपल्या नगरी आला
म्हणून नगरच्या नारी बघाया गेल्या
त्या नारी राणीला विचारू लागल्या
राजाने काय किमया आणिली दावाया पाहिजे आम्हाला
राणीने सांगितले त्यांना फळ खाऊन मूल व्हायचं नाही मला
बेलाचे दोन भंग आणले ते काय दावू तुम्हाला
नगरच्या नारी विचारती राणीला
ते भंग कुठं आहेत दाखवा ते आम्हाला
राणीने सांगितले त्यासनी त्या वेळेला
तुळशीवृंदावनात दोन्ही भंग आहेत ठेवलेले
नारीनी तुळशीवृंदावनातील दोन्ही भंग घेतले
राणीची समजूत घालून एक भंग खायला दिला
उजव्या हाताचा भंग राहिला गेला
डाव्या हाताचा भंग खाल्ला गेला
तेथून संपूर्ण महिना राणीचा झाला
एक महिना सरून दुसरा महिना लागला
असे नवमास पूर्ण झाले
राणी प्रसूत झाली तिला कन्यारत्न जन्मले
पाचव्या दिवशी पाचवी पूजली
सातव्या दिवशी सातवी पूजली
नवव्या दिवशी नववी पूजली

बाराव्या दिवशी बारशाचा आरंभ घातला।
राणीच्या महालात पालकं-पाळणा बांधला।
येळूसेन राजाने नगरीतील ब्राह्मण बोलावले
ब्राह्मण मुलीचे नाव पंचांगात बघू लागले
सकाळचा दिवस दोपारला आला
मुलीचे नाव घावंना त्याला।
भोळ्या शंकराला कोडे पडले इंद्रसभेला
भाव सोडून ब्राह्मणाचं रूप धारण केले
एक सोवळे नेसून एक सोवळे काखेला लाविले
जानवे गळ्यात घालून हातात पंचांग घेतले.
देव इंद्रसभा सोडून मानवखंडात आले
येळूसेन राजाच्या दरबारी गेले
येळूसेन राजा सांगू लागला
सकाळचा दिवस दोपारला आला
मुलीचे नाव घावंना कुणाला
मुलीचे नाव ठेवायला पाहिजे या वेळेला।
भोळ्या शंकराने पंचांग उघडले त्या वेळेला।
च्यार पाने पालटली नाव घावले नाही त्याला।
पाचव्या पानाला नाव घावले त्याच वेळेला।
पार्वती नाव ठेवून देवशंकर निघून गेले
राजवाड्यात मुलीचे दिवस लोटाया लागले
महिना नि महिना वर्षान वर्ष लोटत गेले
मुलगी पाच वर्षांच्या वयाची झाली
पित्याला खेळ मागाया लागली
सुवर्णाची सुपली मोत्यानं गुंफली
सुवर्णाचे जाते रुप्याचा खुंटा
एक प्रकारचा खेळ मुलीला दिला
पार्वतीने खेळ वट्यात घेतला
चौकात खेळाचा पसारा टाकला
खेळत खेळत वर्षे लोटाया लागली
पार्वती उपवर बारा वर्षांची झाली
मुलीच्या बापाला कोडे पडले जिवाला
म्हणून बोलावून घेतले प्रधानाला
मंदीर महालात बसून सांगू लागला
पार्वती लग्नाच्या वयाला आली
नवखंड पृथ्वी आणि दहावा खंड काशी
देश दुनिया बघून मुलीजोगा वर बघून
मोठा सोयरा जोडून दारी मांडव घालून

लगीन पार्वतीचे करायचे विचार चालविला
पार्वतीच्या कानावर लग्नाचा उतार गेला
पार्वतीने खेळता डाव बाजूला सारला
पित्याला दोन्ही हात जोडून नमस्कार केला
सांगाया लागली कसला विचार चाललाय
पार्वती आजपर्यंत अज्ञान होतीस
उपवर झालीस लग्नाच्या वयाला आलीस
देश-दुनिया फिरून मोठा सोयरा जोडून
लग्न तुझे करायचे दारी मांडव घालून
पार्वतीने सांगितले मग आपल्या पित्याला
लग्न माझे करायचे कसे माहिती नाही तुम्हाला
मग पित्याने विचारले पार्वतीला
लग्न कसे करायचे ते सांग मला
मग पार्वती सांगते पित्याला
जन्माचा जोडा जन्माचा चुडा
कधी नाही हालायचा कधी नाही डुलायचा
बिनमरणाचा भरतार पाहिजे मला
अशी पार्वती बोलताना मोठे कोडे पडले पित्याला
देश दुनिया फिरले तरी असा वर मिळायचा नाही हिला
मग येळूसेन राजा रागाच्या भरात बोलतो पार्वतीला
तू लेक नव्हं वादीन आलीस माझ्या पोटाला
जन्माची काळोखी देणार तू मला
असे पिता बोलताना राग आला पार्वतीला
पार्वती सांगते आपल्या पित्याला
वाईट वंगाळ बोलू नका मला
जिकडे फुडा तिकडे मुलूख थोडा करीन या वेळेला
पार्वती रागाच्या भरात निघून चालली त्या वेळेला
जाता जाताच हे वर्तमान कळले तिच्या मातेला
माता माऊली सुखाची सावली विचार केला
पार्वती कुठे चालली बघाया पाहिजे या वेळेला
माता पार्वतीच्या आडवी गेली
जवळ जाऊन विचारू लागली
कुठे जातीस पार्वती सांग मला
पार्वती म्हणते मातोश्री काय सांगू तुला
पुढचे पाऊल मागे घेणार नाही ह्या वेळेला
जन्माचा जोडा नि जन्माचा चुडा
कधी नाही हालणार कधी नाही डुलणार

बिनमरणाचा भरतार मिळेल मला
तर परत येईन तुझ्या नगरीला
असा वर नाही मिळाला मला
तर मी येणार नाही तुझ्या नगरीला
असे त्या मातेने ऐकून मनाचा विचार केला
पार्वतीचा हाट कशात पुरवावा
मातेनं पोटाशी धरलं पार्वतीला
पार्वतीला धरून चालली सराफकट्टयाला
सराफदादा जडावाचं दागिने द्या माझ्या लेकीला
भरपूर सुवर्णाचे दागिने घेतले पार्वतीला
निघून चालली शेटचाच्या दुकानाला
शेटीदादा उंची पितांबर द्या लेकीला
सगळा साज सिनगार घेऊन निघून चालली
आपल्या महालात जाऊन पार्वतीला समजाऊ लागली
पार्वती महालात जाऊन पितांबर नेसली
सुवर्णाचे दागिने अंगावर घातले
साज सिनगार करून हातात आयना घेतला
आणि रूप न्याहाळायला लागली
अंगावरचा साज सुना दिसायला लागला
पार्बतीच्या वाईट वाटलें मनाला
साज सिनगार केला पण सुना दिसतोय मला
दागिने काढून धरतीला ढीग लावला
माता सांगते पार्वतीला
आवसकून का केलास सांग मला
कोणती वस्तु मिळाली नाही तुला
पैदा करून देते ह्या वेळेला
मग पार्वती सांगते मातेला
हे लेणं नव्हं माझं या वेळेला
कोणतं हाय पार्वती सांग मला
पार्वती सांगते आपल्या मातेला
पायातले बिरूदे हातातला चुडा
गळ्यातले डोरले कपाळाचं कुंकू
कधी नाही हालायाचे कधी नाही डुलायाचे
बिनमरणाचा भरतार कुठं भेटेल मला
असा भ्रतार भेटला तर परत येईन नगरीला
नाही भेटला तर येणार नाही तुझ्या नगरीला
असे म्हणून पार्वती चालू लागली
जाता जाता हणमंताच्या राऊळा गेली

बाळ ब्रह्मचारीला नमस्कार केला
बाळ ब्रह्मचारीने विचारले पार्वतीला
का येणे केले सांग पार्वती मला
देवा सांगते तुला, पण इमानभाग द्यायला पाहिजे मला
देवाने इमानभाग दिला
काय मागणी मागायची आहे तुला
पार्वती सांगते बाळ ब्रह्मचारीला
जन्माचा जोडा आणि जन्माचा चुडा
बिनमरणाचा भरतार कुठे भेटेल मला
बाळ ब्रह्मचारीला कोडे पडले जिवाला
नवखंड पृथ्वीत असा वर मिळायचा नाही तुला
असे सांगताना पार्वती सांगते ब्रह्मचारीला
बिनमरणाचा भरतार दाखवा मला
नाहीतर सत्व गेले म्हणून सांगा
सत्वाचं नाव घेताना सांगतो पार्वतीला
अंजनी मातोश्री तुळशीवृंदावनाला
तप धरले त्या जागेला
मातेकडे जा पार्वती ह्या वेळेला
पार्वती निघून चालली ऋषीमुख पर्वताला
अंजनी मातोश्री हात जोडून तुळशीवृंदावनाला
अशा वेळेला पार्वती तिच्या जवळ जायाला
अंजनी माता बोलती पार्वतीला का येणं केलं सांग मला
पार्वती म्हणते मातोश्री काय सांगू तुला
शिरी हात ठेवा इमानभाग द्या मला
मग सांगते संकट कोडे तुम्हाला
अंजनी मातेने शिरी हात ठेविला
इमानभाग दिला सांगते पार्वतीला
काय कोडे पडेल ते सांग मला
पार्वती सांगते अंजनी मातोश्रीला
जन्माचा जोडा नि जन्माचा चुडा
कधी नाही हालायचा कधी नाही डुलायचा
असा भरतार कुठं हाय ते सांग मला
अंजनी मातोश्री विचार करून सांगते पार्वतीला
खुळी झालीया पार्वती का वेडी झालीया पार्वती
देश दुनियात असा वर मिळणार नाही तुला
माझं मला पार्वती कोडं पडलंय जिवाला
म्हणून तुळशीवृंदावनाला बसले या वेळेला

पार्वती म्हणते मातोश्रीला कोणते कोडे पडलेय तुम्हांला
काय सांगू पार्वती तुला तान्हां बाळ मी आडवा धरला
पाणी पाजीत बसले त्याला
तान्ह्या बाळानं चमत्कार केला
तान्ह्या बाळानं उड्डाण मारायला आणि वृक्षावर चढायला
झाड लागलाय येंगायला ह्या डहाळीवरून त्या डहाळीला
उडचा घेत गेलाय कुणाच्या मुलखाला
आहे कुणाच्या खंडाला हे माहित नाही मला
म्हणून तप धरले आहे तुळशीवृंदावनाला
तू कोडे घातलेयस मला
बिनमरणाचा भरतार कुठं दाखवू तुला
पार्वती बोलते मातोश्रीला सत्व गेले सांगा मला
सत्वाचं नाव घेताना मातोश्री बोलते पार्वतीला
खुळी झालीस पार्वती का वेडी झालीस पार्वती
भरतार नाही सुखाचा, जीव जाईल लाखाचा
पार्वती सांगते मातेला भरताराच्या पायात
जीव गेला तरी हरकत नाही या वेळेला
पण बिनमरणाचा भरतार दाखवा मला
मातोश्री सांगते पार्वतीला ऐक पार्वती ह्या वेळेला
वनाच्या ठायाला किर्रर्र दाट अंधार झाडीला
वनगाईच्या शेणानं सारवून सात सुयांची उतरंड लावून
सुईच्या टोकावर जिभीचा शेंडा ठेवून
उपारठे तप धरले पाहिजे त्या वनाला
एवढे ऐकून पार्वती निघून चालली
भरतारासाठी वनाची वाट धरली
भयासूर वनात जाऊन वनगाईच्या शेणा सारवून
सात सुयांची उतरंड त्यावर जिभीचा शेंडा ठेवून
सर्व देह तोलून तप धरले वनाच्या ठायाला
पार्वतीच्या तपाला दिवस लागले लोटायाला
वनाच्या ठायाला पार्वतीच्या तपाला
वाळव्यानी तपाभोवतन वारूळ चढवायेला
पार्वतीचं तप मुजीवलं वनाच्या ठायाला
पार्वतीच्या तपाला बारा वर्षं होयाला
पार्वतीचं तप अगळी होयला
तपामुळे सूर्याचा रथ बंद पडायेला
सूर्यदेवानं मनाचा विचार केला
मधूनच रथ मागे वळवला
घेऊन गेला आपल्या तळाला

सूर्याची माता बोलते सूर्याला
रथ का हो मागे आला
सूर्य म्हणतो मातोश्रीला काय सांगू माते तुला
मानवखंडात कोणी तप धरले त्या वनाच्या ठायाला
तप अगळी झाले वाट मिळेना मला
जिकडे रथ वळतील तिकडे तप वळते त्या वेळेला
म्हणून रथ घेऊन आलो तुमच्या तळाला
माता सांगते सूर्याला कोणी तप धरले माहिती नाही तुला
बाळा तप धरले तुला जिताया
सूर्यदेवानं रथाला वारू जोडीयला
सूर्यदेव रथात बसायला
रथ आकाशमाथी निघून चालला
पार्वतीचे तप लागला शेंदायला
सूर्याचा रथ खाली येईल त्या वेळेला
तसे तप लागले धरतीला जिरायला
सूर्याचा रथ आला धरतीला टेकायला
तरी काय तप लागेना हाताला
सूर्यदेवाने रथ मागे वळविला
घेऊन गेला आपल्या तळाला
सूर्याची माता विचारते सूर्याला
गेलेल्या कामाचे वर्तमान सांग मला
सूर्य सांगतो मातेला तप गेलो शेंदायला
पार्वतीचे तप लागले भूमीत जिरायला
म्हणून तेथूनच रथ मागे वळविला
माता सांगते सूर्याला ऐक या वेळेला
नेमाप्रमाणे रथ घेऊन जा मध भागाला
चौसष्ट झळा बावन्न कळा सोड त्या ठायाला
तुझ्या झळेनं तप जळून जाईल त्या वनाला
सूर्याचा रथ आकाशमाथी निघून चालला
मध भागाला जाऊन दोपारच्या पारात
चौसष्ट झळा सोडल्या त्या ठायाला
सूर्याच्या झळेनं झाडंझुडं उभी जळाली
पाषाणाच्या लाह्या उडेल्या
सूर्याने विचार करून रथ मागे घेऊन गेला
रथ आलेला पाहून मातोश्रीने विचारले सूर्याला
गेलेल्या कामाचं वर्तमान सांग मला
सूर्य म्हणतो मातोश्री काय सांगू तुला
मोठा अपराध झाला शिरी दोष राहिला

सांगितल्याप्रमाणे झळा सोडून दिल्या
वनातील ओली झाडे जळून गेली
किती पशु पक्षी मरून गेली
हा चमत्कार बघून रथ आणला तळाला
तपाच्या जोरानं काय प्रकार झाला
तपाच्या जोरानं नवलाखांचं तारांगण डुललं
भोळ्या शंकराच्या गादीला धक्का बसला
खेळता डाव सोंगट्यांचा चुकला
शंकराला कोडे पडले जिवाला
तेहतीस कोटी देव बोलाविले सभेला
शंकराने पैजेचा विडा लावला सभेला
सांगतो तेहतीस कोटी देवाला
पैजेचा विडा उचला या वेळेला
तपाचा शोध लावा मानवखंडाला
तेहतीस कोटी देवांनी फरा धरायला
देव धुंडाळायला लागले त्या वनाला
धुंडाळून कासावीस झाले त्या वनाला
तेहतीस कोटी त्या वनाच्या ठायाला
वृक्षाजिवळ जमा झाले एका जागेला
तेहतीस कोटी देवांनी विचार केला
हिंडून फिरून तपाचा शोध नाही लागणार वनाला
किर्रर दाट अंधार झाडी या वनाला
तेहतीस कोटी देवांनी कुऱ्हाडी घ्यायला
त्या वनाच्या ठायाला झाडी डंग तोडायला
अग्नि दिली त्याला धुराचा कोट उठला
तेहतीस कोटी देवांनी फरा धरायला आणि वन लागले धुंडायला
देवांना मागचे काय दिसेना अन् काय सुचेना
अन् दिशाभूल झाले त्या वनाला
तेहतीस कोटी देव जमले त्या वेळेला
आणि विचार करू लागले त्या वनाला
तपाचा शोध लागेना आपणाला
चला जाऊ या इंद्रसभेला
शरण जाऊ या भोळ्या शंकराला
तेहतीस कोटी देव गेले शंकराच्या सभेला
भोळा शंकर विचारतो तेहतीस कोटी देवांना
गेलेल्या कामाचे वर्तमान सांगा मला

काय सांगू देवा तुम्हांला।
आम्हांला। जीवदान द्या या वेळेला
तपाचा शोध लागत नाही आम्हांला।
तेहतीस कोटी देव शंकराला शरण जाताना।
शंकराच्या गादीला नंदी होता त्या वेळेला।
देव शरण आलेले बघून हसू आले नंदीला।
तेहतीस कोटी देव सांगतात नंदीला।
नंदी का हसलास ते सांगा आम्हांला।
नंदी सांगतो त्या देवांला।
तेहतीस कोटी वीर गेलासा मानवखंडाले।
तपाचा शोध नाही लागला तुम्हांला म्हणून हसू आले मला
त्याच वेळी नंदीने विडा उचलला।
सांगतो तेहतीस कोटी देवांना।
तपाचा शोध लागला तर येईन या इंद्राला।
नाही शोध लागला तर येणार नाही इंद्राला।
असा निर्धार करून नंदी निघून गेला
मानवखंडाला त्या त्या वनाच्या ठायीला।
वन लागला सारे धुंडायला।
सकाळचा दिवस दोपारला आला
उन्हाने कंठ गेला सोकून नंदीचा
तपाचा शोध लागेना त्या वनाला।
नंदीने शंकराचा धावा केला
नंदीने मनाचा विचार केला
वारूळ फोडावं या वेळेला
नंदी वारूळाजवळ गेला
वारूळाभोवती वेढा टाकला।
डाव्या पायाचा खरका मारिला
डावे शिंग लावले त्या वारूळाला
एवढ्यात पार्वती सांगते त्या नंदीला
नंदी महाराज जरा दम धरा
राग थंड करून थोडे मागे सरा
तुम्हाला सांगते ऐका या वेळेला
मी एक मागणी मागते तुम्हांला
नंदी सांगतो त्या पार्वतीला
काय मागायचे ते माग मला निर्माण करून देतो तुला
पार्वती सांगते नंदीला धन द्रव्य नको मला
जन्माचा चुडा कधी नाही हालायचा कधी नाही डुलायचा।

बिनमरणाचा भरतार द्यायला पाहिजे मला
अशी पार्वती बोलताना कोडे पडले त्या नंदीला
नंदी सांगतो पार्वतीला
असा भरतार मिळणार नाही तुला
पार्वती सांगते नंदीला सत्व गेले म्हणून सांगा मला
आल्या मार्गे निघून जावा
नंदी विचार करून सांगतो पार्वतीला
पार्वती भरतार नाही सुखाचा जीव जाईल लाखाचा
पार्वती सांगते नंदीला भरताराच्या पायात देहप्राण गेला
तरी हरकत नाही या वेळेला
असे सांगताना नंदीने डावा गुडघा टेकला
उजवे शिंग वारूळाला लाविले
वारूळातून पार्वतीचे तप उतरले
आणि नंदीबरोबर इंद्राला गेले
सर्व देवांचे डोळे दिपून गेले
तेहतीस कोटी देवांनी विचार केला
अशी रंभा गरत पाहिजे आपल्याला
नंदीने सांगितले त्या पार्वतीला
हार घेऊन शोधून काढा शंकराला
पार्वतीने हातात हार घेतला
तेहतीस कोटी देवांत लागली हिंडायला
भोळा देव शंकर दिसेना तिला
सभेच्या लांब दूर पल्ल्याला
शंकराला पाहिले त्या वेळेला
कोणची खूण होती भोळ्या शंकराला
पायावरची पद्म ओळखली त्या वेळेला
पद्म ओळखून हार घातला शंकराला

संग्राहक : श्री. शा. रा. बाबर

## गिरजा

आलं गंगाला मागनं बसानेला टाका पिढं पाट
पुसा याची जात गोत याची जात धनगराची
आमची गंगा बमिनाची गंगा द्यायाची न्हाई
जागा पाहू जागाईत मळा पाहू बागाईत
नवरा पाहू रूपशाही तिथं देऊ गंगूबाई
गंगू ऐकेनाशी झाली गेली आईच्या जवळी

आगं आगं माझ्या आई आपल्या बारवाच्या तिरी
एक जोगी नवलापरी आपली सोन्याची किंकरी
वाजवितो नवलापरी मी जाते त्याच्या घरी
येडी झाली गंगूबाई जागा पाहू जागाईत
मळा पाहू बागाईत नवरा पाहू रूपशाही
तिथं देऊ गंगूबाई गंगा ऐकेनाशी झाली
गेली बापाच्या जवळी अरे अरे माझ्या बापा
आपल्या बारवाच्या तिरी एक जोगी नवलापरी
हाती सोन्याची किंकरी वाजवितो नवलापरी
गंगा त्याजला वरी येडी झाली गंगूबाई
जागा पाहू जागाईत मळा पाहू बागाईत
नवरा पाहू रूपशाही तिथं देऊ गंगूबाई
गंगू ऐकेनाशी झाली गेली मान मुरडोनी
गेली वल्या पदरानी लागली पहिल्या वनाला
उभा ऱ्हा तू गड्या माझी पावलं वडती
घरी पिताजी रडती
लागली दुसऱ्या वनाला उभा उभा ऱ्हा तूं गड्या
माझी पावलं वडती घरी पिताजी रडती
एवडी पित्याची फेरी मी का जोग्याची बरी
लागली तिसऱ्या वनाला उभा उभा ऱ्हा तूं गड्या
मला सराटं मोडती घरी बंधूजी रडती
एवडी बंधवाची फेरी तूं का जोग्याची बरी
चवथ्या पाचव्या वनाला आलं जोग्याचं नगर
गंगा घातली जटेत मग गेलाय मळ्यात
गिरजा गेली शेजघरी दिलं अंघूळीला पानी
पहिला तांब्या जटवरी मग तांब्या अंगावरी
गिरजा गेली सेजघरी आकाशाच्या आयाबाया
पहिला तांब्या जटवरी मग तांब्या अंगावरी
असू दे ग गिरजाबाई त्याचा विचार असल काही

## शिव-गौरी

धवळी गिरीजा सोनेरी देव जोडयानं राज्य करी
इच्छा झाली पलंगावरी गिरीजा बोले शंकराला
एका पलंगावाचून देवा महाल दिसतो सुना
एवडा उतार जायकिता शंकर तेथून निघाले
सुताराच्या वाडया गेले येता देवाला देखिले

चंदनपाट बसकार केले काय बसू पाटावरी
आळशावर गंगा न्हाली माझ्या दुबळ्यावर कृपा केली
देवा कोणीकडे केले येणे शंकर बोले सुताराला
एका पलंगावाचून गिरीजा महाल दिसतो सुना
इतका उतार आयकिता ऐसा दिनमान डुबला
सकाळ दिनमान निघाला सुतार सकाळी उठला
झाडा झटक्याने गेला त्याने मुखमार्जन केले
ज्याची सेजेची कामिना गंगाळी पाणी सारले
पाणी तांब्याच्या गंगाळी सुतार तेथून उठले
जाऊन न्हायाला बैसले ज्याची आंघोळ संध्या झाली
धोतर करवती नेसले कपाळाशी चंदन काढले
आंगी जगबगी लेले तुळशी मनभाव पूजीले
ज्याची सेजेची कामिना पाची पक्वान केले
जिने विस्तारिले ठाव सुतार तेथून उठले
बरवे पानावर बैसले पाच घास जेवण जेवले
मुखी गुरोळा घेतला बटीसा पाना विडा केला
विडा मुखात घेतला पोटी खोसळ किंकर
खांद्यावर घेतला बासला सुतार तेथून निघाला
हेनुमंताचे पाळी गेला ज्याला नमस्कार केला
टिका शेंदराचा नेला उभ्या मारगाने नेला
एक वन चहढेता दुसरा वन उतरता
गेला भयान्या वनात हिंडू हिंडू बेजार झाला
नाही चंदनाचा खोज पळसाखाली झोपी गेला
पळसा दाविले स्वप्न तूं का जाय वरल्या रानी
तेथे चंदनाचे झाड सुरत पडली डाव्या कानी
डावा कडचा पालटला सुतार तेथून उठला
चालून वरल्या रानी गेला गेला चंदनाजवळी
झाड पक्ष्याने झाकिले सोडला कमरेचा पटका
जोडला गोफणीचा गोटा होरे पुकारू लागला
पक्षी उडोन काय गेले हळदी कुंकवाचा सडा
वरतून घाव या घातला चंदन धरणीवर पाडला
ज्याचे तोडून केले गेर गेर पटक्या बांधले
उचलून शिरावर घेतले पटक्या झाले दोन गेर
गेरा वाच्या या फुटली तूं का जाय वरल्या रानी
सुतार तेथून निघाला गेला पळसाजवळी
पळसा वाचा फुटली तूं का देशील मला काय
हळदी कुंकवाचं बोट बेलावरची बेलपत्री

पळस इतक्यानं समजेना पोळा सनया नेमला
अयसा मुरोबा निघाला ज्याने मुरोबा तोडला
ठोकून ठाकून तैयार केला ज्याचे पटके काढले
गेर पटक्या बांधले उचलून शिरावर घेतले
आपल्या राहुळाशी आले ओझे कामठासी टाकले
ज्याची सेजेची कामिना बाईनं पंचारती केली
सुतार ओवाळू लागली गेर तासाशी लागली
जंतर माठ या मांडला गेर जंतरी लागले
सुतारीन ओढे जंतर दोरी सुतार काते नानापरी
भवळा पलंग तयार केला व हिंगूळ ढाळीला
पलंग शिरावर घेतला गेला गिरजाचे वाड्या
येता गिरजाने देखिले ज्याचा सनमान केला
घेतले सुपलीभर मोती टाकले सुताराचे ओटी
सुतार इतक्यात समजेना तान्या वासराची गाय
हे दान दिले सुताराला सुतार खुशालवंत झाला
आपुल्या राहुळीसी गेला भक्त महादेव बोलीला

संग्राहक : श्री. बाजीराव पाटील

## हरहर महादेव

देवा गा देवा देवा तुझ्या वाटी
झालीसे पाच कणसाची चोरी
कुणबी होता गा मैयावरी
त्यानं काय ठोकली आरोळी
उतरला मैयाच्या तो खाली
उधळली धून्याची अंबाळी
सळवली सांबाच्या पाठीवरी
टाकली हातामध्ये हातवेडी गा
पायामधी टाकुनी पायवेडी
गिरजा माता भोळी गा हात कुणब्याला जोळी
देवा गा देवा देवा तुझ्यासाठी
सारवल्यासे गा म्या उभ्या भिंती
त्यावर काढिले म्या गा चित्रकोटी
डाव्या बाजूला शोभे सरोसती
उजव्या बाजूला शोभे गणपती
समोर पारबतीच्या गा मूर्ती
अंजनीच्या पोटी बाळ जन्मला मारोती

दशरथाला चार मुलं
राम गा लक्षीमन
आणिक भरत शत्रुधन
गेले ते लंकेवर चालून
मारीलासे लंकेचा रावन
राज ते करीतो बिभीषन
आले काय जानकीला घेऊन
आनिक सीतेला घेऊन
अंजनीचे सुत त्याचे नाव हनुमंत
देवा देवा तुझ्या वाटी
आहे कोकनाचे बन
त्यावर संभाचे राखन
त्याची सोनेरी गोफन
गोटा मारला झोकून
मोती झाले दानोदान
गिरजा माझी माता मोती घेतसे येचून
अन् बेलगंगेला आला पूर
तिचे पानी झाले लाल
भोळ्या संभाचे लगीन
दिले गुलाबाचे पाल
बेलगंगेला आला पूर
तो काय आलासे चौफेर
आलासे चौफेर गा
मंधी गोसायाचे घर
बेलगंगेला आला पूर
तो काय आलासे चौकोनी
आलासे चौकोनी गा
मधी गोसायाची धूनी
अनु खांद्यावर खांदा
घेतला घाई घाई
घेतला घाई घाई गा
धराच्या वैतागा पायी
बानावाल्या दादा गा
तुझ्या बानाले तनाई
चवऱ्याचे गडावरी गा
लागते नेत्रात पनाई
काठीवाल्या दादा गा तुझ्या काठीचा पैसा घे जो

तुझ्या काठीचा पैसा घे जो काठी वाजवीत ने जो
देव देव करता गा संभा तुझे नाव गा
संभा तुझे नाव तुह्या चरणी महाभाव
अनु भरल्या दुपारी पोवा चालला हासत
अरं संभा संभा करता गा संभा सुंबरत
आम्ही गाईचे वासईरं गा आलो हुंबरत
संभा संभा करता गा संभा नाही घरी
डोईवर शिदोरी संभा गिरजाच्या माहेरी
अरं संभा संभा करता संभा तुझ्या वाटी
सांडली गा सुपारी पोवा चालला दुपारी
अरं संभा संभा करता संभा तुझ्या वाटी
सांडल्या गा लवंगा पोवा चालला तेलंगा
अरं संभा संभा करता संभा नाई दिसे
अरे भयान्या वनामंधी पोथी वाचयीत बसे
अगं मागिणीच्या पोरी तुवा मांग कुठी गेला
आला वऱ्हाडाचा पोवा त्यानं वाजवत नेला
अगं बारनीच्या पोरी पानं देजो बारा तेरा
संभाच्या लग्नासाठी विळा नेजो ग गोजरा
सकाळच्या पारी कोंबडा देतो बांग
अनु संबाच्या बागेमंधी केळीच्या पानावरी लह्या देतो डोब्या नाग
अरं डोब्या म्हणून नसे त्याले राग लई हाये
माह्या संभाच्या गळ्यामंधी राजा सृष्टीचा हाये
अरं गडावरी गड गा गडावरी ताडं
दुरून दिसते गा नदी नर्मदाची धार
अरं गडावरी गड गडावरी येळू गा
दुरून दिसते नदी नर्मदाची वाळू गा
अरं गडावरी गड गड चवऱ्याचा बाका
तोंडी धरनी टाकू नका
अरं गडावरी गड एका गडाला कुलूप
गड चढता दिसला टोपीवाल्याचा मुलूख
अरं भिमाच्या मयावून मारे गीरजामाय हाका
झाडी वऱ्हाडच्या लोका तुम्ही गर्दी करू नोका
अरं चौसर खेळता हात दुमता पळला
अरं गीरजाबाईची साडी केसावून गा बारीक
केसावून गा बारीक नेसन्यावाल्याची तारीफ
गीरजाबाईची साडी दिसे बुट्टेबाज
साडी दिसे बुट्टेबाज गा मिरी पळे शंभर साठ

गीरजाबाईचा चुळा हिरवा कंकर
ढवळ्या नंदीवर बसून आले शंकर
गाडीचा लोखंड सन्या रूळाले आटलं
झाडी व-हाडच्या लोका त्याचं नवल वाटलं
शंकराच्या वाटी गा जातील भले भले
चवऱ्या येंगता येंगता झाले पखालीचे हेले
देवा तुझ्या वाटीनं गा असे टोंगया टोंगया पानी
सांबाच्या लग्नामंधी नंदी लागले पोहाळनी
भयान्या वनामंधी गा वाघाचा लागे मोठा भेव
व-हाडच्या लोकांसाठी तथी बसे महादेव
वाघाचा केला नंदी अन् सर्पाची केली येसन
शंकर पारबती गा आले त्यावर बसून

संग्राहिका : सौ. मंगला नावडीकर

## शिवा शिवा महाद्‌वा

पहिला तांदूळ महादेवा
काशी विश्वेश्वरासारखा बाप द्यावा

दुसरा तांदूळ महादेवा
कामधेनुसारखी माता द्यावी

तिसरा तांदूळ महादेवा
आपल्या चरणी ठाव द्यावा

चवथा तांदूळ महादेवा
सूर्यनारायणासारखा भ्रतार द्यावा

पाचवा तांदूळ महादेवा
पाची पांडवांसारखे पुत्र द्यावे

सहावा तांदूळ महादेवा
सावित्रीसारखे सौभाग्य द्यावे

सातवा तांदूळ महादेवा
सप्तऋषिसारखे बंधू द्यावे

आठवा तांदूळ महादेवा
अष्टभुजेचे दर्शन घडावे

नववा तांदूळ महादेवा
नऊ खण पृथ्वीचे राज्य घडावे

दहावा तांदूळ महादेवा
दहा वर्ष काशीवास घडावा

आकरावा तांदूळ महादेवा
आकरा कोटी सहस्र जप जपल्याचे पुण्य घडावे

बारावा तांदूळ महादेवा
नंदीवर बसून कैलासा जावा

शिवा शिवा महादेवा प्रयागनाथा उमानाथा
आपल्या चरणी स्नान करता
मज मुक्ति मिळेल आता

राजाच्या हाती सोन्याचं पान
दुबळ्याही हाती बेलाचं पान
माझी पूजा माणिक मोत्यांसमान

संग्राहक : श्री. ना. ना. शिंदे

## आम्हा संबाचं ध्यान

शिव माझा बापमाय
शिव वंदीन तुझे पाय

शिव कृपाळू म्हणती
शिव भोळा चक्रवर्ती

शिव शास्त्री सरस्वती
शिव कैवल्याच्या थडी

शिव प्रेमरसाची गोडी
शिव बुडतीया सांगाडी

शिव येतोया धावत
शिव माझा गणगोत

शिवानं कैलास स्थापिले
शिवाने भक्त रक्षियेले

शिव आहे जळी स्थळी
शिव आहे काष्टी पाषाणी

शिवाचं स्मशानी राहाणं
शिवा हाती त्रिशूळ घेणं
बेलपत्री बेलाचं पान
आम्हा संबाचं ध्यान

पाटप्याच्या ध्वजा लावू
विष्णू घरी बिऱ्हाड नेवू
शंभू कैलासीचा राजा
त्यांना दंडवत माझा

गिरजा शोभे मांडीवरी
गंगा वाहतसे शिरी
अंगी इन्धाचं भूषाणं
गळा रुद्राक्षाचं लेणं

शिव शिव शंकर भोळा
त्याच्या गळ्यात रुद्रमाळा

## शंकराचं लगीन

शंकराच्या लग्नाला आधी नेमला गणपती
तिथं शारदा उभी होती
राजामध्ये दक्षराजा करीत असे कारभार
त्या राजाला सात कन्या ऐका त्यांचा विस्तार
इकडे या ग बायानो तुम्ही कुणाचं भाग्य खाता
सांगा मजला खरं
आम्ही खातो तुमचं भाग्य ऐका आमुचं उत्तर
सातवी कन्या गिरजाबाई रुसून बसली सुंदर
इकडं ये ग गिरजा तू कुणाचं भाग्य खाती ?
सांग मजला खरं
त्या राजाला राग आला झाला लाल नंबर
प्रधानजीला हुकूम केला जावे तुम्ही देशावर
भलता सलता आणा म्हातारा करा गिरजेचं स्वयंवर
धुंडीत धुंडीत प्रधान गेले गाव लागलं शिंगणापूर
उघडे संन्यासी देव होते निजले होते राखेवर
त्याला गडबड करूनी बसविले नंदीवर
तडफडीने तावडतोब उतरले कचेरीसमोर
गावामंधी दिली आरोळी यावं भेटीशी लौकर
भेटूनशानी गावामंधी गोसावी आणलं सारं
गिरजाबाईचं वऱ्हाड आलं ऐका चार हजार
कुठं आहे गांजा कुठं आहे तंबाखू येऊ द्या गुडगुडी लौकर
तिसरा म्हणतो भांग कुरूंबीचं डेरं येऊं दे झडकरी
वडील मेहुणी शाणी होती भलती गोष्टी सांगणारी
असं काहो भाऊजी करता तुमची तीन नेम दिसते
लांब दाढी मिशा पिंगट डंबरू तुमच्या हाती
दुसरी मेव्हणी घोंगडी घेऊनी आंथरू लागली आंगणात
तिसरी मेहुणी तुंबा घेऊनी पळू लागली महालात

चवथी मेहुणी त्रिशूळ घेऊन नाचू लागली दारात
पाचवी मेहुणी सांगत गेली मातेच्या महालात
देव नव्हे वेडा आहे गिरजाबाईचं संचित
तीच माता पार्वती आदिशक्तीचा अवतार
ब्रह्मा विष्णू महेश महादेवा अवघ्याहुनी थोर
हार हार हार शिव शिव शिव स्वार झाले नंदीवर
गिरजाबाईचं लगीन लागलं दिवस होता सोमवार
लगीन झालं साडं झालं सरला वेडा आवतार
भर पंचवीसाच्या भरात आला रूप दिसते दाणेदार
ह्या रूपाला भाळूनशानी नारी पडल्या धरणीवर
सहावी मेहुणी सांगत गेली मातेच्या जवळ
वेड नव्हे देव आहे गिरजाबाईचं दैव थोर
तीच माता पार्वती आदिशक्तीचा अवतार
ब्रह्मा विष्णू महेश्वर, महादेव अवघ्याहून थोर
गिरजाबाईला दागिने घालीत आले दिल्लीचे सोनार
शंकर निघाले शिंगणापूरला नेतो म्हणती गिरजेला
आईवडील घालवीत गेले नेत्र लागले गळायला

संग्राहिका : सौ. कमलाबाई सोहनी

## शिव-पार्वती : प्रश्नोत्तरे

पार्वती : ऐका हो शंकरा बोधाचे प्रश्न करा

शंकर : सांग ग पार्वती बोधाचे अर्थ किती ?
कोणाला अडपीत होतीस ?
कोणाला दडपीत होतीस ?
कोणाला हातात धरून बंधन तू करीत होतीस ?

पार्वती : दाराला अडपीत होते
अडसराला दडपीत होते
कडीला हातात धरून बंधन मी करीत होते
ऐका हो शंकरा . . .

शंकर : कोणाला बांधीत होतीस ?
कोणाला सोडीत होतीस ?
कोणाला हाती धरून घरात आणीत होतीस ?

पार्वती : गाईला बांधीत होते
वत्साला सोडीत होते
चरवीला हाती धरून घरात आणीत होते
ऐका हो शंकरा . . .

शंकर : कोणाला घुसळीत होतीस ?
कोणाला काढीत होतीस ?
कोणाच्या छंदाकडे बघून नाचत होतीस ?

पार्वती : दह्याला घुसळत होते
लोण्याला काढीत होते
रवीच्या छंदाकडे पाहून मी नाचत होते
ऐका हो शंकरा . . .

शंकर : कोणाला लावीत होतीस ?
कोणाला कोरीत होतीस ?
कुणाच्या मुखाकडे पाहून तूं हासत होतीस ?

पार्वती : कुंकवाला लावीत होते
काजळाला कोरीत होते
आरशातल्या मुखाकडे पाहून मी हासत होते
ऐका हो शंकरा . . .

शंकर : कोणाला हात देत होतीस ?
कोणाला पाय देत होतीस ?
कोणाच्या पलंगावरी निद्रा तूं केली होतीस ?

पार्वती : कासाराला हात देत होते
सोनाराला पाय देत होते
शंभोच्या पलंगावरी निद्रा मी केली होती
ऐका हो शंकरा बोधाचे प्रश्न करा

संग्राहक : **श्री. रमजानखान महंमदखान**

## भिल्लीण

गिरजा झाली असी उदास
निघाली शंभू शोधायास
पालटिला तिने दुसरा वेश झाली भिल्लीण

मशी बोल भिल्लीणी सदाशिव म्हणे
चोळी ल्यालीसे उरफाटी मोहनमाळ हार कंठी
टिकली ल्यालीसे ल्ललाटी नाकी मोरणी

बुचडा बांधीला केसांचा
वरती तुरा खोवी मोत्याचा
झणकारा मारी नेत्रांचा पाडिला भुलवूनी
शंभू बघूनी मोहित झाला
हात हा गिरजेवर टाकीला
नको तापसी झोंबू अंगाला बोला दुरूनी
दुर्गा म्हणे योगीराया
कैसी भोगितसा पर जाया
तुमचे तप हे जाईल वाया मुळापासूनी
गिरजा बोले नीलकंठा
तुम्ही तर दिसता बहू तापट
एकीचा नाही केला शेवट दिली सोडूनी मशी बोल
गिरजेने शंभू हाती धरिले महादेव कैलासी नेले
शेवटी पार्वतीने शंकरास कैसे फसविले होऊनी भिल्लीणी
मशी बोल भिल्लीणी सदाशिव म्हणे

संग्राहक : **श्री. ब. गं. चौधरी**

## महादेव

प्रथम शंकराच्या देवळात उंबरठ्याजवळ गेल्यावर...

देखिली शिवाची पायरी
पाप गेले बाहेरी
देखिला शिवाचा उंबरा
पाप गेले डोंगरा
देखिलं शिवाचं अंगण
घेतीलं पापानं रिंगण
देखिला शिवाचा कळस
झाला पापाचा आळस

नंदीला पूजते वेळी...

नंदी नंदी नंदुकलं
वंदीन तुझं आंदुकलं
थापटीन तुझी पाठ
तीर्थ घडली तीनशे साठ
नंदीच्या गळ्यात सोन्याचं दावं
नंदीला घेऊन काशीला जावं
नंदी तूं जा कैलासाशी
माझा नमस्कार शंकराशी

संग्राहिका : **सौ. कुमुदिनी पवार**

## आरती

आरती केली तुझ्या नावाची
शंभूदेवा तुझ्याच नावाची

आरती केली आरतीत काय
ओवाळिली देवा गिरजाची माय

आरती केली आरतीत मोत्यांचे काप
ओवाळिला देवा गिरजाचा बाप

आरती केली आरतीत सांबशिव
गिरजाचा पती शंभू महादेव

महादेवा गाते झुळूझुळू गंगा
तिथं उभी राहे पारबती रंभा

संग्राहक : **श्री. भगवंत ठाकरे**

## आरती

आरती केली तुझ्याच नावाची
शंभू महादेवा चवऱ्या बाबाची

आरती केली आरतीत काप
ओवाळीला जातो गिरजाबाईचा बाप

आरती केली आरतीत काय
ओवाळीली जाते गिरजाबाईची माय

आरती केली आरतीत दाणे
ओवाळीले जाते गिरजाबाईचे घराणे

आरती केली आरतीत गहू
ओवाळीले जाती गिरजाबाई तुझे भाऊ

आरती केली तुझ्याच नावाची
चवऱ्या बाबाची शंभू महादेवा गा

संग्राहक : **श्री. व्यंकटेश आत्राम**

आदिवासी गोंड महादेवाचे उपासक असतात. प्रत्येक देवकार्यात अग्रपूजा महादेवाचीच असते. पूजेच्या आरतीमध्ये कोणती पूजासाहित्ये असतात त्याचा स्पष्ट उल्लेख खालील गीतात सापडतो :

## पूजा

| गोंडी गीत | मराठी अर्थ |
| --- | --- |
| रे ना रे रे ना रो ऽऽ दादा ऽऽ<br>रे ना रे रे ना रो. . . | (गोंडीमध्ये आलाप घेतात. दोन दोन वेळा प्रत्येक कडवे दोनदा) |
| १. आकी पुंगारे रो . . . दादा ऽऽ<br>आकी पुंगारे बेले पतरीता<br>पूंजा निवा आयाल<br>आयाले फळा पेनता<br>पूंजा निवा आयाल | १. पर्ण पुष्पांनी . . . रे . . . दादा<br>पर्ण पुष्पे बेलाची पाने<br>यांनी पूजा तुझीच होईल<br>होईल महादेवाची<br>पूजा त्याचीच होईल |
| २. राळे ऽ कापूडे रो . . . दादा ऽऽ<br>राळे कापूडा पसपोळा येता<br>पूंजा निवा आयाल<br>आयाले फळा पेनता<br>पूंजा निवा आयाल | २. अरे भाऊ राळ, कापूर गा . . .<br>राळ कापूर अन्नकण पाण्याने<br>पूजा तुझीच होईल<br>होईल महादेवाची तर<br>पूजा त्याचीच होईल |
| ३. मेसे चिवाडा रो . . . दादा ऽऽ<br>मेसे चिवाडा कोरे पड्डाते<br>पूंजा निवा आयाल<br>आयाले फळा पेनता<br>पूंजा निवा आयाल | ३. अरे भाऊ कोंबडी पिल्लेनी अंडी रे<br>अंडी नी कोंबडी पिल्ले<br>पिल्ले कोंबडानी पाडस<br>यांनी पूजा महादेवाची होईल<br>होईलच महादेवाची तर<br>पूजा त्याचीच होईल |
| ४. पद्दी फयता रो . . . दादा ऽऽ<br>पद्दी फयता येटी पाटाता<br>पूंजा निवा आयाल<br>आयाले फळा पेनता<br>पूंजा निवा आयाल<br>रे ना रे रे ना . . . | ४. डुक्कर कापून रे . . . दादा<br>डुक्कर रक्त बकरी पिल्ल्यानी<br>पूजा तुझीच होईल<br>होईल महादेवाची<br>पूजा तुझीच होईल<br>(आलाप) |



# गणपती

**मंगलमूर्ती मोरया**

देहाचा मृदंग घुमवीत आणि तळहातांचे टाळ वाजवीत नेत्रांचे दिवे पाजळून आरती करताना श्रीगजाननाच्या सहवासातील घरदार सुखानं तंबायला लागलं म्हणजे उल्हासाचे मळे फुलतात. वैदिक कालापासून हिंदूंचं एक प्रमुख उपास्य दैवत म्हणून गणल्या गेलेल्या गौरीनंदनाच्या दर्शनानं सर्वांची तहानभूक हरपून जाते. कोणत्याही प्रकारच्या मंगल कार्याच्या प्रारंभी प्रथम क्रमांकानं आळविल्या जाणाऱ्या गौरीबाळाच्या नामोच्चारानं वाणी सुखावते. आयुष्यातील अपेक्षित फलाच्या मागणीसाठी पूजिल्या जाणाऱ्या चिंतामणीच्या महापूजेनं देहभांडे उजळून निघते. शब्दब्रह्माच्या प्रतीकात्मक ओंकार दर्शनानं चित्तवृत्ती हेलावून जातात, उमेद म्हाऊन उठते, उल्हास नादावतो.

ओंकार म्हणजे सृष्टीचा आदिकंद, ईश्वराचं नादमय स्वरूप, चैतन्यशक्तीचा गाभा, स्वयंभू विश्वदर्शन. त्यामुळं पार्वतीपुत्राच्या या दर्शनानं माणूस भारावून जातो, नव्या ईर्षा त्यांच्या अंगी बळावतात. म्हणून 'मंगलमूर्ती मोरया'च्या जयघोषानं त्रिभुवन दणाणून जात. या जयघोषाची नांदी घरीदारी घुमते, व्यासपीठावरून उच्चारिली जाते आणि कलाविलासातून सहभागी होत नादावते. सहाही शास्त्रं न् अठरा पुराणं ज्याच्यापासून निर्माण झाली त्या लंबोदराचा उदो उदो होतो. पंचपक्वान्नांची ताटं नैवेद्यासाठी सामोरी जातात आणि हरतऱ्हेची कलाकुसर आरास सजवून मोकळी होते.

म्हणून सामान्य माणूस नृत्यगीतांची खैरात करून या देवाचं 'जागरण' साधताना म्हणतो की, 'हातात पुष्पांच्या माळा घेऊनच देवा तू नाचत नाचत ये, आमच्यावर तुझ्या आशीर्वादाची प्रेमळ शिंपण कर आणि आमच्याशी तू जवळीक साधून ऐस.'

अशा वेळी चौदा विद्यांच्या या निर्मात्याला चंद्रसूर्यांच्या, दाही दिशांच्या आणि नवलाख तारांगणाच्या साक्षीनं आळवितांना आमंत्रण दिलं जातं तेच मुळी हातात चारी वेद घेऊन ये म्हणून! त्यामुळं अहोरात्र जिकडं पहावं तिकडं आपलं निवासस्थान मांडलेल्या या महाभागापुढं नतमस्तक झालेल्या भक्तांचा



गौरीनंदन

मेळा टिप्पूर चांदण्याच्या अंगणात सारं गाव गोळा करीत या देवाधिदेवाच्या प्रिय पुत्राचा जयजयकार मांडतो. त्याचा परिणाम म्हणून मग चंद्रकिरणं अमृताच्या धारांचा वर्षाव करीत या मनोहराला मनापासून गात नाचावं म्हणतात! अशा वेळी भावना झिरपत रहाते, माणूस सजिवंत होऊन उठतो आणि ह्या गणराजाच्या वैभवापुढं अस्मान ठेंगणं व्हावं म्हणतो!

## अनुक्रम

# ॐ नमोजी गणनायका

लेखक : डॉ. भालचंद्र फडके

गणपती हे एक अत्यंत प्राचीन असे दैवत आहे. कै. वि. का. राजवाडे यांनी जवळजवळ अडीच हजार वर्षांचे मागे त्याचे अस्तित्व सिद्ध केले आहे.[१] गणपती या शब्दाचा स्पष्ट उल्लेख 'गणानां त्वा गणपतिं हवामहे'. . .असा प्रारंभ असलेल्या 'ऋग्वेदा'तील एका सूक्तात आलेला आहे. वेदकालात ब्रह्मणस्पती, बृहस्पती आणि इंद्र या देवांशी गणपतीची एकरूपता जरी मानली तरी गणपती हे भारतातील मूळ अनार्यांचे दैवत आहे असे काहीजण समजतात. ज्ञानकोशकार गणपतीला आर्यपूर्व व आर्येतर दैवत म्हणून मानतात तर डॉ. संपूर्णानंद म्हणतात, 'वैदिक काळात आर्य सप्तसिंधव प्रदेशात रहात होते. त्यावेळी गणपतीची पूजा करण्याचा प्रघात नव्हता. गणेशाच्या अस्तित्वाचाच आर्यांना पत्ता नव्हता. पूर्वेकडे ते सरकले तसा अनार्य लोकांशी आर्यांचा संबंध आला. पराभूत अनार्यांवर विजेत्या आर्यांच्या संस्कृतीचा तर रंग चढलाच, पण आर्यांच्या संस्कृतीवरही अनार्यांचा प्रभाव पडला.'[२] याचा परिणाम म्हणजे आर्यांनी नव्या देवदेवतांचा अंगीकार केला असला पाहिजे. आपल्या अनार्य जित लोकांपासून नाग, गर्दभावर आरूढ होणारी शीतला, कुत्र्यावर बसणारा भैरव यांच्याबरोबरच उंदिरावर आरूढ होणाऱ्या हत्तीमुख विनायकाचाही स्वीकार केला असावा. एलिस गेटी म्हणते[३] की, गणेश हे मूळचे द्रविडांचे दैवत असावे. मूळचे अनार्य हे सूर्याची उपासना करणारे होते. त्यांच्या दृष्टीने गणेश हे सूर्यदेवतेचे प्रतीक आणि त्याचे उंदीर हे वाहन अंधाराचे प्रतीक होय.

१. तळवलकर, य. वा., गणपति, बृहस्पति व ब्रह्मणस्पति, 'पुरुषार्थ' श्रीगणेशांक १९३७.

२. डॉ. संपूर्णानंद, गणेश.

३. गेटी एलिस, गणेश, ए मोनोग्राफ १९३६.

तथापि, एक गोष्ट मात्र खरी की, सर्व हिंदु दैवतांत 'गणेश' हे लोकमान्य दैवत आहे. या दैवताने बौद्ध धर्मात प्रवेश केला. हिंदु उपासक त्याला यवद्वीप, बोर्निओ व बाली बेटात घेऊन गेले तर बौद्ध अनुयायी त्याला तुर्कस्थान, तिबेट, चीन व जपानमध्ये घेऊन गेले. गणेशाला वक्रतुंड, एकदंत, विनायक, गणपती, विघ्नेश्वर, आखुरथ, सिद्धिदाता, हेरंब, द्वि-देहक, लंबोदर, गजानन अशा किती तरी विशेषणांनी संबोधिले जाते. यांपैकी 'एकदंत' हे विशेषण अति प्राचीन असावे. द्रवीड भाषेतील पल्लू व पेल्ला या शब्दांचा अर्थ हत्तीचा दात, हत्तीची सोंड असाच आहे. तैत्तिरीय-आरण्यकात 'दन्तीन्' या दैवताला उद्देशून जी प्रार्थना आहे ती या गजमुख दैवताला उद्देशूनच केलेली असली पाहिजे. या प्रार्थनेतील मंत्रात म्हटले आहे की, 'तत्पुरुषाय विद्महे, वक्रतुण्डाय धीमही तन्नो दन्तीः प्रचोदयात्'। (तैत्तिरीय-आरण्यक १० : १–५) पुराणांनी गणपतीला 'वक्रतुण्ड' हे विशेषण योजले तर महानिर्वाण-तंत्रात त्याचा उल्लेख 'रक्ततुण्ड' असा केलेला आहे. वैदिक देवतांत 'गणेशा'चा समावेश नसला तरी गणेश हे ग्रामदैवत असले पाहिजे. मनू तर म्हणतो की, शिव हे ब्राह्मणांचे दैवत होते तर गणेश हा शूद्रांचा म्हणजे मूळच्या अनार्यांचा देव होता. गणेशाला 'एकदंत' म्हणण्याचे एक कारण असे असावे की, त्याला कृषिदेव म्हणून स्वीकारले गेले होते. त्यामुळे एकदंत वा वक्रदंत हा नांगराच्या फाळाचे प्रतीक म्हणून मान्य झालेला असावा.

तसे पाहिले तर 'गणेशा'ची जी विविध नावे आहेत त्या सर्वांचाच 'अर्थ' लावण्याचा प्रयत्न वेगवेगळ्या विचारवंतांनी केलेला आढळतो. विघ्नकृत, विघ्नेश, विघ्नराज, विघ्नेश्वर इ. नावे गणेशासाठी म्हणून योजिलेली पाहिली म्हणजे त्या नावामागे असलेला 'विघ्ने निर्माण करणारा' असा शब्दशः अर्थ बाजूला ठेवून विचार करावा लागतो. काही विद्वान म्हणतात की, विघ्नांचा स्वामी असलेला गणनायक विघ्नहर्ता होतो व मानव जातीचे कल्याण करतो. मोनियर-विल्यम्स म्हणतो[1]: 'जरी गणेश विघ्ने निर्माण करणारा असला तरी विघ्नांचा नाश करणारा तोच आहे. म्हणून तर प्रत्येक कार्याच्या आरंभी या विघ्ननाशकाला आवाहन करण्यात येते. "नमो गणेशाय विघ्नेश्वराय" या मंत्राचा अर्थच असा की हे विघ्नेश्वर गणेशा, तुला नमस्कार असो.' म्हणजे गणांचा प्रमुख असा विनायक विघ्नेश्वर म्हणूनच मानला गेला असावा. आर्यांनी 'गणेशा'ला स्वीकृत केल्यानंतर त्याचे 'विघ्नराज' हे रूप अस्तंगत झाले आणि तेथे तो मंगल करणाऱ्या देवाचे रूप धेऊन अवतरला. विपत्ती टाळण्याकरिता कार्यारंभी त्याला संतुष्ट करण्याची रीत सुरू झाली आणि त्याला कार्य सिद्धीस



१. संस्कृत-इंग्रजी शब्दकोश—मोनियर-विल्यम्सकृत पहा.

जावे म्हणून विनविण्यात आले. विघ्नकर्ता विनायक विघ्नहर्ता, सिद्धिदाता झाला. कोणी या गणनायक विनायकाला शिवगणांचा ईश म्हणून साक्षात शिवच म्हटले. कोणी त्याला शिवगणांचा सेनापती म्हणून 'स्कंद' असे संबोधिले. कोणी त्याला शिव-पार्वतीचा पुत्र असे मानले. कोणी त्याला परशुरामाशी झुंज देणारा वीरपुरुष मानले. कोणी त्याला गण-मातृकांचा अधिपती मानले. कोणी त्याला व्यासांचा 'लेखकु' या रूपात पाहिले. म्हणजे गणपतीचे मानवी शरीर हे मानव प्रकृतीचे निदर्शक ठरले तर त्याचे शिर हे महान ईश्वरी तत्त्वांचे निदर्शक आहे असे मानले गेले.[१] 'गणपती या शब्दाचा अर्थ गण म्हणजे तारागण, त्यांचा पती म्हणजे चंद्र,



एक आगळं ध्यान

१. 'गणपती', हरिदास.

म्हणजे तारागणांच्या समुदायात ठसठशीतपणे दिसणारा असा असला पाहिजे.'[1] गणपती हे रुद्राचेच स्वरूप आहे असाही काही विचारवंतांचा दावा आहे. योगात आणि तंत्रात 'मूलाधार चक्राची देवता गणपती आहे' असा निर्देश आहे. श्रीगणेशाचे ओंकारमयत्व गणेशतापिनी, गणेशपुराण, शिवपुराण, देवीभागवत यांत स्पष्टपणे मांडलेले आहे.

'गणपती'च्या विविध रूपांची जाणीव मराठी कवींनाही झालेली आहे. ग्रंथारंभी गणेशवंदन करण्याच्या निमित्ताने अनेक मराठी कवींनी शब्दकुसुमांची पूजा बांधिली आहे व आपल्या मनीचा भाव व्यक्त केला आहे. पदे, अभंग, स्तोत्रे, आरत्या, भूपाळ्या या काव्यप्रकारांच्या माध्यमातून मराठी कवींनी 'गणेशमहिमा' गायिलेला आहे. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांना गणेशमूर्ती प्रतीत होते ती 'शब्दब्रह्म' म्हणून. ते लिहितात—

**हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।**
**तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ।।** (ज्ञा. १:३)

'सकलमतिप्रकाश' गणेशाचे स्मृती हेच अवयव आहेत. त्या अवयवांवर अर्थ-सौंदर्याचे लावण्य झळाळत आहे. अठरा पुराणे ही तर त्याची मणिभूषणे होत. पदपद्धतींच्या कोंदणात जडवलेली प्रमेयरत्ने व नागर पदबंधाची रंगीत वस्त्रे त्याने परिधान केलेली आहेत. काव्य नाटकांच्या घुंगरातून गोड अर्थध्वनी येत आहे. व्यासादिकांच्या बुद्धीचा शेला कमरेला बांधलेला आहे. सहा शास्त्रे म्हणजे गणपतीचे सहा हात. विवेकाच्या सरळ शुंडादंडावर महासुखाचा परमानंद उसळतो आहे. संवाद हा त्याचा दात आणि समता ही त्या दाताची शुभ्रता. उन्मेष हा विघ्नराजाचा सूक्ष्म नेत्र. पूर्वोत्तर मीमांसा हे दोन कर्ण ! ज्ञानमकरंदाने घमघमणाऱ्या दहा उपनिषदांच्या सुवासिक कुसुमांचा मुकुट त्याला शोभतो आहे. अशा या गणेशाचे 'ओंकार स्वरूप' वर्णिताना ज्ञानदेव म्हणतात—

**अकार चरणयुगुल । उकार उदर विशाळ ।**
**मकार महामंडळ । मस्तकाकारें ।।**

**हें तिन्हीं एकवटलें । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।**
**तें मियां गुरुकृपा नमिलें । आदिबीज ।।** (ज्ञा. १:१९–२०)

'एकदंता'चे ज्ञानेश्वरांनी जसे वर्णन केले तसेच एकनाथांनी गणेशाचे 'वाङ्मयरूप' वर्णन केले. गणेशाची कृपा होताच चौदा विद्या हस्तगत होतील आणि मुके वेदघोष बोलतील असा नामदेवांचा विश्वास आहे. भक्तजनांची विघ्ने दूर करणाऱ्या गणेशाला तुकारामांनी भावपुष्पांजली वाहिली आहे. 'सकल विद्यांचे आगर' असलेल्या गणेशाच्या मूर्तीचे अत्यंत ठसठशीत चित्र श्रीसमर्थ रामदास



१. केळकर, रा. ना. आमच्या देवांच्या मूर्ती, पृ. १० ते १६.

रेखाटतात आणि त्यांची श्रद्धा आहे की, गणेशाच्या कृपाप्रसादाने भ्रांतीची पटले वितळून जातात आणि विश्वभक्षक काळही दास्यत्व करू लागतो, यदुमाणिक गणेशपुराणावर लिहिलेल्या संजीवनी टीकेत म्हणतात—

**ऐसा तूं लोकत्रयवंद्य । निरूपम त्रिजगदाद्य ।**
**होसी सर्वंग स्वयं वेद्य । तूं अगाध श्रुतीस्मृतीसी ।।**

श्रीगणेश मूर्ती : बर्मा, मलाया, जावा



मुक्तेश्वराला श्रीगणेशाचे रूप जाणवते ते 'उन्मेष धनदाता' म्हणून. 'अष्ट हस्तीं आयुधें' घेतलेला गणेश प्रापंचिकांना अज्ञानतिमिरातून ज्ञानाच्या प्रकाशाकडे नेतो असा कवि श्रीधराचा भाव आहे. 'महाराज गौरीनंदना, अमरवंदना,

दैत्यकंदना, हे मंगलमूर्ती, ठेवा कृपादृष्टी, एकदंत दिनावर पुरती' असे आवाहन करणाऱ्या 'गणा'ची लावणी शाहीर रामजोशांनी फडाफडांतून खेळवली, नाचवली! संतकवींनी, शाहिरांनी गणेशाची पूजा मनोभावे बांधिली ती आपली कलासाधना सफळ व्हावी म्हणून, आर्ताचे मनोरथ पुरावे म्हणून! मराठी मुलुखात गणेश दैवताची आराधना तर झालीच पण जगाच्या विविध भागांतही 'गणेश'पूजा करण्यात आली. 'मोरगाव'पासून ते मेक्सिकोपर्यंत जी विविध गणेशस्थाने आढळतात तीच या गणेशभक्तीची साक्ष देतात.

'श्रीगणेशाय नमः' हा आमचा कार्यारंभीचा महान मंत्र आहे. महाराष्ट्रात वा अन्यत्र गणेशस्थाने अगणित असली तरी 'अष्टविनायकांना' जे महत्त्व आहे ते अन्य गणेशस्थानांना नाही. अष्टविनायकांची ही सर्वमान्य गणना पुराणांना मान्य नाही.[१] पुराणप्रसिद्ध गणेशस्थाने आठ नसून एकवीस आहेत. पुराणप्रसिद्ध अष्ट-विनायक भारताच्या आठ दिशांना आहेत. पूर्वादी दिशानुक्रमाने त्यांची नावे वक्रतुंड, एकदंत, महोदर, गजानन, लंबोदर, विकट, विघ्नराज व धूम्रवर्ण अशी 'अंकुश'कारांनी दिलेली आहेत. पुराणप्रसिद्ध एकवीस स्थानांपैकी मोरगाव, कळंब, अदासा, गंगामसले, राक्षसभुवन, सिद्धटेक, रांजणगाव, लेण्याद्री, वेरूळ, पद्माळे, नामलगाव आणि राजूर ही बारा गणेशक्षेत्रे महाराष्ट्रात आहेत. पण लोकमान्य परंपरा मात्र अष्टविनायक स्थाने जी मानते ती अशी :

**स्वस्तिश्री गणनायको गजमुखो मोरेश्वरः सिद्धिदः**
**बल्लाळस्तु विनायकस्त्वथ मढे चिंतामणिस्थेवरे**
**लेण्याद्रौ गिरिजात्मजः सुवरदो विघ्नेश्वरश्चोझरे**
**ग्रामे रांजण संस्थितो गणपतिः कुर्यात् सदा मंगलम्**

अष्टविनायक स्थानांत 'मोरगाव' हे पहिले स्थान. पुण्यापासून चाळीस मैल अंतरावर असलेले कमंडलू किंवा कऱ्हा नदीच्या काठी वसलेले मोरगाव मयूरेश्वर गणेशाच्या वास्तव्याने पावन झाले आहे. येथेच 'दर्शनमात्रे मनःकामना पुरविणाऱ्या' मयूरेश्वराच्या कृपेने मोरया गोसाव्यांचा जन्म झाला आणि त्यांच्या गणेशभक्तीला फुलोरा आला तोही येथेच. 'रात्रंदिवस वाट पाहात' रहाणाऱ्या मोरया गोसाव्यांनी आत्मसाक्षात्काराचा सोहळा अनुभवला तो येथेच. अठराव्या शतकाच्या अखेरीस मयूरेश्वर गणपतीची हाक ऐकून गणेश योगींद्र आले ते येथेच. त्यांनीच गणेशोपासनेचा वृक्षही फुलविला. मोरया गोसावी, गणेश योगींद्र यांना ब्रह्मविद्येचा प्रसाद देऊन मुक्त करणाऱ्या मयूरेश्वर गणेशाचे देऊळ आहे ते गावाच्या मध्यभागी! देवळाभोवती संरक्षणार्थ तट बांधला आहे आणि चार

१. ढेरे, रा. चिं., नमन एकदंता, केसरी, २८ फेब्रुवारी १९६५.
२. गाडगीळ, अमरेंद्र, गणेशकोश, खंड २, पृ. १.

कोपऱ्यांत चार मिनारासारखे स्तंभ आहेत व त्यांतूनच देवालयाचे शिखर लक्ष वेधून घेते. मंदिराच्या प्राकाराबाहेर पायऱ्या चढण्यापूर्वी नगारखाना आहे. या नगारखान्याचे खाली गणपतीकडे तोंड करून असलेला व आपल्या पुढच्या पायात लाडू घेऊन उभा राहिलेला दगडाचा प्रचंड उंदीर आहे व त्यापुढे पंधरा एक फूट



मयूरेश्वर : मोरगाव

उंचीवर दगडी चौथरा व त्यावर एक भला मोठा नंदी चित्त वेधून घेतो. देवाचे शेजघर, सभामंडप, नग्न भैरवाचे देऊळ, तरटीचे जुने झाड इ. पाहून भक्तांचे अंतःकरण उचंबळून येते आणि 'गणपती बाप्पा मोरया' या नामघोषात ते आपले सगळे दुःख विसरू लागतात. गाभाऱ्यातील मयूरेश्वराच्या परमरमणीय मूर्तीचे दर्शन घेऊन मन प्रसन्न होते. गणेशाच्या आठ प्रतिमा आणि नव्याने बसविलेल्या तेवीस परिवार मूर्तींच्या मेळाव्यात मयूरेश्वर एका हाती पाश व दुसऱ्या हाती

अंकुश धारण करून, उजवा हात गुडघ्यावर ठेवून डाव्या हातात मोदक धारण करून आसनस्थ आहे. कपाळावर तृतीय नेत्र विराजमान आहे. उजव्या डाव्या बाजूंना ऋद्धिसिद्धी आहेत व पुढ्यात मूषक व मयूर ही वाहने आहेत. या 'स्वानंदेश' मयूरेश्वराचे दर्शन घेऊन तृप्त झालेल्या समर्थांनी म्हटले—

> सुखकर्ता, दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ।
> नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।
> सर्वांगी सुंदर उटि शेंदूराची ।
> कंठी झळके माळ मुक्ताफळांची ।।

बारा वर्षे निष्ठेने आराधना करणाऱ्या गणेश योगींद्रांनी आपली भक्तिभावना कुंचल्यातून व्यक्त केल्याची साक्ष ओवरीच्या भिंतीवर काढलेली चित्रे आजही देतात.

पुणे-नगर रस्त्यावर पुण्यापासून एकतीस मैलांवर अष्टविनायकांपैकी दुसरे स्थान म्हणजे रांजणगाव. रांजणगावच्या महागणपतीचे देऊळ चुनेगच्ची व सुंदर कळसाचे आहे. सध्या महागणपतीची जी दृश्यमूर्ती आहे तिच्याखाली तळघरात एक लहान मूर्ती आहे. तिला दहा सोंडा व वीस हात आहेत. रांजणगावचे क्षेत्र तसे प्राचीन. भगवान शंकरांनी ज्या क्षेत्रात तपश्चर्या केली, गणेशाला प्रसन्न करून जो बीज मंत्र घेऊन त्रिपुरासुराचा नाश केला तेच हे क्षेत्र. येथे त्यांनी मणिपूर नावाचे नगर वसविले तेच हे रांजणगाव! रांजणगावचा महागणपती भक्तावर प्रसन्न झाल्याच्या किती तरी आख्यायिका येथे वावरतात. नामदेवबुवा, भिलवडीकरमहाराज, गुर्जर इत्यादी किती तरी भक्तांना 'महागणपती'चे दर्शन घडले आणि त्यांचे जीवन कृतार्थ झाले. आज दिसते त्या मूर्तीचे आसन मांडीचे आहे व तिची सोंड डाव्या बाजूला वळलेली आहे. या गणेशस्थानाचे बांधकाम कसे झाले, केव्हा झाले ते सांगणारे 'देवां'चे मल्हारराव होळकरांच्या दिवाणाला लिहिलेले एक पत्र आढळते तर दुसऱ्या पत्रात 'देव' म्हणतात, 'मौजे रांजणगाव तर्फ पाबळ तनखा रुपये २,२०१ हा गाव श्रीच्या अन्नछत्राचे उत्सवाचे बेगमीस असावा.' ही दोन्ही पत्रे य. न. केळकरांना त्यांच्या संशोधनात मिळाली आहेत.

अष्टविनायकांपैकी तिसरे स्थान थेऊर येथे! थेऊर हे पेशव्यांचे आवडते स्थान. या स्थानावर पेशव्यांनी अक्षरशः देणग्यांचा वर्षाव केला. नानासाहेब, थोरले माधवराव यांची तर या स्थानावर असीम निष्ठा होती. थोरल्या माधवरावांनी अखेरचा श्वास सोडला तो याच गणेशचरणी! याच अखेरच्या क्षणी त्यांनी गणेशाला दहा हजार रुपयांचा मोत्यांचा तुरा दिला. देवळाच्या ओवरीत अखेरचा श्वास सोडणारे माधवराव आणि त्यांच्या पाठोपाठ सती



श्रीचिंतामणी :
थेऊर

जाणाऱ्या रमाबाई यांच्या स्मृती या देवस्थानाभोवती अद्यापही रेंगाळतात. मुळामुठेचे पात्र विस्तीर्ण होऊन जो डोह आहे तेच चिंतामणी तीर्थ. तसे पाहिले तर थेऊर गावाला तिन्ही बाजूंनी मुळामुठेने वेढलेले आहे. मंदिर केवढे चित्तवेधक! त्यातील गणेशमूर्ती डाव्या सोंडेची, पूर्वाभिमुख आणि मांडी घालून आसनस्थ! मूर्तीचे ध्यान केले की, 'चिंतामणी' प्राप्त झाल्याचे सुख मिळते! कारण हा चिंतामणी गणेश प्रजापती ब्रह्मदेवाला प्रसन्न झाला आणि त्याला त्याने चित्तशांती व सृजनशक्ती प्राप्त करून दिली! येथेच इंद्राने तपश्चर्या करून गौतममुनींच्या शापातून मुक्ती मिळविली आणि तो पावन झाला. कपिलमुनींनी श्रीविनायकाची आराधना केली आणि विनायकाने दैत्यासारख्या मातलेल्या अभिजित व गुणवती यांच्या अपत्याशी युद्ध केले व त्याचा संहार केला. कपिलमुनींना त्यांचे 'चिंतामणी रत्न' पुनः मिळवून दिले. अशा अनेक कथांनी गजबजलेले आणि मोरया गोसाव्यांनी केलेल्या तपश्चर्येमुळे

आणि पेशव्यांच्या भक्तीने न्हाऊन निघालेले अष्टविनायकांचे हे स्थान केवळ अपूर्व आहे.

भीमेच्या काठी सिद्धिविनायक गणपतीचे मंदिर असलेले अष्टविनायकांपैकी चौथे स्थान म्हणजे सिद्धटेक! गणपतीचे मंदिर उत्तराभिमुख! सरदार हरिपंत फडके यांनी बांधलेला फरसबंदीचा मार्ग वेशीपासून देवळापर्यंत आहे. देवालयाचा मधला गाभारा अहिल्याबाईंनी बांधला. गाभाऱ्यात सिद्धिविनायकाची मूर्ती स्वयंभू असून ३ फूट उंच व २½ फूट रुंद आहे. मूर्ती गजमुख, सोंड उजवीकडे झुकलेली. एक मांडी घातलेली व तीवर ऋद्धिसिद्धी बसलेल्या. उजव्या सोंडेचे हे एक दैवत कडक मानतात. या कडक स्थानाभोवती जी कथा प्रचलित आहे तीही अपूर्वच. मधू आणि कैटभ या दोन अतिशय पराक्रमी दैत्यांनी ब्रह्मदेवाला त्याच्या सृष्टिरचनेच्या कार्यात विघ्ने निर्माण केली. ब्रह्मदेवाने विष्णूचे सहाय्य घेतले पण तेही निष्फळ ठरले. अखेर शंकराच्या आज्ञेप्रमाणे विष्णूंनी षडाक्षरी मंत्र जपून विनायकाला प्रसन्न करून घेतले. विष्णूला येथेच सिद्धी लाभली



श्रीसिद्धिविनायक
सिद्धटेक

म्हणून हे क्षेत्र 'सिद्धक्षेत्र' किंवा 'सिद्धटेक' म्हणून प्रसिद्धीस आले. या क्षेत्राला जाऊन दर्शन घ्यायचे म्हणजे यातायात करावी लागते. पुणे-सोलापूर रेल्वे मार्गावर बोरीवेल या छोटया स्टेशनावर उतरायचे व बैलगाडीने भीमेच्या पलीकडे असलेल्या या गावी यायचे. पण तरीही चित्तशांती देणाऱ्या या दैवताच्या दर्शनासाठी भक्तजनांची दाटी होतेच. हरिपंत फडक्यांनी सिद्धटेकच्या भूमीतच अखेरची विश्रांती घेतली.

अष्टविनायकांपैकी पाचवे स्थान पालीच्या बल्लाळेश्वराचे! पुण्याहून सत्तर मैलांवर असलेले कुलाबा जिल्ह्यातील सुधागड तालुक्यातील हे छोटे गाव! बल्लाळ नावाच्या एका लहान मुलाच्या भक्तीवर संतुष्ट होऊन श्रीगणेश हे त्या मुलाने पुजलेल्या शिळेत येऊन राहिले अशी कथा मुद्गल पुराणात आढळते. पालीचे देऊळ पूर्वाभिमुख त्यामुळे सूर्योदय होताच सूर्याचे किरण या गणेशमूर्तीला अभिवादन करतात. देवळाचा गाभारा १५ फूट उंच आहे आणि बाहेरील उंदराचा गाभारा १२ फूट उंच आहे. त्यामध्ये उंदराची मूर्ती हातात मोदक घेऊन गजाननाकडे पाहात आहे. सभामंडप चांगला लांबरुंद आणि सुरूचे खांब असलेला! मंदिरासमोर दोन तळी व घाट! गाभाऱ्यात बल्लाळ विनायकाची मूर्ती ३ फूट उंचीची पण रुंदट! कपाळाचा काही भाग खोलगट असून मुखभाग चांगला स्पष्ट! सोंड डावीकडे झुकलेली आणि मूर्ती दगडी सिंहासनावर विराजमान झालेली! या जागृत देवस्थानात जीभ कापून देवास वाहणारे किती तरी भक्त होऊन गेल्याच्या कथा आढळतात.

अष्टविनायकांच्या या महायात्रेतील सहावे ठिकाण म्हणजे जुन्नरजवळील लेण्याद्री गणपतीचे! डोंगरावर कोरलेल्या एका लेण्यात ही गणेशमूर्ती असल्यामुळे 'लेण्याद्री गणपती' अशी तिची ख्याती झाली. हिमालयकन्या पार्वतीने पुत्र व्हावा म्हणून या डोंगरातच तपश्चर्या केली. आपले मन एकाग्र व्हावे म्हणून तिने मातीची जी बालमूर्ती बनविली होती त्यातूनच तिच्या भक्तीने प्रसन्न होऊन गणेश बालरूपात प्रकट झाले अशी कथा आजही आपण ऐकतो. गणेशाच्या बाललीला जेथे झाल्या तो हा डोंगर जुन्नरजवळ तीन मैलांवर! जुन्नरच्या उत्तरेस कुकडी नदीच्या पलीकडे एका डोंगरावर कोरून काढलेले हे देऊळ! देवळासमोरच्या सभामंडपात कोरून काढलेले सहा खांब, दोन्ही बाजूंना १७-१८ ओवऱ्या दिसतात. पायऱ्या उतरून आले की एक प्रचंड बौद्ध स्तूप लागतो आणि त्याचा आकार पाहून लोक म्हणतात ही 'भीमाची गदा'. देवळातील मूर्ती तशी रेखीव नाही. गणेशाला शेंदराचा हवा तसा आकार दिलेला! पण भक्तजन पूजा करतात ती गिरिजात्मज म्हणूनच. 'शिवनेरी' किल्ल्याचे दर्शन घडते ते येथूनच. लेण्याद्रीस जे दर्शन होते ते केवळ गणपतीच्या पाठीचे आणि म्हणूनच

पाठपोट दोन्ही ज्यात समाविष्ट आहेत अशा त्या डोंगराचेच गणेश म्हणून ध्यान चालते.

अष्टविनायकांपैकी एक रमणीय स्थान म्हणजे ओझरचे! विघ्ननायक राक्षसाचा येथे गजाननाने पराभव केला म्हणून येथील गणपतीची मूर्ती विघ्नेश्वर गणपती म्हणून प्रसिद्ध आहे. नारायणगावाहून जुन्नरला जाताना सुमारे चार फर्लांगांवर ओझरकडे फाटा फुटतो व तेथून ओझर पाच मैलांवर आहे. कुकडी नदी ओलांडूनच पुढे जावे लागते. विघ्नहराचे देवालय पूर्वाभिमुख! देवालय चारी बाजूंनी दगडी तटाने बंदिस्त आहे. मुख्य देवाच्या मूर्तीसमोरचा मंडप औरसचौरस १० फूट आहे. खुल्या दारातून बाहेर पडले म्हणजे दाराशीच काळ्या कुळकुळीत दगडाचा उंदीर पळण्याच्या तयारीत असलेला दिसतो. मुख्य मूर्ती पूर्णाकृती, मांडी घातलेली, सोंड डावीकडे असलेली. डोळ्यांत माणके, कपाळावर हिरा व बेंबीत खडा अशी आहे. या मूर्तीचे ध्यान चित्ती साठवीत भक्त प्रसन्न होऊन जातो.

अष्टविनायकांमधील आठवे स्थान आहे कुलाबा जिल्ह्यातील महाडच्या किंवा मढच्या वरद विनायकाचे! वेदप्रसिद्ध गृत्समद ऋषीने या देवालयाची स्थापना केली अशी समजूत आहे. गृत्समद ऋषी गणेशाला आवाहन करताना म्हणतो:

> 'हे ब्रह्मणस्पते, तू गणांचा अधिपती आहेस. तू कवींचा कवी, ज्ञात्यांचा ज्ञाता आहेस . . . तू आपल्या सर्व शक्तीसह ये आणि या आसनावर विराजमान हो!'

ऋग्वेदातील दुसरे मंडल रचणाऱ्या या मंत्रद्रष्ट्या ऋषीने विनायकाला प्रसन्न केले म्हणूनच हा गणपती वरद विनायक म्हणून विख्यात पावला. गणपतीचे मंदिर पूर्वाभिमुख आहे. बाहेरून ते एखाद्या जुनाट कौलारू घराप्रमाणे वाटते पण आतून ते उत्कृष्टपणे कोरलेल्या दगडांचे आहे. देवालयाच्या गाभाऱ्यातील मुख्य मूर्ती दगडी महिरपी नक्षीदार सिंहासनावर विराजमान झालेली आहे. मूर्ती दगडी व तिची सोंड डावीकडे झुकलेली. या निसर्गरम्य देवस्थानाला पेशव्यांनी आश्रय दिला.

या अष्टविनायकांच्या स्थानाचा महिमा लक्षात घेतला तर एक गोष्ट स्पष्ट होते की, ही गणेशपूजा अतिशय प्राचीन आहे. गणेशोपासनेचा प्रवाह अव्याहत वाहात आला आहे आणि महाराष्ट्रातील भक्तिपरंपरेशी तो पूर्णपणे संवादी आहे. पेशव्यांनी परम निष्ठेने गणेशपूजन केलेले असल्यामुळे ही सगळी स्थाने राजाश्रय मिळवू शकली. या स्थानांचें दर्शन घेत, तेथील विनायकाच्या विविध रूपांचे ध्यान करीत, संतसज्जनांनी रचलेल्या गणेशभक्तिपर-वाङ्मयसरितेत अवगाहन

करीत प्रापंचिकांनी अपार आनंद मिळविला. ज्ञानदेवाप्रमाणे निरंजनदासांनी विश्वकल्याणाचे 'पसायदान' मागितले आणि म्हटले--

**दुष्टांचे दुष्टपण मोडो । अंतरीं सद्भाव जडो ।**
**परस्परें प्रीति घडो । अभिमान उडो सरळ हा ॥**

**ब्रह्मानंदें सकळ सृष्टि । हें लावोही अमृतवृष्टि ।**
**जीव भवसंकटीं । न पडोत कोणी ॥**

तसे पाहिले तर 'दुरितांचे तिमिर जावो। विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ॥' असे म्हणणाऱ्या ज्ञानदेवांच्या आशयाचाच गणेशभक्त निरंजनदास पुनरुच्चार करीत आहे.[1] भक्ताने यापरते कोणत्याही दैवताजवळ वेगळे असे आणखी काय मागावे ? मोरया गोसावी यांच्या पुत्राने–चिंतामणी गोसाव्यानेदेखील असेच म्हटले की--

**गणराज चरणीं माझे लुब्धलेसें मन ।**
**पहावया निजरूप द्यावे भक्तीचें अंजन ॥**

ही भक्तीची शक्तीच प्रत्येकाला हवी असते. ती हवी म्हणून माणूस दैवतासमोर नतमस्तक होतो. कारण तुकोबाप्रमाणे त्याचीही खात्री असते की, भक्तीचा डांगोरा पिटला तर कळिकाळालाही भय उत्पन्न होते ! भक्तीच्या वाटेने जाण्यातच माणसाचे जीवित 'अर्थपूर्ण' होते. आपल्या जीविताला अर्थ प्राप्त करून देणारे शब्दब्रह्म म्हणजे गणनायक विनायक ! त्याचे वास्तव्य या पुराणप्रसिद्ध वा लोकमान्य अष्टविनायकस्थानांत केवळ नाही. कारण गणेश या चराचरात भरून राहिला आहे. तोच असुंदर, असत्य, अमंगल इत्यादींचा नाश करून जीवन सुंदर, सत्य आणि मंगल बनविणारा आहे ! तोच अंधारातून प्रकाशाकडे नेणारे चैतन्य आहे ! तोच रसपूर्ण जीवनाचा आरंभ आहे ! तोच सर्वांगसुंदर आहे ! तोच 'सकल विद्यांचे आगर'ही आहे !

१. ढेरे, रा. चिं., विविधा, पृ. ३ ते ३०.



# सर्व विद्या आणि कला यांचा अधिपती

लेखक : श्री. यशवंत दि. पेंढरकर

### श्रीगणेशाचा महिमा

'कपील, एऽऽ कपीलऽ' एक माउली आपल्या लडिवाळाला हाक मारीत होती. नाव ऐकून नवल वाटले. नावातला 'ल' ऐकू आला नसता तरीही नवल वाटले असते. बाललीला 'कपी'सारख्या असतात हे ध्यानी घेऊन आश्चर्य वाटले असते. पण 'कपील' हे तरी नाव काय आहे ? कपिल नावाचा एक महर्षी होता हे ठाऊक होते. पण महर्षीचे नाव ठेवण्याची तरी का बुद्धी व्हावी ? असे मनात तरंग उठले. तोच 'कपील, एऽऽ कपीलऽ' ही हाक पुन्हा कानी आली, आणि एकदम मनात आणखी एक तरंग उठला—'कपिलो गजकर्णक.' कपिल हे गणपतीचे नाव आहे (हाक मारताना पी दीर्घ झाली एवढेच). गणपती, गजानन, मोरेश्वर, ही झाली नेहमीची नावे. त्यापेक्षा जरा वेगळे पण त्याच देवाचे म्हणून 'कपिल' हे नाव ठेवलेले दिसते. हे ध्यानात येऊन, कपिल नाव ठेवणाराचे कौतुक वाटले.

मंगल कार्यारंभी शुभचिंतन म्हणून आपण गणपतीची बारा नावे उच्चारितो त्यात कपिल नाव आहे—

> सुमुखश्चैकदन्तश्च कपिलो गजकर्णकः
> लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः
>
> धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजाननः
> द्वादशैतानि नामानि . . .

ह्या नावांचा जप केल्याने विद्यारंभ, विवाह, गृहप्रवेश, प्रवास, युद्ध, संकटे, यांतून निर्विघ्नपणे पार पडता येते असा गणपतीचा महिमा सांगितला आहे.

वरील संस्कृत श्लोकांतील बारा नावे स्पष्टपणे अशी : सुमुख, एकदंत, कपिल, गजकर्णक, लंबोदर, विकट, विघ्ननाश, गणाधिप, धूम्रकेतू, गणाध्यक्ष, भालचंद्र व गजानन. यातील काही नावांमागे थोडा इतिहास दिसतो.

**'गजानन' व 'गजकर्णक'**

शंकर-पार्वतीचा हा मुलगा. सुमुख म्हटलेले आहे त्याला. मग हा गजकर्णक व गजानन कसा झाला? पुराणात ती कथा सांगितली आहे. गणेशाची आई पार्वती एकदा स्नानाला बसली होती. कोणी आत डोकावू नये म्हणून तिने ह्याला दारावर राखणीला बसविले. त्यावेळी खुद्द शंकरच तिथे आले. आईच्या आज्ञेवरून त्याने वडिलांना मज्जाव केला. बाप-लेकांत प्रकरण हातघाईवर आले. शंकराने याचे डोकेच उडविले. पण आईला हे कसे सहन होईल? तिने पतीची प्रार्थना केली. मग शंकराने इंद्राच्या हत्तीचे मस्तक आणून बसविले. म्हणून हा गणेश 'गजानन' व 'गजकर्णक' झाला.

**'एकदंता'ची कथा**

'एकदंत' ह्या नावातही अशीच एक गोष्ट आहे. परशुरामाने तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले. तेव्हा शंकराने त्याला शस्त्र म्हणून आपला परशू दिला. हा परशुराम असाच एकदा शंकराच्या भेटीस आला असताना 'ही भेटायची वेळ नाही' म्हणून गणेशाने परशुरामाला अडवले. परशुरामाला राग आला. त्याने गणपतीवर परशू फेकून मारला. वडिलांनी दिलेला तो परशू त्याचा कसा प्रतिकार करायचा, म्हणून गणपतीने त्याला तोंड दिले. तो परशू त्याच्या दातांवर आपटला. त्यामुळे एक दात तुटून पडला. मग उरला एकच दात. तेव्हापासून नाव झाले एकदंत. पण पडलेला दात गणपतीने टाकून दिला नाही. हत्यार म्हणून त्याने त्याचा उपयोग केला.

'सर्वांगी सुंदर उटि शेंदूराची' असे आरतीत म्हटले आहे. याचा अर्थ गणपतीला शेंदूर आवडतो. का आवडतो? त्याचीसुद्धा गोष्ट आहे.

सिंदूर नावाचा एक असुर होता. त्याचा बीमोड करायला हवा म्हणून गणपतीने त्याच्याशी युद्ध करून त्याला ठार मारले आणि त्याचे रक्त आपल्या अंगाला माखले. हा केवळ विजयाचा उन्माद नव्हे, तर सिंदुरासुराचे रक्त सुवासिक होते. तेव्हापासून गणेशाला शेंदूर प्रिय आहे असे रूढ झाले.

गणपतीची बारा नावे वर दिली आहेत. त्याहून जी निराळी यादी सापडते तिच्यात पुढील नावे आहेत : गणपती, विघ्नराज, लंबतुंड, गजानन, द्वैमातुर, हेरंब, एकदंत, गणाधिप, विनायक, चारुकर्ण, पशुपाल व भवात्मज.

**गोकर्ण महाबळेश्वर**

'पशुपाल' ह्या नावाला काही इतिहास असेल का? रावणाने तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले व त्याच्याकडून त्याचे आत्मलिंग मिळविले. ते 

# सर्व विद्या आणि कला यांचा अधिपती

लेखक : **श्री. यशवंत दि. पेंढरकर**

**श्रीगणेशाचा महिमा**

'कपील, एऽऽ कपीलऽ' एक माउली आपल्या लडिवाळाला हाक मारीत होती. नाव ऐकून नवल वाटले. नावातला 'ल' ऐकू आला नसता तरीही नवल वाटले असते. बाललीला 'कपी'सारख्या असतात हे ध्यानी घेऊन आश्चर्य वाटले असते. पण 'कपील' हे तरी नाव काय आहे? कपिल नावाचा एक महर्षी होता हे ठाऊक होते. पण महर्षीचे नाव ठेवण्याची तरी का बुद्धी व्हावी? असे मनात तरंग उठले. तोच 'कपील, एऽऽ कपीलऽ' ही हाक पुन्हा कानी आली, आणि एकदम मनात आणखी एक तरंग उठला—'कपिलो गजकर्णक.' कपिल हे गणपतीचे नाव आहे (हाक मारताना पी दीर्घ झाली एवढेच). गणपती, गजानन, मोरेश्वर, ही झाली नेहमीची नावे. त्यापेक्षा जरा वेगळे पण त्याच देवाचे म्हणून 'कपिल' हे नाव ठेवलेले दिसते. हे ध्यानात येऊन, कपिल नाव ठेवणाराचे कौतुक वाटले.

मंगल कार्यारंभी शुभचिंतन म्हणून आपण गणपतीची बारा नावे उच्चारितो त्यात कपिल नाव आहे—

**सुमुखश्चैकदन्तश्च कपिलो गजकर्णक:**
**लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिप:**

**धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजानन:**
**द्वादशैतानि नामानि. . .**

ह्या नावांचा जप केल्याने विद्यारंभ, विवाह, गृहप्रवेश, प्रवास, युद्ध, संकटे, यांतून निर्विघ्नपणे पार पडता येते असा गणपतीचा महिमा सांगितला आहे.

वरील संस्कृत श्लोकांतील बारा नावे स्पष्टपणे अशी : सुमुख, एकदंत, कपिल, गजकर्णक, लंबोदर, विकट, विघ्ननाश, गणाधिप, धूम्रकेतु, गणाध्यक्ष, भालचंद्र व गजानन. यातील काही नावांमागे थोडा इतिहास दिसतो.

### 'गजानन' व 'गजकर्णक'

शंकर-पार्वतीचा हा मुलगा. सुमुख म्हटलेले आहे त्याला. मग हा गजकर्णक व गजानन कसा झाला? पुराणात ती कथा सांगितली आहे. गणेशाची आई पार्वती एकदा स्नानाला बसली होती. कोणी आत डोकावू नये म्हणून तिने ह्याला दारावर राखणीला बसविले. त्यावेळी खुद्द शंकरच तिथे आले. आईच्या आज्ञेवरून त्याने वडिलांना मज्जाव केला. बाप-लेकांत प्रकरण हातघाईवर आले. शंकराने याचे डोकेच उडविले. पण आईला हे कसे सहन होईल? तिने पतीची प्रार्थना केली. मग शंकराने इंद्राच्या हत्तीचे मस्तक आणून बसविले. म्हणून हा गणेश 'गजानन' व 'गजकर्णक' झाला.

### 'एकदंता'ची कथा

'एकदंत' ह्या नावातही अशीच एक गोष्ट आहे. परशुरामाने तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले. तेव्हा शंकराने त्याला शस्त्र म्हणून आपला परशू दिला. हा परशुराम असाच एकदा शंकराच्या भेटीस आला असताना 'ही भेटायची वेळ नाही' म्हणून गणेशाने परशुरामाला अडवले. परशुरामाला राग आला. त्याने गणपतीवर परशू फेकून मारला. वडिलांनी दिलेला तो परशू ह्याचा कसा प्रतिकार करायचा, म्हणून गणपतीने त्याला तोंड दिले. तो परशू त्याच्या दातांवर आपटला. त्यामुळे एक दात तुटून पडला. मग उरला एकच दात. तेव्हापासून नाव झाले एकदंत. पण पडलेला दात गणपतीने टाकून दिला नाही. हत्यार म्हणून त्याने त्याचा उपयोग केला.

'सर्वांगी सुंदर उटि शेंदूराची' असे आरतीत म्हटले आहे. याचा अर्थ गणपतीला शेंदूर आवडतो. का आवडतो? त्याचीसुद्धा गोष्ट आहे.

सिंदूर नावाचा एक असुर होता. त्याचा बीमोड करायला हवा म्हणून गणपतीने त्याच्याशी युद्ध करून त्याला ठार मारले आणि त्याचे रक्त आपल्या अंगाला माखले. हा केवळ विजयाचा उन्माद नव्हे, तर सिंदुरासुराचे रक्त सुवासिक होते. तेव्हापासून गणेशाला शेंदूर प्रिय आहे असे रूढ झाले.

गणपतीची बारा नावे वर दिली आहेत. त्याहून जी निराळी यादी सापडते तिच्यात पुढील नावे आहेत: गणपती, विघ्नराज, लंबतुंड, गजानन, द्वैमातुर, हेरंब, एकदंत, गणाधिप, विनायक, चारुकण, पशुपाल व भवात्मज.

### गोकर्ण महाबळेश्वर

'पशुपाल' ह्या नावाला काही इतिहास असेल का? रावणाने तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले व त्याच्याकडून त्याचे आत्मलिंग मिळविले. ते

घेऊन तो लंकेकडे निघाला. शंकराने आत्मलिंग दिले हा अनर्थ होय. तेव्हा धूर्तपणे रावणाला एक अट घातली गेली की, 'हे कुठे वाटेत जमिनीवर ठेवावयाचे नाही, जमिनीवर ठेवलेस की हे गुप्त होईल.' रावण ते लिंग घेऊन निघाला. पण शरीरधर्म कोणाला चुकले आहेत का? तशी निकड लागली तेव्हा त्याने काय करावे? इतक्यात त्याला एक गुराखी पोरगा दिसला. त्या गुराख्याला 'हे थोडा वेळ सांभाळ' असे म्हणून रावणाने ते त्याच्या हातात दिले. तो गुराखी म्हणजे दुसरा तिसरा कोणी नव्हता. तो होता गणेश. त्याने ते लिंग घेतले. आणि रावण लघुशंकेला बसल्याबरोबर तो ओरडला– 'अहो धावाऽधावाऽऽ हे फार जड आहे. मला पेलत नाही.' असा बहाणा करून ते त्याने खाली ठेवले. त्याबरोबर ते जमिनीत रुतले. रावण लगेच धावत आला व ते उपटून काढू लागला. पण ते निघेना. रावणाने जोर करून, पिरगळून उपटायचा प्रयत्न केला. लिंगाला पीळ पडला. तरीही ते उपटून निघाले नाही. जिथे हा प्रकार घडला ते ठिकाण गोकर्ण महाबळेश्वर. तेथील देवालयातील महादेवाच्या पिंडीला पीळ बसल्यामुळे गाईच्या कानासारखा आकार आलेला दिसतो. म्हणून हे गोकर्ण महाबळेश्वर. तेथील गणपतीच्या देवळातील मूर्ती दोन हाताची, पोरगेलीशी आहे. कारण गणपती पोरगेलासा गुराखी झाला होता आणि म्हणूनच त्याला 'पशुपाल' हे नाव पडले नसेल ना?

**कृतयुगातला अवतार**

गणपतीच्या काही नावांचा त्याच्या अवताराशी संबंध दिसतो. कृतयुगातला त्याचा अवतार 'विनायक' या नावाने ओळखला जातो. त्याचे वाहन सिंह. मढ येथील गणपतीचे विशेष नाव विनायक आहे. त्रेतायुगातील त्याच्या अवताराचे नाव मयूरेश्वर. तो मोरावर बसायचा. म्हणून नाव झाले मयूरेश्वर. हा मोरेश्वर आहे मोरगाव येथे. सिंदूरला मारणारा गजानन द्वापारयुगातला आणि चौथा अवतार 'धूम्रकेतू' हा कलियुगातला.

अष्टविनायकांच्या स्थानात ओझरचा 'विघ्नेश्वर', पालीचा 'बल्लाळेश्वर', थेऊरचा 'चिंतामणी', रांजणगावचा 'गणपती', सिद्धटेकचा 'गजमुख' आणि लेण्याद्री (जुन्नर) येथील 'गिरिजात्मज' यांचा समावेश आहे.

गणपतीची जन्मतिथी भाद्रपद शुद्ध चतुर्थी हीच एक नाही. वैशाखातील पौर्णिमा, ज्येष्ठातील आणि माघातील शुद्ध चतुर्थी ह्या तिथ्याही जन्मदिन म्हणून समजल्या जातात. पण विशेष माहात्म्य पावली ती भाद्रपद चतुर्थी. लोकमान्य टिळकांच्या पुरस्काराने उत्सवकर्त्यांनी हीच प्रामुख्याने मान्य झाली आहे.

 सर्व विद्या व कला यांचा अधिपती अशी ही देवता आहे. ❦ ❦

# ऐसा गणेशु पूजि जो

लेखिका : सौ. मुक्ता केणेकर

समोरासमोर दोन पंक्तींमध्ये ब्राह्मण बसलेले. चंदन वा विभूतिचर्चित नव्या मुद्रा, शिरावर पगड्या वा स्वच्छ पांढरे रुमाल, अंगात बाराबंद्या, खादी उपरणे, कानी क्वचित भिकबाळी. मंत्रोच्चारांबरोबर पगडीच्या लोंबत्या जरीपदराशी सलगी करीत झुलणारी उजव्या हातांच्या अनामिकांमध्ये पंचधातूची पवित्रकं. शरीराचा एकूण थाट 'महोदर, महाकाय' असा. असे श्रीधर भास्कर, हेरंबशास्त्री, पुरुषोत्तम तात्या, विद्याधर नाना, गोविंदभटजी, विष्णू गंगाधर पाटापाटावर बसलेले. उजेडासाठी चार पाच दिवे आहेत. गाभाऱ्यात लामण-दिवे आहेत. तुपाचे नंदादीप आहेत. चांदीची निरांजनं आहेत. धूपचंदनाच्या धूम्रवलयांनी गाभाऱ्यातला देव गजानन कोंदून गेला आहे. आरतीचा सोहळा भूदेवांच्या मंत्रजागरानं साजरा होतो आहे. पाचपन्नास तंबोऱ्यांच्या फक्त खर्जतारा अखंड छेडल्या जाव्यात, तसा तो ध्वनी वातावरण मुखरित करतो आहे. . .

गणपती अर्चनाचे माझ्या बालमनावरचे अगदी पहिलेवहिले संस्कार हे असे आहेत. ते अजून माझ्या मनात फुलासारखे घमघमताहेत. चाचरणारी जीभ बोबड्या बोलांचं लाघव दाखवू लागली तेव्हा शब्दोच्चारांची वाटच बघणाऱ्या आजोबांनी एका संध्याकाळी एक एक अक्षरानं शिकवलं——

**प्रारंभी विनंती करू गणपती विद्या दया सागरा ।**

'हे मोरेश्वरा, माझं अज्ञान दूर करून मला विमल बुद्धी दे. आमचे चिंता, क्लेश, दारिद्र्य, दुःख देशांतराला पाठव व आम्हांला, तुझ्या प्रिय भक्तांना सुखी कर.'

ताईचा हात धरून इवल्या इवल्या बोटांनी पाटीवर पहिली अक्षरं गिरवली तीसुद्धा 'श्रीगणेशाय नमः।'

लहानपणापासून असा हा गणपती देव माझा फार फार आवडता आहे. तो बुद्धी देतो, विद्या देतो, संकटे निवारतो, मखरात बसतो, खूप सुगंधी फुलांच्या माळा घालतो, गजमुख असला तरी सुंदर दिसतो आणि मोदकासारखी वस्तू नैवेद्याला मागतो.

## जीव लावणारी ती मूर्ती

लहानपणी गणेशोत्सव सुरू झाला की, दिवाळी फिकी पडेल अशी रोषणाई आणि उत्सव सुरू होई. रथापालख्यांतून खाली उतरून गणपतीबाप्पा सुवासिनींच्या औक्षणाचा उपचार घेऊन उंबरठ्याच्या आत येत. मंत्रोच्चारांच्या उच्चारांत प्रतिष्ठित होत. वातावरणातल्या पाण्यापावसाला न जुमानता भक्तांचा उत्साह सळसळू लागे. आरत्या, देवे-मंत्रपुष्पांच्या गर्जनांनी वाडे, वाडगे आणि गल्ल्या-बोळचा गजबजून उठत. रात्री टिपऱ्यांच्या तालावर मेळे येत. त्यांच्या टिपऱ्या, नाच, गाणी होत. मध्ये कृष्ण सजलेला असे. एखादा मावळी वेषातला 'रणमर्द मावळी मेळा' येई. त्यांची ऐतिहासिक कवनं चौकातल्या गणपतीपुढे होत. दहा दिवस असा चढत्या वाढत्या उत्साहाचा हा उत्सव चाले. आम्ही शाळा, पाटी नि खाणेपिणेदेखील विसरून जात असू.

हा आनंदाचा बाजार आटोपता घेताना मात्र आमचा जीव जडभारी होऊन जाई. गणपतीबाप्पा उत्तरपूजा होऊन बाहेर पडले की, आपलं काही डोळ्यांदेखत हरवत आहेसं वाटे. लोकांच्या झुंडीच्या झुंडी लेझीम हलगीच्या आणि होलारांच्या तालावर नाचू लागायच्या. कपाळं गुलालानं रंगायची. क्वचित पावसानं अंग भिजवली तरी लेझिमांचा ताल-ठेक्यांचा रंग मोडायचा नाही. अशी मुंगीच्या पावलांनी मिरवणूक पुढे सरकायची आणि 'पुढच्या वर्षी लवकर या' असे म्हणताना आमचे गळे भरून यायचे. आपल्या घरची मूर्ती वडील विसर्जित करताहेत हे बघताना तर माझ्या बालमैत्रिणी तिथेच नदी-वाळवंटात रडण्याचे तारांगण मांडीत. 'गणपती गेले गावाला चैन पडेना जिवाला' असे म्हणत परतताना एक मोठी मैत्रीणसुद्धा डोळे पुसताना मी बघितली आहे.

## मन मोहणारी लडिवाळ मिठी

गणपतीने लहानपणापासून असा आमच्या जिवाला वेध लावून ठेवला आहे. प्रत्येकाच्या आयुष्याला गणेशाची अशी लडिवाळ मिठी आहे. उल्हास असो की विवाद, उत्सव असो की विपत्ती, त्याचे स्मरण प्रथम कुठल्याही घरात व्हायचेच. काही धार्जिणे असो-नसो, पण देवघरात गणेशाची मूर्ती नाही असे होणे नाही

'विद्यारंभे विवाहे च' तो अगदी आधी हवा. पूजेची सुरुवात असो की भोजनारंभ, कथाकीर्तन असो की व्यवसायाचा प्रारंभ 'श्रीगणेशाय नमः' आधी व्हायचे. गणेशस्तुती आधी मग इतर स्तोत्रविस्तार. आमच्या शेजारी एक वैद्यराज होते. ते पुड्या बांधून रोग्याच्या हातात देताना 'वक्रतुंड महाकाय . . .' म्हणायचे आणि सांगायचे, 'औषध घेतानाही हाच श्लोक म्हणत औषध घ्या.' ती भाविक श्रद्धा रोग्याला मुक्त करायची नि वैद्यराजांचा लौकिक वाढवायची.

रोजच्या दळणकांडणा आधी गणेशदेवाचे स्मरण. संसारात दमल्याभागल्याची कर्म कहाणी बाजूला सारून हाती तांदळाचे दाणे घेता मनात स्थिरता येई आणि हाती कहाणीचे पुस्तक येई. पहिले पान उलटले रे उलटले की, मन हिरव्यागार आनंदाने डवरून येई. पहिली कहाणी सुरू होई. कुण्या सासुरवाशिणीचा जरासा कापरा नाजुक मर्यादशील आवाज ऐकू येई.

'ऐका परमेश्वरा, देवा गणेशा तुमची कहाणी. निर्मळ मळे, उदकाचे तळे, बेलाचा वृक्ष, सुवर्णाची कमळे तेथे विनायकाची देवळेरावळे.'

मनातल्या आनंदाला मोहोर फुटे. लोकसाहित्याने कहाण्यांच्या त्या रंगलेण्यामध्ये गणपतीभवती निर्मळ मळे, उदकाचे तळे, त्यात सोन्याची कमळे, काठी डौलदार, बेलपानांचा धुमार, देवळेरावळे निर्माण करून गणेशावरचे आपले प्रेम कितपत उत्कट आहे याची साक्ष दिली आहे. केशर-कस्तुरीच्या टिळ्याशिवाय देवाला देवपण नाही, अहेव लेण्याच्या चिमूटभर कुंकवाशिवाय कुलवतीला सौभाग्य नाही. तसे गणेशनमनाशिवाय ग्रंथाला ग्रंथपण नाही ही गोष्ट कालचीच नव्हे, तर अगदी वैदिक काळापासूनची आहे.

### वैदिक काळापासूनची मोहिनी

श्रीगणेश ही वैदिक देवता आहे. ऋग्वेदशाकलसंहिता, शुक्लयजुर्संहिता ही झाली वैदिक रचनांची यादी. तैत्तिरीय आरण्यक गाणपत्य, नारायणोपनिषद या उपनिषदांमध्येही गणेशस्तुती आलेली आढळते. अथर्ववेदीय गणपत्युपनिषद म्हणजे आपण आज ज्याला गणपत्यथर्वशीर्ष म्हणतो ते. भाविक आबालवृद्धांच्या ते ओळखीचे आहे. 'त्वमानंदमयं त्वंब्रह्ममयः । त्वं सच्चिदानंदाद्वितीयोसी' किंवा 'त्वंवाङ्मयस्त्वंचिन्मयः' या ओळी प्रत्येकाच्या ओठी आहेत. शेवटी नमस्कार करताना नम्र होऊन त्यात म्हटले आहे. व्राता (देवगण) च्या नायकाला नमस्कार असो. गणपतीला नमस्कार असो. प्रमथपती (शिवगणांचा नायक)ला नमस्कार असो. लंबोदराला, एकदंताला, विघ्नविनाशकाला, शिवपुत्राला अर्थात श्रीवरद मूर्तीला नमस्कार. पुनःपुन्हा नमस्कार.

### ज्ञानेशांचा लोभस 'माहेरू'

वेदवाङमयानंतर भक्तीला अधिक उजाळी देणारे, उपास्याशी अधिक जवळीक निर्माण करणारे, आपल्या इष्टदेवतेचा महिमा आपल्याला समजेल अशा आपल्याच भाषेतून आणून सुमधुर, भक्तीच्या सुगंधित बागा निर्माण करणारे वाङमय म्हणजे संतवाङमय, तिथेही हाच देव गजानन असाच आदरानं पूजिला गेला व उत्कटतेनं आदरिलाही गेला आहे. गणेशाचं स्वरूप एकाच ओवीत सांगताना बालयोगी पण साधकांची मायबाप असलेली ज्ञानेश्वर माउली म्हणते :

अकार चरण युगुल।
उकार उदर विशाल।
मकार महामंडळ।
मस्तकाकारें॥

त्याच्या श्रीविग्रहाचं वर्णन करताना ज्ञानदेवांची वाणी म्हणते :

मुक्तामाळा भव्यभूषणा।
श्रुति नेती गजानना।
तुझिया अंगींच्या नानाभूषणा।
कोण वर्णी॥

प्रेमळ पुष्पें दुर्वांकुरना।
आभास नयना अगम्यदर्शना।

सद्गुरुबोध प्रांजळा।
मोदक बोध कृपाळा।
गौरीनंदना घननीळा।
मेघश्यामा॥

तसेच

तूं श्रेष्ठ मंगलध्यान।
तुझें नाम आम्हा पावन।
तुझियानें भक्ति मुक्ति।
तुझियानें चाले स्फूर्ति।
तुझियानें हा संसार।
सार झाला।
कुलस्वामिया गणपती।
ज्ञानेश्वराची मंगलमूर्ती॥

ज्ञानदेवांचा कुलस्वामी हा मंगलमूर्ती गणेश इतरांप्रमाणे धातुपाषाणाचा नाही. तो ॐकार स्वरूप आहे. प्रत्यक्ष वाङमयब्रह्म आहे. प्रत्यक्ष ज्ञानदेव ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीचे मंगलाचरण करताना त्याच्या स्वरूपावर लोभावून गेले आहेत. त्यांचा गणेश सहा हातांचा आहे. शब्दब्रह्म हे त्याचे देखणे आणि सतेज

नेटके शरीर आहे. श्रुति-स्मृती हे त्याचे सुरेख अवयव आहेत. अठरा पुराणांचे विविध अलंकार तो ल्यायला आहे. चातुर्यमुक्त पद्यरचनेचं महावस्त्र तो पांघरला आहे. काव्यनाटकातील गोड अर्थध्वनी त्याच्या पायांतील नूपुरे आहेत. व्यासकृतीचे रत्नखचित जडाव त्याच्या कमरेभोवती बसले आहेत. षड्दर्शने या सहा भुजा, साक्षात्कार-सुख ही त्याची सोंड आहे. खरोखर ज्ञानेश्वर हे 'ईश्वरू' तर त्यांना 'वेधु' लावणारा गणपती हा लोभस रूपगुणांचा 'महेश्वरू' आहे.

### एकनाथांनी वर्णिलेली महती

ज्ञानदेवांनी पाया रचिलेल्या देवालयाला श्रीमद्भागवताच्या स्तंभानं उभारणारे दुसरे नाथ म्हणजे एकनाथमहाराज. त्यांचा वाङ्मयसंसार फार विशाल. लोकभाषेतूनच नव्हे तर लोककलांचा, लोकरीतींचा, वृत्तांचा आश्रय करून भगवद्भक्ती अपेक्षित स्तरांपर्यंत पोचवणारे नाथच. भागवताच्या रचनेला सुरुवात करताना तेही या मंगलमूर्तीचा आश्रय घेतील यात नवल ते कसले? ग्रंथारंभी ते लिहितात :

'हे गणेशा, एकात अनेकता दाखवूनही परत ती एकात्मता अभंग राखतोस. तुझ्यात सर्व चराचर सामावले आहे. म्हणून तू महोदर. तुला भजतो तो निर्विघ्न होतो. म्हणून तू विघ्नहरू . . .' हर्ष हे तुझं श्रीमुख. चार पुरुषार्थ, चार भुजा, पूर्व आणि उत्तर मीमांसा हे तुझे श्रवणयुगुल. एकाच क्षेपात समस्त चराचर मायेनं बघणारी तुझी प्रेमळ दृष्टी आहे.

'संकटांची जाळी तोडण्यासाठी आणि विघ्नांवर नियंत्रण ठेवण्यासाठी हाती परशु-अंकुश आणि आवडत्या भक्ताला आपल्या प्रेमामध्ये ओढण्यासाठी एका हाती पाशदेखील घेतला आहेस.'

असं नाथ लिहून गेले आहेत.

### समर्थांची गणेशस्तुती

ज्ञानदेवांच्या काळापासून बदलत्या राजकीय परिस्थितीचा नाथांच्या काळामध्ये महाराष्ट्राला जाणवेल एवढा जाच होत होता. पण त्यानंतर दीडशे वर्षांनंतर महाराष्ट्र त्यात होरपळला जात होता. केवळ महाराष्ट्रालाच काय, उभ्या देशाला परकीय आक्रमणाच्या आणि धर्मछळाच्या संकटांनी ग्रासून टाकले होते. धर्मांतर, मूर्तिभंजन, धनदारांचे अपहरण अशी विघ्नं ठायी ठायी महाभयंकर स्वरूपात उभी होती. अशा वेळी कधी नव्हे इतकी विघ्नविनाशक गजाननाची आठवण होणे हे राष्ट्रद्रष्टया ग्रंथकर्त्यांना अपरिहार्यच होते. या दृष्टीने समर्थांचा दासबोधांतर्गत गजानन अधिक तेजस्वी, अधिक प्रखर वर्णिला गेला आहे.

भव्य दिव्य शब्द आणि उदात्त उज्ज्वल भावभावनांचा संगम समर्थांच्या गणेशस्तुतीमध्ये झाला आहे. ते लिहितात---

सर्वकाळ मदोन्मत ।
सदा आनंदें डुलत ।
हरूषें निर्भर उद्दित ।
सुप्रसन्नवदनु ।।

ऐसा गजानन—कसा त्याचा आकार ?

भव्यरूप वितंड ।
भीममूर्तो महा प्रचंड ।
विस्तीर्ण मस्तकीं उदंड ।
सिंदुर चर्चिला ।।

कसे मुखमंडल ?

नाना सुगंध परिमळें ।
थबथबा गळती गंडस्थळीं ।
शुंडा दंड मुडित सरळे ।
चतुर्दश विद्यांचा स्वामी ।
ऱ्हस्व लोचन तेहिलावी ।
लवलवित फडकावी ।
फडैफडै कर्णथापा . . . ।।

मुकुटादी अलंकार

रत्नखचित मुगुटी झळाळ ।
नाना सुलंग फाकती कीळ ।
कुंडले तळपती नीळ ।
वरि जडिले झमकती ।।

ठसठशीत पांढरा एकदंत शोभतो आहे. त्यातही सोन्याची कडीं शोभताहेत. लवलवित कमरेभोवती नागबंद कसला आहे. त्याखाली क्षुद्र घंटिकांचा मंजुमधुर झंकार उमटतो आहे. कमरेच्या बंधनातला नागराज मात्र महाभयंकर फूत्कारतो आहे. मत्तपणे डोलतो आहे. आपली लवलवती चंचल जीभ वारंवार बाहेर काढतो आहे. नाभीजवळ मस्तक उंचावून दर्शनार्थीकडे टकमक बघतो आहे.

गळ्यात नानापरींच्या कुसुमांच्या मालांचं भाग्य सुगंधित झालं आहे. हातात विशाल परशू, प्रफुल्ल कमल आणि तीक्ष्ण धारेचा तेजाळ अंकुश उगारला आहे. एका हाती सुरस मोदकगोळ आहे. त्याची त्याला अति आवडी आहे.

एवढं सगळं सुंदर स्वरूपाचं लेणं ल्यायलेला हा देव गणपती काय करतो?

**स्थिरता नाही येक क्षण । चपळ विशई अग्रगण ।**
**साजिरी मूर्ति सुलक्षण । लावण्यखाणी ॥**

**रुणझुणा वाजती नुपुरें । वांकी बोकाटती गजरें ।**
**घागरीयासहित मनोहरें । पाऊलें दोन्ही ॥**

नाटचाभिनयाने नाना कलाकौशल्य दाखवीत विविध वाद्यतालांसह तो नृत्य करतो. त्या नृत्यरंगणी रंगताना आनंदाने बेभान होऊन जो हुंकार त्याच्या मुखातून बाहेर पडतो, त्यानं शत्रूच्या हृदयाचा थरकाप होतो.

## सप्रचीत चंडीविनायक

शिवसभेला त्याच्या आगमनानं शोभा आली आहे. त्याच्या दिव्य माल्यांबरांनी अवघी शिवसभा दिपून गेली आहे. असा सर्वांगी सुंदर सकळ विद्यांचा आगर, साहित्य संगीत कलादींच्या 'सुल्लभा अष्टनायिकां'सह तो शिवसभेतून मिरवतो. त्याचे ध्यान केले तर 'भ्रांतासि' मतिप्रकाश होतो. त्याचे गुणानुवाद गायिले तर शारदा 'प्रसन्न वरदा' होते.

**ऐसा जो परमसमर्थ । पूर्ण करी मनोरथ ।**
**सप्रचित भजनस्वार्थ । कल्लो चंडीविनायका ॥**

असं समर्थांचं प्रचितीचं बोलणं आहे. समर्थांच्या प्रचितीला हिंदवी स्वराज्याचे भगवे वैभव दिले. अवघी दुरिते वारण्याचं बळ मंगलमूर्ती गणेशानं दिलं हे इतिहासानं दाखवून दिलं आहे.

तेच बळ आज आपल्यालाही हवं आहे. आपल्या राष्ट्रात, आपल्या कुटुंबात, आपल्या घरातदेखील. आपलं भाविक मन अशा वेळी त्या विघ्नराजाचं ध्यान करील. आपल्या मुलाबाळांनाही तोच मार्ग दाखवील. पुढच्या पिढ्यांसाठी तोच गणेशोपासनेचा वसा वसून ठेवील. मग तो आताचा त्राता भक्तांचा देव का आपल्याला विसरणार आहे? उलट तो सुप्रसन्न झाला म्हणजे कुटुंबात शुद्ध प्रेमाचे निर्मळ मळे डोलू लागतील. सुखशांतीच्या शीतल उदकाच्या तळचात, समृद्धीच्या सुवर्णाची कमळे घमघमू लागतील. काठावर 'सत्यं शिवं सुंदरं'च्या त्रिदळाने डवरलेला संपन्न बिल्ववृक्ष हलू डुलू लागेल आणि अशा आपण स्वतः निर्माण केलेल्या देवळारावळांत तो वरदमूर्ती विनायक नांदायला आल्याशिवाय कसा राहील?



# कळंबचा चिंतामणी श्रीगणेश

लेखिका : **सौ. साधना सुधाकर भावसार (तोरणे)**

'विदर्भ विषद: सारस्वती जन्मभू' म्हणून पुराणात मान्यता पावलेल्या विदर्भाची परंपरा अत्यंत उज्ज्वल आहे. ही भूमी जगन्माता रुक्मिणीचे माहेर व मायबोली मराठीचे उगमस्थान असून साहित्याची गंगोत्री आणि महानुभवांचे विद्यापीठ आहे. अशा या विदर्भात अनेक अतिप्राचीन देवस्थाने आहेत. त्यात कुंडिनपूर (कौंडिण्यपूर), भोजकट (भातुकली), वत्सगुल्म (वाशिम), भद्रावती (भांदक), लोणार, सालबर्डी, रामटेक आणि कळंब इत्यादींचा समावेश होतो. 'कदम्ब' हे क्षेत्र अति पुरातन नगरांपैकीच एक असून हल्ली ते कळंब या नावाने प्रचलित आहे. येथे श्रीगणेश उपासना प्राचीन काळापासून रूढ आहे. श्रीगणेशा-इतक्या दुसऱ्या दैवतांच्या मूर्ती पृथ्वीच्या पाठीवर आढळत नाहीत. भारतात एकशेआठ विनायकांची स्थाने आहेत. पैकी अष्टविनायकांचा जास्त बोलबाला झाला आहे. 'कदम्ब' क्षेत्र अष्टविनायकांत समाविष्ट केलेले नाही. परंतु त्यामुळे त्याचे महत्त्व कमी होत नाही. कदंब क्षेत्राचे आणि तेथील चिंतामणीचे सविस्तर वर्णन गणेशपुराण व मुद्‌गलपुराण ह्या धार्मिक ग्रंथांतून आलेले आहे. गणेश-पुराणात कदंब क्षेत्राचे माहात्म्य वर्णन करणाऱ्या कथा आहेत. येथील चिंता-मणीची स्थापना देवराज इंद्राने केली आहे. ह्याबद्दलची कथा गणेशपुराणात पुढीलप्रमाणे आढळून येते:

ब्रह्मदेवाने अहिल्या नावाची एक अत्यंत लावण्यवती, रूपवती, सौंदर्याची पुतळी अशी कन्या निर्माण केली. तिच्या निर्मितीत त्याने कुठलाच उणेपणा ठेवला नाही. अशी ही लावण्यवती देव, दानव, ऋषि-मुनींना हवीहवीशी वाटू लागली. त्यांच्यात अहमहमिका निर्माण झाली. ती प्राप्त व्हावी म्हणून सारेच आपापल्या परीने विधात्याची स्तुती व प्रार्थना करू लागले. तेव्हा ब्रह्मदेवाने एक अट घातली की, जो कोणी सर्वांत अगोदर पृथ्वीप्रदक्षिणा करून येईल

त्यालाच ही कन्या मिळेल. देवेंद्र ऐरावतावर बसून पृथ्वीप्रदक्षिणेस निघाला. इतरही सारे पृथ्वीप्रदक्षिणेस निघाले. इकडे महर्षि गौतमांना हे वृत्त कळले. ते गंगेवरून स्नान करून परत येत होते. रस्त्यातच त्यांना प्रसूत होत असलेली सवत्स धेनू दिसली. त्यांना शास्त्र आठवले. अशा धेनूला तीन प्रदक्षिणा घातल्यास पृथ्वीप्रदक्षिणेचे पुण्य लाभते. त्यांनी लागलीच तिला तीन प्रदक्षिणा घातल्या. नंतर ते ब्रह्मदेवाकडे गेले व सर्व हकिगत निवेदन केली. अहिल्येची मागणी केली. ब्रह्मदेवाने त्याप्रमाणे आपली कन्या गौतमाला अर्पण केली. गौतमांनी अहिल्येचा सहर्ष स्वीकार केला. तेवढ्यात सुरवर इंद्र तेथे उपस्थित झाला. सारा घडलेला प्रसंग त्याच्या लक्षात आला. सारे देव निराशेने परतले.

एकदा इंद्र आपल्या सभेत बसला असता नारदमुनी तेथे अवतरले. क्षेमकुशल झाल्यानंतर इंद्राने काही नवल विशेषाबद्दल नारदमुनींना विचारणा केली. तेव्हा नारद म्हणाले, 'ऐका. येता येता दंडकारण्यात गौतमऋषींचा आश्रम मी पाहिला. त्यात त्यांची पत्नी अहिल्या माझ्या नजरेस पडली. तिला पहाताच मी देहभान विसरलो. त्रैलोक्यात इतकी सुंदर स्त्री शोधून सापडणार नाही. ती नसलेली ही अमरपुरीही मला ओकी ओकी वाटते.'

हे ऐकून इंद्राचे चित्त अस्वस्थ झाले. तिच्या प्राप्तीच्या हेतूने तो भूलोकी गौतमाच्या आश्रमात दाखल झाला. त्याने तेथे अहिल्येच्या पातिव्रत्याचा भंग केला. त्यावेळी रागावलेल्या गौतमांनी तुझ्या अंगाला हजार भोके पडतील असा शाप इंद्राला दिला. ती शापवाणी इंद्राच्या कानी पडते न पडते तोच त्याच्या शरीरावर हजारो व्रण उमटले! त्याच्या शरीराची घाण सुटू लागली. इंद्राला आता आपले तोंड दाखविण्याची शरम वाटू लागली. म्हणून तो इंद्रगोप नावाचा किडा होऊन राहू लागला.

ही बातमी देवादिकांना कळताच ते फारच सचिंत झाले. ते सर्व गौतमांकडे येऊन क्षमायाचना करू लागले. इंद्राला शापमुक्त करण्याची विनंती करू लागले. गौतमांना दया आली. ते म्हणाले, 'मी एक मंत्र सांगतो. त्याचा तुम्ही त्याजकडून जप करून घ्या. षडाक्षरी मंत्र महासिद्धी देत असतो. म्हणून त्या मंत्राचा जप केला असता इंद्राचा देह दिव्य होईल व त्याच्या अंगाला जितके व्रण आहेत तितक्याच नेत्रांनी तो युक्त होईल.'

कदंब वृक्षाच्या खाली पद्मासनावर बसून इंद्राने नासाग्री दृष्टी लावून व मनाचा हिय्या करून षडाक्षरी मंत्राचा जप केला. वायू भक्षण करून इंद्राने हजार वर्षे मंत्रोच्चार करून काढली. नंतर गजानन प्रसन्न झाले व त्यांनी दर्शन दिले. आनंदाने बेहोष झालेल्या इंद्राने मोठ्या आदराने तेथे गजाननाची शुभ, दिव्य व सर्वांगसुंदर अशी स्फटिकाची मूर्ती स्थापिली. रत्ने व सुवर्ण यांच्या 

सहाय्याने त्याने तलावाच्या काठी विस्तृत मंदिर बांधले. तेच हे कदंब क्षेत्रातील चिंतामणीचे स्वयंभू मंदिर होय.

या स्थानाबद्दल दुसरी एक कथा अशी सांगण्यात येते की, एके दिवशी राजा रुक्मांगद मृगयेसाठी अरण्यात भटकत असता त्याला एक आश्रम दिसला. तो आश्रम वाचमुनीचा होता. त्याच्या पत्नीचे नाव मुकुंदा असे होते. राजाने त्या उभयतांना नमस्कार केला. नमस्काराचा स्वीकार करून तो मुनी स्नानासाठी नदीवर निघून गेला. तहानेलेल्या राजाने मुकुंदेपाशी पाणी मागितले. परंतु दुर्दैवाने राजाला पाणी न मिळता त्याला दुष्ट मुकुंदेकडून शाप मिळाला—त्यायोगे राजाच्या सर्वांगाला पांढरे कुष्ट जडले.

काही दिवस असेच गेल्यानंतर आकाशमार्गाने जाणाऱ्या नारदमुनीस राजाने पाहिले त्याला आपली दुःखद हकिगत निवेदन केली. ह्यातून सुटण्याचा मार्ग सांगा अशी विनंती केली. तेव्हा नारदाने निवेदन केले की, हे राजा येता येता मार्गात एक मोठे आश्चर्य पाहिले. विदर्भ देशात कदंब म्हणून एक प्रसिद्ध नगर आहे. तेथील एका मंदिरात विनायकाची मी एक शुभ्र मूर्ती पाहिली. ती मूर्ती चिंतामणी नावाने प्रसिद्ध असून सर्व मनोकामना पूर्ण करीत असते. त्या मूर्तीच्या समोर गणेशपद पूर्वक असे एक महाकुंड आहे. कुणी एक राजा कुष्टीने व म्हातारपणाने जर्जर झालेला माणूस तीर्थयात्रा करता करता कदंब क्षेत्री आला व त्याने त्या गणेशकुंडात स्नान करताच त्याला दिव्य देह प्राप्त झाला. रुक्मांगदाने त्या ठिकाणी येऊन त्या गणेशकुंडात स्नान केले. तर काय आश्चर्य ? त्याचे श्वेत कुष्ट नाहीसे झाले व तो दिव्य तेजाने युक्त झाला.

श्रीगणेशाचे 'चिंतामणी' या नावाने बऱ्याच ठिकाणी बरेच अवतार झालेले आहेत. त्या सर्वच ठिकाणांना 'चिंतामणी' क्षेत्र असे संबोधिले जाते. पण पुराणात 'चिंतामणी' क्षेत्र अशा दोन क्षेत्रांचाच प्रामुख्याने उल्लेख आला आहे. एक चिंतामणी क्षेत्र स्थावर ऊर्फ हल्लीचे पुणे जिल्ह्यातील थेऊर व दुसरे प्रस्तुत कदंब क्षेत्र होय. यवतमाळहून वर्धा-नागपूरला जाणाऱ्या मंदिर मार्गावर पूर्वेस कळंब हे गाव आहे. यवतमाळ ते कळंब हा मोटारमार्ग डोंगरातून वळणावळणाने जात असल्यामुळे सभोवतालचे अवर्णनीय सृष्टिसौंदर्य दृष्टीस पडते. येथे सापडलेल्या जुन्या अवशेषांवरून हे गाव पूर्वीच्या काळी फार मोठे भरभराटीचे नगर असावे हे निश्चित झाले आहे. तेथे सापडलेले शिलालेख वगैरे नागपूरच्या पुराणवस्तु-संग्रहालयात ठेवले आहेत. कळंबच्या मंदिराची बांधणी खूप खोलात असल्यामुळे त्याचा कळस विशेष उंच दिसत नाही. मंदिर तसे उंच आहे परंतु जमिनीच्या सपाटीपासून ते ३३ फूट खोलात असून सभोवतालचा सर्व भाग उंचावर आहे. यावरून पुराणात निवेदिल्याप्रमाणे येथे सरोवर असावे ह्यास पुष्टी मिळते.

पुराणात असे वर्णन आहे की, ज्या दिवशी इंद्राने मूर्ती स्थापन केली त्या दिवशी श्रीचिंतामणीच्या पादप्रक्षालनाकरिता येथे स्वर्गंगा येत असे. हा प्रकार दर वर्षी येथे घडून येतो. सर्व आवारात पाणीच पाणी होते. अशा वेळी देवाची पूजा-अर्चा पाण्यातून जाऊनच करावी लागते. मंदिराची बांधणी अत्यंत साधी व सुबक आहे. मंदिरासमोरच दर्शनी बाजूस उजव्या हाताला चौमुखी गजाननाची मूर्ती आहे. एकाच दगडात पण चारीही बाजूंना चार गणेश मूर्ती कोरलेल्या आहेत. नंतर २९ पायऱ्या उतरल्यावर मध्येच चौकोनी कुंड आहे. तेच पावनतीर्थ होय. याला जिवंत झरे आहेत. याच्या पाण्यात कुष्टादी चर्मरोग नष्ट करण्याचे सामर्थ्य आहे. समोरच्या गाभाऱ्यात चिंतामणीची लांब उदर सुटलेली मूर्ती दृष्टीस पडते. ती पाहताच आपले मस्तक विनम्र होते व चिंतामणीच्या दर्शनाने मनातली चिंता नाहीशी होते.

चिंतामणीच्या दोन्ही बाजूंच्या गाभाऱ्यात शंकराच्या दोन पिंडी आहेत. देवळात येण्यासाठी पायऱ्यांचे तीन मार्ग आहेत. चारही बाजूंना दगडांनी मजबूत बांधलेल्या भिंती आहेत. हे देवालय कोणी व केव्हा बांधले असावे ह्याविषयी काहीच माहिती उपलब्ध नाही. समोरून दिसणारा सभामंडप नवीन व मजबूत बांधलेला दिसतो. देवळाचा परिसर मोकळा व हवेशीर असून सभोवताली विटांच्या भिंती बांधल्या आहेत. चिंतामणीच्या बाजूसच अनसूयेची काळ्या पाषाणाची अत्यंत कोरीव, घाटदार व शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना असलेली मूर्ती दिसून येते. ती मूर्ती मंदिराच्या आवारात उत्खननात सापडलेली आहे.

चिंतामणीच्या मंदिरात माघ शुद्ध प्रतिपदेपासून सहा दिवस मोठा उत्सव केला जातो. ते सहा दिवस पूजेसाठी तेथील रहिवाशांनी वाटून घेतलेले असतात. राखीव तीन दिवस मात्र देवस्थान संस्थेतर्फे पूजा-अर्चा होत असते. ह्या सहा दिवसांत भजन, पूजन, कीर्तन, पुराण प्रवचन व इतर कार्यक्रम होत असतात. शेवटच्या दिवशी म्हणजे षष्ठीला दहीहंडी फुटून काला होतो. मंदिराच्या देवस्थान संस्थेचे वार्षिक उत्पन्न २,००० रुपये असून त्यातून देवस्थानाचा खर्च केला जातो. देवस्थानाला वर्गणीदाखल काही शेते मिळाली आहेत. गावोगावचे लोक उत्सवात भाग घेण्यास व गजाननाच्या दर्शनास येत असतात. इतर वेळीही मंदिरात भाविकांची गर्दी होत असते.

※ ※

# मोरगावचा गणपती

निवेदक : **श्री. सं. गो. टिकम**

आपल्या संस्कृतीत गणेशाला पहिले स्थान आहे. लग्नकार्यादी मंगलकार्यात, ग्रंथलेखन प्रसंगी, नवविद्या दानप्रदान प्रसंगी किंबहुना कोणत्याही शुभकार्याचे वेळी प्रथम आवाहन करतात ते विघ्नहर्त्या श्रीगणरायाला. पुणे नगरी व पुणे जिल्हा तर गणेशदेवतेच्या व गणेशभक्तांच्या वास्तव्यानेच भरलेला आहे.

मोरगाव हे या गणपतीचे आद्य क्षेत्र. हा गणराज मयूरेश्वर पण प्राकृत लोकांनी त्याचाच 'मोरया' असा सुरेख अपभ्रंश साधला. भीमेच्या काठी तो 'सिद्धि-विनायक' झाला. कुलाब्यातील पालीला 'बल्लाळेश्वर' तर महाडला कर्जत-खोपोली रस्त्यावर 'वरद विनायक' बनला. पुण्यातील जुन्नरच्या लेण्याद्रीस त्याने 'गिरिजात्मज' संज्ञा घेतली तर तेथून जवळच्या ओझरला तो 'विघ्नेश्वर' झाला. पुण्याजवळ थेऊरला तो 'चिंतामणी' झाला तर रांजणगावी 'गणपती'च राहिला. या अष्टविनायकांपैकी पाच तर पुणे जिल्ह्यातच आहेत.

'गाव तेथे गणपती' या म्हणीवरून प्रत्येक गावी आणि 'ते संवाद चतुष्पथीचे । गणेश जाहले ।।' या ज्ञानेश्वरीतील उल्लेखावरून प्रत्येक चव्हाट्यावर गणेश अधिष्ठित झाले होते. अनेक नावांनी, अनेक रूपांनी गणेशभक्तांच्या या तपोभूमी आजही त्या त्या ठिकाणच्या महापूजेची साक्ष देत आहेत. मोरगावचा गणपती चिंचवडला आला तोही असाच भक्ताच्या भक्तिप्रेमाने.

**मयुरपुरीं कऱ्हातीरीं रहिवासु केला ।**
**भक्तिभाव देखोनिया चिंचवडीं आला ।।**

मोरगावचा मयूरेश्वर तसा स्थानापन्न झाला आहे. अगदी चारमिनारासारख्या उंच उभ्या स्तंभाच्या कोटामध्ये अगदी सुरक्षित. शिखर सोडले तर वाटावे की, एखादी मशीद असावी. असे सांगतात की, तीर्थयात्रा प्रसंगाने पांडव इकडे आले असताना त्यांनी मूळ मूर्तीपुढे तांब्याचा भक्कम पत्रा बसविला व लोकांच्या



गणेश मंदिर : मोरगाव

दर्शनाकरिता त्याबाहेर एक नवी मूर्ती स्थापली. पुराणात मोरगाव हे क-हेकाठी वसलेले गाव 'मयूरपुरी' किंवा 'स्वानंदपुरी' म्हणून उल्लेखिलेले आहे.

या तीर्थाच्या उदयाची आणखी एक आख्यायिका अशी :

'मिथील देशात सिंधुदैत्य अत्यंत मातला. त्याने आपल्या आसुरी कृत्यांनी देवांना संत्रस्त केले. तेव्हा देवांनी स्वानंदेश श्रीगणेशाला विघ्ननाश करण्यासाठी प्रसन्न करून घेतले. यज्ञाने प्रसन्न झालेला श्रीगणेश मयूरावर आरूढ होऊन त्याने सिंधुदैत्याचा निःपात केला. या विजयानंतर मयूरेश्वर मागे फिरतात न फिरतात तोच सिंधुदैत्याचा सेनापती कमलासुर याने त्यास अडविले. श्रीगणेशाने त्याचेही शिर उडविले. ते शिर येथे येऊन पडले व त्यावर गणेशशिराचेच आसन इथे विसावले.'

असे हे छोटेसे पण मांगल्याचा ठेवा व माहात्म्य पावलेले गाव. महाद्वारी दोन दीपमाळा, मध्ये एक जयस्तंभ, मूषक व नंदी आहेत. मूषक तर किती तरी मोठा आहे. महाद्वारातून आत गेल्यावर मोकळे प्रांगण असून दोन दीपमाळा आहेत. तटाच्या आत ओवऱ्या बांधलेल्या आहेत. बेल, शमी, आवळी इत्यादी

पूजाद्रव्यांचे वृक्ष प्राकारातच आहेत. मंदिराच्या शिखरावर सभोवती गणेशलीला चितारल्या आहेत.

भक्तगणांना नेहमी एक कोडे वाटते ते गणेशाच्या समोर नंदी कसा ? त्याचीही माहिती मिळाली. हा नंदी भुलेश्वरच्या देवळात नेत असताना मोरगावला येताच गाडा एकाएकी मोडला. खूप प्रयत्न करून दुसरे गाडे आणले पण वजन काही पेलेना. मग नंदी तासून वजन कमी करण्याचे ठरले, पण नंदीने रात्री स्वप्नात येऊन सांगितले की, मला तिकडे नेण्याचा प्रयत्न करू नका. मला इथेच गणराजासमोर ठेवा. त्यानुसार हा नंदी मयूरेश्वरासमोर राहिला.

मयूरेश्वराच्या प्राकारात अनेक गणेशमूर्ती आहेत. त्यातच रामदासांनी स्थापिलेला गणपतीही दाखवितात. येथेच 'सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची' ही सुप्रसिद्ध आरती समर्थमुखातून निर्माण झाली असे सांगतात.

मयूरेश्वराच्या या जागेला माहात्म्य आले ते गणेशयोगींद्र या सिद्धयोग्यामुळे व मोग्या गोसावी या गणेशभक्तामुळे. गणेशयोगींद्र हे येथील एका ओवरीत बारा वर्षे रहात होते. गाणपत्य धर्माला उजाळा देणारी मुद्‌गल पुराणावरील टीका त्यांनी लिहिली. त्यांच्याच शिष्यसंप्रदायाने हे मंदिराचे महाद्वार व तट बांधले. या ओवरीच्या भिंतीवर गणेशयोगींद्रांनी स्वहस्ते काढलेली चित्रे आहेत. त्यांची व त्यांचे शिष्य सिद्धेश्वर यांच्या समाध्या कऱ्हेतीरी आहेत.



# ॥ श्रीमयूरेश्वर ॥
## मोरगाव

लेखक : श्री. डी. डी. रेगे

पुण्यापासून ४६ मैलांवर मोरगाव येथे अनादिसिद्ध मयूरेश्वराचे स्थान आहे. अष्टविनायकांमध्ये मयूरेश्वर सर्वश्रेष्ठ मानला जातो. गणेश जयंतीला या ठिकाणी भव्य सोहाळा केला जातो.

या स्थानाबद्दल अशी दंतकथा आहे की, विश्वातील साऱ्या शक्ती अंशरूपाने आणि बीजरूपाने एकत्रित येऊन या जागी एक प्रखर दिव्य ज्योत निर्माण झाली. ओंकारस्वरूप गजाननांनी विश्वाच्याही उत्पत्तीपूर्वी स्वयंज्योतिपूर्ण असे हे क्षेत्र स्वेच्छेने निर्माण केले. भृशुंडीच्या आदेशावरून तपश्चर्या करणाऱ्या ब्रह्मा, विष्णू, शिव, शक्ती आणि सूर्य अशा पाच देवांना, चार वेदांकरवी, मयूरेशाने आपले साक्षात आदिस्वरूप या ठिकाणी दाखविले आहे. त्याला पंचेश्वर वरद म्हणतात. सर्व क्षेत्र क्षेत्रराज, भूम्वानंदभवन इत्यादी नावे या क्षेत्रास तेव्हापासून पडली. इतकेच काय पण भाद्रपद शुक्ल चतुर्थी व माघ शुक्ल चतुर्थी या महापर्वकालस्वरूप पुण्यतिथ्याही ठरल्या.

या बाबतीत मुद्गल पुराणातील सहावे खंड प्रमाणभूत म्हणून मानले गेले. सर्व शक्तीचे प्रतीक म्हणून त्याची श्रेष्ठता सर्वोच्च समजली जाते. मोरया गोसावी यांना याच ठिकाणी प्रथम साक्षात्कार झाला.

येथील क्षेत्रोपाध्ये रामचंद्रशास्त्री हेरंब ढेरे अगदी अस्खलितपणे या गजाननाचा महिमा सांगतात. तुकारामांनी बसविलेली विठ्ठलाची ओवरी, शमी विघ्नेश, मंदार गणेश, अष्टविनायक आणि पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, नैऋत्य व ईशान्य अशा दिशांना अधिष्ठित झालेले रमामहेश, रतिमदन, उमामहेश, महीवराह, साक्षविनायक, कल्पवृक्ष, विघ्नहर यांचे दर्शन भक्तांना येथे घडते. नग्नभैरव, भृशुंडी योगींद्रमहाराज, कृष्णचतुर्थी, समर्थांनी स्थापन केलेला मारुती यांच्या अवतारकार्याची माहिती मिळते. या स्थानाची रचना आणि जागोजागी

बसलेल्या या प्रासादिक वास्तू पाहून कोणाही भाविकांचे हृदय या स्थानाकडे आकर्षिले जाते.

स्वयंभू गजाननाच्या गाभाऱ्यातील उभ्या पवित्र्यातली भोगमूर्ती तर अतिशय तरतरीत व बाणेदार भासते. या प्राचीन पितळी मूर्तीची छाती ताठ असून तिच्या पायांत चांदीचे तोडे आहेत. पाश, अंकुश, मोदक इत्यादी गोष्टी हातात घेऊन कमळाच्या पाकळ्यांवर उभी असलेली ही प्रतिमा जागजागी पार झिजून गेली आहे. तिच्या दोन्ही बाजूंस उभ्या असलेल्या सिद्धिबुद्धीचे चेहरे तर जवळजवळ दिसेनासे झाले असले तरी एकंदर शिल्प मोठे मोहक आणि सौंदर्यपूर्ण आहे. ज्या भक्तांना काही कारणामुळे आत जाता येत नाही अशांना ही मूर्ती बाहेर उंबऱ्यावर ठेवून तिचे दर्शन घडवितात.

येथे सोवळ्याशिवाय कुणीही गाभाऱ्यात प्रवेश करावयाचा नसतो अशी येथील पूर्वापार प्रथा आहे.

या मंदिराचा परिसर अगदी मर्यादित असा आहे. याच्या सभोवार उंच असा दगडी तट असून प्रवेशद्वाराबाहेर प्रशस्त असा लांबरुंद चौथरा आहे. तेथे दर्शनाला जाणाऱ्या लोकांसाठी नारळ, फुले, उदबत्त्या, पेढे इत्यादी विकणाऱ्यांची लहान लहान दुकाने आहेत. पलीकडे समोर भव्य चौसोपी कमान असून त्यात नंदीची दगडी मूर्ती आहे.



मयूरेश्वर : मोरगाव

चौथऱ्याबाहेर उतरण्यासाठी बऱ्याच लांबरुंद पायऱ्या आहेत. त्या उतरल्या-वर समोरच नदीकडे छोटासा रस्ता जातो. हीच इथली एकमेव बाजारपेठ. साधारण चारपाचशे पावलांच्या या छोट्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी मिळून सुमारे पन्नाससाठ घरे आणि त्यातच मधूनमधून छोटी दुकाने दिसतात. पेठेत शिरण्यापूर्वी पायऱ्या उतरताच एक भव्य दगडी कमानीवजा प्रवेशद्वार आहे. त्यात हातात मोदक घेऊन असलेल्या मूषकाची मोठी प्रतिमा गजाननाभिमुख बसलेली आहे. रस्त्याचे मध्यभागी बुरुजाप्रमाणे गोल असा एक मनोरा असून, त्याचा वरचा भाग ढासळलेला दिसतो. वर चढण्यासाठी याच्या आतून पायऱ्या आहेत. उत्सवाचे दिवशी या पायऱ्यांवर तेलाचे टेंभे पेटवण्याची पूर्वी प्रथा होती. देवळात असलेल्या जुन्या तोफांतून या बुरुजावर बार उडवतात. दोन्ही बाजूंस लहान दीपमाळा आहेत.

त्यानंतर जवळच असलेल्या कऱ्हा नदीमधील गणेशकुंडाकडे आपले लक्ष जाते. या सभोवतालच्या पायऱ्या पाण्याच्या पात्राखाली झाकलेल्या असतात. नदीचे पात्र अगदीच कोरडे. त्यातच उजवीकडे छोटेसे मंदिर आहे. या ठिकाणी मोरया गोसावी यांना गणपतीचा तांदळा मिळाला. नदीच्या या लहानशा तीरावर डावीकडे छोटेसे चिंचेचे बन आहे. ते अतिशय एकांतपूर्व व रमणीय आहे. सहलीसाठी मोरगावला येणारे भक्त आणि विद्यार्थी या सुंदर ठिकाणी वनभोजन करतात, आनंदाने नाचतात, बागडतात. गावात विहिरीचे पाणी खारे असल्याने, कऱ्हेचे गोड पाणी पिऊन क्षुधा शांत करतात. येथे जवळच एक महादेवाचे प्राचीन शिल्पकृती देऊळ आहे. त्यावरील द्वारपालांच्या डोक्यावर टोप्या घातल्याप्रमाणे छत्र्या आढळतात. काही मूर्तींचे अवयव पोकळ पद्धतीने खोदलेले दिसतात.

मोरगावचा मयूरेश्वर, थेऊरचा चिंतामणी, लेण्याद्रीचा गिरिजात्मज, ओझरचा विघ्नेश्वर, रांजणगावचा महागणपती, पालीचा बल्लाळेश्वर, महाडचा वरद विनायक व सिद्धटेकचा श्रीसिद्धिविनायक असे अष्टविनायक विद्यमान असले तरी सर्वांत अनादिसिद्ध म्हणून मयूरेश्वराचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे. या मूळ लहान मूर्तीवर रोज शेंदूर लावल्याने त्यावर भलेमोठे व जाडजूड कवच आपोआप निर्माण होते. साधारण १०० वर्षांनी ते आपोआपच निखळून पडते! सव्वाशे वर्षांपूर्वी असेच एकदा कवच गळून पडल्यावर मूर्तीच्या मागे काय आहे हे पहाण्याची एका भाविकाला इच्छा झाली. मूर्तीच्या शिरावरील नाग थोडा बाजूला करताच एक अत्यंत देदीप्यमान, प्रखर, तेजस्वी अशी ज्योत दिसताच तात्काळ तो नाग जागच्या जागी ठेवला गेला, म्हणजे स्वयंज्योतिपूर्ण असे हे पवित्र स्थान असले पाहिजे यात शंका नाही.

# गणेशवाडीचा गणपती

लेखक : श्री. दत्ताजी बाळाजी शिंदे

कृष्णा नदीच्या तीरी हे एक रम्य पुरातन देवस्थान आहे. देवाच्या गाभाऱ्यापुढे तीन दालनी सभामंडप दगडी अष्टपैलू खांबांचा व वर दगडी तुळयांचा असा बांधलेला आहे. करांजन घालून तो बंदिस्त केलेला आहे. भोवती खुली जागा असून त्यापलीकडे चारी बाजूंस चौसोपी छपरी आहे. पूर्वेकडे प्रवेशद्वारावर नगारखाना बांधलेला आहे. मंदिर हेमाडपंती बांधणीचे आहे.

पूर्वेकडे तोंड करून उकिडवी बसलेली अशी डाव्या सोंडेची ही दगडी मूर्ती आहे. ती फार प्राचीन आहे. मूर्तीच्या पाठीमागे रुप्याचे पाणी दिलेली पितळी प्रभावळ आहे.

देवाचे नित्यकर्म करण्याचे काम बारा ब्राह्मण घरांपैकी काणे घराण्याकडे आहे. देवस्थानाच्या गाभाऱ्यात अद्याप सोवळ्या ब्राह्मणाखेरीज इतरांना प्रवेश नाही. पुजारी यांच्याकडूनच अभिषेक वगैरे करविता येतो. पूर्वी पाच नंदादीप तेवत असत. हल्ली एकच आहे. नित्य झाडलोट, सकाळी पूजा व संध्याकाळी आरती, मंत्रपुष्प होतो. गावी ब्राह्मणवस्ती भरपूर होती तेव्हा आरती तिथीवार एकेका घराकडे वाटलेली असे. त्यांच्याकडून आरतीचे निरांजनादी सामान व प्रसाद हजर होई. पण आता ब्राह्मणघरे अल्प राहिल्याने श्री. काणे हेच ते चालवीत असतात.

भाद्रपद शुद्ध प्रतिपदा ते पंचमीपर्यंत या देवस्थानाचा उत्सव होतो. दर संकष्टीस वाडीतील प्रत्येक घरातील एक तरी माणूस उपवास करतो व आबालवृद्ध स्त्री-पुरुष संध्याकाळी दर्शनास जाताना दूधसाखर किंवा अशीच एखादी वस्तू नैवेद्यासाठी म्हणून घेऊन जातात.

पटवर्धनांना पेशव्यांकडून सरदारकी मिळण्यापूर्वी हरभटबाबा पटवर्धन यांना अक्कलकोटकर भोसले यांच्याकडून कागवाडजवळ असलेली रानजमीन अग्रहार

(भट इनाम) म्हणून मिळाली होती. पुढे सरदारकी मिळाल्यानंतर या रानजमिनीची वहिवाट कुरुंदवाडचे अधिपती त्र्यंबक हरी यांच्याकडे देण्यात आली. एकदा ते स्वतः या जमिनीची पहाणी करण्यासाठी म्हणून आले असता एका झाडाखाली विश्रांतिस्तव पडले होते. तेव्हा डुलकी लागून गणपतीचा दृष्टांत झाला की, 'मी अमुक अमुक ठिकाणी आहे, तेथून मला बाहेर काढून माझी स्थापना कर.' तदनुसार त्र्यंबक हरींनी श्रीच्या मूर्तीची स्थापना करून सभामंडपासह एक सुंदर देऊळ बांधले आणि बारा ब्राह्मण व बारा रयत लोकांना आणून त्या जागी या देवस्थानाची व्यवस्था करण्याकरिता बसविले. त्याच स्थळाला सध्या गणेशपूर किंवा गणेशवाडी म्हणून ओळखिले जाते.

हे देवस्थान छप्पन्न विनायकांपैकी एक आहे, असे म्हणतात. पटवर्धनांचे हे कुलदैवत आहे. त्यामुळे मिरज, बुधगाव व केव्हा केव्हा सांगलीचे अधिपती या गणपतीच्या दर्शनार्थ पूर्वी वरचेवर येत असत.

विशिष्ट कामनापूर्तीसाठी येथे श्रीच्या सेवेस लोक स्वतःच्या खर्चाने किंवा मधुकरी मागून रहात व कामना पूर्ण होताच निघून जात. येथील गणपतीस तामसी उपासना चालत नाही असे म्हणतात. तसे करणारांना भयंकर स्वरूपात दर्शन होते व लोक पळून जातात अशी उदाहरणे घडल्याचेही सांगतात.

मिरज किंवा शेडबाळ या दक्षिण रेल्वेच्या मीटरगेज लाईनच्या स्टेशनावर उतरून पुढे कागवाडला एस.टी. बसने जायचे. मिरज ते कागवाड अंतर चौदा मैल आहे. कागवाडहून फक्त अडीच मैल ही वाडी आहे. तेथे चालत किंवा बैलगाडीने जाता येते.



# बोंबल्या गणेश

लेखक : **श्री. न. शे. पोहनेरकर**

परळी वैजनाथ या ज्योतिर्लिंग क्षेत्राच्या पश्चिमेकडे सुप्रसिद्ध संत श्रीजगमित्रनागा यांची समाधी आहे. या समाधीच्या समोरच्या भागात दुर्लक्षित अवस्थेत एक गणेशमूर्ती आज आपण पाहतो. दोन हातांची, सोंड नसलेली आणि उजवा हात तोंडावर पालथा असलेली ही मूर्ती इतर गणेशमूर्तीप्रमाणेच! कुतूहलाने शोध घेताना असे कळले की, श्रीवैजनाथाने जेव्हा परळीला सनाथ केले आणि तेथील क्षेत्र माहात्म्य उत्तरोत्तर वाढू लागले तेव्हा येणाऱ्या भाविक भक्तांना तेथे एकाच गोष्टीची उणीव जाणवू लागली. तीर्थे, देवदेवता, अनेक स्वरूपात तेथे होत्या. नव्हती ती केवळ एक गंगाच! तेवढ्याने क्षेत्र माहात्म्यात किंचित कमतरता वाटत होती. परंतु तीदेखील पूर्ण होण्याचा योग आला आणि गंगेचा पाट धाडधाड आवाज करीत आजचे गाव आणि देऊळ यांच्या मधून वाहू लागला. परंतु अशा प्रकारे गंगेचे अवतरण पश्चिमेकडे असलेल्या गणरायाला कसेसेच वाटून त्याने श्रीवैजनाथाला उच्च स्वराने साद घातली, 'हे शंकरा! अशा प्रकारे लोकवस्ती आणि देऊळ यांच्यामधून जर हा गंगाप्रवाह अशाच प्रकारे अखंड चालू राहिला तर यापुढे आपल्या दर्शनास व पूजनास भाविकांना येता येणार नाही, आणि साहजिकच येथील स्थानमाहात्म्याला झळ लागेल. तरी हा गंगाप्रवाह आवरता घेण्याची त्वरित कृपा करावी.' अशी साद नुसतीच घातल्याने कदाचित तिकडे दुर्लक्ष होईल या शंकेने श्रीगणरायाने आपला उजवा हात तोंडावर ठेवून प्रत्यक्ष धोक्याची सूचनादेखील दिली! गणेशाच्या या उपायाचा मात्र परिणाम झाला आणि श्रीवैजनाथांनी हा प्रचंड प्रवाह आपल्या जटाकलापात सामावून घेतला. गणेशाने शंकराला जी धोक्याची सूचना दिली तिचे स्मारक म्हणून मेरु पर्वताच्या पायथ्याला ही गणेशमूर्ती असून तिचे प्रचारातील नाव आजदेखील 'बोंबल्या गणेश' असेच कानावर येते.

# गणपतीपुळे

लेखक : **श्री. डी. डी. रेगे**

रत्नागिरी जिल्ह्यातील पुळ्याचा गणपती, अखिल महाराष्ट्राला परिचित आहे. हे स्वयंभू स्थान किती प्राचीन असावे याची कल्पना मुद्‌गल पुराणातील काही श्लोकांवरून येऊ शकते. या स्थानाचे प्रमुख वैशिष्टय ते निराकार स्वरूपाचे असल्याने मानसपूजेचे एक प्रभावी प्रतीक म्हणून त्याचा निर्देश केल्यास अवास्तव ठरणार नाही. हिंदु संस्कृती केवळ मूर्तिपूजेवरच आधारलेली नसून, मानसपूजा त्यापेक्षाही श्रेष्ठ असल्याचे हे एक जागृत प्रतीक मानावे लागेल. एवढ्यासाठीच त्याला 'स्वयंभू' ही संज्ञा देण्यात येते.

इ.स. १६०० च्या सुमारास हिंदुस्थानात मुसलमानी अंमल चालू असता हे ठिकाण उदयाला आले. या डोंगराच्या पायथ्याशी केवड्याचे घनदाट असे बन होते. भिडे नावाचे एक ब्राह्मण खोत व काही ब्राह्मणेतर वस्ती तुरळकपणे त्या काळी या लहानशा गावात होती. मुसलमानी स्वारीचे वेळी मोठी पळापळ झाली. परंतु श्री. भिडे गजाननाचे निःसीम भक्त असल्यामुळे त्यांनी केवड्याच्या या बनात अगदी एकांत स्थळी श्रीची आराधना सुरू केली. तिसऱ्या दिवशी त्यांना गजाननाचा दृष्टांत झाला की, 'या पवित्र क्षेत्री, दोन गंडस्थळे व दंतयुक्त स्वरूप धारण करून मी अवतार घेतला असून, हा डोंगर माझे निराकार रूप राहील. या ठिकाणी माझे अनुष्ठान, पूजाअर्चा आणि भजनपूजा केल्यास कोणतेही संकट तत्काल दूर होईल.' त्या वेळेपासून या डोंगरास गणपतीस्वरूप मानून भाविक भक्त श्रद्धायुक्त अंतःकरणाने पूजाअर्चा करीत आले आहेत.

ऐतिहासिक दृष्टयाही गणपतीपुळ्याचे महत्त्व श्रेष्ठ आहे. शके १६७०–७५, ७९, ८८, ९०, ९२ व ९३ या कालात कोणी थोर व्यक्ती श्रीच्या दर्शनासाठी येऊन गेल्या व त्यांनी सोन्यारुप्याचे कोणकोणते दागिने देवाला अर्पण केले याच्या तपशीलवार याद्या पुळ्याच्या वतनदार मंडळींकडे आढळून येतात. श्री. धनवटकर,

बापट व शेंड्ये ही पूर्वापार वतनदार घराणी आहेत. देवाचा गाभारा, शिवाजीमहाराजांचे सचिव अण्णाजी दत्तो यांनी छत्रपतींच्या सूचनेवरून बांधला. सभामंडप सरदार गोविंदपंत बुंदेले यांनी उभारला. सुवर्णाचा मुलामा दिलेला कळस, कोल्हापूरचे कारभारी श्री. माधवराव बर्वे यांनी बांधला. सवाई माधवराव पेशव्यांच्या जन्मकाळी कारभाऱ्यांनी देवाला नवस केले होते. गणपतीच्या जीर्णोद्धारासाठी ५,००० रुपये, सहस्रभोजनासाठी ८०० रुपये, महारुद्रासाठी १३६ रुपये व मोदकांच्या नैवेद्यासाठी ८० रुपये दिल्याचा उल्लेख आढळून येतो. गणपतीसमोरील नंदादीप नानासाहेब पेशवे यांचा असून, दुसऱ्या बाजीरावांचे बंधू चिमणाजीअप्पा यांनी नगारखाना बांधला. इ.स. १८३० साली कॅप्टन डोवेल यांनी रत्नागिरी तालुक्याचा सर्व्हे केला. रिपोर्टात चिंतामणराव अप्पा पटवर्धन यांनी विहिरीचे बांधकाम व एक मैल लांबीचा रस्ता यासाठी ३०,००० रुपये खर्च केल्याचा तपशील आहे. पटवर्धन संस्थानिकांचे मूळ पूर्वज, कोतवड्याचे श्री. हरभटजी पटवर्धन यांनी केवळ दूर्वांकुरांचा रस घेऊन या स्थानी खडतर तपश्चर्या केली. मंगलमूर्तीच्या साक्षात्कारावरून ते घाटावर आले. निर्धन अवस्थेत खडतर दिवस काढीत असणारा एक सहा वर्षांचा मुलगा नारायण जोशी व त्याची आई पार्वतीबाई यांना श्रींच्या दृष्टांतावरून त्यांनी आपले यजमान केले. या गरीब मायलेकांची वर्णी त्यांनी सेनापती म्हाळोजीराव घोरपडे यांचेकडे लावली व आपण नरसोबावाडी येथे तपश्चर्येसाठी प्रयाण केले. नरसोबाचे वाडीस जाण्यापूर्वी म्हाळोजीरावांनी हरभटजींची सुवर्ण मोहरांनी आचार्यपूजा केली. त्यांच्या आशीर्वादाने नारायण जोशी हा एक मोठा कर्तबगार पुरुष निघाला. म्हाळोजीरावांनी त्याला इचलकरंजी जहागीर बक्षीस दिली. इचलकरंजीच्या पूर्व संस्थानचा नारायण हाच मूळ पुरुष होय. धन्याविषयी कृतज्ञता म्हणून त्याने 'घोरपडे' हे नाव धारण केले व अजूनही ते प्रचलित आहे. हरभटजीचे मुलगे, गणपतीपुळ्याच्या आशीर्वादाने पेशवे दरबारात मोठे मान्यता पावले. हरभटांचे वंशज, सांगली, मिरज, कुरुंदवाड, जमखंडी, बुधगाव, वाडी वगैरे माजी संस्थानिक पुळ्याच्या गणपतीला आपले कुलदैवत मानीत आले.

देवाच्या जामदारखान्याचे काम पूर्वी रत्नागिरी तालुक्यातला कारकून करीत असे. १८४१ साली लॉर्ड ऑकलंड हिंदुस्थानचे व्हाइसरॉय असता, या स्थानाला 'संस्थान' ही संज्ञा प्राप्त होऊन पंचांची देखरेख सुरू झाली. तथापि एकंदरीत पाहता या ठिकाणी विशेष असे उत्पन्न नाही. श्रींच्यापुढे आठ आणे अगर त्यापेक्षा अधिक पैसे ठेवल्यास ते देवाच्या डबीत जमा होतात. यात्रेच्या वेळी दोन-तीन हजारांपेक्षा जास्त उत्पन्न येत नाही. अलीकडे दर्शनासाठी यात्रेकरूंची रहदारी वाढली असली तरी ती काही ठराविक मर्यादेपलीकडे जात नसल्याने मनात

असूनही देवस्थानची सुधारणा करणे अशक्य होऊन बसले आहे. एक लक्ष एकवीस हजार रुपयांचा निधी गोळा करण्याचा संकल्प पंच मंडळींनी नुकताच केला असून, साहाय्यासाठी संबंधित मंडळी, संस्थानिक आणि श्रीमंत भक्त यांना त्यांनी आवाहन केले आहे.

गणपतीपुळे येथील आसमंत अतिशय निसर्गसुंदर आहे, अगदी समोर अथांग समुद्र पसरला असून, त्यावर उसळणाऱ्या लाटांचा फेस विलोभनीय वाटतो.

या मंदिराचा मुख्य दरवाजा उत्तरेकडे आहे. आत गेल्यावर मुख्य घुमट लागतो. त्याचे तोंड पश्चिमेकडे. या घुमटातून आत जाण्यासाठी पश्चिमेच्या बाजूला पुरुषांकरिता व उत्तरेच्या बाजूला स्त्रियांकरिता असे दोन दरवाजे राखले आहेत. ही कौलारू इमारत वीस हात लांब व सात हात रुंद आहे. घुमटापुढे लहानसा सभामंडप असून, त्याचा दरवाजा पश्चिमेकडे आहे. देवळाबाहेर वाळवंटाकडे तीन दीपमाळा असून, बाजूला पूर्वीचे जमखंडी अधिपतींनी बांधलेले एक अतिथि-गृह आहे. मंदिराचा गाभाराही लहानसा असून, तिथे असणारा डोंगराचा भाग ही गजाननाची मानसप्रतिमा मानली जाते.

समुद्रात अस्तंगत होणारी सुंदर सूर्यकिरणे या प्रतिमेवर २ ते ८ फेब्रुवारी व २ ते ८ नोव्हेंबर या कालात स्पष्टपणे पडतात. तो देखावा मोठा भावनापूर्ण असतो. पाठीमागील निराकार मूर्ती जो डोंगर त्यातून पडत असलेले नाभिगंगोदक समुद्राच्या पाण्यात अद्यापही जात असते. गोल डोंगर ही देवाची निराकार मूर्ती असल्याने या डोंगराला प्रदक्षिणा घालतात. तिची लांबी अर्धा मैल आहे. या डोंगरावर घनदाट झाडी असून, देवाचे गण म्हणून तिला मानले गेल्याने एकही झाड तोडले जात नाही असे सांगण्यात येते.

हे जागृत रमणीय गणेशस्थान रत्नागिरीहून पायवाटेने १२ मैल व एस.टी. मार्गे ३० मैल आहे. मुंबई ते पुळे खास प्रवाससोय आठवड्यातून तीन दिवस असते. मुंबई सेंट्रलवरून गाड्या सुटतात. साधारणतः रत्नागिरीहून दुपारी गाडी निघून ती रात्री मुक्कामाला पुळ्याला रहाते व दुसरे दिवशी सकाळी परत फिरते. विशेष उत्सवांचे वेळी एकसारख्या गाड्या सुटत असतात.

एस.टी. स्टँडपासून मुख्य मंदिर सुमारे मैलभर दूर आहे. जातायेताना जिकडे पहावे तिकडे नारळी, पोफळी, काजूंची लहानमोठी झाडे, रंगीबेरंगी फुलझाडे, झापांच्या झोपड्या आणि खळ्यांत तुरळकपणे गप्पा करीत बसलेली कोकणी माणसे जागजागी दिसतात. एकंदरीत हा टापू निवांत, एकांत धारण करणारा असून वृक्षराजींनी गजबजलेला भासतो.

गणपतीपुळे या ठिकाणी प्रतिवर्षी दोन मोठे उत्सव होतात. एक भाद्रपद महिन्यात व दुसरा माघ महिन्यात. माघ महिन्यातील उत्सवाचे वेळी साधारणपणे

१२,००० लोकांची गर्दी जमते. भाद्रपद महिन्यात शुद्ध चतुर्थीला सूर्योदया-पासून ते दुपारी बारापर्यंत श्रीचे गाभाऱ्यात शुचिर्भूतपणे मोठ्या थाटात पूजा होते. उत्सवाचे कालात मंदिरापासून तो त्रिपुरापर्यंत नाना प्रकारची दुकाने दुतर्फा थाटली जातात. मोठा बाजार भरतो, आरास केली जाते. याशिवाय चैत्री पाडवा ते अक्षय तृतीया व आश्विन महिन्यातील दीपोत्सव असे दोन उत्सव या ठिकाणी होतात. गणेश चतुर्थी हा गणेशस्थानांचा मुख्य दिवस असल्याने त्याचे अर्थात महत्त्व मोठे आहे. गणपतीपुळे येथे भाद्रपद शुद्ध ११ ला स्थानशुद्धी-साठी एक धार्मिक विधी क्षेत्रोपाध्ये बापट यांचेकडून करण्याची पूर्वापार प्रथा आहे. त्यानंतर प्रसाद होतो.

# कुलदैवत गणपती

लेखक : **सरदार श्री. आबासाहेब मुजुमदार**

आपल्याला आपल्या पूर्वज वंशजांची जेथपर्यंत माहिती मिळू शकते, तेथपर्यंत ऐतिहासिक दृष्टया माहिती मिळून ती प्रसिद्ध करणे इष्ट आहे. त्या दृष्टीने आमचे पूर्वज वंशज यांची माहिती प्रसिद्ध सत्पुरुष श्रीमोरया गोसावी यांचेपासून उपलब्ध आहे. आम्ही मूळचे रहाणारे मोरगाव क्षेत्राचे. तेथे श्रीमोरेश्वराचे देवालयात आम्हाला रहाण्याकरिता सभामंडपाचे बाहेर परंतु देवालयाचे आत चार ओवऱ्या बांधल्या होत्या, त्यावेळी श्रीमोरया गोसावी हे चिंचवडहून दर्शनाकरिता (मोरयाचे) उत्सवामध्ये व इतरही वेळी वरचेवर येत असत. त्यावेळी त्यांना रहाण्याकरिता जागा म्हणून एखादे घर अथवा खोल्या नव्हत्या. म्हणून आमच्या त्या वेळच्या पूर्वजांनी आपल्या चार खोल्या अथवा ओवऱ्या त्यांना रहाण्याकरिता दिल्या, तेव्हा त्यांनी आम्हाला स्वतःला रहाण्याकरिता म्हणून तेथे देवळाचे आवारामध्ये दोन ओवऱ्या बांधण्याकरिता तेथील स्थानिक अधिकाऱ्यास सांगितले. त्याप्रमाणे आम्ही दोन खोल्या आमच्याकरिता बांधल्या व वहिवाट करू लागलो. तेव्हापासून मूळचे रहाणारे मोरगावचे असलेले आम्ही गणपतीभक्त बनलो. तेव्हापासून आमचे कुलदैवत गणपती हे झाले. त्यानंतर श्रीगणपतीची पूजा, अर्चा, उत्सव, महोत्सव, मंत्र, तंत्र, जपजाप, उपासना, अनुष्ठाने चालू झाली. ही सर्व उपासना आमच्या घराण्यात चालत आली असून आम्ही ती पाळीत आलो आहोत. त्याप्रमाणे मुख्य कुलदैवत गणपती हे राहिले. त्यांच्या अनुषंगाने तेथून थोडे अंतरावर असलेले लोणीभापकर व जेजुरी हीही आमची कुलदैवते बनली. याशिवाय तुळजापूरची भवानी हीही कुलदेवता झाली. त्याप्रमाणे आमच्या घराण्याच्या ह्या चार कुलदेवता झाल्या. लोणीभापकर येथे आमचे पूर्वजांनी कुलकर्णपण व जोशीपण मिळवले. तेथील मुख्य देवता ही भैरवनाथ नावाची कुलदेवता बनली.

# ॥ श्रीमोरया गोसावी यांचे चिंचवड ॥

लेखिका : **सौ. उषा माटे**

पुणे जिल्ह्यात हे गाव पूर्वी चिंचवडी या नावाने प्रसिद्ध होते. गावाच्या रक्षणार्थ तट व चार वेशी पण होत्या. श्रीमोरया गोसाव्यांचे वेळी व्यापारधंद्यात हे गाव फार मोठे होते. लोक खाऊन-पिऊन सुखी होते. मोठमोठी घराणी अत्यंत सुखवस्तु परिस्थितीत होती. जकात नाकी होती. इतकेच नव्हे तर चिंचवड नाणीसुद्धा तिथल्याच टाकसाळीतून निघत होती. अशा या चिंचवडी गावात एक महान संत श्रीमोरया गोसावी गणेशभक्त होऊन गेले. त्यांचे आयुष्य गणेश-भक्तीने भारलेले, सात्त्विक, सदाचारसंपन्न असेच होते.

सुमारे सहाशे वर्षांपूर्वी कर्नाटकात बेदराजवळ 'शाली' नावाच्या खेड्यात वामन भट्ट नावाचे आश्वलायनसूत्री, हरितस गोत्रोत्पन्न देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण रहात होते. त्यांचे आडनाव शालिग्राम होते. ते प्रतिभासंपन्न, सदाचारी, विद्वान, स्वधर्मनिष्ठ व गणेशभक्त होते. पत्नी पार्वतीबाई पण सुशील, पतिपरायण, साध्वी व प्रेमळ होती. पण असे असूनही घरची अत्यंत गरिबी. काही तरी व्यवसाय करण्यासाठी म्हणून ते गाव सोडून फिरत फिरत मोरगावला आले. या पवित्र ठिकाणी राहून वामन भट्टांनी तीन तपे अनुष्ठान केले. तिसऱ्या अनुष्ठानाचे वेळी श्रीमंगलमूर्तींनी तुझ्या पोटी जन्म घेईन म्हणून आशीर्वाद दिला, व त्याप्रमाणे त्यांचे वयाचे ८०-८५ वे वर्षी शके १२९७ माघ शु. ४ गुरुवारी गणपतीच्या रूपाने श्रीमोरया गोसावी जन्मास आले. मोरेश्वराच्या कृपेने पुत्र झाल्यामुळे त्याचे नाव मोरया असे ठेवले. पहिल्यापासूनच उत्तम संस्कार झाल्या-मुळे मोरया गोसावीसुद्धा लहानपणापासून ईश्वरचिंतनात मग्न असत. अचाट बुद्धिमत्तेबरोबरच काही अलौकिक चमत्कारही त्यांच्यात दिसू लागले. पहिल्याने हा मुलगा मुका असल्याचे त्यांच्या आई-वडिलांना वाटले. कारण ते काहीच उच्चार करीत नव्हते. पण एका साधूने त्यांच्या अंगावरून हात फिरवून

त्यांच्याबरोबर बोलण्यास सुरुवात करताच 'गणानात्वा' या शब्दाने त्यांचे मौन सुटले.

एकदा ते पाच वर्षांचे असताना तापाने अतिशय आजारी होते. त्यातून ते उठणे शक्य नव्हते, म्हणून त्यांचे आईवडील अतिशय चिंताक्रांत झाले होते. अशा वेळी एक गोसावी आला. त्याने त्यांची आजारातून मुक्तता केली. आशीर्वाद दिला. गोसाव्याने जीवदान दिले म्हणून गोसावी हे त्यांचे आडनाव सुरू झाले. मूळ आडनाव 'शालिग्राम'. व्रतबंध झाल्यावर आपल्याला उत्तम गुरू असावा अशी तळमळ त्यांना लागली होती. त्यांची ही तळमळ 'श्रीनयन भारती' या योगीमहाराजांनी पुरी केली. त्यांनी या शिष्याला सर्व विद्या पारंगत केले. गुरूंच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी थेऊर या गावी उत्तम जागा बघून त्या ठिकाणी ४२ दिवस अन्नपाण्यावाचून घोर तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येतून प्रत्यक्ष मंगलमूर्तींनीच त्यांना जागे केले व तुझ्या तपश्चर्येने मी प्रसन्न होऊन तुझ्या पोटी जन्म घेईन असा वर दिला. तसेच सर्व आश्रमात गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे, तेव्हा तू लग्न कर अशी आग्रहपूर्वक आज्ञा केली. संसारबंधनात पडण्याची श्रीमोरयांची इच्छा नव्हती पण 'तुला प्रपंचाची बाधा होणार नाही. परमार्थ करताना प्रपंच त्याग, पंचाग्निसाधन हेही करण्याची आवश्यकता नाही. माता-पिता, पुत्रकलत्र या सर्व गोष्टींचे योग्य तऱ्हेने संगोपन करून माझी प्राप्ती होते.' असा ज्ञानोपदेश केला. स्वप्नात दृष्टांत दिला व ज्यावेळी मी जन्माला येईन त्यावेळी माझी खेचरी मुद्रा असेल व हृदयावर पंजाप्रमाणे शेंदराचा पट्टा असेल. एवढे सांगून परत मोरगावी जाण्याची अनुज्ञा दिली. आज्ञेप्रमाणे श्रीमोरया गोसावी, तेथील मंडळींचा प्रेमाचा निरोप घेऊन परत मोरगावी आले. आपल्या पुत्राला श्रीमंगलमूर्तींचा प्रसाद लाभल्याबद्दल व स्वप्नात दृष्टांत झाल्याबद्दल त्यांच्या आईवडिलांना फार आनंद झाला. कालानुरूप वयाच्या १३० व्या वर्षी १३३२ मध्ये त्यांचे वडील निधन पावले. त्यांच्या निधनापूर्वी चार महिनेच आगोदर त्यांच्या मातोश्री पण निधन पावल्या होत्या. आईवडील गेल्यावर त्यांना पुन्हा एकांतवास करावा अशी इच्छा झाली. ती इच्छा श्रीच्या जवळ सांगितल्यावर दृष्टांत झाला की, पवनाकाठी चिंचवडला जाऊन वास्तव्य कर. मी तुझ्याजवळ सदैव आहे. पण प्रतिमासी चतुर्थीला मोरगावला येत जा. अशी आज्ञा झाल्याप्रमाणे श्रीमोरया हे पवनाकाठी चिंचवडला कायम वास्तव्य करण्या-साठी आले. तेथून ते रोज किवजाई देवीच्या देवळात अवतीभवती जंगल आहे अशा ठिकाणी तपश्चर्या करीत. असा रोजचा क्रम सुरू होता. असा दिनक्रम चालू असता, एक दिवस पुनवळ्याचे एक गृहस्थ श्रीमोरया गोसावी यांचेकडे चिंचवडला आले व त्यांनी आपणांस माझी मुलगी देण्याबद्दल श्रीचा दृष्टांत झाल्याचे

सांगितले. त्यावर श्रीमोरया म्हणाले आम्ही विरक्त, त्यातून वयाला ९६ वर्षे झालेली, अत्यंत गरिबी अशा मला तुम्ही मुलगी देणे बरे नव्हे. आम्हास पण श्रीचा दृष्टांत झालेला नाही करता पुढे पाहू. पण लगेच श्रीमोरयांना आलेल्या मुलीशी लग्न कर असा संकेत झाला. त्याप्रमाणे हा लग्नसोहाळा चार दिवस पार पडला. विशेष म्हणजे श्रीमोरयांची गरिबी तेव्हा गावकरी मंडळींस भोजन कसे देणार ही चिंता मुलीच्या वडिलास पडली. पण श्रीच्या पुढे सर्व स्वयंपाक ठेवून तेथूनच सर्व लोकांना वाढण्याची व्यवस्था करा असा गोविंदरावास विचार सांगितला. त्याप्रमाणे केल्यावर अन्न तुटवडा बिलकूल भासला नाही. श्रीसिद्धीच तेथे नांदत होत्या. ईश्वरी अवतार असलेला जावई आपल्याला लाभला म्हणून गोविंदरावांस फार आनंद झाला. त्यांच्या पत्नीचे नाव उमाबाई होते. त्याही स्वभावाने शांत, दयाशील व श्रीमोरयांना सर्व प्रकारे अनुकूल होत्या. शके १४०३ मध्ये माघ वद्य चतुर्थीला श्रीमोरया गोसाव्यांना पुत्र प्राप्ती झाली. त्या मुलाचे नाव 'चिंतामणी' असे ठेवण्यात आले. कारण त्याचा जन्म थेऊर येथील चिंतामणीच्या रूपाने झाला त्यावेळी मोरया गोसावी हे वारीला थेऊर येथे गेले होते. तिथेच त्यांना दृष्टांत झाला की, 'मी चिंचवडी तुझ्या घरी जन्म घेऊन आलो आहे.' मोरया गोसावी घरी येऊन पहातात तो श्रीने सांगितल्याप्रमाणे आपण केलेली श्रीची पूजा आपल्या बालकावर दिसत आहे. अशा त्या बालकाला पाहून मोरयांना ब्रह्मानंद झाला. पुढे हेच बालक 'चिंतामणीमहाराज' म्हणून फार प्रख्यात पावले. श्रीमोरया गोसाव्यांनी प्रपंच व परमार्थ दोन्ही उत्तम तऱ्हेने केले. वृद्धपणामुळे पुढे पुढे त्यांना मोरगावला वारीस जाणे जड पडू लागले. पण आत्यंतिक भक्तीमुळे श्रीमंगलमूर्तींनी त्यांना तू 'आता वारीस येऊ नकोस. मीच तुझ्या घरी येतो. उदईक गणेशकुंडात स्नान करताना तुझ्या हातात जो प्रसाद येईल तो माझाच आहे असे समजून तो घेऊन चिंचवडला जा' अशी आज्ञा केली. त्याप्रमाणे दुसरे दिवशी श्रीमोरयांचे हातात स्नान करते वेळी श्रीची (तांदळा) मूर्ती ओंजळीत आली. हातात तांदळा मूर्ती असतानाच आकाशातून त्यांचेवर शमी, दूर्वा, फुले यांची वृष्टी झाली व मोरेश्वराच्या नावाचा गजर झाला. नदीतून बाहेर येताच काठावर नैवेद्याची पण सर्व तयारी दिसली. प्रत्यक्ष सर्व देव त्या ठिकाणी दर्शनाला आले होते. असा हा चमत्कार पाहाण्यासाठी ग्रामस्थ मंडळींची पण अलोट गर्दी झाली. अशा मंगल प्रसंगी काठावर असलेल्या नैवेद्याची तयारी होतीच, त्या सर्व भाज्या एकत्र करून त्यांची भाजी केली व कणकेच्या पोळचा करून, श्रीमोरया गोसाव्यांनी सर्व देवांस त्या शमीवृक्षाखाली भोजन दिले. उरलेला सर्व अवशिष्ट भाग सर्व लोकांना प्रसाद म्हणून वाटला. एवढे वाटून जे कण तेथे राहिले होते ते पक्षी रूपांनी येऊन

देवतांनी भक्षण केले. तेव्हापासून माझ्या वंशजांना याच ठिकाणी जीवमात्रास अन्न संतर्पण करावे अशी आज्ञा श्रीमोरया गोसाव्यांनी केली. त्या वेळेपासून अजूनपर्यंत ही प्रथा चिंचवडी चालू आहे. त्या ठिकाणाला पोळा असे म्हणतात.

पुढे ती तांदळा मूर्ती श्रीमोरया गोसाव्यांनी मोठ्या समारंभाने चिंचवडास आणली व तिची सांगितल्या जागेवर स्थापना करून तिचे भजन पूजन सुरू केले. भाद्रपद आणि माघ मास या दोन्ही वेळी मोरगाव येथे श्रीमोरया गोसावी जात असत. ती प्रथा अजूनही चालू आहे. अशा तऱ्हेने ईश्वरचिंतनात काल घालवीत असता लोकांकडून त्यांना फार उपसर्ग पोचू लागला. म्हणून ते कंटाळले आणि मंगलमूर्तीस प्रत्यक्ष दर्शन देण्याची आणि गुप्त वास करण्याची इच्छा प्रकट केली. त्याप्रमाणे श्रीमंगलमूर्तींनी स्वतः प्रकट होऊन तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील व माझा वास तुझ्या हृदयात अक्षय असल्याचे सांगून अंतर्धान पावले. गुप्त वास (समाधी) करण्याचा आपला मनोदय आपल्या पुत्रास श्रीमोरया गोसाव्यांनी सांगितला. लागलीच पित्याच्या इच्छेप्रमाणे चिंतामणीमहाराजांनी पवना नदीचे काठी शुद्ध भूमी पाहून गुहा तयार केली. शके १४७३ मार्गशीर्ष वद्य षष्ठीला श्रीमोरया गोसाव्यांनी पवना नदीवर प्रातःस्नान करून संध्यावंदन केले. श्रीमंगलमूर्तीची पूजा करून गुहेत उतरले. आसन विधी केला. नासाग्री दृष्टी ठेवून समाधी लावली. चिंतामणीने त्यांच्यापुढे दोन दीप लावले व गणेशपुराण, शमी, दूर्वा मांडून ठेवले. आपल्या दोन्ही पत्नींसह त्यांची पूजा करून साष्टांग नमस्कार



कोठेश्वर :
चिंचवड

घातला. नंतर अत्यंत सद्‌गदित अंतःकरणाने गुहेचे दार लावून घेतले व त्यावर शिळा ठेवली. श्रीमोरया गोसाव्यांचे मस्तक ज्या ठिकाणी होते त्या ठिकाणी ऋद्धिसिद्धीची श्रीमंगलमूर्तीसह स्थापना केली. शके १५८० मध्ये देऊळ बांधले. श्रीमोरया गोसाव्यांचे नातू 'नारायणमहाराज' यांनी आपल्या आजोबांच्या समाधीचे द्वार दर्शनार्थ उघडले. तेव्हा त्यांना दोन्ही बाजूंना दिवे व पोथीवाचन चालू असलेले श्रीमोरया गोसावी दिसले. पण लगेच आतून शब्द आले की, पुढे येऊ नकोस. माझ्या समाधीचा भंग केलास तर पुढे साक्षात्कार होणार नाही. झाल्या गोष्टीबद्दल क्षमा मागून त्यांनी एक शिवलिंग समाधीचे द्वारावर कायमचे बांधून काढले. तेथे बसविलेल्या त्या शिवलिंगाची हकिगत अशी आहे :

कोथळे गावी कऱ्हा नदीमध्ये एक शिवलिंग फार दिवस पडून होते. ते सासवड येथील एका सावकाराने आणण्याचा प्रयत्न केला. पण महादेवांना त्याच्या घरी जायचे नव्हते. चिंतामणीमहाराजांना मात्र त्यांना घेऊन जाण्याचा दृष्टांत झाला. त्याप्रमाणे चिंतामणीमहाराज यात्रेहून परत येत असता ते बरोबर घेऊन आले. नंतर त्यांचे नातू जे 'नारायणमहाराज' त्यांनीच ते शिवलिंग गुहाद्वारावर बसवून ते कायमचे बंद केले.

**भाद्रपदी यात्रा**

भाद्रपद शुद्ध प्रतिपदेला सकाळी पालखी निघून गावाबाहेर खडकबेहेरे येथे थांबते. तेथे जयजयकार, प्रसाद वाटणे झाल्यावर, पालखी पुढे निघून पहिला मुक्काम पुणे येथे तळेगावकर दाभाडे यांजकडून लकडी पुलाजवळ पूजा, प्रसाद व आरती होते. दुसरा मुक्काम सासवड वाटेने अंबी येथे कऱ्हेचे श्रीस स्नान, पूजा व भोजन झाल्यावर रात्री मोरगाव, चतुर्थीस महापूजा. पाचवे दिवशी पोळीत पालखी येते. तेथे नैवेद्य भोजन वगैरे होते. मात्र तेथे अंत्यजाकडून प्रसाद लुटवितात. सोवळ्या ओवळ्यांचा प्रश्न नाही व स्पर्शदोषही नाही. षष्ठीला जेजुरी, खंडोबा दर्शन, सप्तमीला शेवरीच्या यमाईचे दर्शन व सासवड, अष्टमी व नवमी हडपसर उरळी, रात्री भांबुर्डे व दशमीस चिंचवडला परत.

माघी यात्रा याप्रमाणेच पण दहा दिवसांतच परत येण्याचे बंधन नाही. या यात्रेत श्रीमोरया गोसाव्यांना मिळालेली तांदळा मूर्ती बरोबर नेतात. ती नेल्यावर त्याच्या पाठीमागे जी गजाननाची मूर्ती आहे तिची पूजा करतात. ती मूर्ती ज्या ठिकाणी आहे त्या ठिकाणी श्रीमोरया गोसावी आपण केलेल्या पार्थिव गणेश-मूर्तीचे विसर्जन करीत असत. पण या मूर्तीपुढे पडदा असतो. तांदळा मूर्ती परत आल्यावर ती झाकून टाकतात. या मूर्तीचे नाव कोठेश्वर आहे.

# || गणेशमहिमा ||

लेखिका : **सौ. सविता जाजोदिया**

महाराष्ट्रात गणपतीच्या पौराणिक कथा प्रसिद्ध आहेत. पण गणेश माहात्म्य वर्णन करणाऱ्या लोकांना व्रतविषयक कहाण्यांमध्ये वा लोकसाहित्यात फारसा वाव मिळालेला आढळत नाही. त्याभानाने राजस्थानात 'बिन्दायकजी' (विनायक) चे महत्त्व फार! कोणतेही शुभ कार्य गणेशाचे आवाहन स्तुति-गीतांनी केल्याखेरीज सुरू होत नाही. तद्वत कोणत्याही व्रताची सांगता गणपतीची कहाणी ऐकल्याखेरीज होत नाही. व्रताच्या दिवशी महिला अगोदर त्या व्रताची कहाणी सांगतात आणि व्रतकथा सांगून झाली की लगेच गणपतीची कहाणी सांगून मगच उठतात. या कहाण्या खूप आहेत. त्यांपैकी काही येथे देण्यात येत आहेत :

## बारा दाणे घेतले, बारा वर्षे चाकरी केली

एकदा गणपतीची स्वारी फिरायला निघाली होती. वाटेत एका सावकाराचे शेत लागले. गणपतीने सहज जाता जाता त्या शेतातून धान्याचे बारा दाणे तोडून घेतले. पुढे गेल्यावर गणपतीच्या लक्षात आले की, अरे आपण त्या सावकाराला न विचारताच त्याच्या शेतातून धान्याचे दाणे घेतले हे काही ठीक नव्हे. तेव्हा चोरीच्या त्या पापप्रक्षालनार्थ गणपतीने त्या सावकाराकडे बारा वर्षे नोकरी करण्याचे ठरविले. साधे मानवरूप धारण करून तो सावकाराकडे नोकरी करू लागला. एकदा काय झाले सावकाराची बायको परसाकडे जाऊन आल्यावर राखेने हात धुऊ लागली. गणपतीने ते पहाताच सावकाराच्या बायकोचा हात पिरगळून तिला ती राख खाली टाकायला लावली आणि मग मातीने तिला हात धुवायला लावले. गणपतीचा हा आगाऊपणा पाहून सावकाराची बायको चिडली. तिने सावकाराकडे तक्रार केली. सावकाराने गणपतीला असे धिटाईने वागण्याचे कारण विचारले तेव्हा गणपती उत्तरला, 'राखेने हात धुतल्यास ऋद्धिसिद्धी

निघून जातात म्हणून मी बाईंना मातीने हात धुवावयास लावले.' सावकाराने मनात म्हटले, गणपत्या समजूतदार आहे. त्यानंतर कुंभमेळ्याची पर्वणी आली. तेव्हा सावकाराने गणपतीस म्हटले, 'गणपत्या, बाईंना गंगास्नानास जावयाचे आहे. तू त्यांच्याबरोबर यात्रेला जा.' गणपती बाईबरोबर गेला. गंगेकाठी पोहोचल्यावर बाई काठाशीच बसून स्नान करू लागली. तेव्हा गणपतीने तिला पाण्यात ढकलून दिले आणि चांगले गंगेच्या मध्यावर नेऊन बुडी मारायला लावली. बाई चिडली, घरी आल्यावर तिने सावकाराजवळ पुन्हा तक्रार केली. 'या गणपत्याने इतक्या लोकांसमोर माझी नाचक्की केली.' सावकाराने गणपतीला जाब विचारला तेव्हा गणपतीने खुलासा केला, 'काठावरचे पाणी इतरांच्या स्नानामुळे दूषित झालेले असते म्हणून मी बाईंना गंगेच्या मध्यावर नेऊन स्नान करवून आणले. असे स्नान केले म्हणजे त्याचे फळ म्हणून पुढच्या जन्मी राज्य मिळते.' सावकाराला गणपतीचे बोलणे पटले.

त्यानंतर एकदा सावकाराने यज्ञ करावयाचे ठरविले. यज्ञ सुरू झाला तेव्हा सावकाराने गणपतीला म्हटले, 'गणपत्या जा बाईंना बोलावून आण.' गणपती बाईंना बोलवायला गेला. बाई जरीचे छानदार पातळ नेसून तयार होत्या. पण त्यांची चोळी मात्र काळ्या रंगाची होती. गणपतीने बाईंची चोळीच फाडून टाकली आणि त्यांना लाल रंगाची चोळी घालून चलण्यास सांगितले. बाई भयंकर चिडल्या आणि रुसून आपल्या खोलीत जाऊन झोपी गेल्या. सावकाराने येऊन रुसण्याचे कारण विचारले तेव्हा बाईने घडलेला प्रकार सांगितला. एका नोकरमाणसाने मालकिणीची चोळी फाडायची म्हणजे काय? सावकाराने गणपतीला असे का केलेस म्हणून विचारले, तेव्हा गणपतीने खुलासा केला, 'काळा कपडा नेसून शुभ कार्य केल्याने ते कार्य सफल होत नसते.' सावकाराला ते पटले. त्यानंतर पूजेला सुरुवात झाली. अचानक उपाध्येबुवांना आठवण झाली. गणपतीची मूर्ती घरीच राहिली. आता काय करावे? गणपती जवळच उभा होता. लगेच पुढे होऊन तो म्हणाला, 'मूर्ती नसली म्हणून काय झालं? माझीच पूजा करा म्हणजे झालं.' आता मात्र सावकाराला अनावर राग आला. गणपतीचे मानगूट पकडीत तो ओरडला, 'काय रे इतके दिवस बाईची चेष्टा करता करता आता माझीच थट्टा करायला लागलास होय?' गणपतीने शांतपणे उत्तर दिले, 'मी खोटं थोडंच बोलतोय? खरं तेच सांगतोय.' आणि त्याने आपले मूळ रूप धारण केले. सर्व लोक चकित झाले. षोडशोपचारांनी त्यांनी त्याची पूजा केली. पूजा संपल्यावर गणपती अंतर्धान पावला. सावकार व त्याची बायको दोघेही पश्चात्ताप करू लागले की, 'पहा देव आपल्या घरी आला आणि

 आपण त्याच्याकडून काम करून घेतलं. चुकलं आपलं.' तेव्हा गणपतीने त्यांना

स्वप्नात दर्शन देऊन सांगितलं, 'तुमची चूक नाही. मी तुमच्या शेतातून बारा दाणे घेतले होते म्हणून बारा वर्षे तुमची चाकरी केली.' त्यानंतर गणपतीच्या कृपेने सावकाराकडे अपार माया जमली. तो सुखाने राहू लागला. देवा, त्यांना जशी धनदौलत दिलीस तशी सर्वांना दे.

## तुझ्या त्या विनायकाला बोलाव!

दोन बेडूक होते. त्यांपैकी जी बेडकी होती, ती रोज विनायकाचे स्मरण करीत असे. एकदा बेडूकराव रागावले व बेडकीला दम दिला, 'तू रोज परपुरुषाचे नाव घेतेस हे फार वाईट आहे. पुन्हा कधी त्या विनायकाचे नाव घेतलेस तर डोक्यात मुसळ घालीन.' सर्वज्ञ विनायकाला हे समजले. त्याला राग आला. त्याने बेडकाला चांगली अद्दल घडविण्याचे ठरविले. त्याच दिवशी एका कोळ्याच्या जाळ्यात दोघे बेडूक पकडले गेले. राजाच्या दासीने माशाबरोबरच या बेडकांनादेखील तेलाच्या कढईत घालून कढई चुलीवर ठेवली. तेल गरम होण्यास सुरुवात झाली. आता बेडूकराव घाबरले आणि बेडकीला म्हणाले, 'बेडके, तुझ्या त्या विनायकाला बोलाव नाही तर आपण दोघंही मरून जाऊ?' 'छे, मी मुळीच विनायकाचे नाव घेणार नाही. तुम्ही माझ्या डोक्यात मुसळ घालणार आहात ना?' बेडकीने आढेवेढे घेतले. इकडे तेल चांगलेच तापू लागले. बेडकाचे प्राण कासावीस होऊ लागले. हात जोडीत तो म्हणाला, 'चुकलो, पुन्हा नाही असं बोलणार. पण आता लवकर विनायकाला बोलाव.' बेडकीने सात वेळा अगदी मनापासून विनायकाचे नाव घेतले. तत्क्षणी दोन बैल एकमेकांना टक्करा देत तेथे आले. त्यांच्या शिंगांनी कढई उलटली आणि बेडूक-बेडकीने जी धूम ठोकली ती थेट सरोवराच्या काठी जाऊन श्वास घेतला. तेव्हापासून बेडकीबरोबरच बेडूकदेखील रोज विनायकाचे स्मरण करू लागला. देवा, बेडकांचे संकट निवारण केलेस तसे सर्वांचे कर.

## आजी, तू खीर उष्टावलीस!

एक गणपती होता. एके दिवशी चिमूटभर तांदूळ आणि चमचाभर दूध घेऊन तो सर्वांना विचारीत सुटला, 'याची खीर करून देता का?' प्रत्येकाने नकार दिला. अखेरीस एका म्हातारीने म्हटले, 'आण ते चमचाभर दूध आणि चिमूटभर तांदूळ. मी त्याची खीर करून देते.' म्हातारी खीर करण्यासाठी वाटी घेऊन आली. तेव्हा गणपती म्हणाला, 'आजी, वाटीत कसली खीर करतेस? मोठं पातेलं घे खीर करायला.' म्हातारीने म्हटले, 'अरे वेड्या, मोठ्या पातेल्यात चमचाभर दुधाची खीर कशी होणार?' 'तू करून तर

बघ' गणपती आग्रहाने म्हणाला. तेव्हा म्हातारी मोठे थोरले पातेले घेऊन आली, आणि तिने दुधाचा चमचा त्यात टाकला. त्याबरोबर ते भले मोठे भांडे दुधाने भरून गेले. म्हातारी खीर करायला बसली. तेव्हा गणपती पुन्हा म्हणाला, 'आजी तू खीर बनवतेस तोवर मी जरा बाहेर जाऊन येतो.' गणपती निघून गेला. इकडे खीर तयार झाली. पण गणपती काही आला नाही. म्हातारीने बराच वेळ वाट पाहिली. अखेर तिला रहावेना. तिच्या तोंडाला पाणी सुटले. तेव्हा गणपतीला नैवेद्य दाखवून ती एकटीच दारामागे लपून खीर खायला बसली. पहिला घास घेतला तोच गणपती आला. 'आजी, आजी तू खीर उष्टावलीस.' 'छे, तुलाच अगोदर नैवेद्य देऊन मी खायला बसले. चल, ये आत आणि बैस माझ्याबरोबर खीर खायला.' म्हातारीने गणपतीला ओळखले. गणपतीने तिला दर्शन देऊन आशीर्वाद दिला. 'आजी, जोपर्यंत तू हे पातेले उलटणार नाहीस तोपर्यंत ते सदैव खिरीने भरलेले राहील.' म्हातारीने देवाला विनविलं, 'देवा, माझी परीक्षा घेतलीस तशी दुसऱ्या कोणाची घेऊ नकोस. सर्वांवर कृपादृष्टी राहू दे.' 'तथास्तु' म्हणून देव अंतर्धान पावला.

## देवा, चुकले मी!

एक म्हातारी होती. तिला एक मुलगा होता, सून होती. मुलगा पैसे मिळवायला परदेशी गेला. त्याच्या मागे म्हातारी सुनेचा छळ करू लागली. तिला ती पोटभर खायला काही देत नसे. तेव्हा ती सून चोरून खाऊ लागली. फराळाचा जिन्नस ठेवलेला दिसला की ती त्यातून थोडंसं खाऊन घेई आणि थोडंस सांडून ठेवी. सासूने विचारलं की फराळाचे पदार्थ कुठे गेले तर चक्क खोटं सांगून देई, 'मला काय ठाऊक? उंदरांनी खाल्ले असतील.' त्यांच्या घरात उंदीर खूप होते म्हणून सासूला ते खरंच वाटे. पण असा उंदरांवर खोटा आळ घेता घेता बारा वर्षे निघून गेली तेव्हा गणपती रागावला. त्याने सुनेला धडा शिकवण्याचे ठरविले.

एके दिवशी त्या सुनेचा नवरा परदेशाहून घरी परतणार होता. त्याच्या आदल्या रात्री सुनेने नेहमीप्रमाणे आपले लुगडे खुंटीला टांगून ठेवले आणि खोलीची दारे खिडक्या बंद करून ती झोपी गेली. रात्री गणपतीने उंदरांना ते लुगडे पळवून बिळात लपवून ठेवायला सांगितले. उंदरांनी लुगडे बिळात लपवून ठेवले. दुसरे दिवशी सकाळी सून जागी झाली. लुगडे घ्यायला गेली तर खुंटीवर लुगडे दिसेना. आता खोलीबाहेर कसे पडायचे? बाहेर सर्वजण तिला हाका मारू लागले. तेवढ्यात तिचा नवराही परदेशाहून आला. पण सूनबाई काही केल्या खोलीबाहेर येईना. तिने आतून उत्तर दिले, 'माझे लुगडे कुणी तरी

चोरून नेले आहे. मी बाहेर कशी येऊ?' अखेर तिचा धनी खोलीत गेला. दारे खिडक्या बंद असताना चोर लुगडे कसे नेतील? त्याला वाटले बायको खोटं बोलतेय. त्याने तिला मारायला सुरुवात केली. तेव्हा सुनेच्या मनात आलं, 'आज माझ्यावर खोटा आळ आलाय. मीदेखील असाच रोज उंदरावर खोटा आळ घेत असे. तेव्हा त्यांनी तर मला अद्दल घडविण्यासाठी असं केलं नसेल ना?' सुनेने मनातल्या मनात गणपतीची प्रार्थना केली, 'देवा, चुकले मी. क्षमा कर. पुन्हा नाही असं करणार. माझं लुगडं सापडू दे. मी सव्वा रुपयाचा प्रसाद तुझ्या नावाने वाटीन.' गणपतीने तिला क्षमा केली. त्याच वेळी सुनेच्या नवऱ्याला लुगड्याचे टोक बिळाशी दिसले. गैरसमज दूर झाला. सून शहाणी झाली. आपली चूक तिला उमजली. तेव्हापासून ती रोज नित्यनेमाने गणपतीची पूजाअर्चा करू लागली. सर्वजण सुखाने राहू लागले. ही साठा उत्तराची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण.



## अनुक्रम

संग्राहिका : सौ. सरस्वतीबाई गोखले

आधी नमन करू चिंचवडीच्या मोरया
रत्नजडित तुळया मंडपात

आधी नमन करू चिंचवडीच्या मोरया
रत्नजडित समया तेवतात

आधी नमन करू आळवाचं पान
नाव गजानन मोरयाचं

आधी नमन करू आळवाची देठी
नाव जगजेठी मोरयाचं

आधी नमन करू आळवाची देठी
गणपतीपुढं मोठी सरस्वती

आधी नमन करू आळवाचं पान
गणपतीपुढं ध्यान सरस्वती

आधी नमन करू नमनाचं झालं पाणी
नाव चिंतामणी मोरयाचं

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

घाणा भरियेला विडा ठेवियेला
आदि नमियेला गणराज

घाणा भरियेला साचा खंडेश्वरी मातेचा
मोठा भार तो गोताचा गणराज

आम्हा घरी कारणी गणराज पुराणी
मांडव दणाणी चारी दिवस

आम्हा घरी तुम्ही देवे गणराजे यावे
मांडवी राहावे पाच दिवस

गणराज गणपती त्याशी शेंदुरे लिंपिती
जे मनी कल्पीती तेची होय

आदि मूळ धाडी घुंगुरांची गाडी
शालजोडीचा व-हाडी गणराज

आदि मूळ धाडा अंबेचे हो गावा
मग तेल लावा कृष्णनाथा

पानाचा की पुडा फुलांचा हो तुरा
आदि मोरेश्वरा नमियेला

आदि मूळ धाडा दूरीचीये हो दूरी
आम्हा कुळाचारी अंबेश्वरीमाय

## गणेशस्थापना

जयजयाजी देवा गणेशा । मुहूर्ते स्थापी खांबाच्या प्रकाशा ।।
ढवळा गाईन सुरेशा । रघुनाथ नोवरा ।।
देव भक्तांचा कैवारी । गणेश विघ्ने निवारी ।।
नवरदेव नोवरी । दया करी तयावरी हो ।।
बरवे दोंद देवाचे । कंठी पदक नवरत्नांचे ।।
हिरे जडिले तयावरचे । उजेड पडे भुजांवरी ।।
शेंदुर चर्चिला मस्तकावरी । जास्वन सुमनाची पूजा शिरी ।।
मोदक झेली तो हातावरी । विघ्नहरण गणराज ।।
बरवी सोंड या देवाची । कंठी माळ मोतीयाची ।।
हिरे शोभती तयाची । प्रकाश पडे उदरी ।।
सभे बैसला गणराजा । चरणी नमीते सारजा ।।
ब्रीद तोडा संकट निवारणा जा । भक्तांचा विघ्न हरणा गणराजा ।।

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

१

यावे नाचत गौरीबाळा
हाती घेऊनी पुष्पांच्या माळा
सर्व ठायी मी वंदितो तुला
यावे नाचत गौरीबाळा

चौदा विद्येचा तू माता पिता
सर्वे ठायी हाये तुजी सत्ता
चार वेदा घ्यावे वेळोवेळा
यावे नाचत गौरीबाळा

साही शास्त्रे अठरा पुराण
तुझ्यापासून झाले निर्माण
भक्त देवी येती मंडपाला
यावे नाचत गौरीबाळा

मुळारंभी सत्व धरी पाया
संगे घेत सरस्वती माया
किती विनवी तुला भक्तमेळा
यावे नाचत गौरीबाळा

२

मोरया गणपती रे गणराजा
किती विनवू तुला म्हाराजा
तेहतीस कोटी देव-दैवता
सर्वा आधी गणनायका
दैत्य मारूनी केलीस दशा
लावली पळवून धाही दिशा
चेडा झुटिंग वेताळ म्हैशा
दुष्टाला देशी तू सजा
किती विनवू तुला म्हाराजा

तुझा धाक तिन्ही ताळाला
दिला सराप तू चंद्राला
चतुर्भूज तू मंगलमूर्ति
संगे घेऊनी सारजा सती
हाती त्रिशूळ डमरू बाजा
किती विनवू तुला म्हाराजा

अष्टभैरव सिद्ध सोळा
चौसष्ट जोगणींचा मेळा
गण शंभर कोटी जमले
माझ्या अंगणी येऊनी गमले
पीर पैगंबर हे रमले
गाऊ नाम लावू ध्वजा
किती विनवू तुला म्हाराजा

संग्राहिका : सौ. मंगला नावडीकर

## हरिजागर

नमन माझे सद्गुरुनाथा शिव शंकराच्या सुता
त्याचे चरणी ठेवूनि माथा पंढरीनाथा आळविते
रुक्मिणीचा प्रीय कांत प्रगटला हृदेयात
जागर केलासे त्वरित जागर माथा आळविते
आश्विन शुद्ध दशमीचे दिवशी
आरंभ होतो जागरणासी
तेहतीस कोटी देव ऋषी
दही दुधासी पाहु येती
देव सर्वांगी सावळा पंचामृताचा सोहळा
मुखी लोणीयाचा गोळा अनंत कळा नकळे
पहाटेचे प्रहर रात्री आनंद होतो घरोघरी
दह्या दुधाच्या घागरी श्रीहरीसी अर्पिती
साखर मधाचे मर्दन मोगरेल अभंजा चर्चूने
उष्ण उदक शुद्ध स्नान मनमोहना शोभतो
पुजाऱ्याचे पुण्य थोर अखंड पूजा करती लवकर
नाना परींचे उपचार दिनोद्धारा भोगिती
पूजा पहाती थोर थोर काशीखंडाचे शंकर
त्रिशुळ हातीचा डमरू गळा हार शेषाचा
भैरव शोधी बाळराजा याच्या तिही क्षेत्री ध्वजा
हाती काठी सन्निध उभा पाहातो शोभा देवाची
चतुर्भुज गजानन यांचे उंदिराचे वाहन
प्रेमे नाचे आनंदाने जगज्जीवना पाहातसे
वायुपुत्र हनुमंत याची सेवा अखंडित
दोन्ही जोडुनीया हस्त चरणी मस्तक ठेवितसे
ब्रह्मदेव शिरोमणी तिन्ही त्रिभुवनींचा तो धनी
पंचामृताशी पाहुनी अंतरी ध्यान करीतसे
राधा रखुमाई भामा त्यांची प्रिती असे मेघश्यामा
मिळुनी गेली आत्मारामा देहभान विसरल्या
लक्ष्मीचा अहंकार नारायणे केला दूर
झाली पायांची किंकर सर्वांहूनी वरिष्ट
पुंडलिक भीमरथी मुख्य गोदा भागिरथी
नित्य नेमाशी येती हरी जागरा सावध
नारद म्हणे ऋषिश्वर विणा योगेश्वर
रामनामाचा गजर निरंतर ध्यान असे

तुळजापूरची निवासीनी नाव तुझे वरदायिनी
घाट शिळेचे वरुनी अंतरी ध्यान करितसे
नरसिंगपुरचा नरहरी कोळे नरसिंगपूर भोवरी
अतुल अनुष्ठान करी हरी जागरा सावध
करवीर कोल्हापूरवासिनी तू तर विश्वाची जननी
दक्षिण केदार घेऊनी धाऊनी येसी जागरा
निवृत्ती ज्ञानदेव मुक्ताबाई सोपानदेव चौथा भाई
चोखा नामदेव जनाबाई अक्षयपायी राहिले
पैठणचा एकनाथ अरण भेंडींचा सावता
तो तर देवाचा पंडियता प्रति येतो जागरा
नरसिंह हुंडिवाला गोरा कुंभार बहुत भला
बालक तुडवूनि काला केला आत्मा नेला जागरा
नमन माझे सद्‌गुरुनाथा शिवशंकराच्या सुता
त्याचे चरणी ठेवूनी माथा पंढरीनाथा आळविते






## तमाशातील गण

तमाशासारख्या लोकप्रिय लोकनाट्याच्या प्रारंभाचे वेळी गणपतीचे स्तवन करण्याची प्रथा आहे. आपला खेळ चांगला व्हावा म्हणून देवाची प्रार्थना करावयाची व त्याचा आशीर्वाद घ्यावयाचा ही त्या मागची भावना आहे. लेखनवाचनाची ओळख नसलेल्या सामान्य मंडळींनी आपल्या पाठांतराच्या भरंवशावर गायिलेले काही 'गण' या ठिकाणी मुद्दाम देण्यात येत आहेत. ही भावपूजा आगळी आहे. वेगळी आहे.

तमाशाच्या निरनिराळ्या कनाती व रंगमंच गाजविलेल्या वेगवेगळ्या फडांतील हे गण आहेत. गण म्हणजे गणपती देवाचे स्तवन, प्रार्थना, देवाला केलेले आवाहन.

संग्राहिका : **डॉ. सरोजिनी बाबर**

## १

अधी नमो गणपती । कार्तिक आणि सरस्वती
संभो आणि पार्वती । नमो नमो त्या लक्ष्मीला
प्रार्थना मी करीतो । ब्रह्मदेव सावित्रीला
नारदांची करून आरती । तया विना शोभे हाती
तीन्हीताळ गमन करती । आज नाचत यावे सभेला
धाव बलभिमा । संगे आणा त्या मारूतीला
मच्छे कच्छे व-हाव नरसिंह । वामन परशुराम
सातवा स्मरू राम नाम । दहा आवतार अरे भगवंता
आठवा कृष्णनाथा । बोध विठोबा कलंकी सहीता
नमु नमु चंद्र । तेतीस कोटी देव इंद्र
नाथ गोरक्ष मच्छींद्र । नमू नमू साधू संताला
गुणी रामाला । हरी गुरूनी भेद दाखविला

## २

नमू वक्रतुंडना । शुभ गण मुंडना
शुभ गण मुंडना । शुभ गण मुंडना ।
रणी माझ्या नाचत यावे शुभ ज्ञनानना
शुभ ज्ञनानना शुभ ज्ञनानना ।
मुळ माया सार ज्ञाला येतानी संगे आणा
येतानी संगे आणा येतानी संगे आणा ।
रनी माझ्या वै-याच्या करू माना खंडना
करू माना खंडना करू माना खंडना ।
पठठे बापूराव कविचा । कविचा हो मोती राना

३

श्रीगणेशा ये नमा ओनमा । मूळ तत्वाच्या तू अगमा
आनंद कंद तुझे वर्णन करूनी । गेले निघोनी निजधामा
निळकंठाच्या तू गुनराशी । होशी प्रसन्न नित अम्हा
सुरवर मुनीजन गुन तुझे गाती । नाही गणती तुझे प्रेमा
कवि देवजी म्हणे लोभ असू देवा । करी क्षमा नित आम्हा

४

रंगणी माझ्या अंगणी नाचत । येई तू गौरीहार।
धन्य धन्य तुमची करणी ।
तुम्हा विन देवा लागलो झुरणी द्या मज चरणी थारा
ओंकाराच्या तू मूळ स्वरूपा ।
संकट समई लागली आशा तुम्ही जगयाचा तारा
विठ्ठल राणू म्हणे नटला हा अंत ।
कधि येऊन मन करील शांत कवि दशरथ म्हणे हिरा

५

वक्रदंता । ये गजा मुंडा
येऊन लावावा लावावा विद्येचा झेंडा
ज्ञान मती द्यावी गंगेचा लोंढा । सप्तसुर स्मरण
करितो तुझे नऊ खंडा । सभे यावे विघ्नाच्या खंडा

६

येई रणा चरणी गणा । करूया वंदना
तुच असे आमुचा कर्ता । तुच सारी विघ्न हरिता
गाणे गातो प्रेमाने पुरता । करू या वंदना
रिद्धि सिद्धिच्या तू दंता । किति हाका मारू अनंता
सारे विघ्न तुम्ही गुणीवंता । ठेवी बंधना
कवि बाबू गुण वर्णीता । महिना झाला एक पुरता
हीच सांगतो प्रेमाची विनंती । करु या वंदना

७

या नाचत रंगणी गणोबा हो तुम्ही गवरीच्या दारकी ।
महा पंडीत, सभामध्ये बसला तुम्ही रत्न पारखी
महा माया सभेमध्ये आणाहो ब्रह्माची पोरकी
म्हणे पठ्ठे बापूराव कवी कवीचा फेरका

८

चारी मुंड्या चीत मारो काळाचोया सूत माझ्या स्वामी यावे
दूत म्हा विर विर विर
शिवा चारी बांधोनीया तेस यशी सांधोनीया भूत सारी
जमली एका मंत्रा सारखी गंगली माझा गुरू आहे
जंगली फिर फिर फिर
येताळ ते खंकाळ भंकाळ उकीन ते अकराळ विकराळ
जीते परत पुजला तेथे लाखो मुडता नीजला
त्याला पाहून जिव माझा रोजला झाली कीर कीर कीर
या मसन खाई वरती केकांची हाडे करकरती
कोणी नरकी चारा चरती कोणी पिसाटा होऊन फिरती
कोणी राम नाम स्मरती रगू विर विर विर
बीज मंत्राचा रस पेता कविता सुचली अमुच्या चिता
म्हणे पठ्ठे बापूराव कवी आले आडूमाडू त्याला झाडू आम्ही
काडू सार निर निर निर

९

चला पाहूया गौरीच्या बाळा । रंग मंडपी खेळा
गळ्या घालून माळा । हिंडती कसे तो भोळा
जगाच्या तू जगदिशा व्हंकर पुरूषा । नाही रूप रेषा तुला
मिती तरी काळा । रणमंडपी खेळा गळा घालूनी माळा
हिंडती कसे तो भोळा
आंगी विभूतीची उटी बावर झोटी । केशरी ललाटी त्याते टिळा
हारी कवी म्हणे मुळ आगमा यावे आमच्या कामा ।
करमाच्या ठेवा आमचे विघन हे टाळा

१०

गण राज नमो तव पाई
सुबुद्धि आम्हा देई रे
विघ्न हरया ये धाऊनी ‘ पाठी राखा होई ’
नं सुचे तुजवीण काही रे
तव पदकमली लीन सदोदीत्
परी धावत तू येई
गरुडावर करूनी स्वारी रे

११

श्रीगणपति मंगल मूर्ति नमतो तुला सारी । चौदा विद्येच्या दाता ही गुण गाती कवि सारी । बत्तीस दंत गुप्त मुकामध्ये दोन ठेवीले वरी बत्तीस दोन्ही चौतीस झाले मनी हिसाब करी । प्रथम गणाचे शिरसाना कुठे हुडकूनी लौकरी । म्हणे कृष्णाराम करी नको तुझी पोकाळ किरकिर

१२

प्रार्थना करू आज या सभे गया बहुपती गौरीच्या गणराया
सर्वात श्रेष्ठ आहे तुझी वाणी तुला आठवा द्रड भवानी
लागीतो पाया बहुपती गौरीच्या गणराया ।
राखावी लाज माझी सभेत येऊनी मस्तक ठेवितो श्री चरणावरती ।
कृपा करा आज ठेवावी छाया बहुपती गौरीच्या गणराया ।
आबादास खास कविची वाणी मनेराजूरी त्याची रहानी वल्ली
शिरावरती छत्र धरूया बहुपती गौरीच्या गणराया

१३

तुम्ही मंगल मूर्ति दृष्टीजनी काहो गांजती ।
आकाशाप्रती मायारूपी शक्ती झाली ।
भव पार्वती तुझी मंगल मूर्ती ब्रह्म विष्णू आणि महेश्वर
माझ्यासमोर धाकटी पोरहून श्रीपती तुम्ही मंगल मूर्ती ।
दुष्टजना काहो गांजती ।
दगडू सावळा कविता रचली ।
कौसाला बडबड सुटली ।
झाले लाल किती तुम्ही मंगल मूर्ती ।
तुम्ही दुष्ट गणा काहो गांजती ।

१४

नमन करू आज गौरी बालका गुण तुझे वर्णू किती
द्यावी मला ज्ञान मती संगे घेऊनी सरस्वती आष्ट ही नायका
चौदा विद्या चौसष्ट कला सभेमध्ये विघ्नहराला ।
यावे पार्वतीच्या बाळा चक्रचालका ।
आबा कवीत्वाची लावी घडा ।
मनी द्यावी गणराज प्रसन्न व्हावे ।
आज ठावरिचा ।
बालका नमन करूया गौरीच्या बालका ।

१५

या नाचत रंगणी गणूबा गौरीच्या हारकी तुम्हा नारीच्या हारकी
महामाया सभेमधी आनवा ब्रह्माची पोर महामंडीत सभेत बसला
तुम्ही रत्नपारखी ।
म्हणे पठ्ठे बापूराव ऐका कवी त्याची हेरकी ।

१६

आधी प्रसंग गण गायक सुन आई विर मुल पडा सरसपतीची शीर
शाया खुप गायक मैं रंग चढा
अब डूब मृदंग वाजे आसमाण उडती धड धडा छनाम छनाम
धुंगराचा आवाज शिव शक्तीचा एक लढा
शंकर सुर पुरविता आसे सुरत्या लोभे ताल बडा शप्त सूर
म्हणावा कशाला ध्यायचा घालून त्रपडा
प्रचयणे या माहाराज वल्लीच्या फडा बाडा मंच्या
झडप कैसा निधून जासी घाल मूडा
दगडू साळी गुरू हामारा आत्मा नका भला बुरा बारा गाय
साती पांढरे वस्त्र धोका नामा वडाळ

१७

गवरीचा बालक विदेचालक बुधीचा पालक आणा आणा
श्री गणे मुळ तत्र होम नमोची होम नमो वंथ सांभाळी
पात्र मजूळ गात्र वोवाळी मात्र काणा काणा
भात पूजूया रन प्रसंगी नौ विद्या भक्तीहिन वरंगी
लावू मूद बुद्धी समुंद्र शरूपी मुघ्र पाणा पाणा
सर्वा गुणाम तुमा सारखे नटले ऊनी हारी
कविला पटले कविचा खडा शश्रानी दंडा
ढेशाला दंडा हाणा हाणा

१८

शुभ मंगल चरणी गण नाचला चला चरी पाहू
चला साऱ्या आंगणी रस उचरवीला छेतीस रागाध्या
वसल्या ऊस्याला गण साऱ्यातल्या सुरा वर वर खर खर
चीम वाचवीला वाचविला नवह सागळा येचीवला उह सगळा
आगळा नीगळा मनु वेगळा खोचहा शुभ मंगल चरणी गण नाचला
गण हातीच्या पींडाचा गण वाकुड्या सोंडचा आज
पाहून पडला त्याचा छुम छुम छंनन छंनना छुंम आवाज धुंगराचा जाहला

शुभ मंगल चरणी गण नाचेला गणपती नाचुन गेल्या पाटी
शेंदूर ठेवला कोणा साठी पठ्ठे बापूराव कवीची दाटी
आटी मराठी वाले घाटी वर वर वरची भर भर भरची शाऊ
नगरची कोल्हापूरची पहा नीट पंच गेला पोचला शुभ मंगल
चरणी गण नाचला

## १९

ये गजा वंदना ये गजा वंदना नाचत ये रंगणी
आधी तुझे नाम घेऊ मग सभेत उभे राहू
आनंद आनंद होईल माझ्या मना नाचत आहे
गणपती माये धागऱ्या वाजती पार्वतीच्या नंदना
नंदना वाजवीतो ब्रह्म वीणा कवी सकाराम
शाहीर जोडी जसारणी बाण सोडी तोडू या
तोडू या वैऱ्याच्या माना रणाये गजा वंदना
ये गना वंदना आंगणी माझ्या रंगणी नाचत येई तू
गवरी हारा हॉम करस्था तुमळ पुन्या संकट समया





# जय मल्हार

**येळकोट येळकोट घे!**

देवा खंडेराया, तुझ्या दर्शनाला यावं म्हणून गेले किती तरी दिवस मी रोज घोकण्या घालतेय पण होतच नाही बघ. एक तर घरच्या माणसांसह गडजेजुरीला यायचं म्हणजे लांबचा पल्ला आणि दुसरं म्हणजे कुणाच्या सोबतीनं तुझी नवलाख पायरी चढायची? दिवटचा बुधल्या घेऊन पासरी पासरी खोबरं भंडारा उधळीत तुझ्या पालखीला सामोरं यायचा कुळाचार सांभाळावा कुणी? आणि पुरणाच्या दोन पोळचा, वरणभाताच्या मुदी, दहीभाताचे काले, भरडाचे चार वडे, गव्हल्याची खीर, तुपाची वाटी, पानाचा विडा, बेलभंडारा, खोबरंवाटी या कुळधर्मासाठी लागणाऱ्या गोष्टी कोठून गोळा करायच्या आमच्यासारख्या सडाफटींग माणसांनी? म्हणून जिथं आम्ही फिरतीवर असू तिथूनच नैवेद्य संकल्पून मोकळे होतो.

मलूराया, म्हाळसाकांता, असं म्हणतात की, ज्या दिवशी मल्लासुराचा वध झाला त्या दिवशी हर्षोन्माद झालेल्या देवादिकांनी मार्तंड भैरवांना सिंहासनावर बसविलं आणि रत्नखचित दिवटी (दीपिका) पेटवून आपला आनंद व्यक्त केला. तर त्या आठवणीची साक्ष म्हणून तुझ्या दर्शनाला यायचं तर ऐपतीप्रमाणं सोन्याचांदीची नाही तर पितळेची किंवा लोखंडाचीही दिवटी पेटवून तिला तुझ्या पायापासून मस्तकापर्यंत ओवाळली पाहिजे. बुधलीनं त्या दिवटीस वारंवार तूप अगर तेल घालीत तुझी आरती केली पाहिजे. पण एवढा खटाटोप आमच्याकडून होत नाही. असं म्हणतात की, तुझ्या आरतीच्या वेळी पुरणाचे, साखरेचे, खव्याचे, लोण्याचे, उंडीचे असे दिवे करावे लागतात. नवरात्रात वाढत्या माळेप्रमाणे ह्या दिव्यांची ताटंही वाढती हवीत. पण एवढी फुरसत आमच्याजवळ कुठली देवा? म्हणून आम्ही असेच रेंगाळतो इकडे तिकडे न् मनातल्या मनात तुझी आठवण ताजी ठेवून मोकळे होतो.

मध्यंतरी जेजुरी गडावर येऊन तुला भेटावं अशी भाषा घरात निघाली तर कुणीसंसं म्हणालं की, देवाला प्रसन्न करून घेण्यासाठी चारी दारांनी प्रदक्षिणा घातली पाहिजे. म्हणून चौकशी केली तर कळलं की, त्यासाठी पाच घटका रात्र आहे तोवरच उठून स्नान करायचं आणि गडावर येऊन तुझं दर्शन घेऊन मग प्रदक्षिणेचा मार्ग चोखाळायचा! तशी हरकत नाही म्हटलं आणि थोडी खोलात विचारणा केली. बापरे बापरे! खंडेराया, महाद्वाराची प्रदक्षिणा घालावयाची तर म्हणे मोरगावी जाऊन मोरेश्वराचं दर्शन घ्यायचं, नंतर दक्षिणेकडे वळून वीरभद्राचं दर्शन घ्यायचं, नंतर पश्चिमेकडे सासवडी जाऊन तेथील भैरवाचं दर्शन घ्यायचं, पुढे मग उत्तरेस भुलेश्वरी जाऊन येऊन पुन्हा तुझ्या दर्शनाला गडावर यायचं तेव्हा ही प्रदक्षिणा पुरी होते!

देवा, भक्तावर प्रसन्न होण्यासाठी एवढा अंत कशाला पाहायचा मी म्हणते? त्यापेक्षा तुमच्यासाठी जागरण विधी करणं आम्हांला परवडेल एक वेळ. जागरणासाठी वाघ्या-मुरळ्यांना आणि सुहासिनींना आमंत्रण करून मिष्टान्न भोजन द्यायचं ही गोष्ट तरी अवघड नाही. सवड काढली तर हे जमेल. तसंच मन संतुष्ट ठेवून आणि रागलोभ विसरून गव्हाचा चौक भरायचा, भोवती पाच ऊस बांधायचे, मधी फुलांची माळ गुंफायची आणि तुझ्या जयजयकारात वाघ्या-मुरळ्यांचं गाणं नाचणं घडवून आणीत हास्यविनोदात रात्र घालवायची हे आम्हांला ठाऊक आहे. आम्ही त्यातला रस घेतला आणि सर्वांना तांबूल देत या जागरणाची समाप्तीही भोगलेली आहे. तेव्हा मनावर घेतलं तर हे जमेल याची खात्री आहे.

ईद्रकन्या बानूच्या प्रियकरा खंडेराया, परवा एका धनगरवाड्यात आमचं जाणं झालंवतं. ही मंडळी तुझी उपासक. सात कोट सैन्याला जिंकणारा म्हणून तुझा येळकोट त्यांनी मांडलेला. त्यावेळी कुळधर्म म्हणून त्यांनी ठोंबऱ्याचा नैवेद्य केलेला. कणकीचा रोडगा वांग्याचं भरीत, पातीचा कांदा, लसूण, गव्हाच्या ओंब्या (उंडा), हुरडा, तीळ व गूळ एकत्र कांडून त्याचा दिवा करीत त्यांनी फुलवीत लावलीवती. शिजवलेले जोंधळे दहीमीठ लावून नैवेद्याला घेतलेवते. ते बघून आम्ही तिथं गेलो. कुळधर्माप्रमाणे डाक्याचा, खापराचा अगर चुडीचा गोंधळ घालतीत त्याची माहिती घेतली न् म्हटलं तळी उचलायला आपणही हातभार लावावा म्हणून पुढं झालो.

'एक स्वच्छ असं मोठं पात्र घ्यावं, त्यात अष्टदल काढून भंडार भरावा, त्यावर कलश ठेवून तो नागवेलीच्या पानांनी शिणगारावा, त्यावर नारळ ठेवून तळीची पूजा करावी.' असलं काय काय या संदर्भात ऐकलेलं आठवलं. म्हणून कुणाकुणाशी कुजबूज केली. चंपा षष्ठीच्या वेळी घरी परडी न् कोटंबा बोलावून 'उदे उदे घे'

करीत वाघ्या-मुरळींना महानैवेद्य वाढतात व खंडोबावर तिळाचे तेल ओततात त्यातलीही विचारपूस केली. तर त्यावेळी आम्हांला बरंच ठाऊक आहे असं शिफारसपत्र मिळाल्यानं धीर आला. त्यामुळं त्या तळी उचलण्यासाठी पुढं होताना आणखीनच बरं वाटलं.

फुलांचा झेला, पानाचा विडा, सुपारी, भंडारा, हळदकुंकू, खोबरं, काळचा कापडाचे तुपात भिजवलेले पाच काकडे असं सगळं सामान ताटात ठेवलेलं होतं. लोकांनी हातात पेटती दिवटी बुधली घेऊन ही तळी उचलली आणि गजर केला, 'येळकोट येळकोट घे ऽऽ' त्यावेळी त्यांच्या आवाजात आम्ही आपलाही आवाज घुमवला. पेटवलेल्या काकड्यांना ताटाच्या चारी कोपऱ्यांत ठेवून या जयजयकाराची पुनरावृत्ती साधली. दीपपात्र हातात घेऊन ते तुझ्या पायापासून डोक्यापर्यंत नेत देवा तुला ओवाळलं. त्यावेळी लोक गरजले, 'प्रकाशात देव दिसला !' आम्ही ते खरं मानून तिथल्या तुझ्या ध्यानाकडं एकटक पहात तुझ्या काळजाचा वेध घेतला आणि सारं काम एका बाजूला सारून जेजुरी गाठावी म्हटलं . . .

आणि दवणा घेऊन एक दिवस खरंच तुझ्या दाराशी आलो. दवण्याच्या सुगंधानं प्रसन्न होत भंडार खोबरं घेऊन तुझ्या गडाची एकेक पायरी चढावी म्हटलं. इतक्यात कावडी घालायचा नेम धरलेले तुझे भक्त पुढं सरसावले. प्रातःकाळी गंगेचं दर्शन घेऊन कऱ्हेच्या पाण्यानं भरलेल्या कावडी अंगावर झेलीत ही माणसं गड चढत होती. त्यांच्या मुखी तुझ्या एकीची स्तुती गीतं घुमत होती आणि वाटेवर जागोजाग भंडार उधळला जात होता ! . . . आपल्या मनोकामना पुऱ्या व्हाव्यात म्हणून तुझ्या अभ्यंग स्नानासाठी चाललेली ही धडपड बघून आम्ही सुखावलो. म्हटलं, आपणही याच धांदलीत पुढं सरकावं. तशी कुणी तरी सांगतं झालं, 'हाळावर चाललं म्हणजे खंडेराया नवसाला पावतो. साडेतीन हात लांबीच्या व दीड हात रुंदीच्या हाळ (खड्डा) खैराच्या इंगळांनी भरून त्याची षोडशोपचारे पूजा करतात. त्यावर भरपूर भंडार फेकतात आणि मग वाद्यांच्या गजरासह सचैल स्नान केलेला भक्त गळ्यात फुलांची माळ घालून हाळ प्रदक्षिणेसह नमस्कार करून हाळावरून हलक्या पावली चालतो. अशा वेळी त्याच्या मुखी मार्तंडभैरवाचा जप चालत असल्याने त्याला कसलीही इजा पोचत नाही.' . . . त्यासरशी देवा अवचितच एक आठवण येऊन अंग शहारलं. कुणी कुणी नवस फेडण्यासाठी तुझ्यासमोर बगाड घेतात म्हणे ! बगाड घ्यायचं म्हणजे पाठीच्या कातड्यात दोन लोखंडी आकडे टोचून घेऊन त्या आधारावर उभ्या खांबास लावलेल्या आडव्या दांड्यावर लोंबकळत दोन तीन प्रदक्षिणा घालायच्या ! बापरे ! देवा, खंडेराया भक्ताचा किती अंत 

बघायचा हा? कशासाठी एवढं हे दिव्य? त्यापेक्षा चटकन दर्शन देऊन मोकळं व्हावं हे उभयपक्षी सोपं नाही का?

या गरीब बिचाऱ्यांना तुझा आशीर्वाद हवा असतो. 'वेलं मांडवाला जाऊंदे, एकाचे एकवीस न् पाचाचे पन्नास होऊंदेत' असं त्यांचं तुझ्याकडं मागणं असतं. 'भक्ताचा उंबरा न् उंबरा असाच वाढूंदे' एवढाच वर ते तुझ्याकडून अपेक्षित असतात. त्यामुळं असले नवस नाही फेडले तर ते उदास मनानं वारंवार तुझ्या धोकण्या घालीत बसतात न् मग एक दिवस ह्या अघोचारीपणाला बळी पडतात! तर आमचं म्हणणं खंडेराया तू एवढी वेळ येऊच देऊ नयेस. भक्त संकटात आहे म्हणून कळलं रे कळलं की, भंडार उधळून ते संकट तू पडदानशीन करावंस आणि तुझ्या भक्ताला नवी उमेद देऊ करावीस.

खंडेराया, तू आमचं कुलदैवत. आमच्या कुळांचं संरक्षण करणं हे तुझं काम. त्यासाठी तुझ्याकडं आम्ही एकच जोगवा मागणार आहोत की, 'या कडेपठारावरून तू महाराष्ट्राच्या संस्कृतीचं रक्षण करावंस. त्यासाठी पोथीपुराणं तू वाचावीस आणि म्हाळसा बानूसह आमच्या भेटीला वारंवार येण्याचं मनावर घ्यावंस.'



## अनुक्रम





# गडजेजुरी

लेखिका : डॉ. सरोजिनी बाबर

अंगावर पिवळं धमक पातळ नेसून, कपाळावर भंडारा लावून, पायात घुंगूर बांधून आणि पदराला बांधलेली घाट वाजवून मुरळी नाचायला लागावी आणखी हातात दिमडी, चौंडकं न् सुरत्याच्या हातातील तुणतुणं लावून 'हब्...हब्...' करीत वाघ्यानं तिला साथ करीत नाचून खंडेरायाच्या नावानं येळकोट गरजावा म्हणजे बघणाराचं देहभान हरपून जातं न् पहाणाराची पावलं चुटकीसरशी गड-जेजुरीची 'नवलाख पायरी' केव्हाच चढू लागतात. खरं म्हणजे गडाची पायरी नऊ लाख नव्हे तर या मजबूत पायऱ्या बांधण्यासाठी उपयोगात आणलेल्या चिऱ्यांची संख्या नऊ लाख आहे म्हणे! तर इथली एकेक पायदंडी चढताना दोन्ही बाजूंच्या दीपमाळा पाजळाव्यात आणि या जेजुरी नगरातील कोऱ्या चंदनी महालात आपण प्रवेश करावा म्हणजे या देवाचं जागरण असं काय रंगतं की, त्याबद्दल काय बोलावं?

गडजेजुरीचा खंडोबा हे महाराष्ट्राचं एक प्रमुख कुलदैवत. त्यामुळं या देवाचं जागरण घालावं हा मराठी माणसाचा एक आवडता छंद. म्हणून, वाघ्या-मुरळींनी नाचगाणं करताना देवाचं नमन, पूजन, आरती न् खंडोबारायाच्या जीवनातील विविध पैलूंची मोठ्या हौसेनं केलेली गुंफण जागरण घालणाऱ्या मंडळींच्या मनाची विलक्षण पकड घेते. त्याकारणानं जागरणाची ही रात्र सर्वार्थानंच एवढी अपूर्वाईची ठरते की, हे गीतनृत्यकारच काय किंवा या दैवताचे भक्तगणच काय पण उभ्या जेजुरी नगरात उत्सवाला उधाण येतं. अशा वेळी रीण काढून सण साजरा करायची वेळ आली तरीही कुणी मागंपुढं पहात नाही. कुलदैवताला प्रसन्न करण्यासाठी अहोरात्र धडपडणं हा जणू मराठी माणसाचा स्वभावविशेषच आहे.

पंढरीला विठ्ठलनामाच्या गजरात देवाला आळवतात, प्रसन्न करतात, तर जेजुरीला खंडोबाची पूजा बांधताना 'खंडोबाचा येळकोट, सदानंदाचा येळकोट'

असा घोष सदैव चालू असतो. या ठिकाणी 'तळी भरणं' हा एक विशिष्ट विधी असतो. ताटात किंवा ताम्हनात खोबरं व भंडार घ्यायचा, पूजा करायची आणि मग 'येळकोट'च्या घोषात ती तळी त्रिवार उचलून डोक्यावर घ्यावयाची आणि खाली ठेवायची. नंतर देवाकडे तोंड करून मुक्त हस्तानं त्या भंडाऱ्याची, खोबऱ्याची उधळण करायची. हाच खंडेरायाचा प्रसाद.

भक्तगणांचे देवाकडे मागणं एकच, 'देवा, भरपूर अन्न पिकू दे, मी पूर्णपात्र दान देईन.' 'इळा' म्हणजे पृथ्वी आणि 'कोट' म्हणजे पूर्णपात्र, यावरूनच येळकोट या शब्दाचा जन्म झाला. खंडोबाच्या भक्तांचा जणू हा मंत्रच.

या खंडेरायाचे वाघ्या-मुरळी हे महान भक्त आहेत. देवाच्या रंगभोगासाठीच त्यांची खास नेमणूक करण्यात आलेली असते, त्यामुळं देवाचं जागरण घालायचं. नाचगाणं करायचं आणि देवाचं मनोरंजन होईल हे पहायचं हेच त्यांचं खास काम असतं. म्हणून जन्मभर याच एका कामात ते दंग होऊन गेलेले असतात.

जेजुरी : प्रवेशद्वार



खंडोबारायाच्या अंगभोगासाठी म्हणन पुजारी अगर गुरव यांची नेमणूक झालेली असते.

पुणे जिल्ह्यातील जेजुरीचा खंडोबा हा काही लोकांच्या मते मूळचा द्रविडांचा, परंतु आर्य, शक आणि द्रविड यांच्या मिश्रणानंतर आता तो मराठ्यांचा झाला आहे. त्यामुळं दरवर्षी चैत्री पौर्णिमेला आणि सोमवती अमावास्येला जेजुरीला मोठी यात्रा भरते व हजारोंच्या संख्येने मराठी मंडळी हा जेजुरी गड चढून जाऊन खंडेरायाचं दर्शन घेतात. या जेजुरीच्या गडाला मोठे ऐतिहासिक महत्त्वही आहे. शिवाजीराजांनी स्वराज्याची स्थापना करण्यास सुरुवात केली, परंतु त्यावेळी शहाजीराजे कर्नाटकात होते. बारा वर्षे पुत्राची भेट झाली नव्हती. आता मात्र त्यांना शिवाजीराजांच्या भेटीची ओढ लागली. ती खबर पुण्यास शिवाजीराजांना मिळाली. येताना शहाजीराजे जेजुरीस आले आणि शिवाजीराजे पुण्याहून तेथे आले. देवळात असणाऱ्या काशाच्या परातीत तूप घालून प्रथम त्यात पितापुत्रांनी एकमेकांचे मुख पाहिले. अशी ही ऐतिहासिक भेट जिथे झाली तोच हा जेजुरीचा गड !

जेजुरीचा हा खंडोबा म्हणजे महादेवाचा ज्येष्ठ पुत्र कार्तिकेय होय. त्याचं मूळचं नाव स्कंध. या स्कंधाचंच खंडोबा हे अपभ्रष्ट रूप होय. हा पूर्वी देवांचा सेनापती होता. त्यानं देवांच्या आज्ञेप्रमाणं असुरांशी युद्ध केलं आणि ते जिंकलंही. म्हणून युद्धदेवता हाही लौकिक खंडोबानं प्राप्त करून घेतला.

आपल्याकडील खंडोबा हा मद्रासकडील सुब्रह्मण्याचा अवतार आहे असे म्हणतात. सुब्रह्मण्याप्रमाणंच या खंडोबाला दोन बायका असून दोघांनाही मुरळ्या प्रिय आहेत.

वास्तविक खंडोबा हे मूळचं क्षत्रियांचं दैवत. पण त्याची पूजा धनगरांचेकडूनही केली जाते. त्याकारणानं जेजुरीच्या देवस्थानाला इंदूरच्या होळकर सरकारचं खास उत्पन्न आहे. शिवाय या खंडेरायाच्या म्हाळसा आणि बानू या दोघी बायकांपैकी बानू ही धनगराची मुलगी आहे.

खंडोबाची निवासस्थाने तशी अनेक आहेत. जेजुरी, निमगाव (पुणे), पाली-पेंबर (सातारा), नळदुर्ग व अणदूर (धाराशीव), शेगुड (नगर), सातारे (औरंगाबाद), मालेगाव (नांदेड), मैलापूर-पेंबर (बिदर), मंगसुळी (बेळगाव), देवरगुड्ड (धारवाड), मण्मैलार (बळ्ळारी), पाली (बीड), सोनई (नगर), साडेगाव (औरंगाबाद), शूंख (सातारा), पेनू गोंडे (अनंतपूर), पाटर (कडपे), कोंडबीडु (गुंटुर), वेमावर (गोदावरी), यादगिरी (रायचूर), देवर हिप्परगी (विजापूर), कारमणी (बेळगाव), अनेगुंदी (रायचूर), मैलारपटण (तुमकूर), कल्लुकोटे (शिरे), भवनदुर्ग (शिमोगे) इत्यादी. हा

महाराष्ट्र, कर्नाटक आणि तेलंगणमधील पसारा पाहिला म्हणजे खंडोबाला लोकदेव का मानलं जातं आणि त्याची लोकप्रियता किती आहे याचा अंदाज बांधता येतो.

भारतात दक्षिणेकडे खंडोबाच्या उपासनेचा प्रसार फार मोठा असून उत्तर भारतातही तो पसरत गेलेला आढळून येतो. मध्यप्रदेशात विलासपूर जिल्ह्यात मल्हार नावाचं एक गाव असून ते या मल्हारीवरूनच पडलं असावं असा अंदाज आहे. अनंतानंदगिरीच्या शंकरविजयावरून उज्जयिनीच्या वायव्येस मल्ल नावाचं एक गाव असून तिथं या मल्हारीचे उपासक रहात असत.

या खंडोबाची मल्हारी, मैलार, मैळाल, मैराळ, मार्तंड, मार्तंडभैरव, मल्लारि-मार्तंड, म्हाळसाकांत, खंडोजी, खंडेराया अशी अनेक नावे आहेत. या देवाला पुरणा-वरणाचा, कांद्या-वांग्यांच्या भरिताचा व कणकी-बाजरीच्या रोडग्याचा नैवेद्य विशेष आवडतो. कर्नाटकात पालखीच्या मिरवणुकीच्या वेळी पालखी-बरोबर गुडगुडीही नेतात.

खंडोबा हा वीरांचा देव आहे. त्याला दवणा, भंडारा, फार प्रिय आहे.

खंडोबाच्या चार हातांत खड्ग, त्रिशूल, डमरू व रक्त गळणाऱ्या मुंडासह पानपत्र असते. भैरव हे शिवाचं उग्र स्वरूप असल्यानं भैरवाचं मल्लारीत मूर्तिरूप देताना या देवतेच्या हातातील मुंड काढून टाकण्यात येते. मात्र कुत्रा त्याच्या सान्निध्यात जरूर असतो. अलीकडे सूर्याची उपासनाही या दैवताच्या उपासनेत जमा झाल्यानं मल्हारि-मार्तंड हे नाव या देवाला शोभून दिसतं. आज खंडोबाच्या देवळात नंदी, घोडा व कुत्रा यास उतरत्या क्रमानं महत्त्व प्राप्त झालेलं आहे. खंडोबाच्या देवळातील देवाचं सिंहासन खांब, देवपाट हे सारं काही चांदीच्या पत्र्यांनी मढविलं आहे. ही सकाम भक्तीची देवता आहे. नवसाला पावणारी. नाना फडणिसांनी नारायणरावाचा खून झाल्यानंतर 'त्याच्या पत्नीला मुलगा होऊ दे. तुला एक लाख रुपये वाहीन.' असा नवस केला. गंगाबाईला मुलगा झाल्यानंतर नानांनी एक लाख रुपये देवाच्या कारणी लावले. पंचवीस हजारांच्या चांदीच्या मूर्ती बनविल्या. दगडी मंडपी रुप्यानं मढविली आणि उरलेल्या रकमेत स्वयंभू लिंगावरील कवच, सोन्याचे मुखवटे अशी राजोपचारांची सामग्री केली.

जेजुरी नगरीमध्ये या कुलदैवताला प्रसन्न करण्यासाठी म्हणून काही अघोरी आचारही शंभर एक वर्षांमागे अमलात येत असत. या देवाचे वीर नावाचे काही उपासक मांडीवर तलवारीची जखम करून त्या रक्ताचा टिळा देवाला लावीत. देवरगुड्डु व मण्मैलार येथील कंचवीर आजही देवापुढं पिंढरीत अनुक्रमे पहार, चामड्याची दोरी व बाभळीची काटेरी फांदी खुपसून ती ओढून काढीत.



जेजुरी देवालयातील पिंडी

आजही मण्मैलार येथे लोखंडी पंचारतीचा खिळा मनगटात ठोकून देवाची आरती करतात. पाठीत किंवा मानेत गळ टोचून बगाडास टांगून घेण्याचा नवस सध्याही कुणी कुणी करतात म्हणे. त्यावरून हे दैवत अनार्य असावं असा तर्क केला जातो.

अशा या देवाची पूजा वाघ्या-मुरळींनी नेमकी कधी सुरू केली याचा नेमका पुरावा सापडत नसला तरी इ.स. १५१० मध्ये बंगाली वैष्णव साधू चैतन्य हा पुण्याला व जेजुरीला आला होता आणि त्यानं मुरळ्यांना काही उपदेश केला होता ही माहिती उपलब्ध झालेली आहे. यावेळी हा साधू कीर्तन करीत

असताना एक मुरळी त्याची शिष्याही झाली होती हे विशेष होय. या संदर्भावरून मुरळ्यांनी या देवाची पूजा बांधावी हा प्रकार फार जुना असावा असे दिसते.

मुरळी म्हणजे देवाला वाहिलेली मुलगी. फार पूर्वीच्या काळी स्वतःच्या पोटी मूलबाळ नसले म्हणजे श्रीमंत माणसे देवाला नवस बोलत असत व मूल झाल्यावर देवाच्या नावानं आपलं पहिलं मूल देवाला वहात असत! हे मूल मुलगी असेल तर मुरळी होत असे व मुलगा असेल तर वाघ्या म्हणून ओळखलं जाई. या मुलांना बहीण भाऊ या नात्यानं जगण्याची व अविवाहित रहाण्याची सक्त ताकीद दिली जाई. वाघाच्या कातडीच्या पिशवीतून भंडारा घालून गुरव ती पिशवी या मुलांना हळद लावून त्यांच्या स्वाधीन करीत असे.

खंडोबाची मुरळी, अंबाबाईची जोगीण, रवळनाथाची भावीण, भूतनाथाची नायकीण, महाबळेश्वराची कलावंतीण, दरीश्वराची वेसवी, गुईम्माची देवदासी, यल्लम्माची देवळी, धामव्वाची मातंगी, मारुतीची शरणी असे या देवदासींचे विविध प्रकार आहेत. त्याचप्रमाणे खंडोबाचा वाघ्या, अंबाबाईचा अराधी, धामव्वाचा पोतराज, यल्लम्माचा जोग्या इत्यादी देवीला वाहिलेल्या मुलग्यांचे प्रकार आहेत. सामान्यतः हे वाघ्या-मुरळी भंडारी, कुणबी, धनगर, नाईक, कोळी, बेरड, कवळीगार, यतळवार, महार, मांग, इत्यादी जातीतून आलेले आढळून येतात.

वाघ्या हा शब्द कानडीतील वग्गे म्हणजे भक्त या शब्दावरून आलेला आहे. मुरळीबद्दल जी जुनी पौराणिक कथा ऐकायला मिळते ती अशी :

'एकदा काय झालं की, भगवान श्रीकृष्ण बायाला भेटायला गेले व ते तर तिला भेटून आणि तिनं दिलेला विडा घेऊन परत जाताना ते आपली मुरली तिथंच विसरून गेले. त्यामुळ बायानं ही कुणाची कोण अशी आपल्या सखीजवळ चौकशी केली. तशी "असू दे कुणाची पण आण मी ठेवते." असं सांगून त्या बाईनं मुरलीला आपल्याजवळ ठेवून घेतली. पण बायाला ते पटलं नाही. ही मुरली जो विसरून गेला त्याचा काही हेतू असावा असा तिनं तर्क केला आणि तिच्यावर पांघरूण घालीत ती स्वतःजवळच ठेवून घेतली.

होता होता मग रात्र झाली. म्हणताना बायानं तिला विचारलं, "अग तू ग कोण? कुठून आलीस?" त्यासरशी मुरली माणसाचं रूप घेऊन उठली न् म्हणाली कशी, "मी इंद्राची दासी. स्वर्गलोकीची अप्सरा. माझ नाव तिलोत्तमा. नृत्य अगर गायनकलेत माझी कुणी बरोबरी करणार नाही. असा माझा गर्व. म्हणून एक दिवस मी इंद्राकडे गेलेच नाही. म्हणताना त्यानं मला शाप दिला की, 'तू पृथ्वीवर जाशील पण इथल्याप्रमाणं तिथं नाच-गाण्यातील तुझं कौशल्य रहायचं नाही. कपटयुक्त गाण्यानं तू दुसऱ्याच्या बायकांना तिसऱ्यासाठीच फसवशील.'

त्यामुळं मी देवापुढं पदर पसरला. काही झालं तरी मी आपली दासी आहे" म्हणाले आणि शापमुक्त केव्हा होईन ते विचारलं. तशी इंद्रदेव म्हणाले, "कृष्णावतारात तू मुरलीच्या रूपानं त्याची सखी होशील. अनेक स्त्रियांचं हरण करण्यास तुझा त्याला उपयोग होईल. दूती होऊन मग तू बाणाजवळ जाशील तेव्हा माझ्या नवऱ्याच्या अंगणात मुरली होऊन तू नेहमी नाचत रहाशील असा ती तुला शाप देईन." तेव्हापासून मुरली होऊन मी नाचतेय.

माझं पहिलं नाव वंशवाद्य. कृष्णाच्या अधरप्राशनानं मी स्त्री झाले. बांबूची केली म्हणून मी बन्सी. मुराचा लय करण्याच्या हेतूनं तयार झाले म्हणून मी मुरली आणि आता शापामुळं झाले खंडोबाची मुरळी.'

देवापुढं नृत्यगीतांचा साज चढविताना वाघ्या-मुरळी अनेक प्रकारची गाणी म्हणतात. अशा वेळी मानवी जीवनातील बहुतेक सर्व प्रसंग या ना त्या रूपानं त्यात गोवले जातात. त्यांपैकी उदाहरणादाखल म्हणून खंडोबाच्या लग्नाचं एक गीत असं आहे—

**नंद पालिमधी ग म्हाळसा**
**देव मल्हारी देव मल्हारी**

**चालले देव लग्नाला**
**निघाली स्वारी निघाली स्वारी**

**सटी लागलं ग तेल मार्तंडाला**
**जिजिबाई कुरवली आली**

**हळद लागली अंगाला**
**धाडिल्या लगीनपत्रिका भक्तजनांला**

**पुशिनीच्या पूर्णिमेला यावे लग्नाला**
**चहूकडे केली ताकीद गोरगरिबांला**

**शुद्ध मृग नक्षत्राच्या दिवशी हो**
**यावे लग्नाला यावे लग्नाला . . .**

अशा गीतांच्यामुळं गीतकारांनी देवाशी मोठी जवळीक निर्माण केली आहे. त्यामुळं अखंड भंडाऱ्यानं डवडवलेल्या कायेच्या ह्या देवाची कीर्ती किती म्हणून वर्णन करावी याचं भान कुणालाच उरलेलं नाही. या थाटाची किती तरी गाणी ह्या वाघ्या-मुरळींनी गाऊन या मराठी देशाचं राऊळ घुमवलं आहे.

या गडजेजुरीच्या मुरळींची नीतिमत्ता ढिली होऊ नये व त्यांचे हातून बदफैलीपणा वाढीस लागू नये म्हणून सरकारनं १९३४ साली दि बॉम्बे देवदासी प्रोटेक्शन ॲक्ट नावाचा कायदा पास केला आणि काही दुरुस्त्या जोडून १९५० मध्ये त्यास कायमची मान्यता देऊन टाकली. त्यामुळं अलीकडच्या काळामध्ये

नव्यानं कुणी मुली मुरळी झाल्याचं आढळून येत नाही. म्हणून ज्या कुणी जुन्या काळच्या मुरळचा असतील त्याच देवापुढं नाचगाणं करताना दिसून येतात.

मुरळचांना अशी बंदी घालण्याचा प्रयत्न औरंगजेबानं प्रथम औरंगाबाद-जवळच्या सातारे गावी केला आहे असं ऐतिहासिक कागदपत्रांवरून आढळून येतं. स्त्रीजीवनाला सामाजिक स्थैर्य प्राप्त होण्याच्या दृष्टीने देवाला मुली वाहाण्याची प्रथा कायद्यानं बंद झाली ही फार चांगली गोष्ट झाली खरी. परंतु त्यामुळं अशा नृत्यगीतात पारंगत अशा चांगल्या मुरळीला व त्यायोगे वाघ्या-मुरळींच्या उत्तम व विलोभनीय लोकनृत्याला गडजेजुरीसह मराठी मुलूख मुकला ही गोष्ट नाकबूल करून चालणार नाही.

एकनाथमहाराजांनी जेजुरीच्या परिसरातील वाघ्या-मुरळींच्याबद्दल म्हटलं आहे की——

**वारी वारी वारी**
**देई का गा मल्हारी**
**त्रिपुरा हरी तुझे वारीचा मी भिकारी**
**वाहन तुझें घोड्यावरी**
**आवडी ऐसी पाहीन जेजुरी**
**वाहन तुझें घोड्यावरी**
**वरी बैसली म्हाळसा सुंदरी**
**वाघ्या मुरळी नाचती परोपरी**
**आवडी ऐसी पाहीन जेजुरी**
**ज्ञान कोटंबा घेऊन आली द्वारीं**
**बोध मंडाळबा लावीन परोपरी**
**एका जनार्दनीं विनवी श्रीहरी**
**वारी देऊनी प्रसन्न मल्हारी**

म्हणजे हळदीच्या गाभ्यागत मराठी माणसाचं मन प्रसन्न करणाऱ्या आणि सर्वांचं हरएक प्रकारे कल्याण चिंतिणाऱ्या येळकोटानं जुन्या काळचा मराठी मुलूखही जिंकला होता. एवढंच नाही तर पिढ्यान्‌पिढ्यांनी भुलून जावं अशा या गडजेजुरीच्या धन्याच्या कथाही ऐकवून त्या वेळच्या सामान्य मंडळींच्या जीवनात अद्‌भुत रसाची न् शृंगाराची अपूर्वाई आणून सोडली होती. तर त्या संदर्भात बोलायचं म्हणजे जाता जाता मल्हारीच्या लाडक्या बानूची गोष्ट सांगितल्याशिवाय जेजुरी गडावरच्या मल्हारीरायाच्या निशाणाला डामडौलानं भाडभाड करीत मिरवायची लहरच येणार नाही!

'तर एकदा काय झालं की, देवांचा राजा इंद्रदेव आपल्या दरबारात

 बसलेला. त्याला सात मुली. त्याला त्या आल्या भेटायला. म्हणताना इंद्रदेवानं

त्यांना विचारलं, 'बाई तुमी कुणाच्या कोण?' तशी सगळ्याजणी बोलल्या, 'देवा, आमी तुमच्या लेकी.' मग इंद्रदेवानं पुन्हा म्हटलं, 'तुमी कोणावर अवलंबून?' म्हणताना सातवी सोडून सगळ्याजणी म्हणाल्या की, 'तुमच्यावरच.' पण सातवी बरीक धीटपणानं बोलली, 'मी आपली स्वतःवर अवलंबून! मी माझ्या जीवावरच जगीन.' त्यासरशी इंद्रदेवाला राग आला न् त्यानं ह्या पोरीला शाप दिला. ही मुलगी चार महिन्यांचं पोर झाली न् मुठी चोखीत पडली. इंद्रानं तिला एका चंदनाच्या पेटीत घातली न् ती पेटी मोहोरबंद करीत एका जासुदाच्या हाती दिली. चंदनपूरच्या जंगलात नेऊन सोडून दे जा म्हटलं. जासूद हुकमाचा धनी. तो पेटी घेऊन गेला पण त्याला दया आली. सोन्यासारख्या पोरीला टाकावी कशी? त्याला कोडं पडलं. म्हणताना मग त्यानं मेंढरं चारायला आलेल्या धनगरांचा कानोसा घेत ती पेटी चंदनपूरच्या जंगलात नेऊन ठेवली. धनगरांची त्या पेटीवर नजर गेली. सगळेजण धावले. ढोल लेझीम दणाणलं. नमन आरती झाली. देवाची पूजा झाली न् मग भक्तिभावानं ती पेटी त्यांनी उघडली. बघतात तर आत हिरे, माणिक, सोनं, नाणं, मोती,

दीपमाळा : जेजुरी



पोवळी नव्हती! तिथं एक गोजिरवाणं गोरंगोमटं गुटगुटीत बाळ होतं! त्या बाळाच्या तेजानं बघणारांचे नेत्र दिपले. देवाची देणगी म्हणून मग एका धनगरानं त्या पोरीला आपल्या घरी नेलं. तिथं बाळाचं नाव ठेवलं बानू न् मग ती तिथंच लहानाची मोठी होत गेली.

'होता होता मग अशीच बारा वर्षं आली न् गेलीही. धनगरांनी बानूच्या लग्नाचा विचार काढला. पण ती म्हणाली कशी, "मी शंकराची पूजा करते. माझी काळजी करू नका." या उप्पर तिनं एक चित्तानं, एक दिलानं, बारा वर्षं शंकराची पूजा केली. तशी शंकर तिच्यावर प्रसन्न झाला. वर मागून घे म्हणाला. ती मग हळूच बोलली, "चांगला नवरा दे देवा." शंकरानं "बराय" म्हटलं. आणि तिला सांगितलं, "समोरच्या खडावावर उभी रहा. माझं नाव घे. मग तुला पाहिजे तिथे तू जाशील. पाहिजे तो नवरा मिळेल." बानूला आनंद झाला. ती त्या खडावावर उभी राहिली. त्यासरशी तिला घेऊन ते खडाव आभाळात उडाले आणि गडजेजुरीला घेऊन आले! त्यावेळी म्हाळसा न् मल्हारी रंगमहालात सारिपाट खेळत बसलेवते. बानूनं ते पाहिलं. पदर फाडला. नेत्रीचं काजळ घेतलं. त्यावर मल्हारीला निरोप लिहिला आणि आपल्या घरी निघून आली.

'बानूच्या अक्षरानं न् निरोपानं मल्हारी वेडा झाला. म्हाळसाला विसरावं म्हणाला. मग त्यानं युक्ती केली. सारिपाट खेळताना म्हाळसाला जिंकून तो अटंग्या वनात निघून गेला. शिकारीचं निमित्त केलं. वेष बदलला. आणि सहासातशे मेंढरं एकटा वळीत बानूच्या घरी नोकर झाला!

'एकदा मग त्यानं गंमत केली. एका दमात सगळी मेंढरं काढली सोलून! हाडाचे न् मासाचे वेगळे ढीग रचले! रक्तांचे पाट वाहिले! ते बघून बानूला भयंकर राग आला. फडाफडा ती त्याला बोलली. होतं तस्सं सगळं कर म्हणाली. मग हा म्हणतो कसा, "करीन पण माझी बायको झालीस तर!" आता काय करावं? बानूचा तर मेंढरांच्यावर भारी जीव पण ह्या भुताशी कोण लगीन करील? बानू कोड्यात पडली. म्हणताना होय नाही करीत तिनं ह्याला लगीन करीन असं म्हटलं! त्यासरशी मेंढरं होती तश्शी झाली न् खंडेरायानं पण आपलं मूळ रूप धारण केलं! बानूला मग ब्रह्मानंद झाला. खंडोबानं तिला आपल्या घोड्यावर उचलून घेतली न् तो थेट जेजुरीला निघून आला. तिथं म्हाळसानं हे पाहिलं मात्र-न् ती एकदम शिळा होऊन कोलमडत पल्याड जाऊन पडली. ह्या दोघांनी मग सुखानं राज्य केलं. पण बानूचा सवता सुभा खंडोबानं मांडला न् भक्तांच्या दर्शनासाठी जेजुरी गडावर स्वतः एकटाच राज्य करीत बसला.'



# मल्लारी-मैलार-खंडोबा

लेखक : **श्री. ग. ह. खरे**

खंडोबा हे महाराष्ट्रातील तिसरे प्रसिद्ध दैवत आहे. याची भक्ती केवळ मराठी प्रदेशातच चालते असे नसून कर्नाटक, आंध्र व काही अंशी तामिळनाड या प्रदेशांतही चालते. खंडोबाचे भक्त पुष्कळ असल्याने याची प्रतीकात्मक स्थानेही पुष्कळ झाली आहेत. लहानसहान स्थाने तर शेकडो आहेत. पण ज्या ठिकाणी ५०,००० वा त्याहून अधिक यात्रा सालोसाल जमते अथवा कागदपत्र, ताम्र-शिलासने, ग्रंथ इ.च्या आधाराने ज्यांचा काल फार जुना असल्याचे ठरते, अशी या देवतेची आज महाराष्ट्र व कर्नाटक यांत मिळून अकरा प्रख्यात स्थाने आहेत :

१. कडे–कऱ्हे पठार–जेजुरी
२. निमगाव–दोन्ही [पुणे जिल्हा]
३. शेगुंड–[अहमदनगर]
४. सातारे–[औरंगाबाद]
५. नळदुर्ग–धाराशी [उस्मानाबाद]
६. पाली–पेंबर [सातारा]
७. मंगसुळी–[बेळगाव]
८. मैलारलिंग–[धारवाड]
९. मैलार–देवरगुड्ड [धारवाड]
१०. मैलार किंवा मण्मैलार–बळ्ळारी
११. मैलारपूर–पेंबर [बिदर]

### जेजुरी

सर्वत्र सामान्य समजूत प्रचलित आहे ती अशी की, वरील अकरा स्थानांत आद्य किंवा अधिक महत्त्वाचे स्थान जेजुरी हे होय. जेजुरी निदान इतर

कोणत्याही स्थानाइतकेच महत्त्वाचे स्थान आहे असा तरी समज आहेच आहे. पण खुद्द जेजुरीस मात्र अशी भावना आहे आणि तीस कागदपत्रांचा पुरावाही आहे की, खंडोबाचे मूळ स्थान कडे–कन्हे पठार असून भक्तांस तेथे जाणे अधिक श्रमाचे वाटू लागल्याने देव अलीकडे व सहज जाता येईल अशा जेजुरीच्या टेकडीवर आला.

जेजुरी हे गाव पुण्याच्या आग्नेयेस सुमारे ३० मैलांवर जुन्या पुणे-सातारा रस्त्यावर आहे. पुण्याहून येथे जाण्यास आगगाडी व एस. टी. अशा दोन्ही प्रकारच्या सोयी आहेत. पुणे-सातारा रस्ता जेजुरी गावातून जात असून आगगाडीच्या स्थानकापासून हे गाव सुमारे एक मैल दूर आहे. स्थानकावरून गावात जाण्यास गाडी, छकडा असे वाहन मिळू शकते. येथे आषाढ ते आश्विन हे चार महिने सोडून बाकीच्या आठ महिन्यांत माणसी चार आणे कर द्यावा लागतो. दर्शनास येणारा यात्रेकरू सामान्यतः एक दिवसात आपली यात्रा आवरीत असल्याने त्यास धर्मशाळा इत्यादी ठिकाणी उतरण्याची आवश्यकता भासत नाही. तो आपला वेळ खंडोबाच्या देवळात बसून काढू शकतो. गावात पाण्याची मात्र खूपच अडचण आहे.

येथे कडे–कन्हे पठार व किल्ला–कोट अशा दोन ठिकाणी खंडोबाची स्थाने आहेत. पैकी कडे पठार हे अधिक जुने असल्याची समजूत आहे. हे जेजुरीच्या नैऋत्येस सुमारे चार मैलांवर अजमासे ८०० फूट उंचीच्या डोंगरावर आहे. जेजुरीच्या पश्चिमेस सुमारे मैल दीड मैल पाऊलवाटेने गेल्यावर आपण एका उंच टेकडीच्या पायथ्याशी असलेल्या ओढ्याजवळ पोचतो. तेथे एक तुळशी-वृंदावन आहे. तेथून कच्च्या दगडी पायऱ्यांची वाट सुरू होते. हिने सुमारे अर्धा तास डोंगर चढून गेल्यावर आपण खंडोबाच्या मंदिरापाशी पोचतो. हे मंदिर पूर्वाभिमुख असून त्याचे सोपा, मंडप व गाभारा असे तीन भाग आहेत. सोपा तिकमानी असून त्यातून मंडपात जातात. मंडप अष्टकोणी असून चार मुख्य दिशांस भासमान तर उपदिशांस खोल व टोकदार अशा कमानींनी बनलेला आहे. गाभारा साधारण चौरस असून त्यात पश्चिमेच्या भिंतीत मध्यभागी एक देवळी आहे. तीमध्ये काळ्या पाषाणाची तीन फूट व एक फूट दहा इंच उंची-रुंदीची एक आसनमांडी घातलेली मूर्ती असून तिच्या बैठकीच्या उजव्या-डाव्या अंगास मणी व मल्ल यांची मुंडे दाखविली आहेत. याच्या चार हातांत खड्ग, त्रिशूल, डमरू व परळ अशा वस्तू आहेत. पैकी केवळ परळ अंगचा व दगडी असून खड्ग लोखंडी आणि त्रिशूल व डमरू पितळी आहेत. याच्या दोन्ही बाजूंस दोन उभ्या दगडी त्रिमूर्ती असून त्यास बाळाई व जोगेश्वरी असे म्हणतात.


या कमानीसमोर जमिनीवर दोन स्वयंभू, खडबडीत, अनियमित आकाराची

लिंगे असून त्यांपैकी एक खंडोबाचे व दुसरे म्हाळसेचे अशी समजूत आहे. शिवाय एक खंडोबाची व एक म्हाळसेची अशा दोन उभ्या पितळी मूर्ती आहेत. खंडोबाच्या चार हातांत खड्ग, त्रिशूल, डमरू व अंगचा परळ अशा वस्तू आहेत. म्हाळसेच्या उजव्या हातात कमलकलिका असून डावा हात गजहस्त मुद्रेचा आहे. घोडा व कुत्रा यांचा या शिल्पात समावेश नाही. येथे एक पितळी कुत्रा आहे; पण त्याचा या मूर्तीशी संबंध नाही. मंदिरासमोर पितळी पत्र्याने मढविलेले फार मोठे कासव असून त्याचा उपयोग रंगशिलेप्रमाणे देवाच्या रंगभोगासाठी करतात.

कासवाच्या पूर्वेस एका दगडी मेघडंबरीत दोन नंदी व तीन मारुती आहेत. या मंदिराच्या उत्तरेस बऱ्याच अंतरावर हेगडी प्रधानाची देवळी आहे. याची मूर्ती आसनमांडी घातलेली व आपले दोन्ही हात गुडघ्यावर ठेवलेली, पण उजव्या हातात काही वस्तू धारण करणारी आहे. याशिवाय येथे पंचलिंगेश्वर, राम व हेगडी यांची देवळे आहेत. राम मंदिरातील लेखात रामचंद्र मल्हार ढगे जोसी, बायजाबाईचे जेऊर यांनी ते देऊळ हेमलंबी ज्येष्ठ कृष्ण १३ भृगुवार श. १७१२त बांधले असा निर्देश आहे. या कालनिर्देशात काही तरी चूक झाली आहे. दुसरा हेगडी पहिल्या हेगडीप्रमाणेच पण उजव्या हातात तलवार घेतलेला आहे.

कडे पठारावरून पूर्व व ईशान्य दिशेच्या सुमारास सरळ चालत आणि सात वेशी व कित्येक पायऱ्या उतरून आलो असता जेजुरीच्या खंडोबाचे सध्याचे टेकडीवरील देवालय लागते. याचा प्राकार सर्व बाजूंनी बांधून काढला असून त्यात एका किंवा दोन्ही बाजूंनी अंशतः उघड्या अशा ६३ ओवऱ्या आहेत. सर्वसामान्य लोक यास गड–कोट–किल्ला असेही म्हणतात. प्राकाराला तीन दरवाजे आहेत. कऱ्हे–कडे पठाराकडून येणारा पश्चिम दरवाजाने आणि गावातून येणारा उत्तर दरवाजाने प्राकारात येतो. पूर्व दरवाजा सध्या बंद असतो. पण त्या दरवाजाने येण्यासाठी खालपासून वरपर्यंत पायऱ्या असल्याने एके काळी त्या दरवाजाने वावर होत असावा. आजकाल यात्रेकरू गावातूनच येतात. इकडून–उत्तर दरवाजाने येणारास देवालयाच्या प्रांगणात येण्यासाठी सुमारे ३८५ पायऱ्या चढाव्या लागतात. या पायऱ्यांच्या दोन्ही अंगांस मिळून शेकड्यांनी मोजण्याइतक्या लहानमोठ्या व अस्ताव्यस्त उभारलेल्या दीपमाळा आहेत. उत्तरेच्या दरवाजावरच देवाचा नगारखाना आहे. या दरवाजाने आत शिरताच पूर्वाभिमुख देऊळ व त्यासमोर असलेले वीस फूट व्यासाचे आणि पितळी पत्र्याने मढवलेले कासव लागते. याचा रंगशिलेप्रमाणे देवाच्या रंगभोगासाठी उपयोग करतात. या देवळाचे सोपा किंवा देवड्या, मंडप व गाभारा असे तीन भाग आहेत. याची रचना अगदी साधी, वैशिष्ट्यरहित आहे. सोप्यात एक देशी व एक

पोर्तुगीज अशा दोन घंटा आणि चार फूट लांब व चार इंच रुंद पात्याचा एक देवाचा खांडा अशा वस्तू आहेत. गाभाऱ्यात एक चौरस मेघडंबरी असून तिच्या खाली एका चौकोनी योनीमध्ये खंडोबा व म्हाळसा यांची दोन स्वयंभू लिंगे आहेत. त्यावर रुप्याची आच्छादने व मुखवटे घालतात. मेघडंबरीच्या पश्चिमेस खंडोबा व म्हाळसा यांच्या उभ्या मूर्तींचे तीन जोड आहेत. पैकी डावीकडून पहिला व दुसरा चांदीचे तर तिसरा पितळी किंवा नीरस सोन्याचा आहे. या तिन्ही जोडांची घडण साधारण एकसारखीच आहे. पण उंचीने मधला लहान व कडेचे सारखे आहेत. खंडोबाच्या चार हातांत खड्ग, त्रिशूल, डमरू, परळ या वस्तू असून परळ अंगचा व बाकी वस्तू सुट्या आहेत. तीनही म्हाळसांच्या उजव्या हातांत अनुक्रमे उत्पल, कमलकलिका व उत्पल, अशा वस्तू असून डावे हात गजहस्त मुद्रेचे आहेत. दुसऱ्या जोडातील खंडोबाच्या हातात परळाशिवाय इतर वस्तू नाहीत. खंडोबा शिवाचा अवतार असल्याने त्याच्या कानांत खरोखर अहि (सर्प) कुंडले असावयास पाहिजेत. पण येथील तिन्ही खंडोबांच्या कानांत मकरकुंडले आहेत. म्हाळसेच्या कानांत कर्णफुले, बुगड्या, इत्यादी दागिने आहेत. डावीकडील पहिल्या जोडातील खंडोबाच्या पायाजवळ, पण किंचित पुढे, बाणाईचे स्वयंभू लिंग व त्यावर मुखवटा आहे. हे लिंग सनदशीर नाही किंवा मागाहूनची कल्पना आहे हे त्याच्या स्थानावरून स्पष्ट होते. पहिल्या जोडाच्या प्रभावळीच्या पाठीवर 'वा (वजन) तोळे १५६१॥' असा लेख आहे. मधल्या जोडास रुप्याची पाटी आहे. तीवरून तो जोड श. १८५४मध्ये साताऱ्याच्या छत्रपति-वंशजांनी अर्पण केलेला दिसतो. तिसऱ्या जोडाच्या प्रभावळीच्या पाठीवर लेख आहे. या लेखावरून वंशावळ समजते ती अशी : १. मालोजी भोसले, २. शहाजी, ३. येकोजी दीपांबिका, ४. शाहजी, ५. शरीफजी = शरभोजी, ६. तुकोजी. यांपैकी शरभोजी किंवा शरीफजी याने या मूर्ती देवळात स्थापिल्या. येकोजीच्या पासूनचे राजे तंजावरास राज्य करीत होते. शरभोजीचा काळ इ.स. १७११ ते १७२७ हा असल्यामुळे प्रस्तुत जोड या काळात केव्हा तरी जेजुरीस आला असे दिसते. पुणे गॅझेटियरमध्ये (१८८५ची आवृत्ती, ३रा खंड) येथील तीन जोडांचे वर्णन एक पवारांनी दिलेला सोन्याचा, एक पेशव्यांनी दिलेला रुप्याचा व एक पाषाणाचा असे केले आहे. याचा अर्थ त्या तीन जोडांपैकी सध्या एकच काय तो येथे उरला आहे. सोन्याचा होता तो १९४२च्या आंदोलनात बहुधा चोरीला गेला. तिसऱ्या पाषाणाच्या जोडाचा आज तरी पत्ता नाही. या जोडांच्या मागे एक रुंद देवळी असून तीमधील कट्ट्यावर आसनमांडी घातलेली खंडोबाची दगडी चतुर्भुज मूर्ती आहे. हिच्या हातात नेहमीप्रमाणे खड्ग, त्रिशूल, डमरू व परळ या वस्तू होत्या. पैकी परळ दगडी व अंगचा असून बाकी त्रिशूल व डमरू पितळी

आहेत आणि खड्ग हरवले आहे. याच्या दोन्ही अंगांस दोन दगडी पुतळ्या असून त्यांस जोगेश्वरी म्हणतात. खंडोबाच्या बैठकीवर उजवीकडे सूक्ष्म पण वामावर्ती घोडा काढला आहे. मंडपात दोन घोडे असून एकावर खंडोबा आहे आणि दुसरा मोकळाच आहे. कडे पठार व जेजुरी येथील दगडी व धातूंच्या मूर्ती पाहिल्या आणि त्यांमधील एकरूपतेची लक्षणे विचारात घेतली तर या सर्व मूर्ती भैरवाच्या किंवा घोड्यामुळे मार्तंडभैरवाच्या ठरतात याविषयी शंका नाही. भैरवाबरोबर सामान्यतः कुत्रा असतो आणि मार्तंड-भैरवाबरोबर घोडा व कुत्रा असावयास पाहिजेत. पण येथे दगडी मूर्तीच्या बैठकीवर घोडा काढला आहे. आणि पितळी जोडापाशी कुत्रा ठेवलेला असतो. मूर्तीच्या तपशिलाबाबत उणिवा दिसतात याचे कारण या सर्व मूर्ती अलीकडच्या काळातील म्हणजे सुमारे २-३शे वर्षांतील आहेत हे होय. एक जोड तर २५ वर्षांपूर्वीचाच आहे. मूर्ती जुन्या असत्या तर घोडा व कुत्रा हा तपशील अवश्य सापडला असता.

देवळाच्या प्राकारात पण साधारणतः देवळाच्या समोर बगाड लावण्याची एक मंडपी असून तिच्या माथ्यावर बगाडाचा खांब आहे. या मंडपाच्या पूर्वेस ओवरीस टेकून मणिमल्लाची एक दगडी मूर्ती आहे. मुख्य मंदिराच्या मागे तुळजा भवानी, पंचलिंगेश्वर, भंडारगृह इत्यादींच्या देवळ्या आहेत. पैकी तुळजा भवानी म्हणजे एक चतुर्भुज बैठा पुरुष असून त्याच्या चार हातांत भूमिस्पर्श, खड्ग, चक्र, परळ या मुद्रा व वस्तू आहेत. उत्तर बाजूने वर येताना मध्येच वाटेला दोन फाटे फुटतात व काही अंतरानंतर ते पुनः एकत्र मिळतात. डाव्या फाट्याने वर जाताना प्रधान व हेगडी यांच्या आणि उतरताना डाव्या फाट्यावर खंडोबाची उपस्त्री बाणाई हिची अशा देवळ्या लागतात. गावाच्या आग्नेयेस दुसऱ्या बाजीरावाचे तळे व त्याच्या खाली मल्हारतीर्थ आणि वायव्येस लवथलेश्वर व मल्हार गौतमेश्वर ही मंदिरे आणि एक मोठा जलाशय आहे.

देवाची प्रतिदिनी पहाटे, दोन प्रहरी व रात्री अशी तीन वेळा पूजा होते. पहाटे इतर देवांस धुपारती नसते. फक्त दुपारच्या पूजेच्या वेळी धुपारती बाणाई व हेगडी (उत्तरेच्या पायऱ्यांवर असलेल्या देवता) यांजकडे नेऊन आणतात. शनिवारी व रविवारी रात्रीचीही धुपारती यांजकडे नेतात. इतर दिवशी रात्रीची धुपारती फक्त किल्ल्यातील देवाकडे जाते. नवरात्रात मंगळवारी व शुक्रवारी किल्ल्याच्या कोपऱ्यांत फिरंगाई आणि पिंगळा अशी स्थाने आहेत तेथेही धुपारती नेतात.

येथे चैत्र, पौष व माघ या तीन महिन्यांत शुद्ध १२ ते वद्य १ प्रत्येकी पाच दिवस, मार्गशीर्ष शुद्ध १ ते ६ दिवस, सोमवती अमावास्या आणि आश्विन 

शुद्ध १ ते १० दिवस उण्या-अधिक प्रमाणात यात्रेचे समजले जातात. सोमवती अमावास्येस देव पालखीत बसून कऱ्हा नदीवर स्नानास जातात व परत येतात. आश्विन महिन्यात नवरात्र बसते आणि दसऱ्याचे दिवशी कऱ्हे पठार व कोट येथून परस्परांस भेटण्यासाठी देवांच्या पालख्या निघतात. भेटीच्या जागेस रमणा म्हणतात. तेथे भेट झाल्यावर पुनः स्वस्थानी येतात. शिवाय प्रत्येक आश्विनी शनिवारी रात्री देवास दुधाचा अभिषेक व जागरण असते. मार्गशीर्ष शुद्ध १ ते ६ पुनः घटस्थापना करतात. शुद्ध पंचमीस रात्री भाविकांनी शक्यतेनुसार तेल घातलेला एक हंडा मिरवणुकीने देवाकडे आणून तो त्यास अर्पण करतात. त्यास तिळवणाचा हंडा म्हणतात. षष्ठीचे दिवशी यात्रेकरू आपापल्या पद्धतीने निरामिष किंवा सामिष आहाराचा नैवेद्य दाखवितात. सामिष नैवेद्य कोटात आणीत नाहीत. निरामिष नैवेद्यात कांद्याचे भरीत व रोडगा हे पदार्थ मुख्य असतात. या दिवशी पूर्वी सेवेकऱ्यांपैकी वीर किंवा आणखी कोणी आपल्या मांडीत मोगरी किंवा तलवार मारून आलेल्या रक्ताचा टिळा देवास लावीत. आता ती प्रथा नाही. या दिवशी हाळ (विस्तवाने भरलेला चरा) वरून चालण्याचाही प्रघात होता. आता तोही बंद पडला आहे. पौषी व माघी पौर्णिमांच्या यात्रांसाठी वऱ्हाड, खानदेश, कोकण इत्यादी सर्व भागांतून उपासक येतात. या वेळी अनेक गावांहून काठ्या (सर्वभर लाल पागोटे गुंडाळलेले उंच कळक) येतात. यात खैरे, होलम व होळकर यांच्या काठ्या मुख्य आहेत. वद्य द्वितीयेस या काठ्या मिरवणुकीने कोटात येतात आणि शिखरांस स्पर्श करून आपापल्या गावी परत जातात. या सर्व यात्रांत एळकोट, चांगभले, सदानंदाचा एळकोट इत्यादी अनेक जयघोष करून भंडार व खोबरे उधळतात.

या देवाचे दोन प्रकारचे भक्त किंवा उपासक आहेत. एक म्हणजे स्वयमुपासक व दुसरे धंदेवाईक उपासक. यांना घरवाघे व दारवाघे म्हणतात. घरवाघे नवस फेडीपुरते वाघे बनतात. म्हणजे वाघ्याचा पोषाख वस्तू, शस्त्रे, वारी, मागणे इत्यादी आचार करतात आणि दारवाघे भीक मागून किंवा मोलाने उपासकाची देवसंबद्ध कामे करितात. वाघ्याप्रमाणेच कामे करणाऱ्या स्त्री उपासिका त्या मुरळ्या. वाघे बनण्याची पद्धती अजून चालू आहे. मुरळी बनण्यास कायद्याने बंदी घातल्याने आता मुरळ्या नव्याने क्वचितच होत असतील. घरवाघे कोणत्याही जमातीमधील असू शकतात. दारवाघे मात्र ब्राह्मण जमातीखेरीज इतर जमातींमधले असतात. उपासक व नवसे ठरविलेली कृत्ये आपापल्या जमातीच्या वाघ्याकडून करवितात आणि स्वतः करण्यासारखी स्वतः करतात. यांची लग्ने स्वजातीय स्त्रियांशी होतात. त्यांची प्रजा वाघेच समजली जाते असे नाही. मुरळ्यांची मात्र लग्ने होत नाहीत. त्या रक्षा किंवा वेश्यांप्रमाणे आपले जीवन

जगतात. आपल्याकडील वाघ्या-मुरळ्यांचे स्वतंत्र पोशाख नाहीत. पण कर्नाटकात वाघे अंगावर घोंगडीची कफनी घालतात. वाघ्याबरोबर सामान्यत: भंडार (हळदीची पूड) ठेवण्यासाठी पूर्णत: किंवा अंशत: व्याघ्रचर्माची पिशवी, धातूचे किंवा लाकडी भिक्षापात्र (कोटंबा किंवा दोणी), गाठा (रुपे, कातडे, वाख इत्यादींची आसुडासारखी दोरी), दिवटी व तेलाची बुधली, ध्वज (पताका), पोवते (हळदीने पिवळी केलेली व गळयात बांधावयाची दोरी), घोळ (अंगुलित्राण असलेल्या तलवारीच्या मुठीसारखे पण त्यात कड्या घातलेले एक वाद्य), शंख किंवा डमरू, शूल किंवा त्रिशूल, या वस्तू असतात.

खंडोबा ही सकाम भक्तीची देवता आहे असे म्हणण्यास हरकत नाही. अर्थात कोणत्या कामनापूर्तीचा नवस देवाला करावयाचा याचा नेम नाही. पूर्वी मुलासाठी नवस करणारे, दोन मुले होताच पहिले मूल मग ते पुरुष असो वा स्त्री असो देवास अर्पण करीत. हीं मुले पुढे वाघ्या, मुरळी बनत. आता असा नवस सहसा कोणी करीत नाही. सध्याचे नवसाचे प्रकार असे—कामनापूर्ती होण्यासाठी खेटे (विशिष्ट कालमर्यादेत नियमित कालाने देवदर्शनास येणे) घालतात आणि कामनापूर्ती झाल्यावर पुढील आचारांपैकी एक किंवा अधिक प्रकारांनी नवस फेडतात. कावडी घालणे (नियत संख्येच्या पाण्याच्या कावडी देवास वाहणे), जागरण (पाच उसांच्या मखरात प्रतीकात्मक देवस्थापना करून वाघ्या-मुरळीकडून देवाची गाणी म्हणविणे), तळी भरणे—उचलणे, दहीभाताची पूजा देवास बांधणे, भरीत, रोडगा व पुरणवरण किंवा मांसाचा नैवेद्य करून ब्राह्मण, गुरव, वाघ्या, मुरळी यांस भोजन घालणे, बगाड (मानेस किंवा कमरेस) गळ टोचून घेऊन तशा स्थितीत एका उंच सोटावर बसविलेल्या लाकडास टांगून घेऊन देवास प्रदक्षिणा घालणे, मुलाची कानटोचणी, जावळ, शेंडी इत्यादी कृत्ये करणे, लंगर (लोखंडी साखळदंड) तोडणे, वारी (देवाच्या नावाने भीक) मागणे, वास्तू (दीपमाळ, पायरी, देवळी, ओवरी) उभारणे, हाळावरून चालणे (विस्तवाने भरलेल्या चरातून चालणे) इत्यादी. यांपैकी लंगर तोडणे, जागरणे, इत्यादी आचार वाघ्या-मुरळी किंवा इतरांच्याकडून तर वारी, बगाड, इत्यादी स्वतःच करावयाचे असतात. बगाडास सध्या फार सौम्य रूप आले आहे.

शिवचरित्रसाहित्य खंड १, २, ३ व ५ यांत जेजुरीच्या पुजाऱ्यांकडे मिळालेले काही कागद प्रकाशित झाले आहेत. त्यांवरून पुजाऱ्यांचे उत्पन्न, गुरवांचा तंटा, जेजुरीच्या ज्योतिष-कुलकर्ण्याची हकिगत, इत्यादी विषयांची माहिती कळते.

जेजुरीचे मंदिर, पायऱ्या व गावं यांत शिलालेख पुष्कळ आहेत. पण प्राय: देवळाचे बांधकाम किंवा मूर्तीची घडण याविषयी ते असल्याने त्यांतून देवतेसंबंधी इतिहास दृष्टया महत्त्वाची माहिती मिळत नाही. म्हणून त्यांचे केवळ सार येथे



जेजुरी:
नवलाख पायरी

देतो. एक जैन लेख सोडल्यास बाकी लेखांत बहुधा मार्तंड किंवा मार्तंडभैरव हे देवाचे नाव आले आहे. येथील सर्वप्रथम लेख संवत १३०३ (श. ११६८ इ.स. १२४६) चा असून त्यात धउल्लकाने आत्मकल्याणासाठी कपर्द यक्षाची प्रगती केली म्हणून सांगितले आहे. एकोणिसावा जैन तीर्थंकर मल्लिनाथ याचा हा यक्ष असल्यामुळे या मूर्तीचा खंडोबाशी अर्थाअर्थी संबंध नाही. उरलेले शिलालेख श. १५३०, इ.स. १६०८ ते श. १७१२, इ.स. १७९०, या काळातील आहेत. मुख्य देवळाच्या सोप्यात एक भली मोठी तलवार आहे. तीवरील लेखात महिपतराव व रामराव अशी नावे आली आहेत (भा. इ. सं. मंडळ इतिवृत्त १८३५, पृ. २६६-७१; शिचसा ७, पृ. ४०).

श. १६८२ चैत्र वैद्य १ (इ.स. १७६०, एप्रिल १) या कालाच्या एका पत्रावरून असे दिसते की, जेजुरीच्या देवास श. १६७८ (इ.स. १७५६) मध्ये धारवाड तालुक्यातील ५०० रुपये उत्पन्नाचा एक गाव इनाम दिला होता. तसेच या वर्षी

गोदातीरीही ५०० रुपये उत्पन्नाचा एक गाव नेमून देण्याची व्यवस्था केली होती. या दोन्ही गावांच्या उत्पन्नातून दागदागिना व इतर जे काही करावयाचे असेल ते नारो अप्पाजी (तुळशीबागवाले) यांनी करावयाचे होते (पेद ४०, ले. १३२, ऐसंसा ६, पृ. १६).

सु. ११८८ ते सु. ११९६ (इ.स. १७८७-९५) पर्यंतच्या ८ वर्षे, ३ महिने व ११ दिवस एवढ्या मुदतीचा तुकोजी होळकरांकडून झालेल्या जेजुरीच्या जमाखर्चाचा एक चिठ्ठा श्री. स. पं. धालेवाडीकर (पुणे) यांनी मला दाखविला. त्यावरून देवस्थानाच्या खर्चाविषयी समजते ते असे : श्रीमार्तंडास नित्य नैवेद्य दरमहा ५ रु., श्रावणमास अभिषेक ३६ रु., नंदादीप दरमहा १३/४ रु., हारतुरे दरमहा ४ रु., सोमवती अमावास्येस देवाची स्वारी कऱ्हेस स्नानास जाते त्याबद्दल २ रु., दशाहार पर्व १ रु., स्वारीचा इतर खर्च दरसाल सरासरी ३१ रु., पठार लिंगास कऱ्हेच्या पाण्याची दैनंदिन कावड दरमहा ५ रु., कऱ्हे पठाराच्या मार्गावर सावलीसाठी झाडे लावली त्यास दरसाल सरासरी ६८ रु. मल्हारेश्वराकडे दैनंदिन पूजा, नवरात्र, चंपा षष्ठी, शिमगा इत्यादी उत्सव यांचा खर्च दरसाल सरासरी २५० रु.

**देवरगुड्ड**

साऊथ सेंट्रल रेल्वेच्या पुणे-बंगळूर मार्गावर व पुण्यापासून ३९५ मैलांवर देवरगुड्ड नावाचे स्टेशन आहे. तेथून पूर्वेस सुमारे चार मैलांवर एक दक्षिणोत्तर डोंगरपट्टी आहे. तिच्या दक्षिण टोकावर हे स्थान आहे. या देवस्थानामुळेच बहुधा या टेकडीस देवरगुड्ड (देवांची टेकडी) किंवा गुडगुड्डापूर हे नाव पडले आहे. हिची उंची दोनशे फुटांपेक्षा अधिक असेल असे वाटत नाही. या देवस्थानाला जाण्याचे दोन मार्ग आहेत. पहिला म्हणजे देवरगुड्ड स्टेशनवर उतरून पायी किंवा खास वाहनाने टेकडीच्या पायथ्याशी जाणे आणि तेथून एकशेबावीस पायऱ्या चढून व थोडे दक्षिणेस चालून देवळाशी पोचणे. दुसरा मार्ग म्हणजे देवरगुड्डाचे पुढील स्टेशन राणेबेन्नूर येथे उतरावे आणि खास वाहन करून किंवा बस सर्व्हिसचा उपयोग करून सहा मैल अंतरावर असलेल्या या टेकडीपाशी यावे. सुमारे अर्धा मैल चालल्यावर आपण या टेकडीवर येतो आणि दक्षिणेस थोडे अंतर गेलो की देऊळ येते.

येथील मंदिर पूर्वाभिमुख असले तरी मंदिराच्या आवारात जाण्याची मुख्य वाट उत्तर बाजूच्या महादरवाजाने आहे. या दरवाजाच्या बाहेर उजव्या बाजूस हेगडे-हेग्गप्प याचे पूर्वाभिमुख देऊळ आहे. याचे मंडप व गाभारा असे दोन भाग आहेत. मंडपात तीन नागशिला असून गाभाऱ्यात शिवलिंगामागे आसनमांडी घातलेली हेग्गप्पाची मूर्ती आहे. हेग्गप्प हे विष्णूचे रूप असल्याच्या समजुतीमुळे

याच्या चार हातांत अनुक्रमे खड्ग, गदा, शंख, पुस्तक किंवा चोपडी या वस्तू दिल्या आहेत. आवाराच्या उत्तर भिंतीत लागूनच काली किंवा काळव्व हिची बैठी मूर्ती आहे. हिच्या हातांत अनुक्रमे खड्ग, डमरू, लिंग, या वस्तू असून सव्यावर्ती सिंह हे वाहन दाखविले आहे. सिंहाच्या दोन्ही बाजूंस सिंहाकडे तोंड केलेले दोन उंट खोदले आहेत. मुख्य दरवाजाच्या दोन अंगांस अनुक्रमे मारुती व भैरव यांचे कोनाडे आहेत. भैरव नग्न व उभा असून त्याच्या चार हातांत अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व नरमुंड, या वस्तू आहेत आणि कुत्रा नरमुंडातून गळणारे रक्त चाटीत असल्याचे दाखविले आहे. भैरवाच्या मस्तकाच्या दोन्ही अंगांस दोन नाग दाखविले असून वाहन म्हणून विंचू दाखविला आहे. या दरवाजाच्या माडीवर नगारखाना असून आत शिरताच उजव्या अंगच्या सोप्यात देवस्थानाची कचेरी आहे. या कचेरीच्या नैऋत्येस धूतमारी किंवा तुप्पद माळव्व हिचे छोटे मंदिर आहे. याच्या सोप्यात पण गाभाऱ्याच्या दाराच्या दोन अंगांस अनुक्रमे बैठा, मोठ्या पोटाचा आणि खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र धारण करणारा मार्तंडभैरव व मारुती यांच्या मूर्ती आहेत. गाभाऱ्यात बैठी आणि खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र धारण करणारी भैरवी आहे. कचेरीच्या दक्षिणेस गंगिमाळव्व किंवा म्हाळसा हिचे पूर्वाभिमुख मंदिर असून त्याचे एकामागे एक दोन सोपे व गाभारा असे तीन भाग आहेत. गाभाऱ्यात माळव्वाची बैठी, चतुर्भुज आणि खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र, या वस्तू धारण करणारी मूर्ती आहे.

या मंदिराच्या दक्षिणेस मुख्य मंदिर आहे. हे पूर्वाभिमुख असून याचें पाचखणी तिघई मंडप, नवरंगी मंडप, अंतराल, गर्भगृह व अंतर्गृह असे पाच भाग आहेत. तिघई मंडपाच्या आतल्या घईत दरवाजाच्या दोन्ही अंगांस दगडी चबुतरे असून त्यावर देवाच्या पालख्या व घोडे ठेविले आहेत. नवरंगी मंडपाचे मधले चार खांब कातीव असून दरवाजाच्या गणेशपट्टीवर श्री किंवा गजलक्ष्मी हिची आकृती आहे. या मंडपाच्या उत्तर भिंतीस लागून बाहेरच्या अंगास दोन देवडचा आहेत. त्यावर देवाचा झोपाळा व इतर वाहने आहेत. यांचे दोन खांब कातीव आहेत. अंतराल व दोन्ही गृहे अगदी साधी आहेत. गर्भगृहामध्ये शिलामय बैठी मार्तंड-भैरवाची मूर्ती आहे. तिच्या चार हातांत अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू आहेत. या मूर्तीपुढे पितळेची उत्सवमूर्ती असून अंतर्गृहात स्वयंभू (स्थानिक शब्द उद्भव) लिंग आहे. या उद्भवलिंगाचे स्त्रियांनी दर्शन न घेण्याचा येथे प्रघात आहे. याशिवाय गर्भगृहात एक बैठी व दुसरी बायकोसह घोड्यावरील अशा दोन मार्तंड–भैरवाच्या धातुमूर्ती आहेत. येथील सर्व मंदिरांची शिखरे खुजी व मुसलमानी संस्कार असलेली आहेत. देवळांच्या बांधणीत चुन्याचा भरपूर उपयोग केलेला आहे आणि पहिल्या मंडपाचे खांब खाली चौरस पण वर

निमुळते होत गेलेले आहेत. या देवळात दीपमाळी नाहीत. पण दीपस्तंभ आहेत. शिवाय या देवळात सुमारे चाळीस नंदादीप किंवा अखंड तेवणारे दिवे असून त्यांतील कित्येक तुपाचे आणि धनगरांच्या देणगीतून चालणारे आहेत हे त्यांचे वैशिष्टय आहे.

या देवाची दुपारी पूजा व रात्री धुपारती असे दोन दैनंदिन कार्यक्रम असतात. पण नैमित्तिक कार्यक्रम मात्र बरेच आहेत. प्रत्येक रविवारी रात्री देवाची पालखी गंगिमाळव्वेच्या देवळात जाऊन येते. प्रत्येक पौर्णिमेस रात्री दोनदा पालखी प्राकाराच्या बाहेर दोलमंडपास जाऊन व तेथे बसून परत येते. वैशाख पौर्णिमा ते ज्येष्ठ पौर्णिमा रोज रात्री एकदा पालखी निघते. ज्येष्ठ शु. १४ स देव लाकडी सिंहासनावर बसतात आणि त्यांचे समोर पुरुष भांडयाने एकमेकांवर रंग उडवितात. रंग करण्यासाठी मंदिराच्या आवारातील फरशीवर एक कुंड केले आहे. आश्विन शुद्ध १ ते १० पर्यंत नवरात्र असते. पण पालखी वद्य ९ पर्यंत रोज रात्री असते. देवाचे एक मोठे धनुष्य असून ते नवमीच्या दिवशी उभे करतात व त्यावर गोरप्प–गोकय्य–वग्गय्य–वाघ्या चढून भविष्ये सांगतो. त्यावेळी त्याचे अंगात आलेले असते असे नाही. दसऱ्याच्या दिवशी कंचवीर नावाचे ठराविक अस्पृश्य समाजातील लोक पवाड करतात. त्याचे तीन-चार प्रकार आहेत. एक प्रकार म्हणजे अर्धा ते पाऊण इंच व्यासाची पहार पिंढरीच्या खालच्या भागात आरपार मारून घेणे. ही पहार काढून मग त्यातून तेवढयाच घेराची चामडयाची दोरी ओवतात व काढतात. नंतर त्याच छेदातून बाभळीची एक काटयाची बारीक फांदी ओवून काढतात. यायोगे होणाऱ्या जखमेतून फारसे रक्त येत नाही. आणि केवळ भंडार म्हणजे हळदीची पूड टाकून जखम बरी करण्याचा प्रघात आहे. एका मध्यम वयाच्या व एका पोरसवदा तरुणाच्या पायांना विजयादशमीच्या दिवशी झालेल्या जखमा आश्विन वद्य १४ च्या दिवशी मी पाहिल्या तेव्हा त्या प्रायः भरून आलेल्या दिसल्या. तथापि त्या लांबट होत्या. पहारेच्या चपटया बाजूस धार लावून ती बाजू प्रथम पिंढरीत मारीत असल्याने तिची जखम लांबट होत असावी. पवाडाचा दुसरा प्रकार म्हणजे पहारेच्या ऐवजी निमुळती वाटोळी लाकडी खुंटी पिंढरीत मारून घेणे. या व पहिल्या प्रकारात फार अंतर नाही. खुंटीची जखम अधिक मोठी किंवा विस्तृत असते. पवाडाचा तिसरा प्रकार म्हणजे एका बाजूने ओळीने पाच खिळे आणि दुसऱ्या बाजूने मधोमध एकच खिळा बसविलेल्या पट्टीचा हा खिळा डाव्या हाताच्या मनगटात आरपार जाईल असा मारावयाचा आणि पाच खिळयांना पाच पेटत्या वाती बांधून देवाची आरती करावयाची. पवाडाचा चौथा प्रकार दगडास जाड साखळ-दंड (लंगर-सरपळी) बांधून तोडावयाचा. आश्विन वद्य ९ स देव पालखीतून

गावाबाहेर असलेल्या मरडी (टेकडी) वरील कुरुबत्यम्मा-व्वाकडे जाऊन परत येतात. देव मधूनमधूनही तिच्याकडे जातात. कुरुब (धनगर), कुरुबर्ती (धनगर स्त्री), कुरुबत्यम्म-व्व ही देवाने ठेवलेली उपस्त्री. हिचे बाणाईशी विलक्षण साम्य आहे. देवाची पालखी निघते तेव्हा सांगाती नेहमी गुडगुडी असते. आश्विन वद्य ९ स ब्राह्मणभोजन असते. मार्गशीर्ष शुद्ध १ ते ६ पर्यंत चंपा षष्ठीचे नवरात्र असून शेवटच्या दिवशी कांद्यावांग्याच्या भरिताचा नैवेद्य करतात. माघी पौर्णिमेस इतर पौर्णिमांच्या मानाने अधिक यात्रा जमते. ज्येष्ठी व माघी पौर्णिमेस प्रत्येकी दोन दिवस (१४ व १५) आणि आश्विन शुद्ध १ ते १० पर्यंत १० दिवस यात्रेकरूंवर प्रत्येकी दोन आणे कर असतो. यात्रा व इतर दिवस यात एळकोटी चांग भलो असा घोष चालतो. येथे फक्त भंडार उधळतात. खोबरे उधळण्याचा प्रघात नाही.

येथे वाघे आहेत. त्यास गोरप्प–गोकय्य–वग्गय्य म्हणतात. हे बहुधा कुरुब (धनगर) जातीचे असतात. इतर जातींचे अजिबात नसतात असे नाही. मात्र ते तात्पुरते वाघे असतात. हे कांबळ्याची कफनी घालतात आणि यांजपाशी लाकडी किंवा धातूची दोणी (चौकोनी, पसरट भिक्षापात्र), घंटा, सोटा किंवा त्रिशूल, भंडारचील (अंशत: किंवा पूर्णत: वाघाच्या कातडयाची भंडार ठेवण्याची पिशवी), कधीकधी डमरू, अंगावर मारून घेण्यासाठी चाबूक, या वस्तू असतात. वाघे भिक्षेवर निर्वाह करतात व त्यांना पोरेबाळेही असतात. ते आपल्या जमातीमधील स्त्रीशी लग्न लावतात. येथे पूर्वी मुरळ्या होत्या. त्यास बसवी म्हणत. त्या अनाचारी असत. आता त्या अगदी कमी झाल्या आहेत. उघडपणे प्राय: नाहीतच.

या देवाला दिलेल्या विविध देणग्यांविषयी शिलालेख व कागद आहेत. त्यांचा काळ श. १६३८/इ.स. १७१६ ते श. १७६७/इ.स. १८४५ असा आहे.

**मैलारलिंग**

धारवाड येथील मैलारलिंगाचे स्थान महत्त्वाचे आहे. धारवाड-हुबळी रस्त्यावर पण धारवाडपासून सुमारे दोन मैलांवर डाव्या अंगास एका टेकडीवर याचे मंदिर आहे. हे पूर्वाभिमुख असून याला फक्त चार खांब व नवरंगी मंडप किंवा गाभाराच आहे. मंदिरात शिरताच प्रथम लागणाऱ्या दोन कातीव व घोटीव खांबावर एक फारसी लेख आहे. सध्या तो प्राय: छिनून काढला आहे. मंदिराच्या पश्चिम भिंतीच्या एका कमानीत उंच कट्ट्यावर पाषाणाची सव्य ललितासनी, चतुर्भुज मूर्ती असून तिच्या चार हातांत अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू आहेत. शिवाय त्रिशूल व डमरू यांवर अनुक्रमे वामावर्ती सयोनिलिंग व

सव्यावर्ती बसव आहेत. याच्या बैठकीवर कुत्रा व घोडा असे दोन प्राणी आणि पानपात्राजवळच सन्मुखी लहान मूर्ती आहे. ही मैलाराची बायको गेंगि-तुप्पद माळव्व हिची आहे असे समजतात. मैलाराची मूर्ती मुसलमानपूर्वकालीन नाही. पण देवळाचा अंतर्भाग मुसलमानपूर्वकालातील असावा. या मंदिरात सध्या ब्राह्मण व लिंगायत अशा दोघांचीही पूजा आहे. मूर्तीमध्ये सयोनिलिंग व बसव खोदणाराचा आशयही तोच असावा. येथे याच्या मंत्र्याचे नाव हेग्गप्प, वासरमल्लप्प, गोरप्प किंवा वग्गय्य सांगतात. मला वाटते पहिली दोनच नावे हेग्गडी प्रधानासाठी आहेत. गोरप्प गुरवांसाठी व वग्गय्य वाघ्यांसाठी असावी. येथील वाघे देवरगुड्डाप्रमाणेच आहेत. यांच्या अंगात येते व मग हे प्रश्नांची उत्तरे देतात. यांचे काही आचार डोईफोडचा फकिराप्रमाणे असून कडक लक्ष्मीप्रमाणे हे अंगावर आसूड मारून घेतात.

**नळदुर्ग**

नळदुर्ग हे गाव सोलापूरच्या ईशान्येस सुमारे अठ्ठावीस मैलांवर आहे. सोलापुराहून तेथे जाण्यास एस.टी.च्या गाड्या असून शिवाय खाजगी गाड्यांचीही ये-जा चालू असते. येथे खंडोबाची तीन स्थाने आहेत असे समजतात. पैकी एक स्थान येथील सुप्रसिद्ध किल्ल्यात आहे. किल्ल्यात उपरी नावाचा एक उंचच उंच बुर्ज असून त्यावर चढून जाण्यास पायऱ्यांचा जिना आहे. या बुर्जाचा पूर्वेकडील वाटोळा भाग जेथे पायऱ्यांच्या भागाशी टेकतो तेथे, पण अगदी पायथ्याशी, एक लांबट चौकोनी मोरीवजा भोक आहे. तेथे खंडोबाचे स्थान होते, अशा समजुतीने भक्तांनी तेथे शेंदूर लाविला असून यात्रिक तेथे नारळ फोडतात. याबाबत मला मिळालेल्या कागदावरून खंडोबाचे श. १५३६ (इ.स. १६१४) मध्ये किल्ल्यात स्थान होते एवढे सिद्ध होते. माझी कल्पना अशी आहे की, या वेळेपर्यंत जरी किल्ल्यात स्थान असले तरी नंतरच्या काळात उपरि बुर्ज बांधला गेला तेव्हा खंडोबाचे स्थान त्याच्या बांधकामात गाडले गेले. यामुळे भाविक यात्रेकरू प्रतीक म्हणून या स्थानाचे दर्शन घेतात. हा उपरि बुर्ज विजापूरच्या उपरि बुर्जाप्रमाणेच असल्यामुळे दोघांची उभारणी एकाच काळी झाली असण्याचा संभव आहे.

दुसरे व तिसरे ही स्थाने नळदुर्ग गावाच्या साधारणतः उत्तरेस सुमारे दीडदोन मैलांवर एकमेकांपासून फर्लांगाच्या अंतरावर आहेत. पैकी प्रथम पूर्वेकडील स्थान प्रचलित होते. पण दंतकथा अशी की, तेथे देवापुढे गाय मारल्यामुळे देव अणदूर येथे जाऊन राहिला. पुढे अहिल्याबाईने पश्चिमेकडील देऊळ उभारल्यानंतर देव या नव्या देवळात येऊ लागला. काही असो, पूर्वेकडील देऊळ आज परित्यक्त आहे. हे देऊळ पूर्वाभिमुख व तिघई असून पहिल्या घईत

चार, दुसरीत तीन आणि तिसरीत एक अशा कमानी व खण आहेत. पहिल्या घईच्या पूर्व, दक्षिण व उत्तर या बाजू उघडच्या असून पहिला व चौथा हें खण पश्चिमेकडून बंद आहेत. दुसऱ्या घईचा तिसरा खण उत्तरेकडून बंद आहे. तिसऱ्या घईचा असलेला एकच खण फक्त पूर्व बाजूने उघडा आहे. या खणात पश्चिम भिंतीस लागून पण दक्षिणोत्तर अर्धा खण व्यापणारा एक उंच कट्टा असून त्यावर उत्तरावर्ती सयोनिलिंग आहे. या खणाच्या पाठीस लागून एक दक्षिणाभिमुखी तिखणी सोपा असून त्यास जोडून पूर्वाभिमुख दुखणी सोपा आहे. या सर्व इमारतीच्या प्रत्येक खणाचे छत उभ्या कपऱ्या व चुना यांनी बनविले आहे. तिसऱ्या घईवर विटांचे, तारकाकारी, षट्‌तली, कलशयुक्त शिखर आहे.

अहिल्याबाईने बांधल्याची समजूत असलेले मंदिर उत्तराभिमुख आहे. याच्या आरंभी दुतळी (पहिला तळ दगडी, दुसरा विटांचा) नगारखाना असून त्याच्या उत्तरेस पण पूर्व व पश्चिम कोपऱ्यांजवळ दोन दीपमाळा आहेत. नगारखान्याच्या दक्षिणेस एकाहून एक उंच अशा पातळीत दोन लंबचौकोनी फरशी पटांगणे असून प्रत्येकाच्या ईशान्य व वायव्य कोपऱ्यांत एकेक दीपमाळ आहे. यांच्या दक्षिणेस पूर्व, उत्तर व पश्चिम या बाजूंस प्रत्येकी कट्टे, तीन कमानी व तीन वाटा असलेला नऊ कमानींचा चौरस मंडप आहे. मंडपाच्या मध्यभागी कासव आहे. मंडपाचा अंड (अर्धगोल छत) पायाशी अष्टकोनी आणि वर क्रमाने निमुळता होत गेलेला आहे. मध्यभागी तिपदरी कमळ व केंद्रात अवलंब आहे. मंडपाच्या दक्षिणेस लंब चौकोनी अंतराल आहे. गाभारा साधारण चौरस असून त्याच्या दक्षिण भिंतीस लागून पूर्वपश्चिम पोकळ पट्टा आहे. याच्या पोकळीत कट्ट्याच्या इतकेच उंच सिंहासन असून त्यावर पूर्वावर्ती, सयोनिलिंग आहे. गाभारा व अंतराल, दारे सोडल्यास प्रायः चारी बाजूंनी बंद आहेत. सर्व वास्तूच्या चारी अंगांस उत्तम फरसबंदी आहे. या मंदिरास शिखर नाही. बांधकाम भक्कम आहे.

येथे खंडोबा कायमचा असत नाही. येथून सुमारे तीन मैलांवर असलेल्या अणदूर गावी नेहमी तो असतो; पण मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेस अणदूरचा छबिना संपला म्हणजे देवास पालखीतून समारंभाने आणून अहिल्याबाईच्या या देवळात बसवितात. येथे सुमारे पावणेदोन महिने तो रहातो आणि पौष वद्य द्वादशीच्या आगे-मागे अणदुरास परत जातो. या काळात पौष शुद्ध पौर्णिमा मुख्य धरून मोठी यात्रा भरते. या वेळी माणसी, गाडीस व नैवेद्यासाठी अनुक्रमे प्रत्येकी दीड, आठ व तीन आणे इतका कर घेतात. पैकी नैवेद्याचा कर पुजाऱ्यास जातो. बाकीचा कर यात्रा समितीकडे जमा होतो. यात्रेच्या वेळी 'शिवा मल्हारीचा एळकोट घे' असा जयघोष करीत भंडार व सुके खोबरे

उधळतात. या यात्रेत छबिन्याचे दिवशी ज्यांच्या अंगात येते त्यास वारू म्हणतात. हे वारू आपल्या अंगावर सुताचे कोरडे (चाबूक) इतके मारून घेतात की अंगाचे कातडे लोंबू लागते. पुढे सर्व जखमा केवळ भंडाराने बऱ्या होतात. छबिन्याचे दिवशी लंगर किंवा साखळी सोडण्याचाही कार्यक्रम एक वारू करतो. या दिवशी मिरवणुकीत, नळदुर्गचे देशमुख, होर्टीचे पाटील व अणदूरकर यांच्या तीन काठ्या असतात.

**पाली**

पाली हे गाव सातारा-कोल्हापूर रस्त्यावरील अतीत (साताऱ्यापासून १३ मैल) या गावाच्या नैऋत्येस पाच मैलांवर किंवा काशीळ-कोपर्डे (साताऱ्यापासून १५ मैल) गावाच्या पश्चिमेस साडेचार मैलांवर आहे. येथे जाण्यास पावसाळ्याखेरीज इतर दिवसांत काशीळ-कोपर्ड्यापासून एस.टी. गाडी असते. तारळी नदीमुळे या गावाचे दोन भाग झाले आहेत. नदीच्या दक्षिण-पश्चिमेच्या भागास पाली आणि उत्तर-पूर्वेच्या भागास राजापूर म्हणतात. खंडोबाचे देऊळ राजापूर भागात आहे. हे या भागाच्या पूर्वेस तटबंदी व फरसबंदी प्राकारात पूर्वाभिमुख बांधलेले आहे. या तटास पूर्व, दक्षिण, उत्तर या दिशांस तीन दरवाजे आहेत. दक्षिण दरवाजा अधिक मोठा असून अधिक वापर याच दरवाजाने होत असतो. तटास लागून प्रायः सर्वभर ओवऱ्या काढल्या आहेत. त्यांचा यात्रेकरूंना उतरण्यास उपयोग होतो. पूर्व दरवाजाने आत शिरताच दोन्ही अंगास दोन दीपमाळा आहेत. उजव्या दीपमाळेच्या नैऋत्येस आणखी एक दीपमाळ, तिच्या पलीकडे पितळी पत्र्याने मढविलेल्या हत्तीची मंडपी आणि तिच्या ईशान्येस आणखी एक दीपमाळ आहे. दरवाजासमोर नंदीची मंडपी असून तिच्या उत्तर-दक्षिण बाजूंस चार दीपमाळा, तसेच तुळशीचे वृंदावन व खंडोबाचे एक लहानसे पश्चिमाभिमुख मंदिर आहे. यातील मूर्ती बैठी, चार हातांची व त्यांत खड्ग, डमरू, त्रिशूल व पानपात्र घेतलेले अशी आहे. मूर्तीच्या मांडीखाली दोन्हीकडे दोन मणी व मल्ल यांची मुंडे आहेत. यापुढे सोळखांबी, दगडी मंडप लागतो. याच्या बाहेरच्या सर्व खांबांस लागून टेकण्याचा कट्टा असून मधले सर्व खांब पितळी पत्र्याने मढविले आहेत. पत्र्यावर कधी उठावाच्या, तर कधी रेखामय आकृत्या काढल्या आहेत. यातच फरशीवर धनाजी बिन संताजी जाधव असा लेख असल्यामुळे हा मंडप प्रसिद्ध मराठी सेनापती धनाजी याने बांधला अशी अवास्तव समजूत झाली आहे. सोळखांबी मंडपाच्या पश्चिमेस एक दुधई सोपा असून त्यात फरशीवर 'पडळोजी अबा बिन बाबसेटी करदोई' असा लेख आहे. याचेच वाचन 'अबा बिन शेटी पधोडे' असे करून याने हे

देऊळ बांधल्याचे सातारा गॅझेटियरमध्ये नमूद केले आहे. याच्या पश्चिमेस गाभारा आहे. गाभाऱ्याच्या मध्यभागी एक चौरस मेघडंबरी असून तीमध्ये पश्चिम अंगास उत्तराभिमुख योनी आहे. या योनीमध्ये खंडोबा व म्हाळसा यांची दोन स्वयंभू लिंगे असून त्यांच्या पुढे गादीच्या दुपायरी बैठकीवर या दोघांचे दोन मुखवटे ठेविले आहेत. मेघडंबरीच्या मागे घोड्यावर बसलेला, डावीकडे बायको असलेला, दुहाती, पितळी हेगडी आहे. मेघडंबरीच्या दक्षिणेस गाभाऱ्याच्या भिंतीस चिकटून बाणाईची उभी दगडी, हात जोडलेली मूर्ती आहे.

गाभाऱ्याच्या पाठभिंतीस चिकटून बाहेर एक मेघडंबरी आणि तीत शिवलिंग व अष्टभुजा महिषासुरमर्दिनी आहे. गाभाऱ्याच्या उत्तर भिंतीच्या बाहेर चिकटून तीर्थकुंडाची मेघडंबरी असून तिच्या पूर्व-पश्चिम बाजूस प्रत्येकी एक घोडा आहे. गाभारा, मंडप व सोपा यांवर, क्रमाने उतरत्या उंचीची, विटा व चुना यांनी बनविलेल्या कमानी—कोनाड्यांची, शिखरे असून त्यांत सुधामय, मराठी थाटाच्या, रंगीत मूर्ती आणि वेलपत्ती आहेत. प्राकाराच्या दक्षिण भिंतीत एक दरवाजा असून त्याच्या पूर्वेस असलेल्या दोन ओवऱ्यांपैकी एकीत उत्तराभिमुख गणपती आहे. दरवाजाच्या पश्चिम अंगास असलेल्या ओवरीत पूर्वाभिमुख मारुती आहे. या ओवरीच्या एका खांबावर उत्तर बाजूस 'श्रीमार्तंडचरणीं तत्पर गणेश खंडो व महिपत खंडो पारगांवकर शक १६९४ नंदननाम संवत्सर चैत्र वद्य त्रयोदशी गुरुवार' असा लेख आहे. तेव्हा वाटते की, ही ओवरी उपर्युक्त काळी उपरिनिर्दिष्ट बंधुद्वयाने बांधली. प्राकाराच्या नैऋत्य कोपऱ्यात एक देवळी असून तीत एक उभी, मिशाळ, धोतर, कंठा, तोडे, कडी, मुकुट, परिधान करणारी आणि आपल्या दोन हातांत अनुक्रमे खड्ग व दोन परळ घेतलेली मूर्ती आहे. हिच्या उजव्या अंगास 'आडोजी बिन कृष्णाजी सावंत' असा लेख आहे. तेव्हा उपर्युक्त सावंताचा हा पुतळा असावा. पण श. १७६२ च्या एका नेमणूक बेहेड्यात शिवाजी बावा म्हणून नाव आल्यामुळे तेथील लोक या मूर्तीस शिवाजीच म्हणतात. वायव्य कोपऱ्यात दुसरी एक देवळी असून तीत विठ्ठल-रखुमाई व शिवलिंग आहेत. हिच्या पायरीवर 'चरनी ततपर वाघोजी बिन मोरसेट बगाडे म्हेत्रे सीपी कसबे सासवड हाली वस्ती कसबे पुणे' असा लेख आहे. ही देवळी या बगाड्याने उभारली असण्याची शक्यता आहे. तटाच्या उत्तर भागात एक लहान दरवाजा असून त्याच्या उत्तरेस एक वापी आहे. दक्षिण दरवाजातून बाहेर पडल्यावर एक मोठे आवार असून त्याच्या पश्चिमेस एक भला मोठा व उंच दरवाजा आहे. याच्या दक्षिण अंगास तर सध्याही ओवऱ्या आहेत. पूर्वी सर्वच बाजूंस ओवऱ्या होत्या असे दिसते.

या देवाचे रोजचे पूजोपचार फार महत्त्वाचे नाहीत. रोज एकादशणी असते. आश्विन महिन्यात घटस्थापना करतात. दसऱ्यास रात्री साडेनऊ वाजता देव म्हाळसेस घेऊन शिलंगणास निघतात ते दुसरे दिवशी सकाळी ९-१० वाजता परत येतात. हे शिलंगण चौगुल्याकडे असलेल्या दोन एकर जमिनीपैकी एका एकरात होऊन त्यातील पिकाचा नाश होतो. दुसरा एकर या एकराच्या मशागती-साठी चौगुल्यास दिला आहे. मार्गशीर्ष शुद्ध १ ते ६ पर्यंत पुनः घटस्थापना असते. सहा दिवस रोज कीर्तन असते. पंचमीला देवाला तेल-हळद लावतात आणि षष्ठीस सकाळी त्याचा जन्मोत्सव करतात. षष्ठी व सप्तमी दोन्ही दिवस देवास लघुरुद्र व पुरणावरणाचा नैवेद्य असतो. या देवास सामिष नैवेद्य सहसा नाही. पण कोणी केलाच तर तो देवळाच्या पश्चिमेस असलेल्या हवालदारापाशी होतो. अष्टमीस सकाळी लळीत होते. पौष महिन्यात मृगनक्षत्रदिनी दुपारी चार वाजता देवाचे म्हाळसेशी लग्न लागते. त्यासाठी देव हत्तीवरून तारळी नदीच्या पलीकडे पालीस जातात. तेथे बहुले कायमचे बांधले आहे. मांडव मात्र प्रतिवर्षी घालतात. रात्री बारानंतर वरात निघते ती दुसरे दिवशी सकाळी आठ वाजता देवळात येते. लग्नाच्या पाचवे दिवशी पाखाळणी असते. तेव्हा देवास स्नान घालून नैवेद्य दाखवतात. बाणाईचे मात्र खंडोबाशी लग्न लागत नाही.

येथे लंगर तोडणे, जागरण, भीक, पशू वाहणे, वाघ्या बनणे, भंडार खोबरे उधळणे, इत्यादी नवस करतात. लंगर तोडणे व जागरण वाघ्याकडून करवितात. एक तास जागरण करण्याबद्दल सव्वा रुपया द्यावा लागतो. नवसाच्या भिकेला कधीकधी मल्लुखानाची वारी असेही म्हणतात. ती नवशानेच मागावयाची असते. देवास घोडा वाहिला तर तो पुजारी घेतो. बैल वाहिला तर त्यास वळू म्हणून सोडतात. लग्नाची मिरवणूक हत्तीवरून निघते तेव्हा भंडार खोबरे उधळण्याचा नवस फार लोक करतात. कधीकधी तुळा करूनही आपल्या वजनाचे खोबरे उधळतात. खोबऱ्याचा हत्तीवरील देवावर माराच करतात म्हणाना. जत्रेत मुख्यतः धनगराच्या अंगात येऊन तो चाबूक मारून घेतो. 'सदानंदाचा एळकोट घे' असा जयघोष नेहमी करतात. नवसाचे वाघे किंवा घरवाघे ब्राह्मणही बनतात. दारवाघे किंवा धंदेवाईक वाघे इतर जातींचेच असतात.

येथील पुजारी गुरव आहेत. त्यास इनामी उत्पन्न नाही असे समजते. मार्गशीर्ष शुद्ध ६ ते पौषातील पाखाळणीच्या अखेर देवापुढे येणाऱ्या भेटींच्या मक्त्याचा लिलाव करतात. तो ६००-७०० रुपयांपर्यंत जातो. इतर दिवसांतली भेट पुजारी गुरवास मिळते. पौषातील लग्नयात्रेच्या वेळी माणसी एक आणा आणि सायकल, गाडी व घोडे यांस प्रत्येकी दोन आणे कर असतो. हा कर ग्रामपंचायत

घेते. मक्त्याचे पैसे व सरकारकडून येणारे ३१० रुपये एका समितीकडे जातात. ती देवाच्या नित्यनैमित्तिक कार्याची व्यवस्था पहाते.

### मंगसुळी

मंगसुळी हे गाव बेळगाव जिल्ह्याच्या अथणी तालुक्यात पुणे-मिरज-बेळगाव रेल्वे रस्त्यावरील शेडबाळ स्टेशनच्या पूर्वेस शेडबाळ-विजापूर रस्त्यावर पाच-सहा मैलांवर आहे. येथील खंडोबाचे देऊळ गावाच्या अलीकडे म्हणजे शेडबाळ-पासून सुमारे साडेचार मैलांवर रस्त्याच्या डाव्या अंगास पण रस्त्यापासून अर्ध्या मैलावर आहे. या देवळाचे महाद्वार पूर्वेस असून प्राकारास लागून आतल्या बाजूस सर्वभर ओवऱ्या काढल्या आहेत. त्यातील बऱ्याच पुजारी व भक्त यांनी व्यापल्या आहेत. महाद्वारावर नगारखाना आहे. महाद्वारातून आत शिरताच समोर खंडोबाचे देऊळ आहे. प्रथम तीन खणी सोपा आहे. सोप्यातून आत गेले म्हणजे मुसलमानी स्क्विच पद्धतीच्या कमानींचा नवरंगी मंडप लागतो. मंडपाच्या पलीकडे गाभारा आहे. गाभाऱ्याच्या मधोमध एक सुटी भिंत आहे. तिच्या माथ्यावर तीन मिनार व दोन कमानी असून त्याखाली छोट्या १०-१५ कोनाड्यांची एक ओळ आहे. या ओळीखाली दोन मोठ्या कमानी किंवा देवळ्या असून त्यांपैकी दक्षिणेच्या कमानीत फक्त खंडोबा किंवा मल्लय्य याचे लिंग आणि उत्तरेच्या कमानीत गंगा, म्हाळसा व बाणाई यांची लिंगे आहेत. याशिवाय तेथे आणखी चार मूर्ती आहेत. पैकी एक पंचरसी घोड्यावरील खंडोबा आहे. यास चार हात आणि त्यांत खड्ग, त्रिशूल, डमरू व आलिंगन या वस्तू व मुद्रा आहेत. शिवाय मांडीवर म्हाळसा आहे. दुसऱ्या तीन मूर्ती म्हाळसा, खंडोबा व बाणाई अशा तिघांच्या आहेत. तिन्ही मूर्ती उभ्या असून, म्हाळसेच्या हातात खड्ग व पानपात्र, खंडोबाच्या दोन हातांत खड्ग व ढाल आणि बाजूस कुत्रा, बाणाईच्या डोक्यावर उजव्या हाताने तोलून धरलेली चार घागरींची उतरंड आणि छातीपाशी धरलेल्या डाव्या हातात (बगलेत) कोकरू व कोंबडा किंवा आणखी कोणता तरी पक्षी आहे. देवळामध्ये नऊ नंदादीप आहेत. या देवळाचे शिखर खाली चौरस व वर निमुळते होत गेले आहे आणि चारी कोपऱ्यांवर मिनार आहेत. खुद्द देवापुढे वाहनरूपाने कोणतेही शिल्प नाही.

येथील देवाचे पुजारी गुरव असून दैनंदिन कार्यक्रम म्हणजे दुपारची पूजा व सायंकाळची आरती हा होय. नैमित्तिक कार्यक्रम असा : चैत्र शुद्ध १० चे दिवशी रात्री बाराचे पुढे चार निशाणांच्या काठ्यांसह पालखी निघते आणि पहाटे चार वाजता वाघ्या साखळदंड तोडतो. हा साखळदंड सुमारे $\frac{3}{4}$ व्यासाच्या गजाच्या प्रत्येकी सहा इंच लांबीच्या दुव्यांचा आणि अजमासे १३ फूट लांब आहे. आश्विन

शुद्ध १ ते १० रोज सकाळी १० वाजता पालखी; अष्टमीस सकाळपासून संध्याकाळपर्यंत भक्त साखर वाटतात; या दिवशी सकाळच्या ऐवजी रात्री १२ ते २ पालखी व आरती, शिवाय रात्रभर वाघे व मुरळ्या गाणी गातात. नवमीस घटविसर्जन व खांडेपूजा; दसऱ्याचे दिवशी सायंकाळी पालखी, आपटापूजा, शस्त्रपूजा व साखळदंड तोडण्याचा चमत्कार; आश्विन शुद्ध १२ भंडारा; यावेळी जातिनिरपेक्ष ४-५ हजार पान होते. नंतर शुभ वेळ पाहून उत्सवमूर्ती गावात जाते व पुनः परत येते. मार्गशीर्ष शुद्ध १–६ सटीचे नवरात्र; माघ पौर्णिमेस पालखी गावात जाऊन पुनः परत येते. दर अमावास्येस मोठी यात्रा भरते. देवाचे एकंदर सेवेकरी १८ आहेत. त्यांस उत्पन्न नाही. येथील वाघ्या ब्राह्मणा-खेरीज कोणत्याही जातीचा असू शकतो. तो भीक मागून रहातो आणि आपल्या जातीतील मुलीशी लग्न करतो. हा कांबळ्याची कफनी विकल्पाने घालतो. याच्याजवळ डमरू, त्रिशूल, डिमडी, कोटंबा, पूर्वी घोळ, आता घाटी, तुणतुणे, टाळ, दिवटी, कवड्या बसविलेला गाठा, भंडाऱ्यासाठी वाघाच्या कातड्याची पिशवी, इतक्या वस्तू उण्या-अधिक प्रमाणात असतात. यांच्या साखळदंड तोडण्यावरून लोक सार्वजनिक भविष्याची कल्पना करतात. सध्या मुरळी बनण्यास कायद्याने बंदी केली असली तरी काही बायका चोरून मुरळ्या बनतात व अनाचार करतात.

## सातारे

सातारे हे गाव औरंगाबाद स्टेशनाच्या आग्नेयेस सुमारे दोन मैलांवर एका डोंगराच्या अगदी पायथ्याशी वसले आहे. उत्तरेकडून या गावात शिरताच सध्याचे खंडोबाचे पूर्वाभिमुख देवालय लागते. हे एका उंच कट्ट्यावर बांधले असून याचे आवारात जाण्यासाठी १५ पायऱ्या चढाव्या लागतात. इतरत्र खंडोबाच्या बहुतेक देवळांस सभोवती तट असून त्यांत ओवऱ्या काढलेल्या दिसतात. पण येथे तटच नसल्याने ओवऱ्याही नाहीत. फक्त एके काळी येथे ओवऱ्या किंवा खोल्या असाव्या असा अवशेषांवरून संशय येतो. आवारात येताच उजव्या अंगास एक दीपमाळ असून तिच्या थोडे पुढे तीन पायऱ्या चढल्यावर अर्धवट म्हणजे केवळ चारी बाजूंच्या भिंतींचा पहिला थर आणि सोळा खांबांचे तळखडे असलेला चौरस मंडप लागतो. मंडपाच्या पुढे उत्तर-दक्षिण बाजूस प्रत्येकी एक खोली काढलेला सोपा आहे. खोल्यांच्या पूर्वेकडील दर्शनी बाजूस प्रत्येकी एक पुढे आलेली देवळी असून तीत अनुक्रमे गणपती व मारुती यांच्या मूर्ती आहेत. सोप्याची दर्शनी तुळई स्थापत्य तत्त्वांचा उघड उघड अवमान करून बांधल्यामुळे तीस दोन खांब टेकू द्यावे लागले आहेत. दक्षिणी खोलीच्या

दारवंटयावर श्रीजलशायी व सूर्य यांची, गाभाऱ्याच्या दारवंटयावर दशावतारांची आणि उत्तरी खोलीच्या दारवंटयावर कृष्ण-गौळणींची शिल्पे आहेत. दशावतारात बुद्धाऐवजी विठोबा खोदला आहे. सोप्याच्या मागे (पश्चिमेस) गाभारा आहे. याच्या दरवाजाच्या दर्शनी भागावर वेलपत्ती आणि मूर्ती यांची रेलचेल आहे. गाभारा सामान्यतः चौरस असून त्याच्या पश्चिम भिंतीत थोडी पुढे आलेली तिखणी देवळी आहे. तीमध्ये तीन पायऱ्या असून तिच्या तीन खणांवर तीन मेघडंबऱ्या आहेत. पहिल्या पायरीवर घोडेस्वारी खंडोबाच्या पाच पितळी मूर्ती आहेत. पहिली दुहाती आणि तलवार व मोरधारी आहे. दुसरी आपल्या चार हातात तलवार, त्रिशूल, डमरू व पानपात्र धारण करणारी आहे. तिसरीने आपल्या चार हातात तलवार, डमरू, त्रिशूल व पानपात्र या वस्तू घेतल्या असून शिवाय तिच्या डाव्या मांडीवर तलवार व पानपात्र घेतलेली स्त्री आहे. हिचा घोडा लाकडी पण जागोजाग शोभेसाठी पितळी खिळे ठोकलेला आहे. चौथीच्या चार हातात तलवार, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू असून शिवाय हिच्या पुढे व मागे तलवार व पानपात्र घेतलेली एकेक स्त्रीमूर्ती आहे. पाचवीच्या दोन हातात तलवारीची मूठ व पानपात्र या वस्तू असून हिच्या डाव्या मांडीवर तलवार व पानपात्र घेतलेली स्त्रीमूर्ती आहे. पहिल्या मूर्तीच्या हातात मोर का असावा हे समजत नाही. या सर्व मूर्ती खंडोबाच्या म्हणून समजल्या जातात. पण मग दुसऱ्या व चौथ्या मूर्तीच्या नेहमीच्या आयुधक्रमात थोडा बदल झाला आहे असे समजले पाहिजे. क्रमांक तीन, चार व पाच या मूर्तींबरोबर असलेली स्त्री म्हाळसा असून चौथीच्या पाठीमागे असलेली स्त्री बाणाई असावी. येथे हेगडी व कुत्रा यांचा अभाव आहे. दुसऱ्या पायरीवर कमलार्धदलाकारी, शेंदूर लावलेला, घडीव दगड असून त्यास आंगचे नाक व तोंड आणि एनॅमेलचे डोळे आहेत. तिसऱ्या पायरीवर दोन उशा व पगडी या वस्तू आहेत. गाभाऱ्याच्या नैऋत्य कोपऱ्यात ढाल-तलवार घेतलेला एक घोडेस्वार असून शिवाय सुमारे आठ फूट लांब दुधारी खांडा आहे. गाभारा आठ कमानींचा आहे. गाभारा बाहेरून तारकाकृती करण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो साधलेला नाही. देवळाचे शिखर विटांचे व छोटया शिखरांनी शोभविलेले आहे. देवळासाठी वापरलेला दगड जांभा आणि गारेचे ठिपके व रेषा असलेला आहे. गाभाऱ्यातील मेघडंबऱ्या, सोप्याचे छत, गाभारा व सोप्यातील खोल्या यांचे दरवाजे व भिंती, तसेच पुढारलेल्या देवळया यांवरील वेलपत्ती, प्राणिरूपे व जाळया यांचे काम फार सुबक आहे. पण मानवरूपे पाहिली म्हणजे हे देऊळ पेशवाईत उभारले गेले याविषयी शंका रहात नाही. समजूत अशी आहे की, हे देऊळ बोरसर (औरंगाबादेच्याजवळ पश्चिमेस) येथील कुलकर्णी (भालेराव) घराण्याने बांधविले.

सातारे गाव कायगावकर दीक्षितांना इनाम असल्याने त्यांचाही या देवस्थानाशी संबंध आहे. येथे चंपा षष्ठी, बांगड-र (पौष शुद्ध) षष्ठी व पौषी पौर्णिमा असे तीन यात्रेचे दिवस आहेत. चंपा षष्ठीचे समयी घट असतात. पाच दिवस उपास करतात. सहावे दिवशी नैवेद्य करून उपास सोडतात. दुसरा व चंपा षष्ठी या दिवशी पालखी असते. पौषी पौर्णिमेस खंडोबाचा म्हाळसेशी विवाह लावतात. बाणेशी गंधर्व विवाह लागला आहे असे समजतात. भंडार व खोबरे उधळणे, 'बोल सदानंदाचा एळकोट', 'एळकोट, एळकोट घे' असे जयघोष या गोष्टी पालखीच्या व इतर वेळी होतात. देवास बकऱ्याचा नैवेद्य चालतो. मुंडके व चार पाय देवापुढे आणतात. येथे वाघे बनण्याची चाल आजही आहे. पण मुरळ्या बनत नाहीत. वाघे सर्व जातींचे असतात. वाघे नवसांसाठी लंगर तोडणे व जागरण ही कामे करतात भीक नवसाने स्वतःच मागावी लागते. बगाडाची चाल येथे नाही. देवास स्वतःचे उत्पन्न दागदागिने, इत्यादी काही नाही. देवाचे नित्यनैमित्तिक उपचार आणि सेवेकऱ्यांचा निर्वाह त्याजपुढे येईल त्यावर चालतो. तसेच या देवास अनेकदा यवनोपसर्ग झाला असावा. यामुळे हे देवस्थान अतिशय निकृष्ट अवस्थेत आहे. तरीही येथे चंपा षष्ठीस वीस ते पंचवीस हजार यात्रा जमते.

खंडोबाच्या निरनिराळ्या स्थानांची तेथे चालू असलेल्या उपासना व आचार यांची आणि ऐतिहासिक निर्देशांची जी माहिती मिळाली आहे तीवरून दिसते ते असे: या देवाला मल्लारी, मल्हारी, मल्हारी-मार्तंड, मार्तंड, मार्तंड-भैरव, खंडेराव, खंडोबा, म्हाळसाकांत, मैलार व त्याचा अपभ्रंश मैराळ, मल्लुखान, अजमतखान, इत्यादी नावे आहेत. यांपैकी मल्ल राक्षसाचा वध केल्यामुळे मल्लारी हे नाव पडले. त्याचाच द्राविडी भाषांतील अपभ्रंश मैलार आणि त्या अपभ्रंशाचा मराठी अपभ्रंश मैराळ. मल्लुखान व अजमतखान ही दोन मुसलमानी नावे असून ती दोन्ही लोकगीतांत तर आलेली आहेतच; पण मल्लुखान हे नाव बीड येथे मिळालेल्या सतराव्या शतकातील एका कोरीव लेखातही आहे. अजमतखान हे नाव मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीत (१८५७) दिलेले आहे. ही दोन मुसलमानी नावे व उपासनेत भिक्षा मागण्यासाठी योजलेला गदा हा शब्द यावरून मुसलमानांची या देवास भजणूक होती असे दिसते. जैन पंथांतील काही लोकांनी मल्लारी म्हणजेच आपला तीर्थंकर मल्लिनाथ असे समजून जेजुरीच्या मंदिरात गाभाऱ्याच्या बाहेरील कोनाड्यात मल्लिनाथाचा यक्ष कपर्द किंवा कपर्दी याची मूर्ती बसविली आहे. ती खाली संवत १३०३ (श. ११६८, इ.स. १२४६) चा लेख असून त्यात धउल्लक नावाच्या कोणा भक्ताने उपर्युक्त यक्षाची मूर्ती करविल्याचे सांगितले आहे. मैलार हे केवळ देवाचे नाव

म्हणून शिल्लक असले तरी मल्लारी, मार्तंड, भैरव, खंडेराव, मैराळ, खंडोबा ही व्यक्तिनामे लोकांच्या प्रचारात आहेत. एवढेच नव्हे तर मैराळ हे आडनावही बनले आहे. याचे एळकोटी महादेव असे एक नाव असून त्याचेच संस्कृतरूप सप्तकोटीश्वर असे आहे. खंडोबा हे नाव स्कंद ह्या नावापासून झाले असावे अशी कै. राजवाडे यांनी कल्पना केली होती; पण ती चुकीची आहे. हे नाव खड्ग ह्या शब्दापासून झाले आहे.

खंडोबाची तांदळा, शिवलिंग व चतुर्भुज मूर्ती या तिन्ही रूपांनी पूजा होते. तांदळा म्हणजे एक अनघड दगड असतो. शिवलिंग सर्वपरिचित आहे. चतुर्भुज मूर्ती असल्यास तिच्या हातात दक्षिणाधःकरक्रमाने नंगी पण उभी तलवार, त्रिशूल, डमरू व पानपात्र (परळ) अशा चार वस्तू असतात. त्रिशूल व डमरू ही शंकराची प्रसिद्ध आयुधे आहेत. आणि परळ भैरवाच्या हातात दाखविलेला असतो. खंडोबाच्या बरोबर कुत्रे असतात. कुत्रे हे भैरवाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. खंडोबाला घोडा व नंदी अशी दोन्ही वाहने विकल्पाने दाखवितात. नंदी खंडोबा शिवरूप आहे आणि घोडा मार्तंडरूप आहे असे दाखवितात. कोकणातील रवळनाथाच्या सांगाती घोडा व कुत्रा हे प्राणी दाखवितात; तेव्हा रवळनाथ हाही खंडोबाचे रूप असावे.

खंडोबाला म्हाळसा = गंगिमाळव्व = तुप्पद = माळव्व माडची व तिचेच संस्कृतिकरण मालती या नावांची एक बायको कल्पिली असून शिवाय बाणाई = पालाई = कुरुबती या नावाची एक गौळण किंवा धनगर स्त्री रक्षा म्हणून कल्पिली आहे. ती जातीने धनगर आहे हे दाखविण्यासाठी मंगसुळी येथील तिच्या मूर्तीच्या डाव्या-उजव्या काखांत कोंबडा व मेंढरू दाखविली आहेत. ही राख असल्यामुळे हिचे लिंग किंवा मूर्ती खंडोबाच्या देवळात म्हाळसेच्या शेजारी न दाखविता लांब एका बाजूस दाखवितात आणि कर्नाटकात तर हिचे देऊळ गावाच्या बाहेर उभारतात. पण वर्षातून काही दिवस खंडोबाला किंवा मैलाराला समारंभाने तिच्या घरी रहाण्यासाठी पोचवितात व परत आणतात. या धनगर स्त्रीला हेगडे नावाचा एक भाऊ असल्याचे कल्पिले असून त्याला खंडोबाचा प्रधान बनविला आहे. हेगडे हा कानडी शब्द असून त्याचा अर्थही प्रधान असाच आहे. याच्याही मूर्ती खंडोबाच्या देवळात सापडतात.

खंडोबा ही सकाम भक्तीची देवता असल्यामुळे तिची काही तरी हेतूने उपासना केली जाते. या हेतूत रोगनाश, अपत्यप्राप्ती हे दोन हेतू प्रमुख आहेत. कोणाही उपासकाला खंडोबाच्या प्रसादाने दोन मुले झाली तर त्यांतील पहिले मूल मग ते पुरुष होवो वा स्त्री होवो खंडोबाला वाहण्याची चाल होती. अशा

 वाहिलेल्या मुलांपैकी पुरुषांना वाघे व स्त्रियांना मुरळ्या म्हणत. त्यांमधील

स्त्री-पुरुष संबंधविषयक नीती फार ढिली असे. दुसऱ्या एका विधीस बगाड म्हणतात. यात देव नवसाला पावला असल्यास नवशाच्या कमरेस गळ टोचून त्यास गाड्यावर उभारलेल्या एका उंच खांबास टांगतात व तशा अवस्थेत त्यास ठरीव मार्गाने मिरवून आणतात. रखरखीत निखारे घातलेली एक खाच करून तीमध्ये चालण्याचाही लोक नवस करतात. त्या रखरखीत निखाऱ्यावरून चालणे याला हाळ म्हणतात. याशिवाय कर्नाटकात काही ठिकाणी नैमित्तिक उपासक आपल्या अंगावर कडक लक्ष्मीप्रमाणे कोरडे ओढून घेतात.

खंडोबासंबंधीच्या सौम्य उपचारात खंडोबाच्या उपासकाने देवाच्या नावे जोगवा किंवा भीक मागावयाची असते. या भीक मागण्याला मल्लुखानाची गदा (मल्लूची भीक) असा पारिभाषिक शब्द आहे. देवासमोर अंगात घोंगडीची कफनी आणि गळ्यात कवड्यांच्या माळा घालणे, हातात पोत घेऊन देवासमोर नाचणे, भंडार उधळणे, कुत्र्याप्रमाणे भुंकणे किंवा सदानंदाचा चांगभले अथवा एळकोट, एळकोट मल्हार एळकोट असा घोष करणे, त्याच्या नावाने वाघ्या-मुरळींकडून जागरण नावाचा विधी करवणे इत्यादी प्रकार मोडतात. याशिवाय मुलाचे जावळ करणे, लग्नगाठ सोडणे इत्यादी सौम्य उपासनाही चालू असतात.

देवाचे आनुवंशिक पुजारी किंवा सेवेकरी आहेत. त्यांना प्रतिवर्षी काही सौम्य व काही घोर विधी करावे लागतात. घोर विधींमध्ये तलवारीने आपल्या अंगावर जखम करून निघालेल्या रक्ताचा टिळा देवाच्या कपाळास लावावा लागतो. काही ठिकाणी देवासमोर त्याचे कंचवीर (आनुवंशिक उपासक) आपल्या पिंढरीमध्ये प्रथम अर्धा-पाऊण इंच व्यासाची पहार किंवा लाकडी खुंटी किंवा मोगरी, नंतर तेवढ्याच व्यासाचा कातडी दोर आणि शेवटी बाभळीची काटेरी फांदी खुपसून बाहेर काढतात किंवा हाताच्या मनगटात लोखंडी पंचारतीचा खिळा खुपसून बाहेर काढतात व तशाच अवस्थेत पंचारती करतात. यायोगे झालेल्या जखमांवर त्या बऱ्या होण्यासाठी देवाचा भंडार (हळदीची पूड) लावतात. आनुवंशिक उपासक लंगर म्हणजे साखळदंड तोडण्याचा प्रयोग करतात. मी मंगसुळी येथील साखळदंड पाहिला असता मला त्याचा एक दुवा कच्चा असल्याचे आढळले.

खंडोबाचे उपासक ब्राह्मणापासून मांगापर्यंत सर्व जाती-जमातींचे असल्यामुळे याला सामिष व निरामिष असे दोन्ही प्रकारचे नैवेद्य उपासक दाखवितात. सामिष नैवेद्यात कोंबडे किंवा बकरे यांच्या मांसाचा समावेश असतो., निरामिष नैवेद्यात पुरणपोळी चालत असली तरी उपासकांचा मुख्य भर वांग्याचे भरीत व बाजरीचा रोडगा ह्यांचेवर असतो.

काही ठिकाणी दर वर्षी म्हाळसा-खंडोबाचे लग्न लावण्याचा उत्सव करतात. सातारा जिल्ह्यात पाली येथे या उत्सवाचा फार मोठा समारंभ होतो. लग्न लागल्यावर देवाच्या वरातीची टोलेजंग मिरवणूक काढतात आणि तीत खंडोबावर खारीक-खोबरे व भंडार उधळतात. या लग्न लावण्याच्या पद्धतीवरून असे वाटते की, प्रथम खंडोबा व म्हाळसा या दोन स्वतंत्र देवदेवता होत्या. पण त्या स्वतंत्र ठेवणे उपासकांस बरे न वाटून त्यांनी या दोन देवतांचे लग्न लावून एकत्रीकरण करण्याचा प्रघात पाडला.

यांच्या उपासनेत एळकोट, चांगभले, हेगडे, वाघ्या, मुरळी, वारी, वारे, भंडार, लंगर, बगाड, हाळ, गाठा, पोवते, घोळ, कोटंबा, तळी, कांबळे, खेटा, भरीत, रोडगा, कवडी, कावडी, दोणी इत्यादी अनेक शब्द वापरले जातात. यांतील बहुसंख्य शब्द द्राविडी भाषांतील आहेत. तेव्हा हा देव मूळचा द्राविड देशसंबद्ध असावा. यामुळेच त्याची बहुतेक स्थाने महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र व तामिळनाड या प्रदेशांत आहेत. खंडोबाची देवळे उत्तरेत सामान्यत: नाहीत. जी आहेत ती बहुधा पेशवेकालात मराठे सरदार उत्तरेत गेल्यानंतर तयार झाली आहेत.

या देवदेवतांच्या भक्तांनी त्यास जातीही चिकटविल्या आहेत. रक्षा बाणाई= पालाई ही धनगर किंवा धनगर-गौळी जातीची असल्याचे मागे सांगितलेच आहे. म्हाळसा ही एका वाण्याची मुलगी असल्याचे तत्संबद्ध कथा सांगतात. खंडोबा तेली असण्याची शक्यता तेलहंड्याच्या आचारावरून वाटते.

खंडोबा व म्हाळसा या दोन्ही देवता मुसलमान पूर्वकालीन आहेत याविषयी शंकाच नाही. म्हाळसेच्या माडची नावाचे उल्लेख शकाच्या दहाव्या शतकातील आहेत ; तर शकाच्या तिसऱ्या शतकात झालेल्या महामायूरी मंत्रात भारतात विविध ठिकाणी बावन यक्ष असल्याचे सांगितले आहे. त्यात पैठणला खंड नावाचा यक्ष होता असे विधान आहे. पैठणला मैलाराचे देऊळ होते. यक्ष म्हणजे ज्याची लक्षणे अजून निश्चित व्हावयाची आहेत असा देव,असा मी करतो. तेव्हा खंडोबा शकाच्या तिसऱ्या शतकाइतका प्राचीन आहे असे समजण्यास हरकत नाही.

खंडोबाच्या स्थानांचे पौर्वापर्य ठरविणे कठीण आहे ; पण माझा मात्र अंदाज असा की, कालानुक्रमाने मण्मैलार, देवरगुड्डु, मैलारलिंग (धारवाड), मैलारपूर, नळदुर्ग, पाली, जेजुरी, सातारे, निमगाव अशी स्थाने तयार झाली. यात मी शेगूड, माळेगाव, पाटूर, कोंडविड्डू, वेमवरं इत्यादी स्थाने घातली नाहीत. कारण त्यांचेविषयी पक्की माहिती अद्याप मिळालेली नाही आणि सप्तकोटीश्वर कुठे बसवावयाचा हे ठरवावयाचे आहे.




# महाराष्ट्राचे कुलदैवत
# मल्हारी मार्तंड

लेखक : **प्रा. अशोक प्र. कामत**

म्हाळसादेवीचा पती म्हणून म्हाळसाकांत आणि मल्लदैत्याचा वध करून ऋषिमुनींना अभय देणारा म्हणून मल्लारी म्हणविणारा खंडोबा हा असंख्य मराठी माणसांच्या मनीमानसी पूजेचा विषय बनलेला आहे. महाराष्ट्रातील असंख्य जातीजमातींचे लोक त्याची यात्रा–वारी करतात, त्यांचा कुळधर्म पाळतात. म्हणूनच तो बहुजन समाजाचा देव आहे.

महाराष्ट्रातल्या जेजुरी 'निमगाव' पाली पेंबर, धाराशीव, शेगूड, सातारा, माळेगाव, मैलापूर पेंबर या गावी त्याची जागती स्थाने आहेत. बेळगावजवळ मंगसुळी, धारवाडजवळ मैलारलिंग आणि देवरगुड्ड या कर्नाटकातल्या गावीही खंडोबाची पूजास्थाने आहेत. आणि या दोन शेजारी प्रांतातले बहुसंख्य लोक खंडोबाच्या बारा स्थानांचे दर्शन घेत असतात. त्यात मराठे आहेत, मराठेतरही आहेत. ब्राह्मण आहेत आणि मुसलमानही आहेत! मुसलमान खंडोबाला मल्लूखान समजतात. जेजुरीला भक्त जेव्हा नवस फेडण्याची भिक्षा मागतात तेव्हा तिला मल्लुखानाची गदा म्हटले जाते. फारसीत 'गदा'चा अर्थ आहे भीक. आपल्या कडव्या धार्मिकतेसाठी महशूर असलेला बादशहा औरंगजेब खंडोबाला मानायचा असे म्हणतात. त्याने त्याला 'अजमतखान' अर्थात पवित्र माणूस अशी आपल्यापुरती पदवीही दिल्याची गप्प आहे!

या खंडोबाची पुराणकहाणी सांगावयाची झाली तर आपल्याला 'मल्लारी माहात्म्य' या संस्कृत ग्रंथाचा हवाला घेऊन अशी सांगता येईल–त्याचे असे झाले, कृतयुगात मणिचल पर्वतावर धर्मपुत्र सप्तर्षी तपाचरण करीत होते. त्यावेळी मणी आणि मल्ल या दोन छळवादी राक्षसांनी या पर्वतावर हैदोस मांडला. ऋषींचे तपोवन उद्ध्वस्त झाले. मग अडचणीत आलेले ऋषी अर्थात देवांचा राजा इंद्र काही करतो का, ते पहायला निघाले. पण ब्रह्मदेवाच्या

वरामुळे मणी आणि मल्ल हे दैत्य अवध्य झाले आहेत अशी देवेंद्राने त्यांची बोळवण केली. मंडळी विष्णूकडे आली. त्यानेही त्यांना आपली असमर्थता सांगून शिवाकडे धाडून दिले. शंभुमहादेवाने सारा प्रकार ऐकला आणि तो संतापला. मग त्याने मार्तंड भैरवाचा अवतार धारण करून कार्तिकेयाच्या पुढारपणाने आपल्या सात कोट गणांचे सैन्य सुसज्ज केले. मणिचल पर्वतावर तुंबळ युद्धाला तोंड लागले. मणी राक्षस पडला तेव्हा त्याला देवाच्या पायावर पडण्याची बुद्धी झाली. शिवशंकराने त्याची अखेरची इच्छा ऐकली. मल्लाला मारताना त्यानेही महादेवाची करुणा भाकली. म्हणाला, 'देवा मला तू मारलेस हे केवढे माझे भाग्य! तुझ्या नावाशी माझे नाव जोडले जावे.' भोळा शंकर म्हणाला, 'काही हरकत नाही.'

मल्लाचा विनाश करणारा म्हणून शंभुमहादेव हा मल्लारी मार्तंड झाला. खंडोबाच्या चित्रात त्याच्या पायदळी पडलेला मणी राक्षसही दिसतो. दुष्ट प्रकृतीस दाबणारा शंभुमहादेव, केवळ मरता मरता सद्बुद्धी झाली म्हणून दुसऱ्या एका राक्षसाला आपल्या नावाशीही जवळीक देतो ही लोककल्पना किती हृद्य आहे. महादेवाच्या शत्रुंजय खड्गाला भक्तगण खांड म्हणतात आणि या 'खांडा'वरूनच खांडा धारण करणारा तो खंडोबा ठरला असावा!

खंडोबा हा शिवशंकराच्या भैरव रूपाचाच अवतार होय. खंडोबाची उपासना मूळची कर्नाटकातली. मैलार हे त्याला असलेले मुख्य नाव तर कानडी आहेच पण येळकोट, हेगडे, भंडार, कोटंबा, लंगर, बगाड हे खंडोबाच्या पूजेअर्चेशी संबंधित असलेले अनेक शब्दही कन्नड भाषेतलेच आहेत.

वाघ्या आणि मुरळी हे खंडोबाची अखंड सेवा करणारे लोकसंस्कृतीचे दोन उपासक. खंडोबाचे आणि भैरवाचेही उदंड प्रेम असते कुत्र्यावर. त्यामुळे वाघे स्वतःला खंडोबाचे कुत्रे म्हणवून घेतात. मुरळी म्हणजे खंडोबाच्या उपासनेत स्वतःची सुख-दुःखे विसरणारी देवदासी. दक्षिण महाराष्ट्रात या वाघ्यांचे आणि मुरळ्यांचे अस्तित्व बरेच जाणवते. खंडोबाची गाणी गात ही मंडळी उभ्या महाराष्ट्रात हिंडत असतात. भिक्षा मागून पोट भरतात. वाघ्यापाशी भंडार म्हणजे हळदीचे चूर्ण असते. वाघे हा भंडार स्वतःला आणि इतर भक्तांना लावतात. खंडोबाच्या जत्रेत भंडारा उधळला जातो. खंडोबाचे बगाड पाठीवर घेतल्याने ज्या जखमा होतात त्याही या पवित्र भंडारानेच बऱ्या करायच्या असा प्रघात आहे.





# मंगसुळीचा खंडोबा

लेखिका : **सौ. मंदाकिनी काळे**

बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुक्यात मंगसुळी या नावाचे छोटेसे खेडेगाव असून त्याच्या पश्चिमेस काही अंतरावर असणाऱ्या छोट्याशा टेकडीवर खंडोबाचे भव्य सुंदर मंदिर उभारलेले आहे. या मंदिरा सभोवती मोठा तट असून आत कमानीवजा ओवऱ्या बांधलेल्या आहेत. याच ठिकाणी यात्रेकरू भक्त उतरतात. पूर्वेकडे तोंड करून उभे असलेले महाद्वार तीन मजली उंच व प्रशस्त आहे. तटाच्या मध्यात दोन भव्य मंदिरे मोठ्या डौलाने उभी आहेत. त्यापैकी एका मंदिरात दोन सुंदर कमानी असून, एका कमानीत खंडोबाचे स्वयंभू रुद्राक्षाकार असे लिंग आहे व हेच येथील प्रमुख आकर्षण व वैशिष्ट्य आहे. दुसऱ्या कमानीत म्हाळसा भवानीमातेची उभी स्वयंभू अशी मूर्ती भिंतीत बसविलेली आहे. त्या शेजारीच हेगडी प्रधानाने बांधलेले सुरेख मंदिर असून त्यात दोन अडीच फूट उंचीची शंख, चक्र, गदा, पद्मधारी भगवान श्रीविष्णू यांची नयनमनोहर, कोरीव अशी सुंदर मूर्ती आहे. या मूर्तीकडे पहाताना देहभान हरपते. समोरच भव्य अशी दीपमाळ आढळते. यात्रेच्या वेळी या दीपमाळेवर असंख्य पणत्या लावून दीपोत्सव साजरा केला जातो.

मात्र या मंदिराच्या बांधकामावर मुसलमानी अमलाची छाप आढळून येते. या सुंदर व भव्य मंदिराविषयी फारशी ऐतिहासिक माहिती उपलब्ध नसली तरी खंडोबाच्या मंदिरावर असणाऱ्या पितळी कळसावरून थोडीशी कल्पना येते. कळसावर असणाऱ्या उल्लेखावरून त्या कळसाची स्थापना सुमारे २२५ ते २५० वर्षांपूर्वीच झाली असावी असे वाटते.

मंगसुळीच्या या स्थानाविषयी एक आख्यायिका सांगितली जाते. ती अशी :

सुमारे ३५० ते ४०० वर्षांपूर्वी अल्ली आदिलशाहीची कारकीर्द सुरू होती. इ.स. १५५७ ते १५८० च्या काळात सगळीकडे बंडाळी माजली होती. त्यावेळी

कर्नाटकातही बंडाचा बीमोड करण्यासाठी सगळीकडे आदिलशहाने आपले सरदार पाठवून दिले. त्या काळात वंटमुरी गावचे (जिल्हा बेळगाव) जहागीरदार बसनप्रभु देसाई हे त्या भागातील जाज्वल्य धर्माभिमानी असणारे तेजस्वी योद्धे पुरुष म्हणून प्रसिद्ध होते. मुसलमानी सरदारांना त्यांचा हा धर्माभिमान सहन न झाल्यामुळे त्यांनी बसनप्रभु देसाईंना बंडखोर म्हणून कैद करून नळदुर्ग येथील किल्ल्यात अंधार कोठडीत ठेवले.

श्री. देसाई हतबल होऊन त्या अंधार कोठडीत कालक्रमण करीत होते. परंतु या बिकट परिस्थितीतून कोणत्या मार्गाने बाहेर पडावे हे त्यांना समजेना. असेच एके दिवशी ते काही विचार करीत असतानाच 'येळकोट घे येळकोट घे' असा नादघोष त्यांचे कानी आला. परंतु हा आवाज कोठून व कोणाचा येतो हे त्यांना समजेना. म्हणून भीतियुक्त सुराने देसाईंनी पहाऱ्यावर असणाऱ्या पहारेकऱ्यास त्या नादघोषाबद्दल विचारले. तेव्हा त्याने स्पष्टीकरण केले की, नळदुर्ग हे खंडोबाचे जागृत स्थान असून हा देव नवसाला पावणारा असल्याने नवस फेडण्यासाठी लांबलांबचे भक्त येथे येतात. त्यांचाच हा नादघोष आहे. श्री. देसाईंनी अशा प्रकारे त्या पहारेकऱ्याकडून खंडोबाची सर्व माहिती विचारून घेतली.

त्यावेळी त्यांच्या मनात विचार येऊ लागला की, 'श्रीमल्हारी या बंदिवासातून मला मुक्त करील का? मनोभावे मी त्याला शरण जाईन. माझ्या गावी त्याचे खूप भव्य व सुंदर मंदिर बांधून मी स्वत: त्याची पूजाअर्चा करीन.' श्री. देसाई अशी प्रार्थना रोज करू लागले. खंडोबाने देसाईंच्या अंत:करणपूर्वक भक्तीची परीक्षा घेण्याचे ठरवून एके दिवशी ते झोपले असताना मल्हारीने स्वप्नात दृष्टांत दिला. त्यात त्या रात्री श्री. देसाईंना बंदिवासातून मुक्त करून त्यांच्या गावी पोचविण्याचे कबूल केले. मध्यरात्री झालेल्या ह्या दृष्टांताने देसाई जागे झाले. उठून पहातात तो साखळदंड गळून पडलेले व तुरुंगाचे दरवाजे उघडलेले. श्री. देसाई आश्चर्यचकित झाले. बाहेर येऊन पहातात तो एक उमदा व पांढरा शुभ्र घोडा दारात उभा होता. मायेच्या तेजोवलयामुळे प्रत्यक्ष मल्हारीला ते पाहू शकले नाहीत. ते अश्वावर स्वार होतात तो अबलख पंचकल्याणी अश्व मात्र वाऱ्यासारखा चौखूर धावू लागला!

पहाटेच्या मंद, मधुर व प्रसन्न वातावरणात वाहणाऱ्या वाऱ्याने श्री. देसाईंचे अंग शहारून आले. याच वेळी पहाटेच्या धूसर संधिप्रकाशात मंगसुळीच्या माळावर हा सुलक्षणी अश्व फुरफुरत होता. संपूर्ण प्रवासात मागे वळून पहावयाचे नाही अशी आज्ञा असतानासुद्धा घोडा का फुरफुरतो म्हणून देसाई मागे वळून बघताच तो काय? घोडा एकदम अदृश्य झालेला व देसाई घोड्यावरून बाजूला फेकले गेलेले! देवही नाही व घोडाही नाही. अशा अवस्थेत देसाई पुन्हा देवाचा धावा

करू लागले. एवढ्यात त्यांच्या कानांवर आवाज आला, 'निष्कारण माझा शोध करू नकोस. एका मंदाराच्या वृक्षाखाली उजाडल्यानंतर भंडारा व कुंकू असलेले स्थान आढळेल व त्याच ठिकाणी मी प्रकट होईन.'

आकाशवाणीप्रमाणे देसाई स्थान शोधू लागले. शोधता शोधता श्री. देसाईंना भंडारा असलेले रुद्राक्षाकार लिंग व कुंकुमयुक्त आदिमाया म्हाळसा भवानी अशी दोन लिंगे मंदार वृक्षाखाली प्रकट झालेली दिसली. त्यावेळी श्री. देसाईंना फार आनंद झाला.

तो सौभाग्याचा दिवस म्हणजे चैत्र शुद्ध दशमीचा रविवार होता. याच दिवशी श्री. देसाईंनी मल्हारी म्हाळसाकांत यांची मनोभावे व षोडशोपचारे पूजा केली. त्या दिवसापासून श्रीक्षेत्र मंगसुळी येथे पाच दिवस मोठी यात्रा भरते. प्रतिवर्षी चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून दशमीपर्यंत भरणाऱ्या यात्रेस दशमीला लंगर तुटतो. लंगर म्हणजे लोखंडी साखळी असून तिच्या २८ कड्या एकमेकात अडकविलेल्या असतात. पाच फूट लांबीची ती साखळी सुमारे एक मण वजनाची असते. लंगर तोडण्याचा हा मान एका हरिजन कुटुंबाकडे परंपरागत चालत आलेला आहे. चैत्र व आश्विन दशमी असा वर्षातून दोन वेळा हा लंगर तुटतो. लंगर तोडणाऱ्या मानकऱ्याला लंगर तुटेपर्यंत अन्नप्राशन करता येत नाही. देवालया-समोर पटांगणात तीन-तीन फूट उंचीचा एक दगडी खांब रोवलेला आढळतो. त्या खांबाला साखळीचे एक टोक बांधावयाचे व दुसरे टोक ह्या मानकऱ्याने आपल्या हाताने धरून जोराने हिसके घालायचे. साखळी तुटेपर्यंत यात्रेकरूला हलता येत नाही. तुटलेल्या कड्या सम किंवा विषम प्रमाणात आहेत ते पाहूनच पुढील सबंध वर्षाचे भविष्य ठरविण्याची पद्धत चालू आहे.

लंगर तोडण्यापूर्वी पंचासमक्ष सर्व कड्या मोजून तपासतात. प्रत्येक यात्रेच्या वेळी येळकोटाची गर्जना करीत व दिवे पाजळून तल्लीन होत भक्त नाचतात. मंगसुळीचे माळरान अफाट माणसे व जनावरे यांनी फुलून जाते. कृष्णानदी जवळ असल्याने कृष्णाकाठच्या जातिवंत जनावरांचा मोठा व्यापार होतो. हुबळी, गदग, धारवाड याशिवाय मिरज, सांगली, कोल्हापूर या ठिकाणचे भक्तही येतात. दर अमावास्येलाही शेकडो भक्त येतात आणि 'सदानंदाचा येळकोट घे' अशी गर्जना करतात. यात्रेचा हा सुंदर देखावा पाहून डोळ्यांचे पारणेच फिटते.






लेखक : श्री. बाळकराम वरळीकर

पुणे जिल्ह्यातील जेजुरी गावी खंडेरायाचे जागृत स्थान आहे. आम्हा कोळी लोकांचे ते कुलदैवत, असेच आम्ही मानीत आलो आहोत. आमच्यापैकी भगत माणसे त्या देवाची आराधना तर करीतच असतात, पण दर सोमवती

खंडोबा : जेजुरी



अमावास्येला आपले देव पालखीने फिरवीत जेजुरीला घेऊन जातात. त्याला 'पोवा' असे म्हणतात. त्या पोव्यात जवळजवळ ३०० ते ४०० स्त्री-पुरुष सहभागी झालेले असतात. ही मंडळी मुंबई किंवा अन्य कोळीवाड्यांतून शनिवार-पर्यंत जेजुरीस पोहोचतात. त्यांच्याबरोबर देवांच्या चांदीच्या मूर्ती, ढोल, पालखी व निरनिराळे ध्वज असतात. खंडोबारायाची गाणी गात ही मंडळी शनिवार-रविवार जागरण करीत असतात. सोमवारी मुख्य खंडोबारायाच्या पालखीबरोबर आपण बरोबर आणलेली पालखी पण बाहेर काढतात. त्यात देव, देवकाठी, छडी वगैरे साहित्य असते. याच वेळेस कोणी 'एक गोणभर खोबरं भंडार उधळीन' असा जर नवस केला असेल तर ते मोठ्या भक्तिभावाने खोबरे भंडार उधळीत असतात. वाजत गाजत करई नदीवर ती पालखी जाते. सर्व भक्तगण जिथे देवाला आंघोळी घालायची असते तिथे थोडे दूर पाण्याच्या उलट वाहत्या प्रवाहात थांबून असतात. त्यांची श्रद्धा अटळ असते. ते म्हणत असतात की, देवांची आंघोळी झाली म्हणजे जे येणारे पाणी असते ते आपण अंगावर घेतले किंवा त्या पाण्याने आंघोळ केली की मन पवित्र होते. साऱ्या यात्रेचे समाधान लाभते. असेच त्या सोमवती अमावास्येनिमित्त गेलेल्या पोव्याचे सांघिक गीतही असते.

**है पावलाय देव मना मल्हारी**
**है पावलाय देव मना मल्हारी**
**देवा तू धावरे धावरे मल्हारी**
**देव माझा कोल्याला पावलाय मल्हारी**
**गडाला पायरी नवलाख मल्हारी**
**देव माझा किल्यान बसलाय मल्हारी**
**देवाची उडती निशानी मल्हारी**
**देव माझा गडाव चालला मल्हारी**
**देवाची निघाली पालखी मल्हारी**
**देव माझा करर्थव निघाला मल्हारी**
**देवाला आंघोळी घालतान मल्हारी**
**देव माझा वस्ती गेला मल्हारी**
**देव माझा किल्यान आयला मल्हारी**
**है पावलाय देव मना मल्हारी**



# वाघ्या-मुरळी



लेखक : **श्री. रा. चिं. ढेरे**

वाघ्या-मुरळ्यांचा उल्लेख झाला की आपल्यापुढे खंडोबा दैवत उभे रहाते. देवीचे जसे गोंधळी आणि भुत्ये हे उपासक, तसेच वाघ्या-मुरळी हे खंडोबाचे उपासक होत. खांद्यावर घोंगडी टाकलेला, गळ्यात व्याघ्रचर्माची भंडाराने भरलेली पिशवी अडकवलेला आणि हातात घोळ (लहान घाटयांचा जोड) असलेला वाघ्या खंडोबाची गाणी म्हणत व 'मल्हारीची वारी' मागत हिंडताना अनेकदा दिसतो. खंडोबाच्या यात्रेत तर जागोजाग वाघ्या आणि मुरळी यांचे कार्यक्रम चाललेले दिसतात. अशा कार्यक्रमात 'घोळ' मुरळीच्या हाती असतो. तिने ओचे न सोडता नऊवारी लुगडे नेसलेले असते. तिच्या कपाळी भंडार फासलेला असतो आणि एका हाताने घोळ वाजवीत ती नृत्य करीत असते. एक वाघ्या तुणतुण्याची साथ देत असतो, तर दुसरा खंजिरी वाजवून गाणी म्हणत असतो. वाघ्या-मुरळ्यांचे हे 'जागरणा'चे कार्यक्रम गोंधळ्यांच्या गोंधळासारखेच असतात. अनेकांच्या घरी या जागरणाचा कुलाचार साजरा केला जातो.

अपत्यप्राप्तीसाठी देवाला नवस करणारे लोक दोन मुले होताच पहिले मूल देवास–खंडोबास–अर्पण करीत असत. त्यातील मुलगे वाघे बनत आणि मुली मुरळ्या बनत. वाघ्या बनण्याचा एक विवक्षित विधी असतो. प्रथम चैत्र महिन्यात पालकाने देवास मूल वाहण्याचा संकल्प गुरवाकडे कळवावा लागतो. मग ठरलेल्या दिवशी मुलास मिरवणुकीने खंडोबाच्या मंदिरात नेतात. तेथे गुरव त्या मुलास भंडार लावतो व वाघाच्या कातड्याच्या पिशवीत भंडार भरून ती पिशवी मुलाच्या गळ्यात बांधतो. मग देवावर भंडार उधळून तो देवाला मुलाचा स्वीकार करण्याची विनंती करतो.

मुंबई इलाख्यातील जातींच्या सर्वेक्षणात वाघ्या-मुरळ्यांविषयी पुढील माहिती दिली आहे. 'एखाद्या मनुष्यास मुले होत नसली अथवा त्याची मुले

जगत नसली, म्हणजे तो "मूल जगल्यास तुला अर्पण करीन" असा नवस खंडोबाला करतो. अशा तऱ्हेने खंडोबास अर्पण केलेल्या मुलींस मुरळ्या म्हणतात व मुलांस वाघे म्हणतात. कधीकधी विवाहित स्त्रियाही नवसाने अथवा "आपणास खंडोबाची स्त्री होण्याविषयी स्वप्न पडले आहे," असे सांगून आपणास खंडोबास अर्पण करतात. खंडोबास मुलगे व मुली वाघे व मुरळ्या म्हणून वाहण्याची चाल मुख्यत्वेकरून कुणब्यांत व त्यांच्याच दर्जाच्या इतर जातींत आढळते. महारांतही ही चाल प्रचलित आहे. वाघे व मुरळ्या सर्व दक्षिण महाराष्ट्रभर आढळतात. मुरळ्यांचे लग्न खंडोबाबरोबर करतात. वाघे बहुधा आपल्या वडिलांच्या जातीतील मुलींशी लग्न करतात. तथापि वाघ्यांच्या मुला-मुलींतही लग्न होण्यास हरकत नाही. मुरळ्या वेश्यावृत्तीने व भिक्षा मागून उदरनिर्वाह करतात. त्यांचा पोशाख कुणब्यांच्या बायकांप्रमाणेच असतो; पण त्या कपाळास हळद माखतात व गळ्यात कवड्यांच्या माळा घालतात. काही मुरळ्या जेजुरीस कायमच्या रहातात. बाकीच्या वाघ्यांबरोबर सर्व दक्षिण महाराष्ट्रात गाणी गात व भिक्षा मागत गावोगाव भटकत असतात. वाघ्यांस खंडोबाचे चेले समजतात. मराठे आणि खालच्या जातीचे लोक त्यांस नमस्कार करतात. त्यांस दर तिसऱ्या वर्षी जेजुरीस जावे लागते. वाघ्यांच्या चालीरीती व धार्मिक समजुती मराठा-कुणब्यांप्रमाणे आहेत.'

महाराष्ट्रात वाघ्याचा विवक्षित वेष नाही; परंतु कर्नाटकात वाघ्या घोंगडीची कफनी वापरतो. भंडार ठेवण्यासाठी वाघाच्या कातड्याची पिशवी गळ्यात अडकवलेली, कोटंबा किंवा दोणी (धातूचे वा लाकडी भिक्षापात्र), गाठा (रुप्याचा गोफ किंवा कातड्याची वा वाखाची कवड्या गुंफलेली दोरी), दिवटी–बुदली, ध्वज, पोवते (गळ्यात बांधावयाची भंडाराने रंगलेली सुताची दोरी), घोळ (घंटावाद्य), शंख किंवा डमरू, शूल-त्रिशूल इत्यादी वस्तू प्रादेशिक भेदानुसार कमीअधिक प्रमाणात वाघ्याजवळ असतात. अर्थात या सर्व वस्तू तो नेहमीच बरोबर वागवतो असे नाही.

वाघे बनण्याची पद्धती अजूनही रूढ आहे; परंतु मुरळी बनायला कायद्याने बंदी आहे. वाघे दोन प्रकारचे असतात: घरवाघे व दारवाघे. घरवाघे म्हणजे नवसाच्या फेडीसाठी काही वेळ वाघ्याचा वेष परिधान करून 'वारी' (भिक्षा) मागणारे. केवळ खंडोबाविषयीची श्रद्धा व्यक्त करणारे वाघे. आणि दारवाघे म्हणजे कायमची वाघ्याची दीक्षा घेतलेले, भिक्षेवर जगणारे व भक्तांची क्षेत्रातील धार्मिक कृत्ये पार पाडणारे वाघे. भक्तांच्या वतीने 'जागरण' करणे व लंगर (लोखंडी साखळी) तोडणे ही त्यांची विशेष कामे होत.'

---

१. 'मुंबई इलाख्यांतील जाती', पृ. २१८

वाघे हे स्वतःला खंडोबाचे कुत्रे समजून भुंकतात. गुर्रगुर्र आवाज काढतात. यासंबंधीचे उल्लेख बाराव्या शतकापासून आढळतात. बसवेश्वराने कुत्र्याप्रमाणे भुंकणाऱ्या मैलारभक्तांची चेष्टा केली आहे. आनंदगिरीच्या 'शंकरविजया'त खंडोबाच्या उपासकांची श्वानभाषा उल्लेखिलेली आहे. शेख महंमद श्रीगोंदेकर यांनी 'घडिक भुंके मागतसे वारी', 'कुमारांस श्वाने करूनि भुंकविती। मनुष्य असता ।।', 'मनुष्याच्या आकारे असती, श्वान म्हणविति, पिवळे करूनि भाळ।' असा अनेकवार या प्रकाराचा निषेध केला आहे.[१]

अनेकदा दोन हात टेकून कुत्र्याप्रमाणे चार पायांवर चालण्याचा व भुंकण्या-गुरगुरण्याचा अभिनय श्रद्धेने करणारा वाघ्या हे एक रहस्य आहे. कर्नाटकातील संशोधक श्री. पांडुरंग देसाई हे वाघ्यांविषयी असे स्पष्टीकरण देतात की, 'कुत्रे मल्हारीला प्रिय आहेत. मनुष्यरूपी वाघ्या स्वतः कुत्रे समजून कुत्र्यासारखे चाळे करतो. पाशुपत मतात भक्त स्वतःस पशू आणि शिवास पशुपती म्हणजे पशूंचे पालन करणारा, असे मानतात. वाघ्याचे वर्तन यासारख्या भावनेने प्रेरित झाले आहे. वाघ्या या नावाचे मूळ कन्नड भाषेत सापडते. त्याचे कन्नड नाव ओग्गय्य आहे. हा शब्द "उग्गु" या धातूपासून निघाला आहे. "उग्गु" म्हणजे बोबडे बोलणे, अर्थशून्य किंवा अस्पष्ट ध्वनी काढणे, इत्यादी. या अर्थाला अनुरूप असे वर्तन करून, म्हणजे कुत्र्याप्रमाणे भुंकून, गुरगूर शब्द करून, इत्यादी प्रकाराने ओग्गय्य किंवा वाघ्या आपल्या नावाची अन्वर्थकता पटवून देतो.'[२]

या स्पष्टीकरणाविषयी काही शंका उद्भवतात. वाघ्याचे कानडी नाव वग्गय्य किंवा ओग्गय्य याचा अर्थ जर 'बोबडे, अर्थशून्य व अस्पष्ट बोलणारा' असा असेल, तर त्याचा संबंध कुत्र्याकडे कसा पोचतो? वाघे जर 'आपण देवाचे कुत्रे आहोत', असे समजतात, तर त्यांना श्वानवाचक नावच मिळावयास नको होते काय? वग्गय्य हा कानडी शब्द जर श्वानवाचक असेल, अशा अर्थाने तो कानडी वाङ्मयात अन्यत्र खंडोबाच्या उपासनासंदर्भाच्या बाहेर वापरला गेला असेल, तरच हे स्पष्टीकरण पत्करता येईल. 'वाघ्या' हा शब्द ज्या मूळ शब्दाचा अपभ्रंश असेल, तो शब्द कानडीत किंवा अन्य द्रविड भाषेत श्वान या अर्थाने वापरात असला पाहिजे, असे निश्चयाने म्हणता येण्यासारखा पुरावा उपलब्ध झाला आहे. तंजावरकडे जाऊन राहिलेल्या रामकवी नामक मराठी पंडिताने मराठीत 'भाषाप्रकाश' या नावाचा अमरकोशाच्या धर्तीवर एक कोश-ग्रंथ रचलेला आहे. या कोशात तिकडे मराठीत प्रविष्ट झालेल्या अनेक द्रविड शब्दांचाही समावेश

१. 'योगसंग्राम', १२.९५ व १४.६९; 'शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह', स्फुट क्र. १०, ६६, ७०, २०२, २२८, २७४.

२. 'नवभारत', जुलै १९५७, पृ. ९.

आहे. त्याने आपल्या या कोश-ग्रंथात 'पक्षी-खग-मृगादी वर्गा'त कुत्र्याचे पर्यायी शब्द पुढीलप्रमाणे नोंदविले आहेत :

> **सुणा कूतर कुत्राही, कुतरा, तीं यथास्वरीं ॥**
> **वाघ्या, तो बाल भाषेत कुत्ताही म्हणिजेतसे ॥**[१]

या श्लोकात 'वाघ्या' हा शब्द 'कुत्रा' या अर्थाने आलेला असून तो प्राण्याच्या संदर्भात आहे. खंडोबाच्या उपासनेच्या संदर्भात नाही, हे लक्षात घेतले पाहिजे. या उल्लेखावरून हे स्पष्ट होत आहे की, वाघ्या म्हणजे कुत्रा. वाघ्या हा खंडोबाच्या परिवारातील कुत्र्याचा मानवस्वरूपातील आविष्कार आहे. गोंधळी हा जसा मुळात भूतमात्राच्या परिवारातील भुताचा–पिशाचाचा मानवी आविष्कार होता, तसाच हा वाघ्याचा प्रकार आहे.

मराठीत 'वाघ्या' या शब्दाचे 'वाघा'शी ध्वनिसाम्य आहे. तसेच वाघ्याच्या गळ्यात वाघाच्या कातड्याची पिशवी असते. चिन्ह वाघाचे आणि नाव व वर्तन कुत्र्याचे, अशी ही विसंगती आहे. या विसंगतीची कल्पना खंडोबाच्या जुन्या भाविक भक्तांनाही असावी. कारण 'जयाद्रिमाहात्म्या'त या विसंगतीचे स्पष्टीकरण देणारी एक अद्‌भुत कल्पित कथा आहे.[२] त्या कथेनुसार वाघ्या म्हणजे वाघाचे कुत्र्यात झालेले रूपांतर होय.

एकनाथांच्या भारुडात वाघ्या-मुरळ्यांवरील काही भारुडेही आहेत. वाघ्याच्या भूमिकेतून नाथ म्हणतात :

> **अहं वाघ्या सोहं वाघ्या प्रेमनगारा वारी ।**
> **सावध होउनि भजनीं लागा देव करा कैवारी ॥**
> **मल्लारीची वारी माझ्या मल्लारीची वारी ॥**
> **इच्छामुरळीस पाहूं नका पडाल नरकद्वारीं ।**
> **बोधबुधली ज्ञानदिवटी उजळा महाद्वारीं ॥**
> **आत्मनिवेदन रोडगा निवतील हारोहारीं ।**
> **एका जनार्दनी धन्य खंडेराव त्यावर कुंचा वारी ॥**[३]

या रूपकात नाथांनी 'इच्छामुरळीस पाहू नका' असा दिलेला इशारा चिंतनीय आहे. नाथांप्रमाणेच अनेक संतांनी वाघ्या-मुरळ्यांवर पारमार्थिक रूपके रचली आहेत. पेशवाईच्या अखेरीस उदयास आलेले संत निरंजन रघुनाथ वाघ्यांच्या भूमिकेतून म्हणतात :

> **मागूं प्रेमाची हे वारी । नरदेह-रविवारीं ।**
> **आलिया संसारीं । चुकवूं फेरे सर्वस्वें ॥**

१. 'रामकविकृत भाषाप्रकाश': संपादक डॉ. शं. गो. तुळपुळे, १२. ९–१०, पृ. ७१.
२. 'श्रीक्षेत्र जेजुरीमाहात्म्य', पृ. ५०–५१.
३. 'श्रीएकनाथमहाराज यांच्या अभंगांची गाथा', पृ. ६५०–५१.

स्मरोनिया त्याचे गुण । येळकोट गाऊं गाणं ।
भुंकूं होऊनिया श्वान । त्याचे द्वारीं सर्वदा ॥
निरंजन आला वाघा । जाउनि मल्हारीला सांगा ।
चरणीं थोडी जागा । द्यावी भागा येईल ती ॥[1]

निरंजनस्वामींचा आणखी एक वाघ्या आहे. तो द्वैताला भाजून निश्चयाचा भरीत रोडगा खंडोबाला अर्पण करीत आहे. औट हात कोटंब्यात (नरदेहाच्या पात्रात) चिद्रस भरीत आहे. संसाराला येळकोट बोलून देहभंडारा उधळीत आहे. मोहाचा साखळदंड तोडीत आहे आणि जिवाचा श्वान सोडून देत आहे.

नाथांचे मुरळीवर एक भारूड आहे. त्यातील आध्यात्मिक रूपक बाजूला काढले, तर आपणास मुरळीचे स्वरूप समजावून घेता येईल :

निःसंग मुरळी झालें । या मालूचें घर रिघालें ॥
गळां भक्तीची भांडारी । भावाचा कोटंबा करीं ।
विवेकाची मागतें मी वारी । या संतांच्या चौंधा आलें ॥
चौहात घांट वाजती । सोहं शब्द घोळ गर्जती ।
वाघ्या-मुरळ्या या नाचती । गुरुकृपेचें अंजन ल्यालें ॥
वाजे वैराग्य तुणतुणं । तें कदा नव्हे बा सुनं ।
मन घुंगरू वाजे छुनछुन । नाचत जेजुरी गेलें ॥
गड देखिला जेजुरी । आत्मा नांदतो मल्हारी ।
जाऊनि बसलें मी मांडीवरी । एका जनार्दनी बोले ॥[2]

नाथांनी हे मुरळ्यांच्या निःसंगपणावर पारमार्थिक रूपक रचले आहे. मुरळ्यांनी आपला निःसंगपणा वासनांच्या तुष्टीसाठी न वापरता परमात्म्याच्या भेटीसाठी वापरावा, ही नाथांची विशाल दृष्टी. परंतु नाथांचे समकालीन संत शेख महंमदबाबा असा काही आडपडदा न ठेवता मुरळ्यांच्या अनाचारावर– नव्हे, मुरळी बनण्याच्या प्रथेवरच प्रखर हल्ला चढवितात :

ज्या मुरळ्या करिती अनाचार । चालविती उन्मत्ताचे घरचार ।
त्यांस म्हणती लावी भंडार । आपुलिया हातें ॥
पुण्य आचरण न ये मुरळ्यांच्या चित्ता । भलत्याच्या होतील कांता ।
त्यांचा हात भाळीस लावितां । कोण तरला सांग बा ॥
भाळ बाडवी पुढें ओढवी । म्हणे तूं आपुल्या हातें लावीं ।
मुरळी डोळे घालूनि खुणावी । त्या मुरळ्यालागुनी ॥
जे आपुल्या कुळस्वामीची मुरळी । तिसी कैसे खेळती ढवाळी ।
ऐसी कलियुगीं प्रभावळी । पापाची वर्ततसे ॥

१. 'श्रीनिरंजन रघुनाथांचे ग्रंथ ', पदपदांतरें, पृ. १२, ४०, ५९, ११०, १३९.
२. 'श्रीएकनाथमहाराज यांच्या अभंगांची गाथा ', पृ. ६५०–५१.

मुरळ्या कुळस्वामिच्या दासी। त्यांसी रमतां कंटाळेत ना अपेशी।
मल्हारी न करीच कांहीं त्यासी। कां सत्वें सांडवला ॥
कुळकन्येस बोल लाविला मल्हारीनें। ऐसे विटंबिलें त्याच्या देवपणें ॥
तो पुजील्या कैंवी तुटतीं बंधनें। लक्ष चौऱ्यांशीचीं ॥[१]

शेख महंमदांनी विवेकनिष्ठेच्या शस्त्राने मुरळ्यांच्या अनाचारावर चढविलेला हा हल्ला तीव्र असला, तरी इष्ट असाच आहे. यानंतर त्यांनी 'ऐसें ज्याचें बालक घ्यावें। त्यांस पूर्वजांसहित मोक्षास न्यावें।।' हा चिलयाच्या कथेतील शिवचरित्राचा विशेष सांगून प्रश्न विचारला आहे की, 'देव म्हणवून घेऊन चरणीच्या दासांचे "सुफळ" निर्फळ करावे, हे योग्य आहे काय?' मुरळ्यांवरील टीकेचा उपसंहार करताना शेख महंमदांनी स्पष्टपणे म्हटले आहे :

मुरळी म्हणजे हें कल्पना। श्रीहरि न ये तिच्या अगुणा।
जन विषयलंपट जाणा। तिच्या गुणासंगें ।।[२]

शेख महंमद आणि एकनाथ यांच्याही पूर्वी बंगालचे प्रसिद्ध संत महाप्रभु चैतन्य यांनी आपल्या दक्षिणयात्रेत जेजुरीस भेट दिली असता मुरळ्यांना या अनाचारापासून निवृत्त करण्याचा प्रयत्न केला होता. महाप्रभूंची ही दक्षिणयात्रा इ.स. १५१०–११ या काळात झाली. त्यांच्याबरोबर गोविंददास नामक एक शिष्य होता. या गोविंददासाने यात्रेतील अनुभवांची टिपणे लिहून ठेवली आहेत. या टिपणांच्या आधारे जेजुरी येथे घडलेली घटना वर्णिताना रायसाहेब दिनेशचंद्र सेन लिहितात :

'तेथील मंदिरात खंडोबा नावाचा देव होता. आईबाप आपल्या मुली त्या देवाला अर्पण करीत असत. या मुली आपणांस "खंडोबाच्या पत्नी" म्हणवीत असत. स्थानिक लोक त्यांना "मुरळ्या" म्हणतात. या स्त्रिया आपले जीवन अनाचाराने व्यतीत करतात आणि यात्रिकांना आपल्या मोहजालात पकडतात. या स्त्रियांकडे पाहून महाप्रभु चैतन्यांचे हृदय करुणेने ओथंबून आले आणि ते गोविंददासाला म्हणाले, "गोविंद, या मुलींचे आई-बाप किती क्रूर आहेत पहा ! पापमय जीवन व्यतीत करण्यासाठी आपल्या मुली खंडोबाला वाहण्याइतके हे हृदयशून्य आहेत. यांना हे शक्य तरी कसे होते?" त्यानंतर गोविंददासाची प्रतिकूल भावना दिसूनही महाप्रभू मुरळ्यांकडे गेले. त्यांनी आपल्या करुणामय मधुर वाणीने त्यांना परमार्थ विशद करून सांगितला. महाप्रभूंच्या त्या अमृतमय वाग्वृष्टीमुळे मुरळ्यांना आपल्या पापाचरणाचा पश्चात्ताप झाला आणि त्या

१. 'योगसंग्राम', १४. ५४–५९.
२. 'योगसंग्राम', १५. ९.

आपले जीवन सुधारायला प्रवृत्त झाल्या. त्यांच्यातील इंदिरादेवी नामक मुरळीने तर लगेच जेजुरीही सोडली.'[१]

ही इंदिरादेवी अपवादात्मकच होय. तिचे अनुसरण झाले नाही, हा इतिहास आहे, या आणि यासारख्या अनिष्ट प्रथांचा फायदा ख्रिश्चन धर्मप्रचारकांनी भरपूर करून घेतला. हिंदु धर्माची नालस्ती करून ख्रिश्चन धर्माचे महत्त्व पटविण्यासाठी त्यांना असली व्यंगे उपयोगी पडतात. एक स्कॉटिश मिशनरी रेव्हरंड जे. मरे मिचेल याने खंडोबा आणि त्याची उपासना याची निंदा करणारे 'खंडोबाची गोष्ट' या नावाचे एक छोटे चोपडे प्रसिद्धिले आहे. हे पुस्तक संवादात्मक आहे. लेखक स्वतः पुण्यातील गंगाधरशास्त्री नामक कोकणस्थ ब्राह्मण मित्राकडे बसला आहे आणि तेथे एक देशस्थ ब्राह्मणही बसलेला आहे. इतक्यात शास्त्रीबुवांच्याकडे खंडोबाच्या यात्रेहून एक ओळखीचा कुणबी येतो. भंडाराने रंगलेला आणि गळ्यात रुप्याचा गाठा घातलेला तो कुणबी दिसताच लेखक त्याच्या उपास्य देवतेविषयी प्रश्न विचारू लागतो अशी या पुस्तकाची भूमिका आहे. या प्रश्नोत्तरांतून मरे मिचेलने खंडोबाच्या उपासनेतील व्यंगावर बोट ठेवून खंडोबाची (आणि एकंदर हिंदु देवतांची) उपासना कशी त्याज्य आहे, ते कौशल्याने पटविण्याचा प्रयत्न केला आहे. मुरळ्यांविषयीची प्रश्नोत्तरे अशी आहेत :

'**साहेब :** ते लोक (वाघ्या-मुरळी) लग्न करितात की काय ?

**पाटील :** वाघे लग्न करितात. मुरळ्या लग्न करीत नाहीत.

**साहेब :** त्या लग्न करीत नाहीत, हे योग्य आहे ?

**पाटील :** त्या देवाच्या बायका आहेत ना ? त्यांचे लग्न खंडेरावाशी लागलेलेच आहे. असा नवरा मिळाला असता, दुसरा का करावा बरे ?

**साहेब :** हे काम चांगले आहे. शेताआड चोरी आणि नवऱ्याआड छिनाली. त्यांनी खंडोबाचे नाव करून इच्छेस येईल त्याप्रमाणे वागावे, नाही बरे ? शास्त्रीबावा, त्या पतिव्रता तरी असतात काय ? सर्व मुरळ्या व्यभिचारिणी असतात, असे माझ्या ऐकण्यात आहे, हे खरे काय ?

**शास्त्रीबावा :** साहेब, आपण म्हणता ती गोष्ट खरी. त्या वाईट असतात.

**साहेब :** पाटील अशा मुरळ्यांचे जागरण ऐकून आपल्या बायकांचा नाश करावा हे तुम्हांस योग्य वाटते ना ? . . .'[२]

आपल्याकडे महर्षि शिंद्यांसारख्या सुधारकांनी प्रचार करून[३] या प्रथेविरुद्ध लोकमत तयार करण्याचा प्रयत्न केला आणि शेवटी कायद्याने मुरळीच्या

१. Chaitanya and His Companions, pp. 256–57.

२. 'खंडोबाची गोष्ट,' : रेव्ह. जे. मरे मिचेल, मुंबई, १८५५.

३. 'महर्षि वि. रा. शिंदे यांचे लेख, व्याख्याने व उपदेश', पृ. ९०.

प्रथेवर बंदी आली.[1] अर्थात अद्यापपावेतो चोरून मुरळी बनण्याचा प्रकार चालू आहेच.

येथवरच्या उल्लेखावरून हे स्पष्ट होईल की, मुरळी ही देवदासींच्या वर्गातील खंडोबाची उपासिका आहे. देवदासी, भाविणी, जोगतिणी यांच्या-प्रमाणेच मुरळ्यांना देवसेवेत राहून अविवाहित जीवन व्यतीत करावे लागते. त्यांचे लग्न देवाशीच लागते. त्या देवाची सेवा करतात आणि जागरणासारख्या कार्यक्रमात वाघ्यांना साथ देतात. महाराष्ट्र-शब्दकोशात 'मुरळी' या शब्दाची व्युत्पत्ती दोन प्रकारांनी दिली आहे : (१) मैलाराची पत्नी मैराळी—मुरळी, व (२) मरळी (कानडी शब्द)—मुरळी. या दुसऱ्या व्युत्पत्तीला पुष्टी देताना श्री. पांडुरंग देसाई म्हणतात, 'कानडीत "मरळी" म्हणजे बुद्धिशून्याप्रमाणे बतावणी करणारी. श्वानवत वागणाऱ्या वाघ्याचे स्त्रीपात्र म्हणून तिचे मूळ "मरळी" हे कन्नड नावही अन्वर्थक वाटते.'[2] हेमचंद्राच्या 'देशीनाममाले'त 'मुरई' असा शब्द असून त्याचा अर्थ 'असती स्त्री' असा दिला आहे.[3] आपण मराठीत 'मुरळी' हा शब्द लक्षणेने 'असती'वाचकच वापरतो. कानडीतही 'मरळी' शब्दाचा वापर त्याच अर्थाने रूढ आहे.

मुरळीला द्रविड प्रदेशात 'मरळी' असे नाव आहे, हे आपण पाहिलेच आहे. तामिळनाडमध्ये 'मरळी' या नावाविषयीची एक लोककथा प्रचलित आहे. त्या कथेत देवदासीची प्रथा कशी सुरू झाली, याचे लौकिक स्पष्टीकरण दिले आहे. ती कथा अशी :

'कोप्पम प्रदेशातील घनदाट अरण्यात एक वृद्ध तपस्वी रहात होता. तो पहाटेच उठून नदीवर जाऊन स्नान करायचा आणि तपाचरणादी नित्य कर्मात गढून जायचा. एके दिवशी नित्याप्रमाणे तो नदीवर गेला असता त्याला एका कपडचात गुंडाळलेली अगदी तान्ही मुलगी नदीकाठावर आढळली. त्याने ती मुलगी आपल्या कुटीत आणली आणि अत्यंत वात्सल्याने तिचे लालनपालन सुरू केले. साधूने तिचे नाव "प्रभाती" असे ठेवले. कारण ती त्याला प्रभातकाळी सापडली होती.

प्रभाती हळूहळू बाल्यकाळ ओलांडून तारुण्यात प्रवेशली. साधूच्या सहवासात तिच्यावर उत्तम संस्कार झाले होते. ती जितकी सुंदर होती, तितकीच गुणी आणि सदाचरणी बनली होती. आपल्या मानसपित्याला त्याच्या तपाचरणात

१. 'प्राचीप्रभा', वर्ष १, पृ. १८७.

२. 'नवभारत', जुलै १९५७, पृ. ९–१०.

३. 'देशीनाममाला', ६. १३५.

४. 'तमिलनाडकी लोककथाएँ', पृ. ४०–४५.

आवश्यक ते साहाय्य करून, ती आश्रमातील पशुपक्ष्यांचा मनापासून सांभाळ करी, वृक्षवेलींना पाणी घाली आणि आल्या गेल्या अतिथींचे सुहास्यवदनाने व मधुरवाणीने स्वागत करी. तिचे आचरण देवीसारखे होते.

हळूहळू तिच्या गुणांचा सुगंध आसपासच्या गावांत पसरला. ग्रामवासी लोक या देवतातुल्य मुलीला पाहाण्यासाठी साधूच्या आश्रमात येऊ लागले आणि आपल्या श्रद्धेचे द्योतक म्हणून धान्य, फळे, दूध इत्यादी पदार्थ भेट देऊ लागले. त्यांचा संपर्क आल्यानंतर प्रभातीला त्यांच्या जीवनातील उणिवा जाणवू लागल्या. तिने साधूची अनुज्ञा घेऊन खेड्यातील मुलांना शिकविण्यास प्रारंभ केला. आसपासच्या गावांतील अनेक मुले आश्रमात शिकावयास येऊ लागली. प्रभाती त्या मुलांना प्रेमाने शिकवीत असे; त्यांच्या पालकांना धार्मिक गोष्टी सांगत असे आणि त्यांच्या सुखदुःखांशी समरस होऊन त्यांच्या अडीअडचणी दूर करण्यास पुढे होत असे.

प्रभातीच्या या कार्याची आणि तिच्या देवतातुल्य वर्तनाची कहाणी दूरवर पसरू लागली. त्या काळी कोप्पम प्रदेशावर मरळी नामक एक तरुण स्त्री राज्य करीत होती. ती अत्यंत अधार्मिक आणि विलासिनी होती. तिने आपल्या राजधानीतील सर्व मंदिरे उद्ध्वस्त करून टाकली होती; राजपुरोहिताचा छळ करून त्याला पदभ्रष्ट केले होते आणि मादक द्रव्यात धुंद राहून अनेक प्रकारे अन्याय–अत्याचार चालविले होते.

राणीच्या अन्यायांनी त्रस्त झालेल्या वृद्ध राजपुरोहिताला प्रभातीच्या गुणांची वार्ता समजली. परंतु आजवरच्या अनुभवांनी त्याचे मन शंकेखोर बनले होते. साशंक मनःस्थितीतच तो प्रभातीच्या दर्शनासाठी साधूच्या आश्रमाकडे निघाला. आश्रमाजवळ येताच त्याने भिकाऱ्याचा वेष परिधान केला. त्यावेळी प्रभाती तीन दिवसांचा उपवास संपवून पारणे सोडावयाच्या तयारीत होती. एवढ्यात हा भिकारी दारी आलेला पाहून तिने जवळची सर्व फळे त्याला देऊन टाकली. राजपुरोहिताने आणखी एकदा अशी परीक्षा घेतल्यावर त्याला प्रभातीच्या देवीत्वाविषयी खात्री पटली. तो परत राजधानीला गेला.

राजधानीतील प्रजा राणीच्या अत्याचारांनी संत्रस्त बनली होती. त्या दुःखात दुष्काळाने भर टाकली. शेतात धान्य पिकले नाही, तरी राणीने उपाशी जनतेकडून सक्तीने कर वसुली चालविली आणि कर न देणारांना राणीचे सैनिक छळू लागले. ही परिस्थिती असह्य होऊन राजपुरोहिताने राजधानीतील अनेक पीडितांना बरोबर घेऊन प्रभातीचा आश्रम गाठला आणि तिला प्रजेच्या दुःखाची करुण कहाणी ऐकविली. ती कहाणी ऐकून प्रभातीचे कोमल हृदय व्यथित झाले. साधूची अनुज्ञा घेऊन ती राजधानीत आली. प्रथम तिने राणीची भेट घेऊन तिला

प्रजारक्षणासाठी विनंती करण्याचे ठरविले. परंतु मद्यपानाने धुंद झालेल्या राणीने तिचा अपमान करून तिला सैनिकांकरवी राजवाड्यातून हाकलून दिले. प्रभातीची देवावर असीम श्रद्धा होती. तिने लोकांना गोळा करून देवाची प्रार्थना आरंभिली. तिच्या प्रार्थनेने देव प्रसन्न झाला आणि देवाची करुणा आकाशातून बरसू लागली. प्रजेला अत्यंत आनंद झाला. शेते पुन्हा हिरवीगार झाली. अस्थिपंजर झालेल्या प्रजेत पुन्हा चैतन्य संचारले. प्रभातीच्या इच्छेनुसार लोकांनी देवाचे भव्य मंदिर उभारले. प्रभाती मंदिरात राहून पूजाअर्चा करू लागली ; लोकांना सन्मार्गाचा उपदेश देऊ लागली.

राजधानीतील सर्व प्रजा प्रभातीच्या भजनी लागल्याचे पाहून राणी मरळी द्वेषाने जळू लागली. तिने आपल्या सैनिकांना आज्ञा केली की, "मंदिर उद्ध्वस्त करून प्रभातीला पकडून आणा." सैनिकांनी मंदिर उद्ध्वस्त केले, परंतु ते प्रभातीला हात लावू जाताच अग्निज्वालात सापडून भस्मसात झाले. त्यानंतर राणीने प्रभातीच्या अंगावर भयंकर विषारी नाग सोडला, परंतु तो नागही प्रभातीपुढे फणा वाकवून निघून गेला. मग मात्र राणी अधिकच भडकली. तिने दोन हिंस्र जंगली वाघ प्रभातीच्या अंगावर सोडण्याची व्यवस्था केली आणि आपण स्वतः दूर राहून, काय घडते ते पाहू लागली.

सकाळची वेळ होती. प्रभाती पूजेत मग्न होती. डोळे मिटून ती प्रभूची प्रार्थना करीत होती. इतक्यात राणीने ते दोन वाघ तिच्या अंगावर सोडले. वाघ प्रभातीच्या जवळ गेले आणि तिच्या चरणांवर डोके ठेवून परत फिरले. हे पाहताच राणी लगबगीने रथात बसून राजवाड्याकडे धावू लागली. ते वाघ राणीचा पाठलाग करीत राजवाड्यात आले. राणी एका महालात घुसली आणि दार बंद करून बसली. भयाने आणि पश्चात्तापाने ती व्याकुळ होऊन गेली होती.

इकडे वाघांनी राजवाड्यात धुमाकूळ मांडला होता. प्रभातीला हे समजताच ती राजवाड्यात आली. ती येताच वाघ शांत झाले आणि तिच्या इशाऱ्यासरशी अरण्यात निघून गेले. नंतर प्रभातीने राणीला अभय देऊन शांत केले. प्रभातीच्या सामर्थ्याची आणि क्षमाशीलतेची प्रचिती आल्यामुळे राणी विरघळून गेली. तिने प्रभातीचे पाय धरले आणि राजवैभवाचा त्याग करण्याचे ठरविले.

त्यानंतर राणी मरळीने देवाचे वैभवशाली मंदिर उभारले आणि स्वतःचे सर्व जीवन देवाच्या सेवेला वाहिले. राणी मरळी नृत्य-गायनात निपुण होती. मंदिरात देवापुढे नृत्य-गायन करता करताच तिने अखेर प्राण सोडला.

राणी मरळी ही पहिली देवदासी समजली जाते. राणी मरळीच्या उदाहरणामुळेच दक्षिणेत देवदासी बनण्याची प्रथा सुरू झाली.'

'भरळी' या शब्दाचे मूळ काय असावे, याची स्मृती नष्ट झाल्यानंतर 'भरळी'च्या म्हणजेच देवदासीच्या प्रथेचे स्पष्टीकरण करण्यासाठी लोकप्रतिभेने ही कथा निर्माण केलेली दिसते. अशा स्पष्टीकरण कथा निर्माण करणे हा लोकसाहित्याचा एक स्वभावविशेष आहे.

वाघ्या-मुरळ्यांचा 'जागरणा'चा कार्यक्रम आणि त्या कार्यक्रमात रंगणारी गाणी यांचे स्वरूप मोठे उद्‌बोधक आणि मनोरंजक आहे. 'खंडोबा' हा ज्यांचा कुलदेव आहे, अशा अनेक कुटुंबांत लग्नमुंजीसारख्या संस्कारानंतर बटूला अथवा वधूवरांना देवदर्शनाला घेऊन जाणे आणि वाघ्या-मुरळ्यांचे 'जागरण' करविणे हा कुलाचार रूढ आहे. 'जागरणा'चे स्वरूप अगदी 'गोंधळा'सारखेच असते. पाच उसांच्या मखरात प्रतीकात्मक देवस्थापना करून वाघ्या-मुरळ्यांचा समूह तुणतुणे, घोळ व खंजिरी या वाद्यांच्या साथीने खंडोबाची गाणी गाण्याचा जो कार्यक्रम करतो, त्यास 'जागरण करणे' किंवा 'जागरण घालणे' असे नाव आहे. हा 'जागरणा'चा कार्यक्रम आणि 'गोंधळा'चा कार्यक्रम यात थोडा भेद आहे. गोंधळात नाट्य, गीत आणि वाद्य यांचा मेळ असतो, तर जागरणात नृत्य, गीत आणि वाद्य यांचा मेळ असून, त्यावर नाट्याचाही रंग चढलेला असतो. कंबरेला पदर खोचून आणि कपाळाला भंडार फासून मुरळी पायांतील घुंगरांचा छुमछुमाट करू लागते आणि रुमालाला बांधलेल्या घंटांचा खणखणाट त्याच्या जोडीला धरू लागते, तेव्हा तिच्या त्या अवघड नृत्याला साथ देण्यासाठी वाघेही बेभान होऊन सरसावतात. कोणी तुणतुण्याची तार छेडू लागतो, कोणी डिमडी वाजवू लागतो, तर कोणी मुखाने 'हब् हब्' असा आवाज काढीत भंडाराची उधळण करतो. अशा बेभान स्थितीत नाचणारा वाघ्या-मुरळींचा समूह, त्या नाचात रंगणारी त्यांची शृंगारपोषक गीते आणि त्या गीतांच्या गायनाची उद्दीपक धाटणी या सर्वांचा संकलित प्रभाव पाहता असे सरळ सरळ दिसून येते की, तमाशाच्या घडणीत गोंधळाइतकाच या 'जागरणा'चाही वाटा असला पाहिजे. खास लावणीच्या ढंगात मुरळीने केलेला हा आत्माविष्कार[१] पहा, म्हणजे जागरणातील मुरळीच्या स्थानाची स्पष्ट कल्पना येईल :

**हळदीकुंकानं वटी माझी भरली**
**खंडेरायाची झाले मी मुरळी—ग बाई मुरळी ॥**

**घेउनी भक्तीची भंडारवाटी**
**मल्लूदेवाच्या लागले पाठी**
**'जय मल्हार' दिली आरोळी**
**खंडेरायाची झाले मी मुरळी—ग बाई मुरळी ॥**

१. 'तमिलनाडकी लोककथाएँ', पृ. ४०–४५.

आईबापानं नवस हा केला
कन्या वाहिली मल्हारीला
त्याच्या नामाची गोडी आगळी
खंडेरायाची झाले मी मुरळी–ग बाई मुरळी ॥

एक देवाचे मजला ध्यान
त्याच्याजवळी माझा पंचप्राण
पिवळ्या झेंड्यावर भंडार उधळी
खंडेरायाची झाले मी मुरळी–ग बाई मुरळी ॥

सारी नाती मी देवाशी जोडली
त्यानं हुकमानं मला इथं धाडली
सदा मल्हार माझ्याजवळी
खंडेरायाची झाले मी मुरळी–ग बाई मुरळी ॥

मुरळीची भूमिका ही अशी आहे. तिच्या देवभक्तीत मस्ती आहे. शतकांच्या संस्कारांनी लौकिक श्रद्धेने या मस्तीला भक्तीच्या मंचावर नृत्य करायला लावले आहे. ही लौकिक श्रद्धाच या जातीची आहे की, तिला यात काहीच विसंगती वा विरोध जाणवत नाही. मुरळीची ही मस्ती मूर्तिमंत तुमच्या डोळ्यांपुढे उभी करणारे हे एक गीत पहा. या गीतात मुरळी बनण्यासाठी आतुर झालेल्या एका सोळा वर्षांच्या ग्रामीण तरुणीचे चित्र वेधक शब्दांनी सजीव बनविले आहे[1]:

वय सोळा कोवळी काया, हूडपणात घुंगरु पाया
लागे नाचाया, लागे नाचाया, लागे नाचाया
पोर बावरी झाली पहा जेजुरीला जाया ॥

नव्या नव्या वाऱ्याने हिचे भारावले अंग
या अशा वयातच बदलू पाहे ढंग
उतावीळ मल्हारीसंगे लगीन लावाया ॥

नव्या वाऱ्याच्या संचाराने जिचे अंग न् अंग भारावले आहे आणि त्यामुळे अशा वयातच जिच्या वागण्याचा ढंग बदलला आहे, अशी ही सोळा वर्षांची कोवळी पोर 'बावरी' बनली आहे आणि तिच्या अंगांगांतून थरथरणाऱ्या यौवनाला पायातील घुंगरांचा हूडपणा आपल्या छनछनाटाने साथ देत आहे. अशा मन:स्थितीतील पोरीची हालचाल कशी असेल ? 'तुणतुण्याला टाक द्यावा तशी हिची हालचाल' अशा प्रत्ययकारी शब्दांनी वाघ्या तिच्या हालचालीचे वर्णन करतो :

तुणतुण्याला टाक द्यावा, तशी हिची हालचाल
कमरेला पदर खोउनी, उडवी रुमाल
भारीच झाली बेताल हिला आवराया ॥

१. 'एक होता राजा . . .' (वाघ्या-मुरळ्यांचीं गाणीं), पृ. ३९ व ४६.

भंडाराचा मळवट भरूनिया गोऱ्या ल्हाटी
तशी कवळ्या कवळ्या हाती घेऊनि घाटी
चहू दिशेला भंडारवाटी लागे उधळाया ॥

मुरळीने केलेल्या या भंडाराच्या उधळणीत तिच्या लौकिक पातळीवरील भक्तीतील मस्तीच वारा प्यायल्याप्रमाणे उधळत असते.

वाघ्या-मुरळ्यांच्या मुखी असणारी ही गीते पाहिली, तर त्यांचा असा एक विशेष जाणवतो की, त्यांचा अंतर्बाह्य ढंग शाहिरी कवितेचा आहे. या गीतकारांनी खंडोबाकडे एखाद्या मराठी शिलेदाराची वा सरदाराची भूमिका दिली आहे आणि त्या भूमिकेतील त्यांच्या प्रणयाचे रंगढंग थेट लावणीच्या सुरांत नव्हे, लावण्या लिहूनच चितारले आहेत. अगदी अलीकडे कै. प्रा. वा. दा. गोखले यांनी 'श्रीखंडोबाची पदे'[1] या नावाचा खंडोबाविषयक एकोणपन्नास गीतांचा संग्रह प्रसिद्ध केला आहे. ही गीते श्रीभाऊमहाराज पोवार या खंडोबाभक्ताच्या संग्रहातील असून, ती सर्व वाघ्या-मुरळ्यांच्या कार्यक्रमातील दिसतात. या गीतात बाणाईचे हरण, म्हाळसा बाणाई या सवतींचा कलह, देवाचा दसरा-दिवाळीच्या सणांतील थाट, खंडेरायाचा विवाह, सोमवती यात्रेचा सोहाळा, इत्यादी विषय आलेले आहेत. ही गीते प्राधान्याने खंडोबाच्या जेजुरी क्षेत्राशी संबद्ध आहेत. या गीतांच्या कर्त्यांची नावे समाप्तिमुद्रांतून गोवलेली आहेत. बापू वाघ्या, धोंडू ग्यानू, शंकर वाघ्या, बाबाजी गोकूळ, बाळा कृष्ण, हैबती, विठू वाघ्या, मुकिंदगुरूचा चेला, गंगाराम, मल्ल वाघ्या, इत्यादी रचनाकारांची नावे आढळतात. या पदसंग्रहात 'महाराजा, मल्हारी रे। तुझ्यावीण कोण तारी ।।', 'मल्हारी, किती तुझे गुण गाऊ । तुझ्या चरणी लंपट होऊ ।।', 'मल्हार नाम बहु गोड ।' अशी काही भक्तिगीतेही आहेत; परंतु ती संख्येने कमी आहेत. बहुसंख्य गीते शाहिरी ढंगाचीच आहेत. खंडोबा आणि बाणाई यांच्या पहिल्या भेटीचा प्रसंग चितारताना गीतकार म्हणतो :

बाणूनं करुनिया ग थाट
शिरी ग दुधाने भरून माठ जी ॥

जात होती बाजाराच्या वाटं
पडली देवाची गाठ जी ॥

पदर धरला बळकट
बाणू म्हणे, 'सोड माझी वाट जी ॥

धनगर आहेत आरबट
तुशी ते करतील खटपट जी' ॥

१. 'श्रीखंडोबाचीं पदें' : संपादक व प्रकाशक प्रा. वा. दा. गोखले, पुणे. ('वाघ्या-मुरळींचीं पदें' या नावाचा एक छोटा संग्रह मुंबईच्या बा.ल.पाठक प्रकाशनानेही प्रसिद्ध केलेला आहे.)

बाणू झिडकारी महाराज
बाणू झिडकारी मल्हारी
'सोड पदर जाऊ दे घरी जी' ॥

हा ढंग थेट लावणी-वाङमयातील राधेला अडविणाऱ्या कृष्णाच्या शृंगार-वर्णनासारखा आहे. देव बाणाईच्या नादी लागल्यावर म्हाळसेची उपेक्षा सुरू झाली. गीतकार म्हाळसेची मनोव्यथा म्हाळसेच्याच शब्दांत व्यक्त करताना म्हणतो :

सेज केली महाली जी ।
लाविल्या समया सात
अरे हो, वाट पाहिली साऱ्या रात्री जी ॥

देवा, माझी त्रासली नेत्रं
अरे हो, कोठे गेली होती स्वारी जी ॥

कोणाच्या मंदिरी जी ।
खरे सांगा मल्हारी जी ।
मला कळले अंतरी जी ॥

लुब्ध तुम्ही झाला बाणूला
अरे हो, म्हाळसा म्हणे देवाला ॥

बाहेरख्यालीपणा करणाऱ्या नायकाला छेडताना गरती नायिकेच्या मुखातून असेच उद्गार शाहिरांनी काढलेले दिसतात. खंडोबा आणि बाणाई यांचा एक नाजूक प्रणयप्रसंग चितारताना भक्त शाहीर म्हणतो :

मुख दावुन बानू ग गेली ।
स्वारी देवाची ग वेडी झाली जी ॥

एकदा मध्यान्हीच्या अमलात
देव मल्हारी निद्रागत
बानू नार आली शयनागारात
हिनं उशाला मांडी ग दिली ।
स्वारी देवाची ग वेडी झाली ॥

ह्या ग बानू नारीचं अंग
जसं चमके ऐनाचं भिंग
देव मल्हारी झाले दंग
गोष्ट देवाच्या मनी ग ठसली ।
स्वारी देवाची ग वेडी झाली ॥

बाणाईच्या छंदाने वेडा झालेल्या देवाचा अनुरोध करताना म्हाळसा आवेगाने म्हणते :

**अरे देवा, त्वां मसी बोलावं गोड ।**
**तुला बाणूचं भरलं वेड ।।**

**मौजा केल्या रे बहू प्रीतीनं**
**कुठं नाही रे पडलं उणं**
**एकाएकी झालास रे बेमान**
**फार मन केलं रे कठीण**
**कसं रे बाणूनं लावलं वेड**
**देवा मल्हारी, सोडिला गड ।।**

एवढ्या नमुन्यांवरून या पदांची जडणघडण आणि त्यातून व्यक्त झालेल्या भावभावनांची जात कशी थेट लावणीच्या वळणाची आहे, हे लावणी वाङ्‌मयाशी परिचय असणाऱ्या मराठी रसिकांना मुद्दाम स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाही. खंडोबाचे भक्त अशा थाटात गाणी रचतात, गातात आणि त्याचे उपासक ती तन्मयतेने ऐकतात, हे सत्य लोकधर्माच्या स्वरूपावर वेगळाच प्रकाश टाकते.



## अनुक्रम



# खंडोबाचे नवरात्र :

## सटीचे नवरात्र

निवेदिका : **सौ. कुसुम कुलकर्णी**

आपल्या हिंदुधर्मात अठरापगड जाती व अठरापगड धर्म प्रथा रूढ आहेत. ज्याला आपण कुळधर्म किंवा कुळाचार म्हणतो तो प्रत्येक जातीत तसेच प्रत्येक पोटजातीतही वेगवेगळा असल्याचे आढळून येते. याच कुळाचारांपैकी सटीचे नवरात्र हा एक कुळधर्म आहे. विशेषत: देशस्थ ब्राह्मण व मराठा जातीत रूढ असलेला असा हा कुळाचार आहे.

खंडोबा हे अनेक लोकांचे कुलदैवत मानले जाते. खंडोबालाच म्हाळसाकांत असेही म्हणतात. खंडोबाची पत्नी म्हाळसादेवी. खंडोबाची देवालये विशेषत: गावाच्या शिवेजवळ अगर गावाबाहेरच असतात. जेजुरीला खंडोबाचे निवासस्थान आहे. हे प्रमुख असून ते जाज्वल्य दैवत आहे असे मानले जाते. ज्या घरात खंडोबा हे कुलदैवत असते त्या घरात लग्न झाल्यावर प्रथम नव्या नवरानवरीने व नंतर मुलगा झाल्यावर सहकुटुंब सहपरिवार खंडोबाच्या दर्शनाला जाऊन येण्याची प्रथा आहे.

खंडोबाची मूर्ती साधारणपणे विठोबाच्यासारखीच असते. पांढरे धोतर, डोक्यास रुमाल, अंगरखा व उपरणे, हा साधा सर्वसामान्य पोशाखच देवळात आढळतो. देवाला बेलभंडार वाहणे हीच मुख्य भक्ती असते. बेलभंडार म्हणजे हळदीची पूड घेऊन त्यात सुक्या खोबऱ्यांच्या वाटया घोसळतात व तोच प्रसाद सर्वांना वाटतात.

खंडोबाची उपासना करणारे लोक मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपासून षष्ठीपर्यंत सटीचे नवरात्र म्हणून कुळधर्म पाळतात. प्रतिपदेला देवाची स्वच्छता, घासपूस करून देवाची पूजा करितात. देवावर पहिल्या दिवशी विड्याच्या पानांची माळ बांधतात. नाही तर शेवंतीची माळ लावतात. यावेळी सहा दिवस देवाजवळ तेलाचा अखंड नंदादीप तेवत ठेविला जातो. ज्याने नवरात्राची पूजा

करावयाची त्याने तेल वगैरे लावून शुद्ध स्नान करावे व मग पूजा करावी असा रिवाज आहे. देवाला रोज माळ, पूजा, आरती असा कार्यक्रम असतो. नवरात्र जरी म्हणत असले तरी हा सोहाळा फक्त सहा दिवसच असतो. घरातील कर्ता पुरुष अगर स्त्री सहा दिवस उपवास करते. ज्या दिवशी सट असेल त्या दिवशी पुरणपोळीचा नैवेद्य करून उपवासाची सांगता केली जाते. सटीचे दिवशी ब्राह्मणाला भोजनाला बोलावून त्याला दक्षिणा दिली जाते. या दिवशी सर्व स्वयंपाक तयार करून देवाला पूजाअर्चा, माळ वाहून नैवेद्य दाखविला जातो. यावेळी पुरणाच्या सबंध पाच पोळ्या व इतर सर्व पदार्थ पानात वाढून आरती करतात. नंतर एका ताम्हनात खोबऱ्याचे तुकडे व हळदीची पूड घालून ते तुकडे त्यात पिवळे करतात. त्या ताम्हनात दिवा, हळदीकुंकू व अक्षता ठेवून घरातील सर्व मंडळी एकत्र जमून ती तळी उचलतात. यालाच तळी भरणे म्हणतात. यावेळी तीन वेळा ही तळी वर उचलून खाली ठेवतात व तोंडाने 'येळकोट येळकोट' असे म्हणतात. नंतर खंडोबाची आरती होते.

लग्नकार्यात खंडोबाचे टाक करून घेतात. एरवी कधीही न करता लग्न-कार्यातच ते नव्याने करतात व त्यावरच ही माळ बांधली जाते. सटीचे दिवशी वेशीवरील खंडोबाचे देवळात पोतासाठी तेल व नैवेद्य सोवळ्याने घेऊन जातात व तेथेच नैवेद्य दावून, पोत पेटता ठेवून, घरी येतात. लग्नकार्यानंतर गोंधळ घालण्याची चाल असते. त्यावेळी खंडोबालाच पाचारण केले जाते व त्याचाच गोंधळ घातला जातो.

काही घरांतून हे नवरात्र मागून घेतलेले असते. खंडोबा हे नवसाला पावणारे दैवत आहे असे मानले जाते. चोरी वगैरे केली असता 'बेलभंडार उचल' असा वाक्प्रचार आपणाकडे आहे. यावरून बेलभंडाराला लोक किती मानतात ते लक्षात येते.

विठोबासारखेच सर्व लोकांना दर्शनाला खुले असणारे असे हे दैवत आहे.





# श्रीखंडोबामहाराज

निवेदक : **श्री. नि. छो. लोहार**

आपल्या महाराष्ट्रात बहुतेक प्रत्येक गावाला खंडोबाची देवळे आहेत. खंडोबाची यात्रा चंपा षष्ठी, दांडी पौर्णिमा (माघ शु॥ १५) या दिवशी भरते. खंडोबाला खोडा बेडी, लंगर तोडणे, मुरळी सोडणे, गळ खेळणे इत्यादी नवस केले जातात—

दिंडोरी तालुक्यात वरखेडे या नावाचे एक साधारण २॥-३ हजार लोकसंख्येचे गाव आहे. तेथे मार्गशीर्ष शु॥ षष्ठीला मोठी यात्रा भरते. वरखेडे येथील खंडोबाचा मोठा नवस म्हणजे गळ खेळणे हा होय.

गळाचा नवस असला म्हणजे जेवणाचा बेत बकऱ्याचा करावा लागतो. त्यावेळी आपल्या मित्रमंडळींना व आप्तेष्टांना जेवण्याचे आमंत्रण देतात. यात्रेच्या दिवशी सर्व लोक त्या ठिकाणी जमतात. स्वयंपाक तयार झाला म्हणजे सर्व लोक नवस देण्यास निघतात. ज्याने नवस केलेला असेल त्या माणसाच्या कमरेला व दोन्ही दंडांना कासरा (दोरा) बांधतात. त्याच्या पाठीवर खांद्याच्या थोडे खाली मासे धरण्याच्या गळाप्रमाणे लोखंडाचा दाभणापेक्षा बारीक व सुईपेक्षा जाड असा गळ केलेला असतो. तो नवस फेडणाऱ्याच्या पाठीवरील कातडीत टोचतात. त्या गळाला पाठीमागे एक सुतळी बांधलेली असते. ती दोरी एका माणसाच्या हातात असते. जो गळ खेळतो त्याच्या डोक्यावर छत धरतात. त्याच्या एका हातात नैवेद्याचे ताट व दुसऱ्या हातात पूजेचे ताट असते. तो पुढे चालतो व त्याच्या मागून भक्तगण चालतात. त्यांच्या मध्येच वाघ्या-मुरळी असतात व ते खंजिरी आणि धाटी वाजवून गाणे म्हणतात. गर्जना करतात.

नवस देऊन परत आल्यावर जेवण्याकरिता बसतात व तळी भरतात. तळी भरणे म्हणजे एका ताटात हळद, कुंकू, खोबऱ्याची वाटी घेऊन त्या ताटाला पाच लोक हात लावतात व खंडेरायाचे स्तोत्र म्हणतात.





# तिळेऱ्याचा खंडोबा

निवेदक : **श्री. रा. वि. अधिकारी**

फार वर्षांपूर्वी तिलोरे गावातील एक गवळी मोठा भाविक होता. त्याची जेजुरीच्या खंडोबावर अत्यंत श्रद्धा होती. तो दरसाल नियमाने चंपा षष्ठीला जेजुरीला खंडोबाच्या यात्रेला जात असे आणि खंडोबाचे मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणाने दर्शन घेऊन परत आपल्या गावी येत असे. त्याने आपल्या या नियमात कधीही अंतराय पडू दिला नाही. अशा तऱ्हेने कित्येक वर्षे आली आणि गेली पण गवळ्याचा यात्रेला जाण्याचा नियम अभंग राहिला होता. त्याची खंडोबावरील श्रद्धा पहिल्यासारखीच अढळ राहिली होती.

पण काळाच्या प्रभावातून कोण सुटला आहे ? तो गवळी म्हातारा झाला. म्हातारपणाने त्याची गात्रे विकल झाली होती. त्या काळात आतासारखी दळण-वळणाची सोयीस्कर साधनेही नव्हती, आणि असे सुखकर रस्तेही नव्हते. पदरी घोडे बाळगणाऱ्या श्रीमंत लोकांची गोष्ट सोडून दिली तर सर्वांना प्रवास पायीच करावा लागत असे. आणि तोही डोंगरदऱ्यांतून, काट्याकुट्यांतून आणि खाच-खळग्यांतून, दगडगोटे तुडवीत आणि ठेचा खात. चंपा षष्ठी जवळजवळ आली होती, म्हणून तो म्हातारा गवळी अंगात त्राण नव्हते तरी निर्धाराने जेजुरीला जाण्याकरिता निघाला. त्याला प्रत्येक पाऊल मोठ्या कष्टाने उचलून टाकावे लागत होते. पण त्याचा निश्चय विलक्षण दृढ होता. त्याच्या शरीराला दुबळेपणा आला होता. पण मन अत्यंत खंबीर होते. तो आपल्या शरीराला होणाऱ्या यातनांची लवमात्र पर्वा न करता चालला होता. वाटेत ठेचा लागून त्याचे पाय रक्तबंबाळ होत होते. काटे मोडून पायांची चाळणी होत होती, आणि काटे काढावयासही त्याला दिसत नव्हते ! श्रमाने शिणून शरीर इतके थकून जावयाचे की रात्री सर्वांगाला ठणका लागत असे. पण तो गवळी खंडोबाच्या भेटीची आस पोटात ठेवून हालअपेष्टांची पर्वा न करता पुढे जाई.

तो आपल्याकडून चालण्याची त्वरा करीत होता. पण त्याच्या थकलेल्या शरीराचा नाइलाज झाला असल्यामुळे त्याच्याने अपेक्षेइतका पल्ला तोडवत नसे. अखेर आपण चंपा षष्ठीला वेळेवर जेजुरीला पोचू की नाही अशी धास्ती त्याला वाटू लागली होती. अशा परिस्थितीत तो कळवळून खंडोबाची विनवणी करीत चालला होता, 'देवा, खंडेराया, माझा आजपर्यंतचा नियम नको रे भंग पावू देऊस ! आजपर्यंत सांभाळून घेतलेस तसेच त्याच्या पुढेही सांभाळून घे !'

त्याच्या विनवणीमुळे आणि त्याच्या अंतःकरणातील भक्तीने त्या भक्तवत्सल खंडोबाला दया आली. एके दिवशी रात्री त्याच्या स्वप्नात खंडोबाने त्याला दर्शन दिले आणि त्याला देव म्हणाला, 'तुझी भक्ती आणि व्रतावरील निष्ठा पाहून मी संतुष्ट झालो आहे. तुला यापुढे जेजुरीला यावयाचे कष्ट घेण्याची जरूर नाही. तुझे कष्ट वाचवण्यासाठी मीच तुझ्या गावातील डोंगरावर येत आहे. तू आता परत फिरून आपल्या गावी जा. मी तुझ्या गावच्या डोंगरमाथ्यावर भेटेन, तेथेच माझी पूजा करीत जा !' असे सांगून खंडोबा अंतर्धान पावला.

दुसरे दिवशी सकाळी जागा झाल्यावर गवळी परत गावाकडे फिरला. त्याची खंडोबावर मोठी श्रद्धा होती. त्याने खंडोबाच्या स्वप्नातील भाषणावर विश्वास ठेवून शंकारहित अंतःकरणाने जेजुरीस जाण्याचा निर्णय रद्द केला आणि तो परत तिलोऱ्यास आला.

तो परत आल्याचे पाहून गावकऱ्यांना मोठे नवल वाटले. त्यांनी असे कसे घडले म्हणून त्याच्याजवळ चौकशी केली. त्याने घडलेली सर्व हकिगत सांगितली. मग सर्व गावकऱ्यांना नवल वाटून त्याच्या म्हणण्याचा प्रत्यय पाहण्याकरिता ते सगळेजण त्याच्यासह डोंगरावर गेले आणि तेथे पहातात तो खरेच डोंगरमाथ्यावर त्याच्या सांगण्याप्रमाणे खंडोबाची मूर्ती त्यांना दिसली. आपल्याला शीण होऊ नये म्हणून देवाने येथे येऊन रहाण्याचा शीण घेतला हे पाहून त्या म्हाताऱ्या गवळ्याचा भरून आले. त्याचे अंतःकरण सुखावून गेले आणि भक्तीने उचंबळून येऊन त्याने खंडोबाच्या पायावर मोठ्या प्रेमाने लोळण घेतली. देवाच्या चरणांवर आनंदाश्रूंचा अभिषेक केला. मग त्याच्यासह सगळ्या लोकांनी तेथे मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणाने खंडोबाची पूजा केली.

पुढे तेथे कोणी तरी चांगले पाषाणाचे चिरेबंदी देऊळ बांधले आहे. त्याबद्दलचा शिलालेखही त्या देवळावर खोदविला आहे असे म्हणतात. महादेव कोळी (डोंगरकोळी) लोक सांगतात की, उंबर्डीच्या कोळी राजाच्या प्रधानाने हे देऊळ बांधलेले आहे. ते काही असो. पण तिलोरे येथील खंडोबाला जेजुरीच्या खंडोबाला केलेले नवस फेडण्यासाठी गेले असता चालते अशी पुष्कळांची श्रद्धा आहे.



# कुळधर्म

निवेदक : **श्री. शंकर दवणे**

खंडोबाचे भक्त नेहमी जेजुरीची वारी करतात. लग्न झाल्यानंतर नव्या दांपत्याने जेजुरीस 'वर पाया पडावयास' जाण्याची प्रथा काही घराण्यांतून आढळते. कित्येक लोक गावाबाहेर जाऊन ज्या दिशेला जेजुरी असेल त्या दिशेला तोंड करून देवाची पूजा करतात. चंपा षष्ठीच्या दिवशी काही घराण्यांतून अशी चाल आहे की, सायंकाळी घरातील प्रमुखाने 'चला जेजुरीला' असा पुकारा करावयाचा. तो होताच घरातील सर्व लहानथोर स्त्री-पुरुष मंडळी अंगावर चांगले कपडे चढवितात. सुवासिनी हातात पंचारती घेतात. कोणी तरी एक जण मशाल पाजळतो. दुसरा हातात तेलाची बुदली घेतो. असा सर्व जामानिमा सिद्ध झाला की, सर्व घराबाहेर पडतात व दाराशी येऊन ज्या दिशेला जेजुरी असेल त्या दिशेकडे तोंड करून देवाचे पूजन करतात.

खंडोबाचे भक्त रविवार हा दिवस पवित्र मानतात. काही घराण्यांतून या दिवशी 'वारी' मागण्याची पद्धती आहे. घरातील कोणा तरी व्यक्तीने हाती ताम्हण घेऊन पाच घरी जावयाचे. प्रत्येक घरी जाऊन 'वारी खंडोबाची' असे मोठ्याने म्हणावयाचे. अशा रीतीने जमा करून आणलेल्या पिठाची भाकर करून ती जेवणाच्या वेळी घरातील सर्व मंडळींनी प्रसाद म्हणून खावयाची. वारी मिळाल्यावर अन्नाची कधी तूट पडत नाही अशी समजूत आहे. या वारीचा दुसराही एक घरच्या घरी प्रकार आहे. कुळधर्माच्या किंवा चंपा षष्ठीच्या दिवशी घरी पुरणावरणाचा स्वैपाक होतो. त्या दिवशी सवाष्ण-ब्राह्मण जेवावयास असतात. पूजा, नैवेद्य, तळी, आरती व वैश्वदेव होऊन सर्वांची पाने वाढली की, घरातील एखाद्या व्यक्तीने एखादी ताटली घेऊन पाटावर बसलेल्या सवाष्ण-ब्राह्मणापुढे जावयाचे व 'वारी खंडोबाची' असे म्हणावयाचे. सवाष्ण-ब्राह्मणांनी आपल्यापुढील ताटातून पुरणाच्या पोळीचा तुकडा तुपात भिजवून तो व थोडासा

भात ताटलीत टाकावयाचा. ही वारी घरातील सर्व मंडळींना वाढावयाची व मग पंगत सुरू करावयाची. कुळधर्माच्या दिवशी कित्येक घराण्यांतून वाघ्या-मुरळी जेवावयास घालण्याचाही प्रघात आहे. कुत्र्यालाही या दिवशी पोळी टाकतात.

महाराष्ट्रातील ब्राह्मण घराण्यांतून चातुर्मासात कांदा, लसूण व वांगी वर्ज्य असतात. वांगी खंडोबाच्या नैवेद्याला चातुर्मास सोडून आठ महिने चालतात. कांदा मात्र नैवेद्याला फक्त चंपा षष्ठीच्या दिवशीच चालतो. ज्यांचे खंडोबा हे कुलदैवत आहे त्यांना चंपा षष्ठीनंतर कांदा. लसूण व वांगी खाण्याची मुभा असते. इतर घराण्यांतून तुळशीचे लग्न झाल्यावर वरील जिनसा खाण्यास मोकळीक असते. चातुर्मासात कांदा, लसूण व वांगी खाल्ल्यास तोंड वाकडे होते असे लहान मुलांना धाक घालण्यात येतो. त्यामुळे आपले तोंड वाकडे होईल या भीतीने मुले हे जिन्नस वर्ज्य करतात.

खंडोबा कुलदैवत असलेल्या घराण्यांतून देव्हाऱ्यात सोने, चांदी, पितळ यांचे ऐपतीप्रमाणे टाक असतात. सार्वजनिक देवालयांतून खंडोबा, म्हाळसा व बाणाई यांच्या पाषाणाच्या मूर्ती असतात. महाराष्ट्राचे राष्ट्रीय पक्वान्न पुरणपोळी खंडोबाला प्रिय असते म्हणून खंडोबाला कुळधर्माच्या किंवा चंपा षष्ठीच्या दिवशी पुरणाच्या पोळीचाच नैवेद्य असतो.

मार्गशीर्ष शु।। प्रतिपदेला खंडोबाचे नवरात्र सुरू होऊन ते सहा दिवस चालून चंपा षष्ठीला संपते. पहिल्या दिवशी ब्राह्मणाकडून नवरात्राची प्रतिष्ठापना करण्यात येते. काही घराण्यांतून ब्राह्मणाकडून मल्हारी-माहात्म्य या पोथीचा दररोज पाठ करविला जातो. सहा दिवस अहोरात्र नंदादीप तेवत ठेवला जातो. घरातील एखादी प्रमुख व्यक्ती पाच दिवस उपवास करते. पंचमीला नागदिवाळी असते. त्या दिवशी काही घराण्यांतून घरातील सर्व आबालवृद्धांनी उपोषण करण्याची प्रथा असते. या दिवशी देवावर साटोऱ्याचा फुलोराही बांधण्यात येतो. नागदिवाळीच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे चंपा षष्ठीला देवाची अभिषेकयुक्त पूजा झाल्यावर दिवटी बुदलीसह पुरणाची पंचारती करण्यात येते. घरातील सर्व पुरुषमंडळी तळी उचलतात. ती उचलून शिरापर्यंत नेताना खालील उद्घोष केला जातो :

बोला सदानंदाचा येळकोट !
हरहर महादेव चिंतामण मोरया भैरवाचा चांगभला येळकोट !



# अनुक्रम

संग्राहिका : **सौ. शरदिनी मोहिते**

चैताच्या महिन्यात देव खंडोबा झाला येडा
बानू लोटती तुजा वाडा

सकाळ उदरली कुतऱ्याचा घेगा
देवा माझ्या मल्लारीची बानू काढून नेली बघा

पुसाच्या महिन्यात देव मल्हारी नवरा झाला
सयासी किती सांगू चला देवाच्या लग्नाला

भंडाऱ्याचं जातं वढंना म्हाळसाला
उभी ऱ्होऊन सदऱ्याला हाक मारी बाणाईला

मल्लारीच्या घरी म्हाळसा दारून
बाणाईच्या अंगावरी पडं भंडारा चोरून

काकला कोकरु बानू निघाली नटत
देवा त्या मल्हारीनं झेंडा रवला पेटंत

नदी तारळला देव मल्हारी मासं मारी
म्हाळसा बोलती आमी लिंगायत नारी

आठा दिसाच्या ऐतवारी वाघ्यामुरळी माझ्या दारी
देव मल्हारी बोलत्याती ऊठ म्हाळसा वाढ वारी

संग्राहिका : **श्रीमती राधाबाई कुलकर्णी**

देवाच्या देऊळात उभी राहिली निवांत
कुळस्वामी खंडोबाचे ध्यान हृदयी साठवीत

म्हाळसा पालखीत खंडेराया घोड्यावरी
पोटीची बाळराजं तिच्या पुढल्या गादीवरी

म्हाळसा पालखीत बानूबाई ती घोड्यावरी
खंडेराया बरोबरी

आठ दिसा रवीवारी वाघ्या गर्जतो माझ्या दारी
कुळस्वामी खंडोबाला ऊठ म्हाळसा घाल वारी

बानूबाई म्हाळसा ग दोघींच्या दोन जाती
खंडेरायासाठी दोघी जेवील्या एका ताटी

म्हाळसा विचारीती बानूबाई तुमची कोण
आली माज्या सेवेसाठी जातीची धनगरीण

माझ्या ग अंगणात गजे ढोल्यांची झाली दाटी
प्राणसखा उधळीतो हाती भंडाराची वाटी

कुळस्वामी मल्हारीच्या पालखीला आलं सोनं
पोटीच्या बालकानो भक्ता तुम्हाला काय उणं

बेल भंडाराचा पुडा किती करू मी जतन
कुळस्वामीला विनंती तुझे भक्त हे लहान

बेल भंडाराचा पुडा घेऊ दोघीत समाईक
गुजरी भावजये सासर माहेरात कुळस्वामी आहे एक

उदास जीवनात राहिले मी समाधानी
कुळस्वामी मल्हारींनी दिले बाई दोन हिरे हिरकणी

उदास जीवनात तुमच्या जीवनी रमले
कुळस्वामी मल्हारींना नाही अंतरी विसरले

उदास जीवनात पुण्याई वडिलांची
मजवरी कृपा होती कुळस्वामी मल्हारींची

संग्राहिका : सौ. मालती दांडेकर

दिहा दरवडा धनगराच्या वाड्यावरी
नही नेलं भांडंकुंडं बानू नेली घोड्यावरी

म्हाळसा म्हनीते येडं झालेत मल्हारी
विसरून गेलं कोण्या झाडाला भंडारी

म्हाळसा वाण्याची बानूबाई धनगराची
नाही येंगली पायरी गडाची

म्हाळसा म्हनीते किती बाणाईचा चढ
नाही येंगू गेला जेजुरीचा गड

बानू तुझ्यासाठी खंडेराव झाले येडे
झाडू लागले धनगराचे मेंढवाडे

म्हाळसा होती बानू कशाला यालं केली
खंडेरावानं चाल दुनियेला लावली

हातात कोकरू बानू चालली नटत
जेजुरीच्या खंडेराव झेंडा रोविला वाटंत

धनगराच्या बानू तुजा धुरट येतो वास
भुलले मालूदेव तुझं सडक लांब केस

चोरी झाली धनगरवाड्या नाही नेली वाटी-लोटी
चोरीली बानूबाई जेजुरीच्या तळवटी

संग्राहक : **श्री. ब. गं. चौधरी**

बांधले मंदिर साठ दिसाची बांधणी
सोन्याच्या चौकावर मोत्याची चांदणी

बांधले मंदिर खिडक्या ठेवल्या हारोहार
सोन्याची सारशोभी देव गणपती मांडीवर

असे बसले पहाजी शंकर भगवान
त्यांच्या शेजीच आहे पारबतीचं ठिकाण

बांधले मंदिर त्याला बत्तीस कोपरे
एका कोप-यात देव भगवान वापरे

नगरच्या नगरनारी पाहती भिरी भिरी
खंडेराव सरदाराची सवारी घोड्यावरी

नगरच्या नगरनारी पाहती खिडकी वाटे
खंडेराव देवाजीच्या रुमालाचा तारा तुटे

मुरळी भरे पानी तिची शेवळी गेली खोल
देव खंडेराव बोले मुरळी झाली चक्राभूल

संग्राहिका : **सौ. शुभा वाजपेयी**

वान्या रे भाऊ बांध हयदीनी पुडी
मन-घर खंडेराव भंडारानी मोठी गोडी

देव खंडेराव खंडे खंडे झुंजे
त्याना डावा भुजे बानाबाई निजे

देव खंडेराव यावा खंडे खंडे तारा
त्याना डावा भुजे बानाबाई घाली वारा

देव खंडेराव याना खंडे खंडे मोती
त्याना डावा भुजे बानाई उभी होती

वाजती सयोगया वाजती शंखभेरी
खंडेराव नवरदेव सर्वा मुलखे चाल करी

जेजुरी गडावर सोनाना तालिमखाना
खंडेराव नवरदेव मुरल्या गाती गाना

बंधवाले सांगू आणू जेजुरी जत्रा भाऊ
चांदीना खंडेराव मोतीन्या लडा लावू

संग्राहक : डॉ. भाऊ मांडवकर

बानाई धनकराची माळसा वान्याची
वर जेजुरी सोन्याची देवा या मालोजीची

कुल्याचा कांघावा धनकराच्या व्राडचा
बानाई नेली गडा देवा या मालोजीनं

कुल्याचा कांघावा धनकराच्या येशी
बानाई नेली कशी देवा या मालोजीनं

बानाई धनकरनी तुह्या ताकामंधी केस
देवा ह्यो मालोजी व आला सवद्याच्या मिसं

बानाई धनकरनी तुह्या ताकामंधी लोनी
जेजुरीचा वानी लागून गेला ध्यानी

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

आल्या ग जल्मात सये जेजुरी करावी
नवलाखाची पायरी बाई ध्येनात धरावी

जेजुरी गडावरी आरोळी कुणी दिली
बाळकाची माज्या तळी शिखराला गेली

जन जाती जतरेला मी जाते न्हायाराला
बाप्पाजी बयाचं ग तिरथ ते घ्यायाला

जेजुरीचा गड अवघड सांगत्याती
भंडाराच्या गोण्या नंदी पायऱ्या चढती

बाजार भरीला ग हातचाल पेंबुरीचा
देवा त्या खंडेराया आला का जेजुरीचा

जेजुरीची आंबेराई सर्वी खाल्ली राघूयींनी
देवा त्या खंडेराया गेली निद्रा लागूयीनी

देवात वापरती मनुक्षात नवल कायी
खंडोबाच्या शेजारी ग धनगराची बानूबाई

म्हाळसा बानूबाई दोघी दळती भंडार
देव माझा खंडेरायी वाघ्या तोडीती लंगार

म्हाळसा ती असूनी केली बानाई चढाची
चढूनी न्हाई दिली हिला पायरी गडाची

म्हाळसाबाईवरी आली बानाई दारूनी
आईतवारादिशी भंडार पडतो चोरूनी

म्हाळसाबाई बोले मी ग वाणीयाची पोर
धनगराची बानाई हिने बाटविले घर

म्हाळसाबाई बोले मी का खाईन डाळरोटी
पाळिव बोलिगा धनगराच्या बानूसाठी

तेलणीचं तेल, तेल गेलं उडाउडी
जेजुरीच्या गडावरी दिवटे गेले चढाओढी

जेजुरी गडावरी नौबत वाजे धाईधाई
म्हाळसाबाई बोले शिंदे-होळकर आले न्हाई

जेजुरी गडावरी वाघ्या मुरळी नाचती
म्हाळसाबाई बोले नंदी गाडीचे बुजती

जेजुरी गडावरी वाघ्या मुरळींचा थवा
बानूबाई बोलयीती आणा गाडीला बैल नवा

जेजुरीचं एवढं तळं झालं पिवळं भंडारानी
आंघोळी एवढी केली मालूदेवा सजनानी

अस्तुरी घेऊयीनी नित जेजुरी करावी
नवलाखा पायरी आता ध्येनात धरावी

जेजुरीच्या वाटे झाल्या काळ्या करवंदी
देवा मल्हारीचा भंडाऱ्याचा गेला नंदी

वाकडे तिकडे कऱ्हाबाईचे वळण
देवा मल्हारीने डोंगरी घातीले दुकान

कऱ्हाबाईचे ते पाणी मोत्याच्या ववनी
देवा मल्हारीने शिड्या घातील्या पवनी

कऱ्हाबाईच्या तीरावरी भंडाऱ्याची गर्दी भारी
आंघूळीला आला देव पालखीत मल्हारी

धालेवाडीची आरती कोथळीचा शेला
दुही गावचा मान देवा मल्हारीला

म्हाळसाबाई बोले येळ लागली मल्हारी
इसरूनी आलो भंडारा झाडीवरी

म्हाळसाबाई बोले का हो मल्हारी रागात
गेलो होतो शिकारीला बानू धावली बागेत

जेजुरी गडावरी शिंग वाजलं लग्नाचं
देवा मल्हारीच्या शिरावरी बाशिंग सोन्याचं

जेजुरी गडावरी तोफांचा भडीमार
देव माझा मल्हारी एकला लढणार

जेजुरीचा गड कोण्या राजानं बांधीला
उंच कमानी दरवाजा आत चौक साधविला

## अनुक्रम

संग्राहक : श्री. रा. श्री. कदम

ऊठ लवकर मलुराया, म्हाळसा बोले प्रातःकाळी
उटणे मी लाविते तुम्हाला सण आज दिपवाळी ।। धृ० ।।

वृक्ष बकुळीवरती पक्षी रावे गजबजती
काकांचा किलबिलाट दारी, चिमण्या चिवचिवती
भक्त तळ्याचे पाणी कोकिळा आंबेवनी रहाती
तास पिंगळे उंच तरूवर मोर ठाव करती
कुंभ घेऊनी शिरी देवांगना पाण्याला जाती
काप्रापुर जेजुरी शुद्ध, सतरावी करा वाहाती
दीप सुगंधित उटणे भानू म्हाळसा लावती
घंगाळी उष्ण पाणी, देव चौरंगी न्हाती
पिवळे पितांबर कस्तुरी टिळा लेती
उभी फुलाई माळीण गळा हार घालिती
रंभाय शिंपीन बरवी शेल्याना दोरा भरती
एक म्हालावती मुरळी गुण आवडीने गाती
अलंकार अंगावर पिवळे, शालजोडी पिवळी
दिवे, चंदनाचे पाट बसाया, घालिती रांगोळी ।। १ ।।

छतमंडप झालरी फुलांचे पडदे मंदिरी
ठायी ठायी उदबत्त्या झाडे सुगंधित सारी
अंगणात दीपमाळा पेटल्या, आगीनझाडे चारी
घ्या दिवटी मशाल, पडला प्रकाश महाद्वारी
सडे सुगंधित अंगणी वर रांगोळ्या पाट
हारोहार समया जळती, ऋषीपंक्तीचा थाट
भानू माळसा वाढिती, हाती सोन्याचे ताट
अमृतफळ नारिंगी गोड, द्राक्षे अंजीर केळी
पुढे तबकामध्ये आणुनी ठेविती म्हालावती मुरळी ।। २ ।।

सुगंधित मुखी विडे रत्नभ लांबची प्रभा दिसती
भरगच्ची पोषाख अंगावर, जामा पठाण धरती
श्रीमंदिल शिरपेच कंठी, चौखडा ढाळ देती
वर मोत्याचा तुरा चमकतो, दिपकांच्या ज्योती
लखलखाट बिजल्यांचे तार स्वरूपाची तुटती
चालला गजर चरणी, नाद गगनामध्ये उठती
ऐकून नाद शिखरी, वर पारवे घुमती
जरीपदराचा झोक शेवरी निर्गुणाची पिवळी
केळीकर्दळीचा गाभा म्हाळसा फुलचाफेकळी ॥ ३ ॥

त्रिगुण सभागण धनदाट बसले दिवटे तीस कोटी
आले नारद तुंबर सभेमधी सांगती गोष्टी
वाध्यामुरळ्यांचा गजर हजर पुढे वाजती घाटी
अणुहात गगनात चौघडे मायेची दाटी
गुरु मुकिंदराज प्रसन्न गोड नाद बापूंच्या कंठी
हरिभाऊची जोडी निरंतर भक्तांच्या संभाळी गाठी ॥ ४ ॥

संग्राहक : श्री. ल. भा. गायकवाड

१

म्हाळसा म्हणे देवाला करावा मान ।
मी नाही बोलले तुमच्या गळ्याची आण ॥ धृ० ॥

देवा लग्नाची अस्तुरी म्हाळसा राणी ।
आज काय झाला आनेव सांगा मजपुनी ।
तुम्ही उठा की आंघोळीला खंडेराया ।
हंड्यामधी पाणी ठिवलं तुम्हाला न्हाया ॥
वेळील्या की साळी डाळी आणिक शेवाया ।
पाच घास भोजन जेवा खंडेराया ॥
धरतीवर आभाळाविण कशाची छाया ।
तुम्हावाचून माझी कोण करील माया ॥
तुम्ही दुसऱ्याचे ऐकून घेतले रान ।
मी नाही बोलले तुमच्या गळ्याची आण ॥ १ ॥

आला भानूला घेऊन पुरविला हेत ।
या सवतीला आणून ठेविली रंगमहालात ॥
सहा महिने मजला नाही तुमचं दर्शन ।
का कठोर झाला भानूच्या नादानं ॥

काय पडलं होतं उणं सांगितलं नाही ।
पंचप्राण सगळा देवा तुमच्या ठाई ।।
का धरला अबोला आढी आता सोडावी ।
मी शरण खंडेराया तुमच्या पायी ।।
आता चरणाची ही दासी लागते पाया ।
तुम्हा वाहियली मी चंदनाची काया ।।
हे बावन घरचं सोनं धरा तोलून ।
मी नाही बोलले तुमच्या गळयाची आण ।। २ ।।

२

धनी मैराळा आजानीला ।
एक रोकडी नामाची ।
परचित ऐका मल्हारी देवाची ।।
हरहर महादेव पार्वती भोळा शंकर ।
दैत्यासाठी खंडेरायानं धरला अवतार ।।
दैत्य मारून जार केले धन्य मल्हार ।
आक सक्तीनं आसुद पिऊन केला धुळकार ।।
करी डमरूचा बाजा नाद उठला अंबर ।
गळयात सैली शिंगी जोगीबुवा सरदार ।।
जोगेश्वरी शेश्याची कन्या हिचा भरतार ।
घेऊन इस्वाचा प्याला काळूला जैराशी चढली ।
परचित ऐका मल्हारी देवाची ।

३

म्या पाहिला पिवळा झेंडा
या देवाचा बाई ।। धृ० ।।
रात्री मजला स्वप्न पडले ।
मलुरायाचे दर्शन घडले ।
मी ग दचकुन जागी झाले ।
या देवाला बाई ।। १ ।। म्या . . .
बानू म्हाळसा या दोन्ही नारी ।
मधी शोभे देव मल्हारी ।
निळया घोडयावरती स्वार ग
देव पालेचा बाई ।। २ ।। म्या . . .
भक्तिभावानं पूजा केली ।
मनीची इच्छा पुरी झाली ।
धन्य देवानं जागी मला केली ।
या ग जन्मात बाई ।। ३ ।। म्या . . .

४

यात्रा भरली की धनदाट
बोला मल्हारीचा येळकोट ॥ धृ० ॥

नवलाखाची ही पायरी ।
खंडेरायाची ही जेजुरी ।
चला आनंदानं चढू घाट ॥ १ ॥ बोला . . .

मिळूनि आलो की सर्वजण ।
भरले आनंदानं माझे मन ।
पाहू डोळयानं देवाचा थाट ॥ २ ॥ बोला . . .

ऊद कापूर नारळ फोडू ।
चला भक्तांनो लंगर तोडू ।
मग होणार देवाची भेट ॥ ३ ॥ बोला . . .

५

या कडेकपारी देवाचं ठाणं ।
संकट पडे भक्ताला उदेकारणं ॥
देव उतारले तळवंटी जागा पाहून ।
ही गुपीत काया साक्ष वादळं दोन ॥
देवाचं लागलं ध्यान रातरादिन ।
दखनात खंडेराया नांदे हौसेनं ॥ १ ॥

लई पैसा खरचला त्या की होळकरानं ।
देवाचं देणं त्याला प्रसन्न मलुखानं ॥
पायऱ्या बांधिल्या दाट दिवटयांचा लखलखाट ।
ही करणी केली आगळी आगीनझाड आच्याट ॥
धन्य धन्य तू मल्हारी देवा धन्य तुझं देनं ।
दखनात खंडेराया नांदे हौसेनं ॥ २ ॥

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

१

मुरळी करून शिणगार भंडाराचा जी
तिनं झोक लाविला पिवळया पातळाचा जी
हाती धरून चालती घोळ निऱ्याचा जी
पुढे पाऊल टाका ठोका धाटीचा जी
गळयात भंडार सिक्का हाय देवाचा जी
येळकोट बोलती गजर नामाचा जी
पुढे कुत्रा भुंकतो बानुबाईचा जी
मुरळी करून शिणगार भंडाराचा जी

२

खंडेराया भोळ्या देवा मला आवड तुमची जी
मला आवड तुमच्या बोलाची जी
केली ग निद्रा दोन फेराची जी
सई मला झाली बानू ग नारीची जी
काही आडी धरली ग मनाची जी
सोडा मिठी तुम्ही व खांबाची जी
वेळ आली होती ग आनंदाची जी
सेवेला दासी मी उभी तुमची जी
मला आवड तुमच्या गुणाची जी
खंडेराया भोळ्या देवा मला आवड तुमची जी

३

नंद पालीमध्ये ग म्हाळसा
देव मल्हारी देव मल्हारी
चालले देव लग्नाला
निघाली हो स्वारी
सटीला लागलं ग तेल मार्तंडाला
इंजीबाई कुरवली हळद लावी अंगाला
धाडिल्या लगीनपत्रिका भक्तजनांला
पुशिवाच्या पूर्णिमेला यावे लग्नाला
चोहोकडे केली ताकीद गोरगरिबांला
शुद्ध मृग नक्षत्रादिशी यावे लग्नाला
भक्त हो तातडी यावे लग्नाला
आनंद सुखाचे घडी
पुढे शिवणकराची गाडी
वाजत्या नगारा झोडी
वाघ्या-मुरळ्या परवडी
झाली पुजाऱ्याची वडावडी
करी निवदाला गडबडी
मिरवीत स्वारी गेली तारळी तीरी
देवळातून देव उठला आला बाहेरी
मुखी येळकोट बोलती जत्रा सारी
पाटलानं देव घातला की घोड्यावरी
झाली भंडाऱ्याची चोरी उडती चौरी
यात्रा आली वाळवंटी
यात्रेसी मिळाली दाटी
भंडार खोबऱ्याची वाटी

भरभरून टाकितो मुठी
आले बघे खोबऱ्यासाठी
उडाली काठीवर काठी
मिरवित स्वारी आली तारळीतीरी
घाटावर झाली दाटी
गर्दी चहूकडे, झाला वाद्यांचा गजर
वाजे चौघडा हो वाजे चौघडा
स्वारी आली मांडवा दारी
केली बोहल्याला तयारी
आले वैदिक बामन चारी
मंगलाष्टका बोले काकण बांधलं तरी
बाशिंग देवाचे शिरी
म्हाळसा देव दोघे बोहल्यावरी

## ४

रागे क्रोधे बोलली म्हाळसा ग बाई
तुमची हो चोरी मलुराया केली म्या काई
म्हाळसा बोले म्हाळसा हो बोले
देवाचं माझं माह्यार हो समशेरवाले
देव पिता माझा सावकार जी जी
ह्याच्या हो मतीत सोयरा बरोबर जी
नवलाख बामण आणून केला गजर जी
मांडिले लगीन मांडिले लगीन
बसविले बोहल्यावर जी जी
पाची बामन बोलविले परमेश्वर जी जी
मला परतून मला हो परतून
या आणविले पिंबरा ठायी हो
नवखंडाचे मालूचे आश्रित भारी जी
एका हाडाला दोन सुन्या कशा हो करणार
कुठवर शिकवू काय उमग धरा मनाला जी जी
तुमची हो चोरी मलुराया केली म्या काई
दोईचा झगडा जाईल जना लोकात जी
तुमी बैसाल, बैसाल भुई उकरीत जी
तापलं पाणी चवईला येईना परतून हो
भोळ्या देवा तुला कसा द्यावा वाटून हो जी जी
सवत लोण्याची जवळ नसावी हो ही
हिच्याकडं बघता शरीराची होती हो लाही

लिंब घोटावा, लिंब घोटावा, घोटावा ईकाच्या ठायी
तुमची हो चोरी मलुराया केली म्या काई
पाणी धंगाळी सारिले म्या देवासाठी
लाविलं उटणं हाती भंडाऱ्याची वाटी
आज बाई दिवस उगवला मला हौसंचा
मार्गीशर महिना हो चंपाषष्ठीचा
स्वरूप काय वर्णू काय हो वर्णू
जसा पूर्णिमेचा चांद फाकल्या प्रभा
तुटला तारा अस्मानाचा
तुमची हो चोरी मलुराया केली म्या काई

५

रुसलास का रे रुसलास मजवरी
मल्हारी बानू नार आणिली घरी
बानू या म्हाळसा या दोघी नारी
मधी बसले चतुर मल्हारी
भंडार बाई पडतो पडतो देवावरी
बानू नार आणिली घरी
नवलाख पायरी जेजुरगडाला
डिकमाळ शोभती हारुहराला
झेंडा बाई फडकतो, फडकतो गडावरी
बानू नार आणिली घरी
रुसलास का रे रुसलास मजवरी
मल्हारी बानू नार आणिली घरी

६

का रुसलास मैलागिरा हो हो जी जी
माझ्या कमळाच्या भवरा चल घरा हो हो जी जी
नित येतोस वाड्यावरून हो हो जी जी
नाही बघत मागे फिरून गेला दुरून हो हो जी जी
याने केला माझा मच्छरा हो हो जी जी
रंग रस घेतला सारा नाही जरा हो हो जी जी
हा सफेद बगळा खरा हो हो जी जी
सफेद बगळा खरा नवितीरा हो हो जी जी
देव मल्हार माझा बरा हो हो जी जी
मल्हार माझा बरा जसा हिरा हो हो जी जी

७

करमेना चांदनी रात देवा विना करमेना चांदनी रात
समई जळती मंदिरात देवा विना करमेना चांदनी रात
शेज मी कुसुमाची केली शेज मी कुसुमाची केली
रात्र मला वैऱ्याची गेली रात्र मला वैऱ्याची गेली
चला चला महाराज महाली चला की
काय हे केलेस धन्य तूं मल्हारी रे धन्य तूं मल्हारी
भल्या भल्याला रे केले वाघे गळचात भंडारी रे गळचात भंडारी
आहेव नारी केल्या मुरळ्या नाचे दारोदारी रे नाचे दारोदारी
धन्य तू मल्हारी रे धन्य तूं मल्हारी

८

हरहर महादेव चिंतामण मोरया
भैरवाचं चांगभलं आकडधूम नगारा
निळा घोडा पायात तोडा
अंगावर शाल सदा देव लाल
खोबऱ्याचा खडका भंडाराचा भडका
आरती करी म्हाळसा सुंदरी
देव ओवाळी नानापरी
बोला सदानंदाचा येळकोट

९

खंडोबाला नवस केला
चल जाऊ गो जेजोरीला

कडेपठारावर दिसेल शोभा
गडावरती कैसी येल ती मजा
बेल भंडाराचा भडीमार झालाया
चल जाऊ गो जेजोरीला

गादी मखमली घोऱ्यावर
चमके चांदी सोन्याचा पदर
ढामा टाकील वारु जायला
चल जाऊ गो जेजोरीला

बैसे खंडोबा घोऱ्यावर
त्यांनी घेतली माळसा दूर
आकाशी घोरा उरवील
चल जाऊ गो जेजोरीला

करा नदीचं पाणी झुळझुळ
देव तय आंघोली करतील
तो आंघोलीचा बघु सोहला
चल जाऊ गो जेजोरील।

१०

वय सोळा कोवळी काया हुडपणात घुंगरू पाया
लागे नाचाया, लागे नाचाया, लागे नाचाया
पोर बावरी झाली पहा जेजुरीला जाया

नव्या नव्या वाऱ्याने हिचे भारावले अंग
या अशा वयातच बदलू पाहे ढंग
उतावीळ मल्हारी संगे लगीन लावाया

तुणतुण्याला टाक द्यावा तशी हिची हालचाल
कमरेला पदर खोऊनी उडवी रुमाल
भारीच झाली बेताल हिला आवराया

भंडाराचा मळवट भरूनीया गोऱ्या ललाटी
तशी कवळ्या कवळ्या हाती घेऊनी घाटी
चहू दिसेला भंडारा वाटी लागे उधळाया

खंडोबाशी लग्न लावूनी आनंदी ही मुरळी राहील
पवित्र हिची भावना होईल
पायात आपली कुळी निघे बुडवाया

११

काकला कोकरू बाणू जातिया नटईतु
देवा मल्लारिनं झेंडा लाविला पेटईतु
देव मल्लारी म्हणईतु का ग म्हाळसा रागं रागं
गेलो व्हतो शिकारीला बानू लागुनी आली मागं
देव मल्लारी म्हणईतु का ग म्हाळसा रागमंदी
गेलो व्हतो शिकारीला बानू धावली बागमंदी
काकला कोकरू बानू जाती मेंडवाड्या
देव मल्लारी गारुड्या
बानाई धनगरणीच्या ताकामंदी लेंड्या
मल्लारी देव तिच्या राकितो शेळ्या मेंड्या
तारळी बाईला देव मल्लारी मासे मारी
म्हाळसाबाई म्हणी लिंगायताच्या आम्ही नारी

बानू म्हाळसाच्या दोघीच्या जाती
मल्लारी देवासाठी बैसल्या एका ताटी
धनगराची बानूबाई वाण्याची म्हाळईसा
घास गिळितु तिला कसा

१२
जेजुरीचा बाई वाणी आला माझ्या सपनी
सपन पडले प्रातःकाळी
स्नान केले गंगाजळी
घोडा नाचतो माझ्या अंगणी
घालुनी पितांबराची कास
पडला प्रिथिमीवरी प्रकाश
शेला झळकतो जसा ग अंगणी
देव आला ग माझ्या सपनी

१३
खंडेराव खंडेराव बानू प्यारी
हासून बात बोला गहिरी
खेत्रगाव बडा पिता आहे माझा
तो आहे मंगलपूरचा राजा
सातशे गवळ्यांच्या फौजा तुम्ही कराल चाकरी
हसून बात बोला गहिरी
चला उचला गवळणीचं भार
राजमंदिरी सातशे गवळ्यांच्या फौजा
तुम्ही कराल चाकरी
हासून बात बोला गहिरी

१४
म्हाळसा बोले देवाला का हो मसी अबोला
देवा जाता कुठे मनी कपट मोठे
नका जाऊ चंदनपुराला
केला बानूचा लाड झाला सवतीचा पाड
नका जाऊ चंदनपुराला
बाळू भैरव नेमानं येतो करतो भंजान
नका जाऊ चंदनपुराला बानूच्या गावाला
खंडेराया भोळ्या देवा पथराविन तुमची जी
मला आवड तुमच्या बोलाची जी
केली ग निद्रा दोन ग फेराची जी

सई मला झाली बानू नारीची जी
का वो आडी धरली ग मनाची जी
सोडा मिठी तुमी ग खांबाची जी
वेळ आली होती ग आनंदाची जी
सेवेला दासी मी उभी तुमची जी
मला आवड तुमच्या गुणाची जी

१८

हाकल देवा मेंढी बानूची
काई हो गोडी
घेऊनी हातामधी काठी
लागे शेळ्या मेंढ्या पाठी
खांद्यावर घोंगडी
या ग बानूच्या पायी
गेले चंदनपुरी ठायी
हाकल देवा मेंढी बानूची काई लई गोडी

## आरती

१

मल्हार देवराव कुलस्वामी माझा
अवतार धरिला आपल्या भक्तीच्या काजा
वरदी घाल मनी भाव
हा देव जेजुरीचा राजा हा देव पिंबरीचा राजा
आणखी रूप तुझे
दैत्या मारील्या पैजा
नाव घे मल्हारी माझे अनुभव आक्षरी
देव तू देवराव साक्षा वर्णीला चातुरी
म्हाळसा ही ईश्वर माता अर्ध्या अंगी परवेशा
घेतीस लोटांगण तो हा मल्हारी राजा,
रंका चरणीव तुझं देणं उधारा
रक्षीळ तुजवाचून कळी काळ भेदरा
येळकोट उभ्या उभ्या बोलती रे
आरती जय खंडेराया तुज पिंबरी ठाया
नळ उदगीरी गंगा म्हाळसा राया
आरती ओवाळी कुळस्वामी राया

२

देवाचा वाघ्या झाला
हाती घोळ कोटंबा दिला
भुकत गर्जत वाघ्या भक्तदारी आला
आदरमान सन्मान देवाचा बहु आदर केला
उत्तर पूर्व पश्चिम दक्षिण चारी कोन कोटंब्याला
सोडून सर्व गळयामध्ये लंगर घातेला
देवाचा सत्वर थोर लंगर आपोआप उत्तरला
विडा पाकेड वाघ्या हस्तकी धरला
जरी भक्तावर दया ऐसा वाघूबा बोलला

३

मस्तकी मुगुट अंगी सोन्याचा किल्ला
हाती खड्ग घेऊनी मारीत मणिमल्ला
कैलासाची प्रतिमा जेजुरीचा किल्ला
बसवुनी रक्षीत असती दक्षिण किल्ला
जय देव जय देव जय खंडेराया
अखंड भंडाराने डवडवली काया

चंपा षष्ठीचे दिवशी जे करीती कुलधर्म
त्यांची सफलपूर्ण होताती कर्मं
त्यांची तोडतोसी तात्काळ वर्म
जय देव जय देव जय खंडेराया
अखंड भंडाराने डवडवली काया

तुमची भक्ति जे जन करिती ते सर्व
जिकडे तुमचा धर्म तिकडे गौरव
मध्वनाथ जपतो येळकोट भैरव
निंदा करती त्यांनी होती रव रव
जय देव जय देव जय खंडेराया
अखंड भंडाराने डवडवली काया

संग्राहक : श्री. वा. सु. अहिरे

बानू चाल ग, चाल ग, सारंग्या बागात
तेथे उतरीला, उतरीला, जेजुरीचा वाणी
त्यांनी भरविल्या, भरविल्या, भंडाराच्या गोणी
जाऊन टाकल्या, टाकल्या, बानूच्या अंगणी

बानू चाल ग, चाल ग, सारंग्या बागात
तेथे उतरीला, उतरीला, जेजुरीचा वाणी
त्यांनी भरविल्या, भरविल्या, तांदळाच्या गोणी
जाऊन टाकल्या, टाकल्या, बानूच्या अंगणी
बानू चाल ग, चाल ग, सारंग्या बागात
तेथे उतरीला, उतरीला, जेजुरीचा वाणी
त्यांनी भरविल्या, भरविल्या, नारळाच्या गोणी
जाऊन टाकल्या, टाकल्या, बानूच्या अंगणी
बानू चाल ग, चाल ग, सारंग्या बागात
तेथे उतरीला, उतरीला, जेजुरीचा वाणी
त्यांनी भरविल्या, भरविल्या, सुपारीच्या गोणी
जाऊन टाकल्या, टाकल्या, बानूच्या अंगणी
बानू चाल ग, चाल ग, सारंग्या बागात
तेथे उतरीला, उतरीला, जेजुरीचा वाणी
त्यांनी भरविल्या, भरविल्या नारिंगाच्या गोणी
जाऊन टाकल्या, टाकल्या, बानूच्या अंगणी
जाऊन ठेपला, ठेपला, कडीज पायरी

संग्राहक : श्री. भालचंद्र सोनवणे

## जेजुरीचा खंडोबा

गिरण व मोसम ना मेळा तिथे सोनेरी पिंपळ
त्याले लाया रेशमी नाडा झोका खाती साती बाया
झोका खाता हार तुटना वेचून वेचूंनं हार गुंफला
तोहि हार म्हशांना गळे
जुंप रे म्हशा रंगीत गाडी
रंगीत गाडीले खिल्लारी जोडी
रथ चालना सूर्यातळे सूर्यातळे गाव मोध्याना
मोघ्यानी वस्ती बंदोबस्ती
गिरक्या मारी त्या कोटले
थाप पारी त्या दरबारले
दरबार होता भर झोपात तोडिले जंजरी कुलूप
देव गावात शिरला
देव गया दुबळान घर
नको येऊ बा मना घरा

तुझे अगणीचे घर मनारे अमंगळ संसार
तुनीरे नाही होणार सेवा
तुनी नाही होणार चाकरी
नकोरे खेडचा मन धरू

बोला भक्ताओ सदानंदाचा येळकोट! खंडेराव महाराज की जय! (वरील गाणे वारे अंगात येते वेळी आणि दिवटी-बुदली करते वेळी म्हणतात.)

## खंडोबा लग्नमंडप

काठ्या मांडवना गडना राजा
देव मांडव गड धरना राजा
मांडव घातले पितळी लाखा
तांबानी मेख सोनेरी देखा
मांडव गडावर निमर्न झाड
छाया पडे धम्मा घोर
छाया खाली देव रमला
देव दचकून जागाझाला
नजर गेली सूर्यातळी
सूर्यातळी गाव मोघ्यान
मोघ्यानी वस्ती बंदोबस्ती
गिरक्या मारे त्या कोटले
फेऱ्या घाले त्या कोटले
देव दरबार जवळ आला
दरबार होता भर झोपात
भर रात्री हाक मारी
हाक मारी त्या दरबारले
भाला लायात त्या कोटले
तोडी जंजरी कुलूप
देव गावात शिरला मल्हारी गावात शिरला

## जेजुरी नगरी

ह्या बाई जेजुरी नगरात कोऱ्या चांदणी महालात
म्हाळसा बानाई भांडती ऐकून मल्हारी हासती
सवती सवतीचे भांडण भोळ्या भक्ताचे कांडण
दोघी मुरळी नाचती बघूनी मल्हारी हासती
पंढरीत आहे रखुमाई येथे म्हाळसा बानाई
तेथे विटेवरी उभा येथे घोड्यावर शोभा

तेथे पुंडलिक निधान येथे हेंगडी प्रधान
तेथे बुक्याचे रे लेणे येथे भंडार भूषणे
तेथे वाहे चंद्रभागा येथे जटी वाहे गंगा
तेथे मृदंग विना टाळ येथे वाघ्या-मुरळीचा घोळ

## म्हाळसा-बानाई

पिकंना पिकंना चंदनपुरीना बजरा
चंदनेना मळा वर मल्हारी गोजरा
पिकंना पिकंना चंदनपुरीना शिवार
बानू नारी करता सोडलं मल्हारीनं घर
म्हाळसा बानाई दोन्हीच्या दोन जाती
मल्हार देवा करता जेवल्या एक ताटी
म्हाळसा म्हणे मी वाण्याची पोर
बानू धनगरनी हिनं बाटवलं घर
म्हाळसा म्हणे मी जेवनू दुधपुरी
बानूना जीव करता बोकड्यांना गळे सुरी
म्हाळसा सवाई कयी बानाई चढनी
चडू नही दिधी तिले पायरी गडनी
बानाईले पाही म्हाळसाले क्रोध वना
भंडारना थाळा उभल्यानं आदळना
जेजुरीना देव देव तुना मना एक
भंडारना गाडा वारू जुपसू समाईक
जेजुरीना वाटे कशानी धावपळ
बैल नंदीनी सुटी पडे गेजमाळ
जेजुरी गडावरी वाघ्याचा झाला मेळा
तठूनी ओळखिला बाळ भगतना गळा
जेजुरीले जाता आडवी लागे कऱ्हाबाई
तठूनी आरती भोळा मल्हारीले दायी
नेनंता बाळले दिवटी बुदली तोलेना
जेजुरी गडावरी कोणी येळकोट बोलेना
मना घर खंडेराव मना खंडीना येव्हारा
सोनानी छत्तरी घडू मोत्यांना देव्हारा
देव खंडेराव आनंद कया मना
पानेनो फुलना घट उजवसू तुना

संग्राहक : **श्री. शं. बा. राजभोज**

## लगीन

धनगराचे लग्न लागले सुपे परगण्यात
नवरदेव हिंडे बागलाणात
नवरदेवाला हळद लागली शिंगणापुरात
नवरी चांभारगोंद्यात
नवरदेवाचा मंडप घातला हिरव्या महालात
बाहुले चाळीस गावात
नवरदेवाचे तेलन् पडले पुण्याच्या शिवारा
मारुती क-हाड गावात
नवरदेवाचे सीमांत पूजिले मालेगावात
घोडा चंदनपुरीत
नवरदेवाचे स्नान जाहले गंगाजमुनेत
लगीन पंढरपुरात
नवरदेवाच्या पंक्ति बसल्या गाव नगरात
व-हाडी जेवले पुण्यात
व-हाडाने हात धुतले गाव मनमाडात
पाणी प्याले येवल्यात
वरमाईचा भांग भरला संगमनेरात
झाल-झेंडा बेलापुरात
नवरदेवाचे फळ भरले मलकापुरात
मंडळी कोपरगावात
नवरानवरीची वरात निघाली पुण्याच्या पेठेत
वाजंत्री वाजती कल्याणात
नवरानवरी सजुनी बसली शेंदूरवाडीत
मशाली भाकुलवाडीत
नवरदेवाचे पाट मांडले गाव पाचो-यात
गुळण्या जळगाव जिल्ह्यात
नवरदेवाचे कंकण सुटले काकणबंडीत
करवल्या माहुरगडात
मल्हारदेवाचे लगीन पाहिले बांबू शहरात
नवरदेव हिंडे बडोद्यात

संग्राहक : श्री. ए. के. घोरपडे

## येळकोट

जेजुरीच्या खंडेराया, जागरणाला या या
वाईच्या तू गणराया, जागरणाला या या
पसरणीच्या बहीरी देवा, जागरणाला या या
पुनं धरती पलीकडे
गड जेजुरी अलीकडे
रूप दाऊनी बानू गेली
स्वारी देवाची येडी झाली
आवो बानूबाईचे येड लागले, मल्हारी देव मल्हारी
आवो विसरून गेले कोण्या झाडाला
भंडारी देव भंडारी
आवो येळकोट येळकोट बोलती
नित काय भंडारा उधळती
नऊलाख पायरी गडाला हो
चिरा जोडीला खडकाला
आवो बोला हो तुम्ही बोला म्हाळसा नारीला
भंडारा वाहू देवाला हो मल्हारी रायाला

संग्राहक : आकाशवाणी, पुणे केंद्र

### १

प्रथम घंटा घेतला हाती, नमू गणरायाला, नमू गणरायाला
नमितो संगं सारजा प्रार्थना करतो ॥
पायी पैंजण रे पायी पैंजण घागऱ्या वाजती ॥
नमीले देव मल्हार म्हाळसापती ॥ १ ॥

गणराज आले तेव्हा धावून, युद्ध मांडीले जी, युद्ध मांडीले
महादारून दैत्य कापीले दुष्ट मर्दून ॥ धावा करीती रे ॥
धावा करीती विघ्न हरती ॥ नमी नमीले देव म्होळसापती ॥ २ ॥

### २

देवा जागरण मांडीले मल्हारी जागरणाला यावे
पाल पेंबरचे मल्हारी जागरणाला यावे
नलदुर्गाचे मल्हारी जागरणाला यावे

कडेपठारचे मल्हारी जागरणाला यावे
गड जेजुरीचे मल्हारी जागरणाला यावे
सकळीक देवांनो जागरणाला यावे
आपल्या भक्ताला वारंवार तारावे

३

मल्हारी मल्हारी घोड्यावर केली स्वारी देवा मल्हारी ॥
श्रीमार्तंडा हातात खंडा नित्य विघ्न निवारी ॥
त्रिसुळ डमरू हाती खड्ग विराजे घोड्यावर केली स्वारी ॥ मल्हारी ॥
अर्ध्या अंगी म्हाळसा बानू राजसा दोघी नारी ॥
वाद्या मुरळी गायन करीती मधी देव मल्हारी ॥ मल्हारी ॥
सूरदास कवी अखंड गाता नित्य मागते वारी ॥
गाणी बाबाजी गोकूळ गातो, नवे छंद ललकारी ॥ मल्हारी ॥

४

चला जाऊ पाहू जेजुरी मल्हारी मल्हारी मल्हारी ॥ चला जाऊ ॥
पेठ दिसे पिवळी सारी, भक्त उभे दरबारी, घालू गळा व्याघ्रांबरी,
भंडारी भंडारी भंडारी ॥ चला जाऊ ॥
दिवट्यांचा जळे पोत, घोळ वाजे अनुहात, साक्षात उभी मूर्त, पठारी
पेंबरी; मैलारी, जेजुरी ॥ चला जाऊ ॥

५

मजला आनंद झाला फार, मसी भेटले मल्हार ॥
लखलखलख दिवट्या जळती, पाजळले दिपमाळ ॥ मजला ॥
काय करू मसी चैन पडेना, घेतलासी आवतार ॥ मजला ॥
कडेपठारी त्रिसूळधारी, वर उधळे भंडार ॥ मजला ॥
नाथ निरंजन सद्गुरु स्वामी, निरात अपरंपार ॥ मजला ॥

६

आरे देवा तो म्हशी बोल गोड तुला बानूचे बहुत वेड
मवजा केल्या बहुत प्रीतीनं
तीत काय पडलं उनं म्हेलारी राव जाती वैरीन
एका धन्यावाचुन सुनं मल्हारी तुला
कसं रे लावलं बानूनं वेड सोडीलं पाल पिंबर
आरे देवा तो म्हशी बोल गोड
तुला बानूचं भरलं वेड बानू बोले देवा
मल्हारी का आलास माझ्या घरी मल्हारी

गरजासाठी मेंढरं चारी धावून धावून वाडा झाडी
ताका धाटाचे फुटके मारी दोई
हातानं माशा मारी म्हलारी कसंर लावलं बानूनं वेड
सोडीलं पाल पिंबर मल्हारी

७

देवाची घाटी कशी वाजली
भक्ताची काठी कशी चालली
जेजुरी जाण्याची हौस मला भारी
देवाला पाहुन झाले कशी साजरी
मनाची हौस कशी पुरवली
देवाला पाहून मन झाले शांत
माझ्या देवाला सांगते गुपीत
आनंद जीवा माझ्या वाटले
खैरया होलमाचा मान अतबार
खंडेरायाचा बोला येळकोट
भंडाराची मूठ कशी फेकली
भक्ताची काठी कशी चालली

निवेदक : **प्रा. अनंत काणेकर**

सोनकोळी जमातीची खास लोकगीते म्हणता येतील असा एक कोळ्यांच्या लोकगीतांचा प्रकार आहे. त्यांना 'आंबवण्या' म्हणतात. ही गाणी एक एक किंवा दीड दीड ओळींची असतात, आणि त्यांच्यापैकी बरीचशी उत्स्फूर्त व आयत्या वेळी रचलेली असतात. वारा पडला म्हणजे होडी वल्हवावी लागते त्यावेळी, किंवा खोल समुद्रात गाडलेल्या खांबांना लावलेली मोठमोठ्या माशांनी भरलेली अवजड 'डोली'ची जाळी ओढून होडीवर घेतात त्यावेळी कोळी जवान या 'आंबवण्या' म्हणतात. काही 'आंबवण्यां'त मल्हारी देवाचे नाव आळवलेले असते. पण बहुतेक 'आंबवण्या' रंगेल आणि थोड्याशा अश्लीलही असतात. ही लोकगीते खास कोळी पुरुषांचीच आहेत असे म्हटले पाहिजे. जुन्या काळात रानातून लाकूडफाटा डोक्यावरून वहाताना कोळी बायका 'आंबवण्या' म्हणायच्या असे सांगतात, पण अलीकडल्या काळात बायकांच्या तोंडात 'आंबवण्या' मुळीच नसतात. 'आंबवण्यां'चा एक विशेष असा सांगतात की, दूर समुद्रावर जाळी ओढायला गेलेल्या पुरुषांना या 'आंबवण्यां'तून गावातल्या कुणाही लहानमोठ्यावर वाटेल ती टीका करता येते. शिवाय तिथे समुद्रावर म्हटलेल्या या 'आंबवण्यात'त आलेली टीका किंवा थट्टा किंवा बदनामी कुणी मनावर घ्यायची नाही असा कोळी

लोकांत एक लोकशाही संकेत आहे म्हणे. त्यामुळे या 'आंबवण्यां'तून पाटलाच्या सुनेची म्हणा किंवा मुलीची म्हणा किंवा एखाद्या घरातल्या गुपिताची थट्टा करायला कुणी मागेपुढे पहात नसे. अलीकडे असे उल्लेख आले तरी मुला-मुलींच्या किंवा कुटुंबांच्या नावाचे उल्लेख कुणी करीत नाहीत असे कळते, काही 'आंबवण्या' अशा :

**आंबवण्या**

१

पावलाय रे देव मलारी है
देव माजा जेजुरीघरचा मलारी है
देवाचा हाळद्या भंडार मलारी है
देव पावण्यानि पावशी मलारी है
देवाची नवलाख पायरी मलारी है

२

बाबा खंडेरी डोंगोर भालावी
हे खंडेरी डोंगोर भालावी
देवाची दरी मुंडेरी भालावी
माज्या येताल बंदवा भालावी
दादा कोल्यांना पावलारू रे भालावी
अरे जलानचे बैनी भालावी
माज्या तूं थलच्या लखम्या भालावी
माज्या तूं मेसको बैनी भालावी
माज्या घाटाच्या भिकररा भालावी
देवा तुजी काली निशाणी भालावी
दादा बालांना पावलास भालावी

३

खंडोबाच्या भेटीसाठी जेजुरीला जाताना एक गाणे म्हणतात ते असे :

जेजुरी घर जाता, वारे दोही भुजी कलकी
मधी चाले पालखी, देवा मल्हारीची
जेजुरीवाटे काही उदूमाली, दोही अंगीमळे हाळदीचे
वाटे लागले डराडू, किल्ल्यावरी बिऱ्हाडू देवा मल्हारीचा
वाट पाण्याची होदा, त्यामधी कमळ देवा सोनियाचा
सोनियाचा कमळ देवा, दिसे अती फार
दाखव रे देवा आपले जेजुरी घर

देवाच्या देवळाला सोन्याचे दरवाजे
त्यामधी सावराजे काय खंडोबा देव
जेजुरीघरा जाता वाटे बाभूळीची बना
हेलकोटू म्हणा, देवा मल्हारीचा
वाटे हाळदीचे मळे, उतरा रे करोंडे देवा भंडाराचे
वाटे आठ लाख पायरी
नऊ लाख दिवटी देवाच्या मजूल्याला
वाटे वाण्याची दुकाना
पिवळी निशाणा देवा मल्हारीची

४

..... पावलाय रे देव मलारी
रे पाव माज्या देव मला मलारी
देवा तुजी निगाली स्वारी मलारी
करे नयला देव चाल्लाय मलारी
देवाची गबळ्यानं झोली हाय मलारी
देवाची उरतेय भंडार रे मलारी
देवा चिमटीनं भुशान रे मलारी
देवा नदीवं डेवरीलं मलारी

देवा तुज्या झयल्या आंगोली मलारी
देवा रथाव चरविलाय रे मलारी
देव किल्ल्याला येतोय यो मलारी
भानूचे वाऱ्याला देव ऐकलाय रे मलारी
भानूचे नवलाख मेंडरं मलारी

देवा किल्ल्याना चाललास मलारी
देवा तुजी लावली सांकोल रे मलारी
देवाची होतान चागरान मलारी
वाग्या मुरल्या नाचतान मलारी
देवाला दिलं आसन रे मलारी
देव माजा जेजुरी घरचा मलारी

देवाचा हालद्या भंडार मलारी
देवाची नवलाख पायरी मलारी
देव पावण्यानं पावशी मलारी
पावलाय रे देव मलारी
देवाचा हेलकोट बोला मलारी

संग्राहक : **श्री. बाजीराव पाटील**

## १

पिवळा वाध्या केला न हाती कराळ खंडा घेतला
तेजासार झाला अन चालला दैत वधाया
लागील गुरूच्या पाया परसन व्हय महेसराया
हा देव हिरगुन का निरगुन
भोला भगत होता अनजान
कयऱ्या कोंडचाची भाव म्या, केलीसे आरती
घट्टचा पितांबराच्या उदकं पाजयल्या ज्योती
ओवाळा ओवाळा राऱ्या म्हाळसाचा पती
ओवाळा ओवाळा राऱ्या बानाईचा पती
घट्टचा पितांबराच्या सत्वर ओवायल्या ज्योती
रानीया न वनीया आपल्या दासाली तारत
रानीया न वनीया आपल्या भक्ताली तारत
कराळ खंडो खंडेराव कराळ माल्लूदेव
राजा इच्छावर जातोरे मल्हार दैतावर जातोरे
ओढून तोडून ताळ वाध्या मुरळ्या नाचती
भंडाराचा पुळा भोळ्या भगताच्या हाती
भंडार तयावर भक्त आंधुय करती
पाच पाच म्हनून रत्नं घातले गोमटी
आनंदीचा उदो बोला बयऱ्याचा चांद बोला
शिवा मल्हाराचा येळकोट बोला
येळकोट, येळकोट, जयमल्हार

## २

भंडार गर्दी झाली माय पुसपुनवची
जत्रा चाले चाले माय धन्या मार्तंडाची
कदमापुर तथी जागा हाये मुक्कामाची
इळा, लवंगा, चिकन सुपारी, पानाचे तबकं भरवा
शिव मल्हारी नवरा मिळवा फुलाचे बाशिंग घडवा
जेजुरीगड, शिवाचा अवतार, सांगतो खरं
खारीक खोबऱ्यानं भरलं दुकान
बानाई बोले गर्जून ध्याना वाटून
म्हाळसा उठली महालातून देलं उधळून




**चांगभला ! चांगभला !**

चैत्रमासातील पूर्णिमा जवळ येत चालली की, आमच्या घरी उभंकुडवी सारवण निघायचं. भांडीकुंडी घासूनपुसून लखलखीत व्हायची. अंथरूण पांघरूण धुऊन निघायचं. भल्या पहाटेला गव्हाची दळणं घुमायची. जात्याच्या पाळी शिगोशीग भरून जायच्या. घरात येतेल्या पैपाव्हण्यांच्या देखभालीची तयारी व्हायची. घरच्या कुळस्वामीच्या महापूजेसाठी नारळ यायचे. गुलाबाची पेवं फुटायची. दवण्याच्या वासानं घर दरवळून उठायचं.

**चैताच्या महिन्यात फुलल्या चारी वाटा**
**ज्योतिबा माझा देव रत्नागिरीचा राजा मोठा**

या भावनेनं घरात आनंदी आनंद नांदायचा. अंगणात पोरीबाळींचे नटते-मुरडते थवे तरंगायचे आणि पुरणावरणाचा महानैवेद्य शिजविण्याच्या धांदलीतल्या माहेरवाशिणींच्या उठबशीनं घर शोभिवंत व्हायचं. जत्रेला जायच्या ईर्षेनं घरात नुसती धमाल उडून जायची.

आमच्या गावापासून कोल्हापूर सत्तावीस-अठ्ठावीस मैलांवर. तिथून नऊ मैलांवर आमच्या ज्योतिबा कुळस्वामीची वस्ती. तर तिथंवर आम्ही घरची गाडीबैलं जुंपून झोकात जायचे. अशा वेळी पळतेल्या बैलांच्या गळ्यातील घुंगरांनी वाट घुमून निघायची. गाडीच्या हादऱ्यानं हाडं खिळखिळी व्हायची आणि उधळत्या बुक्क्यानं सगळं अंग भरून जायचं.

पण चारी अंगांनी माणसांचे थवेच्या थवे फुललेल्या वाटेनं डोंगर चढीत गाडी निघाली की, शीणभाग उतरायचा. देवाच्या दर्शनासाठी जीव उतावीळ होऊन जायचा न् मग धाईगर्दीनं जत्रेत घुसून वाट काढीत आम्ही देवळात शिरायचे. वाटेत सातारच्या फाळक्यांच्या आणि निनाम पाडळीच्या ढाण्यांच्या काठ्या

नाचतेल्या भेटायच्या. उदकाडी, गुलाल खोबरं न् देवाला फुले विकतेल्यांची गाठभेठ व्हायची. काय काय विकतेल्या दुकानांवरून नजर फिरायची न् मग आम्ही देवाजवळ जाऊन पोहोचायचे. तिथं ही गर्दी असायची. मुंगीला शिरायला-देखील वाव मिळू नये अशी! पण झम्माटचानं पुढं होत आम्ही तसेच पुढे सरकायचे. तिथं चाललेल्या 'देवाच्या नावानं चांगभला! . . . देवाच्या घोड्याच्या नावानं चांगभला!' . . . या जयघोषात सामील होताना अस्मान ठेंगणं व्हायचं. तिथं फुटलेल्या नारळांच्या आवाजानं भारावून गेल्यागत व्हायचं आणि मुठीमुठीनं होतेल्या गुलालाच्या उधळीत माखून जातेल्या कायेला पहाताना अभिमान वाटायचा.

आमच्या घरात 'आईतवार' करतेल्या आई आज्जीनं देवापुढं नवस फेडताना काय काय वाहिलेलं पाहिलं म्हणजे आपण कुणी तरी मोठ्ठे आहोत असं वाटायचं. 'घरचा वेलविस्तार वाढू दे. घरचा उंबरा सुखानं नांदू दे' असलं काही त्या देवापुढं बोलल्या की, आता आपलंच भलं होणार या कल्पनेनं मनाला खुषी यायची. त्यामुळं हस्त नक्षत्राच्या मुहूर्तावर निघतेल्या देवाच्या पालखीच्या गर्दीतून मिरवताना बरं वाटायचं. चांदीच्या गोंड्यांनी पाठीवर लुडबुडतेल्या वेणीगत समाधानानं इकडं तिकडं करताना गंमत यायची. देवदर्शनानं सुखावलेला जीव वारं प्याल्यागत पळायचा वाट फुटेल तिकडं! . . .

जत्रेला लई लांबलांबचे लोक यायचे. जातगोत विसरून माणसं कुळधर्म साजरा करायची. पैपाव्हण्यांच्या साक्षीनं महापूजा बांधायची. डोळ्यांचं पारणं फिटावं एवढ्या उत्साहानं माणसं फिरतेली पाहिली की, खूप मजा यायची. खूप खूप! त्यातून कवतिकाच्या भाराखाली दबून जाता यावं या बेतानं घरच्या लोकांनी जत्रेतल्या नकट्या भावल्या न् साखरेची चित्रं घेऊन दिली म्हणजे अस्मान ठेंगणं व्हायचं! त्या नादात मग देवाच्या नावाच्या जयजयकाराबरोबरच आम्ही वडीलधाऱ्यांच्या पण नावाचा जयघोष मांडायचे न् मग कुणी मारायला धावलं की, धूम पळून जात एका अंगाला सोडून ठेवलेल्या बैलगाडीच्या आडोशाला लपून बसायचे! . . . त्यावेळी अशी मजा यायची, अशी मजा यायची की, देवा ज्योतिबानं पण पोरात पोर होऊन आमच्यात येत, खेळावं वाटायचं तर! . . .

❦ ❦

## अनुक्रम



# रत्नागिरी ज्योतिबा

लेखक : **श्री. कृ. भा. बाबर**

ज्योतिबा हा आमचा कुळस्वामी आहे.

स्वामी म्हणजे मालक, देव. दक्षिण भारतात देवाला स्वामीच म्हणतात. आपला महाराष्ट्र हा दक्षिण भारताचाच उत्तरेकडील भाग आहे. स्वाभाविकच देवाला स्वामी म्हटले जाते.

कूळ म्हणजे कुळी, गोत्र. पूर्वीच्या काळी फार मोठे झालेले कुटुंब म्हणजे कूळ होय. नुकतेच मला एक माझे मित्र भेटले होते. ते म्हणाले, आम्ही पाचजण भाऊ आहो आणि मला सहाजणी बहिणी आहेत. आम्हा सर्वांची मुले सुमारे ८५ आहेत ; आणि आमच्या मुलामुलींनाही आता मुले झाली आहेत ! एकदोन पिढ्यांतच हे कुटुंब एवढे वाढलेले आहे, तर पुष्कळ वर्षे लोटल्यानंतर एखाद्या कुटुंबाचा पसारा केवढा मोठा झालेला असेल ? हा सारा पसारा एकाच कुळातील आहे, हे उघड आहे. त्यामुळे ह्या एकाच कुळातील लोकांचे आचारविचार, संस्कृती किंवा देवधर्मही स्वाभाविकपणे एकाच प्रकारचा असतो.

गोत्र हा संस्कृत शब्द आहे. गो म्हणजे गाय हा जसा अर्थ आहे, तसाच गो म्हणजे भूमी असाही अर्थ आहे. त्र म्हणजे रक्षण करणारा. भूमीचे रक्षण करणारा असा गोत्र शब्दाचा अर्थ झाला. भूमीचे रक्षण करणारे सारे लोक ह्या गोत्रात येऊ लागले. छांदोग्य उपनिषदात कुटुंब ह्या अर्थाने गोत्र शब्द आलेला आहे.

ज्योतिबा हा आमचा कुळस्वामी आहे, याचा अर्थ आमचे जे वाढलेले कुटुंब आहे त्या सर्वांचा ज्योतिबा हा देव आहे.

ज्योतिबाला आपला कुळस्वामी मानणारे लोक हे एका काळी केव्हा तरी एकाच कुटुंबातील असावेत, हे यावरून उघड दिसून येते.

आमचा कुळस्वामी असलेला हा ज्योतिबा देव कोल्हापूरजवळ असलेल्या रत्नागिरी डोंगरावर आहे.



ज्योतिबा : प्रवेशद्वार

दरसाल चैत्र शुद्ध पौर्णिमेला हस्त नक्षत्रावर ह्या देवाची पालखी निघते आणि त्या दिवशी तेथे मोठी यात्रा भरते. एकदोन लाखांहून अधिक लोक ह्या यात्रेला जमत असतात. ज्योतिबाचा वार रविवार समजतात. तेव्हा दर रविवारी आणि दर पौर्णिमेलाही देवाच्या दर्शनाला जाणारे अनेक भक्त आहेत. माझे वडील, चुलत भाऊ आणि अनेक भाऊबंद ह्या यात्रेला गेलेले मी पाहिले आहेत.

इतकेच नाही, तर अगदी लहानपणी मीही ज्योतिबाच्या यात्रेला गेल्याचे मला आठवते. घरच्या वडील मंडळींनी मला बरोबर नेले होते. आमच्या गावापासून मधल्या रस्त्याने पंधरा सोळा मैलांवर ज्योतिबाचा डोंगर असल्याने आम्ही बैलगाडीने ह्या यात्रेला गेलो होतो. डोंगरावर पूर्वेच्या बाजूला उतरणीवर

एका झाडाखाली आम्ही उतरलो होतो. आमच्या कोणी तरी पूर्वजाने हे झाड लावले होते व आमचे वाडवडील दरसाल तेथेच उतरत आले आहेत, असे त्यावेळी मला सांगण्यात आले होते.

ह्या वेळचा जो देखावा अजून माझ्या डोळ्यांपुढे आहे तो असा की, यात्रा फार मोठी भरली होती; आणि पालखीवर गुलाल, खोबरे उधळणाऱ्या आणि देवाचे दर्शन घेणाऱ्या लोकांनी एवढी गर्दी केली होती की, पुष्कळ लोक चेंगरून जात होते. म्हणून त्यावेळी लोक असे म्हणत होते की, यात्रेत जितके लोक चेंगरून मरतील तितके लाख यात्रा जमलेली आहे असे समजावे ! त्यावेळी मला हे खरे वाटत होते, पण हा एक वेडेपणाचा समज आहे हे मला मागाहून समजले.

देवावर उधळलेले खोबरे खाली पडले की, प्रसाद समजून ते वेचण्याचा प्रयत्न भक्त लोक करतात आणि त्या वेळीच चेंगराचेंगरी घडते. पालखीतील देवाच्या दर्शनासाठीही लोक अशीच धांदल करतात. ह्या वेळी गुलाल खोबऱ्याबरोबर 'दवणा'ही देवाला वाहतात.

ह्या यात्रेतील मोठा देखावा म्हणजे निरनिराळ्या ठिकाणांहून देवापुढे नाचवण्यासाठी आणलेल्या काठ्या. एका फार मोठ्या सरळ बांबूला लाल व पांढरी पागोटी एक आड एक अशी तिरपी गुंडाळलेली असतात. काठीला वर गंगावनाचा काळा किंवा पांढरा झुबका बांधलेला असतो, मध्याच्या जरा वर

श्रीज्योतिबाच्या यात्रेतील काठ्या



एक फरारा लावलेला असतो व खालच्या बाजूला तीन चार फुटांवर ह्या वेळूभोवती एक आडवी फळी जाम बसविलेली असते. ही फळी खांद्यावर घेऊन भक्त काठी नाचवितात. काठीचा तोल जाऊ नये म्हणून तिला तीन चार काढण्या लावलेल्या असतात व दोऱ्या ताणून धरणारे लोक काठीच्या आजूबाजूला उभे राहिलेले असतात. आडव्या लाकडी फळीवर देवाची मूर्तीही बसविलेली असते. दूरदूरच्या गावांतून भक्त लोक ह्या काठ्या खांद्यावरून आडव्या पाडून यात्रेला वाहून आणीत असतात. ह्यांपैकी काही काठ्या मानाच्या असतात. देवाच्या पालखीपुढेच त्या असतात. सातारा तालुक्यातील फाळक्यांच्या पाडळीची फाळक्यांची काठी व निनाम पाडळीची ढाण्यांची काठी ह्या अशा मानाच्या काठ्या आहेत असे मला लहानपणीच समजले होते.

ह्या यात्रेतील दुसरा एक विशेष म्हणजे ‘चांगभल्या’चा जयघोष हा होय. भक्त लोक देवाची पालखी निघाली म्हणजे ‘देवाच्या नावं चांगभलं’, ‘देवाच्या घोड्याच्या नावं चांगभलं’, ‘देवाच्या काठीच्या नावं चांगभलं’ असा जयघोष सारखा करीत असतात.

देवाची पालखी दुपारी बारा वाजता सड्यावर येते. डोंगरावरील उंचवट्याच्या सपाट भागाला सडा म्हणतात. देवाचे देऊळ ह्या सड्याच्या एका बाजूला खोलगट भागात आहे. तेथून सड्यावर चढत यायला किंवा सड्यावरून



यमाईचे मंदिर

खाली देवळापर्यंत जायला पुष्कळ पायऱ्या तयार केलेल्या आहेत. ह्या सड्याच्या दुसऱ्या बाजूला थोड्या खोलगट भागावर यमाई देवीचे देऊळ आहे. देवाची पालखी सड्यावरून पुढे यमाईच्या भेटीला खाली उतरते. यमाई ही ज्योतिबा देवाची बहीण आहे असे म्हणतात. यमाईच्या दर्शनानंतर पालखी परत फिरली की यात्रा आटोपते.

देवाच्या डोंगरावर एक लहानसे गाव वसलेले आहे, त्याला वाडी रत्नागिरी म्हणतात. ह्या वाडीत मुख्यत: देवाचे पुजारी रहातात. ते गुरव जातीचे आहेत. गुलाल, खोबरे, चुरमुरे, बत्तासे, ऊद, फूल वगैरे विकणारेही थोडे लोक येथे रहातात. येथील गुरवांनी देवाचे भक्त वाटून घेतलेले असतात. यात्रेच्या नंतर हे गुरव गावोगावी आपल्या भक्ताकडे जाऊन देवाचा अंगारा व प्रसाद देत असतात. भक्त लोक त्यांना जेवायला घालतात व आपल्या शक्तीप्रमाणे दक्षिणा देतात. यात्रेच्या वेळी जो तो भक्त आपल्या गुरवाकडे उतरतो. उतरतो म्हणजे त्याच्याकडे जागा असली, तर रहातो; पण मुख्यत: त्याच्याकडे देवाचा नैवेद्य करवितो व त्याच्यामार्फतच तो देवाला अर्पण करण्यात येतो. आमच्या कुटुंबाचाही असा एक गुरव आहे.

वर्षातून एकदा भरणारी मुख्य यात्रा झाल्यावर आठवडाभराने तेथेच एक लहानशी यात्रा पुन्हा भरते. तिला पाकाळणी म्हणतात. ही यात्रा मुख्यत: आजूबाजूच्या गावांच्यासाठी असते. मुख्य यात्रेच्या वेळी गर्दी फार असते. देवाचे दर्शन नीट होत नाही आणि यात्रेसाठी आलेल्या काही मालाची खरेदीही नीट करता येत नाही म्हणून पाकाळणीच्या जत्रेचा फायदा आजूबाजूचे लोक घेतात.

माझा विवाह झाल्यानंतर कुटुंबातील काही मंडळींसह आम्ही नवरा बायको एकदा ज्योतिबाला जाऊन आलो होतो. अशा जाण्याला वावर जत्रा म्हणतात. आपला प्रपंच पुढे नीट चालावा म्हणून देवाच्या दर्शनाला नव्या जोडप्याने एकदा जाऊन यावे, अशी रूढी पडलेली आहे.

लहानपणी माझ्या मनात देवासंबंधाची श्रद्धा, अंधश्रद्धा, बरीच होती. शेंदूर फासलेला दगड कोठेही दिसला की मी हात जोडीत असे. मुसलमानांच्या पिरालाही मी असाच भक्तिभावाने नमस्कार करीत असे. मूर्तिपूजा ही परमेश्वर प्राप्तीची पहिली पायरी आहे, असे शाळेमध्ये तिसऱ्या इयत्तेत शिकत असताना गुरुजींनी सांगितलेले माझ्या लक्षात राहिलेले होते. लहानपणी शाळेतील चौथ्या इयत्तेच्या पुस्तकातील एका धड्यात ईश्वर सर्वव्यापी आहे, तो सगळीकडे भरलेला आहे, आपण करतो ती सर्व कृत्ये त्याला दिसतात इत्यादी दिलेले होते, तेही माझ्या ध्यानात राहिलेले होते. आणि जरा मोठा झाल्यावर मी जेव्हा विचार करू लागलो, तेव्हा हळूहळू मूर्तिपूजेवरील माझी श्रद्धा उडत गेली. वयाच्या विसाव्या वर्षापासून

ती अजिबात नाहीशी झाली. आता मी कामानिमित्त किंवा कुटुंबातील अथवा इतर कोणा माणसाबरोबर देवाच्या देवळात जातो पण तेथील मूर्तीच्या पाया पडत नाही, तिरस्कार म्हणून नव्हे, तसे करण्याची जरुरी वाटत नाही म्हणून.

विवाहानंतर चार पाच वेळा निरनिराळ्या कारणांनी मी ज्योतिबाच्या डोंगरावर देवाच्या दर्शनास जाऊन आलो आहे, पण आता त्याच्या पाया पडत नाही !

मात्र देवाच्या संबंधाने ऐतिहासिक माहिती मिळविण्याचा मी प्रयत्न केला. योगायोगाने ह्याच सुमारास ब्राह्मणेतरांचे विद्वान पुढारी श्री. भास्करराव जाधव यांचा व माझा परिचय झाला आणि ज्योतिबासंबंधी काही माहिती मला मिळाली.

पुढे लवकरच श्री. भास्करराव जाधव हे मुंबई राज्याचे मंत्री झाले त्यावेळी मुंबई राज्यामध्ये कर्नाटकातील चार जिल्हे, गुजराथचा (संस्थाने सोडून) सगळा भाग आणि सिंध प्रांत एवढा मुलूख होता. आजचा विदर्भातील आठ जिल्ह्यांचा व मराठवाड्याचा पाच जिल्ह्यांचा भाग मात्र ह्या मुंबई राज्यात नव्हता.

ना. जाधवराव एकदा सिंध प्रांतातून हिंडून आले होते व त्यांची माझी भेट झाली होती. बोलण्यातून बोलणे निघाले. ज्योतिबासंबंधी आणि 'चांगभल्या'-संबंधीही बोलणे निघाले आणि ते म्हणाले,

आपला रत्नागिरी ज्योतिबा हा देव मूळचा सिंध प्रांतातला. तेथील लोक पूर्वी ज्योतीची पूजा करीत, अजूनही काही लोक केवळ ज्योतीचीच पूजा करतात. ज्योत म्हणजे तेज, प्रकाश. जुन्या काळचे लोक प्रकाशाला देव मानीत. त्या काळचे लोक आकाश, वायू, तेज, आप म्हणजे पाणी व पृथ्वी यांना पंचमहाभूते मानीत. म्हणजे ह्या पाच पदार्थांनी सारे जग निर्माण झालेले आहे असे समजत व म्हणूनच ह्या पंचमहाभूतांची ते पूजा करीत. ह्या देवतांसंबंधाच्या ह्या काळच्या लोकांच्या प्रार्थना आपल्या धर्मग्रंथात म्हणजे वेदात पुष्कळ आहेत.

ह्या पंचमहाभूतांपैकी आकाश (अवकाश, पोकळी) व वायू ही प्रत्यक्ष डोळ्यांना दिसत नाहीत. त्यांची जाणीव होत नाही. आकाश सर्वत्र भरून राहिलेले असल्याने त्याची नीट कल्पना येत नाही. वायू (वारा) कातडीला जाणवतो पण दिसत नाही. बाकीची महाभूते तेज, पाणी व पृथ्वी (माती, दगडधोंडे इत्यादी) ही डोळ्यांना दिसतात. आपण पृथ्वीवरच रहातो आणि पाण्याचा रोजचा उपयोग करतो; पण तेज किंवा प्रकाश आपणाला सूर्यापासून मिळत असल्याने, आणि सूर्य तर फार लांब असल्याने त्याच्यासंबंधाने माणसाला नेहमीच कौतुक व पूज्य भाव वाटत आलेला आहे.

सृष्टी किंवा हे सारे जग कोणी उत्पन्न केले असावे, यासंबंधी आपले पूर्वज—

 फार जुन्या काळचे वाडवडील—जेव्हा विचार करू लागले, तेव्हा त्यांना जगात

आढळणाऱ्या अनेक शक्तींचा विचार करावा लागला. यातील सूर्याने त्यांचे मन प्रथम वेधून घेतले. कारण त्याच्या योगानेच माणसाचे सगळे व्यवहार घडून येतात. सूर्य उगवल्यामुळे उजेड पडून सर्व कामे करता येतात. सूर्यापासून नुसता प्रकाशच मिळत नाही, तर त्याच्यापासून उष्णताही मिळते. ह्या उष्णतेमुळेच माणसाला थंडीपासून आपला बचाव करता येतो; आणि प्यायला पाणी व खायला उपयोगी पडणारी धान्ये व फळेमुळे तिच्यामुळेच माणसाला मिळतात. सूर्याच्या उष्णतेमुळे समुद्रातील व इतर पाण्याच्या साठ्यातील पाण्याची वाफ होते. ह्या वाफेचे पुढे ढग बनतात व त्यांच्यापासून पाऊस पडून वनस्पती—झाडेझुडपे उगवतात, पिकेही पिकतात. ह्यामुळे सूर्याबद्दल लोकांना आदर वाटणे साहजिक आहे. सूर्याच्या प्रकाशाने माणसाला अनेक प्रकारचे ज्ञान होत असल्याने सूर्याला ज्ञानाची देवताही मानतात.

पण हा सूर्य नेहमी दिसत नाही. रात्रीच्या वेळी तो नाहीसा होतो व दिवसाही ढग आले म्हणजे दिसेनासा होतो. हे असे का व्हावे म्हणून पूर्वीचे लोक जेव्हा विचार करू लागले, तेव्हा त्यांना वाटू लागले की, ह्या सूर्यापेक्षाही एखादी श्रेष्ठ अशी शक्ती असावी.

ह्याप्रमाणे विचारांची सुरुवात सूर्य ह्या ज्योतीच्या दर्शनाने झाली. ही विचाराची मजल पुढे कोठपर्यंत गेली, ते पुढील श्लोकावरून दिसून येईल :

**किं ज्योतिस्तव भानुमान् अहनि मे रात्रौ प्रदीपादिकम्**
**एवं स्या द्रवि दीप दर्शन विधौ किं ज्योतिराख्याहि मे ।**
**चक्षुस्तस्य निमीलनादिसमये किं धीर्धियो दर्शने**
**किं तत्राहमतो भवान् परमेकं ज्योतिस्तदस्मि प्रभो ।।**

गुरुशिष्य संवाद रूपाने ह्या श्लोकात सांगितलेले आहे की,

गुरु : तुझी ज्योती कोणती ?

शिष्य : दिवसा सूर्य ही माझी ज्योती आहे व रात्री दिवा आहे.

गुरु : असे असेल; पण सूर्य व दिवा पहाताना तुझी ज्योती कोणती ते मला सांग.

शिष्य : डोळा.

गुरु : डोळा मिटल्यावर कोणती ज्योती ?

शिष्य : बुद्धी.

गुरु : बुद्धी पाहाणारी ज्योती कोणती ?

शिष्य : तेथे मी उभा आहे.

गुरु : म्हणून तूच सर्वश्रेष्ठ ज्योती आहेस.

शिष्य : प्रभो, मी ती ज्योती आहे.

ह्याप्रमाणे विचारपरंपरा ज्योतीवरून सुरू होते व परब्रह्म किंवा परमेश्वर स्वरूप ज्ञानरूप असल्याने ज्योती शब्दाने त्याचाही बोध होतो. म्हणून ईश्वर-स्वरूप ध्यानात येण्यासाठी दिवा ठेवणे, ज्योत पाजळणे वगैरे कार्यक्रम सुरू झालेला असावा.

हिमालयातील कांग्रा खोऱ्यात 'ज्वालामुखी' नावाचे देवस्थान आहे. जमिनी-तून एक प्रकारचा ज्वालाग्राही म्हणजे पेट घेणारा धूर वर येत असतो. तो एकदा पेटविला की, सतत जळत रहातो. त्यामुळे ह्या ठिकाणाला पवित्र मानतात व तेथे यात्रेसाठी लाखो लोक जातात.

ही ज्योत म्हणजे तेज रूपाने परमेश्वरच अवतरला आहे, असे समजून त्याची उपासना सुरू झालेली असावी.

सिंध प्रांतातील लोक दिव्याच्या ज्योतीलाच देव समजून त्याची पूजाअर्चा का करीत असावे, याची कल्पना ह्यावरून येईल. सिंध प्रांतातील काही लोक पुढे महाराष्ट्रात रहावयास आले, तेव्हा त्यांनी आपल्याबरोबर आपला देवही आणला. त्यांचा हा देव म्हणजेच आपला ज्योतिबा.

ना. भास्करराव जाधव यांनी आणखी असेही सांगितले की, आपण एकमेकांना भेटलो म्हणजे रामराम किंवा नमस्कार म्हणतो, त्याप्रमाणे सिंध प्रातातील लोक 'चंगाभला' म्हणतात.

'शुभंभवतु' 'म्हणजे चांगले भले होवो अशा अर्थाचाच हा शब्द आहे. सिंध प्रांतातून आलेल्या ज्योतिबाबरोबर तिकडचा 'चंगाभला' शब्दही आपल्याकडे आलेला आहे. मात्र त्याचे रूप आपण 'चांगभलं' केले आहे.

आपल्या देशात केव्हा तरी येऊन द्रविड लोकांनी वसाहत केलेली होती. नंतर बऱ्याच वर्षांनी आर्य लोक येथे रहावयास आले. ह्या आर्यांनी उत्तरेकडचा भाग व्यापल्यानंतर ते दक्षिणेकडे सरकायला लागले. सिंध प्रांतातले लोक आपल्या महाराष्ट्रात रहायला आले ते अशाच प्रकारे. सिंधमधील हे लोक समुद्रमार्गाने महाराष्ट्रात उतरले. रत्नागिरी बंदरात उतरून ते कोल्हापूरच्या बाजूला आले. ह्या लोकांनीच आपला देव ज्योतिबा महाराष्ट्रात आणला. तो रत्नागिरीच्या बाजूने आला म्हणून त्याला रत्नागिरी ज्योतिबा म्हणतात. आणि ह्या लोकांनी हा देव ज्या डोंगरावर आणून ठेवला, त्याला रत्नागिरी म्हणू लागले. डोंगरावर वसलेल्या गावाला त्यामुळेच वाडी रत्नागिरी म्हणण्यात येते.

मूळ देव ज्योतच पण महाराष्ट्रात आपण त्याला ज्योतिबा म्हणतो. बा म्हणजे बाप. देव हा सगळ्यांचा बापच. बहिरोबा, खंडोबा, नाईकबा, म्हसोबा, म्हस्कोबा इत्यादी नावे अशीच पडलेली आहेत. महाराष्ट्रात आल्यावर ह्या देवाचे रूपही
 बदलले. आताचा देव हा कोल्हापुरी पद्धतीची पगडी बांधलेला आणि घोड्यावर



श्रीज्योतिबा

बसलेला देव आहे. ही ज्योतिबाची मूर्ती चतुर्भुज म्हणजे चार हातांची असून तिच्या हातात खड्ग, पानपात्र, डमरू व त्रिशूल ही आयुधे आहेत. मूळ ज्योत आता नंदादीपाच्या रूपाने देवळाच्या बाहेर काळभैरवाशेजारी तेवत असते. काळभैरव हा ज्योतिबाचा शरीररक्षक मानतात व अगोदर त्याचे आणि नंदादीपाचे दर्शन घेऊन मगच ज्योतिबाच्या पाया पडायला लोक जात असतात.

प्राचीन काळी देवाच्या मूर्ती नसत. बौद्ध व जैन धर्मीय लोकांनी बुद्धाच्या व तीर्थंकरांच्या मूर्ती करायला सुरुवात केल्यापासून हिंदु लोकांनीही ही प्रथा सुरू केलेली आहे. ज्योतिबाची मूर्ती त्यानंतरच तयार झालेली असली पाहिजे.

आपण महाराष्ट्रीय लोक मुख्यत: आर्य आणि द्रविड वंशांच्या मिश्रणापासून झालेले आहो. आर्य लोकांची वस्ती भारताच्या उत्तर भागात वाढू लागली, तसे द्रविड दक्षिणेकडे सरकले. दक्षिणेकडील आंध्र, म्हैसूर, केरळ व तामीळनाडू राज्यांमध्ये द्रविडांचाच भरणा अधिक आहे. उत्तरेकडे आर्यांचे वंशज अधिक आहेत. तशी आता साऱ्या भारतातच सरमिसळ झालेली आहे. शुद्ध आर्य किंवा शुद्ध द्रविड क्वचितच सापडतील. आपला महाराष्ट्र हा भारताच्या साधारणपणे मध्यावर असल्याने येथे हे मिश्रण अधिक प्रमाणात घडलेले आहे. त्यामुळे आर्य आणि द्रविड ह्या दोन्ही वंशांच्या चालीरीती आपणाकडे आढळतात. आर्य

उत्तरेकडून आले तेव्हा मुख्यतः पुरुषच जास्त प्रमाणात आले आणि त्यांनी दक्षिणेतील द्रविड स्त्रियांशी लग्न व्यवहार केले. त्यामुळे महाराष्ट्रात पुरुषांमध्ये आर्यांच्या व स्त्रियांमध्ये द्रविडांच्या चाली अधिक आढळतात. तथापि एकंदरीत द्रविड संस्कृती येथे अधिक आढळते.

आर्य लोक हे घोडेस्वार होते. द्रविड लोक महादेवाचे भक्त होते व ते बैल पाळून रहात होते. आर्य लोक विष्णूचे भक्त. आता देशामध्ये सर्वत्र महादेवाची देवळे आढळतात आणि विष्णूची किंवा विष्णूचा अवतार असलेल्या रामाची व कृष्णाचीही देवळे आढळतात. पण त्यातल्या त्यात रामाची व कृष्णाची पूजा उत्तरेकडे अधिक व महादेवाची दक्षिणेकडे अधिक आढळते.

महाराष्ट्रात दसरा हा सण मुख्यतः पुरुषांचा सण आहे. पुरुष घोड्यावर बसून मिरवणुकीला निघतात.

नागपंचमीचा व गौरीचा सण मुख्यतः बायकांचा. द्रविड पद्धतीने कपाळाला कुंकू लावणाऱ्या व काचेच्या बांगड्या घालणाऱ्या बायका महाराष्ट्रात आढळतात. भांगात कुंकू भरणाऱ्या व हस्तिदंती किंवा असल्याच काचेच्या नसलेल्या बांगड्या उत्तरेकडील बायका घालतात. कपाळाला कुंकू हे शोभेचे आहे आणि भांगातील कुंकू हे सौभाग्याचे आहे असे मानतात. महाराष्ट्रातील, दक्षिण महाराष्ट्रातील, मराठ्यांच्या बायका लग्नात सुवासिनींच्या भांगातच कुंकू लावताना आढळतात.

ज्योतिबा घोड्यावर बसलेला आहे, त्याचे कारण दाखविण्यासाठी हा थोडासा प्रपंच केला. ती आर्यन पद्धत आहे. मूळ आर्य हे रशियातील कझाकिस्तानातून आलेले घोडेस्वारच होते. सिंधमधून आलेले लोक आर्यच होते.

पण आता आपण महाराष्ट्रात ज्योतिबालाही द्रविडियन बनविले आहे. त्याला केदारलिंग किंवा केदारेश्वरही म्हणतात. याबाबत दंतकथा आहे ती अशी :

**ज्योतिबा : घोडा**



'कोल्हापूरची अंबाबाई एकदा हिमालयात केदारनाथ येथे केदारेश्वराकडे गेली ; आणि तिने त्या महादेवाला दक्षिणेत येऊन राक्षसांचा बंदोबस्त करण्याबद्दल विनंती केली. तेव्हा केदारेश्वर दक्षिणेत आला व त्याने येथे लोकांना त्रास देत असलेल्या रत्नासुर नावाच्या राक्षसाला ठार मारून टाकले. हा प्रकार ज्या डोंगरावर घडला, त्याला रत्नागिरी डोंगर म्हणू लागले.'

तेव्हापासून ज्योतिबाला केदारलिंगही म्हणतात व त्याला महादेवाचे रूपच मानतात. ह्या ज्योतिबाच्या डोंगरावर जी तीन देवळे आहेत, त्यांतील एक केदारेश्वराचेही आहे आणि त्याच्यामध्ये काळ्या पाषाणाचे दोन नंदीही आहेत.



ज्योतिबा : नंदी

ज्योतिबा अथवा केदार याची प्राचीनता यादव काळाच्याही मागे जाते. महानुभवांच्या स्थानपोथीत पैठण, पाठवध (जिल्हा बीड), जळगाव (जिल्हा नगर) येथील केदारनाथाचा उल्लेख आहे. खोलेश्वराच्या एका शिलालेखात आंबेजोगाई येथील केदार मंदिराची नोंद आलेली आहे. चेदीवंशी राजा जाजल्लदेव याच्या मल्हार (विलासपूर–मध्यप्रदेश) येथे मिळालेल्या संस्कृत लेखात सोमराज नामक एका ब्राह्मणाने इ.स. ११६७ व ११६८ मध्ये मल्लाल पत्तनात केदाराचे देऊळ उभारल्याचा उल्लेख आहे.

वाडी रत्नागिरी येथील ज्योतिबाच्या देवळांपैकी पहिले देऊळ 'नावजी साया' यांनी बांधल्याचा व त्या जागीच हल्लीचे देऊळ प्रसिद्ध सरदार राणोजी शिंदे यांनी इ.स. १७३० साली बांधल्याचा उल्लेख सरकारी इंपीरियल गॅजेटमध्ये सापडतो. केदारेश्वराचे देऊळ इ.स. १८०८ मध्ये दौलतराव शिंदे यांनी व रामलिंगाचे देऊळ मालजी निलम पन्याळकर यांनी इ.स. १७८० त बांधल्याचा उल्लेख आहे. जवळ चोपडाईचे देऊळ आहे. ते प्रीतराव हिंमतबहाद्दूर यांनी इ.स. १७६० मध्ये बांधले आहे. यमाईचे देऊळ व जामदग्न्य तीर्थ नावाचे तळे राणोजी शिंदे यांनीच बांधलेले आहे. दुसरे तळे जिजाबाईसाहेब यांनी इ.स. १७४३ त बांधलेले आहे.

रत्नागिरी डोंगर आणि त्यावरील ज्योतिबा देव हा इतके दिवस कोल्हापूरच्या राजाच्या ताब्यात होता, तथापि देवाला द्यावयाचा पहिला नैवेद्य ग्वाल्हेरकर शिंद्यांचा असतो व दुसरा कोल्हापूरच्या छत्रपतींचा असतो.

त्याचे कारणही तसेच आहे. सिंध प्रांतातून ज्योतिबा घेऊन आलेले पहिले लोक शिंदेच होते. सिंधमधून ते आल्यामुळे त्यांना सिंधीया किंवा शिंदे म्हणू लागले. ग्वाल्हेरचे शिंदे हे कोल्हापूर-साताऱ्याकडूनच उत्तरेत गेलेले आहेत.

आमचा कुळस्वामी असलेला हा ज्योतिबा महाराष्ट्रात केव्हा आलेला आहे कळत नाही, पण ती फार वर्षांपूर्वी घडलेली गोष्ट असावी असे म्हणावेसे वाटते. कारण देवाची पालखी जेव्हा यमाईच्या भेटीला जाते, तेव्हा यमाईचे पुजारी देवळाची कवाडे लावून घेतात ! देव हा आपली बहीण यमाई हिच्याशी लग्न लावायला येतो आणि ते तिला पसंत नसते असे सांगितले जाते. याचा अर्थ ज्या काळी बहीण भावाचे शरीरसंबंध होते, त्या फारफार जुन्या काळची ही चाल आहे आणि त्या काळी हे देव येथे आले असले पाहिजेत. मागाहून जेव्हा बहीण भावामधील विवाह मागे पडले, तेव्हापासून यमाईच्या पुजाऱ्यांनीही कवाडे लावणे सुरू केले !

हा एक गमतीचा भाग सोडून दिला तरी ज्योतिबा हा देव मागे सांगितल्याप्रमाणे ज्ञानाचे प्रतीक आहे, तेजाचे रूप आहे. अर्थात अग्नीचेही रूप आहे, हे लक्षात घ्यावयास हवे. पूर्वीच्या काळी तर अग्नीला परमेश्वराचे मुखच समजत. 'अग्निरस्य मुखमासीत्' असे म्हटलेले आहे. देवाला द्यावयाचे सर्व पदार्थ यज्ञामध्ये अग्नीत टाकून अर्पण करीत असत, हे आपल्याला माहीत आहे. असा आहे हा आमचा ज्योतिबा.






लेखक : **श्री. भाऊराव धोंडीबा पोखर्णीकर**

फार पूर्वीपासून आर्यावर्तात वस्ती होऊ लागली, तसे पूर्वीचे असलेले लोक दक्षिणेस जाऊ लागले. तेथील मूळ लोक अनार्य किंवा राक्षस. ते ह्यांना दैत्य या नावाने उल्लेखू लागले. कारण मूळचे लोक दणकट व बुद्धीने जड असत. नवीन येणारे आर्य बुद्धिमान असत. त्या बुद्धीच्या सामर्थ्यावर ते या रानटी लोकांचा सहज पराभव करीत आणि त्यांचा मुलूख घेऊन त्यांना खालच्या भागात हाकलून देत. पण आर्य संस्कृतीचा पगडा जसा बसू लागला तसे हे राक्षस किंवा दैत्य बेफामपणे वेळी अवेळी आर्यांवर तुटून पडत, परंतु प्रत्येक वेळी दैत्यांचा पराभवच होत गेला.

अशाच एका वेळी दक्षिणेत दैत्यांचा सुळसुळाट झाला. सर्व लोक त्रस्त होऊन गेले. तेव्हा त्यांच्या एका समाजाने उत्तरेकडून योद्धे आणण्यास सुरुवात केली. त्यांपैकीच उत्तरेकडील पढीक योद्धे दक्षिणेवर स्वाऱ्या करू लागले.

उत्तरेकडे असलेल्या आर्यांत केदारेश्वर किंवा केदारनाथ हा संघ बलाढच होता. त्या संघाने दक्षिणेकडील दैत्यांचा नाश करण्यासाठी तयारी चालविली. अगोदरच बलिष्ठ, युक्तिबाज त्यातच दैत्यांवर स्वारीस जाताना जितके लोक (सैन्य) जमवता येतील तितके ते जमवू लागले.

केदारेश्वर दक्षिणेस जाऊन त्या मातलेल्या दैत्यांवर चालून जात आहेत ही वार्ता सगळीकडे पसरली. मग जिकडून तिकडून झुंडीच्या झुंडी त्यांना येऊन मिळू लागल्या. अशा प्रकारे मुक्काम दर मुक्काम करीत केदारेश्वराची स्वारी दक्षिणेत जाऊ लागली. सैन्याचा अफाट मेळावा जमला. स्वतः केदारेश्वर उत्तम युद्धपटू असल्याने त्यांच्या संग्रही निवडक योद्धे जमू लागले.

इकडे दैत्यांना या स्वारीचा सुगावा लागला. ते आपल्या परीने दैत्यांचा मेळावा जमवू लागले. पण मनातून त्यांनी कचच खाल्ली होती. तरी पण भिऊन

मरण्यापेक्षा लढून मरू या, या जिद्दीने त्यांनी आपल्या सैन्याचा तळ कोल्हापूरच्या आसपास जमवला. तेथे कोल्हासुर दैत्य प्रबळ होता. मग त्याच्यावर रोख ठेवून केदारेश्वर कोल्हासुरावर चालून येऊ लागला. होता होता दोन्हीही सैन्यांचा तळ कोल्हापूरच्या आसमंतात बारा मैलांवर पडला. लढाई जुंपली. केदारेश्वरांनी कोल्हासुराचा वध केला.

आपल्या पूर्वीच्या युद्धनीतीप्रमाणे पावसाळा संपून, आश्विन महिना लागतो, त्यावेळी मुख्य लढाईला तोंड लागून दैत्य पटापट मरू लागले. त्यावेळी कोल्हापुराच्या आसपास असलेल्या शूर देवींची मदत केदारनाथांना झाली. मुख्य देवी म्हणजे अंबिका, त्र्यंबुळी, कात्यायनी, उजळेश्वरी या होत्या. त्यातही इतर देवस्वरूपी असलेले सैनिकही होते. अशा रीतीने दैत्यांचा नाश झाल्यावर केदारेश्वर कोल्हापुरापासून बारा मैलांवर रत्नागिरी नावाचा डोंगर आहे, तेथे

ज्योतिबा : पूजासाहित्य खरेदी



वास्तव्य करून राहिले. त्या डोंगराला पुढे लोक 'रत्नागिरी' किंवा केदारनाथाचा डोंगर म्हणू लागले.

लढाईसाठी केदारनाथांनी आपल्याबरोबर आणलेले योद्धे आपापल्या ठिकाणी परत गेले. पण विजय मिळाला तो केदारेश्वराच्या मदतीने, शौर्याने म्हणून हे सैनिक आमचा 'स्वामी' केदारनाथ म्हणून त्याला आपले कुलदैवत मानू लागले. या आपल्या कुलदैवताच्या गादीच्या दर्शनासाठी उत्तरेकडले लोक अजूनही येतात. त्यातही प्रत्येक महिन्याची पूर्णिमा ही यात्रेसारखी मानून लोक येतात.

चैत्री पुनवेला येथे फार मोठी यात्रा भरते. कारण वयात आलेला केदार, तारुण्याने व आपल्या पराक्रमाने मुसमुसलेला केदार याच्या लग्नाची भाषा सुरू होते. जिकडून तिकडून मुली सांगून येतात. पण केदारनाथांनी आपल्या बहिणीला जी मुलगी पसंत पडेल, तिच्याशीच आपण लग्न करणार म्हणून बेत केला होता. त्यामुळे चैत्री पुनवेच्या सुमाराला आपली बहीण येत आहे व तिने मुलगी बरोबर आणली असेल या हेतूने हे नवरदेव चैत्री पुनवेस नटूनथटून बरोबर समुदाय घेऊन बहिणीकडे थाटाने येतात. पण आपण मुलगी आणली नाही तेव्हा रिकाम्या हाताने बंधूची कशी भेट घेऊ म्हणून यमाई आपला दरवाजा लावून घेते. केदार-नाथाला हे समजल्यावर त्याच पावली स्वारी परत फिरली आणि दक्षिणमुख खडी राहिली. तेव्हापासून चेहऱ्यावर आता लग्न होणार हा हास्याचा भाव कायम आहे. असे स्मितहास्य क्वचितच पाहावयास सापडते.

'रत्नागिरीचा राजा' या नावाने केदारेश्वराला ओळखले जाते. जो रत्नागिरी आहे तो नावाप्रमाणे 'रत्नांचा गिरी'च आहे. या डोंगरावर रत्ने सापडल्याचा उल्लेख नाही, पण खडक आहे तो सर्व लाव्हा रसापासून तयार झाला असल्याने खांब, तुळया, पाटे असे पडदेचे पडदेच खाणीतून निघतात. विशेष म्हणजे कोणताही दगड पाहिला व त्यावर दुसऱ्या दगडाचा आवाज केला तर खण् खण् खण् असा घाटीसारखा आवाज होतो. तसेच कितीही उन्हाळे पावसाळे त्या दगडाने खाल्ले असले तरी त्याच्यावर भेगा पडत नाहीत. म्हणून त्या खडकाच्या खांब, तुळया, चौकटी तयार करतात. या दगडांना चांगली किंमत येते.

केदारनाथाला ज्या ज्या देवींनी मदत केली, त्यात त्र्यंबुली, उजळेश्वरी, फिरंगाई, कात्यायनी, भवानी या मुख्य आहेत. पण आपल्याला लौकिकाने, पातिव्रत्याने, भक्ताला पांघरूण घालून, त्याचा प्रपंच वाढवणारी प्रसिद्ध देवी पद्मावती (श्रीअंबामाता) ही कोल्हापुरास आली.






लेखक : श्री. वसंत चौधरी

कोल्हापूरच्या वायव्य दिशेला नऊ मैलांवर ज्योतिबाचा डोंगर आहे. तो सपाट प्रदेशावर एक हजार फूट उंच असा सोंडेसारखा वर गेलेला आहे. तो अलग आणि वेगळा दिसत असला तरी सह्याद्रीच्या मध्यापासून पन्हाळ्यावरून कृष्णेकडे जो फाटा गेला आहे त्याचाच हा एक भाग आहे. त्याच्या माथ्यावर वाडी रत्नागिरी या नावाने ओळखले जाणारे एक लहानसे गाव वसलेले असून तेथेच प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेले ज्योतिबाचे देऊळ आहे.

मंदिरातील ज्योतिबाची मूर्ती निळसर रंगाची असून चतुर्भुज आहे. तिच्या उजव्या हातात डमरू व खड्ग आहे तर डाव्या हातात त्रिशूल व अमृतकलश आहे. ज्योतिबाचे वाहन जो घोडा आहे तो तर त्याच्याजवळ आहेच पण त्याचे उपवाहन शेषही तेथे आहे. देवाची मूर्ती सहसा दक्षिणाभिमुख असत नाही. पण ही मूर्ती मात्र दक्षिणेकडेच तोंड करून उभी आहे. याचे कारण सांगण्यासाठी एक दंतकथा निवेदन करण्यात येते ती अशी :

'बऱ्याच वर्षांपूर्वी करवीरच्या लोकांना दैत्य फार त्रास देऊ लागले असता देवी महालक्ष्मीने केदारनाथांचा धावा केला, त्यावेळी केदारनाथ ज्योतिबाच्या रूपाने इकडे आले.

ज्योतिबाने दैत्यांचा समाचार घेण्यासाठी प्रथम आपला सरदार तोरणभैरी याला पाठविले. पण तो त्यांचा फडशा पाडून येण्याऐवजी त्यांचा नायक जो रत्नासुर याच्या मोहिनी विद्येला बळी पडून त्याला शरण गेला. ही गोष्ट कळताच ज्योतिबा स्वतः तिकडे चाल करून गेला आणि तोरणभैरीला कैद करून घेऊन आला. आजही त्याचे देऊळ ज्योतिबाच्या डोंगरावर पश्चिम बाजूस आहे.

ज्योतिबाने त्यानंतर दैत्यांचा धुव्वा उडविण्यासाठी काळभैरव नावाच्या त्याच्या पट्टशिष्याला पाठविले. त्याने मात्र आपली कामगिरी अगदी चोख



ज्योतिबा : उत्सवमूर्ती

बजावली. रत्नासुराचा जरी तो वध करू शकला नाही तरी त्याने त्याच्या बऱ्याच अनुयायांचा फडशा पाडला, तेव्हा तो ज्योतिबाच्या गळयातला ताईत बनला. एवढयासाठीच ज्योतिबाच्या दर्शनास जाते वेळी वाटेत जो काळभैरव लागतो त्याच्यापुढे भाविक लोक ज्योतिबाचा नारळ प्रथम ठेवतात.

आपल्या अनुयायांचा संहार झाल्यामुळे रत्नासुराने काही कच खाल्ली नाही. उलट सरळ ज्योतिबाजवळ जाऊन त्याने त्याला द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले. ज्योतिबा वीर होता. रत्नासुराचे आव्हान स्वीकारून तो लगेच पुढे झाला.

दोघांची चांगलीच जुंपली. आषाढी एकादशीला सुरू झालेले त्यांचे हे द्वंद्वयुद्ध सतत सात दिवस चालले आणि शेवटी ज्योतिबाच्या त्रिशूलाला रत्नासुर बळी पडला. लोकांनी आनंदाने 'चांगभले, चांगभले' अशा आरोळ्या ठोकल्या. तेव्हापासून "चांगभले, चांगभले" ही ज्योतिबाच्या भक्तांची उत्साहवर्धक आरोळी ठरली.

अशा रीतीने ज्योतिबाने रत्नासुराचा वध केल्यामुळे महालक्ष्मीच्या मनातील दैत्यांची भीती नाहीशी झाली. तथापि तिने ज्योतिबाला विनविले, "फिरून माझ्यावर संकट येऊ नये म्हणून तुमची दृष्टी सदोदित माझ्यावर असू दे."

ज्योतिबाने महालक्ष्मीची ही विनंती मान्य करून आपले मुख तिकडे वळविले, तेव्हापासून ते तिकडेच आहे.'

ज्योतिबाच्या शक्तीचा ठसा लोकांच्या मनावर बिंबविणाऱ्या अशा किती तरी दंतकथा प्रचलित असल्यामुळे ज्योतिबा हे लाखो लोकांचे आराध्यदैवत बनले आहे. त्याच्या जन्मदिवशी, रविवारी, त्याच्या दर्शनासाठी जाणारे जसे काहीजण आहेत तसे पौर्णिमेला, नवरात्रातील जागराला आणि श्रावण शुद्ध षष्ठीला डोंगरावर भरणाऱ्या यात्रेच्या वेळी येणारेही बरेच लोक आहेत. ज्योतिबाने रत्नासुरावर जो मोठा विजय मिळविला त्याच्या स्मरणार्थ चैत्री पौर्णिमेला तेथे फार मोठी यात्रा भरते. तेव्हा जवळपासची मंडळीच नव्हे तर म्हैसूर, इंदूर, ग्वाल्हेर, खानदेश वगैरे दूरदूरच्या ठिकाणांहून लाख दीड लाख लोक जमतात. त्या वेळचा मिरवणुकीचा थाट पहाण्याजोगा असतो.

हस्त नक्षत्रावर दुपारी बारा वाजता ज्योतिबाची पालखी वाजतगाजत देवळाबाहेर पडते आणि गजगतीने मार्ग आक्रमू लागते. दोन एक फर्लांगावर असलेल्या यमाईच्या देवळाला जायला पालखीला चांगले चार पाच तास लागतात. त्यावेळी 'चांगभले'च्या गगनभेदी आरोळ्या ठोकीत भाविक लोक सासनकाठ्या घेऊन नाचत असतात.

सासनकाठी म्हणजे ३० ते ३५ फूट उंचीचा लांबलचक वेळू. त्याच्या शेंड्याला एक चांगले वस्त्र व तुरा बांधलेला असून वेळूच्या तळापासून साधारणपणे चार पाच फुटांवर एक आडवी फळी ठोकलेली असते, त्याच्यावर ज्योतिबाचे वाहन असलेला घोडा बसविलेला असतो. ताशा सनईच्या नादात आणि 'चांगभले'च्या गजरात भाविक लोक सासनकाठ्या इतक्या सुरेखपणे नाचवितात की, पहाणाऱ्यांची मती गुंग होऊन जाते. अशा वेळी लोक कितीही दमले तरी यमाईचे देऊळ येऊन ज्योतिबाची पालखी आत जाईतो हातातल्या काठ्या खाली ठेवीत नाहीत.

गॅझेटियरमध्ये यमाई ही ज्योतिबाची बायको असून चैत्री पौर्णिमेला आपल्या लग्नाचा वाढदिवस साजरा करण्यासाठी तो वाजतगाजत तिच्याकडे जात

असल्याचे विदित केले आहे. इतिहास संशोधक श्री. गुळवणी यांच्या मते यमाई ही ज्योतिबाची बायको नसून त्याची गुरुपत्नी आहे. ती त्याचा गुरु जमदग्नी याची बायको आहे. ज्योतिबा त्याच्या गुरुमाउलीस फार मानीत असे. रेणुकेने तर त्याला वेळोवेळी फार मदत केलेली असल्याने तो तिला मातृस्थानी लेखत असे, म्हणूनच त्यांच्या लग्नाच्या वाढदिवसाच्या समारंभाला हजर रहायला तो चुकत नसे. पण इकडे येऊन तो दैत्यांबरोबरच्या युद्धात गुंतून पडल्याने एकदा त्याला चैत्री पौर्णिमेला समारंभ साजरा करण्यासाठी रेणुकेकडे जाता आले नाही. ही गोष्ट त्याच्या मनाला फारच लागून राहिली. त्याला शरीराने तिच्याकडे जाता येत नव्हते तरी त्याचे मन एकसारखे तिच्याकडे धाव घेत होते. शेवटी अभाविकपणे त्याने तिला हाक मारली, 'ये माईऽये माईऽऽ' आणि आश्चर्याची गोष्ट ही की, त्याने अंतःकरणपूर्वक मारलेली ही हाक ऐकून रेणुका तेथे आलीही! 'येऽमाईऽऽ' म्हणून ज्योतिबाने मारलेल्या हाकेवरून लोक तिला 'यमाई' म्हणून संबोधू लागले!

यमाई आल्याचे पाहून ज्योतिबाला आनंद झाला. त्याने तिच्या रहाण्याची सोय खालच्या नितांत रम्य अशा वनराजीत केली आणि तेथे तिच्या लग्नाचा वाढदिवस समारंभ थाटामाटात साजरा केला. आजही चैत्री पौर्णिमेच्या दिवशी यमाईच्या लग्नाचा सोहळा तेथे धूमधडाक्यात साजरा केला जातो. या समारंभाला हजर रहाण्यासाठी ज्योतिबा जातो आणि नंतर तो समारंभ पुरा झाल्यावर परततो.

ज्योतिबा मंदिर : मुख्य दरवाजा



ज्योतिबा डोंगरावर इ.स. १९५९ मध्ये सरकारने एक विश्रांतिगृह बांधले आहे. त्याशिवाय गावात व मंदिरामध्ये सर्वत्र विजेची सोय केली आहे. जोतिलिंग देवस्थानाची सर्व व्यवस्था सरकारनियुक्त देवस्थान विश्रांतिगृह मंडळाकडे असून या ठिकाणी देवस्थान कामगार व इतर नोकरवर्ग व्यवस्था पहाण्याचे काम करीत असतो. यात्रेची व्यवस्था ग्रामपंचायतीमार्फत केली जाते.





# सोन्याचं जानवं

निवेदिका : **श्रीमती जानकीबाई पाटील**

असंच आपलं एक गाव होतं. तिथं एक गरीब बाई रहायची. दळण कांडण करून पोट भरायची. पण बिचारी मोठी कष्टी असायची. पोटी मूल बाळ नव्हतं म्हणून रडायची. तर एकदा काय झालं की, शेजारच्या आयाबाया ज्योतिबाला नवस कर म्हणाल्या. म्हणून ही डोंगरावर गेली. ज्योतिबाचं दर्शन घेतलं. नवस बोलली. म्हणाली, 'देवा ज्योतिबा, माज्या घरात पाळणा हलू दे. तुला सोन्याचं जानवं घालीन.' तसा देव तिच्यावर प्रसन्न झाला. त्यानं तिला दर्शन दिलं. 'तुझी इच्छा पुरी होईल मात्र शब्दाला जाग' म्हणाला.

झालं ! ही हारखून टुम्म झाली. माघारी आली. देव्हाऱ्यातील ज्योतिबाला पुजायला लागली. ऐतवारचा उपास करायला लागली.

होता होता तिला दिवस गेले. आणि मग एकदा काय झालं की, ज्योतिबा देव तिच्या परीक्षेला निघाला. बैरागी झाला. भिक्षा मागायला तिच्या दाराशी आला. बघतोय तर ही आपल्याच नादात. तिनं भिक्षेकऱ्याची दखलच घेतली नाही ! तशी मग हा रागाला आला. जवळच्या कमंडलूतलं पाणी त्यानं मग तिच्या दारातल्या भाजीपाल्यावर शिंपडलं आणिक निघून गेला.

इकडे तोवर काही दिवसांनी ही बाळंत झाली. तिला मुलगी झाली. पण बघतात तर ही मुलगी डुकराच्या पिलासारखी ! आता काय करावं ? सारं गाव बघायला जमलं. माणसाच्या पोरावानी हे पोर रडतेलं, पण दिसायला असं कसं ? ज्याला त्याला नवल वाटलं. तरी पण हिनं त्या पोरीचा सांभाळ केला. तिला कवतिकानं ल्हानाची मोठी केली.

पुढं मग एकदा काय झालं की, ही डुकरासारखी दिसणारी मुलगी आळीतील पोरींच्या बरोबर नागपंचमीच्या वेळी न्हंवणाला म्हणून नदीवर गेली. पण तिला कुणीच आपल्यासंगं खेळायला घेतली नाही. तशी मग ती एकटीच खेळत राहिली.

तितक्यात काय झालं की, त्या नदीच्या दुसऱ्या कडेला एका राजाचा मुलगा शिकार खेळत बसला होता. त्याची नजर तिच्यावर गेली. तर काय गंमत बघा, एकदम हिचं रूपांतर एका सुंदर राजकन्येत झालं! राजाचा मुलगा धावत तिच्याकडे आला. करीन तर हिच्याशीच लगीन करीन म्हणाला. त्यानं तिला तसं बोलून पण दाखवलं. तशी ही म्हणाली, 'हात नको लावूस नाही तर डुकराचं पिलू होईन!' मग हा बापाकडे गेला. लग्नाचा बेत बापाला करायला लावला. पण राजा कुठला तयार व्हायला? नको म्हणाला. नव्हे एकुलता एक मुलगा तेव्हा राजा असं कसं ऐकेल? पण पोरानं आपला हेका सोडला नाही.

अखेर शेवटी थाटामाटानं ह्याचं लग्न त्या पोरीशी लागलं. सारी माणसं थक्क झाली. राजानं मग हे नवरानवरी आपल्या घरी आणले, तशी पहिल्या रात्री राजपुत्रानं आपल्या बायकोला काही विचारलं. म्हणाला, 'कधीकधी तू चांगली दिसतेस तर कधीकधी तू डुकराचं पिलू होतेस. तर असं का?' मग हिनं कारण सांगितलं. म्हणाली, 'माझी आई ज्योतिबाला सोन्याचं जानवं घालीन म्हणून नवस बोलली‌वती पण तिच्यानं तो नवस फेडणं झालं नाही. तुम्ही तेवढं ते करा. मी साजिवंत होईन.' मग काय? राजपुत्रानं राजाला ही खबर दिली. गावोगावचे कारागीर रातोरात जमले. सोन्याचं जानवं राजानं ज्योतिबाला घातलं. ही मुलगी साजिवंत झाली. सगळीकडे आनंदी आनंद झाला.






निवेदिका : **प्रा. सुमन पाटील**

केवळेचा नावजी भक्त, देवाचा जिवाचा चाकर हुता. दररोज त्यो त्येच्या डोंगरावर जातो. त्येची मनोभावाने सेवा करून मग पोटाला अन्न घासभर खातो. भक्तीकरिता पाटील झाला. ऐपतीपरमान त्याला द्रव्य भरपूर होते. भक्ती करिताना तो झाला बेकार. त्येची गेली सर्व ईस्टन गुरंढोरं, पोटच्या अन्नासाठी तो झाला महाग. परी न्हाई सोडला तेनं भक्तिभाव धर्म. त्या देवावरी धरीला असा भक्तीचा भडिमार, तेवा त्याचे झाले पुनरपी एक तप भरपूर. बारा वर्सांनं त्या देवानं केला इचार. माह्या भोळ्या भक्ताला जाऊन भेट द्यावी लवकर. भगवी काया, भगवी माया, धरीला अवतार. देव गोसाव्याचे रूप घेऊन आला. केवळ नगरावर अलख अलख म्हणीता हिंडतो गल्लीनं, तवा केदाराला न्हाई केला कुणी दानधर्म. न्हाई आली गोसाव्याची माया कळून. तवा पाटलाच्या दारी जाता पाह्यलं अस्तुरीनं, खरोखर आपला देव आला धावून. म्हणून त्येंच्या पायावर घालती लोटांगण. तेवा केदारनाथा बोले त्या मायेकारणं. म्हणे भुकेनं व्याकूळ झाला माझा प्राण. करून वाढ आता तू मला भोजन. पाटलीण घरात पाहता न्हाई चिमूटभर धान्य. शेजारपाजारणीच्या घरी हिंडती उसन्यासाठी. म्हणे माह्या भैनीनो, पाठच्या आक्कांनो, मला द्या तुमी दोन रुपय उसनं किंवा शेरमापटं उसनं. म्हणे 'पाटलीणी पैले न्हेल्याले दिले का आणून? या घडीला कुठलं मिळल् तुला उसनं? जा ग पाटलीणी इथून निघून.' म्हणताना पाटलीण हिंडून हिंडून गेली कावून. पाटलीण घरात जाता पाटील आलं व्हतं भक्तीपासून. म्हणी, 'धनी तुमा सांगते घ्या माझं ऐकून. आमच्या घरी म्हणे म्हाराज आले. भोजनाकारणं. तेवा आपलं इष्टमित्र कुणी असतील तेंच्याकडून आणावं तुम्ही दोन रुपय उसनं.' पाटील हिंडू लागले उसन्यासाठीनं म्हणे माह्या दादानो, पाठच्या बांधवानो मला द्यावं तुमी दोन रुपय उसनं. म्हणे 'पाटला तुनं पयले

न्हेल्याल दिलं का आणून? या घडीला कोण उसनं देईल?जावा निधून. उभयता
हिंडून हिंडून गेले कावून, घरामंदी येता पायले तेवा भोळचा नाथानं, म्हणे तुमची तापत्रा मला आली समजून. तुमच्या उतरंडीला दाणं हायत. या जावा बधून. चांगभला म्हणीता गुलाल मारीला देवानं. म्हणे धान्याने तेच्या उतरंडी आल्या भरून. तेवा देवासाठी केला सैपाक त्यानं सोवळचानं, जेव्हा हाक मारली तेव्हा नाथाला म्हणे तुमी पाटील एक म्हस कुठं ठेवली ती या जावा घेऊन. म्हस ठेवली तेल्याच्या घराकारणं, तेली देतो तिला एक रुपया दाम चार दिवसाकारणं त्येच्यावरती चटणीमीठ माझं चालल देवा आनंदानं. म्हणून म्हस तेल्या घराकारणं. हरकत न्हाई येजा घेऊन दिले लावून. तेलीदादाला जाऊन म्हटले म्हणे 'म्हस नेतो घराकारणं. तेली म्हणे, म्हशीला कुठली घालशील चारा-वैरण, पाटील बारा वर्सं पड पडलं तुमच्या मालकीचं रान. हरकत नाही देवानं दिलं मजला आणाया लावून. म्हशीला जातो घेऊन. तेव्हा म्हशीला दिली सोडून. म्हणे तेलीदादा पाटलाकारणं तुमचं राहिलं माह्यावरती १०-५ रुपय रीण. तेही तुमी जावा आता घेऊन. १०-५ रुपय घेऊन म्हशीला घेऊन आले निधून. म्हस आणून बांधली गोटचाकारण म्हणे पाटील म्हशीची धार द्या पिळून. न्हाई पिळली म्हणे मी बारा वर्सं पाळली लाडाकारणं. कशी काढा म्हणता मला धार पिळून, चांगभला म्हणीता थाप मारीली म्हशीच्या पाठीकारणं. चळचळा दूध सुटलं मग थानामधून. दोन घागरी दूध काढलं मग पिळून. दूधभात देवाशी जेऊ वाढती आनंदानं. शांत झाली त्या बुवाची ध्यायी. ढेकर दिला देवानं. जेवण झाल्यावर हाक मारितो देव पाटलाकारणं. म्हणे पाटील जरा चला येऊ तुमच्या शेताकडून फिरून. कशाला फिरायचं शेताकडं वाढलं की हो बारा वर्सांचं तण. हरकत न्हाई येऊ जरा फिरून. देव आणि पाटील गेलं निघून. मध्य भागावरी त्रिशूळ मारीला केदारनाथानं. म्हणे पाटील या जमनीत आहे सात हंडे द्रव्य हिरामोराकारणं. बोले पाटील देवाकारणं. म्हणे अन्यायी पामर मला कसे मिळणार? तेव्हा मारीला त्रिशूळ देवानं. धन काढीला साटे उकरून. पाटलाच्या डोक्यावर देता हंडे दोनतीन. देवानं घेटले दोनचार. आले निधून तेव्हा शहरात. येता पाहिलं तेवा आजूबाजूच्या लोकानं म्हणे पाटलाला गावले की हो सरकारी जमनीत धन. म्हणे बादशहाचा हुकुम आता कधी जाऊन कळवीन. आजूबाजूच्या लोकांनी जाऊन कळविलं बादशाकारणं. केदारनाथ येऊन पोचले डोंगराकारणं. तवर येऊन ठेपले त्या बादशाचे सैन्य. तेवा अटक केले उभयताना बादशानं. हातपायाला बेड्या बांधून धन चालला लुटून घेऊन. तेवा बादशा आणून ठेविला आपल्या शेराकारणं. धन लाविले खजिन्याकारणं, उभयताना दिले
 ढकलून तुरुंगाकारणं. दिवस होता शनवार दिन, तुरुंगात केला धावा पाटलानं,

म्हणे तुझा उद्या रविवार दिन, कसं घडील तुझ्या पवित्र पायाचं दरशन. म्हाई केली धनाची आशा कवडीकारणं. धावत येऊन भेट द्यावी देवा मजकारणं. हिकडं डोंगरावरी देव झाला केदार चैतन. मध्यरात्री घोडा घेटला शिणगारून, आकाशमार्गे घोडा उडविला देवानं. मध्यरात्री बादशाच्या शिरी उतरिला येऊन दरवाजे टाकिला मोडून, घोडा लाविला पलंगाकारण. पाटलाला का रे आणलं धरून अशी सिंहगर्जना करता छातीवर त्रिशूळ ठेवून, तेवा बादशा गेला घाबरून. म्हणे म्हाराज काय चुकलं द्यावं सांगून. माह्या का रे पाटलाला आणलास धरून? आताच्या आता पोचव त्याच्या शारांकारण. म्हाईतर तुझ्या शाराला लावतो मी आगीन. तेवा बादशा मनी गडबडता झाला. मध्यरात्री आणिले सोडून, घालीता सुवासिक स्नान. राजपोषाख दिला बादशानं तेच्यापेक्षा दिले चौपटीनं धन. रातोरात पोचवले केवळ नगराकारणं. दुसरे दिवशी रविवार दिन. भक्त आला डोंगराकारणं देव केदार होता प्रसन्न. म्हणे तुला काय घ्यायचं घे मागून, म्हणे चैत्राच्या म्हैन्यात तुमच्या सबीना फिरतो आनंदानं. माह्या निशाण्याला द्यावा तुमी पैला की हो मान म्हणून त्या पाटलाचा चालला की हो अजून मान. पुनरपी देवाकडे काय मागतो ऐका वचन. कुठे तरी देवा पडेन वाटेतिटेनं मरून. तुमच्या पायाजवळ जागा द्यावी आनंदानं. भक्त राहिले तेथे देवानं दिली जागा. पायाजवळ. तेव्हा भक्त देवापाशी राहिला अजरामर होऊन. भक्तीपासूनी गोसावी झाला. त्येला नाव पडले नावजी हेच कारण.



## अनुक्रम

संग्राहिका : प्रा. सुमन पाटील

जोतिबा घोड्यावरी वैजनाथ तो पायी चाले
येलुबाई माजी बोले बंधु माझे दुणावले

जोतिबा न्हवयीरा येलुबाई ती ओवईळी
तिच्या ग करावरी चांदसूर्याची सावली

जोतिबाच्या वाटे दिसती दवण्याची रोपे
मुरूख माणूस खवा म्हणून मारी फके

जत्रा ग भरलीया जोतिबा त्या दलालाची
माज्या ग बाळकाच्या हाती पितळी गुलालाची

पंचगंगेचं हे ग पाणी दिसं खढूळ ताकावानी
जोतीसागर देवायानी जटा धुतल्या गोसाव्यानी

जोतिबा जाताना ग नगारा वाजे नवा
बाळ राजसा माज्या बाई आली संपता जाती देवा

जोतिबा जाताना ग सीसण ठेवलं सजवून
भगत माजं बाळ घेणार गेलं पुढं हून

जोतिबा जाताना ग कटला बैल सजवीला
तान्हा ग बाळराज दवना गुलाल वाहू गेला

जोतिबा जाताना ग आडवं लागलं यमनापूर
सावळ्या बंधुराया तुझे भगत गेले दूर

जोतिबा जाताना ग आडवी लागली कागयिती
व्हनम्या गावामंदी भैरी देवाची वसयीती

जोतिबा जाताना ग आडवं लागली सूतकाठी
देवा जोतिबाच्या जातो गुरूच्या आमी भेटी

जोतिबा जाताना ग आडवं लागलं संकेशर
जोतिबा घोड्यावरी तुरा घेतो मी मोतीचूर

निपाणी गावच्या वेशी सासणाची झाली दाटी
देवा ग जोतिबाच्या गुरूच्या जाती भेटी

जोतिबा जाताना ग माझ्या वटचात व्हती पेरं
देव माजा जोतिबा ग एकादशीचा निरंकार

जोतिबाची ग वाट सये चढाया हालयिकी
देवा माज्याच्या संगं येती गुरूची पालयिकी

जोतिबा जाताना ग मला लागली तानभूक
सावळा बंधु माजा दावी मला गायमुख

देवाच्या डोंगरात मी ग आडव्या निऱ्या खवी
देवा माज्या जोतिबाला गुरूला निवद दावी

पंढरी जायाचा ग मी का इचार केला कल
देवा जोतिबा बंधु माज्या संगं माज्या तू बी चल

जोतिबाची जत्रा जन म्हणी पाणी पाणी
देवा ग जोतिबांनी त्रिशूळ मारूनी काढलं पाणी

चैताच्या म्हईन्यात देव जोतिबा वेडापिसा
पाठीच्या भैनीसंगं लगीन लावूनी गेला कसा

जोतिबाच्या वाटं फुटली गुलालाची पेवं
जनलोक म्हणीयती दावा निवदाला फवं

देवा ग मंदी देव देव जोतिबा खरं बोलं
तुझ्या मस्तकी तुरा डोलं लाडक्या बाळराजा

संग्राहिका : सौ. सुभद्रा सावंत

देवामंदी देव देव जोतिबा किती काळा
धूप जळतो सव्वा तोळा
देवामंदी देव देव जोतिबा चांगला
जन बोलती चांगभला
देवामंदी देव देव जोतिबा किती भोळा
जन सतरा होती गोळा
देवामंदी देव देव जोतिबा पाया पडू
आपल्या मनीचं कोडं सोडू

देवामंदी देव देव जोतिबा किती शाणा
शिंग वाजतं दणादणा

देवामंदी देव देव जोतिबा खरोखरी
नवस बोलती घरोघरी

देवामंदी देव देव रत्नागिरीचा मोठा राजा
त्याच्या कीर्तीची दारी धजा

संग्राहिका : सौ. गंगूबाई बाबर

चैताच्या म्हईन्यात देव जोतिबा कुठं जातो
आपल्या नारळाचा काळभैरीला मान देतो

आईतवारी न्हाई सारविलं घर
देवा माज्या जोतिबा चुकी माजी माफी कर

चैतीपुनवेला डोंगरावरी गलबला
देवा जोतिबाचा मानाचा चांगभला

जोतिबाची जत्रा जत्रा म्हणीती पाणी पाणी
बारव काढीली चाफ्यामंदी देवा माज्या जोतिबांनी

जोतिबाच्या वाटे धुरळा चढतो गंगनाला
देवा माज्या जोतिबाचे घोडे खेळती रंगणाला

जिवाला माज्या जडू मला कशाला वैदवानी
देवा माज्या जोतिबाच्या त्याच्या न्हानीचं पाजा पानी

जिवाला माज्या जडू मला कशाला म्हालदारी
जोतिबा माजा सादु वैद आलाया माज्या घरी

देव जोतिबा घोड्यावरी काळभईरी पाठीशी
माझा बाळ भक्त भेटला वाटेशी

देवा जोतिबाच्या वाटे कोणी म्हणीना चांगभलं
आला जतरेकरी बाळ

जोतिबाच्या वाटे वाजे नगारा तांब्याचा
माझा बाळ भक्त निगाला भाग्याचा

चैताच्या म्हईन्यात देव जोतिबा घोड्यावरी
टाकी नदार खेड्यावरी

आठ दिसाच्या आईतवारी ऊद कापूर माझ्या हाती
ज्योतिबाच्या जाते भेटी

जोतिबाच्या वाटे आडवं सराटं सोनियाचं
नटव्या बंधुजीचं ओठ सुकलं पानायाचं

नवलाक एवढा घोडा गाई मुखाला पानी पेला
देवा माझ्या त्या जोतिबानं रत्नांगिरीला डेरा दिला

नवलाख या पायरी मला चढीता झालं ऊन
देवा माझ्या जोतिबानं मला दिलंया दरशन

चैताच्या म्हईन्यात वाजंत्री वाजत्याती
देव जोतिबा बोलत्याती

नवलाख पायरी अंब्या फणसाचं बन
देवा जोतिबा तुला साजे चैत म्हईन्याचं ऊन

संग्राहिका : **सौ. शांता पाटील**

रात्रीच्या सपनाची किती सांगू मी भावना
माहेराचा देव आलाया जोतिबा पाव्हना

देवाजीला मी जातो मोठ्या हावसेनं केलं लाडू
देवा जोतिबा तुझं मला लई याडू

आठ दिसाच्या आईतवारी देव जोतिबा घोड्यावरी
टाकी गुलाल राजावरी

भाजी मिळंना घोलान्यात अंबाबाईच्या न्हानीपाशी
आला हरबरा सोलायाला देवा जोतिबाच्या ताशी

संग्राहिका : **सौ. शरदिनी मोहिते**

बत्तीस पानाचा विडा रगला जोतिबाचा
त्येला रतीब पन्हाळ्याचा

देवा जोतिबाच्या वाटे आंबा लागला विसाव्याचा
चढे डोंगर गोसाव्याचा

जोतिबा देवाच्या शिखरावर कोण बोलतंय गूज
कवा बांधून गेला धज

चैताच्या म्हईन्यात भाजी मिळेना घोळाण्याला
रुकमिणीच्या न्हाणीपाशी ढाळा आलाया सोलाण्याला

चैताच्या म्हईन्यात देव जोतिबा आवागला
पाठीच्या भैनीसंगं गेला लगीन लावायला

आठ दिसाच्या आईतवारी देव जोतिबा तोलीवार
हाती सोन्याची तलवार

संग्राहिका : **सौ. शकुंतला बाबर**

आठ दिसाच्या आईतवारी नाही नारीनं सारविलं
देवा माझ्या त्या जोतिबानं घोडं माघारी फिरविलं

आठ दिसाच्या आईतवारी मला खेडचाला झाली रात
जोतिबा माझ्या देवा मी का दल्लेन दरवाजात

आठ दिसाच्या आईतवारी पीठ माझं ते साठचायाला
जोतिबा देवायाच्या मी का जायची खेटचायिला

दुबळं माझं पन साऱ्या जगाला म्हाईत
जोतिबा माझा देव आला खजिन्यासहित

देवा जोतिबाच्या वाटं सारी गुलाबाची पेवं
बाळा माझ्याला किती सांगू भक्ता उधळीत जावं

देवा जोतिबाच्या वाटं सारा डोंगर गुजारला
चांगभलंया म्हणताना गड पन्हाळा हादरला

चैताच्या महिन्यात देव जोतिबा कुठं गेला
काळभैरीला मान दिला

संग्राहिका : **सौ. मालतीबाई दांडेकर**

देवामंदी देव जोतिबा लई मोठा
चैताच्या म्हईन्यात त्याच्या फुलल्या चारी वाटा

जोतिबाच्या वाटे तांबडचा करवंदी
तान्हीयाचं माझ्या गुलालाचं गेलं नंदी

जोतिबाला जाते अंबा लागतो इसाव्याचा
देव जोतिबाचा डोंगर चढते गोसाव्याचा

आठ दिसा आदितवारी सडा देते गुलालाचा
जोतिबा देवाचा मला शेजार दलालाचा

आठा दिसा आदितवारी देव जोतिबा घोडचावर
टाकी नजर खेडचावर



संग्राहिका : प्रा. सुमन पाटील

## डवरी-कुरकुली यांची गीते

१

देखली मुंगी गुरु ज्ञानदूत बैरागी
मुंगी म्हणजे थोर आहे
सप्तपाताळी तिचे पाई
देखली बहुरंगी अशी बैरागी
गुरु ज्ञानज्योत बैरागी
मुंगीच्या पोटी चौदा अंडी
सात पिंडी सात ब्रह्मांडी
तिने तो पर्वत उचलला तोंडी
वाजवली पुंगी
गुरु ज्ञानज्योत बैरागी
मुंगीच्या मस्तकी एक तळे
ते का उदकाविण डळमळे
जाणतो योगी गुरु ज्ञानज्योत बैरागी

२

जोतिर्लिंग बारा लिंगाचा
दत्तगुरु दत्तानंदाचा
चवघडा नाद मृदंगाचा
पुढे दरवाजा भिंगाचा

भार पितळ त्या चवकटीचा
बारा खण मंडप दगडीचा
जोतिर्लिंग बारा लिंगाचा

पालखी सोभे अंबारी
आपुल्या दासाला दारी
शिरी तुरा पेच पाचूचा
गळ्यामधी मोहनहार मोत्याचा
जोतिर्लिंग बारा लिंगाचा

परतम काशीमधे आवतरले
तेंवा अशुराशी पळ सुटले
जोतिर्लिंग बारा लिंगाचा

ऐतवार दिवस नाथाचा
सबीना निघतो देवाचा
कोतवाल पुढं हो सबीनाचा
जोतिर्लिंग बारा लिंगाचा

बेत रविवारी पालखीचा
बुधवार घोडा नाथाचा
सबीना निघतो नाथाचा
जोतिर्लिंग बारा लिंगाचा

३

नाथजीला चला जाऊ
चरण केदाराचे पाहू
रामलिंग चोपडाई
भावे गुलाल दवणा वाहू
नाथजीला चला जाऊ

एके दिवशी एक शीण
जाता डोंगर चढून
राम रवळियाचे, यमाईचे दर्शन घेऊ
नाथजीला चला जाऊ

द्वादशी पत्रपूजा
त्याशी पावे जोतिराजा
निपुत्राशी पुत्र देतो
पावे अनर्थाच्या काजा
नाथजीला चला जाऊ

काठी कावडीयाचा भार
चांगभल्याचा गजर
कालुकरण शंकर भैरी
धो धो वाजती नगारं
नाथजीला चला जाऊ

चैत्रमासी उष्णकाळ
यात्रा मिळाली सकाळ
ठायी ठायी यात्रा न्हाते
देव करितो संबाळ
नाथजीला चला जाऊ

नाथ बसले सदरेवर
मुजुरा करिती न्हाणथोर
गुलाल दवण्याचा भडिमार
नाथजीला चला जाऊ

४

नाथ दक्षिणापती केदार
चैत्रमासी यात्रा भरती
भक्त मिळाले अनिवार
नाथ दक्षिणापती केदार

खारिक खोबरे
उधळती भक्तजन
गुलालाचा भडिमार
नाथ दक्षिणापती केदार

हात्ती घोडे तोफ गर्जती
सबानी निघाला भडिमार
नाथ दक्षिणापती केदार

काळभैरव हाये पाठीमागे
दैत करी संहार
नाथ दक्षिणापती केदार

भैनीमाई आशा भारी
भेट देतो केदार
नाथ दक्षिणापती केदार

नाथ भुजंग सम दास मी तुमचा
सदरे पुढे येणार
नाथ दक्षिणापती केदार

५

नाई नाथा मज कुणाचा आधार
जिवे निरंतर हासतो गे
कृपेचा सागर भावाचा भुकेला
म्हणुनिया झाला देव गडी
कृपेचा सागर भावाचा भुकेला
आता न सोडावे देवाजीचे पाय
सुलभ उपाया सापडेला
कृपेचा सागर भावाचा भुकेला
म्हणुनिया झाला देव गडी
नाथ भुजंगाशी उपासावे तुम्ही
रेणुकेचे स्वामी सौदागर
कृपेचा सागर भावाचा भुकेला

६

नमु नात गुरुजीला सिदभैरोबाला
आदिपुरुषादेश गुरुजी
आदि लागू गुरुचरण
शिव भैरोबाला
नमु नात गुरुजीला
कानात मुद्रा त्रिशूळ जपमाला
शैली शृंगी कानात मुद्रा
त्रिशूळ शोभे खड्ग जपमाला
महाराज नमु नात गुरुजीला
नात भुजंगस्तव शरण तुमाला
नमु नात गुरुजीला
तुमी गुरु हाय आमी चेलाचेला
नमु नात गुरुजीला
नमु सिद भैरोबाला

७

दवणा घेऊ गुलाल वाहू
हासत नाचत केदाराला जाऊ
हासत नाचत जोतिबाला जाऊ
चैत्रमासी यात्रा भरती
पौणिमेदिवशी पालखी फिरती
हस्तनक्षत्राव पालखी उठती
देवाजीला त्या भेटाया जाऊ
दवणा घेऊ गुलाल वाहू

चैत्राच्या महिन्यात खूप होते गरदी
नगार नौबती झडू लागती
वाद्याचा हा गजर होती
मानाची निशाणं तुझ्या डोंगरावर झळकती
दवणा घेऊ गुलाल वाहू

मान मानकरी मानासाठी भांडती
मानाचे निशाण डोंगरावर नेऊ
आनंदाने आनंदाने जोतिबाला जाऊ
दवणा घेऊ गुलाल वाहू

पाच ऐतवारी पाकाळणी हुती
नाथा तुझा सर्व दरबार धुती
भक्त सारे तुझा जयजयकार करती
आनंदानं आनंदानं तुह्या डोंगरावर येऊ
दवणा घेऊ गुलाल वाहू

श्रावणमासी षष्ठी होती
न्हाणथोर उपोषण नाथा तुझे करती
द्वादशी दिवशी उपोषण सोडती
भाकेचा नारळ घेऊन येती
वर्षभर भाक तुझी अखंड ठेवू
दवणा घेऊ गुलाल वाहू

आहे दसऱ्याची महमा थोर
करिती सर्वत्र तुझाच जयजयकार
नऊ दिवस नवचंडी होती
नंदादीप हा तुजला उजळती
नंदादीप हा अखंड ठेवू
दवणा घेऊ गुलाल वाहू

नामदेवदास विनवी तुम्हाला
भाव भक्तीने लागू चरणाला
देव पावतो तुमच्या नवसाला
चांगभला चांगभला आनंदात घेऊ
दवणा घेऊ गुलाल वाहू





# तुळजा भवानी

**तेजाळली वरदायिनी**

कपाळावर चंद्रकोरीचं देखणं रूप, नाकात टपोऱ्या मोत्यांची नथणी, कानांत हिरेजडित कर्णफुलं, दंडांवर बाजूबंदांचा झोक, गळ्यात चंद्रहाराचा भार, मनगटावर जडावाच्या कंगण्या, अंगावर भर्जरी साडीचोळी, मनात दाटला आनंद आणि नजरेत न मावतेली उत्सुकता असा आपला थाट घेऊन त्या दिवशी हळदकुंकवाच्या पायघड्यांवरून तुळजा भवानीच्या मंदिरात जाताना आमचे पाय कसे हलकेफुलके होत भराभर पुढं पुढं गेले. महाराष्ट्राच्या कुलस्वामिनीला ओवाळायला घेतलेल्या पंचारतीच्या डौलानं आमच्या कायेला अगळं सौंदर्य प्राप्त झालं. छत्रपती शिवाजीराजांच्या स्फूर्तिदेवतेला भेटायला जाताना आमची उत्सुकता शिगेला जाऊन पोचली. सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांच्या आराध्य-देवतेच्या दर्शनाला जाताना आम्हाला आस्मान ठेंगणं झालं. वाऱ्यागत आमचं ध्यान हाललं आणि भक्तांच्या रांगेतून पुढं पुढं सरकताना त्या जगज्जननीच्या पायाला केव्हा शिवीन म्हणतेल्या आधाशीपणानं जीव मोहरून उठला. मराठ्यांच्या पराक्रमाची शर्थ पाहिलेल्या या महन्मंगल शक्तीच्या गाभाऱ्यात शिरता क्षणीच फुलांचा पोषाख ल्यालेल्या या माता माउलीनं कौल दिला आणि गाभारा घुमला, 'कल्याणम् भवतु।' त्यासरशी आमच्या नेत्रांचे दिवे अपूर्वाईनं पाजळले गेले आणि देहाचा मृदंग करीत आम्ही त्या महादेवीचं मनसोक्त दर्शन घेत म्हटलं, 'आई जगदंबे, मला मंत्र ठाऊक नाहीत. बये, तुला आवाहन कसं करावं अगर तुझ्या ध्यानात कसं मग्न व्हावं माहीत नाही. तुझ्या दर्शनानं होणारा ब्रह्मानंद गाऊन दाखवीत तुझी पूजा बांधीन म्हटलं तरी मला तुझ्या एकीच्या स्तुतीपर गोष्टींचं ज्ञान नाही. एवढंच नाही तर बये, मला तुझ्या मुद्रादेखील ठाऊक नाहीत ग? माते, अग, मला धड रडतादेखील येत नाही बघ! तरी पण आई

जगदंबे, मला एवढं पक्क कळतं की, तुझ्या दर्शनानं, तुझ्या पूजेनं आमचं दुःख पळून जाईल! मन स्फूर्ती घेऊन उठेल. तुझा उदंड आशीर्वाद आमच्या पाठीशी नांदू दे. बये, केसांची चवरी करून तुझं अंगण झाडू आम्ही आणि येणाजाणारांना पानवंतांच्या पदरानं पालवू. खरंच, बये, तुझ्या उदोकारानं महाराष्ट्राचं राऊळ साजिवंत होऊन उठेल. तुझ्यातल्या क्षात्रतेजानं आम्हाला धन्य धन्य करून सोडलंय. . .उदयोऽस्तु बयेऽऽउदयोऽस्तु!'. . .

त्या मराठमोळ्या तेजाला नजरेत भरून घेत आम्ही त्या महादेवीचे पाय शिवले. तिला दंडवत घातला. आणि मग तिच्या दर्शनानं धुंद होऊन गेलेल्या भोळ्या-भाबड्या मनाला पोटाशी घेऊन तिथून पाय काढला. गाभाऱ्यातून बाहेर आलो. प्रदक्षिणेची वाट दिसली तशी तिथल्या दोन-तीन पायदंड्या उतरून निघालो. एवढ्यात देवीच्या रंगभोगाचा नि अंगभोगाचा मानकरी असलेला भुत्या दिसला.

गळ्यात कवड्यांच्या माळा, डोईवर कवड्या जडवलेला टोप, अंगावर तेलकट वस्त्रं, हातात पोत (जळता काकडा) आणि मुखामध्ये देवीचा उदोकार असा त्या भुत्याचा थाट होता. त्याच्या आसपास याच नोकझोकातील आणखी काहीजण दिसत होते. तुळजा भवानीचा उदोकार त्यांच्या मुखी घुमत होता आणि सामुदायिक नृत्यासाठी त्यांचे पाय वाऱ्यागत हलत होते. त्या धांदलीत त्यांच्या गळ्यातील देवीचे टाक डौलानं उडत होते. देवीच्या दरबारातील या मानकऱ्यांचा हा बडेजाव अपूर्वाईचा होता. त्या दर्शनानं जीव मंत्रमुग्ध होऊन गेला. मनात आलं की, या तुळजामातेला श्रीमंतांच्या देणग्यांपेक्षा आणि त्यांचे-कडून होणाऱ्या महानैवेद्यांपेक्षा या गरिबांचंच कवतिक अधिक आहे. म्हणून तर साध्याभोळ्या जनसामान्यांच्याकडून आंबाडीच्या भाजीचा आणि जोंधळ्याच्या भाकरीचा बालेघाटी वळणाचा पहिला नैवेद्य आल्याखेरीज या महादेवीच्या राऊळात पाची पक्वान्नांच्या ताटांचा प्रवेश होऊच शकत नाही! आई जगदंबेची सांस्कृतिक श्रीमंती केवढी विलासाची म्हणावी ही!

जगदंबेच्या दर्शनानं भारावून गेलेल्या मनाला सावरीत प्रदक्षिणेचा मार्ग चोखाळताना न कळत आमच्याही मुखातून 'आई राजाऽउदोऽउदोऽऽ' ही भाषा जयजयकारली.

त्यावेळी कृतयुगातील अनुभूतीसाठी बनलेल्या महिषासुरमर्दिनीचं, त्रेतायुगा-तील प्रभु रामचंद्रास आशीर्वाद दिलेल्या रामवरदायिनीचं, द्वापारयुगातील धर्मराजाला कृपाप्रसाद दिलेल्या दुर्गाभवानीचं आणि कलियुगातील राजा छत्रपती शिवरायांला भवानी तलवार देऊन त्यांचं स्फूर्तिस्थान बनलेल्या जगदंबा भवानीचं दर्शन आपण एकाच वेळी घेत असल्याचा भास मनाला झाला. . .त्यामुळं

 धीरगंभीर वृत्तीनं या वीरमातेला दंडवत घालीत आम्ही प्रदक्षिणेचा मार्ग पुरा

केला आणि जागोजाग वेगवेगळ्या रूपानं प्रकट झालेल्या भारताच्या या भाग्यदेवीपुढं नतमस्तक होत क्षणभर उभे राहिलो. . .मनात आलं, ज्या देवीला राजेरजवाड्यांनी आणि श्रीमंतांनी महान अलंकार अर्पण केलेत त्या देवीला आपण काय द्यावं? छत्रपती शिवाजीमहाराजांनी देवीला अर्पण केलेल्या पुतळ्यांच्या माळेतील प्रत्येक पुतळीवर 'राजे सीव छत्रपती' ही अक्षरं कोरली आहेत. आपल्याजवळ ती ताकद आहे तरी का? या विचारानं भुलायला झालं. म्हणून हिऱ्यामाणकांनी, मोत्यापोवळ्यांनी, पाचूंनी अगर मौल्यवान रत्नजडित दागिन्यांनी देवीला शोभा आणायची कुवत अंगी धारण करण्यापेक्षा आमच्या मनातील श्रद्धेला आम्ही वेगळा आविष्कार धारण करायला सुचवलं. त्यासरशी तुळजा भवानीला आम्ही अर्पण केले ते आमचे सद्भाव. म्हणताना उगीचच आमचे ओठ हलले—

**तुळजापूरला जाईन हळदकुंकू घेईन**
**मातापूरला जाईन हळदकुंकू घेईन**
**देवीला वाहीन . . .**

आम्ही मग देवीला सादर केल्या त्या पानाफुलांच्या परड्या. मंदिराच्या पायदंड्यांवर कुणी कुणी परमुलखातून आल्यानंतर आपली नावं खोदून ठेवलीत तसल्या भानगडीत न पडताना आम्ही आमच्या मनालाच तिथं साक्षीला रहा म्हटलं आणि देवळातून बाहेर पडलो.

पण घाटशिळेजवळ आल्यासरशी आठवण आली. हैदराबाद राज्यातील स्वातंत्र्यलढ्याचे वेळी घाटशिळेच्या आश्रयानं उभ्या असलेल्या निजामाच्या सैन्याचा तेथून दोनच मैलांवरील खंडोबाच्या देवळाजवळील भारतीय सेनेवर हल्ला करावयाचा आखलेला डाव लक्षात आला. त्यासरशी सारं अंग रोमांचून गेलं. इथं कुणी तोफ डागली असती मग? या मंदिराचा केव्हाच चक्काचूर झाला असता! . . .पण आई जगदंबेच्या उदोकारानं विजयाचा उन्माद लेत आमच्या सेनेनं तेही धाडस केलं! . . .शिखराला धोका पोचला खरा पण निजामी फौजांनी काढता पाय घेतला. भारतीय रणगाड्यांनी या मुलखाचा ताबा घेऊन तुळजा भवानीला शाबूत ठेवली. भवानी आईच्या क्षात्रतेजानं आम्ही साजिवंत झालो. स्वातंत्र्यसंग्रामातील विजयश्रीनं आमच्या गळ्यात माळ घातली.

या आठवणींनी जिवाला हुशारी आली. स्वाभिमानाचे आणि स्वतंत्रतेचे धडे गिरवायला स्फूर्ती देणाऱ्या या महान भगवतीपुढं आम्ही पुन्हा एकदा नम्र भावानं वाकलो. महाराष्ट्राच्या या शक्तिपीठावर लोकधर्माची जोपासना करायचा बेत केला आणि कुळधर्म साजरे करायच्या नादाला लागलो. . .त्यावेळी या भगवतीला असं काय तेज प्राप्त झालं होतं की, त्या दर्शनापुढं जगातलं सारं सौंदर्य फिक्कं फिक्कं होत जावं! . . .



## अनुक्रम



# देवी भवानी आई

लेखक : **श्री. कृ. भा. बाबर**

भवानी आई हे महाराष्ट्राचे कुलदैवत आहे. ती महाराष्ट्राची कुलस्वामिनी आहे.

महाराष्ट्र राज्याचे संस्थापक छत्रपती शिवाजीमहाराज या भवानी आईच्या आशीर्वादानेच सर्व महत्त्वाची कार्ये करीत होते. शिवाजीमहाराजांनी तुळजापूरच्या भवानीमातेचे दर्शन तर अनेक वेळा घेतले होतेच, पण तिचे दर्शन सुलभ व्हावे म्हणून त्यांनी तिची स्थापना प्रतापगडावरही केलेली होती.

तुळजापूर आणि प्रतापगड ह्यांखेरीज महाराष्ट्रात पुष्कळ ठिकाणी भवानी आईची मंदिरे आहेत.

भव म्हणजे शंकर आणि भवानी म्हणजे पार्वती. शंकराचे नाव शंभू असेही आहे. भू म्हणजे होणे आणि शम् म्हणजे कल्याण. लोकांच्या कल्याणासाठी झालेला म्हणजे अवतरलेला तो शंभू.

अमरकोशात शंकराची ४८ नावे दिलेली आहेत. त्यामध्ये भव आणि शंभू हीही नावे आहेत.

अमरकोशात भवानीचीही २१ नावे दिलेली आहेत. ही नावे अशी :

'उमा, कात्यायनी, गौरी, काली, हैमावतीधरी, शिवा, भवानी, रुद्राणी, शर्वाणी, सर्व मङ्गला, अपर्णा, पार्वती, दुर्गा, मृडानी, चंडिका, अंबिका, आर्या, दाक्षायणी, चैव, गिरिजा, मेनकात्मजा.'

शिव म्हणजे कल्याण. शिव हे महादेवाचे म्हणजे शंकराचेच नाव आहे. शिवा हे भवानी आईचे नाव वर आलेले आहे. येथे मृड म्हणजे शंकर.

भवानी आईची वरील नावे पाहिली म्हणजे लक्षात येईल की, ही देवी केवळ महाराष्ट्राचीच नव्हे तर अखिल भारताचीही आराध्यदेवता आहे.

महादेव हे सगळ्या भारताचे मुख्य दैवत आहे. असे एकही गाव आपल्या देशात सापडावयाचे नाही की, जेथे महादेवाचे देऊळ नाही. लिंगपूजा ही



तुळजा भवानी
(नवरात्र)

महादेवाचीच पूजा. ही लिंगपूजा फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. आर्य लोक भारतात येण्याच्या पूर्वीपासून ती चालू आहे.

आणि तेव्हापासून शंकराची व पार्वतीचीही पूजा देशात सर्वत्र सुरू झालेली आहे.

सारे जगच प्रकृती आणि पुरुष यांच्या संयोगाने झालेले आहे, असे बऱ्याच विद्वान लोकांचे म्हणणे आहे. क्षर आणि अक्षर असा भगवद्गीतेत आलेला उल्लेख किंवा माया आणि ब्रह्म म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो, ती प्रकृती आणि पुरुषच पार्वती आणि शंकर होय.

भेदक लावण्या गाणारे लोक कलगी आणि तुरा म्हणून ज्या प्रकारांनी ही गाणी गातात, त्या कलगी तुऱ्यांनाच माया ब्रह्म म्हणतात. हे दिसणारे सारे जग

आपोआप झालेले आहे, म्हणून त्याला प्रकृती किंवा स्वभाव, मूळ रूप मानतात. पण ह्या जगाला कारणभूत झालेले असे जे चैतन्य मानले जाते, तेच ब्रह्म.

आपल्या स्वत:पुरते, माणसापुरते, बोलायचे झाल्यास आपला देह ही प्रकृती आणि त्यातील जीव किंवा आत्मा हे ब्रह्म असे म्हणता येईल. काही उपनिषदांनीही असेच म्हटलेले आहे.

ह्या प्रकृतीची देवता म्हणजे भवानी आई.

देवाची रूपे दोन प्रकारची मानली जातात, काही पुरुषरूपे आहेत, तर काही स्त्रीरूपे आहेत. भव किंवा शंकर हे पुरुषरूप आहे आणि भवानी किंवा पार्वती हे स्त्रीरूप आहे.

स्त्री आणि पुरुष या रूपांनी सारे जग नटलेले आहे. त्यांपैकी स्त्रीरूप हे माणसाला अधिक जवळचे वाटते. कारण ते आईचे रूप आहे. आई जन्म देते आणि लहानाचे मोठे करते. म्हणून देवाच्या स्त्रीरूपालाही आई म्हणूनच संबोधले जाते. इतकेच नाही तर देवाच्या पुरुषरूपांनाही आदराने आईरूपात संबोधण्याचा प्रघात पडला आहे. विठोबाला विठाईमाउली म्हणतात किंवा ज्ञानेश्वरांना ज्ञानेश्वर माउली म्हणतात, ते ह्याच कारणाने.

आपल्या महाराष्ट्रात देवीची देवळे गावोगाव आहेत. ती सारी भवानी आईचीच रूपे आहेत. मात्र ती सर्वत्र एकाच नावाने ओळखली जात नाहीत. ग्रामपरत्वे त्यांची नावे निरनिराळी आहेत. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' हे वेदान्तातील वचन ब्रह्माला, सत्याला किंवा एकाच परमेश्वराला उद्देशून ऋषींनी म्हटलेले आहे, तेच देवी भवानी आईच्या नामरूपालाही लागू आहे.

सत् एकच आहे पण ते अनेक नावांनी ओळखले जाते. तुळजापूर किंवा प्रतापगडला जी भवानी आहे, तीच पुण्यात आहे व साताऱ्यातही आहे. कोल्हापूरला असलेली प्रसिद्ध अंबाबाई किंवा औंधला (जिल्हा सातारा) असलेली यमाई तरी दुसरी कोण आहे?

खेड्यापाड्यांत जी ग्रामदैवते आढळतात, त्यामध्येही स्त्रीरूप देवताच फार आढळतात आणि त्यांच्या भक्तांमध्ये स्त्रियांचाच भरणा फार आढळतो. दर मंगळवारी किंवा शुक्रवारी उपास करून बऱ्याच स्त्रिया पाच घरी तरी जोगवा मागतात. जोगेश्वरी किंवा योगेश्वरी हेही देवीचेच नाव असते. जोग म्हणजेच योग आणि योग हा शब्द युज्–जोडणे ह्या शब्दावरून बनलेला आहे. देवाचा व आपला संबंध जोडण्याचा जो विधी किंवा प्रकार त्याचे नाव योग.

खेड्यापाड्यांतून रहाणाऱ्या लोकांत बहुधा शेतकरी असतात. ते आपले शेत चांगले पिकावे आणि त्याचे रक्षण चांगले व्हावे म्हणून धरणीमातेची आणि जलदेवतांचीही पूजा करतात. नदीत किंवा विहिरीत आसरांना (अप्सरांना) परडी

सोडली जाते. आसरा ह्या जलदेवता आहेत. अप्सरा या शब्दावरून आसरा शब्द बनला आहे. अप्सु म्हणजे पाण्यात सरति, म्हणजे संचार करतात. त्या अप्सरा.

ग्रामीण किंवा खेडूत लोकांचा संचार शेताभातांत, दऱ्याखोऱ्यांत, रानावनांतच नेहमी असल्याने त्यांच्या देवताही अशाच ठिकाणी कोठे वाटेल तेथे असतात. जाखाई, जोखाई, डोंगराई, रानजाई, वाघजाई, सोमजाई, खामजाई, काली, मातृका, येलू आई (यल्लमा), मरीआई (मरीअम्मा), पेडम्मा, पोलेरम्मा इत्यादी त्यांची नावे असतात.

रानावनात असलेल्या ह्या देवतांची रूपेही अगदी साधी असतात. साधारणपणे वाटोळासा दगड बघून त्याला शेंदूर फासून आणि चांदीचे किंवा तसलेच कसले तरी दोन डोळे बसवून ह्या देवता पूजिल्या जातात.

शक्तिपूजा ही अशी सर्वत्र प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. ही सारी भवानी आईचीच रूपे आहेत.

महाराष्ट्रात भवानी आईची पूजा मुख्यत: तुळजापूरच्या अंबाबाईचीच केली जात असल्याने आता तेथील देवतेची माहिती थोडक्यात पुढे देण्यात येत आहे.

तुळजापूर हे क्षेत्र मराठवाड्यातील उस्मानाबाद जिल्ह्यात आहे. ते उस्मानाबादपासून १४ मैलांवर व सोलापूरपासून २८ मैलांवर आहे. तुळजापूर हे गाव सुमारे ८,००० लोकवस्तीचे आहे.

हे गाव सोलापूरच्या उत्तरेस डोंगर पठारावर वसलेले आहे. येथील डोंगराला बालाघाटचा डोंगर म्हणतात. तुळजापूरच्या तिन्ही बाजूंना डोंगराचा भाग असून एका बाजूला झाडी आहे. हे ठिकाण रम्य आहे.

तुळजापूर हे पवित्र ठिकाण महाराष्ट्रात असले तरी आजूबाजूच्या राज्यांतून म्हणजे गुजराथ, आंध्र, म्हैसूर वगैरे राज्यांतून हजारो भक्त देवीच्या दर्शनास नित्य येत असतात.

देवीचे देऊळ गावाच्या पश्चिमेला आहे. ते चांगले भव्य व विस्तीर्ण आहे. देवळाला जाताना वाटेत महाद्वार लागते. महाद्वारावर चौघडा वाजत असतो.

ह्या महाद्वारापासून मुख्य मंदिराकडे जाताना पुष्कळ पायऱ्या उतरून जावे लागते. वाटेत डाव्या बाजूला कल्लोळ आणि उजव्या बाजूला गायमुख अशी दोन तीर्थे लागतात. त्यांच्याभोवती सिद्धिविनायक, विठ्ठलरुक्मिणी, दत्तात्रेय अशी लहानलहान देवळे आहेत. ही पाहून पुढे गेल्यावर दुसरे द्वार लागते.

ह्या द्वारातून आत गेल्यावर आणखी काही पायऱ्या लागतात, मग होमकुंड लागते व भव्य गोपूरही दिसते.

यानंतर मुख्य मंदिराचे द्वार लागते. ते दक्षिणेकडे तोंड करून आहे. ते सगळे पितळेच्या पत्र्याने मढविलेले आहे.

मुख्य मंदिरात शिरल्याबरोबर सभामंडप लागतो. ह्या सभामंडपात लग्न व मुंजीचे सोहळे आणि मुलाचे जावळ काढण्यासारखे विधी उरकले जातात.

सभामंडपात पश्चिमेकडे सिंहासनावर श्रीतुळजा भवानी उभी असलेली दिसते. पूर्वेकडे श्रीभवानीशंकराची मूर्ती आहे. उत्तरेच्या बाजूला तुळजा भवानी आईचे शयनमंदिर आहे.



श्रीगणपती आणि गोमुख

देवीची मूर्ती गंडकी शिळेची असून अतिशय सुंदर, रेखीव व प्रमाणबद्ध अशी आहे. ती अष्टभुजा आहे आणि महिषासुरमर्दिनी अशी तयार केलेली आहे. मूर्तीच्या उजव्या व डाव्या खांद्याजवळ अनुक्रमे चंद्र व सूर्य यांच्या आकृत्या आहेत. आठ हातांपैकी सहा हातांत निरनिराळी शस्त्रे असून राहिलेल्या दोन हातांपैकी एकाने महिषासुराची शेंडी धरलेली आहे व दुसऱ्या हाताने त्याच्या बरगडीत भाला खुपसलेला दाखविला आहे. पायाखाली रेड्याच्या रूपात महिषासुर दाखविलेला आहे. महिष म्हणजे रेडा व असुर म्हणजे राक्षस. माणसातील दुष्ट प्रवृत्ती रेड्याच्या स्वरूपात जनतेला त्रास देणाऱ्या राक्षसाला म्हणजेच माणसातील अनीतीला ठार मारण्यासाठीच देवी भवानीचा अवतार झालेला आहे.

देवीची रोजची पूजा चार वेळा होते. पहाटेस पुजारी येऊन देवीचे श्रीमुख व हातपाय एका ओल्या वस्त्राने पुसतो. त्यावेळी दर्शनासाठी आलेल्या भक्तांच्या हातावर हे वस्त्र पिळण्यात येते आणि 'चरणतीर्थ' म्हणून भक्तमंडळी ते आवडीने पितात.

त्यानंतर लगेच देवीची न्याहारी होते. ही न्याहारी भाजी-भाकरीची असते. आंबाडयाची भाजी आणि ज्वारीची भाकरी न्याहारीला लागते. 'जसा भक्त तसा देव' भवानी आई ही सर्वसामान्य लोकांची देवी असल्याने सामान्य लोकांना जे खायला मिळते, तेच ते देवीलाही देतात.

दुपारी महापूजा होते. पंचामृताच्या वेळी दह्यादुधाची भांडी देवीच्या मस्तकावर ओततात. नंतर चांगल्या पाण्याने तिला न्हाऊ घालतात. मग देवीच्या कपाळावर चंदनाचा मळवट भरतात. मस्तकावर हळद-कुंकू वाहातात. छतीवर बुक्का उधळतात. नंतर आरती व महानैवेद्य होतो.

सायंकाळी धुपारती व रात्री प्रक्षाळण होते. म्हणजे मूर्ती पुसून ठेवण्यात येते. देवीचे पुजारी मराठे आहेत.

तुळजामाता व भवानीशंकर यांचे दर्शन घेऊन आपण मंदिराच्या बाहेर आलो म्हणजे प्रदक्षिणेचा मार्ग लागतो. हा मार्ग चांगला ऐसपैस असून त्याच्या भोवती चांगल्या ओवऱ्या बांधलेल्या आहेत.

मूळ मंदिर जुने हेमाडपंती आहे. पण त्यामध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. देवीला शहाजीराजे आणि शिवाजीमहाराज यांच्यापासून अनेक राजेरजवाडयांनी व श्रीमंत लोकांनी अलंकार अर्पण केलेले आहेत.

भवानी देवीमागील बाजू



शिवाजीमहाराजांनी एक पुतळ्यांची माळ दिलेली आहे. ह्या माळेतील प्रत्येक पुतळीवर 'राजे सीव छत्रपती' ही अक्षरे कोरलेली आहेत.

येथे दर मंगळवारी छबिना निघतो. देवीच्या डाव्या हाताच्या ओवरीत त्यासाठी सिंह, नंदी, गरुड, हंस, मोर इत्यादी लाकडी रंगीत वाहने तयार ठेवलेली आहेत. यांपैकी एखाद्यावर देवीची अंबारी ठेवून प्रदक्षिणा सुरू होते. त्यावेळी संबळ वगैरे वाद्ये वाजू लागतात. भुते पोत घेऊन नाचतात. मग आराध्याच्या अंगात देवीचा संचार होतो व अनेक भक्त आपापले प्रश्न विचारीत असतात.

येथील सर्वांत मोठा उत्सव नवरात्रात असतो. प्रतिपदेच्या दिवशी गावचा कुंभार तीन घागरी आणून गोमुखतीर्थाजवळ ठेवतो. अधिकारी, सेवेकरी, मग वाजत गाजत ते घट खाली आणतात. पहिला घट सभामंडपात ईशान्येला स्थापन करतात. दुसरा घट देवीसमोर शिव मंदिर आहे त्याच्या मागच्या त्रिशूलाच्या ओवरीत बसवितात व तिसरा त्याच आवारातल्या मातंगीच्या मंदिरात स्थापन करतात. नंतर देवीच्या समोर बांधून ठेवलेल्या होमकुंडात नवचंडीचे हवन सुरू होते. येथे खड्गनवमीस पूर्णाहुती होते तेव्हा बकऱ्याचे शिर धडावेगळे करून 'आग्नेय स्वाहा' करण्याची प्रथा आहे.



होमकुंड

दसऱ्याच्या रात्री देवी शिलंगणाला निघते. पालखी निघाली की जन-समुदायाच्या मुखातून 'उदो उदो'चा मोठा घोष उठत असतो. नगारा, तास, संबळ झडू लागतात. दिवे, दिवट्या, पोत यांनी जणू सगळा डोंगरच पाजळला जातो. बायका, पुरुष सगळे देहभान हरपून यात्रेत सामील होतात. कुंकवाची उधळण पालखीवर व इतरत्र होत असते. उत्तररात्रीपर्यंत ही मिरवणूक चालू राहून देवी परत मंदिरात येते.

तुळजापूरच्या देवीचे मुख्य पुजारी आणि भोपे तेथील कदम पाटील आहेत. त्यांचे घराणे उत्तर हिंदुस्थानातले. ह्या घराण्यातील भुतोजी नावाचा पुरुष हुमायून बादशहाच्या काळात येथे आला. त्याने आपल्या भक्तीने व कर्तबगारीने तुळजापूरची ख्याती वाढविली. ह्या मूळपुरुषाच्या नावावरूनच अंबाबाईचा पोत पाजळणाऱ्या लोकांना भुते म्हणण्याचा प्रघात पडलेला दिसतो.

भवानी आईच्या भक्तीचा प्रसार गोंधळी लोकांनी आजवर फार केलेला आहे. हे गोंधळी लोक देवीचा गोंधळ घालून समाजामध्ये भक्तीचा व ज्ञानाचा प्रसार करीत आले आहेत. गोंधळाच्या वेळी लोकांची करमणूक करून नाना प्रकारच्या लोककथा हे गोंधळी सांगत असतात.

पुष्कळ लोक विवाहविधी आटोपल्यावर एक दिवस गोंधळ घालून आणि अंबा भवानीची यथासांग पूजा करून विवाहविधीची सांगता करीत असतात.

देवीचा गोंधळ घालण्याचा प्रघात बराच जुना असला पाहिजे असे वाटते. एकनाथमहाराजांनी आपल्या भारुडात गोंधळ घातलेला आहेच. त्यांची कुल-देवता भवानी आईच होती. एकनाथांनी गोंधळ मांडला आहे. त्यामध्ये त्यांनी त्रैलोक्याचा मंडप उभारला आहे, वर चारी वेदांचा फुलवरा बांधला आहे. शास्त्रपुराणांना साथीला बोलावले आहे. पुंडलिकाच्या हातात दिवटी बुधली दिलेली आहे व—

**गोंधळा ये वो जगदंबे**
**विठाबाई तू मूळसांभे**

म्हणून हाकारले आहे.

गोंधळी लोक गोंधळ घालायला उभे रहातात, तेव्हा प्रथम जगदंबेचा धावा करतात आणि नंतर त्यांना माहीत असलेल्या सगळ्या देवतांना त्यांच्या त्यांच्या ठिकाणांचा उल्लेख करून गोंधळाला येण्याबद्दल आवाहन करतात. भक्ताला यश देण्याबद्दल ते इतर सगळ्या देवदेवतांनाही विनवणी करीत असतात.

गोंधळी लोक ह्यावेळी संबळ वाजवीत असतात. संबळ ह्याला कोणी कोणी संबूळही म्हणतात. हा मूळ शब्द सम्मेळ (सर्व प्रकारचा मेळ साधणारे) ह्या शब्दावरून आला असावा.

संबळ हे एक गमतीचे वाद्य आहे. ते चांगले वाजायला लागले की एक प्रकारची वीरश्री निर्माण होते. भवानी आई हे क्षत्रिय दैवत आहे. महाराष्ट्राचे क्षात्रतेज जागते ठेवायला ती साह्य करते. संबळ वाजवून गोंधळी हे काम करीत असतात.

गोंधळ हा शब्द संस्कृत गुंदल (एक प्रकारच्या वाद्याचा आवाज) या शब्दावरून आला असावा असे दिसते.

गोंधळाच्या वेळी कवड्या खेळवलेला पोषाख आणि कवड्यांची माळ घालून देवीचा पोतही पाजळला जातो. हा पोत म्हणजे एक प्रकारची ज्ञानज्योत आहे. त्याच्या प्रकाशात लोकांना नाना प्रकारचे ज्ञान देण्यात येते.

अशी आहे ही भवानी आई.





# तुळजा भवानी

लेखक : **श्री. एस. डी. कदम**

**मराठवाड्याची हद्द**

तुळजापूर हे गाव मराठवाड्याचे पश्चिम टोकास डोंगराच्या कड्यावर वसले आहे. सोलापूरमार्गे आपण तुळजापूरला यावयास निघालो की, गावाचे पश्चिम टोकास शिवछत्रपतींचा भव्य अश्वारूढ पुतळा, देवीचे दर्शनाकरिता झेपावत आहे असे दृश्य पाहावयास मिळते. घाट चढून वर आले की, तुळजापूरचे दर्शन प्रवाशांना घडते ते देवीच्या पादुका नावाने ओळखले जाणारे ठिकाण 'घाटशीळ' व छत्रपतींच्या पुतळ्याच्या दर्शनाने होते. सध्या या ठिकाणास 'गेट वे ऑफ मराठवाडा' असे म्हणतात. येथूनच मराठवाड्याची हद्द सुरू होते.

**मन धुंद करणारा परिसर**

तुळजापूर हे गाव आकाराने लहान आहे. परंतु डोंगराचे एका कड्यावरती ते वसले असल्यामुळे येथील हवा पाणी आल्हादकारक आहे. त्यामुळे कोणाही प्रवाशास तुळजापूर गावात आल्यावर प्रवासाचा शीण जाणवत नाही. सर्वत्र

भवानी मंदिराचे दुरून होणारे दर्शन



चैतन्यमय वातावरण व देवी जगदंबेचा उद्घोष ऐकावयास मिळतो. भाविकांना देवीचे दर्शन घेतल्यावर कृतकृत्य झाल्यासारखे वाटते. डोंगराचे एका दरीत तुळजा भवानी मातेचे भव्य मंदिर आहे. सर्वत्र घातलेली दगडी फरशी व स्वच्छता पाहून मन प्रसन्न होते. मंदिराचे पश्चिमेस महंतांचे मठ आहेत. मठासभोवती

भवानी मंदिर, तुळजापूर



सुंदर शेती आहे. ती शेती महंतच स्वतः कसतात व त्या मिळकतीवर आपली उपजीविका चालवितात. मंदिरासमोर मोठे कल्लोळ तीर्थ (हौद) आहे. त्या तीर्थात भाविक मंडळी स्नान करतात. समोरच गायमुख (गोमुख) तीर्थ असून गायीच्या दगडी तोंडातून पाण्याची अखंड धार वहात असते. याच पाण्याने दररोज देवीला स्नान घातले जाते. शिवाय भाविक यात्रेकरूंसाठी हे गोमुख तीर्थस्नानाकरिता म्हणून मोफत खुले असते.

**नवरात्र महोत्सव**

तुळजापूरचा उत्सव हा फार मोठा ऐतिहासिक मानला जातो. देवी 3 चांदीच्या पलंगावर झोपी जाते. ती आश्विन शु. प्रतिपदेस उठते व त्य घटस्थापना केली जाते. नवरात्र उत्सवास सुरुवात होते. घटस्थापने गावातील दुकाने व घरे धुऊन, सारवून, रंग देऊन स्वच्छ केली जा पारंपरिक प्रथा येथे आहे. या कामी कोणी हयगय करीत नाही. कार केली नाही तर देवी जगदंबेचा आपणावर कोप होईल अशी भाव आहे. आश्विन मासाचे तुळजापूरमध्ये एक आगळे व वेगळे महत्त्व म यावेळी हवा स्वच्छ व आल्हादकारक असतेच परंतु सर्वत्र दिसण खोऱ्यांतील हिरवीगार शेतीही मनाला धुंद करते.

**दसऱ्याचे सीमोल्लंघन**

नऊ दिवस देवीची वहाने (छबिना) निघतात. रोज रात्री ९ चे सुमा दिवशी वेगवेगळ्या वाहनावर छबिना निघतो. तो पहाण्याकरिता झुंडीच्या झुंडी लोटतात. त्याचप्रमाणे नऊ दिवस देवीला निरनिरा अलंकार घालून सुशोभित केले जाते. हे देखावे ऐतिहासिक परंपरे जातात. उत्सव पहाण्याकरिता महाराष्ट्रातूनच काय परंतु सर्व भाविकांच्या झुंडीच्या झुंडी लोटतात. दसऱ्याचे दिवशी देवी सी निघते तो सोहाळा पहाण्याकरिता लोक जिथे जागा मिळेल तिथे उ सर्व मंदिर लोकांनी फुलून गेलेले असते. मूर्ती पालखीत बसवून सी निघते व सीमोल्लंघन झाल्यावर परत देवी झोपी जाते. त्याकरिता प्रतिवर्षी तेली पलंग बनवून आणतो. त्यावर देवी झोपी जाते. परंपरे तयार करून आणण्याचा मान नगर येथील तेल्यास आहे.

**आणखीन काही वैशिष्टचे**

तुळजापूर येथे कुंभाराचे चाक फिरत नाही. तेल्याचा घाणा चालत पलंगावर झोपत नाहीत. लग्नकार्यात नवरानवरीची वरात गाडीम जात नाही. नवरात्रानंतर भेंडोळी हा एक तुळजापूर येथील अभूतपू कार्यक्रम असतो. एका मोठ्या लाकडास तेलातुपाने भिजवलेले काप गुंडाळतात व त्यास अग्नी लावून आणि ते लाकूड अग्निज्वालां घेऊन मिरवणुकीने गावात हिंडवण्यात येते. त्यास भेंडोळी अ भेंडोळीच्या दर्शनाने भूत पिशाचांची बाधा होत नाही 3 समज आहे.

**रामवरदायिनी**

तुळजापूरचे उत्तरेस रामवरदायिनी देवीचे मंदिर आहे. ते पुराणकालीन असून त्या ठिकाणी राम वनवासात असताना आले होते व त्यांनी देवीचे दर्शन घेतल्यावर देवीने रामाला वर दिला म्हणून तिला रामवरदायिनी असे म्हणतात. त्या



भवानी मंदिराचा परिसर

ठिकाणी सध्या मोठा मठ असून देवीचे छोटे मंदिरही आहे. तो परिसर पाहिला म्हणजे ऐतिहासिक वास्तूंचे दर्शन घडते.

**धाकटे तुळजापूर**

तुळजापूरच्या पूर्वेस धाकटे तुळजापूर नावाचे छोटे गाव आहे. त्या ठिकाणी तुळजा भवानीमातेप्रमाणे हुबेहूब दिसणारी अशी एक देवीची मूर्ती आहे. ती मूर्ती एका शेतकऱ्यास शेत नांगरत असता मिळाली अशी आख्यायिका आहे. हल्ली ती मूर्ती धाकटे तुळजापूर येथे आहे. तेथे आता भक्तांनी मंदिरही बांधले असून त्याही ठिकाणी भक्तांची दर्शनाकरिता रीघ लागलेली असते.

४९७



# कुळस्वामिनी

लेखिका : डॉ. सरोजिनी बाबर

महाराष्ट्राच्या पराक्रमाची जोपासना करणारी तुळजा भवानी ही एक प्रभावी शक्तिदेवता आहे. जगातील अनेक प्रकारच्या प्राचीन संस्कृतींनी शक्तीची उपासना केलेली असून या भारत देशामध्ये वेदपूर्वकाळी नांदणाऱ्या सिंधु संस्कृतीत शक्तिदेवतेचे प्रथम दर्शन घडून आले. वेदकालीन जीवनात ती आदितीच्या रूपाने नांदत होती. तिचे दर्शन भव्य व तेजस्वी होते. वेदकालीन ऋषिमुनींनी तिच्या चरणी प्रार्थना करून समृद्धी, सौभाग्य आणि स्वास्थ्य यांची मागणी केली होती. त्यांनी तिला तिन्ही काळांची स्वामिनी मानली होती आणि इच्छापूर्ती करणारी वरदायिनी म्हणूनही तिची महापूजा बांधली होती.

शक्ती ही शिवाची अर्धांगी असून या जगाची सूत्रचालिका मानली गेली आहे. शिव आणि शक्ती ही विश्वाची मातापितरे आहेत. त्यांच्या सहजीवनातूनच विश्वातील मांगल्य निर्माण झाले आणि मंगलमूर्ती हा शिवशक्तीचाच पुत्र आहे ही पुराण कल्पना सर्वसामान्य लोकांनी स्वीकारलेली आहे. शक्तीची अधिष्ठात्री देवता ठरलेली ही तुळजा भवानी राजा शिवछत्रपतींची स्फूर्तिदेवता असून हजारो घराण्यांची कुलदेवता म्हणूनही तिचा लौकिक मोठा आहे.

या कुलस्वामिनीचे मंदिर हे पूर्वाभिमुख असून त्याचे सभामंडप, गूढमंडप व गाभारा असे तीन भाग आहेत. मंदिराभोवती विस्तृत प्रांगण, प्रशस्त ओवऱ्या आणि मजबूत असा तट आहे. मंदिरावर हत्ती, घोडे, मोर, माकडे, यक्ष, किन्नर, गंधर्व, देवदेवता इत्यादी अनेक मूर्ती कोरलेल्या दिसून येतात. मंदिराचे सुवर्ण शिखर, शिखरावरील कोरीव वेलबुट्टी आणि नक्षीकाम प्रेक्षणीय आहे.

मंदिराच्या सभामंडपाची रचना सोळखांबी तत्त्वावर असून या मंडपाच्या उत्तर आणि दक्षिण बाजूस तोरणे आहेत. या मंडपाला लागूनच पश्चिमेकडे



सभामंडपातील खांब

गूढमंडप (बिनखांबी मंडप) असून त्या जागेच्या पश्चिम बाजूस गाभारा आहे. गाभाऱ्याच्या पश्चिम दिशेस मध्यावर एक उंच सिंहासन असून त्यावर तुळजा भवानीची तीन फूट उंचीची काळ्या पाषाणाची अशी प्रभावळीसह दिसणारी सुटी मूर्ती आहे. दिवसा उजेडी या देवीचे दर्शन होते ते असे--

डोईवरील अंगच्या मुकुटावर सयोनिलिंग असून मुकुटाखाली केसांच्या बटा आढळून येतात. ही अष्टभुजा देवी असून तिच्या हातात दक्षिणेकडून क्रमाने त्रिशूल, बिचवा, बाण, चक्र, शंख, धनुष्य, पानपात्र व राक्षसाची शेंडी या वस्तू आहेत. पाठीवर भाता टांगता आहे. हिच्या चेहऱ्याच्या उजव्या व डाव्या अंगास अनुक्रमे चंद्र व सूर्य आहेत. उजवा पाय महिषासुरावर टेकलेला आहे. पलीकडे सिंह व त्याचे खाली मार्कंडेय ऋषी आहे. डावा पाय जमिनीवर आहे. दोन्ही पायांच्यामध्ये उलटा तपस्वी आहे. हिच्या अंगावर केयूर, चक्रकुंडले, अंगद, बांगड्या, कंठा, माळा, मेखला, साखळ्या व पदबंध असे दागिने आहेत.

देवीच्या मंदिरातील सभामंडपाला लागूनच भवानीशंकराचे (सिद्धेश्वराचे) देऊळ आहे. या देवळाभोवती ओवऱ्या असून पश्चिमेकडे येण्याजाण्यासाठी दरवाजा आहे. यमाई, नृसिंह, शकुनवंती व लक्ष्मीनारायण या देवता निरनिराळ्या ओवऱ्यांमधून आहेत.

गूढमंडपास लागून उत्तरेकडे शेजघर आहे आणि पलीकडे खंडोबा आहे. भवानीशंकराच्या देवळामागे होमकुंड व त्रिशूल असून समोर दीपमाळा आहेत.

दोन पार आहेत. आग्नेय बाजूस घंटा असून पूर्वेकडील दरवाजाजवळ उजव्या सोंडेचा गणपती आहे. या स्थानाचे आसपासच अमृतकुंड व अमृतेश्वर आहे. शेजारीच नर्मदेश्वर आणि दत्तात्रेयही आहे. सिद्धिविनायक व गणेशकुंडही जवळपासच आहेत.



भवानीशंकर

देवीची रोज चार वेळा पूजा होते. शिवाय चैत्र शुद्ध १, श्रावण शुद्ध ६ (शिराळ षष्ठी), भाद्रपद शुद्ध ८, आश्विन शुद्ध ५ (ललिता पंचमी), कार्तिक शुद्ध १, मकरसंक्रांत आणि रथसप्तमी या सर्व तिथींना देवीची अलंकारपूजा होते. सालंकार पूजा पहाण्यासाठी पैसे देऊन प्रवेश मिळवावा लागतो.

महापूजेसाठी दह्यादुधाची भांडी देवीच्या मस्तकावर ओतण्यात येतात. नंतर शुद्धोदकाचे स्नान घालतात. मस्तकी हळदकुंकू वाहून भाळी चंदनाचा मळवट भरण्यात येतो. महापूजेचे साहित्य घेऊन जेव्हा पुजारी देवळात येतो तेव्हा जामदार देवळाच्या पश्चिमेकडील दाराशी उभा राहून मोठ्याने ललकारी घालतो, 'पुजारी आले ऽऽ हो ऽऽ लवकर या ऽऽ' हे आवाहन खुद्द जगदंबेला असते. देवळाशेजारच्या खालच्या डोंगरधळीत हा साद घुमत रहातो. या संदर्भात एक कहाणी अशी सांगतात की, देवी या डोंगरधळीत फासे खेळण्यासाठी जात असे. पण खेळाचे नादात तिला भान न राहिल्याने तिच्या भोजनासाठी म्हणून असा पुकारा घालण्याबद्दल तिनेच पुजाऱ्याला दृष्टांत देऊन सांगितले व तेव्हा-पासून ही चाल पडली !

देवीच्या रोजच्या पूजेखेरीज दर मंगळवारी, प्रत्येक महिन्याच्या शुद्ध १४, १५ व वद्य १ या तिथींना, आश्विन शु. १ ते ९ व पौष शु. ८ ते १५ या दिवशी सायंकाळच्या पूजेनंतर देवीचा छबिना निघतो. मात्र भाद्रपदातील वद्य ९ ते ३०, आश्विनातील शुद्ध ११ ते १४ आणि पौषातील शुद्ध २ ते ७ या कालखंडात देवी झोपी जात असल्याने व फाल्गुन शु. १५ ला होळी असल्यामुळे छबिना निघत नाही.

देवीची भक्तमंडळी देवीने आपल्यावर प्रसन्न व्हावे म्हणून अनेक प्रकारचे नवस बोलतात. हे नवस फेडण्यासाठी देवीच्या मंदिरात आल्यानंतर त्यांना ओटी भरण्यासाठी चार आणे, गोंधळासाठी दोन रुपये, जावळासाठी तीन रुपये असा वेगवेगळ्या प्रकारचा कर सध्या द्यावा लागतो. आपल्याला होणारी मुले जगू देत म्हणून केलेला नवस फेडताना अशा मुलाचे जावळ येथे येऊन काढतात. अशा वेळी पुरोहिताचे घरापासून तो देवीच्या पायाशी येईतो साष्टांग नमस्कार—दंडवत—घालीत येतात. देवीचा भक्त म्हणून आयुष्य स्वीकारताना देवीच्या भक्तसांप्रदायाचे प्रतीक म्हणून वेळूची परडी, नव्या कापडाचा पोत व कवड्यांची माळ स्वीकारावयाची पद्धत आहे. नवस फेडताना देवीला फुलांचे घर बांधावयाचे असते. मंडपास फुलांच्या माळा बांधावयाच्या असतात. एका डेऱ्याचा वरील अर्धा भाग फोडून उरलेल्या भागात ओंजळभर अगर दोन ओंजळी तांदूळ घालून व त्यावर कणकीचा दिवा लावून हे भदे वाजतगाजत देवीला घेऊन जातात. देवीची भोगी साजरी करताना देवीला पंचामृताचे स्नान घालतात. देवीला नवीन वस्त्र नेसवून तिची खणानारळाने ओटी भरतात. आपल्याला अखंड सौभाग्य लाभावे म्हणून बायका सर्व देवालयाभर असा हळदकुंकवाचा सडा शिंपतात. कोणी कोणी नवस फेडताना प्रदक्षिणेच्या मार्गावरून लोटांगणही घालतात. कधीकधी वस्त्राऐवजी लिंब नेसूनही देवदर्शन घेण्यात येते.

मंदिराच्या मध्यभागी देवीच्या समोर स्फटिकाचा सिंह आहे. देवीपुढील सभामंडपात लग्न, मुंज व जावळ काढणे अशी कार्ये पार पाडतात. तेथेच गोंधळ घालून देवीचे जागरणही साजरे होते. देवालयाच्या फरशीवर, खांबावर, पायऱ्यां-वर व फरसबंदीवर भक्तांनी चांदीचे रुपये ठोकल्याच्या खुणा सापडतात. अलीकडे हे सर्व रुपये काढून घेऊन देवीच्या गाभाऱ्याची दर्शनी बाजू, गाभाऱ्याचे दरवाजे आणि चबुतरा, चांदीच्या पत्र्याने मढविलेले आढळून येतात. या पत्र्यावर जयविजय कोरले असून, निरनिराळ्या प्रकारची वेलबुट्टीही काढलेली आहे. गाभाऱ्याच्या दारावर गजगौरीची सुंदर मूर्ती आढळते. या देवीची महापूजा बांधण्यासाठी म्हणून इतिहासकालीन समाजजीवनातील शेकडो मराठ्यांनी आपल्या रक्ताचा रंग उधळून स्वातंत्र्याचा ध्वज देवीच्या दाराशी उभा केलेला आहे !

भुत्ये आणि गोंधळी या देवीच्या दरबारातील परंपरागत भाटांनी दिवट्या पाजळून महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यांमधूनही जगदंबेचा 'उदो...उदो...'चा जयघोष घुमविलेला आहे.

गोंधळी हे तुळजा भवानीचे व देवी रेणुकेचे उपासक आहेत. गोंधळ हा लोक-विधी साजरा करताना हे गोंधळी अंगावर तेलकट वस्त्रे परिधान करतात.



द्वारपाल (सांखळी)
तुळजापूर

डोईवर कंगणीदार पगडी व गळ्यात कवडयांच्या माळा घालतात. त्यांच्या हातात संबळ व तुणतुणे ही वाद्ये असतात. प्रारंभी ही वाद्ये वाजवून निरनिराळ्या देवदेवतांना आमंत्रण करण्यात येते. त्यावेळी हे आमंत्रण 'मोरेश्वर गणा गोंधळा ये' अशा थाटात सुरू होऊन झाडून सारे देव, सगळ्या देवता, साती समींदर, साती आसरा, नवलाख तारांगण व धरतरी माता यांना केलेल्या आवाहनाने अखेर पावते.

ज्या घरात गोंधळ घातला जातो त्या घरात हे गोंधळी गव्हाच्या पुंजीवर घट मांडतात. वरती जोंधळ्याच्या ताटांचे तिकाटणे उभे करतात. ताम्हणात टाक मांडतात. नारळ व सुपारी ठेवलेले तांब्याचे दोन तांबे घेतात. दिवटी पेटवतात. नंतर कवडयांची टोपी व माळ घातलेला भुत्या पेटती दिवटी घेऊन नाचू लागतो. त्यावेळी गोंधळी सुंदर सुरावट लाभलेली कथागीते गातात. या गीतांची कथानके ऐकणारांना मंत्रमुग्ध करून सोडतात. अद्‌भुताची व विनोदाची झालर लाभलेल्या या कथागीतांमधून चित्ताकर्षक रीतीने सद्‌भावांची पेरणी केलेली असते. म्हणून या गोंधळ्यांना व भुत्यांना लोकधर्माचे उपासक मानले जाते.

या देवीचा भुत्या (आराधी) हा पाजळलेला पोत हाती घेऊन घरोघरी भिक्षा मागायला जात असतो. त्याला अनेक भाषा अवगत असतात. त्यामुळे हातांच्या बोटांच्या खुणांवर बसविलेली करपल्लवी भाषा वापरताना तो एखाद्याचे नाव, गाव अगर विचारलेली इतर माहिती बिनचूक सांगू शकतो. त्यामुळे त्याचे सर्वत्र चांगले स्वागत होते. तो गात असलेली गाणी भक्तिभावाने ऐकिली जातात.

तुळजा भवानी ही आदिमाता आहे. महाराष्ट्राची ती एक महन्मंगल अशी शक्ती आहे. ती महादेवी आहे. अखिल भारतात तिने वेगवेगळी नावे धारण केली असून जागोजाग तिचे वास्तव्य आहे. हिची उपासना औट किंवा साडेतीन पीठे मान्य करून सर्वत्र केली गेली आहे. तुळजा भवानी हे हिचे पहिले पीठ आहे. आंबेजोगाई योगेश्वरी हे दुसरे पीठ असून रेणुकाई मातापूर हे तिचे तिसरे पीठ आहे. चौथे अर्धे पीठ हे कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे आहे. ही महादेवी सत्व, रज व तम या त्रिगुणांची एकमुखी अशी आराध्यदेवता आहे.

महाराष्ट्राच्या या कुलस्वामिनीसंबंधीचे उल्लेख प्राचीन काळच्या अनेक ग्रंथांमधून आलेले आहेत. काही संशोधकांच्या मते मुसलमानपूर्वकालात लिहिल्या गेलेल्या स्कंदपुराणात तुळजा भवानीचा उल्लेख आलेला आहे तर काहींच्या मते ब्रह्मदेवाच्या आज्ञेनुसार त्या वेळचा सुप्रसिद्ध कारागीर विश्वकर्मा याने देवीचे हे देऊळ बांधलेले आहे. काही संशोधकांनी या देवीच्या देवळाच्या बांधकामाचा काळ हा राष्ट्रकुटांच्या वेळचा मानला आहे.



भवानी मंदिराच्या शिखरावरील नक्षीकाम

महाराष्ट्राचे क्षात्रतेज असलेल्या या तुळजा भवानीच्या चरणाशी ज्य
ऐतिहासिक महापुरुषांनी काही दान देऊ केले त्या त्या महाभागाने आपल
येथे या ना त्या स्वरूपात ठेवलेला आढळून येतो. तुळजापुरी उपलब्ध अ
सर्वात जुने पत्र 'राज्याभिषेक शके २७ विक्रम नाम संवत्सरे अश्वीन सुधे
भोमवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शीव छत्रपती याणी मोकदमानी
अलजापूर ता. रातांजन सुभा प्रांत परंडे यास आज्ञा केली येसीजे' या री
प्रारंभाचे असून त्यावरती श्रीशिवनरपती हर्षनिधान, मोरेश्वरसुत नीलकंठ
प्रधान ही प्रारंभमुद्रा आढळून येते. तसेच 'मर्यादयं विराजते' ही लेखन
मुद्राही गवसते. पत्राच्या सुरुवातीस 'भवानी' असा उल्लेख आलेला अस
पत्राचे अंतरंग असे आहे—

'श्रीस्थल तुळजापूर हे मुख्य पीठ बहुत जागृत देव व स्वामीचे कुल
येथील पुजा उछाह तात्प्राचे धामधुमें करीता चालत नाही म्हणोन श्रीचे पुज
येउन वीदीत केले त्यावरून मनास अणीता हे राज्य श्रीच्या वरदेचे
तेथील पुजा उछाह सांग चालला पाहिजे या करीता स्वामीने श्रीच्या

उर्छाह नीमीत्य मौजे मजकूर कुलबाव कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी झाड झाडोरा पडेल पान सहीत चतु:सीमा ग्रामपुर्वक मर्यादेप्रमाणे खेरीज हकदार व प्राचीन ईनामदार करून गाव ईनाम दील्हा असे तरी तेथील उत्पन्न जे होईल ते श्रीस प्रवीष्ट करीत जाणे या पत्राची प्रती लिहुन घेऊन मुख्य पत्र पुजारी या जवली परतोन देणे.'

—लेखनीलंकार

अशाच प्रकारचे अनेक पत्र-लेख तुळजापूरच्या देवीच्या संस्थानात आढळून येतात. तुळजापूर येथील राजकीय अंमल हा वारंवार बदलत गेल्याने त्याचा परिणाम देवीच्या अस्तित्वावरही होत गेला. त्यामुळे देवीच्या भोप्यांनी मुसलमानांच्या अत्याचारापासून देवीला वाचविण्यासाठी मूळची मूर्ती लपवून ठेविली व त्या जागी देवीचे दुसरेच प्रतीक ठेविले. त्यासंबंधीचा उल्लेख सभासदांच्या बखरीमध्ये आलेला असून तो मजकूर असा आहे—

'तेव्हा अवघी फौज एकत्र होऊन औरसचौरस लष्कर उतरले. पुढे तुळजापुरास आले. येथे येऊन मुक्काम केला. श्रीभवानी कुलदेवता महाराजांची, तीस फोडून, जातियात घालून, भरडून पीठ केले.' याच प्रकारची माहिती थोड्याफार फरकाने अव्वल इंग्रजीतील शेडगावकरांच्या बखरीतही आढळून येते.

अज्ञानदास शाहिराने अफझलखानाच्या वधावर आधारित अशा रचलेल्या पोवाड्यातदेखील यासंबंधीचा उल्लेख आलेला असून तो मजकूर असा आहे—

'येथून कूच केले कटकाला । अबदुल फौजेने चालला । मजलीवर मजला । अबदुल तुळजापुरा आला । फोडिली तुळजा । वरती मसूदच बांधिली । मसूद बांधुनी पुढें गाय जब केली । अबदुलखान फोडि देवाला । काही एक अजमत दावा मला ।'

—ऐतिहासिक पोवाडे, भाग १, पान ११ : श्री. य. न. केळकर

परमानंदाच्या शिवभारतामध्येही खानाने देवीचा अवमान केल्याचा उल्लेख आलेला आहे.

'रामवरदायिनी माता । गर्द घेऊनि उठली ।' असा उल्लेख संत रामदासांच्या काव्यातही आलेला आहे. त्यावरून युद्धकालामध्ये नित्याच्या पूजेसाठी म्हणून सैनिक तुळजा भवानीची प्रतिकृती घेऊन जात असत व सैन्याचा तळ पडेल तेथे देवीची प्रतिष्ठापना करून तिची पूजा बांधीत असत असे दिसते.

'सनदापत्रां 'वरून असे आढळून येते की, कोल्हापूरच्या ताराबाईचा मुलगा शिवाजी याने देवीच्या नित्याच्या पूजेसाठी म्हणून परांडे प्रांताच्या अधिकाऱ्यांना सनदापत्रे दिल्याचे उल्लेख आढळून येतात. त्यांपैकी राजशक ३२ पार्थिव

संवत्सर, कार्तिक वद्य ५ गुरुवार या काळामध्ये (इ.स. १७०५ ऑक्टोबर २५) दिलेल्या एका आज्ञापत्रातील मजकूर असा आहे—

'श्रीक्षेत्र तुळजापूर हें स्वामींचे आराध्यदैवत, बहुत थोर, जागृत स्थळ, अनादि, येथील पूजा उत्साह सांग चालावयाकरिता पूर्वी बालेघाट परगण्यांतील औवशे तर्फे पैकीं ब्राह्मणी हा गांव इनाम दिला होता. पण तो लश्करास मोकासा दिल्यामुळें सुरळीत चालत नव्हता. म्हणून तो मोकासा दूर करून रातांजनतर्फे पैकीं शेलगांव हां गांव नूतन इनाम करून पूर्वी प्रमाणे देवीस दिला.'

—सनदापत्रे, पृ. १९१

तुळजापूर गावच्या प्रवेशद्वाराशीच एक भव्य आणि प्रशस्त विहीर आढळून येते. ही विहीर पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांनी शके १७०७ मध्ये बांधली असल्याचा उल्लेख एका शिळेवर आढळून येतो. या शिळेवरील हा मजकूर असा—

श्रीदेवी पदितोषणार्थं मतुलं विख्यात कीर्तिक्षती ।
मल्हारोति वधुश्च कर्तुमधुना रेवातरे संस्थिता ॥
खंडेराय वधुश्चकार जगदक्षेमाय वापी परी ।
सारा मान भरेन्द्र वद्यं सलिलो नामना अहिल्या सती ॥

शके सत्राशेसात नृप शालिवाहन शके

तुळजापूरच्या दक्षिण टेकडीवर असलेल्या एका सुंदर मंदिरामध्ये एक प्रचंड शिळा असून तिला घाटशिळा असे म्हणतात. सीतेचे रूप घेऊन आलेली देवी पार्वती याच शिळेवर बसली व येथूनच ती रामाशी बोलली असे सांगतात. याच जागेवरून पार्वतीने रामाला दक्षिणेचा मार्ग दाखविला आणि दैत्यांचा पराभव करून तू यशस्वी होशील असा वर दिला असेही सांगितले जाते. या संदर्भात एक कथा सांगतात ती अशी की, वनवासात असताना प्रभू रामचंद्र हे

घाटशिळा



सीतेच्या शोधासाठी रानावनांतून भटकत होते. त्यावेळी रामाचे हे वागणे मान्य न झाल्यामुळे शंकराजवळ पार्वतीने रामाच्या सामर्थ्याबद्दल शंका व्यक्त केली. परंतु शंकरांनी तिचे म्हणणे खोडून काढले. म्हणून ती हट्ट घेऊन कैलासावरून निघाली. रामाला फसविण्यासाठी तिने सीतेचे रूप घेतले व ती या ठिकाणी आली. रामाने मात्र तिचा कावा ओळखला व पार्वतीला विचारले, 'आई, तू इथे का आलीस?' त्यामुळे पार्वतीची घमेंड उतरली. त्या वेळेपासून देवीचे नाव 'तुकाई' असे पडले!

संत एकनाथांनी या प्रसंगाचे मोठे बहारदार वर्णन केलेले आहे.

> **श्रीराम म्हणे तूं का आई। तेंची नाम लोकांचे ठायीं ॥**
> **अद्यापी राहिलेसे पाही। म्हणती तुकाई जगदंबा ॥**
> **तुकाई नामें निदान। तें जगदंबेचें निजस्थान ॥**
> **अद्यापी पूजिती जन। अति पावन दंडकारण्यीं ॥**
> **श्रीराम वरदायिनी माता। तुकाई म्हणती राम वाच्यार्था ॥**
> **पुढे काय वर्तली कथा। सावधान श्रोतीं परिसावीं ॥**
> **हांसोनी बोले रघुनंदन। माते तुज आलो लोटांगण ॥**
> **तुवां माझें न करावें छळण। मी अनन्यदीन शिवाचे ॥ . . .**

तुळजा भवानीचा भोगोपचार करण्यासाठी म्हणून वेगळी उत्सवमूर्ती नाही. त्यामुळे पालखीसाठी मुख्य मूर्तीच हलविण्यात येते. देवीच्या रोजच्या पूजेच्या वेळी वस्त्रालंकारांचे व गंधलेपनाचे विविध प्रकार साजरे होत असतात. भवानी देवी आणि तिचा देवता परिवार यांच्यासाठी तुळजापुरी वर्षभर सतत अनेक उत्सव चालू असतात. परंतु भवानीचा खरा उत्सव नवरात्रातच पार पाडला जातो.





# श्रीतुळजा माहात्म्य

लेखक : **श्री. न. शे. पोहनेरकर**

महिषासुरमर्दिनीच्या या अवताराची कथा स्कंद पुराणाच्या सह्याद्री खंडात आलेली आहे. मुळात ही कथा संस्कृतमध्ये असल्याने सामान्य मराठी भाषिकाला ती अबोध अशी आहे. यासाठी तुळजापूरपासून १० कोसांवर असलेल्या पांगरी या गावाचे विद्वान व भाविक अंबाभक्त पांडुरंग जनार्दन यांनी या मूळ कथेचे, शके १८२० मध्ये ३६ अध्यायांत आणि २६०५ ओव्यांत, मराठीत रूपांतर करून ठेवलेले आहे. या योगाने सामान्य अशा भाविक मराठी वाचकांची चांगली सोय झालेली आहे. पुराणातील ही कथा थोडक्यात पुढे दिल्याप्रमाणे आहे :

कृतयुगात कर्दम या नावाचे एक ऋषी होते. त्यांची पत्नी अनुभूती ही पतिव्रता आणि सौंदर्यसंपन्न अशी होती. दोघाही पतिपत्नींचा गृहस्थाश्रम अतिशय समाधानकारकपणे चाललेला होता. दैववशात् कर्दमऋषींचा काल झाला. महासती अनुभूतीने सहगमनाचा विचार केला. परंतु पोटी लहान मूल असल्याने तेथील ऋषिमुनी आणि त्यांच्या स्त्रिया यांनी अनुभूतीला सहगमन न करिता तापसी जीवन जगण्याचा मार्ग सुचविला. तिचे मन वळविले. मंदाकिनीच्या काठी आश्रम बांधून अनुभूती आपले तापसी जीवन जगू लागली. तिने उग्र अशा तपश्चर्येस प्रारंभ केला. एकदा कुकुर नावाचा एक दैत्य त्या ठिकाणी आला. अनुभूतीला त्याने पाहिले. तिच्या सौंदर्याने तो दुष्ट मोहित झाला. त्याला वाटेल ते रूप घेण्याचा वर असल्याने आपण अजिंक्य आहो हा त्याचा दृढ विश्वास होता. कसलाही विचार न करता त्याने अविचाराने अनुभूतीला स्पर्श केला. महासतीचा ध्यानभंग झाला. अनुभूतीने डोळे उघडले आणि या महा आपत्तीतून आपणास मुक्त करण्यासाठी भगवतीची प्रार्थना केली. सतीची प्रार्थना व्यर्थ कशी जाईल? अष्टभुजा महिषासुरमर्दिनी तेथे प्रकट झाली. अनुभूती त्या आदि-शक्तीच्या आशीर्वादास पात्र ठरून महिषाच्या रूपात आलेल्या कुकुराचा तेथे अंत

झाला. या पर्वताचे जुने नाव यमुनाचल. अनुभूतीच्याच प्रार्थनेवरून भगवतीने आपले वास्तव्य या यमुनाचल पर्वतावर ठेविले. अनुभूतीसारख्या महासतीच्या संरक्षणार्थ प्रकट झालेल्या आदिमायेचा भक्तच कल्याणच्या सुभेदाराच्या सौंदर्यसंपन्न सुनेची माता म्हणून ओटी भरून बोळवण करू शकतो. महाराष्ट्राच्या संस्कृतीतील ही सांधेजोड अमोल अशी आहे. सतीचे शीलरक्षण हा महान आदेश यमुनाचलाच्या कडे पठारातून आजही कानी येईल. कान उघडे ठेवून लक्षपूर्वक ऐकणे आपले काम आहे.

तुळजापूरचे जुने नाव चिंचपूर असे आहे. ज्या जागी आज मंदिर आणि बाजारपेठ दिसते तेथे संपूर्ण जागा चिंचेच्या झाडांनी व्यापलेली होती. देवळाच्या समोरच्या एका बाजूस त्या जुन्या चिंचबनाची साक्ष म्हणून एक झाड तेवढे उभे असलेले आज दाखविण्यात येते. जुन्या कागदपत्रांतून ठाणे चिंचपूर असा या स्थलाचा उल्लेख येतो. अनुभूतीच्या हाकेला ती त्वरित धावली म्हणून ती 'त्वरिता'. त्यापासून तुरजा आणि शेवटी तुळजा अशा स्वरूपात आजचे नाव आले आहे असे सांगतात. तुकाई हे नाव पडण्याच्या दृष्टीने श्रीरामचरित्रातील एक प्रसंग सांगण्यात येतो तो असा :

सीतेच्या शोधात वृक्षवेलींना 'हा सीते' म्हणून आलिंगन देत फिरणाऱ्या विरही प्रभु रामचंद्राची परीक्षा पहाण्यासाठी देवी पार्वती सीतेचे रूप घेऊन श्रीरामापुढे आली. रामाने तिकडे दुर्लक्ष केले आणि वृक्षवेलींना कवटाळीत जाण्याचे आपले काम चालू ठेवले. पार्वती पुन्हा पुढे आली. श्रीराम पुन्हा बाजूला गेले. दोन चार वेळा हा प्रकार झाल्यानंतर श्रीरामांनी त्या आदिमातेपुढे नम्र भावाने हात जोडून तिला प्रश्न केला, 'येथे तू का आई ?' आदिमाता आश्चर्यमूढ



घाटशिळा परिसर

होऊन मूळ रूपात प्रकट झाली. रामाला आशीर्वाद दिला. सीतेची शुद्धी सांगितली. लंकेचा मार्ग दाखविला. दोघांचा हा वार्तालाप ज्या ठिकाणी झाला ते स्थान म्हणजेच मागे उल्लेखिलेले घाटशिळेचे मंदिर. श्रीरामचंद्राच्या 'तू का आई' या प्रश्नाने तिचे नाव तुकाई झाले असेही म्हटले जाते.

तसे पाहता मराठवाड्यात देवीची किती तरी ठाणी आहेत. डिघोळ, राणी सावरगाव अशी अनेक नावे घेता येतील. या ठिकाणी त्या त्या पंचक्रोशीपुरत्या उत्सव, यात्रा इत्यादी कार्यक्रमांच्या परंपराही जुन्या अशा आहेत. मात्र इतर ठिकाणे ही क्वचित मोठी असली तरी ती तुळजापूर किंवा माहूर येथील तुळजामाता आणि रेणुकामाता यांची ठाणी म्हणून मानली जातात.

## पौराणिक तीर्थे

कल्लोळ : श्रीतुळजा भवानीच्या मंदिरात पहिल्या टप्प्यावर, पायऱ्या उतरल्यानंतर डावीकडे हे तीर्थ आहे. श्रीतुळजामातेची येथे वसती झाल्यानंतर तिच्या सान्निध्याने पवित्र होण्यासाठी सर्व तीर्थे येथे आली. त्या सर्व तीर्थांचा जो कोलाहल (कल्लोळ) माजला त्यातूनच हे कल्लोळ तीर्थ उदयाला आले. भाविक यात्रेकरू येथे स्नान करून नंतरच देवीच्या दर्शनास जाताना दिसतात.

गायमुख : कल्लोळ डावीकडे आहे तर त्याच्या अगदी समोर म्हणजे उजवीकडे हे गायमुख आहे. तुळजामातेच्या स्नानासाठी गंगा, यमुना आणि सरस्वती यांना ब्रह्मदेवाने पाचारण केले तेव्हा त्यांचा एकत्र प्रवाह या गायमुखावाटे वाहू लागला. माणसाइतक्या उंचीवर हे गायमुख असून त्यातून पाण्याची सतत धार चालू असते. धारेला खंड कधीच नाही. पाणी कोठून येते हे आजही अज्ञात आहे. मात्र ते स्वच्छ आणि पाचक आहे. येथेही स्नानाची झुंबड असते.

मंकावती : देवालयाच्या पूर्वेकडे हे एक प्रचंड तीर्थ आहे. याला तीन प्रवेशद्वारे आहेत. याचे दुसरे नाव विष्णुतीर्थ. गौतमाच्या पापाचा नाश व्हावा म्हणून श्रीविष्णूंनी हे तीर्थ उत्पन्न केले असे याविषयी सांगतात. या तीर्थात श्रीतुळजामाता आपल्या चौसष्ट योगिनींसह जलविहार करण्यास येते असा समज आहे.

पापनाशी : वृत्रासुराचा वध इंद्राने केला. त्याने घडलेले हे वृत्रवधाचे पाप नाहीसे करण्यासाठी तपश्चर्या केली. त्याचा दोष नाहीसा झाला. गावाच्या आग्नेय दिशेला एका दरीत असलेले हे रमणीय स्थान, याच कारणासाठी, पापनाशी या नावाने ओळखले जाते. याही ठिकाणी श्रीजगदंबेची अष्टभुजा मूर्ती आहे. ती इंद्रवरदायिनी या नावाने ओळखली जाते.

नागझरी : देवालयाच्या दक्षिणेकडे एका दरीत हे तीर्थ आहे. अहिरावणाने सर्पराज वासुकीच्या राज्याचा अपहार केल्यानंतर ते परत आपणास प्राप्त व्हावे



कल्लोळ तीर्थ, तुळजापूर

म्हणून वासुकीने या ठिकाणी तपश्चर्या केली. वासुकीची इच्छा पूर्ण झाली. म्हणून हे स्थान मनकामना सिद्धिदायक असे मानले जाते. वंशवृद्धीसाठी करावयाचे नारायणबली आणि नागबली हे दोन विधी या ठिकाणी करण्यात येत असतात.

### सत्पुरुषांचे मठ

भारतीबुवांचा मठ : देवालयाच्या पश्चिम बाजूस अर्ध्या मैलावर डोंगराच्या पायथ्याशी परम देवीभक्त रणछोडबुवा भारती यांनी हे स्थान निर्माण केले. यांचा भक्त म्हणून फार मोठा अधिकार होता. श्रीतुळजामाता यांच्याबरोबर सोंगटया खेळण्यास येत असे असे सांगण्यात येते. म्हणूनच सकाळी ज्यावेळी पूजेसाठी भक्त जमत तेव्हा पुजारी पश्चिम दरवाजात जाऊन 'आईसाहेब पूजेची वेळ झाली, या' अशी साद घालीत असे. त्या हाकेनंतर भवानी पूजा स्वीकारण्यासाठी तेथून देवालयात येई व सिंहासनारूढ होई. ही बोलावण्याची पद्धती आजही चालू आहे. भारतीबुवांच्या मठात सोंगटयांचा पट, सोंगटया, कवडया या एका विशिष्ट ठिकाणी आजही मांडलेल्या असतात आणि भाविक त्यांना आदराने वंदन करून जातात. शिष्यपरंपरेने हा मठ व येथील उपासना कार्य आजही चालू आहे. अन्नछत्र, पूजा, नंदादीप या सेवा येथे नित्य आहेत.

गरीबनाथबुवांचा मठ : गरीबनाथबुवा हे एक निष्ठावान देवीभक्त होऊन गेले आहेत. आपल्या जीवनात आपण एकदा काशीयात्रा करावी अशी यांना इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांनी भगवतीकडे काशीस जाण्याची आज्ञा मागितली. जगदंबा म्हणाली, 'गोमुखातून अहर्निश भागीरथीचा प्रवाह चालू असताना काशीला जाण्यातच विशेष काय आहे?' बुवांनी इतक्यावरही आपला आग्रह सोडला नाही. भगवतीने त्यांच्या हाती एक लहान काठी आणि एक लिंबू देऊन सांगितले, 'ठीक आहे. तुझा आग्रहच असेल तर काशीस जा; पण तेथून परत निघताना मात्र ही काठी आणि हे लिंबू दोन्ही भागीरथीत टाक.' बुवांना आनंद वाटला. ते यात्रेला गेले. यात्रा पूर्ण झाली. तुळजापूरला परत निघताना जगदंबेच्या आज्ञेप्रमाणे ती काठी व ते लिंबू त्यांनी भागीरथीच्या प्रवाहात सोडून दिले. तुळजापूरला परत आल्यानंतर आरंभी भगवतीच्या दर्शनास गेले. गायमुखावर जाऊन हातपाय धूत असताना पहातात तो तेच लिंबू व ती काठी बुवांच्या ओंजळीत येऊन पडली. गरीबनाथांना आश्चर्य तर वाटलेच पण भवानीच्या सांगण्याविरुद्ध आपण व्यर्थ काशीला गेलो याचा पश्चात्तापही वाटला. ते अनन्य भावाने आईला शरण गेले. तिची क्षमा मागितली. भगवतीने त्यांना नित्य दर्शनाची बंदी केली. बुवांनी जेव्हा प्रार्थना केली की, 'वर्षातून एकदा तरी तुझे दर्शन झाले पाहिजे. नसता, जीवन व्यर्थ आहे.' तेव्हा आज्ञा झाली की, 'आश्विन अमावास्येला एक दिवस दर्शनाला यावे. इतर वेळी वेशीच्या आत पाऊल टाकावयाचे नाही.' गरीबनाथबुवांनी ही आज्ञा आमरण पाळली आणि तेथील मठपती आजही या व्रताचे पालन करीत आहेत. औरंगजेब तुळजापूरला आल्या वेळी प्रस्तुत मठात त्याला काही दिव्यत्वाची प्रचिती आली म्हणून काही उत्पन्न त्याच्याकडून येथे मिळालेले आहे. मठात सदावर्त चालू असून श्रीदेवालयाच्या स्वच्छतेची व्यवस्था या मठाकडून करण्यात येते. येथील परंपरेत नाथपंथाचाही संबंध आहे.

बाकोजीबुवांचा मठ : हा मठ देवालयाच्या दक्षिणेला असून तो ब्रह्मचारी अशा शिष्यपरंपरेचा आहे. मठ तसा आहे जुनाच पण विशेष अशी माहिती येथे नाही. श्रीतुळजामातेची सकाळची चरणतीर्थ पूजा आणि रात्रीची प्रक्षाळ पूजा, दिवाबत्ती आणि मंदिरातील किल्ल्यांचे संरक्षण ही कामे यांचेकडे असतात. आजही प्रस्तुतचे मठपती ही कामे करीत आहेत. देवीच्या स्नानासाठी लागणारे पाणी यांनीच पुरवावे लागते.

हमरोजीबुवांचा मठ : जगदंबेच्या जामदारखान्याची किल्ली यांच्या स्वाधीन असते. ज्या ज्या वेळी अलंकारपूजा होते त्या त्या वेळी सर्व अलंकार प्रतवारीने घेताना आणि ठेवताना या मठपतीस उपस्थित रहावे लागते. आज देवळाच्या

 कामासाठी एक पंचकमिटी असून ती सरकारी नियंत्रणाखाली आपला सर्व

कारभार चालवीत असली तरी अलंकाराच्या ठेवी-घेवीच्या वेळी बुवांना तेथे असावे लागते.

अरण्यबुवांचा मठ : दसनाम गोसाव्यांचा पंथ प्रसिद्ध आहे. त्यांपैकी हा मठ असून याची परंपरा हरिद्वार, काशी आणि तुळजापूर अशी आहे. श्री. तुको जनार्दन अरण्य यांनी हा मठ स्थापन केला असून भावसार क्षत्रिय कुलोत्पन्न अवधूत अरण्य यांच्यापासूनची शिष्यपरंपरा हा मठ आणि येथील उपासना विशेष चालवीत आहे.

**इतर स्थाने**

मातंगीदेवी : श्रीतुकाई मंदिराच्या ईशान्येस हे मंदिर आहे. मातंगासुराच्या वधासाठी आदिमायेने अवतार घेतला तो इथे आणि त्याचा अंत झाला तोही इथेच. या स्थानाचे वैशिष्टच हे आहे की येथील पूजा आणि इतर सर्व उपचार अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या महार-मांग या समाजाकडे आहेत. शक्तीच्या उपासनेने हिंदु धर्मात आणि हिंदु समाजात किती खोलवर प्रवेश केलेला आहे याचे हे एक जिवंत प्रतीक आहे. श्रीतुळजामातेला करण्यात येणारे सर्व उपचार, पूजा, भोगी, गोंधळ इत्यादी इथे होतात पण ते सर्व अस्पृश्य—हरिजन—समाजाकडूनच. यात्रा, उत्सव, नवस इत्यादी निमित्ताने येथे हरिजनांचे मेळावे ठिकठिकाणांहून येत असतात. मातंगकुंड या नावाचे एक तीर्थही येथे आहे. यातील पाणी अतिशय स्वच्छ असते. अस्पृश्यांच्या बरोबरच स्पृश्य समाजही आपली भावांजली येथे अर्पण करीत असतो. धार्मिक दृष्टीने जातीय ऐक्याचा केवढा महान संदेश श्रीमातंगीदेवी देते हे पहाण्यासारखे आहे. सामाजिक समतेला आणि एकतेला हे आगळेपण विशेष पोषक असून महाराष्ट्र धर्माचे सुफलित दर्शन या ठिकाणी होते.

रामवरदायिनी : सीतेच्या शोधात फिरत असलेल्या प्रभु श्रीरामचंद्राला सीतेची शुद्धी भगवतीने सांगितली ती या स्वरूपाने. या मूर्तीच्या हाताचा अंगुलीनिर्देश दक्षिणेकडे असून त्या दिशेला सीतेस नेण्यात आले आहे ही बातमी या स्वरूपाने आदिमायेने रामाला दिली. प्रभु श्रीरामचंद्राला आशीर्वाद देऊन मार्गदर्शन केले म्हणून ही रामवरदायिनी. श्रीसमर्थ रामदास स्वामी तुळजापूरला आले असताना त्यांनी याच रामवरदायिनीचा गौरव गायिला आणि उल्लेखही केला आहे.

**वार्षिक विशेष**

प्रत्येक मंगळवार, प्रत्येक पौर्णिमा, पौर्णिमेच्या आदला आणि दुसरा दिवस, गुढीपाडवा आणि बलिप्रतिपदा इतक्या दिवशी रात्री श्रीचा छबिना निघत

असतो. छबिन्यासाठी घोडा, मोर, सिंह अशी वेगवेगळी वाहने तयार करून ठेवलेली आहेत. त्यांच्यावर श्रीच्या पादुका ठेवून देवालयाच्या परिसरात छबिना काढण्यात येतो. यावेळी पोत-परडयांच्या बरोबरच आईच्या उदेकारांनी सर्व परिसर गर्जून उठतो.

गुढीपाडवा, शिराळषष्ठी, ललिता पंचमी ते अष्टमी, बलिप्रतिपदा, मकरसंक्रांत आणि रथसप्तमी इतक्या दिवशी अलंकारपूजा होत असते, याखेरीज एखाद्या भाविक यात्रेकरूला जर अलंकारपूजा करावीशी वाटली तर ठराविक कर भरून ती करण्यात येते.

आश्विन महिन्यातील विजयादशमीचे नवरात्र आणि पौष महिन्यातील शाकंबरीचे नवरात्र हे नियमित उत्सव असून यावेळी श्रीची श्रमनिद्रा होत असते. विजयादशमीनंतर पौर्णिमेस सोलापुराहून काठ्या येत असतात. जाडजूड व प्रचंड उंच अशा काठ्या आपल्या हाती उभ्या घेऊन हे भाविक लोक पायी प्रवास करीत येत असतात. रस्त्यात देवीच्या या भाविकांचे स्वागत होतच असते. अशा रीतीने ही मिरवणूक वैशिष्टयपूर्ण आणि प्रेक्षणीय अशी असते. श्रीच्या शिलंगणासाठी नगरहून पालखी व श्रमनिद्रेसाठी भिंगारहून पलंग ही दर वर्षी येत असतात. या दोन्ही वस्तू थाटामाटाने मिरवत आणल्या जातात. नगरच्या तेल्यांचा हा मान आहे. आजही शिलंगणास उठविताना 'आई शिलंगणास ऊठ, उशीर झाला' असे म्हणून मातेला हाक देण्याचा मान याच तेली समाजाकडे आहे.



# कळसूबाई

लेखक : श्री. पां. द. खांडगीर

या देवतेचे निवासस्थान अहमदनगर जिल्ह्यातील अकोले तालुक्याच्या पश्चिमेस भंडारदरा तलावानजीक सह्याद्री पर्वतावर समुद्रसपाटीपासून ५,४२७ फूट उंचावर आहे. अहमदनगर, नाशिक, ठाणे या तीन जिल्ह्यांच्या व अकोले, इगतपुरी, शहापूर या तालुक्यांच्या सरहद्दीवर तिन्ही रेषा सांधून महाराष्ट्रातील या सर्वांत उंच पर्वतावर जाऊन बसलेली ही कळसूबाई महाराष्ट्राची कुल-स्वामिनी आहे. पायथ्याशीच बारी आणि पेंडशेत अशी दोन गावे वसली आहेत. या गावांपासून मंदिरापर्यंत जाण्यास चार मैलांचा प्रवास नागमोडी रस्त्याने पायी करावा लागतो.

श्रीभवानीच्या दर्शनास जाताना वाटेवरच बारी गावापासून अर्ध्या मैलावर सह्याद्रीच्या पायथ्यापाशी, माची म्हणून देवीचे पहिले ठाणे आहे. गडावर जाताना प्रथम याच जागेचे दर्शन होते. इथली इमारत लाकडाची बांधली असून भिंत दगडाची आहे. देवळाच्या खांबावर, फरसबंदी पायऱ्यांवर रुपये ठोकून बसविलेले आहेत. काही रुपये काढून गाभाऱ्याची दर्शनी बाजू, दरवाजे, चबुतरा इत्यादी भाग चांदीच्या जाड पत्र्यांनी मढवलेला आहे. दारातच दगडी पायरीवर नंदीचे कोरीव काम केले आहे. देवीपुढील सभामंडपात मौजीबंधन, जावळ काढणे, मुलाचे नाव ठेवणे, सत्यनारायणाची पूजा करणे, इत्यादी धार्मिक विधी होतात. शिवाय गोंधळ जागरणाचा कार्यक्रमही दर आठ दिवसांनी होतो. दर मंगळवारी देवीची मोठी यात्रा भरते. तिथे एक भगत असतो. तो राखुंडी घेऊन येतो. त्याच्या अंगात येते. देवीच्या रूपाने भगत बोलतो. रोगी समोर ठेवून खरे असेल ते सांगतो. तसेच भवानीच्या डोक्यावर फूल ठेवून प्रसाद लावतात. यात डावी उजवी, पाठी पोटी, पाहण्याची आजही प्रथा चालू आहे. आवारात दीपमाळांचा खांब उभा आहे. रात्रंदिवस गोड्या तेलाची व तुपाची वात तेथे

तेवत असते. आजूबाजूचे आवार झाडाझुडपांनी गजबजून गेलेले आहे. त्यामुळे भवानीमातेच्या मंदिराला चांगली शोभा आली आहे.

दर मंगळवारी आणि शुक्रवारी येथे नेहमीची जत्रा भरते, पण नवरात्रोत्सवात पंचमीला मोठी यात्रा भरते. या दिवशी ज्या कोणास देवीच्या दर्शनाला जावयाचे असेल त्यांनी शुचिर्भूत म्हणजे आंघोळपांघोळ करून निघावे लागते. विटाळ वगैरे चालत नाही. जो विटाळ घेऊन जातो त्याला प्रायश्चित्त निश्चितच मिळते. म्हणजे वाटेने सर्प आडवे होतात व रस्ता खुंटवतात ही सत्य गोष्ट आहे.

नवरात्रोत्सवात पंचमी; नवमी आणि दशमी या तीन दिवशी होमहवन होते. पण पंचमीच्या दिवशी मोठी यात्रा भरते. वणी दिंडोरीपासून भाविक लोक दर्शनास येतात.

गडावर दर्शनी बाजूला देवीच्या पादुका आहेत. होमकुंडासमोर दीपमाला आहेत. एक दीपस्तंभ पेंडशेत येथील सावळेराम पदमेरे यांनी देवीला अर्पण केला आहे असे त्यावरील कोरीव लेखावरून दिसते.

भवानीचे देऊळ २०'×२०'चे असून ते हेमाडपंती पद्धतीचे बांधलेले आहे. मंदिराचे शिल्प आणि त्यावरील सुवर्ण कळस पहाणाऱ्याचे लक्ष वेधून घेतो. याच गडावर शिवाजीमहाराजांनी आपल्या ऐक्याचा भगवा झेंडा फडकविला. तो आजही वार्षिक यात्रेच्या वेळी नवरात्रोत्सवात सतत दहा दिवस फडकविला जातो.

गाभाऱ्यात डोकावताच सिंहासनावर विराजमान झालेली भवानी दिसते. ही मूर्ती काळ्या गंडकी शिळेची असून ती गोलाकार आहे. तिच्या अंगाला शेंदराचा लेप दिला आहे. बाजूंनी देवीच्या चांदीच्या मूर्ती बसविल्या आहेत. हिरवे पातळ नेसून अंगात जरीची चोळी, गळ्यात सोन्याच्या माळा, कपाळावर कुंकवाचा टिळा, केसांचा बुचडा बांधलेला, पायांत तोडे, इत्यादी प्रकारे शिणगारून ही गौरवर्णीय कळसूमाता भक्ताला दर्शन देते.

ह्या भवानीचे प्रतीक म्हणून अठरा भुजांची देवी तयार केली असून दरसाल बारी, पेंडशेत गावांत बोहडयाचा कार्यक्रम होतो. रामायण, महाभारतातील नाटकी सोंगे सोमवारी रात्रभर काढून मंगळवारी सकाळीच गाडीवर बसवून देवीची मिरवणूक गावातून काढली जाते. लोक तिची मनोभावाने पूजा करतात व तिच्या पाया पडतात. सुवासिनी नारळ फोडतात. गुलाल, कुंकू बुक्का वाहतात. उदबत्त्या, कापूर लावून देवीची (अंबामातेची) गोड गाणी गातात.

देवीने हातांत विविध प्रकारची शस्त्रे धारण केली आहेत. आपल्या डाव्या हाताने महिषासुराची शेंडी पकडली असून उजव्या हाताने त्याच्या छातीत त्रिशूल खुपसले आहे. देवीच्या पायाखाली रेड्याचे धड आहे. खालच्या बाजूस

त्याचे शिर पडलेले आहे. सुदर्शन चक्र, भाला, धनुष्य, त्रिशूल, कुऱ्हाड वगैरे शस्त्रे हातांत घेतलेली आहेत.

भगत, भुत्ये आणि गोंधळी हें देवीच्या दरबारातले परंपरागत भाट. त्यांनी साऱ्या महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यात दिवटया पाजळून आईचा उदो, उदो धुमविला आहे. अंगात मलमलीचा अंगरखा, त्यावर जाकिट आणि डोक्यावर पेचाचे बसके पागोटे बांधलेले असा कल्लेदार मिशांचा गोंधळी संबळ झडवू लागला व रोमांचकारी कथा सांगू लागला म्हणजे कान त्याचे शब्द ऐकण्यासाठी तयार असतात.

या भवानीचे वर्णन अग्निपुराण, स्कंदपुराण आणि देवी भागवत या अनेक ग्रंथांतून आले आहे. देवी भवानीचे पौराणिक नाव कली, पुढे कळी व नंतर कळशी व आता कळसूबाई पडले. त्यासंबंधीची दंतकथा ऐकावयाला मिळते ती अशी :

कृतयुगाच्या काळात कर्दम नावाचा ब्राह्मण आपल्या पत्नीसह दंडकारण्यात रहात असे. त्याच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी अनुभूती सती जाऊ लागली. पण त्यावेळी ती गर्भवती असल्यामुळे लोकांनी तिला आडकाठी केली. नंतर काही दिवसांनी अनुभूती प्रसूत झाली. तिला एक मुलगी झाली. या मुलीला गुरुगृही सोपवून ती तपश्चर्येसाठी अंजनेरी पर्वतावर निघून गेली. तिथे तिने खडतर तपश्चर्या केली. स्वतःला उलटे टांगून घेऊन अग्निसाधनही केले. त्या तपामुळे ती अधिकच तेजस्वी बनली. तिने अंजनेरी पर्वतावर बसून शिवाची मनोभावे आराधना केली. शिवलिंगासमोर बसून धूप, दीप, नैवेद्य, फुले व बेल वाहून दररोज पूजा केली.

एके दिवशी तपश्चर्या करीत असता अनुभूतीने डोळे मिटले व शंकराची आराधना केली असता शंकरांनी प्रसन्न होऊन तिला विचारले. 'तुला काय पाहिजे ते माग' तेव्हा ती म्हणाली, 'माझा पती व माझी मुलगी या दोघांची भेट कायम घालून द्या.' शंकर म्हणाले, 'तुझी मुलगी सध्या गाईच्या जन्मात आहे. ती एका शेतात येऊन भात खाईल, एक ऋषी तिला दर्भ मारील व ती तात्काळ मरण पावेल. पापक्षालनासाठी शंकराची आराधना तो ऋषी करील त्यानंतर मी प्रसन्न होऊन माझ्या जटेतून गंगा वाहील तीच तुझी मुलगी समज.'

'यानंतर एका शेतकऱ्याच्या कुळात जन्म होऊन पहिल्या जन्मातील नवऱ्याशीच तुझे लग्न होईल. पण तिथे न पटल्याने तुला राग येऊन नवऱ्या-पाठीमागेच एका उंच अशा पर्वतावर जाऊन तू बसशील. तेथे एक राक्षस येईल व तुझे सुंदर रूप पाहून तुला वश करील. त्याच वेळी तू गुप्त होऊन शिळा होशील. तुला अनेक लोक मनोमनी भजतील व तुझी कीर्ती अखंड राहील.' एवढे बोलून शंकर गुप्त झाले व अनुभूतीही गुप्त झाली.

नंतर एके दिवशी एक भुकेलेली गाय पोटरीस आलेले दुधाळ कोवळे कोंब खाऊ लागली. तेव्हा गौतमऋषींना हे पाहून राग आला. त्यांनी रागाने एक दर्भ फेकून मारला. त्या ऋषीच्या दर्भाघाताने ती गाय तात्काळ मरण पावली. तेव्हा गौतम घाबरले. गोहत्येचे महापातक आता दूर कसे करावयाचे? त्यांनी सुचविले की, पापक्षालनासाठी शंकराची आराधना करावयास हवी. त्या ऋषींनी शंकराला प्रसन्न होण्यासाठी घोर तप मांडले. त्या तपाने शंकर प्रसन्न झाले आणि वर माग अशी गौतमास आज्ञा केली. गौतमाने पापक्षालनासाठी गंगेची याचना केली. परंतु गंगा तर शंकराची जवळीक सोडायला तयार होईना. शेवटी वचनाला जागणाऱ्या शिवाने रागाने जटा आपटल्या तेव्हा ती भूमीवर अवतरली. गौतमामुळे ती भूमीवर आली म्हणून गौतमी अर्थात गोदावरी झाली. आजही त्र्यंबकेश्वर येथे उंबराच्या झाडाखालून उगम पावलेली गंगा व शंकराने आपटलेल्या त्या जटा प्रत्यक्ष साक्ष देत आहेत. ही गोदावरी म्हणजेच अनुभूतीची मुलगी होय.

इकडे अनुभूती एका गरीब घरात जन्माला आली होती. तिचे नाव कली असे ठेवले. पुढे ती मोठी झाल्यावर कळशी असे तिच्याबद्दल बोलण्यात येऊ लागले. कळशी मोठी झाल्यावर तिचे एका भल्या मोठ्या शेतकऱ्याच्या मुलाशी लग्न झाले.

सह्याद्री पर्वतावर ही दोघे नवरा बायको बरीच वर्षे राहिली. कळशी ही अति सुंदर लावण्यवती तशीच देखणी असल्याने एके दिवशी कुकूर नावाचा दैत्यराज शिकारीसाठी सैन्यासह तिथे आला. कळशीचे सौंदर्य पाहून तो मोहित झाला. त्याने तिच्या अंगाला स्पर्श करताच कळशीची समाधी भंग पावली. तिने दैत्याकडे रागाने पाहिले.

दैत्याला शाप द्यावा तर तपाचे पुण्य नाश पावेल. गप्प बसावे तर पातिव्रत्याचा भंग होईल. यामुळे ती गोंधळली. तिने डोळे मिटून देवतेचा धावा करताच आदिशक्ति पार्वती भवानी रूपाने तिथे अवतरली. देवीने कळशीचे दुःख जाणून अठराभुजादेवीचे रूप धारण केले व कुकूर राक्षसाशी युद्ध केले. देवीचा पराजय करता येत नाही म्हणून दैत्य निरनिराळी मायावी रूपे धारण करू लागला. दैत्याऐवजी देवीला पाच फडांचा नाग दिसला. तो पाच फडा हातात धरून देवी तलवारीने तोडून टाकताच तोच नाग नाहीसा झाला व लाल डोळ्यांचे करवतीच्या आकाराची नखे असलेले गिधाड तिला दिसले. गिधाड दिसताच देवीने त्याचा एक पंजा तोडला. इतक्यात गिधाड गुप्त झाले व रेडा दिसू लागला. त्याचा पाय अधू होता. त्यातून रक्त वाहात होते. रंग काळा कुळकुळीत होता व शिंगे टोकदार होती. त्याचे डोळे अग्नीच्या स्फुल्लिंगाप्रमाणे धुमसत होते. खुरांनी जमीन उकरीत व नाकाने फुरफुरत तो मस्त महिष सिंहवाहिनी देवीच्या

अंगावर चालून आला. देवीने एक हुंकार देऊन व आपल्या हातातील तलवार उचलून त्याची मान धडापासून खाली उतरवली. निघालेल्या रक्ताचा मळवट आपल्या कपाळी लावला व या सिंहवाहिनी देवीने त्या महिषासुर दैत्याचा वध केला. तरीही अंशरूप राक्षस शुंभ व निशुंभ देवीवर चालून आले व देवीने त्यांनाही ठार केले.

कळशीने जगन्मातेची प्रार्थना केली, 'देवी, माझे संकट जसे त्वरित दूर केलेस तशीच अनेक भक्तांची संकटे निवारण्यासाठी तू याच रूपाने मृत्युलोकावर येऊन रहा.'

देवीने सतीची प्रार्थना मान्य केली आणि या सह्याद्री पर्वतावर भवानी रूपाने रहाण्याचे ठरविले. भैरव गणांसह ठाण मांडले. ती कळशी, तिच्या पतीसह गुप्त झाली व महाराष्ट्रात सर्वांत उंच अशा शिखरावर जाऊन बसली. तीच ही कळसूबाई होय.






लेखिका : **डॉ. सरोजिनी बाबर**

नवरात्रामध्ये पुण्याला मोठ्या उत्साहाने चतुःशृंगी देवीची महापूजा बांधली जाते. भल्या पहाटे उठून भाविक स्त्रिया देवीच्या दर्शनाला जातात. त्यावेळी देवीने आपल्यावर प्रसन्न व्हावे म्हणून त्या हळदकुंकवाचा सडाही घालतात. या देवीचे मंदिर पुण्याच्या गणेशखिंड भागामध्ये एका उंच टेकडीवर आहे. तेथे पायऱ्या चढून वर जाण्याची सोय आहे, तशीच टेकडीच्या इतर भागांतूनही मन मानेल त्याप्रमाणे लोकांना वर चढून जाण्याचेही मार्ग उपलब्ध आहेत. पूर्वी ही जागा अतिशय दाट अशा जंगलात होती. तेथे आजच्यासारखी लोकांची वस्ती आसपासच्या भागात नव्हती. त्यामुळे देवीचे दर्शन सुलभ व्हावे म्हणून कै. रामगीर गोसावी यांनी दगडी पायऱ्या बांधून घेतल्या. तसेच देवीला जाताना एका डाव्या बाजूच्या भागात एक सुंदर विहीरही बांधून घेतली. हल्ली अनगळ कुटुंबीय मंडळी त्यांच्या पूर्वजांनी ठरविल्याप्रमाणे या देवीचे सर्व कुळाचार पहात आहेत.

सुमारे पन्नास वर्षांपूर्वी लक्ष्मणशेट दंताळे या त्या वेळच्या प्रसिद्ध सराफांनी देवीच्या देवळाचा लाकडी मंडप मोडकळीस आलेला बघून स्वखर्चाने तो बांधून दिला. हे बांधकाम भक्कम स्वरूपाचे असून मंडपाचा आकारही पूर्वीच्या मानाने मोठा आहे. पुण्यातील सराफांनी जीर्णोद्धार समिती नेमली आणि रस्ता, वीज व पाणी यांची सोय केली. तसेच धर्मशाळेचाही जीर्णोद्धार केला.

मंदिराची व्यवस्था उत्तम रहावी म्हणून अनगळ कुटुंबाने एक लाख चौरस फूट जागा खरेदी केली. या जागेत भरणाऱ्या यात्रेतून होणारे उत्पन्न मालकी हक्कासाठी राखून बाकीची सर्व रक्कम देवस्थानासाठी ठेवली जाते. त्यामुळे देवीची दरवर्षी नवरात्रात भरणारी यात्रा सुखासमाधानाने पार पाडली जाते.



चतु:शृंगी देवी, पुणे (नवरात्र)

चतु:शृंगी देवीचा नवरात्रोत्सव आश्विन शुद्ध प्रतिपदा ते दसऱ्यापर्यंत प्रामुख्याने चालू रहातो आणि कोजागिरी पौर्णिमेला या उत्सवाची सांगता होते. या उत्सवाचे वेळी प्रतिपदेला देवीची महापूजा व अभिषेक होतो. घटस्थापनाही होते. नंतर दर दिवशी सकाळ-संध्याकाळ पूजा, पाठ वगैरे धार्मिक कार्यक्रम नेमाने चालू रहातात. नवव्या दिवशी नवचंडीचा होम होतो. दसऱ्याच्या दिवशी देवी शिलंगणाला जाते, पालखी निघते. हा छबिना मोठा असून संध्याकाळी निघतो त्यावेळी बत्त्यांची रोषणाई केली जाते. बँड वाजतो व शोभेचे दारूकामही होते.

पौष मासातील पौर्णिमेला शाकंभरीचा कुळधर्म असतो. चैत्र पौर्णिमेलाही महापूजा बांधतात. सध्या प्रत्येक मंगळवारी या देवीच्या दर्शनाला जाण्याचा प्रघात पडलेला आहे.

ही चतुःशृंगी देवी ही सप्तशृंग येथील देवीच मानली जाते म्हणून महिषासुर-मर्दिनीचे आपल्याकडील हे स्थान मानले जाते. पहिले स्थान माहूरगड, दुसरे तुळजापूर व तिसरे सप्तशृंगी असे मानतात. या देवीचे स्वरूप वर्णन करताना महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती, अम्रेश्वरी असे एकत्रित विचारात घेतले जाते. हे दैवत जागृत असून ते नवसाला पावते असा लोकांचा विश्वास आहे. पुण्यामध्ये ही एकच देवी अशी आहे की, भारताच्या सर्व प्रांतांमधील व जमातींतील लोक दर्शनासाठी येथे येतात. त्यामुळे या देवीच्या यात्रेला राष्ट्रीय एकात्मतेचे स्वरूप प्राप्त झाले आहे.





# पुण्यनगरीची श्रीचतुःशृंगी

लेखक : श्री. सदानंद चेंदवणकर

पुण्यनगरी ऊर्फ पुणे हे महाराष्ट्रातील प्राचीन संस्कृतीचे अवशेष असलेले व विद्यादेवतेचे माहेरघर झालेले एक शहर आहे. मराठेशाहीत हे शहर राजकारणाचे एक प्रसिद्ध केंद्र समजले जाई. पेशवेकालात तर हे शहर विविध कारणांनी वाजले गाजले आहे. मुंबईच्या खालोखाल गजबजलेल्या या नगरीत मारुतीची आणि गणपतीची देवळे आणि मंदिरे जागोजागी व गल्लोगल्ली आढळतात.

पुण्यनगरीतील मुख्य रस्ता जो लक्ष्मी रोड त्यावरून सदाशिव पेठेतून लकडी पूल किंवा नव्या पुलावर आल्यावर तो ओलांडून मुठा नदी, डेक्कन जिमखाना,



चतुःशृंगी, पुणे

फर्ग्युसन कॉलेज ही सारी ठिकाणे पार केल्यावर चतु:शृंगी मैदान लागते. या मैदानातील पश्चिमेकडच्या डोंगरात पूर्वेकडील उतरणीवर मध्यभागी एक देवीचे प्रसिद्ध देऊळ आहे. चतु:शृंगीचे देऊळ या नावाने ते आज कित्येक वर्षांपासून ओळखले जात आहे आणि या देवळाबरोबरच तो डोंगरही चतु:शृंगीचा डोंगर म्हणून ज्ञात आहे.

हे चतु:शृंगीचे देऊळ या डोंगरावर फारसे उंच नाही. एकूण ऐंशी पायऱ्या देवळात जाण्यासाठी काय त्या चढाव्या लागतात. येथे डोंगरातील एक खडकाळ कडा फोडून श्रीदेवी चतुं:शृंगी अवतीर्ण झालेली आहे.

या देवीची जन्मकहाणी मोठी रंजक आहे.

चतु:शृंगी देवीची मूर्ती येथे स्वयंभू असून ती खडकातून अवतीर्ण झालेली आहे. अवतीर्ण होण्यापूर्वी ती एका भक्ताच्या स्वप्नात गेली व त्या भक्तानेच तो कडा फोडून देवीचे मुख्य देऊळ कोरलेले आहे. या देवळाच्या निर्मितीनंतर काही वर्षांनी देवळापुढील सभामंडप व पायऱ्या भक्तांनी बांधलेल्या आहेत. ज्या टेकडीवर देवी अवतीर्ण झाली ती टेकडी माथ्यावर चौसपाट आहे. चोहो बाजूंचे कोपरे अगदी समान आहेत. या भौगोलिक परिस्थितीवरूनच या टेकडी-वरील देवतेस चतु:शृंगी देवी असे खुणेचे नाव पडले असावे. चतु: म्हणजे चार, शृंग म्हणजे टोक असा याचा अर्थ होतो.

श्रीदेवी चतु:शृंगी सिंहावर आरूढ झालेली असून तिने महिषासुराला मारले आहे असे देवीचे सुंदर रूप दिसते. परंतु देवीला वस्त्रालंकारांनी आणि विविध फुलामाळांनी सजविल्यावर, नटविल्यावर, तिचा फक्त गोल चेहराच काय तो दर्शन घेणाऱ्याला दिसतो.

सुमारे २५० वर्षांपूर्वीची गोष्ट. पुण्यात दुर्लभशेट पीतांबरदास नामक एक गुजराथी व्यापारी रहात होते. या शेटजींनीच इ.स. १७८६ मध्ये शिवराई नावाचे नाणे पाडले. त्यांची नाणे पाडण्याची एक टाकसाळच होती. त्यांचा एक निश्चयपूर्वक नियम असे की, ते चैत्री पौर्णिमेला नाशिक जिल्ह्यातील वणी-जवळील सप्तशृंगी देवीच्या दर्शनास जावे. सतत साठ वर्षे नियमाने अगदी न चुकता ते देवीच्या दर्शनास गेले. परंतु पुढे वय झाल्याने पालखीतूनसुद्धा त्यांना देवदर्शनास इतक्या दूरवर जाणे अशक्य झाले. पुणे ते नाशिक एवढा प्रवास त्यांना झेपेना. देवदर्शनाच्या आपल्या वारीत खंड पडला म्हणून त्यांना अतिशय दु:ख झाले. मनातून त्यांना खूप खूप वाईट वाटले. तेव्हा देवीला दया आली व तिने त्यांना स्वप्नात दर्शन दिले, आणि सांगितले, 'वार्धक्यामुळे तुला एवढ्या दूर माझ्या दर्शनास येववत नाही याबद्दल तू वाईट वाटून घेऊ नकोस. मी तुझ्याजवळचे भांबुर्डा गावच्या डोंगरात अवतीर्ण होत आहे. तेव्हा तुला

नाशिकपर्यंत जावयाचे श्रम घेण्याचे काही एक कारण नाही. मीच तुझ्या भक्तीवर संतुष्ट होऊन पुण्याजवळच्या डोंगरावर आले. तिथे दर मंगळवारी माझे वास्तव्य असेल. तिथे येऊन तू माझे दर्शन घे.' हा असा दृष्टान्त झाल्यावर दुर्लभशेटजींनी डोंगरावर देवीचा शोध केला आणि तिथे देवीचे देऊळ बांधले. तेच आजचे चतु:शृंगीचे देऊळ होय.



चतु:शृंगी मंदिर, पुणे

नंतर काही वर्षांनी पुण्यातील नरपतगीर गोसावी यांनी त्यांचे गुरू निधन पावल्यावर त्यांच्या दोन शिष्यांत गादीबद्दल तंटा सुरू झाला. तेव्हा नरपतगीर

यांनी श्रीदेवी चतु:शृंगीस नवस केला की, गुरूची गादी आता मला मिळावी आणि जर तसे झाले तर मी पायऱ्या व विहीर तुझ्या मंदिराखाली बांधीन. देवीस नवस केल्याप्रमाणे नरपतगिरास देवी पावली व त्यास गादी मिळाली. नंतर त्यांनीच देवीच्या मंदिरासमोरचा सध्याचा सभामंडप, खालून डोंगरावर मंदिरा-पर्यंत जाण्यासाठी पायऱ्या व खाली विहीर इतकी कामे केली.

पुढे दुर्लभशेटजींचे निधन झाल्यावर त्यांच्या मुलाने इतकी भरमसाट उधळपट्टी केली की, देवीचे देऊळ, तिची सतत चाळीस वर्षे पूजा करणाऱ्या ब्राह्मणांस खरेदी दिले. अशा प्रकारे या देवस्थानाची मालकी दुसऱ्या एका घराण्याकडे आली. त्या घराण्याचे नाव आहे अनगळ घराणे. गेल्या चार पिढ्या ही देवीची मालकी या घराण्याकडेच आहे.

देवी श्रीचतु:शृंगीची दर दिवशी षोडशोपचारे पूजाअर्चा केली जाते. दररोज सकाळी आठ नऊच्या सुमारास महापूजा यथाविधि केली जाते. पंचामृत आणि अभ्यंग स्नान झाल्यावर देवीवर वस्त्रे चढविली जातात. सौभाग्य अलंकाराचे प्रतीक कुंकू लावले जाते आणि मग नैवेद्य ठेवून अत्यादरपूर्वक आरती केली जाते. दर मंगळवारी देवीची पालखी काढली जाते. या दिवशी देवीचे भक्तगण दर्शनास येऊन देवीवर पंचामृत ओतून अभिषेक करतात. आरती वगैरे सोपस्कार झाल्यावर सुवासिनी देवीची खणानारळांनी व फळांनी ओटी भरतात. देवीचे तीर्थ, अंगारा व प्रसाद घेतात. देवीची अनन्यभावे ओटी भरणे लाभदायक, शुभ-दायक व मंगलदायक आहे असे हिंदु महिलांचे मत आहे. पारशी, मुसलमान, शीख इत्यादी धर्मातील महिला पण नवसासाठी या देवीची ओटी भरतात. दर मंगळवारी मंदिरात चौघडा वाजत असतो.

नवरात्रात देवीचा फार मोठा उत्सव होतो. भाविकांची खेचाखेच देवीच्या दर्शनासाठी होत असते. नवरात्रात पहिल्याच दिवशी देवीस पंचामृत स्नान, अभिषेक, धुपारती वगैरे झाल्यावर महावस्त्र नेसविले जाते. देवळात तिच्या डाव्या बाजूस घटस्थापना करतात. प्रतिपदेनंतर मात्र देवीला जे स्नान नसते ते अगदी विजयादशमीपर्यंत. कारण त्या दिवसांत ती महिषासुराशी लढण्यात गुंतलेली असते. नंतर आश्विन नवमी व दशमीस देवीपुढे होम, हवन इत्यादी धार्मिक विधी केले जातात. दसऱ्याच्या दिवशी होमाचा विधी झाल्यावर अभिषेक केला जातो व ब्राह्मण सुवासिनींना भोजन घातले जाते. संध्याकाळी शिलंगणाच्या वेळी देवीचा छबिना पालखीत उत्सवमूर्ती बसवून निघतो. त्यावेळी बँड, सनई इत्यादी वाजंत्री वाजविल्या जातात. चंद्रज्योती, भुईनळे इत्यादी दारूकाम सोडून मोठी आतषबाजी केली जाते. देवीचे भक्त यावेळी पेटलेले पोत घेऊन देवीच्या पालखीपुढे नाचतात. रात्री नऊ वाजता पालखी व छबिना योग्य

ती सीमा ओलांडून परत देवळात येते. पालखीबरोबर छत्रे आणि चामरे ही राजवैभवाची साक्ष देणारी साधने पण असतात.

नवरात्राप्रमाणेच देवीचा दुसरा उत्सव पौष शुद्ध पौर्णिमेस येतो. त्यावेळी अभिषेक, लघुरुद्र आणि अकरा ब्राह्मणांकडून एकादशण्यी इत्यादी करून ब्राह्मण आणि सुवासिनींना भोजन घातले जाते. ही देवी म्हणजे नवरात्रातील पुण्याचे फार मोठे आकर्षण आहे व असंख्य पुणेकर या दिवसांत देवीचे दर्शन घेणे पुण्यप्रद समजतात. या दोन्ही उत्सवांतला देवीचा सोहळा खरोखरीच पहाण्याजोगा असतो.

श्रीचतु:शृंगीदेवी पुण्यात एका बाजूला डोंगरावर एका भक्तासाठी अवतीर्ण झाली आणि म्हणूनच की काय राजेरजवाडे, सरदार, अमात्य या ठिकाणी फारसे येत नसत. त्यामुळेच देवीचे अलंकार खूपच कमी आहेत. देवस्थानचे वार्षिक उत्पन्न अंदाजे पंधराशे-सोळाशे रुपयांचे आहे!

चतु:शृंगीदेवीचे देवस्थान जागृत आहे असे समजले जाते. या जागृतपणाचा अनुभव भाविकांना वेळोवेळी येतो. येथल्या पुजाऱ्यांना तर नित्य अनुभव येत असतो. नवरात्रात देवीच्या पायऱ्यांवर शेकडो भिक्षेकरी, आंधळे, पांगळे, लंगडे, थोटे, अनाथ, अपंग दाटीवाटीने वस्ती करून रहातात. धो धो पडणाऱ्या पावसातही ते तिथेच वस्ती करून रहातात, आडोशाला जगतात. परंतु त्यांपैकी कुणाकुणालाही म्हणून सर्प, विंचू, कानेटी इत्यादी प्राण्यांपासून मुळीसुद्धा उपसर्ग पोचत नाही. एरवी डोंगरावर व देवळाच्या आसपास साप हिंडता फिरताना दिसतात, परंतु त्यांचा त्रास असा कुणालाच होत नाही.

यात्रेच्या वेळी पुणे शहरातीलच नव्हे, तर आसपासच्या खेड्यांतूनही भाविक देवीच्या दर्शनास येतात व पाच-सहा लाखांवर यात्रा जाते. यात्रेला हिंदूच नव्हे तर अन्य धर्मीय लोक पण येत असतात. ही देवी नवसाला खात्रीने पावते अशी भाविकांची दृढ श्रद्धा असल्यामुळे भाविक पंचामृत स्नानाचा अभिषेक किंवा अकरा एकादशणींचा अभिषेक, लघुरुद्र, ओटी भरणे, लिंब नेसणे, पानांची प्रभावळ, फुलांचे हार, गोंधळ, बकरे किंवा कोंबडे देवीस सोडणे इत्यादी विविध प्रकारचे नवस करतात.






लेखिका : **सौ. प्रतिभा ल. जाधव**

श्रीमाउली ही बागवे घराण्याची कुलदेवता, उपास्य देवता. बागवे (पवार, कुळी धार) हे मसुरे गावाचे वतनदार. मसुरे गाव बारा वाडींचा. अर्थातच मसुरे गावच्या समस्त रहिवाशांची माय माउली ही अधिष्ठात्री देवता.

मसुरे गांव वसले आहे रत्नागिरी जिल्ह्याच्या मालवण तालुक्यात. घाटी चढून डोंगराच्या कुशीत! समिंदराने वेढलेले मालवण मोहमयी असले तरी हवापाणी मुंबईसारखेच. हवा नाहीच, मध्यान्ही तर उकाड्याने जीव कासावीस होऊन अंगातून घामाच्या धारा वाहतील. पाणी तर मचूळच ! पण मालवण मागे टाकून



श्रीमाउली, मसुरे

उत्तरेकडील घाटी चढली की हिरवीगार वनश्री, थंडावा व शीतलता आणते. काजू, फणस व आंब्यांच्या रायांतून जाताना मन मोहरून जाते, डोळे सुखावतात. सृष्टिसौंदर्याच्या बाबतीत मसुरे महाबळेश्वरापेक्षा कांकणभर उजवेच ठरेल. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना नारळीपोफळींच्या बागा, हिरवेगार शेतमळे नजर खेळवूत टाकतात. काजू, फणस व आंबा यांची हिरवळ आजूबाजूचे डोंगर व्यापून आपल्या नजरेतही उतरते. अशा वेळी वाटते की, जणू ज्या मायमाउलीच्या दर्शनासाठी आपण जात आहोत तीच हिरव्या रंगाचा शालू नेसून आपल्याला सामोरी आली आहे आणि मायेच्या ओलाव्याने आपल्याला म्हणते आहे, 'येवां, येवां, अशेच येवां!'

मसुरे हा इतिहासकालीन प्रसिद्ध गाव. गोव्यापर्यंत अखंड कोकण प्रांत. सावंतवाडकरांच्या ताब्यात असताना मसुरे तर्फे म्हणजे मालवणसकट अकरा गावांचे तालुक्याचे मुख्य ठिकाण. शिवकालीन इतिहास सांगतो की, मसुऱ्याच्या गडनदीत, किनाऱ्याच्या संरक्षणार्थ आंग्र्यांचे आरमार सज्ज असे. मसुऱ्याच्या भरतगड किल्ल्याखालीच हे इतिहासकालीन आंग्र्यांचे बंदर असावे. भरतगड हे मोक्याचे ठिकाण. येथे सावंतवाडकर व शिवाजीमहाराजांचे आरमारप्रमुख यांच्या नेहमी लढाया होत. परिणामी भरतगड किल्ला व त्याच्या परिसरातील गावे, 'ज्याची सत्ता त्याची मत्ता' या न्यायाने अलटूनपालटून सावंतवाडकरांच्या नाही तर आंग्र्यांच्या वर्चस्वाखाली जात. गडनदीच्या परिसरात तीन ऐतिहासिक गड—भरतगड, भगवंतगड व रामगड—मराठी मर्दुमकीची ग्वाही आजही देत उभे आहेत.

अशा या इतिहासप्रसिद्ध मसुरे गावात श्रीजगन्माता जगदंबा मायमाउलीच्या रूपाने भक्तांच्या कल्याणार्थ उभी ठाकली आहे. देऊळवाड्यात दक्षिणोत्तर जाणाऱ्या रस्त्यावर पश्चिम बाजूस माउलीचे देऊळ नजरेस येते. मंदिराभोवती कोकणात विपुलतेने सापडणाऱ्या जांभ्या दगडांचा गडगा किंवा भिंत आहे, पण ती ठिकठिकाणी ढासळली आहे. उत्तरेला एक प्रवेशद्वारवजा दगडी कमान आहे. कमानीतून आत शिरताच देवळाचे भव्य पटांगण दिसते. त्याचबरोबर कमानीच्या समोर, दर्शनीच दोन देखण्या दीपमाळा आपले लक्ष वेधून घेतात. मंदिरप्रवेश केल्याबरोबर मुख्य सभामंडप लागतो. अंदाजे अठरा फूट रुंद व बावीस फूट लांब अशा या सभागृहाच्या कठडेवजा भिंतीतच बसण्यासाठी दगडी बैठक व लोडवजा व्यवस्था केलेली आहे. सभागृहाचे छत, कठड्याच्या चौरस खांबांवर आधारलेले आहे. सभागृह ओलांडून पुढे गेले की देवीचा गाभारा लागतो. तो चौकोनी, प्रशस्त व खोलीवजा असून मध्ये देवी माउली वारुळस्वरूपात आहे. वारुळाचा घेर वीस फूट असून शेंड्याकडे निमुळते होत ते पंधरा फूट उंच गेले आहे.

मसुऱ्यातील अनेक पिढ्या हे वारूळ पहात आहेत. असे सांगतात की, ते फार प्राचीन, कमीत कमी चार पाचशे वर्षांचे जुने, असावे. दिनप्रतिदिन वाढत वाढत ते छतास टेकले तेव्हा देवळाचा जीर्णोद्धार करून छतच उंच केले गेले. नवरात्राच्या पूर्वी वारूळ, काळसर दगडी रंगाने रंगवून त्यावर चुन्याने उभ्या रेषा काढतात. त्यावेळी जणू श्रीमाउली खडीची काळी चंद्रकळा नेसली आहे असे वाटते. या भोमात म्हणजे वारुळात नागिणीच्या स्वरूपात माउली वास करते व ती क्वचित प्रसंगी दिसते असे जाणकार मंडळी सांगतात.

देवी माउलीच्या देवळाचे मानकरी 'बागवे'. या बागवे कुलातील नववधूने देवीची ओटी साडीचोळीनिशी भरण्याची प्रथा आहे. ती आवर्जून पाळली जाते. इतकेच काय, घरच्या विवाहादी मंगल कार्याचे आमंत्रण सनई चौघड्याच्या वाजंत्र्यासह या देवीला मोठ्या थाटामाटात दिले जाते. श्रीमाउली देवी हे आदिशक्तीचेच एक रूप ! आई, माता, जगदंबा या नावाने गाथा सप्तशतीमध्ये आदिशक्तीला आवाहन केलेले आहे. मुळात ती लोकधात्री, धरणीमातेचेच प्रतीक. म्हणूनच की काय माता माउली मूळस्वरूपात, वारूळरूपात, रावळात वसत आहे असे वाटते. अणूरेणू परमाणूपासून महान पर्वत, नद्या, धबधबे, ज्वालामुखी ही विश्वशक्तीचीच रूपे नाहीत का? म्हणूनच मायमाउली अणूरेणूंच्या वारूळरूपात भक्तांना दर्शन देण्यासाठी उभी ठाकली आहे. मूर्ती ही मानवनिर्मित आहे. देहस्वरूप मानवाने तिला दिले. निसर्गात जी गूढ, अनाकलनीय शक्ती असते तीच देवी महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती !

श्रीमाउली ही जगदंबाच असावी म्हणून या देवालयामध्ये आश्विन शुद्ध प्रतिपदेला मोठा उत्सव होतो. नवरात्राचे घट बसविले जातात. त्याला 'देवी नवरात्र' असेच म्हणतात. बागवे, मुळचे, परब (गावकर) व सावंत हा त्रिवर्ग घटाची स्थापना करतो. सप्तशती पाठाची धर्माधिकारी आचार्य वझे यांच्या-करवी नऊ दिवस पारायणे होतात. पारायणानंतर देवीला दररोज मानकऱ्यांतर्फे नैवेद्य केला जातो.

देवीची जत्रा नवरात्रोत्थापनाच्या दिवशी, म्हणजेच दसऱ्याच्या दिवशी असते. त्या दिवशी दूर परगावी स्थायिक झालेले मसुरेकर नवस फेडण्यासाठी येथे आवर्जून येतात. घराघरांतून देवीची खणा-नारळाने, लुगड्या-चोळीने ओटी भरली जाते. होम-हवन, गोंधळ वगैरे विधींनी देवीचा उत्सव साजरा होतो. श्रीमाउली देवीला बळी मान्य नाही.

नवरात्रात श्रीमाउली देवीला साजशृंगार केला जातो. वारुळालाच उंची साडी नेसवून, मुखवटा चढविला की, नथ, पुतळ्यांचे हार घालून फुलांच्या माळांनी सजविलेली देवी, साक्षात माउलीच आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव

भक्तजनांवर करीत आहे असे भासते. या प्रसंगी देवीच्या मुखावर सात्त्विक भाव व आगळेच तेज विलसत असते.

या देवळाला बागवे मंडळींनी पूर्वीच्या काळी जमिनी अर्पण केलेल्या आहेत. तसेच नंदादीपाच्या तेलवातीसाठी काही ठिकाणेही बहाल केली आहेत. देवस्थानाला सरकारातूनही मोहिनी मिळते. देवस्थानाची व्यवस्था करणाऱ्या 'पुजारे' यांजकडे ती चालू आहे. देवीचे जडजवाहीर 'पुजारे' यांजकडेच असते.

मसुरे गावी बागवे कसे आले व त्यांना या देवस्थान व्यवस्थेत अधिकार कसा प्राप्त झाला याविषयी एक फार जुनी कथा सांगितली जाते. ती अशी :

मसुरे गावचे मूळ गावकर किंवा वतनदार, परब. शिवपूर्वकाली कधी तरी या परबांच्या वंशाला एकच दिवा. या एकुलत्या एका मुलाची आई मसुरे गावचे उत्पन्न वहिवाटी, सरकारी सारा भरी. परंतु बाई विधवा, मुलगा लहान! या परिस्थितीचा गैरफायदा घेऊन गावातील पुंड लोकांनी बाईच्या वतनाची लूटमार चालविली. सरकारी खजिनाही लुटला जाऊ लागला. त्यामुळे बाई जेरीला आली. त्या काळी गडनदीपासून गोव्यापर्यंत सर्व कोकणी मुलूख विजापूर सरकारच्या वर्चस्वाखाली होता. पुंडांचा म्होरक्या, कुडतरकर याजविरुद्ध बाईने विजापूर दरबारी अर्ज दाखल केला. विजापूर दरबारने सरदार बागवे यास फर्माविले, 'मसुरे मुक्कामी जाऊन या परब स्त्रीच्या अर्जाची दखल घ्यावी. अर्जात सत्याचा लवलेश असेल तरी पुंडांचे पारिपत्य करून वतन बाईला निश्चित भोगू द्यावे.'

सरकारी आज्ञेप्रमाणे बागवे सरदार मसुरे मुक्कामी पोहोचला. चौकशी करता बाईचे म्हणणे सत्य. बाई म्हणाली, 'हे दुश्मन माझे वतन मला खाऊ देत नाहीत. तर त्यांचा तू बंदोबस्त कर. माझा एकच वंशाचा दिवा आणि दुसरा तू धर्माचा मुलगा! अर्धे वतन तुला मी देईन.' अत्याचारी पुंडाचे पारिपत्य अनिवार्य होते. पण सरदाराच्या दिमतीला अवघे शंभर दीडशे स्वार! शत्रू प्रबळ. त्याच्या हाताखाली हजार दीड हजार लोक. असे म्हणतात की मसुऱ्याची मूळ भूमका, श्रीसातेरी देवी, सरदारांच्या स्वप्नात येऊन सांगती झाली, 'झिला (मुला), तू माघारी जा, मोठे सैन्य घेऊन ये. यश तुझेच आहे.'

देवीकडून अशी पूर्वसूचना मिळताच सरदार बागवे विजापुरास माघारी गेला. विजापूर दरबारची इजाजत घेऊन पाचशे सैनिकांसह परत मसुरे मुक्कामी आला. तरी पण मामला कठीणच होता. कारण अनोखा मुलूख. त्यात डोंगराळ प्रदेश आणि 'बळी तो कान पिळी' या उक्तीस अनुसरून सर्व गावच शत्रूंच्या जरबेखाली! या उपद्रवी भीमकाय पुरुषाच्या विरुद्ध 'ब्र' काढण्याची कोणाचीही छाती नव्हती. तेव्हा सरदाराने गनिमी कावा योजला. आपल्या आगमनाप्रीत्यर्थ गावाला 

मोठी मेजवानी दिली. आणि करमणूक म्हणून 'नाडेभोरीप' (कोल्हाटयांचा दोरीवरील खेळ) मांडले. सायंकाळी चहु बाजूंनी डोंगरांनी वेढलेल्या विस्तीर्ण मैदानात खेळ सुरू झाला. सगळे गावकरी दाटीवाटीने बसले. सरदाराने आपले लोक अधूनमधून पेरले. शस्त्रे अंगरख्यात लपविली.

'नाडेभोरीप' खेळणारेही सरदाराचेच लोक होते. त्यांनी सोंग तर खूप चांगले आणले होते. काळोख दाटू लागला. खेळ ऐन रंगात आला. पलिते पाजळले. आणि अचानक इशारा मिळताच सरदार आपल्या लोकांसमवेत गनिमावर तुटून पडला. भीषण कत्तल घडली. पण मुख्य सावज सुटले. कुडतरकर पळाला.

कुडतरकर जीव घेऊन पळाला तो दोन डोंगरांच्या घळीत, गर्द झाडीत दडून राहिला. वृक्षवेलींनी झाकळलेल्या त्या निबिड अरण्यात, अजूनही भर दुपारी अंधारच असतो. रानवेली माजलेल्या त्या झाळकटीत सूर्यकिरण रिघाव करू शकत नाही तेथे माणसाची काय कथा? या खोल घळीत एक झरी मात्र झुळझुळते. बाकी अगदी भयावह, निरव शांतता! ठावठिकाणा लागताच बागवे सरदाराने कुडतरकराला इथे गाठून ठार मारला. म्हणून हे ठिकाण कुडतरीची राय किंवा कुडतरीची झरी म्हणून मसुऱ्यात प्रसिद्ध!

शब्दाला जागून त्या वतनदार परब बाईने अर्धे वतन बागवे सरदारास दिले. म्हणून बागवे मानकरी! परब व बागवे भाऊबंद झाले. बागवे मसुऱ्यात स्थायिक झाले. परंतु कुडतरकर बाधू लागला. मांत्रिकांकरवी त्याची शांती करण्यात येऊन 'तुझ्याप्रीत्यर्थ आम्ही बागवे दर सोमवारी निरांजन लावू' असे आश्वासन दिले. तेव्हापासून आजतागायत कुडतरकराचे अदृश्य चैतन्य मसुरे गावावर पडछाया ठेवून आहे. पण ते बागव्यांच्या भल्यावर आहे. बागव्यांच्या हरेक घरात सोमवारी रात्री नैऋत्य दिशेस निरांजन लावून ठेवण्याची रीत आवर्जून पाळतात.

दुसरी एक दंतकथा या संदर्भात अशी की बिळवसवाडी (मसुऱ्याच्या बारा वाड्यांपैकी एक) येथील श्रीसांतेरी देवीने दृष्टान्त देऊन बागवे सरदारांस यश मिळवून दिले. म्हणून ते या सांतेरी देवीस भजू लागले. असाच कोणी एक पूर्वज श्रीसांतेरी देवीची नित्यनेमाने पूजाअर्चा करी. नंतर वयपरत्वे बिळवसवाडीची डोंगराळ दुर्गम वाट झेपेना. तेव्हा हात जोडून देवीला त्याने सांगितले, 'माय माते सांतेरे, ही तुझी शेवटची भेट. आता यापुढे हा घाटीचा चढ उतार माझ्याच्याने झेपत नाही.' तदनंतर तो घरीच देवीचे चिंतन करी. पण मनी बहुत अस्वस्थ होता. एके दिवशी देवी त्याच्या स्वप्नात आली व म्हणाली, 'तुझ्या भक्तीमुळे मी प्रसन्न झाले आहे व अमुक ठिकाणी प्रकट झाले आहे.' देवीने दृष्टान्तात दाखविल्या जागी त्या पूर्वजाला वारूळ दिसले आणि ते त्याच्या समक्ष वाढत गेले. श्रीसांतेरी देवी आपल्यासाठी इथवर धावून आली म्हणून तो वृद्ध आनंदला.

'तर तीच ही माउली' असे सांगणारे पुष्कळ भेटतात, पण कोकणच्या पुष्कळ गावांतून श्रीसांतेरी व श्रीमाउली यांची स्वतंत्र देवळे आहेत. मसुऱ्याशेजारी गडनदीपलीकडे चिंदर येथेही तेथील ग्रामस्थांचे कुलदैवत श्रीदेवी माउलीच! चिंदरात मात्र देवीची प्राचीन काळातील काळ्या दगडाची मूर्ती आहे. हे देऊळ मोठे असून येथील शांतता, शुचिर्भूतता व पवित्रता उल्लेखनीय आहे. चिंदरात श्रीसांतेरीचेही मंदिर आहे. त्यातही खूपच उंच व भव्य वारूळ दृष्टीस पडते. श्रीमाउलीला 'शिवशक्ती' म्हणून संबोधतात. माउलीच्या देवळात घटस्थापना व नवरात्राचे होम-हवन होते. गाथा सप्तशतीचे पारायण घडते. देवीला बळी चालत नाही. यावरून ती आदिशक्ती पार्वती असावी.

श्रीमाउली, श्रीसांतेरी व आंगणेवाडीची श्रीभराडी (भद्रकाली) या तिघी बहिणी आहेत अशीही बोलवा आहे. वर्षातून एकदा त्या विशिष्ट स्थळी डोंगरमाथ्यावर भेटतात. त्या स्थळी तीन झाडे (पेडे) एकत्र उगवली असून त्याभोवती पार आहे. सांतेरीची पेडी म्हणून ते ठिकाण सर्वांस माहीत आहे. ते डोंगर पठार अतिशय उंच असून तेथून मालवणचा समुद्र दृष्टिपथात येतो.

या 'बहिणी' आहेत असा जो समज आहे त्यात थोडे फार तथ्य आहेच. कारण शक्तीची रूपे महालक्ष्मी, कात्यायनी, शांती व भद्रकाली या नावाने प्रसिद्धच आहेत. माउली ही महालक्ष्मी, भराडी ही भद्रकाली व सांतेरी म्हणजे शांती. कदंबाच्या ताम्रपटात सांतेरी याचे संस्कृत रूप 'शांतिकरी' असे दिलेले आहे.

कोकणातील श्रीसांतेरी, पावणाई, विठलादेवी या गावाच्या संरक्षक देवता म्हणून मानतात. त्यांना वर्षातून एकदा 'समाराधना' म्हणजे महानैवेद्य होतो. पटकी, तापसरी यांसारखी रोगराई आणणाऱ्या कनिष्ठ देवता या मुलुखात 'चाळे' म्हणून ओळखल्या जातात आणि त्यांना दरवर्षी पशू बळी लागतो.

तथापि श्रीसांतेरी, श्रीरवळनाथ व पावणाई यांच्या कोकणातील वैशिष्ट्यपूर्ण उपस्थितीचें कारण दुसरेही असू शकेल. केदारविजय व करवीरमाहात्म्य या दोन ग्रंथांवरून, श्रीरवळनाथ म्हणजे श्रीकेदार रवळेशच असावा. रवळनाथ हा शिवाचा अवतार हे रवळनाथाच्या मूर्तीने धारण केलेल्या त्रिशूल, डमरू इत्यादी खुणांवरून सहजसिद्ध होते. शिवालयाप्रमाणेच श्रीरवळनाथाचे पुजारी गुरव किंवा राऊळ असतात. चैत्री पौर्णिमेला ज्योतिबाचे यमाईशी लग्न होते. तसेच कोकणातील देवस्कीत रवळनाथाचे तरंग व पावणाईचे तरंग यांचे लग्न लागते. त्याला 'शिवलग्न' म्हणतात. नाथपंथीयांचा संचार कोकणात नवव्या शतकात होता. तेव्हा या देवता नाथपंथीयांच्याच आहेत असाही एक विचारप्रवाह आहे. परंतु या देवता त्याहून प्राचीन, कदाचित पूर्ववैदिककालीन असाव्यात!

कोल्हापुराजवळ वाडी रत्नागिरी येथे ज्योतिबाचा डोंगर हे देवस्थान प्रसिद्ध आहे. तेथील ज्योतिबा हाच केदार रवळेश आहे. कोल्हासुराने कपटनीतीने श्रीमहालक्ष्मीचे कोल्हापूर बळकाविले. त्याच्याशी युद्ध करण्यासाठी केदार रवळेशास हिमालयातून महालक्ष्मीने आणले. तोच केदारेश्वर 'दक्षिणाभिमुख केदार' म्हणून ज्योतिबाचे डोंगरावर श्रीमहालक्ष्मीचे आग्रहावरून राहिला.

कोल्हासुराच्या नाशासाठी रवळेशाने भैरव व महामातृकांचा मेळा जमविला. त्यात चर्पट अंबा, महालक्ष्मी व यमाई यांचा पण उल्लेख आढळतो. कोल्हासुराचे राज्य सह्याद्रीवर होते. पण युद्धसमाप्तीनंतर रवळेशासह सर्व गोतावळा सह्याद्रीच्या कुशीत, कोकण भागात, राहिला असे दिसते.

श्रीमाउली, श्रीसांतेरी व श्रीभराडी यांना जे अनन्यसाधारण महत्त्व दक्षिण कोकणात आहे त्यावरून पार्वतीचीच ती रूपे असावीत. कदंबांचे राज्य असलेल्या गोव्यात सांतेरीची शेकडो देवळे आढळतात. मालवण तालुक्यात सांतेरीची पंचवीस, कुडाळात एकोणतीस व सावंतवाडी भागात एकतीस मंदिरे आहेत. माउलीची देवळे त्यामानाने कमीच. ती विशेषकरून सावंतवाडी भागात पाहण्यात येतात.

मसुऱ्याच्या बिळवसवाडीतील श्रीसांतेरी देवीचे जलमंदिर आहे. गाभाऱ्यात भल्या मोठया घेराचे वारूळ असून तेथे नागीण दर्शन देते असे सांगतात. गाभाऱ्याभोवती स्वच्छ व गोड पाण्याचा तलाव असून त्यात मासे आहेत. देवीचे मासे म्हणून त्यांना संरक्षण मिळते. गाभाऱ्याबाहेर एक लहानशी विहीर असून, तीत पूर्वी लाल कमळे फुलत व ती देवीला अर्पिली जात. भ्रष्टाचारामुळे वारूळ थोडे ढासळले व कमळेही अदृश्य झाली असे म्हणतात.

दक्षिण कोकणचे वैशिष्टच म्हणजे कोकणातील देवस्की. श्रीरवळनाथ, सांतेरी, पावणाई, वेताळ या देवता, तरंगे आणि बारापाचांची देवस्की असे या देवस्कीचे तीन घटक! पंचायत समिती येण्यापूर्वी, इकडील देवस्थान पद्धती स्थानिक ग्रामसंस्थेशी निगडित होती. गावातील सर्व वृत्तिक (विरतिक बलुतेदार) समाजाचे महत्त्वाचे घटक. त्यांच्या एकीवर समाजाचे सामर्थ्य अवलंबून! गावच्या एकीची वेठ वळण्यासाठी, कोकणी माणसाची देवावरील विशेष श्रद्धा व भीतियुक्त आदरभाव लक्षात घेऊन, कोणी पूर्वजाने कधी काळी, देवस्थाने व ग्रामसंस्था यांची सांगड घातली. त्यात या पूर्ववेदिक देवता, ग्रामदेवता इत्यादी कनिष्ठ देवतांबरोबर सामावल्या गेल्या असल्या पाहिजेत. कोकणातील इतिहासाचे व सामाजिक घडणीचे प्रतिबिंब या देवस्कीत पडलेले आहे.

कोकणातील देवस्कीचा नयनमनोहर व अद्‌भुतरम्य भाग म्हणजे 'तरंग'. हे तरंग किंवा खांब स्थानिक देवतांची प्रतीके होत. सुंदर तरंग व त्यांची लयबद्ध

अनोखी मिरवणूक हे या मुलखातील जत्रादी उत्सवाचे खास सांस्कृतिक अंग. मसुऱ्यात त्यांची संख्या दहा असून, चिंदरात सहा तरंग खेळवितात. तरंग हा पाच सहा फूट उंचीचा गुळगुळीत गोल सोटा असून त्यावर रंगीबेरंगी पट्टेही असतात. या तरंगाच्या टोकाला, त्या त्या देवतांचे पूर्वापार मानलेले प्रतीक म्हणून पितळेचे अगर रुप्याचे मुखवटे किंवा नुसता हाताचा पंजा किंवा कलश बसवून, त्याखाली उंची भरजरी रेशमी साड्या, छान निऱ्या काढून नेसविलेल्या असतात. देवळातील गाभाऱ्यालगत, देवीच्या उजव्या अंगास एका पाटावर ठराविक क्रमाने हे तरंग उभे केलेले असतात. गाव देवस्कीच्या वेळी, गावचे दीक्षा घेतलेले वृत्तिक,



श्रीमाउली देवीसमोर उभी केलेली तरंगे

उजव्या खांद्यावर घेऊन हे तरंग नाचवितात. ताकदवान शरीर व त्यावेळी अंगात होणारा देवी संचार, यांच्या जोरावरच हे तरंग सतत दोन तीन तास खेळविणे त्यांना शक्य होत असावे. बहुधा ढोलाच्या तालावर विशिष्ट लयीचा नाच करीत

प्रत्येक तरंगधारी आपला तरंग उलटसुलट गतीने फिरवीत रहातो. गतीमुळे तरंगांची वस्त्रे नर्तकीच्या झग्यांप्रमाणे फुलारतात. तरंग थांबला की, न हलण्याचे कारण विचारले जाते. बहुतेक बोललेला नवस पुरा न केल्यामुळे हा रोष असतो. 'लेकरांस माफी कर' असे विनविले व नवस फेडण्याचे आश्वासन मिळाले की, तरंग पुढे निघाले. माउलीच्या देवळापाशी मिरवणूक पोचली की, मायमाउलीला भेटण्यासाठी पायऱ्यांवर उड्डाण केल्यागत जी चपलगती तरंगधारक दाखवितात ती अवर्णनीय असते. हे तरंग पारंपारिक संकेतानुसार प्रत्येक देवळात काही दिवस मुक्कामास असतात.

पूर्वी ह्या भागात कदंब व शिलाहार राजांची सत्ता होती. जैन धर्माचा प्रसार बहुत झाला होता. तरंग जैन राजसत्तेची उरलीसुरली निशाणी असावी. कारण रवळनाथाचा तरंग गुरव घेतो. त्याला जैनाचा खांबा असेही म्हणतात. दरवर्षी ही तरंगे गावाच्या चतु:सीमांना भेट देतात. देवचारांची चार स्थळे जेथे असतात त्यांस रवळनाथाचा पूर्वस नारळाचा मान व इतर बळी देतो. ह्याला 'सीमा थारावणे' किंवा 'डाळपाचे देवपण' म्हणतात. खोचाखोच, कातरविधी, देसरूढ, असे अनेक विधी दरवर्षी अगत्यपूर्वक व पारंपारिक प्रथेस धरून केले जातात.

दसऱ्याच्या आदल्या रात्री, रवळनाथाच्या देवळासमोरील चवाठ्यावर खोचाखोच होते. पेटत्या मशाली हातात घेऊन विरतिक, छातीवर खंजीर मारल्यागत हावभाव करीत व तोंडाने हा: हा: असे ओरडत, बेभानपणे नाचतात. कदाचित रणदेवतेला रक्त अर्पण करण्याचा हेतू त्यामागे असावा.

दसऱ्याच्या दिवशी 'कातर' हा विधी पार पाडतात. देवळासमोर तरंगे उभी रहातात. त्यांच्या पुढ्यात दोन तलवारी मध्ये बांधून कातर उभी केली जाते. तिच्यावर महार, मडवळ (धोबी), सुतार वगैरे विरतिक एकावर एक उपडे राहिले की त्यावर गुरव उभा रहातो व तरंगांवर तांदूळ टाकतो. गावातील एकीच्या बळावर प्राण संकटात घालूनही कार्य पार पाडता येते. गावगाडा सुरळीत चालावा हीच भावना कातरविधीमागे असावी.

गावात रोगराई 'चाळ्या'मुळे येते असा कोकणात समज असतो. या चाळेगतीला गावाबाहेर हुसकून लावण्यासाठी जो विधी आषाढ महिन्यात करतात त्याला 'देसरूढ' म्हणतात. ही फार प्राचीन प्रथा असावी असे मानले जाते. घाडी रवळनाथाच्या देवळात, निखारे खापरात घेऊन येतो. त्याच्याबरोबर हातात काळा कोंबडा घेतलेला महार असतो. घाड्याने देवावरून निखारे ओवाळले की महार पुढे होऊन कोंबडे ओवाळतो. नंतर ते दोघे 'चल, चल' असे तोंडाने ओरडत गावभर हिंडतात. जणू कोंबड्याचे आमिष दाखवीत ते पिशाचाला (चाळ्याला) पिटाळीत गावसीमेवर येतात. तेथे घाडी कोंबडा बळी देतो व



भरतेश्वर मंदिर, मसुरे

मुंडके खापराबरोबर नदीत सोडतात. त्या बळीच्या आशेने चाळा गावापासून दूर जातो व अशा रीतीने रोगराईपासून गाव बचावतो असा समज !

ग्रामसंस्था देवस्थान पद्धती हे दक्षिण कोकणचे म्हणजे देवगडपासून कारवार-पर्यंतचे वैशिष्ट्य. अशी ग्रामव्यवस्था भारतात इतर ठिकाणी कुठेच नाही !

बारापाचांची देवस्की हे या देवस्कीचे आणखीन एक अंग होय. गाऱ्हाणे घालताना 'बारापाचांचे गणित एक कर' असे देवाला विनविले जाते. बारापाचांच्या एकमतावर समाजाचे कल्याण अवलंबून ही यामागील मनोधारणा असावी. हे बारा व पाच काय गूढ आहे ? कळत नाही. या देवस्कीत मानपान व अधिकार स्थानिक देवतांत, तसेच घराण्यांत वहिवाटीने ठरलेले असतात.

पहिले स्थळ पूर्वसत्तेचे म्हणजे प्राचीन देवतेचे. त्यालाच मूळ भूमका म्हणतात. धार्मिक विधीला प्रारंभ करताना या पूर्वसत्तेची अनुज्ञा घ्यावी लागते. मसुऱ्यात हा अग्रहक्क श्रीसातेरीचा आहे व येथील मानकरी 'पालव' नावाचे मराठा घराणे ! हे मानपान अगदी डोळ्यांत तेल घालून पाळले जाते.

दुसरे स्थळ राजसत्तेचे. राज्यकर्त्यांची देवता या स्थळी मानली जाते. मसुऱ्यातील माउली ही राजसत्तेचे स्थळ.

तिसरे स्थळ गावडा (गौडा), चवथे गांगो, पाचवे खालया (सुतार), सहावे मडवळ (धोबी), सातवे स्थळ जैन (शिवलिंग असलेले देऊळ). जैन राजवटीत शंकराची देवळे जैन स्थानके बनली. तदनंतर श्रीशंकराचार्यांच्या आज्ञेवरून शिवलिंगाची पुनर्स्थापना केली गेली अशी माहिती मिळते. परंतु अजूनही या भरतेश्वर, रामेश्वर इत्यादी शंकराच्या देवळांना 'जैन' म्हणून संबोधतात. आठवे स्थळ ब्राह्मण, नववे स्थळ कूळ, दहावे स्थळ भराडी, अकरावे व बारावे स्थळ बेळा व पान ह्या ठिकाणी दगड पुजलेले असतात व अधिकार महाराकडे असतो.

वरीलप्रमाणे बारा वंस व पाच पूर्वस, पाच पुरुष, ज्यांच्या पूर्वजांनी रवळनाथ, भूतनाथ, पावणाई, माय (देवी) या देवतांची स्थापना केली ते व बारा स्थळांची रचना करणारा पूर्वज ह्या सर्वांचे एकमत होऊन गावात सुखशांती नांदू देत हीच भावना. पूर्वी कधी काळी कोणी पूर्वजाने ग्रामव्यवस्था लावताना एकीची बेकी होऊ नये या हेतूने सर्व अधिकारी व वृत्तिक यांना ज्याचा त्याचा मान ठरवून देऊन ग्रामव्यवस्थेत सामावून घेतले व त्यांच्यावर, ग्रामसंस्था व देवस्थान व्यवस्था यांची सांगड घालून जबाबदारी सोपविली.

'गाऱ्हाणे' ही कोकणातील देवदर्शनाची गोड व भावुक सांगता. भक्तांची सर्व प्रकारची दुःखे व संकटे निवारून त्यांच्या मनकामना पूर्ण करण्यासाठी पुजाऱ्याने किंवा मानकऱ्याने विशिष्ट तालासुरात, आकाशाकडे पाहात देवीला केलेले आवाहन, म्हणजेच गाऱ्हाणे.

जागृत देवदेवतेच्या दर्शनाने भाविक भक्तिरसात बुडून गेलेला. त्यात अधिकारवाणीने घातलेले गाऱ्हाणे म्हणजे देवाशी जवळीकतेने घेतलेला मागणीचा हट्टच. साक्षात देवता समोर उभी असून, 'आपल्या भक्ताचे मागणे पुरे कर' असा हट्ट पुजारी तिच्यापाशी करीत आहे, ही कल्पनाच मोठी अद्‌भुतरम्य वाटते. 'गाऱ्हाणे' अत्यंत प्रभावी व रसाळ भाषेत घातले जाते. त्यातील अधिकारवाणीचा जोश व सुराची तालबद्धता यामुळे ते मनावर परिणाम करून जाते. त्यावेळी एक प्रकारचे गूढ वातावरण निर्माण होते व भक्त आणखीनच विनम्र होतो.

देवदर्शनाचे समयी, धार्मिक कार्यारंभी, प्रवासास निघताना श्रीमाउली देवीला खालीलप्रमाणे गाऱ्हाणे घातले जाते. मानकरी आवाज चढवून उंच सुरात देवीला हाक घालतो :

'बाय, माय, माते माउली, तू माय राजी हो. मूळ भूमका सांतेरे, आज तू पूर्वी राजी हो. आज तू भराडे राजी हो. आज तू जैन भरतेश्वरा, पाचाचो मेळेकार दामगडचो रवळनाथा राजी कर. आज तू पावणेक, पावणेच्या पूर्वसा

राजी कर. तू मायेच्या पूर्वसा, बाराच्या पूर्वसा रवळनाथा राजी कर. आज तू एतोबाची समजी घाल. सहा चाळे, तशीच कुळी, चौवीस ब्राह्मण राजी घालूचे. पूर्वेच्या म्होराचा पुरा गणित खरा कर. आणि बारापाचांचा गणित एक करून, गाव गिरिमांचा कल्याण कर. ("होय देवा म्हाराजा"—एक पालुपद) ही लेकरां लय दिसांनी तुझ्या आसऱ्याक इलि हत, मूळ भूमिक इली आसत, त्येंच्याकडून आजतागत चालत इला हां तसा कार्य करून घे. शेराचा सव्वाशेर कर, पाचाचे पंचईस कर. ह्या चेडू तुझी कायनी लिवतां हां त्याका यश दी माय माते मावले, त्येची ही पूजा मानून घे गे माझे आवशी.' होय देवा म्हाराजा.

✻ ✻

## अनुक्रम



# सती अनुभूती

निवेदिका : **सौ. कुमुदिनी पवार**

कोण्या एके काळी दंडकारण्यातील दिंडीरवनाच्या सीमेवरील आश्रमात कर्दम नावाचा एक ऋषी रहात होता. तो ब्रह्मवेत्ता होता. तो आपल्या पत्नीसह सुखाने रहात होता. तर त्याच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी स्वाभाविकच सती जायला निघाली. परंतु त्यावेळी ती गरोदर असल्याने लोकांनी तिला सती जाऊ दिले नाही. यथावकाश ही सती बाळंत झाली. पुत्रपालनाचे कर्तव्य तिने चोख बजावले. नंतर मुलाला गुरुगृही पोचवून ती तपश्चर्येसाठी म्हणून मेरु पर्वतावर निघून गेली. तेथे तिने अष्टांग योगाची खडतर अशी तपश्चर्या केली. स्वतःला उलटे टांगून घेऊन अग्निसाधन केले. या तपामुळे ती तेजस्वी दिसू लागली. तिच्या या देखणेपणाचा सर्वत्र बोलबाला झाला.

होता होता एक दिवस कुकूर नावाचा एक दैत्यराज शिकारीसाठी म्हणून सैन्य घेऊन तेथे आला. त्याने न रहावून अनुभूतीला पहाताच तिला स्पर्श केला. त्यामुळे ती खूप रागावली. शाप द्यावा तर तप नाश पावेल. गप्प बसावे तर पातिव्रत्याचा भंग होईल. काय करावे तिला सुचेना. म्हणून डोळे मिटून तिने आपल्या कुलदेवीचा धावा केला. त्यावेळी तिच्यावर प्रसन्न होऊन देवी पार्वती ही भवानीच्या रूपाने तेथे प्रकट झाली. तिने अनुभूतीचे दुःख लक्षात घेतले. अष्टभुजा तुरजेचे रूप धारण करून तिने दैत्याशी युद्ध पुकारले. ते बघून कुकुराने भयंकर मायावी रूपे धारण करण्याचा सपाटा लावला व युद्ध सुरू केले. नागाचे, गिधाडाचे, अजस्र रेड्याचे अशी रूपे घेतली. पैकी रेड्याच्या रूपात पाय अधू झाल्याने त्यातून रक्त ठिपकू लागले. त्याचा रंग काळाकुट्ट होता. वधस्तंभावरील सुळाप्रमाणे त्याची शिंगे होती. डोळे अग्नीसारखे लालजर्द होते. नागाप्रमाणे फूत्कार टाकीत व खुरांनी जमीन उकरीत तो देवीवर चालून गेला. देवीने एक जोराचा हुंकार भरला. आपल्या आठव्या हातातील तरवारीने त्याची मान कापून

धडापासून वेगळी केली. त्यामुळे इतर दैत्य देवीवर चाल करून आले. त्यांनाही देवीने आपली इतर शस्त्रे वापरून ठार केले.

त्यावेळी सती अनुभूतीने देवीची प्रार्थना केली की 'हे माते, माझे संकट तू जसे त्वरित हरण केलेस तशीच तू अनेक भक्तांची संकटे निवारणारी हो. त्यासाठी तू भूलोकावर येऊन वास्तव्य कर.'

देवीने सतीची ही प्रार्थना मान्य केली आणि ती भवानी रूपाने या यमुनाचळावर येऊन राहिली. या गिरीदरीत तिचे भैरवगणही ठाण मांडून राहिले.





# देवी डोंगराई

निवेदिका : **सौ. कुमुदिनी पवार**

कडेपूर गावात फार पूर्वी एक सासुरवाशीण रहात होती. तिचे नाव भागूबाई. ती फार गरीब होती. रोज तिन्हीसांजा ती बाहेर जायची. मात्र कुठे जाते ते सांगायची नाही. पण दररोज ठराविक वेळेलाच बाहेर जायची, म्हणून घरातल्या सर्वांनी ती रोज कुठे जाते ते बघायचे असे एकदा ठरविले.

रोजच्याप्रमाणे भागूबाई निघाली. तिच्या नकळत तिच्यापासून काही अंतरावर राहून तिचा सासरा, दीर व नवरा तिच्या मागोमाग निघाले. पहातात तर ती डोंगराईचा डोंगर चढत होती. देवीच्या देवळाजवळ गेल्यावर भागूबाईने देवीला हाक मारली—'आई डोंगराई जगदंबे दरवाजा उघड' तशी देवीने तिला दरवाजा उघडून आत घेतले. दरवाजा परत लावला गेला. ती देवीबरोबर बोलत बसली. मागची माणसे ती येईपर्यंत बाहेरच बसली होती. ती बाहेर आली. तेव्हा तिच्या मागोमाग सर्वजण परतली. त्यांनी विचार केला, ही एवढा-वेळ देवळात बसली तेव्हा नक्कीच देवी हिला दिसत असली पाहिजे. हिच्यावर देवी प्रसन्न दिसते तेव्हा आपण देवीजवळ काही तरी मागूया.

एक दिवस भागूबाई देवीला म्हणाली, 'देवी तू रोज मला भेटतेस, बोलतेस, मी एक मागणं मागू का?'

देवी म्हणाली, 'बोल बाई काय पाहिजे?'

भागूबाई म्हणाली, 'आई माझ्या घरी फार गरिबी आहे. माझ्या घरच्या सर्वांच्या अन्नाची व्यवस्था कर.'

यावर देवीने तिला चार भोपळ्याच्या बिया दिल्या. देवीच्या सांगण्याप्रमाणे तिने गावाजवळच्या तळ्यात चारी बाजूंना त्या बिया लावल्या.

देवीने सांगितले मी सांगितल्याशिवाय बिया तोडायच्या नाहीत. हळूहळू वेल वाढत होते. भोपळे लागले होते. एक दिवस देवीने आज्ञा केली. 'भोपळा तोड'

त्याचबरोबर देवीने असेही सांगितले की, 'जेवढे भोपळे निघतील त्यातले निम्मे तुला नि निम्मे मला. तसेच भोपळ्याच्या भरलेल्या गाड्या माझ्याकडे आणताना मागे बघायचे नाही. सर्व लक्षात ठेव.'

भागूबाईने भोपळा तोडला. त्यात वऱ्या मोहऱ्या (सोने, मोती) निघाले. घराचे कल्याण झाले. देवीच्याकडे गाड्या जुंपून भोपळे पोचवायचे ठरले. पण दुर्दैव हं! एका गाडीवानाने एकदा सहज मागे बघितले लक्षात न राहून, तर काय झाले की, सगळ्या गाड्या गुप्त झाल्या. भागूबाई पण एका गाडीत होती. तर ती पण गुप्त झाली. त्यावेळी भागूबाई डोंगराच्या पायथ्याजवळ होती. तिथेच भागूबाईचे स्मारक झाले. डोंगराई देवीचा डोंगर चढताना पायथ्याजवळ असलेल्या भागूबाईला नमस्कार केल्याखेरीज भक्ताचे पाऊल पुढे जातच नाही.

या सर्व घटनेपासून देवीला नवस करायला निरनिराळ्या ठिकाणचे लोक येतात. दर पौर्णिमेला तिथे यात्रा भरते. डोंगर फुलून जातो. कडेपूरच्या माहेर-वाशिणींचे हे आवडते दैवत आहे.

डोंगराई पुजायला माहेरवाशीण कधी विसरत नाही. या माहेरवाशिणीची भावना असते की, हीच आई डोंगराई, आई जगदंबा माझे कल्याण करते.

डोंगराई हे एक मोठे जागृत दैवत आहे. शिलंगणाच्या वेळेला गावातले लोक देवीची पूजा करतात. प्रत्येक घरातला शिधा गोळा करून एकत्र आंबील, घुगऱ्या करतात. देवीची पालखी वाजतगाजत काढतात. सबंध डोंगराला वेढा घालतात. त्यावेळी गावकरी दहीभात, आंबील, घुगऱ्यांचा नैवेद्य सगळीकडे शिंपतात. तोंडाने म्हणतात, 'आई उदे आई उदे उदे उदे' ऐकावे आणि पहावे तेवढे नवलच. या नैवेद्याचे एकही शीत दृष्टीस पडत नाही.

डोंगराईबद्दलच्या काही ओव्याही आहेत त्या अशा :

**महिन्याच्या पुनवेला फुलल्या चारी वाटा**
**माझी ती डोंगराई वैदिणीचा गुण मोठा**

**डोंगरी डोंगराबाई खाली तळवटी भागूबाई**
**शिड्या लावून पूजा होई**

**महिन्याच्या पुनवेदिशी करती सालरेचं उंडं**
**माझी ती डोंगराबाई अंबा जोगव्याला हिंडं**



## अनुक्रम

संग्राहिका : कु. लता देशमुख

दळण दळतांना ववी मी म्हणते
माझ्या माय भवानीला गूज मनीचं सांगते

ववी ग म्हणतांना व्हटांमंधी शब्द आड
दयाळ अंबिकाची मूरत उभी डोळ्यापुढं

अंगात दंड चोळी लेली पिवळी गुजरी
माझ्या ग अंबिकाची मूरत दिसं ग साजरी

लेली पिवळा पितांबर कपाळाला मळवट
अलिकार महापूजा लई ग सोबा देत

अलिकार महापूजा लई ग सोबा देती
माझ्या माय भवानीची तुळजापुरी ग वसती

आठा दिवसा मंगळवारी निघे पालखी छबिना
दयाळ अंबिकाच्या झुंबड लोटे दरशना

देवीच्या देवळात सवाष्णींची झाली दाटी
माय अंबिका ग माझी तबकात कुंकू वाटी

तुळजापुरामंदी गरदी रातंदिन
दयाळ अंबिकाला भोग्या करी भक्तगण

संग्राहिका : कु. कुसुम देशमुख

तुळजापुरामंदी गरदी अहोरात्र
दयाळ अंबिकेचं जगतावर कुरपा छत्र

पहिली मूळ चिठ्ठी तुळजापूरच्या लाडीला
दयाळ अंबिकेच्या हिरवी बनात गाडीला

माहूरची येमाबाई, तुळजापुरची अंबाबाई, बस हुरदयी येऊन
तुळजापूरच्या अंबिकेला भजते मी गाऊन, बसं हुरदी येऊन

ज्ञानाची विवटी भक्तीचा संबळ
दयाळ अंबिकेचा भक्त घालीतो गोंधळ

शिलंगण खेळूनी अंबा माझी ती शिणली
पलंगी झोपी गेली

सांज संध्याकाळी दिवा लावला तुपाचा
उजेड पडला रूपाचा अंबाबाईच्या

संग्राहिका : श्रीमती राधाबाई कुलकर्णी

बैसली सिंहासनी पायात वाळेचाळ
करी भक्तांचा संभाळ अंबाबाई

बैसली व्याघ्रावर हाती घेतली तलवार
अंबा माझी माता करी दुष्टांचा संहार

बैसली व्याघ्रावर वधीला महिषासुर
भक्त करीती जयजयकार

हात मी जोडीयीते अंबाबाई सोयरीला
पोटीची बालक चिरे तुज्या पायरीला

हात जोडूनी विनंती ग अंबाबाई मालनीला
पोटीचे बालक गोंडे तुझ्या पालखीला

दळण दळीते मी गव्हा नि तांदळाचं
अंबामातेच्या गोंधळाचं

नेसली पिवळी पितांबर कंचुकी हिरवीगार
गळयामध्ये हार शोभतसे

कमरेला कंबरपट्टा गळयात मंगळसूत्र
माता भवानी अंबाबाई आहे माझी पवित्र

कपाळी मळवट पाठीवरी वेणी
भक्ताची अभिमानी अंबाबाई

कानात कर्णफुलं नथीला लाल तुरा
जगदंबा माऊलीची नारळाने ओटी भरा

नैवेद्याला पुरणपोळी पाची पक्वान्नं वाढीते
माता माज्या माऊलीला भक्तीचा विडा देते

नऊ दिवसांचं नवरात्र घट बसले घागरीचे
नंदादीप लावायाला तेली आले नगरीचे

नऊ दिवसांचं नवरात्र धाव्या दिवशी दसरा
शिलंगण खेळायाला अंबा निघाली उशीरा

नऊ दिवसांचं नवरात्र धाव्या दिवशी शिलंगण
भोळे भक्त अंबा तुझे तुला देती आलिंगन

नऊ दिवसांचं नवरात्र नंदादीप माझ्या घरी
अंबा त्या माऊलीची खणानारळांनी ओटी भरी

संग्राहिका : कु. अलका देशपांडे

तुळजापूर शहर दिसं गुलजार
अंबा नांदते डोंगरावर

पायीचे फोलार वाजे रुणझुणु
अंबा कल्लोळा आली जणू

हातातला चुडा कशानं तडकला
दयाळ अंबिकेला भार झांजेचा पडला

पिवळा पितांबर लोळतो रावंमंदी
अंबा होंवंच्या झोकामंदी

पिवळा पितांबर पदराला मोती जाळी
अंबा नेसली संध्याकाळी

बसाया बसकर टाकीते लाल गादी
माझी दयाळ अंबाबाई बैसे भक्ताच्या मंदी

संग्राहक : श्री. रंगनाथ जोशी

पहिली माझी ओवी तुळजाबाई चातुराला
शिण माझा उतरला अशा तिला ओव्या गाता

कल्होळाचं पाणी ग ढवळलं कशानं
हिनं दैत्य खेळविलं तुळजा माझ्या बाईनं

देवीच्या देऊळात गेले मी सहजगती
आडवी आली धुपारती माझ्या अंबाबाईची

देवीच्या देऊळात उभी राहिले अंधारात
मोती आले अंगाऱ्यात जगदंबा माईच्या

देवीच्या देऊळात दत्तराया चिंचखाली
गायमुखाला काशी आली नवल कथा

देवीच्या देऊळात एक पायरी चुकले
चंद्रहाराला दिपले अष्टभुजेच्या माऱ्या

कोणाला बाई कोणी मजला भगवान
माझा तुला अभिमान अष्टभुजे माये माझे

जात्याला वैरण घालिते एक शेजं
आधी नाव घेते तुझं जगदंबेचं आई

संग्राहिका : सौ. शुभा वाजपेयी

सत्तरशिंगी बाई तुना गड चढायेना
तुना पायखाले उभा दैत गाडायना

सत्तरशिंगी बाई वाकडी तुनी मान
खानदेसनं माहेर पव्हाकडे देस कान

सत्तरशिंगी बाई उजाडिले नवो पिक
तुना पाठमागे राव्हा परशराम [illegible]

सत्तरशिंगी बाई तुनं उजाडीनं [illegible]
भाऊले झाया लेक माले [illegible] पेनं

सत्तरशिंगी बाई तुनं सोनाचं [illegible]
भाऊले झाया लेक माले मामानी [illegible]

सत्तरशिंगी बाई अवघड [illegible]
भाऊले होवो लेक मनो जीव हलायनी

सत्तरशिंगी बाई तुनं चांदीचं [illegible]
भाऊले होवा लेक पावशी ते वेसू जा ऊठ

सत्तरशिंगी बाई तुनी शेंदूरनी खोली
भाऊले झाया लेक आठे येनाभी बोली

संग्राहिका : सौ. इंदुमती फुटे

ये ग कल्लोळाचं पाणी दिसतं पिवळट
ये ग माझ्या अंबिकेनं धुतीला मळवट

ये ग कल्लोळाचं पाणी दिसतं नितळ
ये ग माझ्या अंबिकेचं धुतीलं पातळ

ये ग कल्लोळाचं पाणी दिसतं लाल लाल
माझ्या ग अंबिकेचा धुतीला रंगमहाल

चला जाऊ पाहू आंब्याच्या जोगाई
माय माऊलीच्या मंडपाखाली जाई

उजेड पडला सोनाराची टाकसाळ
माय अंबिकेची जडिताची प्रभावळ

उजेड पडला सोनाराच्या ये ग सोप्या
शोभती दंडी वाक्या माय अंबाबाईच्या

अंबिकेच्या देऊळात गालिचा केला नवा
माय जोगाई माझी संपत्तीची घेती हवा

पालखीची दांडी भोयाला जड झाली
जडावाचं लेणं माय अंबिका ल्याली

जातीयाची ओवी गायिली अंबाबाई
असे माझे नमन गणराजा तुझ्या पायी

वाजंत्री वाजती नाद जातसे अंबरी
दयाळ अंबिकेची पालखीमंदी स्वारी

आंबे ग जोगाईचा तांदळा आहे भव्य
लावण्य स्वरूप तिचे दिसे तसे दिव्य

भोळा ग माझा भाव भक्ती माझी अशी तशी
माय जोगाई अंबे शरण तुझ्या पायाशी

मस्तकी दिव्य हात ठेविला माय जोगाईनं
चरणावरी माथा मी ह्यो ठेवीते जाणून

संग्राहिका : **सौ. शरदिनी मोहिते**

आई तू मुंबादेवी तुला तांदळीळाचं बोनं
हावशा माझा बंधू तुझ्या नगरी माझं सोनं

आई तू मुंबादेवी तुजं सोन्याचं कंबाळ
बंधू माझ्याला संभाळ

आई तू मुंबादेवी येईन तुझ्या त्या नगराला
हावशा माझा बंधू जर तुझ्या त्या पदराला

आईतवारा दिवशी गिरणीवाल्याला माझ्या सुटी
मुंबादेवी पेढे वाटी

मुंबईची मुंबादेवी तिची सोन्याची कंबर
निरी पडली शंभर पैठणीची

## अनुक्रम

संग्राहक : आकाशवाणी, पुणे केंद्र

श्री ग देवी तुळजी तुजविण मज कोण तारी
भक्ताचा तू भाव पाहूनी
व्याघ्रावरी स्वार होऊनी
खर्ग त्रिशूळ डमरू हाती
वाजे खणणी खणणी
तुजविण मज कोण तारी

चंडमुंड वधूनिया
महिषासुर मर्दूनिया
शिळो सेतू बांधूनिया
असराव गज...
तुजविणं मज कोण तारी

नाथ भुजंग स्वरूप पाहे
स्वरूप पाहूनी हृदय राहे
स्वरूप तुझे सगुण माये
चिन्मय रूप साजे...
तुजविण मज कोण तारी

संग्राहक : श्री. साहेबराव पाटील

१

स्वयंभुवाच्या कवळ्या आणोनी
माळ तुझी घेईन घेईन ग आई...

कामक्रोधाच्या चिंध्या फाडोनी
आई तुझा पोत मी खेळवीन खेळवीन आई...
प्रेमरसाचे तेल आणोनी
अग्नित होमात टाकीन ग टाकीन ग आई...
प्रत्येक मंगळवारी आई तुझा जोगवा
मागेन ग मागेन ग आई...

२

प्रातःकाळी स्मरा आई । तुळजापूरची तुकाबाई ।
नऊ खंडाची पाशाई । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

अरुणोदयाचा झाला गजर । मिळुनी आले सुरवर ।
अंबा दर्शन दे सत्वर । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

अंबा अंबा अंबा । पृथ्वीची मूळ कदंबा ।
वधियले शुंभ निशुंभा । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

सिंहावरती झाली स्वार । मर्दियेला महिषासुर ।
सुखी केले देव सुरवर । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

महिकावती भागीरथी । कल्होळ तीर्थ यमुना सती ।
गोमुख ते भोगावती । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

अंबा त्रैलोक्याची माता । अजापाळ चरणी ठेवी माथा ।
त्रैलोक्यामाजी जिची सत्ता । ऐसे माहात्म्य अंबेचे ॥

३

जय जय यमुना गिरिवासिनी । राम वरदे विलासिनी ।
तुझी कीर्ती त्रिभुवनी । सहा चार अठरा वर्णिती ॥

ब्रह्मा विष्णू आणि शंकर । ते तव इच्छेचे अंकुर ।
उत्पत्ति पालन क्षय सत्वर । करून दाविसी माते ॥

अंबे महिषासुरमर्दिनी । दैत्य मर्दिला तू चरणी ।
अवघा भूभार हरोनी । भक्तालागी संभाळी ॥

तीर्थासाठी श्रेष्ठ कल्होळ । भक्त करिती जे अंघोळ ।
दर्शनमात्रे तात्काळ । मुक्ति देई तयासी ॥

श्रेष्ठ ऋषिवर मार्कंडी । बकदालभ्य हंस भृशुंडी ।
लोमहर्ष महावेडी । ध्याती तुजला निरंतर ॥

अठ्ठ्याऐंशी सहस्र ऋषी । ध्याती तुजला दिननिशी ।
अजापाळे शरणागत तुशी । जोडनी पाणि अखंड ॥

४ (सकाळी चरणतीर्थाच्या वेळी म्हणावयाचे गीत)

श्रीजगदंबे (अंबे) तुळजे हो तुजपाशी
मी सांगतो आम्हांस विठाबाई देवा आम्हांस पाव ग
झोपलीस काही ऊठ लवकर तुळजामाई
तू निजलीस शाल पांघरून
झोपी गेलीस गुरगुरून

अग अग आई, ऊठ लवकर अंबाबाई
माझी पतिताची पापकृते खोटी
तुझी पावन करण्याची शक्ति मोठी
समजवंताशी काय समजाऊ
ऊठ अंबे तू झोपी नको जाऊ

तुझ्यावीण कोणाशी हात जोडू
आई म्हणोनी कोणाचा पदर ओढू
तुझे पाय सोडूनी माय कोठे जाऊ
ऊठ अंबे तू झोपी नको जाऊ

जगी आता तुजवीण कोणी नाही
माझी कळवळ ही कोणी करत नाही
तूच जननी तू जनक बहिणभाऊ
ऊठ अंबे तू झोपी नको जाऊ

कृपा सांडूनी निजलीस यथासांग
उपेक्षीसी तू काय आता सांग
कृपावंते निष्ठुर नको होऊ
ऊठ अंबे तू झोपी नको जाऊ ।।

५ (संध्याकाळी महापूजेच्या वेळी म्हणावयाचे गीत)

आदि अनादि आनंद माय
दुष्टाशी शासन भक्ताशी पालन
दीनास होशील साध्य
आदि अनादि आनंद माय

तू पुत्र मर्दोनी अनुभूति रक्षोनी
संकट धाऊनी पाय
आदि अनादि आनंद माय

रेणुका कोपुनी त्रिसप्तक आवरोनी
विच्छते पृथ्वीत पाय
आदि अनादि आनंद माय

म्हैसासुर दैत्य मर्दोनी त्याते
सकळीक आनंद होय माते
आदि अनादि आनंद माय

६ (संध्याकाळचे अष्टक)

जय परात्परे पूर्ण चिन्ह हे
भगवती महा मंगला जे
अगाध विश्व रे विश्वव्यापिके
शरण तुज मी पाव अंबिके

आश्रम हे नसे आणि का जिनी
बालकाशी का सोडिले मनी
अपेक्षी कदा भक्तपालिके
शरण तुज मी पाव अंबिके

विजय ज्वाला हे चौघडे अती
काम क्रोध हे व्याघ्र गर्जती
वृक्षी संकटी भ्रांती नाशिके
शरण तुज मी पाव अंबिके

काही नाठवे विचार हा मनी
भ्रमत व्यर्थ मी दीन व्यापिके
श्रीदयानिधे त्रिपुरसुंदरी
सर्वसाक्षी तू भेट लवकरी
गोसावीनंदन विनवी चंडिके
शरण तुज मी पाव अंबिके

संग्राहिका : श्रीमती जानकीबाई पाटील

| | |
|---|---|
| तुळजापुरला जाईन | हळदकुंकू घेईन |
| मातापुरला जाईन | हळदकुंकू घेईन |
| माझ्या अंबेला वाहीन | माझ्या देवीला वाहीन |
| मिठापिठाच्या परड्या भरायला | जवळ नाही पैका |
| भवानी आईला जायाची | गोष्ट माझी ऐका |
| येडूबाईला जायाची | गोष्ट माझी ऐका |
| तुळजापुरला जाईन | पानं फुलं घेईन |
| मातापुरला जाईन | पानं फुलं घेईन |
| माझ्या अंबेला वाहीन | माझ्या देवीला वाहीन |
| मिठापिठाच्या परड्या भरायला | जवळ नाही पैका |
| भवानी आईला जायाची | गोष्ट माझी ऐका |
| येडूबाईला जायाची | गोष्ट माझी ऐका |
| तुळजापुरला जाईन | शिरी टोप मी घेईन |
| मातापुरला जाईन | शिरी टोप मी घेईन |
| माझ्या अंबेला वाहीन | माझ्या देवीला वाहीन |
| मिठापिठाच्या परड्या भरायला | जवळ नाही पैका |

भवानी आईला जायाची गोष्ट माझी ऐका
येडूबाईला जायाची गोष्ट माझी ऐका

तुळजापुरला जाईन चोळी पातळ घेईन
मातापुरला जाईन हिरवा चुडा घेईन
माझ्या अंबेला वाहीन मोझ्या देवीला वाहीन
मिठापिठाच्या परड्या भरायला जवळ नाही पैका
अंबाबाईला जायाची गोष्ट माझी ऐका
येडूबाईला जायाची गोष्ट माझी ऐका

तुळजापुरला जाईन माळ परडी घेईन
मातापुरला जाईन माळ परडी घेईन
अंबेचा जोगवा मागीन देवीचा जोगवा मागीन
मिठापिठाच्या परड्या भरायला जवळ नाही पैका
अंबाबाईला जायाची गोष्ट माझी ऐका
येडूबाईला जायाची गोष्ट माझी ऐका

तुळजापुरला जाईन हिल्लाळच्या बाण घेईन
मातापुरला जाईन हिल्लाळच्या बाण घेईन
अंबेच्या दरबारी खेळीन देवीच्या दरबारी खेळीन
मिठापिठाच्या परड्या भरायला जवळ नाही पैका
अंबाबाईला जायाची गोष्ट माझी ऐका
येडूबाईला जायाची गोष्ट माझी ऐका

तुळजापुरला जाईन ऊद कापूर घेईन
मातापुरला जाईन ऊद कापूर घेईन
अंबेची आरती करीन देवीची आरती करीन
मिठापिठाच्या परड्या भरायला जवळ नाही पैका
भवानीला जायाची गोष्ट माझी ऐका
येडूबाईला जायाची गोष्ट माझी ऐका

निवेदक : **प्रा. अनंत काणेकर**

पुरुषांच्या तोंडी किंवा स्मरणात असलेल्या लोकगीतांत मुंबईजवळच्या किनाऱ्यावर मासेमारीचा व्यवसाय करणाऱ्या सोनकोळी जमातीतल्या पुरुषांच्या गीतांना वेगळेच स्थान द्यावे लागेल. या कोळी जमातीत अनेक प्रकारची लोकगीते आहेत. लग्नसमारंभातल्या निरनिराळ्या प्रसंगी म्हणावयाची गीते, गौरीच्या सणात म्हणावयाची गीते, शिमग्यात होळीभोवती नाचताना म्हणावयाची गीते, सटवीची पूजा करताना किंवा मुलाच्या बारशाच्या वेळी म्हणावयाची गीते अशी अनेक प्रकारची स्त्रीगीते या समाजात आहेतच. पण दूर समुद्रावर जाऊन पुरुष मासेमारी करतात, तेव्हा 'गाण्याने श्रम हलके' करण्याकरिता त्यांनी

म्हणावयाची अशी खास पुरुषगीतेही या लोकांत पुष्कळ आहेत. या गीतांना 'आंबवण्या' म्हणतात. या नावाची व्युत्पत्ती मला माहीत नाही. हे कोळी लोक खंडोबा मल्हारीचे आणि अंबाभवानीचे भक्त आहेत. तेव्हा 'अंबेची आळवणी' म्हणजे आंबवणी असा अर्थ आहे की काय कुणाला ठाऊक.

मासेमारीसाठी होडी समुद्रात ढकलताना कोळी पुरुष पुष्कळ वेळा भवानी देवीने आपणाला सुखरूप परत आणावे म्हणून पुढील 'आंबवणी' म्हणतात :

### आंबवणी

. . . चैत वैसाखी नांद बाई चाप्याला आयले ग ।
आय भवानीचे हौद बांधले चौकोनी ग ।।
आय ग माजी बसली कळंबावरी, कळंबावरी ।
आयची नंदर दुनियेवरी, दुनियेवरी ।।
आय माजी कोलियानं उभी, समुद्रात उभी ।
आय माजी वज्जानं काय बोलली, काय बोलली ।
तुजा धनी आनिन सुखरूप घरी, सुखरूप घरी ।।

संग्राहक : प्रा. सदाशिव माळी

सत्तर शिंगी अंबाबाई व माय, माय मनी अंबाबाई
उंच गडनी पुतयी व माय, माय
कंबर पितांबर नेसनी व माय, माय
भांगे गुलाल भरनो व माय, माय
आंगे जरनी क्षा चोयी व माय, माय
डोयी काजय झिरीमिरी व माय, माय
धक्या घोडावर बसनी व माय, माय
पायी बेगडी मोचा व माय, माय
आईनी जावानी तातडी व माय, माय

संग्राहक : श्री. ता. रा. पवार

### आरती

अंबे करू मी कोण्यागती हो पहिली आरती
अंबे दुज्या दीववर ध्यान हो दुसरी आरती
तिन्ही ताल जमीन असमान हो तिसरी आरती
चारी दिशा दुमदुमणार हो चवथी आरती
पाची प्रकाशल्या ज्योती हो पाचवी आरती
साही शास्त्र भरले कोणी हो सहावी आरती

साती सागर भरले पूर्ण हो सातवी आरती
अष्ट कोटी बहिरोबाच्या चरणी हो आठवी आरती
नऊ खंड तुझा विस्तार हो नववी आरती
दाही अवतार झाले पूर्ण हो देहावी आरती
अकरा रुद्र हनुमान हो अकरावी आरती
बारा भुजांची भवानी हो बारावी आरती
तेरा राज्यांचा विस्तार हो तेरावी आरती
चवदा ताल तबक जमीन अस्मान हो चवदावी आरती
पंधरा तिथी काढल्या कोणी हो पंधरावी आरती

## देवीच्या भक्ताचे गाणे

आईचा परशराम तान्हा सभामंडपी पाळणा
बाळ निजविले नवसाचे तान्हे
त्याला रेशमाची दोरी त्याला हलवे गंगागौरी
हे बया हे बया हे बया

सूर्या समुख बसले गळ्या भोरमाळ घातली
आईचा रथ चालीला गाडीवान दोन
सोडीले आसन, हिमालय पर्वत पुढे बर्फाचे डोंगर
हे बया हे बया हे बया

वाघ जुंपले रथाला सर्पाचे कासरे त्याला
एका कल्होळाचे पाणी हे कशाचे पिवळे होते
आईने धुतला मळवट खेळविले दैत्य
आईचा परशराम तान्हा सभामंडपी पाळणा
हे बया हे बया हे बया !!







# गोंधळ [कुळाचार]

**जनजागरण**

तुळजा भवानीचे व देवी रेणुकेचे प्रमुख उपासक म्हणून महाराष्ट्रामध्ये गोंधळ्यांना मोठा मान आहे. घराण्याच्या कुळाचाराची प्रतिष्ठा सांभाळण्यासाठी म्हणून त्यांचा विशेष उपयोग होतो. घरातील मंगल कार्याचे वेळी आपल्या कुलदैवताने आपणा-वर प्रसन्न व्हावे म्हणून या गोंधळ्यांच्याकरवी घरात 'गोंधळ' घालण्याची प्रथा महाराष्ट्रात आहे. गोंधळ घालते वेळी हे गोंधळी गळ्यात कवड्यांच्या माळा घालतात. अंगावर तेलकट वस्त्रे परिधान करतात. डोईवर कंगणीदार पगडी घालतात. त्यांच्या हाती संबळ व तुणतुणे ही वाद्ये असतात. प्रारंभाला 'मोरेश्वर गणा गोंधळा ये' अशा आमंत्रणाने सुरुवात करीत ही मंडळी निरनिराळ्या देव-देवतांना गोंधळासाठी पाचारण करतात. हे निमंत्रण अखेरीस साती समींदर, नवलाख तारांगण व धरतरी माता यांना आवाहन करीत विराम पावते.

ज्या घरामध्ये गोंधळ घालावयाचा असतो त्या घरातील अंगणात अगर माजघरात हे गोंधळी जोंधळ्याच्या ताटांचे तिकाटणे उभे करतात. त्यावेळी चोळखण पसरून एखाद्या ताम्हणात देवीचे टाक मांडतात. तसेच नारळ व पान-सुपारी ठेवलेले तांब्याचे दोन तांबेही घेतात. घरच्या यजमानाकडून देवीची पूजा होते व दिवटी पेटविण्यात येते. नंतर कवड्यांची माळ व टोपी घातलेला माणूस पेटती दिवटी घेऊन नाचू लागतो. अशा वेळी हे गोंधळी आपल्या वाणीला 'उदे बोल वाचे' असा इशारा देत अनेक प्रकारची गाणी म्हणतात. या गीतांमधून गुंफलेल्या पुराणकथा व वीरगाथा ऐकण्यासाठी आप्तसंबंधातील अनेकांची उपस्थिती असते. यावेळी म्हटल्या जाणाऱ्या गीतांच्या सुरावटी श्रोत्यांना मंत्र-मुग्ध करून सोडतात. या गीतांमधून होणारी विनोदाची, चित्ताकर्षक कथेची व सद्भावाची पेरणी मोठी श्रवणीय असते.

हा गोंधळ घालते वेळी कुलदेवतेला वंदन करण्यासाठी म्हणून नवीन नवरा-नवरी पूजेला बसण्याची प्रथा असते. यावेळी पूजेसाठी म्हणून एका नव्या लाकडी पाटावर नवीन वस्त्र अंथरले जाते. त्यावर तांदळाने चौक भरण्यात येतो. त्यासाठी हळदकुंकवाची शोभा मांडली जाते. चौकाच्या चारी कोपऱ्यांना व मधोमध अशा खोबऱ्याच्या वाट्या मांडतात. तसेच सुपाऱ्या, खारका, लेकुरवाळे हळकुंड व केळी यांचीही येथे मांडणी केली जाते. नंतर मध्यावर नारळ ठेवलेला तांब्या मांडण्यात येतो व मग ही पूजा सुरू होते.

सर्वसामान्य लोकांच्या मनावर आपल्या पारंपारिक संस्कृतीचा ठसा बिंबविण्याचे प्रभावी साधन म्हणून हा गोंधळ विशेष लोकप्रिय झालेला आहे. त्यामुळेच या गोंधळ्यांच्या गीतांची बैठक स्वीकारून संत एकनाथांनी नवीन गोंधळ व भारुडे लिहून लोकप्रियता संपादन केली.

हा गोंधळ घालताना कोठे कोठे वाघ्या-मुरळ्यांचाही नाच होतो.

गोंधळाच्या प्रारंभी 'गण' आळविला जाऊन नंतर जगदंबेचे स्तवन होते व अनेक देवदेवतांना आवाहन करण्यात येते. त्यानंतर गोंधळ्यांची संगीत सभा साजरी होते. ही सभा रात्ररात्रभर होऊन हे जनजागरण मोठ्या हौसेने व उत्साहाने पार पडते.



# अनुक्रम

१. सौ. लीलाराजे पटवर्धन
२. डॉ. सरोजिनी बाबर
३. आकाशवाणी, पुणे केंद्र
४. श्री. गो. ल. जमदाडे
५. श्री. क. भ. प्रयाग
६. श्री. मा. स. मराठे

संग्राहिका : सौ. लीलाराजे पटवर्धन

## अंबिका

अंबे महा त्रिपुर भैरवी आदिमाये
दारिद्रय दुःख भव हारूनि मज दावि पाये
तुझी अगाध महिमा वदती पुराणे
श्रीरेणुके भगवती वरदे भवानी

अनाथासि अंबे नको विसरू गे
भवसागरी सांग कैसा तरू गे
अन्यायी मी जरी तुझे लेकरू गे
नको अंबिके दैन्यवाणे करू गे

भवानी तुझे सांगताती कडाके
महा चंडमुंडा दिले त्या धडाके
महावीर महिषासुर नाश केला
जगी मानवी थोर आनंद झाला

भगवती भवनिळा देखिलो धन्य डोळा
रत्नखचित माळा कस्तुरी भांग टीळा
त्रिशूळ-डमरूधारी अष्टभुजा कुमारी
रघुपति चिंतन करी संकट भक्ताचे निवारी

## नवरात्र

अश्विन शुद्ध पक्षी अंबा बैसली सिंहासनी
प्रतिपदेपासुनी घटस्थापना करूनी
नवरात्र बैसली भोवती रक्षपाळ ठेवुनी
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

द्वितीये दिवशी विश्वव्यापक भवानी
मन माझे मोहिले तुजला ध्याता मनमोहिनी
स्तनपाना देऊनी सुखी केले अंतःकरणी
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

तृतीयेचे दिवशी बाईने श्रृंगार मांडिला
हिरवे पातळ-चोळी गळा हार पुष्पमाळा
कंठीचे पदक कासे पीतांबर पिवळा
रुणझुणती नूपुरे लावण्य सुंदर निळा
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

चतुर्थीचे दिवशी मिळती चौसष्ट योगिनी
सकळामध्ये श्रेष्ठ परशुरामाची जननी
उध्धोकार गर्जती समस्त चंडिका मिळवोनी
तयांसी तू प्रसन्न विश्वमाता मोहिनी
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

पंचमीचे दिवशी व्रत उपांग ललीता
भक्तीपुरस्सर तुझे चिंतन करीता
निशेचे समयी करती जागरण हरिकथा
आनंदे नाचता प्रेम आले असे भगता
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

षष्ठीचे दिवशी भक्त आनंद वर्तला
करी घेऊनी दिवटी हर्ष गोंधळ घातिला
कवड्यांचे भूषण गळा हार पुष्पमाळा
जोगवा मागता प्रसन्न होशी भक्तकुमरा
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

सप्तमीचे दिवशी सप्तशृंग गडावरी
उभी तू रहासी भोवती पुष्पे नाना परी
जाई जुई शेवंती पूजा रेखीलेसी बरी
पडणी पडता झेलुनि घेसी वरीच्या हो वरी
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

अष्टमीचे दिवशी अष्टभुजा नारायणी
शेषाद्री पर्वती उभी देखिली भवानी
मन माझे मोहिले तुज ध्याता मनमोहिनी
स्तनपाना देऊनी सुखी केले अंतःकरणी
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

नवमीचे दिवशी नवा दिवसांचे पारणे
सप्तशतीचा जप होम हवन करणे
पक्वान्ने नैवेद्य करणे कुमारीपूजने हो
अति आर्य ब्राह्मण तृप्त केले जनार्दने हो
अंबामाई माऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

दशमीचे दिवशी सीमोल्लंघना निघती
अश्वारूढ होऊनी करी शस्त्रे झळकती
वधीयले दानव शुंभ-निशुंभ ऐसे किती हो
विप्र रामदासा बाईने धरियले हाती हो
अंबामाई मोऊलीचा उधो म्हणा उधो म्हणा

## नांदसी तुळजापुरी

आई जगदंबा रेणुका सुंदरी
नांदसी तुळजापुरी
धरित्री गांजली दैत्याने
बुडाले अवघे जन जी

तेहतीस कोटी देव मिळून
केले अंबेचे स्मरण जी
निघाली ग माय तेव्हा हो मातुन
महिषासुर मर्दिला तिने जी

तव देवक झाले सुख — व्हई आनंदे जी
तीन ताळ करती मुख — व्हई आनंदे जी
पुढे आगिन झाडे जळती — व्हई आनंदे जी
तुजा महिमा वर्णू मुख — व्हई आनंदे जी
डंका गे वाजे तुझ्या दरबारी
नांदसी तुळजापुरी

देऊळ गे गंगेचे कूसरी — व्हई आनंदे जी
ओवऱ्या हैत चौफेरी — व्हई आनंदे जी
दिग्माळा शोभे ग हारोहारी — व्हई आनंदे जी
चौघडा दरवाजावरी

तुझे कल्होळ तीरीथ — व्हई आनंदे जी
पौष माहीच्या महिन्यात — व्हई आनंदे जी
जन अंघुळ्या करीत — व्हई आनंदे जी
डंका गे वाजे तुझ्या दरबारी
नांदसी तुळजापुरी

## जोगवा

आंबे जोगव दे जोगव दे
माय माझ्या भवानी जोगव दे

काय करूनी परडी
जोगवा मागन बेरडी

साधू संतांचे घरी
अंबाबाई राज्य करी

जोगवा सकला तांब्याचा
जोगवा गाई-म्हशींचा

ज्याने पुरविला त्याने घ्यावा
नवस अंबेचा फेडावा

अंबे जोगव दे जोगव दे
माय माझ्या भवानीचा जोगवा

**गवळण**

गोंधळी गोंधळांत 'गवळणी' हा गीत प्रकार उपयोगात आणतात. कधी स्तवन मांडून, कधी भक्तीचे निरूपण करून, कधी रूपक म्हणून. पण विशेषेकरून मनोरंजनार्थ 'गवळण' म्हणण्याची गोंधळ्यांची पद्धत आहे. त्यांपैकीच ही एक वानगीदाखल! या गाण्यातील वेगवेगळ्या जातीपातींमधील बायकांची नावे पहा कशी खास गावरान आणि अक्कडबाज आहेत ती. गोंधळी धूर्त! या बायकात सगळ्या अठरापगड बायांची नावे आणि जाती आल्या आहेत. वगळली आहे ती फक्त गोंधळ्याची अस्तुरी. तिचे काही यशोदेच्या कान्ह्याविरुद्ध गाऱ्हाणे नाही बरे का! आणि गोकुळात सारेच गवळी असा जर समज असेल तर चूक! या गवळणीत किती किती प्रकार आहेत पहा!

यशोदेच्या बाळा संगे सारे गोपाळ बाई
मोठा आणीवार याने रस्ता जरी कोंडिला

चालल्या सुसाट संगं गोपाळांच्या पुढं
गवळणी सुसाट मग पळ त्यांनी काढिला

तेल्याची ठकी जवळ कासारीण सखी बोले
धनगराची भिकी एकोमेकोस बोलू लागल्या

सोनारीण संगी जवळ चाटयाची लिंगी
कुशा गुरवाची गंगी अशा मनामधी वचकल्या

सुतारीण मैना लोहारीण गहिना कोळघाची चांगुणा
तिनं संगतीनं बोलाविल्या
हरिपाशी जाऊ चला
मुखी डोळा पाहू त्याच्या पदी चित्त लावू
असा विचार करत्या झाल्या

ब्राह्मणाची वाराणशी हो
आली रंगारीण तुळशी
सद्गुण मूळ जैनाची काशी
वाण्याची भीमाई हौशी
गूळ खाऊन आली मऊ जशी
नाही अतार ठाऊक तिशी हो

पहा भोयाची रमी
साळ्याची उमी
माळ्याची ठमी
तिने गुर्कावले कृष्णाला
कुणब्याची देवकी
तिच्यासंगं मिकी बोले
कोष्टीन सांगे, आता उरकत नाही आम्हाला

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

१

अस्वलबाई झिपरी वरमाई
रुसली मानाला
कोला नवरा थाट करूनी
आला मांडवाला

खेकड नवरी पदर सावरी
लाजे नवऱ्याला
डुक्कर सावेळ सेसा भरूनी
बसले बाजूला

झाली जेवणाची वेळ म्हणूनी
वाघ ओरडला
सिंह पाठी तरस लांडगा
बसले जेवायला

हरीण भेकर ससा
स्वयंपाक वाढी पंगतीला
चट् जेवले वराडी सगळे न्
न्हाई सैपाक उरला

तरस बसला रुसून बाजूला
कुत्रे समजावी त्याला
सारे वराडी म्हणती घोटाळा
लांडग्याने केला

कोंबडा वाजंत्री पहाटपारी हो
बाजा सुरू केला
झाले कोल्याचे लगीन वराडी
लागले डोंगराला

२

मीठ मिरचीचे भांडान
ऐका रोज खटखटीनं जी

मिरची अंगी लईच ताठा
म्हणतीया मी हाई तिखटजी

त्या दोघांनी धरोधरीची
पुरविली हो पाठ जी

तोंडामध्ये राहिला घास
जिव्हा झालीया लंपट जी

मिरची म्हणे माझ्यावीण
न्हाई मोठं कोण जी

झाला मिठाचा जोर
मिरची झाली खोरट जी

त्या दोघांचा तंटा मिटेना
फिरा हारीकोर्ट जी

खाली पाटा न् वरती वरूटा
तवा मिटतुया तंटा जी

३

मायेचा निजरूप आईचा गोंधळ मांडीला ।।

| | |
|---|---|
| उदे उदे ग अंबाबाई | गोंधळा ये |
| मोरेश्वर गणा | गोंधळा ये |
| तेहतीस कोटी देवा | गोंधळा ये |
| पुण्याची पर्वती | गोंधळा ये |
| वाईचा गणपती | गोंधळा ये |
| कृष्णा-कोयनामाई | गोंधळा ये |
| सातारची मंगळाई | गोंधळा ये |
| रत्नागिरी ज्योतिबा | गोंधळा ये |
| कोल्हापूरची लक्ष्मी | गोंधळा ये |
| तुळजापूरची भवानी | गोंधळा ये |
| कारंडी येलूबाई | गोंधळा ये |
| म्हसवडशिद्दा | गोंधळा ये |
| शिंगणापूर महादेवा | गोंधळा ये |
| फलटनचे रामा | गोंधळा ये |
| नाशिकचे काळ्या रामा | गोंधळा ये |
| कवठ्याचे यमाई | गोंधळा ये |

वाडे-धोडयाचे बोलाई गोंधळा ये
जुन्नरची शिवाबाई गोंधळा ये
साती समोंदरा गोंधळा ये
नवलाख तारांगण गोंधळा ये
धरतरी माता गोंधळा ये
आगाशी पिता गोंधळा ये
भक्ताच्या गणा गोंधळा ये
राहिले सोहिले गोंधळा ये
आपल्या भक्ता प्रसन्न झाले

४

अवो दखनामंदी तुळजापूर हाये बालेघाट
तिथं माज्या अंबाची बैठक जी जी
अवो धया दुधाच्या नद्यांचे वाहिले पाट जी जी
बघा माज्या अंबाचा थाट जी जी
गावोगावच्या आल्या ग काठचा चांदीचे काठ
हातामंदी सोन्याचे गोट जी जी
दंडामंदी बाजूबंद गोंडे लखलखाट
मोरनीला मोती तीनशे साठ जी जी
किकापाची चोळी अंगामंदी हायतं जरी काठ
बघा माज्या देवाचा थाट जी जी
लाखू खंड्या तेल जळातं पोताची वाट
द्यावी माज्या अंबाला वाट जी जी
कल्लोळ तीर्थावरी बसिवलं सरकारी ग्याट
दिली माज्या अंबानी भेट जी जी
अंबाबाईच्या उजव्या बाजूला वारतीचा मठ
खेळती सोंगट्याचा पट जी जी

५

जाते अंबिकेला तुळजापूरला
माळपरडी आलीया माज्या नशिबाला
तुळजापुरी यात्रा भरती
पणग्या पौर्णिमेला
माही पौर्णिमेला
पायी पैसा नाही तिथं
कवड्या चुना वेचण्याला
पिवळा पितांबर अंबा नेसण्याला

पिवळा पितांबर देवी नेसण्याला
कवड्याचा शिनगार
अंबानं केला वो देवानं केला
भोप्याकडे जाऊ
समाचार घेऊ
माळपरडी आलीया माझ्या नशिबाला

६

कोंडणपूरची -हाणार अंबाबाई जी
शिवाजीला झाली परसन जी
आणली किल्ल्यावर जी
पर्वती पुण्याच्यावर जी
मला पाव नवसीला
पायऱ्या बांधिन मी हजार जी
नार गेली जेजुरीला ग
जेजुरीच्या मल्हारीला जी
नऊ बकऱ्यांची दावण देईन
गळ टोचिन कमरेला जी
नार गेली म्हस्कोबाला
या वूरच्या म्हस्कोबाला
पाच पल्ले शेंदूर द्यावा
मागनं करीन तुला जी
चिंचवडी जाईन आता मी
चिंचवडी जाईन जी
तियं देव मोरया
सव्वा खंडीचा मोदक वाहीन जी
नार गेली जोर्तिलिंगाला जी
भस्म भरतार वाचू दे गुलाल वाहीन
भक्त वाचू दे गुलाल उधळीन
तिरशूळ वाहीन तुला जी

संग्राहक : आकाशवाणी, पुणे केंद्र

## देवीचा गोंधळ

मायेचा निजरूप आईचा गोंधळ मांडिला ॥
प्रथम निरांजनी निराकार आदिशक्ति अवतार
मंडप विलासी आकाशी त्रिभुवनी प्रकाश अंबेने आकारिला

सुवासिनी गहू गऊ पाची जणी
ज्याने मन गिरासले माहेर क्रोध न मद मच्छर
गोंधळ मांडिला ॥
चौक हा भरीयेला चौकोनी नवलाख तारांगणी
घट हा उभारिला ब्रह्मरस आत्मराज कलश
घट हा उभारिला पाच ऊस पाच तत्वांचा प्रकाश
माळ ही लांबविली दिवटी चंद्र सूर्य दोन्ही उदेभानू
उदे बोला कोठोनिया शिवशक्तिपासून गोंधळ मांडिला ॥
गोंधळी नाचती धनदाट ब्रह्मा विष्णु महेश
तुझिया नामाचे आवडी देव बसले तेहतीस कोट
चौंडकं वाजत, वाजत त्रिभुवन गर्जत गोंधळ मांडिला ॥
अंबेला विनवितसे भानुदास पायी शरण सद्गुरूचे
हर हर देवीचे जीवन दाखवी चरण अंबा सत्वाचे
वेल्हाळा ना सोडी भक्तजना गोंधळ मांडिला ॥
मायेचा निजरूप आईचा गोंधळ मांडिला ॥

## कृष्णाची चेंडूफळी

म्हणे यशोदा माता ऐक यदुनाथा नको बा आता गावामधी हिंडू
गवळणी बालंट थोर तुफान तुजवरी करती कुभांडू ॥ धृ० ॥
जा खेळाया बाहेरी पवा बासरी वाजीव श्रीहरी खेळ विटीदांडू
गोपाळ घेऊनिया संगे गेले श्रीरंग खेळाया चेंडू
आले धावून गोपाळाचे भार वेढा चौफेर मधी श्रीरंग दिसेना तोंड
निम्मे गडी घेतले वाटून बोले धिटावून चला डाव मांडू
डाव मांडीला यमुनेच्या कडेला . . .
सारे गोपाळ एका फळीला
साऱ्या आधी कृष्ण खेळ खेळला . . .
बलीभद्र त्यामधी मिळाला
चेंडू झुगारीला सूर्याच्या तळीला . . .
धागऱ्या सहीत धळगळला
चेंडू आडकला कळंबाच्या डहाळीला . . .
वाकडा आला वर्दळीला
वाकडा म्हणे देवा चेंडू अडकला कळंबाच्या डहाळीला
आधी काढून द्यावा मग जावे तुम्ही धराला ॥ १ ॥

देव चढले कळंबावर चेंडू पाही म्होरं घातीला हात
कडकडून कळंबाची डहाळी मोडून पडली कालिया डोहात
कडकडले आकाशभार चेंडूसहीत गेले यदुनाथ बुडाले पाण्यात
गोकुळी झाली आरोळी गेले यदुनाथ

येती धावून गोपाळ गडी मारिती बुडी पहाती तळ धरून लागेना अंत
हे दमले बुडया मारमोरून हरी आम्हा नाही कोठे गवसत
गोपाळ रडे धाई धाई हरी चुकला गवसत नाही
घरी पुसेल हरीची आई तिला सांगावे तरी काही
आली धावून गोधन गाई हंबरती श्रीहरी पायी
कसे केलेस यमुनाबाई हरी कुठे नाही कोणी तरी पाहिला
माझ्या हरणीच्या पाडसा गेलास कसा सोडून आईला ॥ २ ॥

कसी मोवली चेंडूफळी मूर्त सावळी कळंबाडोही हरी गप झाला
कालिया डोहात कालीया भुजंग गेले श्रीरंग तयाच्या महाला
दोघी नागिणी पद्मिणी उभ्या होत्या द्वारी चेंडू श्रीहरी मागतो तिजला
जळो जळो बा चेंडूफळी ऐक धननीळा भुजंग आहे काळा खाईल तुजला
तो भुजंग पाहून फुत्कारी पवा बासरी लंपट केला
नाकामध्ये वेसन टोचून आसन धालून स्वार वर झाला
त्या मुरलीच्या नादे भुजंग झाला सावध
वर बसुन आले गोविंद गोकुळी झाला आनंद
कृष्ण कृष्ण म्हणती लहानथोर उचलून घेती कडेवर
गुलाल गोटयाचा मार नंदाच्या वाडया म्होरं
सोपान काका साधू आहे थोर पंढरपूर दिसे गुलजार ॥ ३ ॥

## देवीचे पद

अंबा आली पाहुणी नयनी ज्योत लावूनी
शाशूर महंकाशूर वधूनी माहूरगडची राणी तुळजापूरची भवानी
अर्धलोचनी विशाल माळा केवळ करुणाकार अंबा आली
धवधवीत धटमाळा अंबेची पूजा आरास केली पूजा आरास केली
अबीर गुलाल चुवा चंदन प्रेमे शिंपारीला आली
संबळ चोंडके टाळ मृदुंग ही नाना ध्वनी वाजे नाना ध्वनी वाजे
मनी एक भाव धरून गावे सकलीक उदो बोला अंबा

संग्राहक : श्री. गो. ल. जमदाडे

१

गुंधुळ मांडीला गोंधळा यावं
अंबाबाईच्या नावानं गुंधुळ मांडला
कारणाकारणं गुंधुळ मांडला
गुंधुळ मांडला गोंधळा यावं
डोंगराईच्या नावानं गुंधुळ मांडला
कुलस्वामीच्या नावानं गुंधुळ मांडला

यमाईच्या नावानं गुंधुळ मांडला
गुंधुळ मांडला गोंधळा यावं
देवाकारणं गुंधुळ मांडला
भक्ताकारणं गुंधुळ मांडला
काकड्या येळं गुंधुळ मांडला
काकड आरतीला भगतांनी यावं
पूजाकारणं गुंधुळ मांडला
चुळी-पातळ लिंबू-नारळ, गुंधुळ मांडला
देवीच्या पूजेला भगत पावला
भगताकारणं गुंधुळ मांडला
देवीकारणं भगत उभा
गुंधुळ मांडला गोंधळा यावं
भगताकारणं गुंधुळ मांडला
चुड्या-जुड्यानं राज करावं
तुमाकारणं गुंधुळ मांडला
गुंधुळ मांडला गोंधळा यावं
गुंधुळ मांडला गोंधळा शोभा
कुळस्वामी देव, काकड आरतीला रहावं उभा
गुंधुळ मांडला गोंधळा यावं
काकड आरतीला रहावं उभं दारी
गुंधुळाच्या येळी देव आला घरी
गुंधुळ मांडला, गुंधुळ मांडला, गोंधळा यावं

## २

रत्नागिरीच्या जोतीबा गोंधळाशी या हो
तुळजापुरची अंबाबाई गोंधळाशी या हो
पंढरपुरचे विठोबा गोंधळाशी या हो
पुण्याचे पर्वती गोंधळाशी या हो
बनपूरीचे नाईकबा गोंधळाशी या हो
गिर[illegible] जोतीबा गोंधळाशी या हो
पान्याचे दरगेश्वरा गोंधळाशी या हो
येळवणचे जुगाई गोंधळाशी या हो
कोल्हापूरचे लक्ष्मी गोंधळाशी या हो
काळभैरवी नाथ गोंधळाशी या हो
स्थळ पांढरी गोंधळाशी या हो

संग्राहक : श्री. क. भ. प्रयाग

## १

ये तुळजापुरची तुकाई
सातारगडची मंगळाई
पुण्याची पर्वतीबाई
तुझा गोंधळ मांडिला माई
पंढरपूरची विठाई
राखेलची यमाई
पाटोदची तुकाई
तुझा गोंधळ मांडिला बाई
तेहतीस कोटी देवा गोंधळासी यावे
दिवट्या पाजळून अंबेसी नमावे

## २

प्रथम दिवटचा कवन
दिवटचा गणराज रंगणी
भरवी कासव कासोनी
टाळ मृदंग लावुनी
सूर संभळ घेऊनी
टिळा रेखिला लल्लाटी
केशर कस्तुरी लल्लाटी
अंगी चंदनाची उटी
आले गोंधळाकारणं ॥ १ ॥

दुसऱ्या दिवट्या कवन
दिवट्या सूर्य नारायण
सोळा कळीचे तपन
व्याघ्रांबर पांघरून
सूर्व्या व्हावे सावधान
त्याचे करावे स्मरण
आले देव नारायण
आईच्या गोंधळाकारणं ॥ २ ॥

तिसऱ्या दिवटचा कवन
पहा कोटीयाचा मेळा
संगं आग्या वेताळ
संगं देव कानडा मल्हारी
हाती भंडाराची वाटी
उदो उदो शब्द गाती
आले गोंधळाकारणं ॥ ३ ॥

चौथ्या दिवट्या कवन
आईचा पुत्र परशुराम
परशुराम धनुष्यवीर
त्यानं मारीले सहस्र वीर
चौंडका केला पुतळ्याचा
हाती पोत व परडी
जोगवा मागत बेरडी
नवस गोंधळ घालिती
आले गोंधळाकारणं ॥ ४ ॥

पाचव्या दिवट्या कवन
पांडवकुळीचे अर्जुन
त्याचे धनुष्यबाण संधान
पाची पांडवांचा मेळ
संगं द्रौपदी घेऊन
आले गोंधळाकारणं ॥ ५ ॥

३

झाले काशीचे कापडी
आईच्या माहूरगडा जाऊनी
नवस गोंधळ घालिती
बघे कल्होळाच पाणी
नामदेव गातो संतुसभे येऊनी
पाची देव गाईले
आईच्या दिवट्या पूर्ण झाले
येऊनी रंगणी बैसले
देवे बस्कार दिधले
चौक्या चंदनाचे पाट
नानापरी विडे केले
आरती केली देवाची
आरती करून पंचारती
उधळत या पाची ज्योती
म्हणे सारे गाव
आईचे माहुरगडी राहिणं ठावठिकाणं

## उदो बोला

उदो बोला उदो बोला तुकाईचा उदो बोला
मीपणाचा त्याग करूनी अहंकारा त्यजी सकल

विनत भावे सदा भज तू, रामवरदी तुकाई
चंडमुंडा वधुनी जिने, अखिल आर्या सुखी केले
संकटांना सकळ हरूनी, आम्हा दिधले स्वराज्याली
तमा हरूनि मनामधल्या, पोत आम्ही पाजळीला
कुबुद्धिचा नाश झाला, उदो बोला उदो बोला

## जोगवा

आदिशक्तिचे कौतुक मोठे भुत्या मज केले ॥ धृ० ॥
पंचभुतांचा देह पोत हा त्रिगुण गुणे वळिला
चैतन्याची ज्योत लावुनी प्रज्वलित केला
चित्तस्नेही प्राणवायुने त्याला स्थिर केला ॥ आदि० ॥ १ ॥

उदर परडी ही हाती घेऊनी ब्रह्मांडी फिरवी
लक्ष चौऱ्यांशी घरची भिक्षा मागविली बरवी
ज्या ज्या घरी भिक्षा केली ते ते घर रुचले ॥ आदि० ॥ २ ॥

सकाम कर्मे कवड्या यांची माला मम कंठी
कर्मफलांची कुंकुम मळवट माझ्या ललाटी
पीडा बाधा शकून सांगुनी लोका भुलविले ॥ आदि० ॥ ३ ॥

आदिशक्ती असा मी भुत्या नाम वासुदेव
मागुनी जोगवा सद्‌गुरुचरणी धरिला दृढभाव
आदिशक्ति ही मजला वळली भुतेपण नेले ॥ आदि० ॥ ४ ॥

## उपासनेची प्रार्थना

उदक सेवी तुळजाणी अष्टभुजा त्रिभुवनी
सर्वा जीवनकळा विद्या साधी सर्वा अर्थी जीवनी

अंतःकरण गंगाजळ झारी भरोनी शीतळ
भावार्थ सुगंधमाळी सुगंधाच्या तुळशीमाळा

सद्‌गुरु आणि नारायणा पूर्ण ब्रह्म तू रुक्मिणी
आदिशक्ती अवताराची सरस्वती रुळे चरणी

## विडा

विडा घ्या हो अंबाबाई आम्हा अनाथाचे आई
लीन भक्त इच्छितीती शेषप्रसाद देई

वासना त्या ठेवी पूजियले पूजा फळ
भावार्थ कापूर लावियेला प्रेमळ

शांती नागली, पान आणले थाळी
अहंकार जाळुनिया चुना लाविला भाळी
दयाशांती विडा लवंगी आणि येल्या निर्मळ
बोध आत्मसुखाचा हेची आणावा निर्मळ
विडा करी सुरंग मातोश्री अंबाबाई ॥

संग्रोहक : श्री. मा. स. मराठे

## टेंबलाईची यात्रा

वर्षाचा आश्विन मास आनंद उल्हास नऊरातन
आठराई पगडच्या नारी टेंबलाईला जाती मिळून
आली कुलकर्ण्याची येसा भटाची कुसा जाती देवीस
आली ब्राह्मणाची पार्वती नवरातन हुती टेंबलाईस
आली पाटलाची मईना त्याली धयीना करून सायास
आली मगदुमाची जिऊ चौगुलीन आऊ बोलवा तीस
आली गुजराची महाघटा पदर उपराटा बोलणे कैसे
आली तांबूळयाची साळी पानं कोवळी देती जायास
आली सत्यव्वा जैनाची लक्षुमी वाण्याची दुकानी बैसे
आली मेयेकऱ्याची सिवा विकती ती मेवा अवघ्या यात्रेस
बोले मणेराची सकिना चुडवाल्याची ग मैना
भरीन गदा सुभावना लेती व्हान बराऱ्याची जमुना
आली लिंगी धोताऱ्याची माळ जोडव्यांची हिंडती नौकेन
आली कलालाची सिती चिमणी हाती विकी पैशानं





# रेणुका

**सती भगवती**

डोईवर सुवर्णाचा मुकुट, कपाळावर कुंकवाची चिरी, भाळी मळवट न् कस्तुरी टिळा, लांब सडक नाक, भांगात बिंदी, पाठीवर पाचपेडी वेणी, हातांत कनकाची काकणं, दंडावर बाजूबंद, कानांत मुद्या, अंगावर पीतांबर अशा झोकनोकातील मातापूरची रेणुका म्हणजेच सौंदत्तीची देवी यल्लमा. परशुरामाची आई. जमदग्नी ऋषींची पत्नी. नवऱ्याच्या रागासाठी पुत्राकडून शिरच्छेद करून घेतलेली भगवती. 'माझा मुलगा एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करील' या आत्मविश्वासानं लेकाचं कवतिक करणारी वीरमाता.

सती रेणुकेची मूळ मूर्ती म्हणजे तांदळास्वरूप. पण तिच्या भक्तांनी तिला नाक, कान, डोळे, तोंड या अवयवांची देणगी दिली. मातापूरच्या तिच्या ध्यानातील तिच्या ओठांची लांबी रुंदी एवढी आहे की, महानैवेद्याच्या वेळी एक सहस्र पानांचा तांबूल कुटून तिच्या मुखी भरविला जातो !

सौंदत्तीचं देवीचं ध्यान हे फार कडक आणि जागृत मानलं जातं, सुवर्णाचे अलंकार आणि कांचन मुकुट लेतेल्या या देवीला बोललेला नवस फेडताना दूरदूरच्या अंतरावरून येणारी भक्तमंडळी देवीची सुवर्णाची बाळमूर्ती असलेले चांदीचे पाळणे वहातात. मंदिराभोवती दिवे पाजळतात. अंगावर चंदनाचा लेप लावून व कडुनिंब नेसून देवीला प्रदक्षिणा घालतात. लोखंडी हुकावर टांगून घेऊन 'बगड' करतात. त्यावेळी होणाऱ्या जखमांवर भंडाऱ्याचा इलाज होतो. कडुनिंबाच्या रसाचा उपाय होतो. कडकलक्ष्मीचं सोंग घेऊन या देवीचे भक्त देवीचा चुणीदार साडीतील मुखवटा घेऊन गावोगाव, घरोघर फिरतात.

जोगती हे या देवी रेणुकेचे, देवी यल्लमाचे भक्त. जोगती म्हणजे संन्यासी. स्त्रीवेषधारी पुरुष. देवीला वाहिलेली मुलं. जोगतिणी या देवीला वाहिलेल्या

मुली. त्यांचेपैकी एकीच्या डोईवर हिरव्या चुणीदार घोळानं माखलेली भली दांडगी बुटी असते. या बुटीत यल्लमाची मूर्त नांदते. चौंडकं आणि सुती ही वाद्यं हिचा जयघोष मांडीत या भक्तांना घरोघरी नेतात. त्यांचं नाचणंगाणं पहाण्याजोगं, ऐकण्याजोगं असतं.

ज्या घरी भिक्षापात्र घेऊन जायचं त्या घरच्या लोकांना भंडारा लावीत हे जोगती नाचगाणं करतात आणि आशीर्वाद देतात.

'आई जगदंबा तुळजापूरचे आई, रामकडचाचे आई, चतुर्शिंगीचे आई, इडा, पिडा, खरूज, नायटा, फोडी फुनसी, रायरोग दूर कर. खडचा घोडचावानी धुतल्या मोत्यावानी कर. जगदंबा आमाला दे तांब्याचे. भक्ताला दे चांदी-सोन्याचे. भक्ताची इच्छा पूर्ण कर बये. घर गोकुलागत नांदू दे.'

त्यामुळं भिक्षा देणाऱ्या घरच्या मालकिणी खुषीनं दान करतात. हौसेनं सारं घर मातापुरीला, सौंदत्तीला जत्रेला जातं. ही यात्रा रांडव पुनवेला (मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेला) भरते. हजारोंनी तिथं भक्तांच्या पाऊलवाटा फुलतात.

वऱ्हाडातल्या मातापुरी पर्वतराजी कदंबवृक्षांनी झाकलेल्या आहेत. त्यामुळे या क्षेत्राची अपूर्वाई दांडगी. इथं दत्तात्रेयांचाही निवास. असं सांगतात की, दत्तात्रेयांची भिक्षा कोल्हापुरी होते, जेवण पांचालेश्वरी घडतं, हातपाय तुळजा-पुरी धुतले जातात, विश्रांती शेषाचलावर होते आणि रात्रीची शय्या या मातापुरी असते. त्यामुळं या क्षेत्राचं पावित्र्य आणखी वाडीदिडीनं वाढतं.



# अनुक्रम



# जगन्माता रेणुका

लेखक : डॉ. सरोजिनी बाबर

प्राणहिता नावाने पुराणात ग्रथित झालेल्या आणि पैनगंगा या नावाने बुलढाणा व यवतमाळ जिल्ह्यांतून वहातेल्या नदीचे ऐलतीर पैलतीर ओलांडून पुढे तीन मैल गेले की, माहूरगाव येथे देवीच्या उपासनेतील मूळ पीठ म्हणून ओळखिल्या



श्रीरेणुका, माहूर

जाणाऱ्या महादेवी रेणुकेचे हे निवासस्थान. मराठवाडा, विदर्भ आणि आंध्र प्रदेशाची ही सरहद्द मातापूर (माहूर) म्हणून जनलोकात या ठिकाणाचा लौकिक. पूर्वीच्या हैद्राबाद संस्थानातील आदिलाबाद जिल्ह्यातील हे गाव. सध्याच्या नांदेड जिल्ह्याच्या किनवट तालुक्यातील हे एक ठिकाण. येथे नांदतेल्या देवी रेणुकेला भेटावयाला जावयाचे म्हणजे हजारबाराशे पायऱ्यांची मोठी चढण पायाखाली घालीत पुढे पुढे व्हावयाचे. हिंदूंच्या गाजलेल्या या तीर्थक्षेत्रावर, शक्तिपीठावर, जाते वेळी भक्तांच्या मुखी नांदतो तो 'वंदिली वंदिली निजसत्ता भवानी, मातापुरवासिनी अंबिका' हा महामंत्र.

देवी रेणुकेचे मंदिर या मातापूर गावाच्या डोंगर शिखरावर आहे. देवीच्या गाभाऱ्याचा दरवाजा चांदीच्या पत्र्याने मढविलेला असून गाभाऱ्यामध्ये मूर्तीच्या ऐवजी तांदळा आहे. याच तांदळयाला शिरोभागी चांदीचा टोप चढविण्यात आलेला असून बैठकीवर देवीचे सिंहवाहन खोदलेले आहे.

देवीच्या दर्शनासाठी येणारी भक्तमंडळी येथे जनविडा, खडीसाखर व मिठाई अर्पण करतात. प्रसाद म्हणून कुटलेला विडा व ही मिठाई देण्यात येते.

रेणुकामातेच्या मंदिराचा हा परिसर घनदाट अरण्याने व दऱ्याखोऱ्यांनी गजबजलेला असून या परिसरात महालक्ष्मी, तुळजा भवानी, परशुराम, दत्तात्रेय आदी अनेक दैवतांचेही वास्तव्य आहे. पायथ्याशी डाव्या अंगाला संत विष्णुदासांचा मठ असून जवळच 'मोवाळे' किंवा 'मावळा' हा तलावही आहे. या स्थानास मातृतीर्थ या नावाने ओळखिले जाते. महानुभावांच्या स्थानपोथीमध्ये या तीर्थाचा उल्लेख 'मेरूवाळा' या नावाने आलेला असून हे तीर्थकुंड प्रचंड तळघासारखे दिसून येते. आठ फूट उंचीच्या भक्कम भिंतींनी या तलावाच्या तिन्ही बाजू बंदिस्त करण्यात आलेल्या असून एका बाजूने पाण्यात उतरण्यासाठी घाट बांधण्यात आलेला आहे. तसेच स्नानासाठी म्हणून येथे सहा फूट रुंदीची फरसबंदी बांधण्यात आलेली असून या तलावातील पाणी हे गंगेच्या पाण्याइतके पवित्र मानण्यात येते. या तलावाच्या परिसरातच रेणुकेची दहनभूमी असून ती मूलझरी या नावाने परिचित झाली आहे.

देवीच्या डोंगराच्या मध्यभागी असलेल्या अर्धचंद्राकृती वाटेने तीन-एक मैल अंतर तोडल्यानंतर एक पर्वतशिखरावर दत्त मंदिर लागते. या दैवतासंबंधीचा उल्लेख श्रीधरस्वामींच्या 'रामविजया'त पुढीलप्रमाणे शब्दांकित झालेला आहे:

**व्यासीं प्रयागीं प्रातःस्नान । पांचाळेश्वरीं अनुष्ठान ।**
**करवीरपुरांत येऊन । भिक्षाटण माध्यान्हीं ।।**

**अस्ता जाता वासरमणी । सह्याद्रीस जाती परतोनी ।**
**तो देवांचे भार कर जोडोनी । वाट पाहती अगोदर ।।**

हे देवस्थान शंकराचार्यांच्या परंपरेतील असून भारती गोसाव्यांच्या ताब्यात आहे. येथील महंतांच्या मार्गदर्शनाखाली दत्तजयंतीचा सोहळा थाटाने पार पडतो.

उंच उंच पर्वतराजी आणि घनदाट वनराई यामुळे एकांतवासास रमणीय ठरलेल्या या तपोभूमीत दत्तोपासक दासोपंतांनी आपल्या तपाच्या बळावर ज्यांचे साक्षात दर्शन घेतले त्या दत्तात्रेयाबद्दलची आपली भक्ती व्यक्त करताना मोठ्या जिव्हाळ्याचे बोलणे केलेले आहे—

**सिद्धराजा अमृतजळधरा । धर्म न कळे मातें दुसरा ।**
**येईन तुज संगें, तूं पुढे । मी मागे, हेची पुरें ॥**

महानुभावांनी परमेश्वराचे जे पाच अवतार मानले त्यांमध्ये दत्तात्रेय यांचाही समावेश केलेला आहे. त्यामुळे स्वाभाविकच महानुभावांनी माहूर गावास तीर्थक्षेत्र मानले आणि त्यांच्या संप्रदायाची मूळ बैठक या नात्याने दत्तभक्तीचा महिमा विशेष गायिला. त्या संदर्भात आपले भाष्य करताना कवि भास्कर याने जे मंगलाचरण आपल्या ग्रंथात समाविष्ट केले त्याचा इथे आवर्जून उल्लेख करावासा वाटतो—

**सैह्याचळाचिये चुळुकें । जयाचें प्रभामंडळ फाकें ।**
**तो श्रीदत्तु ललाट-फलकें । नमस्कारीतु असें ॥**

माहूर या तीर्थक्षेत्रावर तेथील उपाध्यायांची व भगत भोप्यांची वस्ती असून यात्रेकरूंना पूजेच्या वेळी त्यांचा विशेष उपयोग होतो असे सांगतात.

देवी रेणुका ही देवी पार्वतीचाच एक अवतार मानला जात असल्याने सती रेणुकेचे चारित्र्यसंपन्न जीवन घरोघरी वाखाणले जाते. शंकराचा अवतार धारण केलेल्या जमदग्नी ऋषींची रेणुका ही पत्नी. दशावतारातील सहावा अवतार जो परशुराम तो ह्या दंपतीचा सर्वांत धाकटा मुलगा. जमदग्नी ऋषी हे कडक व्रत पाळणारे होते. त्यामुळे पहाटे नदीवर जाऊन ते स्नान करून येईपावेतो रेणुकाही नदीवर स्नान करून व तेथेच तयार केलेला मातीचा घडा पाण्याने भरून घेऊन माघारी येत असे. पूजेचे साहित्य तयार ठेवीत असे.

परंतु एकदा काय झाले की, रेणुका स्नानाला गेली असता तिने माशांचे एक जोडपे रतिसुखात मग्न असलेले पाहिले. क्षणमात्र तीही अस्वस्थ झाली. तिच्या ठायीच्या स्त्रीसुलभ भावना जागृत झाल्या. त्याच अवस्थेत मातीचा घडा करण्याचे काम ती करू लागली. पण तिचे लक्ष लागेना. घडा कच्चा राहिला. त्यातून पाणी झिरपू लागले. तशीच ती घरी गेली. जमदग्नी ऋषींना तिचे हे ध्यान बघून मनस्वी संताप आला. 'पापिणी तू हे काय केलेस? आत्ताच्या आत्ता तुझा शिरच्छेद करवितो' पतीचे हे शब्द ऐकून रेणुका घाबरून गेली.

जमदग्नींनी आपल्या मुलांना आईचा शिरच्छेद करण्याची आज्ञा केली. पण या कामाला पहिल्या तिघांनी नकार दिला. शेवटी परशुरामाने संमती दिली. मात्र रागाच्या भरात आपल्या सर्व भावंडांना भस्मसात केलेल्या पित्याजवळ त्याने वर मागितला. 'मी मागेन ते द्यायला पाहिजे.' जमदग्नी महर्षींनी परशुरामाला होकार दिला. त्यासरशी परशुरामाने आपल्या परशूने आईचे शिर क्षणार्धात धडावेगळे केले. रेणुकेचे शिर तात्काळ कैलासावरील शंकराच्या गळ्यातील नररुंडमाळेत जाऊन बसले.

घटकाभर मग असा तसाच गेला. परशुरामाने वडिलांजवळ मागणी केली, 'मला माझी आई द्या.' जमदग्नींना मुलाचे हे मागणे विचित्र वाटले पण त्यांनी दिलेले वचन पाळले. तेथून नदीवर जाणाऱ्या एका अंत्यजाच्या बाईच्या अंगावर आपल्या कमंडलुतील पाणी शिंपडून तिचे धडावेगळे होणारे शिर त्यांनी रेणुकेच्या धडाला जोडले. रेणुका जिवंत झाली. पण तिला पहाताच जमदग्नी महर्षींचा पारा पुन्हा चढला, 'मला तुझे तोंडही पहायचे नाही. कुठेही चालती हो.' पण रेणुकेने शांतता धारण करीत उःशाप मागितला. मग जमदग्नी तपश्चर्येला निघून जात म्हणाले, 'जाशील तिथं तुझा उदो उदो होईल.' त्यांनी त्या अंत्यजाच्या बाईलाही सांगितले. 'हिच्याबरोबर तुझीही पूजा होईल.'

त्यानंतर रेणुका या स्त्रीला—मातंगीला—व परशुरामाला सोडून दक्षिणेला आली. कर्नाटकातील लोकांनी सौंदत्ती गावी तिची यल्लम्मा म्हणून स्थापना केली. यल्लमा म्हणजे 'आई तू इकडे कोठे निघालीस ?' यल्ल म्हणजे कोणीकडे. अम्मा म्हणजे आई.

देवी यल्लमाची दरसाल पौष ते फाल्गुन या तीन महिन्यांच्या कालावधीत रोज लाखांनी सौंदत्तीला यात्रा भरते. अखिल भारतामधून या यात्रेसाठी व देवदर्शनासाठी येथे लोक येत असतात. यल्लम्मा देवीचे सौंदत्ती हे एक मोठे तीर्थक्षेत्र आहे.

या यल्लम्मा देवीचे भक्त देवीची मूर्ती असलेला जग डोईवर घेऊन सुर्त चवंडक्याच्या साथीवर गाणी म्हणत गावोगाव फिरत असतात. या भक्तांना जोगती व जोगतिणी म्हणतात. या देवीला पौरुषहीन भक्ताचीच सेवा हवी असते म्हणून या भक्तांना देवीच्या ठाणकावर जाऊन अविवाहित रहाण्याची दीक्षा घ्यावी लागते. या भक्तांच्या गळ्यात दीक्षाविधीनंतर मोत्यांची माळ येते. हे भक्त यल्लम्माच्या जोडीनेच मातंगीची व परशुरामाचीही पूजाअर्चा करीत असतात.





# माहूरगडवासिनी श्रीरेणुका

लेखक : डॉ. प्र. न. जोशी

### देवीची सार्वत्रिक उपासना

महाराष्ट्रात शक्तीची उपासना फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. तुळजापूरची भवानीमाता, कोल्हापूरची अंबाबाई, औंधची यमाई, चंद्रपूरची महाकाली, नाशिकजवळची सप्तशृंगी, मातापूर अथवा माहूर येथील रेणुकादेवी, मुंबईची महालक्ष्मी अशा थोर देवीस्थानांपासून गावोगावी संरक्षक म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या तुकाई, जोखाई, मरीआई, कनकाई, जनाई इत्यादी असंख्य ग्रामदेवतांपर्यंत देवीच्या अथवा शक्तीच्या उपासनेचा प्रवाह अखंडपणे चालू असलेला दिसतो. अनेक ठिकाणी नवरात्रात उत्सव साजरे होतात, सप्तशतीचे पाठ होतात. यात्राजत्रांचे स्वरूप वाढत्या प्रमाणावर असते. मंगळवार आणि शुक्रवार या दिवशी दर आठवड्यास देवीची आरती होते. अष्टके म्हटली जातात. स्तोत्रे आणि माहात्म्ये यांचे वाचन होते. अनेक मराठी कुटुंबांची कुलदेवता एखादी देवी असून तिच्या संदर्भातील सर्व कुळाचार नित्य नैमित्तिक असे आजही पाळले जातात. आजही विवाहपत्रिकेवर कुलदेवतेचे प्रसन्न चित्र असते आणि विशेष प्रसंगी तिचे स्मरण केले जाते. लग्न झालेले नवीन दांपत्य 'ओहर' म्हणून कुलदेवतेच्या दर्शनास आजही जाताना दिसते.

### माहूरगडाचा परिसर

घरोघरी जागृत स्वरूपात राहून कुळाला आणि कुटुंबाला स्वास्थ्य व संरक्षण देणाऱ्या या देवतांपैकी माहूर क्षेत्रामधील श्रीरेणुकेची ओळख आपणांस करून घ्यावयाची आहे. नांदेड जिल्ह्याच्या किनवट तालुक्यातील सिंहाद्री पर्वतावर श्रीरेणुकेचे जागृत स्थान आहे. माहूर तथा मातापूर हे क्षेत्र उत्तुंग पर्वतश्रेणींनी वेढलेले असून घनदाट जंगलांनी तेथील सृष्टिसौंदर्य बहरलेले असते. तीनही



माहूर संस्थानची
श्रीरेणुकादेवी

बाजूंनी पैनगंगा नदीचा वेढा असल्याने पहाडावरून भोवतीचे दृश्य अतिशय रमणीय असे दिसते. धनोडचापाशी आता पैनगंगेवर चांगला पूल झाला आहे. हा पूल ओलांडून गेले की, थोडा घाट चढल्यावर सपाटीवर मातापूर अथवा माहूर क्षेत्र लागते. गावाला लागूनच मैल, अर्धा मैल अंतरावर खऱ्या पहाडास सुरुवात होते. माहूरपासून मैल दीड मैल अंतरावर मातृतीर्थ या नावाचे एक रम्य तळे आहे. या तलावापासून देवीच्या शिखराकडे चढण्यासाठी दगडी पायऱ्या आहेत. आजकाल देवीच्या स्थानापर्यंत चांगला गाडीरस्ता झाल्यामुळे या दगडी पायऱ्या चढून जाण्याचे लोक टाळतात. पहाड चढून गेल्यावर रेणुकामातेचे शिखर लागते. येथे मात्र तीस-चाळीस पायऱ्या चढून जावे लागते. रेणुकेचे मंदिर जुन्या पद्धतीचे असून लहान आहे. आत रेणुकामातेची पूर्वाभिमुखी अशी भव्य आणि प्रसन्न मूर्ती गळ्यापर्यंत आहे.

### देवदेवतांचा गजबजाट

रेणुकेच्या मंदिरापासून पूर्वेकडे पाहिल्यास दूरवर आणखी दोन पर्वतशिखरे दिसतात. तीन चार मैलांचा रस्ता चालून झाल्यावर श्रीदत्तात्रेयांचे स्थान येते. येथे दत्तांच्या पादुका व शिवलिंग आहे. या दत्त मंदिराच्या पलीकडे आणखी मैल दीड मैल गेले की, अनसूयेचे शिखर लागते. रेणुकामातेच्या मंदिराच्या डाव्या अंगास ऐतिहासिक काळातील किल्ला आहे. यातील ब्रह्मतीर्थास विझाळे असे नाव असून येथेच महाकालिकेची मूर्ती आहे. यमाजी ठाकूर याने हा किल्ला बांधला असून त्यास रामगड असेही नाव आहे. या यमाजी ठाकुराची पुण्यतिथी दरवर्षी आषाढ शुद्ध पंचमीस साजरी करतात. या दिवसाला येथे यमठाकरी अथवा जमठाकरी असे नाव असून या दिवशी पुरणावरणाचा नैवेद्य आजही केला जातो. माहूरगावाला लागूनच पहाडाच्या उतरणीवर देवल ऋषींनी जेथे तपश्चर्या केली तो आश्रम लागतो. येथील देवदेवेश्वर लिंगाचे उपासक महानुभाव पंथीयांच्या ताब्यात आहे. श्रीरेणुका, श्रीदत्तात्रेय व श्रीदेवदेवेश्वर या तीन प्रमुख दैवतांमुळे माहूर क्षेत्राचा महिमा वाढलेला आहे. याखेरीज झंपटनाथ हा कोल्हापूरच्या कालीचा पुत्र श्रीगजानन, पांडवतीर्थ, कैलास टेकडी, औदुंबरझरा, अमृतकुंड, आत्मबोधतीर्थ, सर्वतीर्थ, काजळतीर्थ, मूलझरी, मातृतीर्थ, रामतीर्थ, ऋणमोचन-तीर्थ, श्रीविष्णुकवींचा मठ अशा अनेक पवित्र स्थानांनी माहूर क्षेत्र गजबजून गेले आहे.

### 'जवा आगळी काशी'

स्कंद पुराणातील सह्याद्रिखंड आणि कालिकाखंड या दोन विभागांतून रेणुका-माहात्म्य व माहूरग्राम महिमा यांची माहिती आलेली आहे. भगवान श्रीविष्णूच्या आज्ञेवरून ब्रह्मदेव सृष्टीची रचना करण्यासाठी प्रवृत्त झाला. त्याला मार्गदर्शन व्हावे म्हणून विष्णूने एक आदर्श स्थान अगोदर निर्माण केले ते माहूर क्षेत्र. यावरून ब्रह्मदेवाने सृष्टीची रचना केली असा पौराणिक कथेचा भावार्थ. हे क्षेत्र सात कोस लांब रुंद असून याला चार दरवाजे असल्याचे सांगतात. पूर्वे-कडील हाटकेश्वर येथे वंजारा नदीवर धबधबा आहे. शेख फरीद या नावानेही या स्थानास ओळखतात. दक्षिणेस पैनगंगा नदीच्या काठी फुलसावंगी येथे विमलेश्वराचे स्थान आहे. पश्चिमेस दुझनी गावाजवळ दर्देश्वराचे स्थान असून उत्तरेस सिद्धेश्वर आणि कापेश्वर याचे स्थान आहे. माहूरगडास तीनही बाजूंनी पैनगंगा नदीचा वेढा आहे. लोणार येथे श्रीविष्णूने लवणासुरास मारल्याची कथा आहे. ब्रह्मदेवाने श्रीविष्णूची पूजा करताना त्याचे पाय धुतले. त्याच्या चरणतीर्थाचा प्रवाह वाहू लागला. तीच पैनगंगा नदी झाली. या माहूर क्षेत्रास

आमलीग्राम, सिद्धपूर, देवनगर, मातापूर अशी अनेक नावे असून माता रेणुकेच्या वास्तव्यामुळे याचे मातापूर नाव प्रसिद्ध झाले आणि मातापुरावरून माहोर अथवा माहूर रूढ झाले. या क्षेत्राचे माहात्म्य 'काशी क्षेत्रात यवाधिकम्' म्हणजे 'जवा आगळी काशी' असे असल्यामुळे येथे ठिकठिकाणांहून यात्रेकरू सतत येत असतात.

### जमदग्नी व रेणुका

माहूरगडावर रेणुकेचे स्थान कसे स्थिरावले यासंबंधी पुराणातून विविध प्रकारची माहिती मिळते. भृगू वंशातील एक तपस्वी ऋषी ऋचीक या नावाचे होते. त्यांनी गाधीराजाच्या सत्यवती कन्येची मागणी पत्नी म्हणून केली. गाधीने शुल्क म्हणून एक हजार श्यामकर्णी अश्वांची मागणी केली. वरुणाजवळून ऋचीक ऋषींनी असे एक हजार अश्व मिळविले व ते गाधीस अर्पण करून सत्यवतीशी लग्न केले. या सत्यवतीचा पुत्र जमदग्नी. आणि या जमदग्नीची पत्नी रेणुका होय. उत्तरेस भागीरथी नदीच्या तीरावर सूर्यवंशीय रेणू राजा प्रजापालनात दक्ष असा होता. पण पोटी संतती नसल्यामुळे तो उदास असे. त्याने कन्याकामेष्टी यज्ञ केल्यावर त्याला यज्ञकुंडातून एक कन्या प्राप्त झाली. रेणू राजाची कन्या रेणुका ती हीच होय. ही रेणुका शक्ती पार्वतीचा अवतार असून लावण्यरूपवती व गुणवती होती. स्वयंवराच्या वेळी रेणुकेने ऋचीकपुत्र जमदग्नीस वरिले. या दोघांचे लग्न थाटाने झाले. रुमण्वान, सुषेण, वसुमान, विश्वावसू व परशुराम असे पाच पुत्र रेणुकेस झाले.

### रेणू राजाने केलेली उपासना

रेणुका माहात्म्यात रेणुकेची चरित्रकथा काहीशी वेगळी आहे. भारतीय युद्धात अपरिमित असा गोत्रवध झाल्याने पाप नाहीसे व्हावे म्हणून धर्मराज तीर्थस्थानांची यात्रा करता करता काश्मीर देशात गेला. तेथील कुलिशा नदीचे लाल पाणी पाहून धर्मराजास अतिशय आश्चर्य वाटले. मार्कंडेय ऋषींनी त्याला यावेळी काही कथाभाग सांगितला. काशीराजाचा पुत्र रेणू राजा हा फार उदार, दयाळू व न्यायप्रेमी होता. महेंद्रराजाची कन्या भोगवंती ही त्याची पत्नी. पोटी संतान नसल्यामुळे राजा व राणी दोघेही उदास होते. गौतम ऋषीने काही उपाय सांगितला. पश्चिम समुद्राच्या तीरावर मूकांबिका गिरीवर जाऊन पत्नीसह श्रीबालदुर्गेची उपासना करण्यासाठी राजाला सल्ला मिळाला. समुद्रमंथनाच्या वेळी सागरातून लक्ष्मी प्रकटली ती मूक होऊन राहिली म्हणून ती मूकांबिका बनली. तिने विष्णूचे ध्यान करताच विष्णू सिंहरूपाने तिच्यापुढे येऊन स्थिरावला. या स्थानावर प्रथम सिंहाची व मग देवीची पूजा होत असते. रेणू राजा

आपल्या भोगवती नामक स्त्रीसहित मूकांबिका पर्वतावर आला. राजाने या बालदुर्गेचे प्रसन्न रूप पाहून स्तवन केले. रोज तिची षोडशोपचारांनी पूजा केली. स्तोत्रपठन, दीपोत्सव, रथोत्सव करून त्याने अन्नदान, वस्त्रदान व कुंभदानही केले. राजाच्या भक्तिभावास प्रसन्न होऊन देवी एका शुक्रवारी प्रकट झाली.

**रेणुकेची चरित्रकथा**

देवीच्या हातात आठ आयुधे होती—

> **शंख चक्र खड्ग बरवें ।**
> **गदा चर्म हें पांचवें ।**
> **पाश शक्ति मिळूनि सातवें ।**
> **पद्म आठवें आयुध देखा ।।**

अशा आयुधांनी युक्त असलेल्या देवीने पीतांबर धारण केला होता. राजास ती म्हणाली, 'राजा मीच तुझ्या पोटी अवतीर्ण होईन. मला नंतर पराक्रमी पुत्र होतील. त्यांतील एक प्रत्यक्ष श्रीहरीचा अवतार असून तो दुष्टांचा संहार करील. या आशीर्वादाप्रमाणे भोगवती चैत्र वद्य पंचमीस प्रसूत होऊन तिला मुलगी झाली. राजाने मुलीचे नाव रेणुका ठेविले. राणी भोगवती व रेणुका यांचा द्वेष इतर राजस्त्रिया करू लागल्या. एकदा तर एक भयंकर सर्प त्यांनी मुलीच्या पाळण्यात सोडला. या शक्तिस्वरूपाच्या मुलीने आपल्या खड्गाने सापाचे तुकडे करून टाकले. रेणुका लग्नास योग्य झालीसे पाहून राजाने वर संशोधन सुरू केले. देवीच्या उपदेशावरून त्याने जमदग्नीशी रेणुकेचा विवाह मोठ्या थाटाने केला.

जमदग्नी व रेणुका यांच्याविषयी अशा अनेक कथा प्रसिद्ध आहेत. जमदग्नींचा आश्रम नर्मदा तीरावर होता. तेथेच असलेल्या हाटकेश्वर नावाच्या तीर्थावरून एकदा ते सहज लीलेने बाण सोडीत होते. बाण परत आणून देण्याचे काम त्यावेळी रेणुका करी. परंतु एकदा कडक ऊन असल्यामुळे रेणुका दमली व एका झाडाच्या सावलीत विश्रांतीसाठी थांबली. बाण आणण्यात त्यामुळे उशीर झाला म्हणून जमदग्नी रागावले. त्यांनी आपल्या बाणाचा वेध सूर्यावरच धरला. सूर्य त्यांना शरण आला. सूर्याने त्यांना छत्र व पादत्राण यांचे दान केले. 'मीच तुमच्या पोटी येईन' असे आश्वासनही त्याने जमदग्नींना दिले. याच वचनास अनुसरून सूर्य म्हणजे विष्णू, परशुरामाच्या रूपाने रेणुकेच्या पोटी अवतरले.

**रेणुकेस शासन व तिचा पुनर्जन्म**

जमदग्नींचा राग रेणुकेवर आणखी एका प्रसंगी तीव्रतेने झाला. पाणी आणण्यासाठी एकदा रेणुका गंगेवर गेली होती. त्या ठिकाणी चित्ररथ वा चित्रांगद

गंधर्व आपल्या भार्यांसह जलक्रीडा करीत होता. त्याचे ते विलासयुक्त ऐश्वर्य पाहून रेणुकेचे मन किंचित बिथरले. ती त्या ठिकाणी तो क्रीडाविलास पहात उभी राहिली. म्हणून घरी जाण्यास तिला उशीर झाला. जमदग्नींनी अंतर्ज्ञानाने तिच्या मनाची चलबिचल ओळखली. त्यांचा मनाचा संताप अनावर झाला. जमदग्नींनी रागाच्या भरात परशुरामास रेणुकेचा वध करण्यासाठी आज्ञा केली. बापाची आज्ञा मानण्यासाठी परशुरामाने आपल्या मातेचा शिरच्छेद केला. आधीच्या भावांच्या हातून हे कृत्य झाले नव्हते म्हणून तेही जमदग्नींच्या शापाने मरण पावले होते. आपले भाऊ व आपली आई यांच्या भीषण अंतामुळे परशुरामाचे अंतःकरण विरघळले. बापाजवळ वर मागून त्याने आपल्या बंधूंना व आईला जिवंत केले. आईच्या पायावर मस्तक ठेवून त्याने क्षमा मागितली. आपल्या क्रोधाचा परिणाम पाहून पुढे जमदग्नीही शांत वृत्तीचे बनले.

### जमदग्नी वध

जमदग्नी, त्यांची पत्नी रेणुका, तिचे पाच पुत्र, विशेषतः परशुराम आणि सहस्रार्जुन कार्तवीर्य व त्याचे पुत्र यांच्यात नेहमी कटकटी होऊ लागल्या. कार्तवीर्य अनेकदा जमदग्नींच्या आश्रमात येत असे. बरोबर प्रधान, रथ, हत्ती, घोडे असा लवाजमा असे. या सर्वांची भोजनाची व्यवस्था जमदग्नी उत्तम प्रकारे करीत. अरण्यात अथवा आश्रमात रहाणारा हा ऋषी एवढी व्यवस्था कशी करू शकतो? याचा शोध घेता राजास आश्रमात एक कामधेनू असल्याचे समजले. राजाने या कामधेनूची मागणी केली. या कामधेनूवर इंद्राचा अधिकार असल्यामुळे जमदग्नी ती देण्यास तयार होईनात. मग बळजबरी, झटापट सुरू झाली. जमदग्नींना मारहाण झाली. रेणुका मध्ये आली तेव्हा तिच्याही अंगावर खड्गाचे एकवीस घाव बसले. जमदग्नी ऋषी मरण पावले. रेणुकेचा शोक अनावर झाला. याच वेळी कैलास पर्वताकडे गेलेला परशुराम परत आला. आश्रमातील हा भयानक प्रकार पाहून त्याने या प्रकाराचा सूड घ्यायचे ठरविले. क्षत्रियांचा नाश करण्यासाठी एकवीस वेळा युद्ध करण्याची घोषणा त्याने केली.

### अग्निसंस्कारास कोरी भूमी

त्यावेळी रेणुका त्याला म्हणाली, 'बाळा, परशुरामा, आता आधी तुझ्या पित्यास अग्निसंस्कार द्यायला हवा. त्याच्याबरोबर मी सती जाणार आहे. ज्या स्थानावर अग्नी द्यावयाचा ते स्थान कोरे पाहिजे. म्हणजे त्या भूमीचा उपयोग पूर्वी कोणी घेतलेला नसावा. आता तू एक कावड आण. एका बाजूला या ऋषीचा देह ठेव आणि दुसऱ्या बाजूस मी बसते. ही कावड खांद्यावर घेऊन तीर्थे, क्षेत्रे, आश्रम

यांची यात्रा कर. ज्या ठिकाणी कोऱ्या भूमीसंबंधाने आकाशवाणी होईल तेथे आमचे दहन कर. स्वतः दत्तात्रेय मंत्र सांगण्याचे काम करतील.' या सांगण्या-प्रमाणे खांद्यावर कावड घेऊन परशुराम तीर्थस्थाने करीत भटकू लागला. सिंहाद्री पर्वतावर असलेल्या कृष्णामलकी तथा माहूर या दत्तात्रेय क्षेत्रात तो आला तेव्हा 'परशुरामा, ही कोरी भूमी आहे. येथेच अग्निसंस्कार कर' अशी आकाशवाणी झाली.

## अर्ध्या स्वरूपात रेणुका

त्याप्रमाणे अग्निसंस्काराची सिद्धता झाली. दत्तात्रेय पुरोहिताचे काम करण्यास उपस्थित झाले. संस्कारासाठी तीर्थाची आवश्यकता होती. दत्तात्रेयांच्या सांगण्या-वरून परशुरामाने एक बाण मारून सर्वतीर्थ या कुंडाची निर्मिती केली. चंदनकाष्ठे, कापूर, तूप यांची सिद्धता झाल्यावर जमदग्नींचे शव चितेवर ठेवण्यात आले. पतीच्या शवाजवळ रेणुका बसली. आई सती जाणार, आपल्याला अंतरणार हे पाहून परशुरामास शोक झाला. पुत्रवात्सल्याने रेणुकाही व्यथित होऊन म्हणाली, 'परशुरामा, शोक करू नकोस. चितेला अग्नी दे आणि निघून जा. मागे परतून पाहू नकोस.' आईच्या सांगण्याप्रमाणे दुःखी कष्टी अंतःकरणाने चितेस परशुरामाने अग्नी दिला आणि तो मागे न पहाता शोकाकुल होऊन चालू लागला. 'आई, आई' असा आक्रोश करून परशुराम कष्टी झाला. आईच्या प्रेमाच्या उमाळ्याने त्याने मागे पाहिले तो चितेतून रेणुकामाता वर येत होती. छातीपर्यंतचा तिचा भाग ज्वालातून वर आला होता. परशुरामास पाहून ती म्हणाली, 'बाळा, परशुरामा तू मागे पाहिले नसतेस तर मी पूर्ण रूपाने तुझ्याकडे आले असते. आता मी अशीच अर्ध्या स्वरूपात येथे वास्तव्य करणार आहे.'

## रेणुकामातेची स्थापना

अशा रीतीने श्रीरेणुकामाता माहूरगडावर स्थिरावली. ज्या ठिकाणी दहन झाले ती जागा आज मूळझरा अथवा मोलझरी म्हणून प्रसिद्ध आहे. शेजारी असलेले रेणुकातीर्थ मातृतीर्थ म्हणून आजही विख्यात आहे. याच तीर्थास मोवाळे असेही म्हणतात. रेणुकेची मूळपीठावर स्थापना करून परशुरामाने संकल्पा-प्रमाणे सहस्रार्जुनाचा पराभव केला. क्षत्रियांचा नाश करून आईच्या आज्ञेप्रमाणे परशुराम रेणुकेच्या समोर दक्षिणेस स्थानापन्न झाला. आज रेणुका मंदिराच्या दक्षिणेस या परशुरामाचे मंदिर आहे. मातृतीर्थासमोरील शिखरावर रेणुकेचे मंदिर पूर्वाभिमुख असे आहे. मुख्य दरवाजातून आत गेले की, यज्ञकुंड लागते.

दरवाजावर नगारखाना आहे. पिंपळीच्या झाडाखाली जमदग्नीचे शिवलिंग आहे. मंदिरात रेणुकेची गळ्यापासून वर अशी भव्य मूर्ती आहे. तीवर शेंदूर फासलेला असतो. मुखाचा जबडा भला मोठा असून त्यात पाचशे पानांचा विडा मावू शकतो. रेणुकामातेच्या मुखातील भिगई, साखर, पेठे, विडा इत्यादींचा प्रसाद घेण्याची वहिवाट आहे.

## पूजा आणि उपासना

आज माहूरगडावर सर्व प्रकारच्या सुखसोयी झाल्यामुळे भक्तगणांची गर्दी सतत वाढत असते. आपल्या कुलस्वामिनीच्या दर्शनार्थ शेकडो लोक येतात. तिची खणानारळाने ओटी भरतात, तिला अभिषेक करतात. तिची भोगपूजा बांधतात. तिला महानैवेद्य दाखवितात आणि तिच्या कृपाप्रसादाने संतुष्ट होऊन आपापल्या नित्याच्या उद्योगास प्रवृत्त होतात. रेणुकेच्या मंदिरात सतत नंदादीप तेवत असतात. भट (ब्राह्मण) व भोपी (मराठे) हे येथील हक्कदार असून देवस्थानास उत्पन्न चांगले आहे. रोज पुरणाचा नैवेद्य असतो. देवीस सोन्यामोत्यांचे दागिने भक्तांनी अर्पण केले आहेत. त्रिकाळ देवीची पूजा होत असते. चैत्र शुद्ध प्रतिपदा, चैत्री पौर्णिमा, आषाढी पौर्णिमा, श्रावणी पौर्णिमा, आश्विनातील नवरात्र, कार्तिकी पौर्णिमा, दत्तजयंती, पौष वद्य एकादशी, चंद्र-सूर्याची ग्रहणे इत्यादी पर्वकाळी गडावर मोठी यात्रा भरते. मंदिराशेजारीच एक लहानसे महालक्ष्मीचे व दुसरे तुळजा भवानीचे मंदिर आहे.

## रेणुकेचे अनेक भक्त

या रेणुकामातेचे अनेक भक्त होऊन गेले. श्रीरेणुकादेवी स्तोत्र, रेणुकामाहात्म्य, रेणुकाकवच, रेणुकासहस्रनाम, श्रीमातापूर कथासार इत्यादी लहान पुस्तिकांतून माहूरगड व तेथील रेणुकामाता यांची माहिती मिळण्यासारखी आहे. महाभारत, भागवत, इतर पुराणे यांतूनही जमदग्नी, रेणुका, परशुराम यांची माहिती मिळते. अलीकडे प्रा. माटे, श्री. म. प. पारखे यांनी परशुरामाविषयी संशोधन करून रेणुकेसंबंधी काही नवी माहिती उपलब्ध करून दिली आहे. कन्हैयालाल मुनशी यांच्या 'भगवान परशुराम' या कादंबरीचा मराठी अवतार आता उपलब्ध असून त्यातही रेणुकेच्या चरित्राचे अनेक धागेदोरे स्पष्ट झालेले दिसतील. रेणुकेविषयीची पौराणिक माहिती बरीच मिळते, तीमधून ऐतिहासिक कण गोळा करण्याचे महत्त्वाचे कार्य व्हावयास हवे. रेणुका ही एकवीरा, यल्लम्मा या नावांनीही प्रसिद्ध आहे. धारवाड जिल्ह्यातील सौंदत्ती येथे यल्लम्माचे स्थान प्रसिद्ध आहे. कार्ल्यास एकवीरा विराजमान झाली आहे. हीच रेणुका अथवा

एकवीरा पैठणच्या एकनाथांची कुलस्वामिनी असल्याने त्यांनी आपल्या ग्रंथात तिला मनोभावे वंदन करताना म्हटले आहे:

आतां वंदूं कुळदेवता। जे एकाएकी एकनाथा।
ते एकीवांचून सर्वथा। आणिक कथा करूं नेदी॥
एक रूप दाविलें मनीं। तंव एकचि दिसे जनीं वनीं।
एकचि कानीं वदनीं। एकपणीं 'एकवीरा'॥
ते शिवशक्तिरूपें दोनी। नेऊन मिरवे एकपणीं।
एकपणें जाली गुर्विणी। प्रसवे एकपणीं एकवीरा॥
ते एकरूपें एकवीरा। प्रसवली बोध-फरशधरा।
जयाचा कां दरारा। महावीरां अभिमानियां॥
तेणें उपजोनि निवटिली माया। आज्ञा पाळूनि सुख दे पितया।
म्हणोनि तो जाहला विजया। लवलाह्या दिग्मंडळीं॥
जो वासनासहस्रबाहो। छेदिला सहस्रार्जुन-अहंभावो।
स्वराज्य करूनियां पहा हो। अर्पी स्वयमेवो स्वजातियां॥
तेणें मारूनि माता जीवविली। तेचि कुळदेवता आम्हां जाहली।
परी स्वनावें ख्याति केली। एकात्मताबोली एकनाथा॥
ते जेंपासोनि निवटिली। तेंपासोनि प्रकृति पालटली।
रागत्यागें शांत झाली। निजमाउली जगदंबा॥
तया वोसंगा घेऊन। थोर दिधलें आश्वासन।
विषमसंकटीं समाधान। स्वनामस्मरण केलिया॥
ते जय जय जगदंबा। 'उदो' म्हणे ग्रंथारंभा।
मतीमाजी स्वयंभा। योगगर्भा प्रगटली॥

—श्रीएकनाथी भागवत, अ. १, ओ. ६९–७८

### देवीच्या अवतार कथा

अशी ही रेणुकामाता अनेकांना स्फूर्ती देणारी आहे. अनेकांची संकटे दूर करणारी आहे. दुर्गा, चंडिका, अंबिका, काली, लक्ष्मी, सरस्वती, पार्वती, गौरी अशा अनेक नावांनी शक्तीचे माहात्म्य अनेकांनी गायिले आहे. एकनाथांची भवानीवरील भारुडे प्रसिद्ध आहेत. रामदासांनी भवानीवर लिहिलेली स्तोत्रे भक्तिरसपूर्ण असून प्रेरक आहेत. दुष्टांचा संहार करणारी ही आदिमाता प्रसंगी अक्राळविक्राळ रूप धारण करते. महिषासुर, चंड, चामुंड, शुंभ, निशुंभ, मधू, कैटभ, कोल इत्यादी असुरांचा नाश ती नाना प्रकारचे अवतार धारण करून करते. सप्तशतीत या अवतारकथांचे विस्ताराने वर्णन आले आहे. देवी भागवतातही देवीच्या नाना अवतारकथा तिच्या माहात्म्यासहित आल्या आहेत.

### मायलेकरांचे वात्सल्य

माहूरगडाच्या पायथ्याशी मातृतीर्थाजवळ श्रीविष्णुकवींचा मठ आहे. सन १९१८ मध्ये समाधिस्थ झालेल्या या थोर देवीभक्ताने आपल्या आयुष्यात वात्सल्यभावाने माहूरच्या रेणुकेची उपासना केली. मातृभक्तीचा प्रसार केला. मातेच्या रूपासंबंधी, दर्शनासंबंधी, तळमळीसंबंधी करुण व वत्सल भावाने अनेक कवने केली. आज माहूरगडाच्या परिसरात व वऱ्हाड नागपूर, मराठवाड्यात विष्णुदासांच्याच कवनांनी घरोघरी रेणुकेची आरती केली जाते. आरत्या, अष्टके, पदे, धावे, अभंग इत्यादी विष्णुदासांच्या विपुल कविता आता उपलब्ध आहेत. कालीमातेला 'आई' म्हणून हाक मारावी व रामकृष्ण परमहंसांच्या या हाकेला त्या वत्सल मातेने 'ओ' द्यावी अशी प्रेमभावना त्या बंगाली मायलेकरांची होती. माहूरगडावर असेच वात्सल्यप्रेम रेणुका जगन्माता व विष्णुदास यांच्यात असे. रेणुकेची महापूजा विष्णुदासरचित आरतीशिवाय, अष्टकाशिवाय, प्रार्थनापर स्तोत्राशिवाय कधीही पूर्ण होत नाही.

### रेणुकेचा गौरव

विष्णुदासांच्या भूपाळ्यांच्या मंगल सुरांनी माहूरगडवासिनी रेणुका आजही पहाटेच्या सुमारास जागी होत असते—

> **सत्वर जागृत व्हावे, उठावे, पहा पहाट झाली।**
> **कशी जगदंबे, अंबे, रेणुके, तुला झोप आली।**
> **उठ जगदंबे, आई, लवलाही! निजलीस कायी उठ लवकर अंबाबाई॥**

अशा भूपाळ्यांच्या स्वरांनी माहुरगडाचा परिसर पहाटेच्या वेळी गजबजून जातो. कधी विष्णुदास तिला—

> **माहुरगडवासिनी आउबाई गोंधळा येई हो।**

म्हणून साद घालतात. कधी—

> **कृपा कर श्रीअंबाबाई। माहुरगडवासिनी दयाळे। दर्शन मज देई॥**

म्हणून प्रार्थना करतात. तर कधी—

> **बोल भवानी जय जगदंबा। ही माहुरगडची अंबा॥**

म्हणून तिचा गौरव करतात. याच पदात तिच्या सुंदर रूपाचे वर्णन करताना विष्णुदास म्हणतात:

> **मूळपीठ कोरि भूमिका। तेथे नांदे देवी रेणुका।**
> **लावण्यरत्नचंद्रिका। ही मूळ सृष्टिची रंभा॥**
>
> **सदा प्रसन्न मुख विराजे। वंदिती देव ऋषि राजे।**
> **भक्तांच्या धावे जी काजे। क्षणहि न लावि विलंबा॥**

निळवर्ण वेणी भुजंग । नेत्राला भुलती कुरंग ।
खुले दंतपंक्तीचा रंग । लाजवी पक्व डाळिंबा ॥
म्हैषासुर मारिला ठार । उतरिला भूमिचा भार ।
सहस्रार्जुन केला ठार । निवटिले शुंभ-निशुंभा ॥

### रेणुकेचे रूपलावण्य

माहूरगडावरील रेणुकेच्या मंदिरातील मूर्ती भव्य आणि गळ्याएवढीच आहे. ही जगदंबा विष्णुदासांना ध्यानात दर्शन देत असे. हिचे अति सुंदर व भाविकांना प्रत्ययकारी वाटेल असे वर्णन करणारी दोन पदे मुद्दाम पुढे देत आहे :

१

रूप सुंदर सुंदर । ध्याती योगी दिगंबर ॥ धृ० ॥
रत्नजडित सिंहासनी । शोभे सिंहाद्रिवासिनी ॥ १ ॥
दिसे मळवट चांगला । मुखीं तांबुल रंगला ॥ २ ॥
साडी नेसली पिवळी । माय मनाची कोवळी ॥ ३ ॥
नाना रत्न अलंकार । अंगीं सर्व अधिकार ॥ ४ ॥
गोठ पाटल्या बांगड्या । कानीं मोत्यांच्या बुगड्या ॥ ५ ॥
शिरीं भोगऱ्याच्या कळ्या । पायीं पैंजण, साखळ्या ॥ ६ ॥
विष्णुदास मनव्यापिनी । भेट देई नारायणी ॥ ७ ॥

२

प्रकट मूळपीठावि भवानी देवि रेणुका सती ।
पाहिली सिंहाद्री पर्वती ॥ धृ० ॥
चंद्रवदन मृगनयन विराजे, भ्रुकुटि धनुष्याकृती ।
दृष्टि धरि असुरावर वक्र ती ।
रत्नजडित शिरिं मुकुट विराजे । कर्णयुगुल हालती ।
गळा हार रत्नांचे डोलती ।
कंचुकि भरजरि पीत पीतांबर अमर चवर ढाळती ।
भ्रमरवत् सिद्ध अंगणि लोळती ॥
वर्णिति पंडित गुणगणमंडित खड्गचापशर हातीं ।
अखंडित योगीजन पाहती ॥
चमकति कंकण भुक्तघोष घन नक्षत्रवृंद लाजती ।
चालतां पदिं पैंजण वाजती ॥
विष्णुदास म्हणे दीन जनांची माय सांगूं मी किती ।
जाहली भक्तांची सारथी ॥

## रेणुकामातेची वाङ्मयी पूजा

विष्णुदासांसारख्या भक्तांच्या कवनांनी श्रीरेणुका लोकमानसात चांगलीच स्थिरावलेली आहे. घरातल्या वडील माणसांनाही आपले सुखदुःख आपण सांगणार नाही, पण अनेकजण ते या जगन्मातेस सांगतात. सांजसकाळ तिचे रूप वर्णन करतात, तिचा महिमा गातात, तिची स्तुती करतात, तिच्यापाशी लडिवाळपणे हट्ट धरतात. 'ही परमकृपेची माऊली हो। ही विश्रांतीची साउली हो ।।', 'ऐसी अंतरपारखी । कोण रेणुकेसारखी ।।', 'नित्य मातृतीर्थी स्नान। नित्य रेणुकादर्शन ।।', 'येग येग अंबाबाई । एकवीरे माझे आई ।।', 'माझी रेणुका माऊली । कल्पवृक्षाची साऊली ।।', 'अंबे तुझ्या भेटीसाठीं । धीर धरवेना पोटीं ।।' इत्यादी पदांनी व अभंगांनी अनेक भक्त या जगन्मातेची उपासना करतात. 'श्रीरेणुके, जय भगवंते, अचिंते, जयवंते ।', 'जयदेवी जयदेवी जयजय एकवीरे ।।', 'ही आदिमाया जगदंबा । रेणुका, कुलस्वामिनी अंबा ।।', 'विपुल दयाघन गर्जे तव हृदयांबरिं श्रीरेणुके हो ।।', 'जय जय जगदंबे, श्रीअंबे, रेणुके, कल्पकदंबे ।', 'जय जय रेणुके, सदा सदय तूं प्रसन्न रूप मूर्ते ।', 'जय जय रेणुके आई, जगदंबे । ओवाळू आरती मंगळारंभे ।।' अशा अनेक भावपूर्ण आरत्या गाऊन भक्त लोक या मातेचा गौरव करताना दिसतात. 'तुझे सुंदर रूप रेणुके विराजे ।' 'श्रीमूळपीठ-शिखर स्थळि कोटी लक्ष ।', 'श्रीमातापुरवासिनी भगवती चिंतामणी शारदा।', 'माझि पतिताची पाकृती खोटी । तुझी पावन करण्याची शक्ति मोठी ।।' 'श्रीअंबे, जय रेणुके गुणनिधे । सौभाग्य सुवासिनी ।।', 'श्रीपुण्य क्षेत्र स्थळ माहूर येकवीरे' अशा अनेक अष्टकांनी आजही घरोघरी देवीचे माहात्म्य लहानथोर गाताना दिसतात. या जगज्जननी रेणुकेचे नवरात्रातील वैभव वर्णन करताना विष्णुदास म्हणतात :

> मूळपीठाची वेल्हाळी । आदिमाय ज्ञानकळा ।। १ ।।
> आई बैसली नवरात्री । झडति चौघडे वाजंत्री ।। २ ।।
> पुढे चरमंडित माळा । द्वारी होतसे सोहळा ।। ३ ।।
> देवदेवी गण मातृका । ऋद्धि सिद्धि महाकालिका ।। ४ ।।
> पूर्णाहुती होमानळी । पडति चंड मुंड बळी ।। ५ ।।
> भुते गोंधळ घालती । भक्त उदयो बोलीती ।। ६ ।।
> विष्णुदास म्हणे धालो । आजी धन्य धन्य झालो ।। ७ ।।

## आणि ही मानसपूजा

माहूरगडावरील ही रेणुकामाता आपले रक्षण करते अशी आजही सर्व भाविकांची श्रद्धा आहे. या देवीचे घरोघरी कुळाचार असतात. नित्यनैमित्तिक पूजाअर्चा असतेच. पण अनेकांना माहूरगडाची ओढही सततची असते. या त्रिभुवन सुंदरीस,

जगन्माउलीस एकदा डोळे भरून पहाण्याची भक्तांना मनोमन इच्छा असते. म्हणून अनेकांचे पाय माहूरगडाकडे वळतात. चित्तास रेणुकामातेची ओढ लागते. तिच्या मानसपूजेत भक्तगण दंग होऊन गुणगुणतात :

माहुरगडावरी गडावरी ग तुझा वास ।
भक्त येतिल दर्शनासी ॥ धृ० ॥
पिवळा पितांबर पिवळा पितांबर बुट्टेदार ।
अंगी चोळी ग हिरवीगार ॥
पितांबराची ग पितांबराची खोऊनि कास ।
भक्त येतिल दर्शनासी ॥
बिंदी बिजवरा ग बिंदी बिजवरा ।
शोभतो भाळी कानी बुगडया बेलबाळी ॥
तुझ्या नथेला ग तुझ्या नथेला ग ।
हिरेधोस । भक्त येतिल दर्शनासी ॥
सरी ठुशी नग सरी ठुशी न मोहनमाळ ।
जोडवी मासोळ्या पैंजण चाळ ॥
पट्टा सोनेरी ग सोनेरी ग कमरेला ।
भक्त येतिल दर्शनासी ॥
जाई जुईची ग जाई जुईची आणिली फुले ।
हारतुरे ग गुंफियेले ॥
हार घालीते ग हार घालीते अंबे तुला ।
भक्त येतिल दर्शनासी ॥
पुरणपोळीचे ग पुरणपोळीचे भोजनाला ।
मुखी तांबुल देते तुजला ।
ओटी भरते ग ओटी भरते नारळासी ॥
भक्त येतील दर्शनासी ।
माझ्या मनाची ग माझ्या मनाची मानसपूजा ।
प्रेमे आलिंगिली अष्टभुजा ॥
आरती करीन ग करीन ग अंबे ।
वाट पाहाते प्रसादाची ॥
माहुरगडावरी गडावरी ग तुझा वास ।
भक्त येतिल दर्शनासी ॥






लेखक : **श्री. रमेशचंद्र पटेल**

महाराष्ट्रात रेणुकादेवीचे मुख्य ठाणे आहे विदर्भात. माहूरगडावर. साडेतीन पीठांपैकी ते एक पीठ आहे. पण माहूरशिवाय चांदवड येथेही रेणुकेचे जाज्वल्य ठिकाण आहे.

रेणुका ही जमदग्नी ऋषींची पत्नी व भार्गव परशुरामाची माता होती. पुराणकाली चांदवडच्या डोंगरावर तिने तपश्चर्या केली होती. गुरुदेव दत्तात्रेयांच्या सांगण्यावरून जमदग्नीसह तिने माहूरगडावर वास्तव्य केले. जमदग्नीचा मुख्य आश्रम माहूरगडावर होता. चित्ररथ गंधर्व नावाच्या क्षत्रिय राजाने कपट व पाप बुद्धीने जमदग्नीचे रूप धारण केले. तो आश्रमात आला असता रेणुकेने

चांदवडची श्रीरेणुकादेवी



अजाणतेपणाने त्याचे पती समजून स्वागत केले. पण जमदग्नीला हे ज्ञात होताच ते क्रोधित झाले व परशुरामाला रेणुकेचा शिरच्छेद करण्याची आज्ञा केली. त्यानुसार परशुरामाने माहूरगडाच्या शिखरावर रेणुकेचा शिरच्छेद केला. मातृवधाचे दुःख परशुरामाला असह्य झाल्याचे पाहून भगवान दत्तात्रेय त्यांच्या सांत्वनासाठी तेथे आले, व त्यांनी आईची यथाविधि क्रिया झाली तर ती जिवंत होईल आणि तिची त्रिभुवनात अखंड कीर्ती राहील असे परशुरामाला सांगितले. जमदग्नीनेही तसाच वर मुलाला दिला. त्यानुसार परशुरामाने आईच्या क्रियेसाठी धरतीला बाण मारून पाताळातून गंगा वर आणली व क्रियेस प्रारंभ केला. परंतु क्रिया संपण्यापूर्वीच त्याने आईला आतुरतेने हाक मारल्याने रेणुकेने 'काय बाळ' असे म्हटले. त्यामुळे पुढची क्रिया थांबली. त्याचा परिणाम म्हणून रेणुकेचा मुखवट्याचाच भाग फक्त जिवंत झाला व खालचा भाग अचेतनच राहिला. यामुळे रेणुकेची मुखवट्याचीच मुख्य पूजा केली जाते. माहूर-गडावर व चांदवड येथे रेणुकेच्या मंदिरात फक्त नुसता शिराचाच तेवढा भाग आढळून येतो.

**वैभवसंपन्न नगरी**

पौराणिक व ऐतिहासिक महत्त्व असलेले चांदवड हे गाव मुंबई-आग्रा राजमार्गावर नाशिकजवळ आहे. उत्तुंग डोंगर व हिरव्यागार वनराजींच्या कुशीत वसलेले हे निसर्गसुंदर गाव एके काळी अत्यंत वैभवसंपन्न होते.

चांदवडची सरदेशमुखी मल्हारराव होळकरांना मिळाल्यावर चांदवड हे होळकरांच्या राज्यकारभाराचे प्रमुख केंद्र बनले होते. त्यावेळी येथील व्यापार व उद्योगधंदे इतके भरभराटीस होते की, चांदवडची लोकसंख्या एक लाखाचेवर गेली होती. पण काळाच्या उदरात चांदवडचे हे सारे ऐश्वर्य, वैभव व राजकीय महत्त्व लोप पावले. आज चांदवडची लोकवस्ती जेमतेम सात-आठ हजार आहे. चांदवडचे रूप आज बदलले असले तरी तेथील चंद्रेश्वर, इंद्रेश्वर, श्रीरेणुकादेवी इत्यादी देवदेवतांचा महिमा व महत्त्व मात्र कायम राहिले आहे.

**तांबकड्यात देवालय**

मुंबई-आग्रा राजमार्गावर चांदवडपासून एक-दीड मैलावर घाटाच्या पूर्वेस तांबकडा नावाचा डोंगरकडा आहे व त्यात श्रीरेणुकादेवीचे पुरातन व स्वयंभू स्थान आहे. डोंगराचा कडा तोडून तेथे या देवीचे देवालय बांधण्यात आले आहे. प्राचीन काली रेणुकेने चांदवडच्या डोंगरावरच तप केल्याची आख्यायिका असल्याने रेणुकेच्या या स्थानास आगळे महत्त्व आले आहे.

आग्रा रोडवरून देवीच्या मंदिराकडे जो रस्ता जातो त्यावर एक छोटासा पूल लागतो. तो ओलांडून पुढे गेल्यावर डाव्या हाताला मारुतीचे मंदिर व त्यामागे एक जुनी विहीर आणि उजव्या हाताला एक पडीक धर्मशाळा आहे. रेणुकेचे मंदिर उंच डोंगरावर असल्याने मंदिराकडे जाण्यास बऱ्याच दगडी पायऱ्या आहेत. त्यांची बरीच पडझडही झाली आहे. पायऱ्यांच्या मध्यावर एकीकडे गणपती व दुसरीकडे खंडोबाचा घोडा व पादुका असून पायरीवर मध्यभागी कासव आहे. पायऱ्या चढून वर गेल्यावर मंदिराचे भव्य प्रवेशद्वार आहे. डोंगराच्या कडेला कोट बांधून ही प्रशस्त कमान उभारण्यात आली आहे. तीमधून आत गेल्यावर प्रशस्त पटांगण व समोरच मंदिर दिसते. प्रवेशद्वाराच्या दोन बाजूला उंचच उंच व प्रशस्त अशा दोन दगडी दीपमाला आहेत. त्यांच्या थोडे पुढे देवीचे तत्कालीन पुजारी कै. दादामहाराज गडकरी यांची समाधी असून तिला प्रदक्षिणा घालूनच लोक मंदिरात दर्शनासाठी जातात. मंदिराच्या समोर जे भव्य प्रांगण आहे ते नवरात्रात असंख्य दुकानांनी व हजारो यात्रेकरूंनी फुलून गेलेले असते.

देवालयात प्रवेश केल्यावर आत चारी बाजूंनी धर्मशाळा बांधलेल्या आहेत. देवळातील छतावर ४-५ शिलालेख कोरलेले असून त्यावरून या धर्मशाळा २२१ वर्षांपूर्वी म्हणजे शके १६७२ मध्ये बांधलेल्या असाव्यात. चार वर्षांपूर्वी एका भक्ताने या धर्मशाळेच्या बांधकामात स्वखर्चाने वाढ केली आहे. या धर्मशाळेत नवरात्रात लोक घटी बसवतात. कोणी सातव्या माळेपर्यंत तर कोणी दसऱ्यापर्यंत घटी बसवतात. धर्मशाळांच्या मध्यभागी मंदिरासमोर मोकळी जागा असून तेथे त्रिशूल व तुळशीवृंदावन आहे. गाभाऱ्याच्या पूर्वेस पडवीत नंदी, महादेवाची पिंडी, संगमरवरी छोटी देवी, पादुका, मारुती व देवीचा भव्य मुखवटा आहे.

देवीचे मुख्य मंदिर तांबकड्यात असून गाभारा छोटा व अरुंद आहे. गाभाऱ्यात जाण्यासाठी दोन दरवाजे असून पश्चिमेकडील दरवाजातून गाभाऱ्यात गेल्यावर समोरच चौथऱ्यावर श्रीरेणुकादेवीच्या मुखवट्याची मूर्ती व पादुका आहेत. ही मूर्ती दक्षिणाभिमुख आहे. देवीचे पुजारी वडनेरचे श्री. जोशी असून हल्ली त्यांच्यातर्फे श्री. वैद्य पूजा करतात. मंदिराच्या पश्चिमेस रस्त्याच्या पलीकडे रेणुकातीर्थ नावाचे सरोवर असून त्यास चारी बाजूंनी दगडी घाट आहे. या सरोवरात बरेच पाणी असून ते कधीच आटत नाही. येथे स्नान करून मग भाविक दर्शनास जातात.

### दिवसातून तीन रूपे

चांदवडची रेणुकादेवी जागृत असून ती नवसास पावते असा असंख्य भाविकांचा अनुभव आहे. रेणुकादेवीचे रूप दिवसातून तीन वेळा बदललेले येथे स्पष्टपणे दिसून येते.

प्रातःकाली बाला, मध्यान्ही युवती व सायंकाळी वृद्धा अशी दिवसातून तीन रूपे चांदवडच्या रेणुकादेवीच्या मुखवटयावर स्पष्टपणे दिसतात.

मंदिरासमोर ज्या दादामहाराज गडकऱ्यांची समाधी आहे त्यांना रेणुकादेवीचा अनेकदा साक्षात्कार झाला होता. एवढेच नव्हे तर त्यांच्याशी रेणुकादेवी बोलत असे अशी दंतकथा आहे. पुजारी दादामहाराज गडकरी हे देवीला मांसाहारी नैवेद्य दाखवितात या समजुतीने त्यांचेवर पोलिस पहारा बसविण्यात आला होता. परंतु देवीच्या नैवेद्यावरील फडके काढून पाहिले असता त्यात गुलाबाची फुले आढळली! रेणुकादेवीच्या पूजेची सनद ज्या जोशी घराण्याकडे आहे, ते वडनेरचे श्री. बाळकृष्ण विश्वनाथ जोशी हे एकदा देवीच्या दर्शनासाठी आले असता रेणुकातीर्थ सरोवरात स्नान करून ते वर आले. तेव्हा सरोवराच्या पायरीवर त्यांना तांब्याच्या ताम्हणात पूजा केलेला तांदळा प्रकटलेला आढळला. रेणुकेचे प्रसादचिन्ह म्हणून हा तांदळा आजही जोशी घराण्याच्या देवघरात पूजिला जातो.

## अहिल्यादेवीची उपासना

चांदवडच्या खिडीतील रेणुकादेवी हजारो भाविकांप्रमाणेच होळकरांचेही आराध्यदैवत आहे.

पुण्यश्लोक लोकमाता अहिल्यादेवी होळकर यांचा वर्षातून चार महिने चांदवडला मुक्काम असे. रेणुकादेवीच्या त्या परम उपासक होत्या. अहिल्यादेवी चांदवडला ज्या राजवाड्यात दरबार भरवून ऐतिहासिक खलबते करीत, त्या रंगमहालातून रेणुकादेवीच्या मंदिरापर्यंत भुयार असून या भुयारातून अहिल्यादेवी रेणुकेच्या दर्शनासाठी जात असत. हे भुयार आजही शाबूत असून देवीच्या मंदिरात जेथे नंदी ठेवलेला आहे त्याखाली या भुयाराचा मार्ग असल्याचे सांगितले जाते.

## आंतरप्रांतीय महत्त्व

रेणुकादेवीची येथे वर्षातून दोनदा म्हणजे आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून दसऱ्यापर्यंत नवरात्रात व चैत्री पौर्णिमेला प्रचंड यात्रा भरते. यावेळी रेणुकेच्या दर्शनासाठी केवळ चांदवड किंवा नाशिक जिल्ह्याच्या परिसरातून नव्हे तर गुजराथ राज्यातूनही शेकडो भाविकांची चांदवडला नुसती रीघ लागलेली असते. त्यामुळे देवीच्या या यात्रेस आंतरप्रांतीय महत्त्व प्राप्त झालेले आहे.

या यात्रेखेरीज नूतन परिणीतांची वर्षभर देवीच्या दर्शनासाठी गर्दी असते. मंगळवारी व शुक्रवारीही असंख्य भाविक येथे दर्शनाला जातात. रेणुकादेवीचा 



चांदवडची
श्रीरेणुकादेवी
(उत्सव)

सोन्याचा मुखवटा, इतर अनेक सोन्या-चांदी-मोत्यांचे अलंकार व महावस्त्रे रंगमहालात असतात. नवरात्रात रोज हे सारे अलंकार रंगमहालातून पालखीत मिरवणुकीने देवीस नेण्यात येतात व परत रंगमहालात ठेवले जातात. पालखी गेल्याशिवाय देवीच्या पूजेस अगर कार्यक्रमास सुरुवात होत नाही. होळकर ट्रस्टतर्फे देवीच्या मंदिरात घटस्थापना व पूजा झाल्यावरच लोक घंटी बसवतात. नवरात्रात येथे अष्टमीचा होम गडकरी व नांदुरटेकचे गोसावी यांचा व नवमीचा होम होळकरांचा होतो. वर्षभर दर पौर्णिमेसही पालखी मिरवली जाते. दसऱ्याचे दिवशी देवीपासून खंडोबापर्यंत पालखी जाते व होळकरांतर्फे शमीची पूजा होऊन नवरात्रोत्सवाची सांगता होते. या मंदिराची देखभालही होळकरांतर्फे केली जाते.

❀ ❀




लेखक : **श्री. त्रि. गो. देशमुख**

**श्रीरेणुका जगन्माता दत्तात्रेयो महामुनिः ।**
**देवदेवेश्वरो यत्र तन्मातृक्षेत्रमुच्यते ॥**

श्रीजगदंबा रेणुका, श्रीदत्तात्रेय आणि श्रीदेवदेवेश्वर ही विविध पंथांच्या सामान्य मराठी कुटुंबांची कुलदैवते सिंहाद्रीच्या पर्वतराजीत जेथे वास्तव्य करतात ते मातापूर क्षेत्र होय. श्रीरेणुका, श्रीअनसूया, श्रीमहाकाली या जगन्मातात्रयींनी ही सिंहाचलाची सुंदर पर्वतराजी भक्तगणांत पुरातन काळापासून जागतीजोगती केलेली आहे. केवळ आजच्या महाराष्ट्रातच नव्हे तर सर्व हिंदवी राष्ट्रात या सनातन ज़ागृत पुण्यभूमीचा कीर्तिपरिमल पसरलेला आहे. या क्षेत्राविषयीच्या जेवढ्या म्हणून लोककथा व लोकगाथा ऐकाव्यात अगर वाचाव्यात तेवढा माणूस अनंतकाळरूपी गडद अंधःकाराच्या गिरिकंदरात पौराणिक, ऐतिहासिक कथागाथांचे दिवटे घेऊन लक्षात न येता लक्षावधी योजने वाट तुडवीत जातो. चंद्रावर चाल करून जाणाऱ्या अचाट मानवाप्रमाणे!

चंद्रावर गेल्यानंतर त्या मानवाला नीलमय मणिकासम दिसणारा पृथ्वीचा गोळा पाहून अचंबा वाटला. आपल्याच जन्मदात्रीला अतीव अंतरावरून पहाताना त्या भूमिपुत्राने ब्रह्मानंद लुटला आणि अनंत ब्रह्मांड यापुढेही अपार आहे, या दुर्ज्ञेयाने तो पार चकितच झाला! या मातापूर क्षेत्राचे असेच आहे. केवळ इतिहासपूर्व काळातच नव्हे तर सृष्टिजन्मदिनापासून मातापूर क्षेत्राच्या कथा सुरू होतात. या प्रचंड काळाच्या एका टोकावरून सिंहाद्री पर्वताच्या शिखराकडे आपण नजर टाकतो तेव्हा चंद्रावरून पृथ्वीकडे पहाणाऱ्या मानवाप्रमाणे आपण गूढगुंजनात गुंडाळून जातो. आपल्या नित्याच्या परिचयाचे माहूर क्षेत्र एकदम अगम्य बनते. अनंत काळाचा भरजरी पीतांबराचा पल्लव मागे सारून उभे ठाकणाऱ्या या सानुल्या सिद्धपुरेश्वरीविषयी अचंबा वाटतो, तोच

एका शिखरावरील शेंदराने माखलेला तेजःपुंज तांदळा मनःचक्षूसमोर दिसू लागतो.

अरुणोदयी रक्तवर्ण । मुखावर पडते रविकिरण ।
अंबे, तुझे नमुनि चरण । भास्कर करितो पुढे भ्रमण ॥

महाराष्ट्राच्या आग्नेय दिशेला अरुणोदयासारखा लालभडक शेंदरी गोलाकार मुखवटा सृष्टिजन्माचे पूर्वीपासून अचल असा स्वयंभू रूपात तेथे प्रतिष्ठान करतो. या जगदंबेचे शेषांग काळदरीत किती खोलवर रुतले आहे कुणास ठाऊक ?

धरीली तव ध्यान, त्यजुनि अभिमान, उडाले भान ।
न कळे अंत नारदाते । भ्रांती पडे सरस्वतीते ॥

विश्वभर भ्रमण करणाऱ्या नारदाला जेथे कळत नाही व प्रतिभेची जननी सरस्वती जेथे भ्रमात पडते, तेथे पुराणकथा, कविगाथा व बिचारा इतिहास आपणास कालदर्शन ते काय घडविणार ?

'रेणुकामाहात्म्य' व 'कालिकाखंड' यांतील 'आमलीग्राम (माहूर) माहात्म्य' यात माहूर क्षेत्राचे वर्णन दिले आहे.

भगवान विष्णूने ब्रह्मदेवाला सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा दिली, पण सृष्टी निर्माण कशी करावी हे त्यांना कळेना. तेव्हा विष्णूने भावी सृष्टीचा नमुना (मॉडेल) म्हणून लहान भूभाग निर्माण केला. हा विभाग चौदा मैल लांबरुंद आहे. हेच मॉडेल समोर ठेवून नंतर ब्रह्माने पूर्ण सृष्टी निर्मिली. या क्षेत्राला चार दरवाजे आहेत. पूर्वेकडे हाटकेश्वर-येथे बंजारी नदीचा धबधबा आहे. पावसाळ्यात पाण्याचा लोट उंचावरून खाली पडतो, तेव्हा सुंदर दृश्य दिसते. एका भव्य खडकामध्ये मंदिर कोरून तेथे शिवलिंग स्थापिले होते, आता त्याऐवजी तेथे शेख फरीद नावाचा दर्गा आहे. दक्षिणेकडे विमलेश्वर आहे. हे ठिकाण फुलसावंगीजवळ एका टेकडीवर आहे. उत्तरेकडे सिद्धेश्वर व कापेश्वर पैनगंगेच्या काठावर आहेत. या क्षेत्राला पैनगंगेचा तिन्ही बाजूंनी वेढा आहे. जवळच पुसदवरून वाहणाऱ्या पुष्पावतीचा (पूस नदीचा) व पैनगंगेचा मनोहर संगम आहे. सूर्यास्ताला रेणुकेच्या डोंगरावरून हे दृश्य फारच आकर्षक दिसते. विदर्भात लोणार क्षेत्र आहे, तेथे विष्णूने लवणासुराला मारले, त्यावेळी ब्रह्मदेवाने भक्तिभावाने भगवंताचे पाय धुतले, त्यावेळी ते पावनतीर्थ पृथ्वीवर वाहू लागले. ती पवित्र पावनगंगा म्हणजेच पुढे पैनगंगा होय. ही पावनगंगा या क्षेत्राला प्रदक्षिणा घालते आणि तेही पुष्पावतीच्या संगमासह प्रार्थना करीत, 'अंबिकायैनमः । तोयंपुष्पं समर्पयामि ।।'

या क्षेत्राची प्रत्येक युगात निरनिराळी नावे आहेत. कृतयुगात आमलीग्राम, त्रेतायुगात सिद्धपूर, द्वापारयुगात देवनगर व कलियुगात मातापूर असे या

क्षेत्राला म्हणतात. 'काशीक्षेत्रात् यवाधिकम्।' काशी क्षेत्राहून या क्षेत्राचे माहात्म्य अधिक मानले आहे. माहूरला 'काशी अमुची रेणुका, मूळपीठ-नायिका' असे म्हटले आहे. 'पदी जाय तो रेणुका मंदिराशी। अशाला कशाला गया आणि काशी॥' असे या क्षेत्राचे महत्त्व आहे. माहूरला 'उत्तर काशी' म्हणतात. 'यवाधिक उत्तर काशी मातापूर हे वसुंधरेवरी।' असे या क्षेत्राचे माहात्म्य आहे.

तिस्त्र कोटचस्तु तीर्थानि रेणुका यत्र तिष्ठति।
दर्शनात्स्पर्शनात्तेषां प्राणिनो यन्ति सद्गतिम्॥

रेणुकेच्या निवासस्थानी तीन कोटी तीर्थस्थाने असून दर्शनस्पर्शाने प्राण्यास मोक्ष मिळतो, यापेक्षा महिमा तो काय वर्णावा?

रेणुकादेवीचा जो स्वयंभू तांदळा आहे, त्याविषयी अनेक आख्यायिका आहेत. भक्तभाविकांच्या श्रद्धेनुसार व अनुभूतीनुसार रेणुकेचे स्वरूप अनाद्यनंत आहे. आदिमानवाच्या मनातील भीती, आश्चर्य, कृतज्ञता या तीन मूल भावनांनी देवतांना जन्म दिला. मानवाच्या या वैयक्तिक सामूहिक चिंतनाच्या मुशीतून विविध देवतांच्या मूर्ती आकारास येत असतात. श्री. रा. चिं. ढेरे म्हणतात, तसे देवतांच्या विकासाचा इतिहास मानवाच्या भावनिक व वैचारिक विकासावर प्रकाश टाकण्यास उपयुक्त ठरतो. विविध मानव समूहाची देवयातने (देऊळ) ही त्या समाजाच्या संस्कृतीची अर्थगर्भ प्रतीके असतात. देवतांच्या स्वरूपात युगांचे चिंतन घनीभूत होत असते. रेणुकादेवीच्या या घनीभूत स्वरूपातून पौराणिक आख्यायिकांचा, लोककथांचा पाऊस शब्दसृष्टीत पडलेला आहे. एका शिखरावरची 'रेणू' दुजा शिखरावरील 'अणू' म्हणजे जणू अणुरेणूमधून प्रकट होणाऱ्या ईशतत्त्वाची ग्वाही देत आहे. 'अणोरणीयान महतो महीयान'—

जय जय वो जगदंबे निराकारे निरालंबे।
निर्गुण सगुण स्वयंते आदिमाय श्रीरेणुके॥

आदिमाता रेणुकेचे हे मातापूर होय, त्याचा अपभ्रंश 'माहूर' असावा तर अनसूयेचे हे साक्षात माहेर तेव्हा त्याचा अपभ्रंश 'माहूर' असेल!

'आदिमाय रेणुके' विषयीच्या कथांचा काही पत्ता लागत नाही, 'रेणुराजाची दुहिता। जमदग्नऋषीची कांता। परशुरामाची माता। ही तर नाती नंतरची॥' ही जी नंतरची नाती आहेत, त्याबद्दलच्या अनेक कथा आहेत.

देवी रेणुकेची कथा फारच अद्भुत व अगाध आहे. रेणुकेच्या कथावस्तूची आरास अनेकांनी अनेक प्रकारे रचलेली आहे.

रेणुका ही इक्ष्वाकुवंशातील रेणुराजाची कन्या व जमदग्नऋषीची पत्नी. समण्वान, सुषेण, वसू, विश्वावसू, परशुराम हे तिचे पाच पुत्र. जमदग्नी भृगुकुळाचे,

या कुळाशी हैहय कुळाचे वैर होते. माहिष्मती राजा सहस्रार्जुन कार्तवीर्य याने जमदग्नीच्या आश्रमात शिरून कामधेनू पळविली. परशुराम व सहस्रार्जुन यांचे युद्ध जुंपले. सहस्रार्जुनाचा परशुरामाने आपल्या परशूने कंठ छेदला. यानंतर सहस्रार्जुनाच्या पुत्रांनी परशुराम नसताना ध्यानस्थ जमदग्नीचा वध केला. रेणुका आक्रोश करू लागली. भेकडपणे आपल्या पित्याचा खून करणाऱ्या क्रूर



श्रीरेणुकादेवी

हैहय कुळाचा तर परशुरामाने निःपात केलाच, पण सर्व क्षत्रिय दंडार्ह आहेत असे समजून पृथ्वीच एकवीस वेळा निःक्षत्रिय केली, यानंतर रेणुका सती गेली व या मातापित्यांची उत्तरक्रिया परशुरामाने मातापुरी केली.

रेणुकेच्या मूर्ती भारतात उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत सर्वत्र आढळतात. सर्वच प्रांतांतील लोक ती आपली देवता मानतात. कान्यकुब्ज, महेश्वर, मातापूर, कोकण व मद्रास, कर्नाटकमधील अनेक स्थाने रेणुकादेवीसाठी प्रसिद्ध आहेत. रेणुराजाची कन्या व परशुरामाची माता यांचा संबंध मागाहून जोडलेला आहे असेही सांगण्यात येते.

भारतवर्षात देवीची ५१ शक्तिपीठे आहेत. यक्षयज्ञाच्या वेळी कालीचे सुदर्शन-चक्रामुळे निरनिराळे अवयव पडून त्या अवयवस्थानी शक्तिपीठे निर्माण झाली. त्यात शिवांगीची स्तने सह्य पर्वतावर पडली, तेथे मातापूर शक्तिपीठ निर्माण झाल्याचे 'रेणुकामाहात्म्य' ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. माहूर व माहूरच्या

आसमंतातं मुळावा उमरखेडपासून ते अमरावती आंबेजोगाईपर्यंत सर्व रेणुका-माता शेंदराने लपेटलेल्या सुंदर अशा गोलगुलूट आकाराच्या तांदळारूपातच आढळतात हे विशेष लक्षणीय होय.

जमदग्नीपत्नी रेणुकेची कथा काहीशा वेगळ्या धाटणीने सांगतात ती अशी :

जमदग्नी श्वेतद्वीपात रहात असत (श्वेतद्वीप म्हणजे अमेरिका होय, भारत हा जंबुद्वीपात आहे). कान्यकुब्ज येथे रेणूराजा राज्य करीत होता. पुत्रप्राप्तीसाठी त्याने पुत्रकामेष्टी यज्ञ केला. या यज्ञाचे फळ म्हणून त्यास रेणुका ही कन्या झाली. पुढे स्वयंवरात रेणुकेने जमदग्नीला वरले. तिचे जन्मनाव कामली होते. महाभारतात तिचा जन्म कमलापासून झाला असे म्हटले आहे. स्कंदपुराणात 'वह्निकुंडादयोनिजा' असा उल्लेख आहे. ती यज्ञकुंडातून बाहेर आली असे म्हटले आहे. तिने जमदग्नीच्या गळ्यात माळ घातली, तेव्हा स्वयंवरात आलेले राजे खवळले. पराक्रमी राजेरजवाड्यांना सोडून राजकन्येने एका ऋषीला वा गोसाव्याला पसंत करावे, हे त्यांना मान्य नव्हते पण जमदग्नीने सर्वांची 'शलभा इव पावकाः' अशी अवस्था केली. रेणुका-जमदग्नी विवाहबद्ध झाली.

जमदग्नी ध्यानस्थ बसले असता, रेणुका पाणी आणण्यासाठी नदीवर गेली. तेव्हा तेथे चित्ररथ गंधर्व आपल्या प्रेयसीसह जलविहार करीत होता. ती जलक्रीडा पाहून तरुण रेणुकेचे मन विचलित झाले. जमदग्नीस हे कळले तेव्हा त्यांचा संताप अनावर झाला. या घोर अपराधाबद्दल रेणुकेला ठार मारण्याचा आदेश त्यांनी आपल्या चार पुत्रांना दिला पण त्यांनी ते नाकारले, तेव्हा शापाने जमदग्नीने त्यांना भस्म केले. परशुराम हा हिमालयात तप करण्यासाठी गेला होता. त्यास पित्याने पाचारण केले व शिक्षा देण्याबद्दल बजावले. परशुरामाने पितृआज्ञा म्हणून आपल्या मातेचे धड शरीरापासून आपल्या परशूने तात्काळ अलग केले. ते बघून जमदग्नी त्याच्यावर निहायत खूष झाले व त्यांनी पुत्रास वर मागण्यास सांगितले. परशुरामाने 'माझी आई जिवंत करा' असा वर मागितला व रेणुका पुन्हा जिवंत झाली.

गणेशपुराणात ही कथा वेगळ्याच तऱ्हेने सांगितली आहे. रेणुका व सहस्रार्जुनाची पत्नी या सख्ख्या बहिणी. पतिदेवांच्या रहाणीत व व्यवसायात जमीनअस्मानाचा फरक. तरी आपापल्यापरी त्या सुखी होत्या. रेणुकेने मेहुण्यास आश्रमात आमंत्रित केले व त्याचे आदरातिथ्य केले. एवढे आदरातिथ्याचे कारण आश्रमात कामधेनू आहे हे सहस्रार्जुनाने ओळखले. त्यास मत्सर वाटला. ध्यानस्थ जमदग्नीचा त्याने वध केला व रेणुका प्रतिकार करीत असता तिलाही एकवीस वार केले. रेणुकेला फार दुःख झाले. तिने प्रतिज्ञा केली की 'याचे प्रायश्चित्त म्हणून माझा पुत्र ही पृथ्वी एकवीस वेळा निःक्षत्रिय करील.' परशुरामाने

आपल्या वडिलांचे प्रेत व दुसरीकडे आई रेणुकेस कावडीमध्ये बसविले व तो नर्मदेवरून सिंहाद्री पर्वतावर आला. तेथे आकाशवाणी झाली की 'जमदग्नीला येथे अग्निकाष्ठ दे. कारण ही पावनभूमी आहे.' माहूरगडी अग्निसंस्काराची तयारी झाली. रेणुका सती जाण्यापूर्वी म्हणाली 'मी सती जात असता या चितेकडे येऊ नको. तुला ते पहावले जाणार नाही.'. परशुरामाने कबूल केले. तो काही पावले पुढे गेला खरा, पण त्यास मातृविरह असह्य झाला. रस्त्यातूनच तो मागे फिरला व 'आई' म्हणून त्याने हंबरडा फोडला. त्यावेळी रेणुकेचे सर्व शरीर भस्मीभूत झाले होते. तिचे शिर तेवढे शिल्लक होते त्या शिरातूनच पुत्राच्या हाकेला 'ओ' मिळाली. माहूरला रेणुकादेवीचा मुखवटा तेवढा दिसतो व इतर शरीर दृग्गोचर होत नाही ते याचमुळे!

'भगवान परशुराम' कथा कन्हय्यालाल मुनशी यांनी लिहिली आहे, त्यात रोगग्रस्तांच्या सेवेकरिता रेणुका आपले जीवन व्यतीत करीत होती व जमदग्नीला त्याचा संताप आला असे कथन केले आहे. यात रेणुका ही जाज्वल्य पतिव्रता होती हे दर्शविले आहे. उलटपक्षी, भारदस्त भाषा असूनदेखील तेजस्वी रेणुकेची जाज्वल्य लोककथा न झेपल्यामुळे गडावरून मोठा दगड लोटून देताच तो ताडमाड करीत तळाला जातो, तसे श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या पहिल्याच 'रेणुका' या पौराणिक कादंबरीच्या कथानकाचे झाले आहे.

पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून साक्षात आईचा वध करणारा पुत्र, आईच्या मायेने असुसलेला व पुन्हा वर मागून तिला जिवंत करणारा मुलगा, आई चितेवर प्रवेश करीत असता तिच्या वियोगाने विव्हल होऊन 'आई' म्हणून हंबरडा फोडणारा वत्स, पोटच्या पोराचा अक्षम्य अपराध गिळून सर्व देह भस्मीभूत झाला असता 'ओ' देण्यासाठी शिर तेवढे शाबूत ठेवणारी माता, लोकसेवेसाठी रत होणारी व पतीच्या संतापाला न डगमगणारी वीरमाता. मातापित्यांच्या अपमानाचा सूड उगविण्यासाठी व आईच्या प्रतिज्ञापूर्तीसाठी एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करणारा एकवीर! अशा राजबिंड्यास जन्म देणारी 'एकवीरा' रेणुका! हे सर्व कथानक अग्नीसारखे तेजस्वी आहे. अग्नीची ज्वाला जशी एकापेक्षा दुसरी अधिक वेगाने आकाशाकडे धगधगत जात असते, तशी रेणुकेच्या कथानकातील एकेक घटना आहे. ज्वालामुखीमधील आगीप्रमाणे सर्व कथानक बाहेर उफाळून येते व सर्व दूरवर या कथेचा लाव्हारस पसरतो. थंड झालेला हा सहस्र वर्षांनंतरचा लाव्हारस माहूरगडाच्या रूपाने अगर सह्य पर्वतराजीच्या रूपाने घनावस्थेत आज उभा आहे.

परशुरामाने आपल्या मातेचा शिरच्छेद केल्यानंतर दोन वर आपल्या पित्याजवळ मागितले : (१) मातेला माझ्याकडून झालेल्या हत्येची जाणीव न देता जिवंत करा.

(२) तुम्ही आपला संताप पूर्णतः जिंकून आपले जीवन प्रशांत करा. जमदग्नीने दोन्ही अटी मान्य केल्या, यानंतर जमदग्नीवर सहस्रार्जुनाने हल्ला केला तेव्हा त्यांनी कोणताच प्रतिकार केला नाही. प्रशांत व अहिंसेचे व्रत घेणाऱ्या तपस्व्याचा त्यात प्राण गेला. असाही चित्तवेधक पैलू या कथानकाचा सांगण्यात येतो.

रेणुकेचे गगनासम अपार चरित्र कसे कवळता येईल? तिचे महातेज कसे धवळता येईल? गगनापेक्षाही विशाल प्रतिभेच्या कालिदासालाच ते शक्य आहे. अशा जगदंबेचा तेजोमय तांदळा माहूरगावाला लागून असलेल्या डोंगराच्या माथ्यावर आहे. वर चढण्यासाठी हजारबाराशे दगडी पायऱ्या बांधलेल्या आहेत. या रस्त्याच्या डाव्या बाजूला डोंगराच्या पायथ्याशी संत विष्णुदासाचा मठ आहे. संत विष्णुदासाने आपल्या भक्तिभावपूर्ण कवनाने विदर्भ-मराठवाडा विभागात रेणुकामातेची महती जागती गाजती केली आहे.

रेणुकेचे तांदळास्वरूप असले तरी त्यावर भव्य असे नाक-डोळे-ओठ उठावदारपणे दिसतात. शेंदराचे कित्येक वर्षांचे आवरण नुकतेच गळून पडल्यामुळे मुखवटा पूर्वीसारखा आक्राळविक्राळ वाटत नाही. त्यास रेखीवपणा आलेला आहे. गाभाऱ्यातील सिंहमुखासनावरील हा मुखवटा पाच फूट उंचीचा असेल. यास लपेटण्यास नऊवारी दोन लुगडी लागतात, असे सांगतात. रेणुकेच्या विशाल ललाटावर ॐ काढलेला असतो. आळीपाळीने 'ॐ ऐं ह्रीं क्लींचा मुडा यै वि चै' या मंत्रातील एकाक्षर काढीत असतात. ही विश्वजननी 'पूर्वमुखा बैसली' आहे.



परशुराम क्षेत्रातील रेणुकेचे देवालय

ही देवी अनेक घराण्यांची कुलस्वामिनी आहे. विदर्भ-मराठवाड्यात माहूरची रेणुका व तुळजापूरची अंबा ही दोन्ही कुलदैवते आहेत ; हे विशेष होय. रेणुकेच्या पूजेचे तीन प्रकार आहेत : (१) मानसपूजा—यात अभिषेक, लुगडेखण देणे, ओटी भरणे व नैवेद्य यांचा समावेश होतो पण ही एकट्यानेच करायची असते. (२) भोगीपूजा—ही पूजा सहकुटुंब करायची असते. पाच खण, पाच जोडवी अशा पाच पाच वस्तूंचा यात समावेश असतो. (३) अलंकारपूजा—या पूजेत ११ अलंकारांपासून १०१ ते १००१ अलंकार देवीस अर्पण करतात.

नवरात्राला हा देवीचा मुखवटा अलंकारांनी जडवतात. या देवीच्या अलंकारांत काळ्यामण्यांनी जडविलेले मंगलसूत्र तसेच भांगटिळा, कर्णफूल, बोरमाळ, पुतळ्यांची माळ, गरसोळी, बिजलीबिजोरा व नथ यांचा समावेश होतो.

देवी नवरात्रात मोठ्या प्रमाणात पूजाअर्चा केली जाते. शिखर मंगलवाद्याने, चौघड्याने दुमदुमून जाते. 'आश्विनी शुद्धपक्षी अंबा बैसली सिंहासनीं हो। प्रतिपदेपासूनी घटस्थापना करूनी हो ॥' प्रथम दिवशी घटस्थापना होते व मंगलसूत्र घालण्यात येते. द्वितीयेला चौसष्ट योगिनी जमतात व परशुरामाच्या जननीची पूजा करण्यात येते. 'तृतीयेचे दिवशी अंबे श्रृंगार मांडिला हो ॥' आरती पूजा करण्यात येते. 'चतुर्थीचे दिवशी विश्वव्यापक जननी हो। उपासका पाहसी नित्य प्रसन्न होऊनी हो ॥' रेणुकेसमोर भक्त लोटांगणे घालीत असतात. 'पंचमीचे दिवशी व्रत उपांग ललिता हो। अर्घ्य पाद्य पूजने तुला भवानी स्तविती हो ॥' ललितापंचमीचा हा महत्त्वाचा दिवस आहे. या दिवशी देवीस सर्व अलंकार घालतात. सवाष्ण ब्राह्मण बोलावतात. 'षष्ठीचे दिवशी भक्त आनंद वर्तला हो। घेऊनी दिवट्या हाती हर्षे गोंधळ घातला हो ॥', 'सप्तमीच्या दिवशी जाईजुई शेवंतीपूजा रोखियली हो ॥' अष्टमीचा हा महत्त्वाचा दिवस. सप्तशतीचे पारायण असते. बारा ब्राह्मण, बारा सवाष्ण आमंत्रित करतात. बोकड बळी देतात. तो तुकाईजवळ कापतात. रात्री १२॥ वाजता भव्य पूजा होते. मांसाचा नैवेद्य दाखवितात. देवीच्या मुखात तो ठेवतात. मराठा-भोपे ते सानंद ग्रहण करतात. नवमीचा तर सर्वांत महत्त्वाचा दिवस. 'नवमीच्या दिवशी नव दिवसांचे पारणे हो। सप्तशती जपहोम हवन सद्भक्ति करूनी हो। षड्रसे अन्ने नैवेद्यासी अर्पियेली भोजनी ॥' सायंकाळी होमकुंडावर झटका पद्धतीने बळी देतात. बोकडाच्या रक्ताने भिजलेला पंजा दरवाजावर उमटवितात व देवीच्या हनुवटीवर टिळा लावतात. याशिवाय हा टिळा मराठा-भोप्याकडून लावून घेण्याचा मान पोलिस पाटील, महाली पाटील देशमुख, देशपांडे या वतनदार मंडळीस असतो. बोकड झटका प्रकाराने कापल्यानंतर तो तडफडत असतो तोपर्यंतच रक्ताचे टिळे लावले पाहिजेत असा दंडक आहे. हा आमिषाचा प्रसाद

मराठा-भोपे आमोदाने खातात. मराठा-भोपे हेच मानाचे पुजारी आहेत. सध्या या मंदिरात श्री. रेणुकादास जयराम भोपे हे तरुण मराठा पुजारी असून दुसरे श्री. अण्णाजी रामभाऊ देव हे तरुण ब्राह्मण पुजारी आहेत. हे दोघेही अप्रमत्त व अनलस असे मित्रद्वय आहेत. भक्तगणांना येथे सर्व सुखसोयी आहेत. मराठा-भोप्यांच्या गळ्यात कवड्यांची माळ असते. इकडील प्रसिद्ध भारती घराण्यातील ते आहेत. त्यांना परंपरेने अनेक सणावारी अग्रपूजेचा मान असतो. देवीच्या नवरात्रात तर त्यांचे कुटुंब कडकडीत व्रतस्थ असते. देवी घटस्थ असेपर्यंत ते बाजेवर निजत नाहीत. जमिनीवर घोंगडे टाकून त्यावर अंग टाकतात. जोगवा मागून जे पीठमीठ मिळेल तेवढेच खातात.

**पूर्ण बोधाची भरीन मी परडी ।**
**आशामनशाची पाडीन दरडी ।**
**अमृत रसाची भरीन दुरडी ।**
**आईचा जोगवा, जोगवा, जोगवा मी मागेन ।।**

अशा तऱ्हेने बाईबुवा पाच घरे जोगवा मागतात.

दसऱ्याच्या दिवशी फारच थाटामाटाने येथे सोहाळा साजरा होतो.

**दशमीचे दिवशी अंबा निघे सीमोल्लंघनी हो ।**
**सिंहारूढ करी शस्त्रे सबळ ती घेऊनी हो ।।. . .**

सूर्योदयाला सर्व निशाणांची उभारणी होते. नव्या पताकांनी शिखर नटून जाते. परशुरामाची भक्तिभावे पूजा होते. सायंकाळी वरदेवीची मूर्ती पालखीत घालून नरनारायण टेकडीपर्यंत ती वाजतगाजत नेतात. नंतर ती रेणुकेजवळ परत आणतात. सर्व गावकरी या दिवशी देवीला सोने अर्पण करतात.

रेणुकेच्या शिखरावर महाद्वाराजवळ नगारखान्याच्या उजव्या बाजूला एक शेंदराची देवी आहे. तिला महाकाली म्हणतात. प्रत्येक वेळी अग्रपूजेचा मान या महाकालीस आहे. जेव्हा खण, नारळ, खारका व तांदूळ यांची रेणुकेला ओटी भरतात, तेव्हा त्या ओटीतला काही अंश या महाकालीला अर्पण केला पाहिजे. जेव्हा रेणुकेवर करंज्या-पात्यांचा फुलारा चढविला जातो, तेव्हा काही पात्या या देवीजवळ समर्पिल्या जातात.

महाकाली ही रेणुकेची धाकटी बहीण. ही कोल्हापूरची महालक्ष्मी आहे म्हणतात. किल्ल्यामध्ये हिचे स्थान होते.

**कोल्हापुराहून आली तुझ्याचसाठी महाकाली ।**
**ठाण मांडूनी बैसली किल्ल्यांत ।।**

महाकालीला झंपटनाथ नावाचा पोरगा होता. हा होता मुलखाचा दांडगेश्वर! आईला त्रास द्यायचा. तो पळून रेणुकेजवळ आला. तेथे लपून बसला. महाकालीचा

संताप अनावर झाला. रेणुकेजवळ ती संतापाने आली. रेणुकेने 'क्षमा' करण्याचे आश्वासन महाकालीकडून घेऊन झंपटनाथाला तिच्या स्वाधीन केले. महाकालीला आपल्या शेजारीच ठेवून घेतले व अग्रपूजेचा मान दिला आणि झंपटनाथाचे दर्शन घेतल्यावरच माहूरगडची यात्रा सफल होईल असे त्यासही वरदान दिले. 'तीर्थयात्रा सफळ न होत, त्याच्या दर्शनावाचूनी ।।' पूर्वी जाण्याचा रस्ताही झंपटनाथाजवळून असल्यामुळे त्याचे दर्शनही गड उतरताना आपोआपच होत असे. सध्या रस्ता दुसरीकडून गेला आहे.

रेणुकेच्या मंदिराचा रंग पांढरा आहे. जवळपासच्या पन्नास मैलांच्या क्षेत्रफळात रेणुका कुलदैवत असलेल्या कोणत्याही घराला बाहेरून पांढरा रंग लावीत नाहीत. सध्या हा नियम कटाक्षाने पाळीत नाहीत. रेणुकेचा नैवेद्य सणवाराला पुरणपोळीचा असतो. तांबड्या रंगाची फुले ही तिच्या फार आवडीची. रेणुकेचा नेहमीचा आवडता पदार्थ म्हणजे तेलपानगा (ज्वारी, मूग इ. पिठाचा). जेवणानंतर 'हस्त-मुख-प्रक्षालन, त्रयोदश-गुणी तांबुलदान' होते. नागवेलीच्या पानांचा विडा देवीला देण्याचा प्रघात आहे. हा विडा २५ पानांपासून १००१ पानांपर्यंत मोठा असू शकतो. देवीच्या तोंडात हा तांबूल घालतात व तोच प्रसाद म्हणून भक्तास देतात, याशिवाय भक्तांना प्रसाद म्हणून नारळ, फुले, हळदकुंकू व मळवट देण्याची पद्धत आहे.

रेणुकेच्या शिखरापासून दत्तशिखर तीन एक मैल दूर आहे व या रेणुकेच्या शिखराच्या समोर जे शिखर आहे त्यावर किल्ला आहे. या किल्ल्यावर चिनीमातीचा दरवाजा आहे. तेथील दलभंजन बुरजावर एक शिळा आहे, तीमधील छिद्रातून कालिकादेवीची पूजा करतात. या देवीने लहान मूल खाल्ल्याची कपोलकथा आहे, या देवीला बुजवलेले आहे. 'चिनलेली देवी' असेही हिला म्हणतात.

हा किल्ला कोणी बांधला, याची निश्चित माहिती नाही. रायबागन नावाची देशमुख घराण्यातील राणी तेथे रहात असावी. शिवाजीराजे इकडे आले होते तेव्हा त्यांनी हिचा पराभव करून जीवदान दिले असे म्हणतात. या बाजूला माहूरच्या परिसरात 'जमठाकरी' हा कुळाचार आषाढ शु॥ ५ला करीत असतात. या दिवशी नागपंचमीप्रमाणे तळलेले अगर कापलेले जिन्नस स्वयंपाकात वापरीत नाहीत. कदाचित 'जमठाकरी'मधील जमाजी म्हणून नागलोकांपैकी कोणी राजा या किल्ल्यावर असेल. राणा प्रतापसिंहाचा कोणी भाऊबंद जयसिंह ठाकूर राजस्थानमधून इकडे आला व त्याने हा किल्ला बांधला असे सांगतात. याच्याच नावाने 'जमठाकरी' साजरी करीत असावे. या भागात बंजारी समाज फार मोठ्या संख्येने रहातो. राजस्थानच्या निवासियांप्रमाणे त्यांचे पेहराव, नावठाव

असल्यामुळे जयसिंहाने राजस्थानातून या लोकांना इकडे आणले असावे असाही तर्क आहे.

दत्तशिखरावर विस्तृत पठार आहे. तेथे एकमुखी दत्ताची मूर्ती आहे. पूर्वी येथे पंधरासोळाशे तोळे सोन्याची दत्ताची सुंदर मूर्ती होती ती काही वर्षांपूर्वी चोरीस गेली. ही मूर्ती एकमुखी होती. भारती गोसाव्याचे येथे वसतिस्थान आहे. येथे देवदेवतांची मंदिरे, विस्तृत प्राकार, अनेक ओवऱ्या, बैराग्यांची व महंतांची समाधिस्थाने, इमारती वगैरे मोठा पसारा आहे. येथे भारती घराण्यातील श्यामसुंदर भारती यांची बाराशे वर्षांपूर्वीची समाधी आहे, यावरून दत्तस्थान व भारतीमठ याची प्राचीनता ध्यानात येते. दत्तजयंती थाटामाटाने येथे साजरी होते. हजारो यात्रिकांची येथे रीघ लागलेली असते. सिंहस्थपर्वणीचे येथे फार महत्त्व आहे. गुरू सिंहराशीत आला म्हणजे येथील मठाधिपती महंत गडाखाली उतरतात. सर्वत्र संचार करतात. गावोगाव जनता त्यांचा मानसन्मान करीत असते. इतर समयी ते गडस्थच असतात. महंत आपल्या भक्तांना कणीधुगरी (मूगज्वारीच्या कण्या), मुरमुरे, भस्म, प्रसाद म्हणून वाटतात. प्रसादात नारळ कधी नसतो, खोबऱ्याच्या वाट्या असतात हे विशेष होय.

या संस्थानास निझामानेदेखील चाळीस गावांची इनामे दिलेली होती. येथे दोन गोसावी रहात होते. ते सिद्धसाधक असून दिशाभूल करतात, असा अपसमज पसरलेला होता. राजा येथे आला असता, त्याने तेथील दगडाच्या नंदीला गवत खावयास लावा म्हणजे आमचा तुमच्या विद्येवर विश्वास बसेल असे आव्हान गोसाव्यांना दिले. त्या दगडाच्या नंदीला ते गवत गोसाव्यांनी खावयास लावले तेव्हा राजा चकित झाला व त्याने चाळीस गावांचे इनाम या संस्थानास दिले अशी दंतकथा सांगतात.

येथून दक्षिणेस सुमारे मैलभर अंतरावर दत्तात्रेयाची माता अनसूया हिचे मंदिर आहे. तेथे अत्रीऋषींच्या पादुका आहेत. दत्त मंदिराजवळ प्रसिद्ध 'सर्वतीर्थ' आहे.

दत्तात्रेय हे अनेक कुटुंबांचे कुलदैवत आहे. दत्तभक्तांनी या क्षेत्राचे माहात्म्य फार मोठे आहे. माहूर हे दत्तात्रेयाचे शयनस्थान समजले जाते. प्रयागात दत्तात्रेय स्नान करतात, कोल्हापूरला भिक्षा मागतात, असा समज आहे.

**सर्वात्मा तू असोनी निजसी बा माहुरी।**
**निजदासा उद्धराया भिक्षा मागे कोल्हापुरी।**
**करिसी तू स्नान नित्यप्रेमे काशीपुरी।**
**वससी बा विश्वराया सह्याद्रीगिरीवर ॥**

डोंगराच्या पायथ्याशी देवदेवेश्वरीचा मठ आहे. बाराव्या शतकात महानुभावपंथाचे संस्थापक चक्रधरस्वामी यांचे गुरू दत्तभक्त चांगदेव राऊळ यांना येथे

दत्तसाक्षात्कार झाला. यापूर्वी दत्तस्थानाची विशेष ख्याती असावी. महानुभाव संप्रदायात माहूरचा महिमा विशेष आहे. ज्या कृष्ण आवळीच्या पवित्र झाडामुळे 'आमलिका ग्राम' म्हणत असत, ते झाड देवदेवेश्वराजवळच आहे. देवदेवेश्वरी हे दत्तात्रेयाचे शयनस्थान असल्यामुळे येथील मठास दरवाजे कोठेही नाहीत. येथे रोज रात्री दत्ताला झोपण्यासाठी शय्या तयार करून ठेवतात व दुसरे दिवशी सकाळी ही शय्या व तीवरील पसरलेली फुले विस्कळीत झालेली दिसतात असे तेथील महानुभाव भक्तिभावाने सांगतात.

देवी रेणुका, भगवान परशुराम, जमदग्नीऋषी, महामुनी दत्तात्रेय, देवदेवेश्वर या सर्व देवता व त्यांच्यामागील पौराणिक कथा, शाक्त, वैष्णव, महानुभाव पंथ व संप्रदाय एकमेकांपासून भिन्न व विभक्त असले तरी त्यांचा समन्वय करणाऱ्या लोककथा व गाथा विद्यमान आहेत. वास्तविक आजही देवीच्या नवरात्री नवमीचे दिवशी महानुभाव पंथीय लोक पूर्ण दिवस आपले गाव सोडून बाहेर कोठे तरी मुक्काम करतात व बाहेरच स्वयंपाक करतात. नवमीचा होमहवनाचा व हिंसा प्रकाराचा त्यांना विटाळदेखील नको असतो. गावामध्ये चुकून असलेला महानुभाव त्या दिवशी थुंकीदेखील गिळणे निषिद्ध मानतो. दत्तात्रेयाकडे भक्तिभावाने जाणारे भक्त रेणुकादेवीच्या वाटेसही जात नाहीत. उलटपक्षी, काही चंडीभक्त हे महानुभावाचे दर्शन होणे अपशकुन मानतात, सर्व दिवस वाईट जाईल असे समजतात; माणसामाणसांतील हा बेबनाव व बेकी नष्ट करण्यासाठी संत-महंतांनी त्यांच्या देवदेवतांचीच एकी व बनाव असणाऱ्या कथा व गाथा रचल्या आहेत व माणसाला देवमाणूस करण्याचा संस्कार केला आहे. देवांचाच संयुक्त मोर्चा करून विभक्त देवभक्तांना एकत्र आणण्याचा प्रयत्न केला आहे. आजही कोणाच्याच देवाला या देवभक्तांनी दाद दिलेली नाही हे अलाहिदा!

परशुराम जेव्हा रेणुकाआईला व जमदग्नीच्या शवाला कावडीत टाकून माहूरगडावर आले तेव्हा त्यांना दत्तात्रेयाचे दर्शन झाले. जमदग्नींचेही गुरू दत्तमाउलीच. दत्ताच्या सांगण्यावरून आपल्या बाणाने पृथ्वीवरील सर्व तीर्थे परशुरामाने एकत्रित आणली, त्यासच सर्वतीर्थ असे नाव आहे. सर्वतीर्थाचा पाण्याचा झरा कधीच आटत नाही, अशी ख्याती आहे. रेणुका सती गेली त्या ठिकाणाला 'मूलधरी' म्हणतात. रेणुकेच्या गडावर जाताना जेथे पायऱ्या चढाव्या लागतात त्याच्या उजव्या बाजूला मूलधरी आजही आहे. तेथे भस्म सापडते ते कोणी घरी नेत नाहीत.

दत्तशिखरावर चिंतामणी, भैरव व कामाक्षी यांची मंदिरे आहेत, याबद्दल मनोवेधक कथा आहेत. सौभरी नावाच्या ऋषीला गुणवती नावाची कन्या होती. तिला वडिलाने मुलगा म्हणूनच वाढविले, विद्यासंपन्न केले. नंतर या तपस्विनीने

शंभर वर्षे तपश्चर्या केली. 'तू स्त्री आहेस तुला पतीची सेवा केल्याविना मोक्ष मिळणार नाही' अशी आकाशवाणी झाली. पतीचा शोध घेत घेत ती माहूरगडावर आली. गर्ग ब्राह्मणाचा पुत्र अमृतकुंड हा दुराचरणी होता. वेश्येकडे जाणे, चोरी करणे व पोट भरणे हा त्याचा नित्याचा उद्योग. त्याला रक्तपिती झाली व त्याच्या अंगाला दुर्गंधी सुटली. गुणवतीने त्यास पाहिले तेव्हा तिला हा योग्य पती वाटला. तिला केवळ सेवा करण्यासाठी पती पाहिजे होता ! ! जुवा खेळण्यासाठी आपल्या पतीला पाळण्यात बसवून ती अड्ड्यावर नेत असे. एक वेळ हा पाळणा मांडव्य ऋषीला लागला. (मांडवी नावाचे गाव पण माहूरवरून काही मैलांवर आहे.) ते फार संतापले. त्यांनी 'तुझा पती सूर्य उगवताच मृत्यू पावेल' असा गुणवतीला शाप दिला. पतिव्रता गुणवतीने सूर्योदयच थोपवून धरला. देवादिक घाबरले, त्यांचे व्यवहारच बंद झाले. त्यांनी विष्णूकडे धाव घेतली तेव्हा ते म्हणाले, 'पातिव्रत्यापुढे माझे काहीच चालत नाही. तुम्ही गुणवतीसम दुसरी महान पतिव्रता अत्रीऋषीच्या आश्रमात अनसूया आहे, तिच्याकडे जा.' देव अनसूयेकडे गेले. 'सूर्योदय होऊ दे. तुझा पती मरणार नाही' असे अनसूयेने गुणवतीला आवाहन केले. सूर्योदय झाला, गुणवतीचा पती मेला, पण अनसूयेने आपल्या पातिव्रत्याच्या तेजाने त्यास पुनः जिवंत केले व त्याचा दुर्धर रोग नाहीसा केला.

देव या कृत्याने फार आनंदले. त्यांनी अनसूयेस कोणताही वर माग असे सांगितले. अनसूयेने 'ब्रह्मा, विष्णू, महेश' हे तिन्ही देव माझ्या पोटी पुत्र म्हणून आले पाहिजेत अशी इच्छा प्रकट केली. हीच दत्तात्रेयाच्या जन्माची कथा आहे. या कहाणीतील गुणवतीला 'सयामाया' म्हणतात. अनसूयामातेच्या शिखराच्या पलीकडे जी उंच टेकडी दिसते, तिला आजही सयामायाचा पहाड म्हणून ओळखतात.

देवदेवेश्वराची पण अशीच कथा आहे. रेणुका व दत्तात्रेय यांच्या आग्रहाने ब्रह्मदेव क्षीरसागरात गेले व तेथून त्यांनी भगवान विष्णूला माहुरात आणले. विष्णूने येताना आवळीचे झाड बरोबर आणले. विष्णू म्हणजे कृष्ण, याचमुळे त्या झाडाला कृष्णावळी असे म्हणतात. आवळीच्या झाडाचे माहात्म्य सर्वश्रुतच आहे. रेणुकेने परशुरामाला, 'विष्णूच्या पोटात प्रवेश कर, तेथे तुझा पिता शंकर आहे, त्याची प्रार्थना कर आणि विष्णू, तू व पिता शंकर अशा तिन्ही देवांच्या रूपाने दंडकारण्यात दत्तात्रेयाच्या आश्रमात राहून ब्रह्मांडाचे रक्षण कर' अशी आज्ञा दिली. परशुराम तीन देवांच्या रूपात देवदेवेश्वर म्हणून तेथे निवास करीत आहे.

त्या काळचे सर्व पंथ, संप्रदाय, वहिवाटी यांचा मिलाफ करण्यासाठी सर्व देवदेवतांना एकाच कथेच्या गाठीत गुंफून ठेवण्याचे यापूर्वी किती तरी प्रयोग येथे झाले असतील. धर्म, पंथ, संप्रदाय यांना एकत्र करणाऱ्या कथा व गाथा यांचे माहूर क्षेत्र हे फार मोठे नमुनेदार केंद्र आहे.

येथील निरनिराळी तीर्थस्नाने भिन्नभिन्न देवभक्तांना सारखीच पवित्र श्रद्धा-स्थाने आहेत. या तीर्थराजांच्यादेखील विविध कथा सांगून त्यांना त्यामधील पाण्यापेक्षाही पवित्र केलेले आहे. साधारणतः माहूरला येणारी व्यक्ती तीर्थ उपवास करते व तीर्थस्नान करते. या यजमानाकरवी येथील कुळ उपाध्याय तोडक्यामोडक्या शब्दांत खालीलप्रमाणे तीर्थसंकल्प सोडतो——

**नमोस्तु तीर्थराजाय । मातृतीर्थाय नमोस्तुते ।**
**परशराम यज्ञेकृते । तीर्थेच ग्रहणार्थ नमोस्तुते ।**
**कायिक, वाचिक, मानसिक । दोषनिवारणार्थ मातृतीर्थ ।**
**स्नानमहं करिष्यते ।**

असे म्हणून यजमान ओंजळभर पाणी सोडतो व 'सुस्नात्भव' असे पुजाऱ्याने म्हटल्यावर तीर्थस्नान घेण्यास यजमान मोकळे होतात.

मोवाळे नावाचे प्रचंड असे दगडी बांधणीचे तळे डोंगराच्या पायथ्याशी आहे. मोवाळे वा मोहतळे (मोहाचे वृक्ष असल्यामुळे) किंवा मातृतीर्थ. एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केल्यानंतर परशुराम येथे आला होता, म्हणून हे मातृतीर्थ झाले. मातेच्या मृत्यूनंतर उत्तरक्रियेसाठी येथे लोक येत असतात. इतर पितृजनासाठी 'सर्वतीर्थ' आहे. याशिवाय किल्ल्यावर ब्रह्मतीर्थ आहे त्यास विजाळे म्हणतात.

**ब्रह्मतीर्थ विजाळे जे का पावन दुर्गांतरी ।**
**पदमतीर्थ विष्णूचे जे स्नाने भवभय हरी ।**
**मातृतीर्थाचा महिमा जे का अनुपम लोकांतरी ॥**

अशी या तीर्थराजांची पावन गाथा आहे, ज्यांनी पवित्र पाण्याप्रमाणे सर्व मानवांत समभाव स्थापिला आहे.

देवदेवेश्वर मंदिर



पंढरपूरचा विठोबा तुम्हाआम्हांला कसाही दिसो तुकोबाला तो 'सुंदर ते ध्यान उभा विटेवरी' असा वाटला तसेच रेणुकामातेचा हा तेजोमय तांदळा देवीभक्तांनी पाहिला तेव्हा ते मंत्रमुग्ध झाले व गाऊ लागले---

**अनुपम स्वरूपाची, तुझी धाटी । अन्य नसे या सृष्टी ।**
**तुजसम रूप दुसरे परमेष्टी । करिता झाला कष्टी ॥**
**नासिक अति सरळ हनुवटी । रुचिरामृतरस ओठी ।**
**कुंकुम चिरी शोभे मळवटी । कस्तुरी टिळा ललाटी ॥**
**समान जणू लवल्या धनुकोटी । आकर्ण लोचन भ्रुकुटी ॥**

अशी किती तरी शब्दपुष्पे 'आदिमूळ माये तू विश्वाची राणी । लावण्यरूप सौभाग्य शिराणी'च्या वर्णनासाठी उधळली आहेत व 'पाहता तुज देहभान विसंबे' असे धन्योद्गार काढले आहेत.

कवि विष्णुदासाने (हे कवी होते व चित्रकारही) तर आपल्या कुंचल्याने मनातील रेणुकेची प्रतिमाच चित्रित केली व रेणुकामातेचे रेखीव, कोमल व अति सुंदर चित्रच रेखाटले आहे. ते प्रसिद्ध चित्र सर्वत्र मिळते. रेणुकामातेजवळ ती माय व आपण लेकरू अशा अलोट मातृप्रेमानेच आपल्या भक्तिभावाचा निर्धार देवीभक्तांनी केलेला आहे.

**तू माय मी लेकरू । तू गाय मी वासरू ।**
**तू पक्षिणी मी पाखरू । हा निर्धार माझा रेणुके ॥**

माहूर क्षेत्री चैत्र शुद्ध प्रतिपदा, चैत्री पुनव, आषाढी पौर्णिमा, आश्विनी नवरात्र, कार्तिकी पुनव, दत्तजयंती, पौष वद्य एकादशी व चंद्रसूर्य ग्रहणे या पर्वकाळी यात्रा भरत असतात. विशेषत: श्रावण पौर्णिमेला हजारोंच्या संख्येने संपूर्ण माहूरगडाला ग्रामवासी प्रदक्षिणा घालतात. या उपासनेला 'परक्कमा' म्हणतात. परिक्रमणा याचा हा अपभ्रंश असावा.

उत्तुंग पर्वतराजी व गर्द वनराजी यांमुळे हा विभाग अत्यंत रमणीय झालेला आहे. तप, अनुष्ठान, उपासना करण्यासाठी अनेकांनी ही तपोभूमी निवडली आहे व जागृत कुलदैवताला प्रसन्न करून घेतले आहे.

**मातापूर उंच हा पर्वत । अंबे अवघड हा घाट ।**
**अरण्य महाडोंगर । वृक्ष लागले दाट ॥**
**कठीण मार्ग हा दिसतो । पुढे कळे न वाट ।**
**दृष्टि हो देखिले मूळपीठ । हरले माझे काट ॥**

असे या पर्वतराजीचे सुरेख वर्णन केले आहे. परंतु वनसंहार करणाऱ्यांनी येथेही हात घातल्यामुळे पूर्वीची घनदाट वनराजी आता उरली नाही. शिखरावर थेटपर्यंत मोटारीचे व बसेसचे रस्ते आणि सर्वत्र विजेचे दिवे व पाण्याचे नळ

गेल्यामुळे वातावरणात बराच बदल झाला आहे. रेणुकेच्या महाद्वारापूर्वी एखादे 'देवीस्तोत्र' कोरण्याऐवजी आपल्याच क्षणभंगुर नावाचा भला मोठा संगमरवरी दगड एका मंत्र्याने लावला आहे. या व अनेक कारणांनी पुरातन सभ्यता, सनातन संस्कार यांचा तोंडवळा आता बदलू लागला आहे. तरी पण ज्या ज्या समयी——

**यात्रा आली कार्तिकीची । अंकित झाली प्रेमळांची ।**
**गर्जना होते संबळाची । वाद्ये वाजती, भक्त नाचती ॥**
**कीर्ती वर्णिती, करिती स्तुति अपर्णेची । अपरंपार लीला तिची ॥**

या भक्तिभावाच्या मंगल वातावरणाचे पडघम आजही तेथे वाजत असतातच आणि 'देवी तुजवीण दैवत नेणे आणिक जाण हो' अशी जाण असणाऱ्या निष्ठावान रेणुकादासांना आजही या मातापूर तपोभूमीबद्दल, तेथील पावन वातावरणाविषयी जाज्वल्य व जागृत जगदंबेबद्दल असेच वाटते व अनंत काळापावेतो असेच वाटत रहाणार की——

**मातापुरी एकान्त निवान्त स्थानी । ध्यानस्थ बसावे हात जोडोनी ।**
**रेणुके, रेणुके म्हणता क्षणी । पोटी धरावे त्वा रेणुके ॥**





# जोगती-जोगतीण

लेखक : श्री. रा. चिं. ढेरे

खंडोबाच्या उपासनेत जे वाघ्या-मुरळीचे महत्त्व, तेच यल्लम्मादेवीच्या उपासनेत जोगती-जोगतिणींचे आहे. नवसाने देवीला वाहिलेल्या मुलांपैकी मुलगे जोगती बनतात आणि मुली जोगतिणी. पदर कंबरेला खोचून आणि डोक्यावर देवीचा 'जग'[१] (परडी) घेऊन कपाळी भंडार-विभूती फासलेली जोगतीण देवांची गाणी म्हणत भिक्षा मागते आणि तिच्याबरोबरचा जोगती चौंडके वाजवून तिला साथ देतो.

**यल्लूबाई ग माझी आई ग**
**महिमा तुझी थ्वार**
**चहू देशाला तुझा कडाका**
**परडी घरोघर**

अशा प्रकारे देवीचा 'कडाका' म्हणजे कीर्ती गाजवीत हिंडणारी जोगती-जोगतीण यल्लम्मादेवीच्या भक्तिक्षेत्रात आदराचा विषय आहेत.

यल्लम्मादेवीचे प्रमुख ठाणे बेळगाव जिल्ह्यात सौंदत्ती या गावी आहे. यल्लम्मा या दक्षिणी देवीचे उन्नत स्वरूप म्हणजे माहूरची रेणुका. भक्त-भाविकांच्या दृष्टीने यल्लम्मा आणि रेणुका ही एकाच देवीची दोन पर्यायनामे आहेत. यमाई हेही याच देवीचे आणखी एक नाव आहे. महाराष्ट्रात सारोळे (जि. नगर), कण्हेरसर (जि. पुणे) इत्यादी ठिकाणी यमाईची ठाणी आहेत. दक्षिणेत 'सात बहिणी' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सात ग्रामदेवींपैकी एक यल्लम्मा ही आहे. मरिअम्माही त्याच वर्गातील देवी. 'भागिणीचे शिर' ही कथा

---

१. 'जग' म्हणजे जोगतिणीच्या डोक्यावरील परडी. या परडीत देवीचा मुखवटा असतो आणि त्या मुखवट्याच्या दोन्ही बाजूंना मोरपिसांचे पुंज असतात. या परडीच्या काठावर सभोवती लहानलहान पितळी कळस लावलेले असतात आणि परडीभोवती हिरवा खण चुण्या करून गुंडाळलेला असतो.

त्या संदर्भात महत्त्वाची आहे.[1] सौंदत्ती येथे यल्लम्मा, मातंगी आणि परशुराम या तिघांचीही स्थाने आहेत, ती या कथेनुसारच.

यल्लम्मादेवीच्या उन्नत स्वरूपाची म्हणजे रेणुकेची उपासना करणारा उपासक वर्ग 'गोंधळी' या नावाने आपणांस परिचित आहे. तिचे मूळ स्वरूप जोगती व जोगतिणी यांनी सांभाळले आहे. अर्थात गोंधळ्यांच्या कथागीतांत ज्याप्रमाणे 'यल्लम्मा' या नावाची व तत्संबंधित कथांची स्मृती अवशिष्ट आहे, त्याचप्रमाणे यल्लम्मा देवीविषयीच्या कथागीतांत रेणुकेचे चरित्र विस्ताराने आढळते. अर्थात हे चरित्र पुराणमान्य होणारे नाही. त्यातला तपशील हा लोककथांतून उचललेला आहे. 'मांगिणीचे शिर' ही आपल्याला परिचित झालेली कथा जोगती-जोगतिणीच्या गाण्यांतही गुंफलेली आढळते ! 'धड आहे यल्लम्माचं। शिर आहे मातंगीचं।' असा स्पष्ट उल्लेख एका गीतात आलेला आहे. परशुरामाने आईच्या इच्छेवरून दैत्याला मारले आणि त्याच्या धडाचे चौंडके करून व त्याला दैत्याच्या शिरांचे तंतू लावून त्या वाद्याच्या साथीने आईला वंदन केले, ही कल्पना जोगत्यांच्या गीतांतही निर्दिष्ट आहे.

**परशराम अवतार सहावा खरा**
**माझ्याजवळी असावा**
**मी करते धावा–बोले रेणुका ॥**

**असा मातेचा शब्द ऐकुनी**
**परशराम निघाले तेथुनी**
**फरशी मारली दैत्याला**
**वीर महिषासुराला**
**तोडून पाडला धरणीला**
**झाला जय जय डंका ॥**

**शिरातंतु काढूनशानी**
**सुती चवंडकं बनविलं त्यांनी**
**मस्तक फोडून केला टाळ**
**भार्गव गातो लडिवाळ**
**देवीजवळ सर्व काळ**
**याची नाही शंका ॥ . . .**

'रेणुकामाहात्म्या'त चौंडक्याचे स्पष्टीकरण याच कथेने दिलेले आहे. 'रेणुकामाहात्म्य' हा मराठी ओवीबद्ध ग्रंथ सौंदत्तीच्या यल्लम्माचे माहात्म्य



१. 'लोककथाकुंज', भाग १. 'The Village Gods of South India', pp. 116–117.

गाणारा असल्यामुळे त्यातील चौंडक्याच्या निर्मितीचे स्पष्टीकरण प्रस्तुत संदर्भात ताडून पहाण्यासारखे आहे.

> स्नान जाहल्यानंतर । बेटासुराचें छेदिलें शिर ।
> शिरा काढोनि सत्वर । तंतु केले पै देखा ॥
>
> ब्रह्मरंध्रीं छिद्र केलें । शिरातंतु त्यांत ओविले ।
> स्कंधीं घालोनियां भलें । नादें हर्षे आगळा ॥
>
> वाद्य जें कां वाजवित । तितूण तितूण ऐसें म्हणत ।
> तेणें होऊनियां आनंदभरित । आला मातेजवळिके ॥
>
> चौंडकें काखेसी घालोनि चोखा । आला रेणुकेच्या सन्मुखा ।
> नमन केलें स्वानंदे देखा । चरणीं माथा ठेवुनी ॥[१]

जोगती आणि जोगतीण ही प्राधान्याने आईबापांनी नवसाने देवीला वाहिलेली मुले असतात. आपल्याला मूल होत नसले किंवा असलेले मूल दुर्धर रोगाने आजारी पडले, तर भाविक स्त्रिया अगतिक होऊन यल्लम्मा देवीला नवस करतात की, 'यल्लूबाई, माझी कूस सुफळ कर, पहिलं मूल मी तुझ्या पायांवर वाहीन' किंवा 'आई, माझ्या पोराला या दुखण्यातून उठव, तो बरा झाला की मी त्याला तुझ्या पायांशी ठेवीन.' काही माणसे जाणतेपणीही स्वतः होऊन श्रद्धेने जोगती वा जोगतीण बनतात. जोगती वा जोगतीण बनावयाचे असेल, तर देवीच्या ठाणकावर (स्थानावर) जाऊन तेथे विधिपूर्वक माळ, परडी व शिक्का धारण करावा लागतो. म्हणजे गळयात मोत्यांची वा कवडयांची माळ घालावयाची, डोक्यावर देवीची मूर्ती असलेली परडी (म्हणजेच 'जग') घ्यावयाची आणि कपाळीला भंडार व विभूती फासावयाची. जोगती भिक्षेला घरोघरी गेले म्हणजे भिक्षा घालणाऱ्याच्या कपाळी भंडार लावतात आणि भरल्या तोंडाने आशीर्वाद देतात.

महारोगाने पछाडलेला एक मनुष्य आप्तस्वकीयांनी लाथाडल्यावर एका मित्राकडे जातो आणि मित्राच्या सल्ल्यावरून यल्लम्मादेवीला शरण गेल्यावर रोगमुक्त होऊन जोगती बनतो, अशा आशयाची कथा सांगणारे एक गीत जोगती-जोगतिणींच्या मुखी आढळते—

> काटा मोडला, नायटा झाला । गर्व मनुष्याला आला ।
> अंगावरनं सर्व नायटं । आगीन धेईला ॥
>
> नाकातोंडाच्या भिंती बसल्या । मनुष्यांतून गेला ।
> घरच्या बायकोनं वडून टाकलं । बाहेर रस्त्याला ॥

१. 'रेणुकामाहात्म्य', १०. ४४–४७.

डोंगराचा रस्ता धरला । पू बंद झाला ।
त्यानं जाऊन अंघोळ केली । खलूतीर्थाला ।
सव्वा रुपयाची भोगि वाहिली । यल्लूबाईला ।
माळ परडी घेऊन बसलो । उजव्या बाजूला ॥

जोगत्याला वाघ्याप्रमाणे आपल्या जातीतील मुलीशी लग्न करून संसार थाटण्याची मोकळीक आहे, परंतु जोगतिणीला मुरळीप्रमाणेच अविवाहित राहून जीवन कंठावे लागते. अर्थात याचे दुष्परिणाम घडावयाचे ते घडतातच. पुरुषत्वहीन पुरुष माणसेही 'जोगती' बनतात. यल्लम्मा अथवा रेणुका ही देवी कडक पातिव्रत्यासाठी प्रसिद्ध असल्यामुळे तिच्या उपासनेत जोगतिणींना आणि अशा पुरुषत्वहीन जोगत्यांना महत्त्वाचे स्थान आहे, असे मानले जाते.[१]

जोगती-जोगतिणींची गाणी जशी कानडीत आहेत, तशीच मराठीतही पुष्कळ आहेत. खंडोबाच्या गाण्यांत जशा रचनाकार वाघ्यांच्या मुद्रा आढळतात, तशाच या गाण्यांतही रचनाकार जोगत्यांच्या, चौंडक्यांच्या, नाममुद्रा आढळतात. 'एक होता राजा. . .' या लोकसाहित्य-संकलनात यल्लम्मादेवीची जी गाणी संकलित केलेली आहेत,[२] त्यांतील अनेक गाण्यांचा कर्ता वसगडे गावचा कोणी परसू चौंडक्या आहे. त्याशिवाय मानू परसू, यल्लू परसू, बाजी वस्ताद, आबा हरी, कृष्णाजी, बापू मारुती, यशोदा, तानू, भागू, सत्तू पुजारी, आक्कय्या जोगय्या, इत्यादी स्त्री-पुरुष रचनाकारांची नावे येतात. हे रचनाकार वसगडे, सावर्डे, कोल्हापूर, कोळेगाव, कोकटनूर आणि शिपूर या गावांचे रहिवासी आहेत.

जोगती-जोगतिणींच्या मुखी असलेल्या या गाण्यात प्रामुख्याने यल्लम्मादेवीचे म्हणजेच रेणुकेचे लोककथात्मक चरित्र कमीअधिक प्रमाणात गायिलेले आहे. एखाद-दुसरे केवळ भक्तिगीतही आढळते. परसू चौंडक्या एका भक्तिगीतात रेणुकेच्या भेटीला जाऊन तिच्या चरणांना मिठी मारण्याची इच्छा व्यक्त करतो—

चला जाऊ रेणुकेच्या भेटी
मारू तिच्या चरणांशी मिठी
यात्रा भरली फार मोठी
गंध-लिंबांची झाली दाटी

१. 'Bombay Beggars and Criers', p. 74; 'मुंबई इलाख्यातील जाती', पृ. ८९; 'एक होता राजा...' (यल्लम्मादेवीची गाणी), पृ. ७५.

 २. या प्रकरणातील सर्व गीतांचे संदर्भ 'एक होता राजा. . .' या लोकसाहित्य संकलनातील आहेत.

येलू तुझी महिमा फार मोठी
चला घेऊ भंडारवाटी
रेणुकाची भरू ओटी
शालू नेसली जरीकाठी
कोळेगाव वांगेच्या काठी
परसू चौंडक्याची निराळी धाटी
चौमुलखी वाजली घाटी

अर्थात अशी गीते फारच कमी आहेत. बहुतेक गीतांत देवीची चरित्रकथा किंवा माहात्म्यकथा ग्रथित आहे. एका गीतात रेणुकेला 'आदिशक्ती माया' म्हणूनही तिला शंकराची कन्या बनविले आहे. एकदा ती रुसून रानात गेली असता, दैत्यांनी तिचा कसा छळ केला आणि अखेरीस तिने दैत्यांना कसे शासन केले, याची कहाणीही त्याच गीतात सांगितलेली आहे. परशुराम हा रेणुकेला केवळ आपल्या पित्याच्या म्हणजे शंकराच्या वरप्रसादाने झालेला पुत्र असल्यामुळे त्याला मुले 'बिनबापाचा पोर', म्हणून चिडवीत असत, अशीही कल्पना काही गीतांत ग्रथित आहे. जोगती-जोगतिणींच्या या गाण्यांत कूटप्रश्नात्मक गाणीही आहेत. शिवधनुर्भंगाविषयीच्या कथागीताचा हा प्रारंभ पहा—

पाच परमेश्वर तुम्हीच बसला तुम्हा जोडतो हात
सीतामाईचं लग्न लागलं हुतं कोंच्या महिन्यात ?
वरकड गानी काय करायची केराची गत ?
राम आधी का वडील जानकी सांगा पंडित !

या गीतकारांनी रेणुकेचा स्वभाव उग्र कल्पिला आहे. परंतु भक्त परीक्षेला उतरल्यानंतर ती त्याच्यावर कृपेचा वर्षाव करते, अशीही त्यांची धारणा आहे. 'यल्लम्मा कारी कंकाळ भारी', असा ते तिच्या उग्र स्वभावाचा उल्लेख करतात. कारी म्हणजे कडक, शीघ्रकोपी. साथीच्या रोगांचे कर्तृत्वही तिच्या-कडेच आहे—

आदिमाया शक्ति जगदंबा कारी
सुंडी मुंडी रुंडी भुटकी महामारी
पिलीक पटकी यांपैकी देवी हाई विष्णु-अवतारी
आदिमाया शक्ति रेणुका जगदंबा कारी

भराडचाच्या एका गाण्यात ज्याप्रमाणे शंकरपार्वतीने शेतकऱ्याची परीक्षा घेतल्याची कथा आहे, तशीच एक कथा यल्लम्माविषयीच्या गाण्यात आहे. एकदा यल्लूबाई परसूबाळासह एका माळयाच्या मळयात जाते आणि माळयाकडे कांद्यांची एक चिगळी मागते. माळी चिगळी देण्याचे नाकारतो. देवी तशीच

मळ्यात जाऊ पाहते, त्याबरोबर माळी आपल्या नोकरांना बोलावतो अन् त्यांना सांगतो--

धरा या रांडेच्या झिपरीला
अन् बांधून घाला समोरच्या खांबाला

माळ्याचे नोकर अंगाला झटू लागताच आदिमाया शक्ती रेणुका प्रचंड रूप धारण करते आणि कवडीतला भंडार काढून माळ्याच्या अंगावर टाकते व गुप्त होते. भंडार अंगावर पडताच माळ्याच्या अंगाचा दाह सुरू होतो. माळीण सात्त्विक होती. ती आपल्या पतीची शुश्रूषा करता करता देवीची करुणा भाकू लागली. मग देवीने वेगळाच डाव रचला—

आदिमाया शक्ति रेणुका सतीने काय केले ?
फुटकी जांगटी
मोडकी परडी
खांद्यावरती चौरी
घेउन निघाली माळ्याच्या मळ्याला
माळ्याच्या गुंफेला उदकार जागला
कानी श्रवण केला
माळी लोळत घोळत आला चरण धरायला
'माझी यलारी ! करतो तुझी भक्ती
आलो शरण, धरतो चरणागती !'

देवी उग्र असली, तरी भावभोळी आहे. माळ्याची ती स्थिती पाहून तिला करुणा आली. तिने आपल्या मनातला क्रोध निपटून टाकला--

आदिमाया शक्ति रेणुकेच्या पोटातला गर्व गेला
बेलभंडार शिवला, शिरी हात ठेवला
तोंड लावलं तेच्या अंगाला
रगत ओढून घेतली
मागं सरली
डर्रऽकरून ढेकूर दिली
माळी साजिवंत केला

अशी ही 'भावभोळी' यल्लूबाई आहे. तिची अशी अद्‌भुत चरित्रे गाताना जोगती-जोगतिणींची 'तनभूल' होऊन जाते. तिच्या 'गुणांच्या पोथ्या' मनोमन वाचताना त्यांना भक्तीचे भरते येते. तानू नावाची एक जोगतीण म्हणते आहे.

माझी रेणुका आदि शक्ती
तुझ्या गुणांची वाचू पोथी

मंगळवार-शुक्रवारी भंडार-विभूतीचा मळवट भरून स्वतः देवीच परडी घेऊन जोगवा मागायला निघते, अशी या जोगतिणीची श्रद्धा आहे. देवीची ही 'अगाध माव' अनुभवल्यामुळे ही जोगतीण देवीला म्हणते—

**यल्लू कळेना तुझी माव**
**भोळ्या भक्ताला काय ठावं ?**

भोळ्या भक्ताला देवीची 'माव' कळणे कठीण आहे. म्हणूनच त्याने अहंकारशून्य बनून देवीला सर्वभावे शरण जावे हेच योग्य—

**तानू सांगे सर्वाला बसून**
**नका गर्वानं वागूस।**
**नका गर्वानं चालूसा !**



# यल्लम्मा देवीची गाणी



# अनुक्रम

संग्राहक : श्री. बाबासाहेब देसाई

१

शंकराची कन्या रेणुका आदिशक्ति माया ॥
देवा ग मंदी देव गणा तो व्हनाराचा पाया ॥ १ ॥
मायलेकामंदी आलं वाकडं कीरत सांगाया ॥
दिलं नगर सोडून गेलिया जंगलामंदी ऱ्हाया ॥ २ ॥
काटं सराप मोडु लागलं रात्रीच्या समया ॥
चालून चालून कष्टी झाली आदिशक्ति माया ॥ ३ ॥
दैत्यादैत्यात बेत केला यल्लूला खाया ॥
वाघ अस्वलं गरजू लागली भिईना कवणा या ॥ ४ ॥
दैत्यादैत्यानं बेत केले काम एक सांगू या ॥
या कामानं दमगिर होऊन आपुनच पळतीया ॥ ५ ॥
दैत्यादैत्यानं आडवं लावलं बगा रेणुकाला ॥
साळीडाळी घेऊनशानी भोजन वाढ आम्हाला ॥ ६ ॥
खडक्या रानी साळी पेरती पुढचा बघ पल्ला ॥
झाली मावची ईज गरजुनी पाऊस हा पडला ॥ ७ ॥
सव्वा खंडिचा वटा घेऊन रेणुका आलीया ॥
हाक मारी दैत्याला यावं तुमी रास मोजाया ॥ ८ ॥
हाताचं उकाळ कोपराचं मुसाळ लागली साळी कांडाया ॥
हाक मारी दैत्याला यावं तुमी रास मोजाया ॥ ९ ॥
दैत्यादैत्यानं आडवं लावलं बगा रेणुकाला ॥
कच्चं गाडगं आणूनशानी भोजन वाड आम्हाला ॥ १० ॥
दिली दगडाची घागर यल्लू लागली पाणी वाहाया ॥
मागं दैत्यांनी बेत केला रांजण फोडाया ॥ ११ ॥

पाणी आणुन कष्टी झाली आदिशक्ति माया ॥
गंगेवरती जाऊन बसली ईसावा खाया ॥ १२ ॥
पाचव्या दिवशी का मंडोदरी ती बोलती झालीया ॥
द्यावा पोटी बाळक मंग मी येते रांजूण भराया ॥ १३ ॥
लावलं वलं जळाण लागली चूल फुकाया ॥
दिला भंडारा झोकुन लागलं आदान बोलाया ॥ १४ ॥
दैत्यादैत्यांनं आडवं लावलं बगा रेणुकाला ॥
सौंदडीच्या पानाच्या इस्तान्या कर आम्हाला ॥ १५ ॥
सौंदडीपाशी गेली रेणुका लागली पाला वरपाया ॥
तिच्या इस्तान्या करूनशानी लागली फेकाया ॥ १६ ॥
दुसऱ्या सौंदडीपाशी गेली लागली पाला जी वरपाया ॥
तंतला उठला भुजंग यल्लूच्या अंगावर धावलाया ॥ १७ ॥
धरला भुजंग यल्लूनं खांद्यावर फेकलाया ॥
आली विषाची गुळी तळहातात ईस वकलाया ॥ १८ ॥
तेच ईस आनुनशानी ठाईठाई कालिवलंया ॥
हाक मारी दैत्याला यावं तुमी पंगत पाडाया ॥ १९ ॥
खाऊन जेऊन लोळू लागलं दैत्य येळ तया ॥
नऊ कोट दैत्य-भुइऱ्यात कोंडुन भाईर निगालिया ॥ २० ॥
आली संधी जायाची रेणुका प्रकट झालीया ॥
त्या येळच्या खुणा जगावर नाग लावलाया ॥ २१ ॥
मानू परसू पदं गात्यात नमन देवीला ॥
वसगडचामंदी ख्याल केलं बसल्याती गायाला ॥ २२ ॥

## २

आदिमाया रेणुका माता । द्वापारयुगाची सांगतो मी कथा ।
चित्त देऊनी ऐकावे आता । बोलु नका म्होरं ।
जमदग्नि हिचा भरतार झाला विस्तार ॥ १ ॥
चार पुत्रांची रेणुका हो माता । सर्व बाळांवर बघा हिची ममता ।
बोले ती कांता अवो भरतार ।
झाला मायेचा बाजार सरला हाहाःकार ॥ २ ॥
जमदग्नि बोले आपल्या आस्तुरीला । आम्ही तर बसलो अनुष्ठानाला ।
जलदी पाणी घेऊनी यावे पूजेला । पोटीचं होईल बाळक मारील तुला ।
नका करू यायाला उशीर ॥ ३ ॥
आदिमाया निघुन गेली पाण्याला । वाळुचा घडा बुडंता राहिना ।
झाला गेला भंगला । कसं नेऊ पाणी पूजेला ।
झाला मला उशीर ॥ ४ ॥
जमदग्नि तापला हो फार । कुठं आहे पाणी सांग लवकर ।
देवपूजेला झाला उशीर । उडवतो शिर ।
चौघा पुत्रांला आज्ञा दिली मारा लवकर ॥ ५ ॥

पदरामंदी पाणी घेता राहिला हो झालं ।
वटचामंदी पाणी घेता राहिला हो झालं ॥
झाली बेजार । कसं केलं देवा कवतुक वडविती ऊर ॥ ६ ॥
जमदग्नि तापला हो फार । चौघा पुत्रांला घेतले बोलावून ।
तिघांनी हो शब्द बापाचा नाही मानिला । चौथा मग आला परशुराम ।
राग क्रोधात घेऊन हत्यार । मातेचं उडविलं शिर बरच्यावर ॥ ७ ॥
परशराम लागे बापाच्या चरणाला ।
जिवंत करूनी द्यावी माता माझी मला ।
हेच माझं वर । याशिवाय न्हाई मागणं जोडतो कर ॥ ८ ॥
जिवंत करूनी दिली माता त्याची तेला ।
रेणुकाचं धड लाविलं कवीच्या सुता ।
ग्रंथ वाचुनी पाहावा जावे आता ।
खोटया पाखंडचा न्हवेत या कथा ।
बोलू नका म्होरं । आला सवाल तुझ्यावर द्यावे उत्तर ॥ ९ ॥
आदिमाया उभी ती कृष्णाकाठला ।
जळामंदी बोलणं करता लज्जा नाही तुम्हाला ।
निघा बाहेर । हे तिघे कुठे राहिले सांगा लवकर ॥ १० ॥
बाजी वस्ताद कवि बोलला । राहाणे त्याचे सावर्डे गावाला मती भरपूर ।
परशराम चवंडक्या लोळे चरणावर ॥ ११ ॥

## ३

मुळापासून सांगतो मी खरं । माजी का यल्लू कनखर अग्निचं घर ।
माझी यल्लु ग बाई पतीवरता नार । वाटला हुतं सिंगणापूर ।
बाळ पाजित बसलिया खिनबर । माझ्या यल्लुबाईनं ।
दृष्टीनं पाहिलं सारं ॥ १ ॥
सन काय संक्रातिच्या म्होरं । बहिणी का मिळून म्हायारावर ।
चोळीपातळ करून म्हायारा आनंद फार । संभू देव की राजा
बसलाय गादीवर जी ॥ २ ॥
चालून हो गेली डोंगरावर । कर जोडून संभाच्या म्होरं ।
संभाला हो संकट पडलंय फार । तळहातामध्ये पुत्र होणार हेच करार ।
त्याचं परसु ग नाव ठेवा बया तुम्ही व्हा म्होरं ॥ ३ ॥
मुलगा का जल्मला सूर्यकुमार । जसा उगवितो पुनवेचा चंदर ।
भारतो लहर । माझ्या पोटी पुत्र जाहला आनंद फार ॥ ४ ॥
परशु का हो झाला लहानाचा थोर । सात वरसाचं वय हेच सारं ।
खेळायाला तवा गेला वाड्याबाहेर । डाव का आलाय परसू बाळावर ।
या बिनबापाच्या पोरा शिव्या देती चार जी ॥ ५ ॥

राग क्रोधात गाठलं घर । जाऊन मातेचा धरला पदर ।
दाव म्हाजा बाप नाही तर उडवितो शीर ।
देवीच्या अंगाचं झालं कापिरं ।
माझ्या कंठीतल्या ताईता परसू दमा खिनबर ॥ ६ ॥
जोगी का झाल्यात घरोघर । नटुन का फिरत्यात दारोदार ।
जाब का आलाय जोग्यावर । या चवंडक्याला धासतं पडलंय फार ।
या सुती चवंडक्याचं नाव सांग लवकर गा ॥ ७ ॥
माण देशात लोणंद घर । यल्लू परसूचा झाला विचार ।
पालकी फिरून गेलीया म्होरं । या झेंडु फुलांच्या माळा परसूवर ॥ ८॥

४

यल्लम्मा कारी कंकाळ भारी । गोऱ्या लोकांला गेली वर्दी ॥
घोड्यावरती स्वार झाला । धावत आला लवकरी ॥ १ ॥
सौंदतीमंदी तळ टाकिला । घोडा बांदला परभारी ॥
एका बाजुला घोडा काढिला । निघून गेला कुंडावरी ॥ २ ॥
परसगडाला निघून चालला । इलाज चालना याचा तरी ॥
एका बाजुला घोडा काढिला । निघून गेला कुंडावरी ॥ ३ ॥
उगरगोळाचं पुजारी आलं । मंगळवार दिवस तरी ॥
पाच घागरी दुधातुपाच्या । अभिषेक होतो नानापरी ॥ ४ ॥
पुजाऱ्याच्या आंगावरती । साहेब गेला चालून तरी ॥
आपल्या हातानं करू द्या आंगुळ । यल्लम्मा बघु या सत्वधारी ॥ ५ ॥
चारी दरवाजाला कुलपं लाऊनी । पुजारी बसले बाहेरी ।
चंदनपाट टाकुनशानी । रेणुका बसली न्हाया तरी ॥ ६ ॥
पिवळा पितांबर ताप्त्याची चोळी । घाली दंडावरी ॥
दागिन्यांची काढून पेटी । जगदंबा करती शिनगारी ॥ ७ ॥
सर्वी बोटं शिनगार ल्याली । पायी पैंजणं तोडे घाली ॥
कंबरेशी हो डाग घालुनी । कुलपं बसविली तिनं चारी ॥ ८ ॥
चिताक चिंचपेटी घागर पेटा । आणली सोन्यायाची सरी ॥
गळ्यामंदी लिंग घालुन । मोती शोभती डुईवरी ॥ ९ ॥
पुतळ्याची माळ जुंदळपोत । टिक्क शोभती शेजारी ॥
कवडीयाची माळ ल्याली । रेणुकेला शोभा आली ॥ १० ॥
गोटपाटल्या तोळबंदी दंडी । लेली कानामंदी बुगडी ॥
नाकामंदी नथ सरज्याची । शिरावरती मुकुट भारी ॥ ११ ॥
कानामंदी काप झुबे । भांगामंदी मोती खिळे ॥
कुंकवाचा टिळा रेखला । मुखामंदी विडा धरी ॥ १२ ॥
भंडाऱ्याचे भुशाण ल्याली । यिबीताची पट्टी खाली ॥
नेत्रामंदी घालुन अंजन । जगदंबाला दृष्ट झाली ॥ १३ ॥

खिडकीवाटे साहेब पहातो । काय स्वरूप हिचं तरी ॥
स्वरूप पाहून तनभुल झाला । नित्य असावे शेजेवरी ॥ १४ ॥
मडमनीला हाक मारी । पहा ये ग तू लवकरी ॥
सूर्यासारखी फुललिया कळी । काय दिसती सुंदरी ॥ १५ ॥
मडमनीला राग आला । हात मारिती तोंडावरी ॥
असल्या देविची निंदा करूनी । पतिवरता ही हाई भारी ॥ १६ ॥
रेणुकानं ऐकून घेतली । कानावरती गोष्ट सारी ॥
साहेबाचे डोळे गेले । म्होरं पडली अंधारी ॥ १७ ॥
हात जोडून उभा राहिला । माफी दे ग मातोसरी ॥
शिकराला सोनं लावून । सडक आणिन तुझ्या डोंगरावरी ॥ १८ ॥
एका डोळ्याला दिला दाकला । कळ काढीना कोण तरी ॥
लिंबाची हो झाडे लावली । भक्त राहोत्याती आरामी ॥ १९ ॥
करवीरामधी बापू मारूती । रेणुकाचे मानकरी ॥
जगदंबाची मोठी छाया । हात ठेविला शिरावरी ॥ २० ॥

६

सत्वधारी रेणुका जमदग्नि । तारिले अवतार धरूनी ॥ धृ० ॥
माया रेणुका आदि म्हणुनी । पतिसेवा करिती निरंजनी ॥
गंधर्व तळ्यात क्रीडा पाहूनी । पूजेची येळ गेली टळूनी ॥ १ ॥
वाळचा घडा तो बनवुनी । सर्पाची चुंबळ करूनी ॥
वाळुचा घडा गेला फुटूनी । सर्पाची चुंबळ गेली सुटूनी ॥ २ ॥
जमदग्नि तापला फार । रेणुका उभी राहिली जाऊनी ॥
शाप दिला जमदग्नि ऋषींनी । रेणुका गेली नासोनी ॥ ३ ॥
रेणुका उभी राहिली जाउनी । जमदग्नि बोले वत्स्याने ॥
जावे आमच्या गुरूकडे निघूनी । मग तू येशिल नीट होऊनी ॥ ४ ॥
बारा वरसं तप कर उभी राहूनी । मग तू येशिल नीट होऊनी ॥
रेणुका उभी राहिली जाऊनी । बारा वरसं तप केले तिनी ॥ ५ ॥
आशीर्वाद दिला गौतम ऋषींनी । रेणुका आली नीट होऊनी ॥
परशरामाचा धावा करूनी । रडू लागला म्होरं येऊनी ॥
कशी मारू माता माझ्या हातानं । मातेविण दुनिया सारी सुनी ॥ ६ ॥
उठवा माता माझी होऊनी । शांत सर्प घेतले खवळोनी ॥
उठविली माता माझी होऊनी । मंत्र दिले हो बांधोनी ॥ ७ ॥
यशोदा म्हणे रेणुका धन्य । तुझ्याविण कोणी नाही अंबिका ॥
तुझ्याविण कोणी नाही रेणुका । सत्वधारी रेणुका जमदग्नि ॥
तारिले भक्त अवतार धरूनी ॥ ८ ॥

६

सौंदतीची रेणुकाबाई । उगरगोळाच्या डोंगरी राही ॥ धृ० ॥
उगरगोळाला गेली कशापाई । तिला जाण्याचे कारण काई ॥
लढाई केली घाई घाई । दैत्य वधला त्या हो ठायी ॥ १ ॥
सौंदतीचा जिंकूनी किल्ला । लावलं निशाण केला हल्ला ॥
राखण ठेवीले मारुतीला । कुरगताच्या साक्षी लावूनी ॥ २ ॥
केवड्याच्या बनी मुक्काम केला । बोलवू लागली परशरामाला ॥
तान लागली बाळा मजला । कर पाण्याचा इलाज पैला ॥ ३ ॥
परशरामानं मारला बाण । गंगा आणिली पाताळातून ॥
पाणी पे ग माझी आई । वेणीकुंड भीमाकुंड नाव हाई ॥ ४ ॥
परसू चवंडक्या पद नित गाई । गाव वसगडं येरळेच्या ठाई ॥
झापड पडली वैऱ्याला बाई । उगरगोळाच्या डोंगरी राही ॥ ५ ॥

७

माळ्याच्या मळ्यात कांदा मेथी । यल्लुबाई सत्वाला जाती ॥ धृ० ॥
मंगळवारा दिशी गाव सारं फिरून कंटाळा आला ।
काय बोलती परशरामाला । अन् चल म्हणती माळ्याच्या मळ्याला ॥
निघून गेली माळ्याच्या मळ्याला । काय बोलती माळ्याला ।
माळीदादा पापाचं बंधु राहिलं गावी । पुण्याचा बंधु हो ।
पण कांद्याची चिंगळी दे मला ॥ १ ॥
माळी काय बोलतो रेणुका सतीला । वाटेवरचा मळा आल्या गेल्याला ।
कांदा देईन तर मी राहिन का माझ्या जाग्याला ।
आदिमायाशक्ति रेणुका सती ।
काय बोलती परशराम बाळाला । सरकाऱ्या घरी तीन पुशी ।
मनुष्या घरी तीन पुशी । अन् देवाधर्माच्या घरी तीन पुशी ।
ह्यो पहिला ठराव झाला । अन् चल म्हणती माळ्याच्या मळ्याला ॥ २ ॥
माळी काय बोलतो रेणुका सतीला ।
बारा न् बारा चोवीस वरसं मळा केला या जाग्याला ।
भूत उठ्ल का ख्यात उठ्ल म्हणून माळी मनामंदी भेला ।
हाळी मारतो चाकरीच्या गड्याला । धरा या रांडेच्या झिपरीला ।
अन् बांधून द्या हिला समोरच्या खांबाला ॥ ३ ॥
बांधुनीया मार दिला तेव्हा यल्लूला ।
परशरामबाळ तान्हा रडू लागला ।
पाया पडतो सोडा मामा आमच्या आईला ।
पायावरती गडागडा लोळू लागला ।
कधी नाही येणार मामा तुमच्या मळ्याला ॥ ४ ॥

आदिमायाशक्ति रेणुकाला ।
मोटेचं सौंदर्य नाही पुरलं पिचुंड बांधायला ।
आदिमायाशक्ति रेणुकाला ।
गुराच्या दावणी नाहीत पुरल्या पिचुंड बांधायला ।
चांबाचं चाबाक नाहीत पुरलं पिचुंड बांधायला ।। ५ ।।
कांद्यासाठी मार मग खाती
नेत्राला झपडी घालती ।
आदिमायाशक्तिने प्रचंड रूप केलं ।
आगाशी घुमूट धरतरी पाय सोडलं ।
गाडीच्या चाकासारखा एक एक डोळा केला ।
बचकत माईना सारखो डोळ्याला ।
हुम आणली निघून गेली माळ्याच्या मळ्याला ।। ६ ।।
कवडीच्या माळेतला भंडार काडला ।
त्याचे आंगावरनं झोकला ।
आगीन जोडली त्याच्या आंगाला ।
राळ्याच्या कणीसारखं फोड उठलं त्याच्या आंगाला ।
बचकत माईनासारखं फोड त्येच्या आंगाला ।
आणि रगात पू लागलं धरनीला गळायला ।
वाटेची माणसं लागली नाक धरायला ।। ७ ।।
ही वर्दी गेली पाटील कुळकरण्याला ।
पाटील कुळकरणी म्हणेत्यात चला जाऊ माळ्याच्या तपासाला ।
निघून गेलं माळ्याच्या तपासाला ।
बोलावून घेतलं त्याच्या बायकोला ।
लागलं तपासाला ।
अग रांडं गावाला का इग्न लावलीस ।
चार म्हार मित्री जमूनशान तीनं तिकाटन्यांवर झोपडं बांधून
टाक तुझ्या माळ्याला ।। ८ ।।
माळिण उठली खोलीत गेली पलंग टाकिला ।
त्यावरती निजविला माळ्याला ।
आपुन बसली समोरच्या खांबाला ।
ये देवा काय करू माझ्या फुटक्या नशीबाला ।। ९ ।।
माळीण बोलं एक न्ह्याती ।
देवा चालत नाही माझी रती ।
हीच माळ्याची वाट ।
पानंदीला तांबडी लाली ।
वर गवताची नाजुक पानं ।
हिरवा शालू पांघरी लाल ।
हीच जांभळ घनदाट ।। १० ।।

वड पारंबी उंच गेल्या ।
वर चढुनी व्याकुळ झाले ।
खेळ खेळूनी ठकून बसले ।
तिची ग पावलंवाट ।
हीच माळयाची वाट ।। ११ ।।
आदिमायाशक्ति रेणुका सतीने काय केले ।
फुटली जांगटी ।
मोडकी परडी ।
खांद्यावरती चौरी ।
घेऊन निघाली माळयाच्या मळयाला ।
माळयाच्या गुंफेला ।
उदकार गाजली ।
कानी श्रवण केला ।
माळी लोळत घोळत आला ।
चरण धरायला ।
माझी यलारी करतो तुझी भक्ती ।
आलो शरण धरतो चरणागती ।। १२ ।।
आदिमायाशक्ति रेणुकेच्या पोटातला गर्व गेला ।
बेलभंडार शिवला ।
शिरी हात ठेवला ।
तोंड लावलं तेच्या अंगाला ।
रगत ओढून घेतली ।
मागे सरली ।
डर करून ढेकूर दिली ।
माळी साजिवंत केला ।। १३ ।।
माझी जोगती लोकं आक्कई उध म्हनत्यात ।
तसं तुझ्या माळयाने भरावी पाटी ।
जावा विक्रा कराया ।
कांदे घेता का बायांनो ।
म्हटलं मंजे त्यात आला माझा जोगवा ।
कांदे घेता का बायांनो म्हणती ।
केज म्हणून परशराम घेती ।

सतू पुजारी कवन गातो शिपूर गावीच्या ठानकावरती ।। १४ ।।

८

परशरामाची स्वारी मोठी कारी ।
रेणुकाला छळतूया भारी ।
ऐक ऐक सांगतो बुद्धीची कल्पना ।
नगरीच्या नारी ।
रुप्याच्या घागरी ।
मोत्याच्या चुंबळी ।
घेऊन निघाल्या बारवंला ।। १ ।।
परशराम काय केला ।
कातऱ्या बाण सोडून दिला ।
घागरीचा कांदुबर काडला अशा येळंला ।
त्या चौघी बोलती एकमेकींला ।। २ ।।
कुण्या सवतीच्या कारट्या ।
घागरी फोडल्यास तरी ।
सासू सासरा शिव्या देत्याली घरी ।
त्या चौघी बोलल्या तरी ।
बिन बाच्या बुध्या तुला भारी ।। ३ ।।
परशरामाने काय केला ।
विटीदांडू मोडून टाकला ।
बारवत कातऱ्या बाण टाकून झाला बाजूला ।
चला म्हणतो मातोश्रीच्या शोधाला ।। ४ ।।
आदिमायाशक्ति रेणुकानं काय केलं हुतं ।
केस वाळवत बसली होती मजल्यावर उनाला ।
परशराम बाळाला पहाताना कोणी बोटानं दाबलं असलं सांग मला ।
त्याचं बोट छाटून काढते अशा येळंला ।
कुणी पायानं दाबलं असलं सांग मला ।
त्याचे पाय छाटुन काढते अशा येळंला ।। ५ ।।
परशराम काय बोलतो रेणुका सतीला ।
अग आई, काय कुणी मारलं नाही मला ।
बाळ हुंदक्यानं भरलं तरी ।
माझा बाप दाखीव लवकरी ।। ६ ।।
आदिमायाशक्ति काय बोलती परशराम बाळाला ।
संभाच्या लेकी खेळण गेल्या होत्या सहा जणींनी गण देताना तुला
बिनबापाचा मागुन घेतला ।
मला नाही पती तुला नाही बाप ।
कुटला दाऊ अशा येळंला ।। ७ ।।

परशराम बाळ काय बोलतो रेणुका सतीला।
बिनबापाचा म्हणतीस मला।
आणली एक पुत्र कवीव दादा म्हंतो तेला।
ज्या रांडनं हंगण दिलंय त्या रांडंचा सूड घ्यायला
जातो अशा येळला ॥ ८ ॥
आता मनात विचार करी।
पुत्र न्हवे ह्यो वैरी तरी।
परशराम काय बोलतो रेणुका सतीला।
बिनबापाचा म्हणतीस मला।
चौरासचौरास तीन कोस डोंगूर मला।
तीन वोप कर अशा येळंला।
आदिमायाशक्ति रेणुका म्हणीन तुला ॥ ९ ॥
आदिमायाशक्ति रेणुकानं काय केलं।
कमरेला बांधला पदूर।
तळहाताचं केलं खोरं।
बोटाची केली कुदळ।
चौरास चौरास तीन कोस डोंगूर फोडला।
तीन वोपे केले अशा येळंला ॥ १० ॥
घ्यावे परशराम बाळा ब्रह्मचारी नका छळू पडली अंदारी।
परशरामाची स्वारी मोठी कारी।
रेणुकाला छळतोय भारी ॥ ११ ॥

९

बहुत गुणिकार सर्व लोकांला झाला।
आदिमायाशक्ति रेणुकाला।
पाहू या देवीला ॥ १ ॥
हे गाडी न घोडं सैन्य चाललं यातेला।
आदिमायाशक्ति रेणुका पाहू या देवीला।
पुढं निघून गेला जुगुळभावीपाशी।
सर्व लोक लिंब नेसायला।
उदाचा धमाकार झाला।
उजव्या बाजूला खडी भरमा ह्यो आला।
उदं म्हणून नारळ देऊन खुशी मनाला ॥ २ ॥
परशरामाला जागा दिला उजव्या बाजूला।
पुढं मातंगीला जागा दाविला न्हायाला।
अग्निमहाराजानं होम पेटवून दिला।
बाराच्या ठोक्याला बार गोळींचा झाला ॥ ३ ॥

परसू चंडक्या जग वाजवीत गेला ।
जर वरसाच्या पुनवीला ।
कोकटनूराला ।
आप्पा पुजारी भक्त पावला त्येला ।
आदिमायाशक्ति रेणुकानं शिरी हात ठेवला ॥ ४ ॥

संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

१

चला जाऊ रेणुकेच्या भेटी
मारू तिच्या चरणाशी मिठी
यात्रा भरिली फार मोठी
गंध-लिंबांची झाली दाटी
येलू तुझी महिमा फार मोठी
चला घेऊ भंजरवाटी
रेणुकाची भरू ओटी
शालू नेसली जरीकाठी
कोळगाव वांगेच्या काठी
परसु चौंडक्याची निराळी धाटी
चौमुलखी वाजली घाटी

२

परशुराम जन्मले बाळ
रेणुकाला छळतो फार
ब्रह्मा विष्णू मिळूनी सारं
परशुराम त्यांच्याबरोबर
बाप नाही म्हणती लहानथोर
मनामधी कष्टी झाला फार
उभा राहिला मातेच्या म्होरं
नाव सांग तू त्याचं लौकर
हुरदांनी दाटिला फार
हाती घेऊनशान तलवार
मातेचे उडविले शिर
तेची वेळ कोणता वार
रेणुकाचे उडविले शिर
येवढी खूण सांगा चातूर

३

पाहिले बडोदे शहर बहुत गुलझार
माझ्या रेणुकाचे नाव चाले दूरवर
राजानं लावली बाग आईच्या सेवेला
हार तऱ्हेची फुले मग वाहतो आईला
तिथे वाजतो चौघडा जोड सनया
तिथे नाचती कळवातीनी रातरा-दिन
तिथे नाचतो गोंधळी वाघ्या-मुरळी
उदे उदे बोलती एकच झाली हारूळी
सण आला दसऱ्याचा नवरतनाचा
मूळ आले देवीला आपटयाचा पुंजान
सयाजी महाराज बडोद्याचे राजे
त्यांच्या वंशी जन्मले गणपती महाराज
ह्या पुण्य शहरामंधी लाविल्या ध्वजा
कमी नाही दौलतीला लाखो फौजा
घोड्याच्या पागा हाती निशाण
माझ्या रेणुकाचे संपूर्ण झाले दिन
आली राजाची स्वारी जडत अंबारी
माझ्या रेणुकाची गेली सुखरूप स्वारी

४

सौंदतीची जागा पाहिली उंच डोंगूर
उंच डोंगूर जागा मला दिसती हवेशीर
करणारानी केली करणी कुरूंदाचं चिरं
बाऱ्या बांदल्या चौफेर जी
अग दोही येळंला अभिषेक होतो
धयीदूध साखर
धयीदूध साखर पूजेला बसले बामण
अवो यल्लम्मापुढं नारळ फुटतो
अंत ना पार
अंत ना पार, देवी तुजी महिमा लयी थोर
वासऱ्यामंदी उभी रेणुका
नेसुन पितांबर
भक्ताच्या हात शिरावर जी
अवो येलूच्या वो उजव्या बाजूला
हाय बारवहीर
येनी कुंडामंदी येऊन पडती
पाण्याची धार जी

हजार बाराशाची गडबड होती
बराच येणार जी
बराच येणार भांडती हालवई आत्तार
अवो सौंदतीचो जागा पाहिली
उंच डोंगूर जी
जागा मला दिसते हवेशीर जी

९

आमी जातो जतरंला
रीग ऱ्हाई गाडयाघोडयांला
वलं सरपन चुलीला
सत्वपन दावी सर्व्यांला जी
गेलं मनोळीच्या नदीला
पूजा वान लागले करायला जी
जन जोगती उभे चाकरीला
भक्त लागले हारकी घियाला
पूजा सोडली जागच्या जागेला
जत्रा चालली निघून डोंगराला
चला येन्नीकुंडीच्या आंगूळीला
पैसा टाकुन तीर्थ घियाला
पालखी गेली माहेरघराला
गेली म्हानकऱ्याच्या वाडयाला
पैला मान मांगनीला दिला
हळदकुंकू भंडार लावीला जी
पालखी गेली भंडारघराला
जन जोगती बसले वानाला
वान पुजारी वाटू लागेला
संपूर्ण वटीत घातला जी
रेणुका निघाली आगीन खायाला
लागली म्होरं मागं सरायला
परशुराम मागं लागेला
होमात ढकली मातेला जी
परशु चौंडक्यानं छंद केला
वसगडेचाचा ग ऱ्हानेवाला
गुरू वस्ताद आमुचा चांगला
गाण्याचा मार्ग दावीला

## जोगवा

जोगवा मागेल देवीचा जोगवा मागेल
दैत्य मारून माळ मी घालीन
हाती बोधाचा झेंडा मी घेईन
भेदरहित वारीला जाईन
जोगवा अनाथ निरगुण प्रकटली भवानी
मोह महिषासुर मर्दाना लागूनी
बहु तापाची करावी तारणी
भक्ता लागूनी पावशी निरवाणी
जोगवा नवविध भक्तिच्या भक्तिच्या नवरात्र
तरुण पोटी मागेल ज्ञानपुत्र
धरून सद्भाव अंतरीच्या मित्रा
दंभ सासरा सारीन कुपात्रा
दो हाती बोधाची भरीन परडी
आशा निष्ठाच्या पाडील दरडी
मन विकार करीन कुरवंडी
अद्भुत रसाची भरीन दुरडी
आता साजणी झाले मी निःसंग
विकल्प नवऱ्याचा सोडियेला संग
काम क्रोध झोडियेले मग केला मोकळा मार्ग सुरंग
देवीचा जोगवा मागून ठेविला
जाऊनी महाद्वारी फेडिला एकाजनार्दनी
एकपण देखीला जन्ममरणाचा फेरा चुकविला

## देवीचे पद

शरण मी आलो रेणुके तुला चला जाऊ देवीच्या दर्शनाला
अग्नी होमातुनी जन्म घेऊनी तारी भक्ताला
तारी दासाला शरण मी आलो रेणुके तुला
चला जाऊ देवीच्या दर्शनाला
काशी पितांबर चोळी बुटेदार शोभे अंबेला
शरण मी आलो रेणुके तुला चला जाऊ देवीच्या दर्शनाला

संग्राहिका : सौ. सिंधू वारेनूळकर

उदं उदं सुकाचा सोपा फुकाचा घ्यावा कोणी
आदीमाया जगी अवतरी जळी स्थळी भरली ही
सत्यही माने माने ज्ञाने ग भावभक्तीचा दावूनीया
जोडी पाने गाणे, गाणे आदीमाया जगी अवतरी
महाराणी रित ठाव नसे ब्रह्मा विष्णु महेश बाळ
उदं उदं अवकरणी ध्यानी मनी
गजानन ते प्रेम करूनी जोडी हो कर ते दोनी

संग्राहक : श्री. गो. ल. जमदाडे

१

अंबा माझी माय
जगदंबा माझी माय
अघट विघट प्रगट होऊनी
दाखीव अपुले पाय । अंबा माझी माय
नारायण कुलदैवत
भक्त जनाला साथ । अंबा माझी माय

२

भुजंगावरी आसन नाथजीचे
जसे सावळे शोभते रूप ज्याचे
अंगी साजरी शोभती दिव्यगंगा
नमस्कार माझा तया ज्योतिर्लिंगा
अंबिके माय माझे भवानी
तुझे वर्णिता लागतो ईश ध्यानी
तुवा पीडिले मंका यानेश्वराशी
रणी पाडिले चंड मुंड दैत्याशी
देवी भवानी बाण घेऊनी आली
प्रचंड दैत्यासी वधूनी आली
तयीपासूनी तुवा रहिवास केला
जगोकारणे थोर आनंद झाला

## आरती

मातापुरी उंच हो पर्वत । आंबे अवघड घाट ।
अरण्य महा हो डोंगर । वृक्ष लागले दाट ।
पुढे न कळे वाट । मूळपीठ दृष्टी देखिल्या ।
उतरती जन्माचे कष्ट । आंबाजी माये अंबिके ।
जगदंबिके मोहमाय रेणुके । भक्तासी मुक्ती तू देई हो ।
मूळपीठ नाईके । आंबाजी माये अंबिके जगदंबिके ।। धृ० ।।
तुझे हो मार्गी चाललो । अति सिनलो कष्टलो भारी :
सुखदुःख सांगेन तुजपाशी । आंबा माझी कैवारी ।
तूचि हो देवाचे तारक । भवसागर तारी कितीक ।
निर्वाण पाहसी । कष्ट दोष निवारी ।
आंबाजी माये अंबिके जगदंबिके ।। १ ।।
त्रिजट स्वप्न सांगते । ऐक जानकेबाई ।
निळ्या घोड्यावरी स्वार हो । पाहिले येथे आणिक जिवलग सांगाती ।
मल्ह भैरव भारी । चौसष्ट योगिनी मिळोनिया उदो बोला ये माये ।।
आंबाजी माये अंबिके जगदंबिके ।। २ ।।
काय वर्णू तुझी स्तुती हो । आई नाकळे लीला ।
सीनभाग माझा हो हरला । आंबा देखिली डोळा ।
लावण्य अति सुंदर । अंबा सतरावी कळा ।
बाया सराफाच्या स्वामिनी । मूळ पीठ वेल्हाळा ।
आंबाजी माये अंबिके जगदंबिके ।। ३ ।।

## जयदेवी आदिरूपे

रूप तुझे काय वर्णू । जैसा शोभतो भानू ।
बैसली सिंहासनी । आंबा माझी कामधेनू ।
इच्छियेले फळ देशी । तुज धाता त्रिजन ।।
जयदेवी आदिरूपे परशुरामाचे माते । आरती ओवाळितो ।।
नव दिवस नवरात्र । माझ्या अंबेचे व्रत ।
यात्रेशी बहु येती । थोर महोत्सव होतो ।
रेणुका नाम तुझे । भक्तजन ओवाळिती ।।
जयदेवी आदिरूपे ।। १ ।।
पाहिले आदिमूळ तुझे तुळजापूर । बैसली सप्तशृंगी ।
दैत्य मारूनिया थोर । पाठ करी गंगाधर ।
दोन्ही जोडूनिया कर विनवितो दास तुझा । ठाव द्यावा चरणी ।
जयदेवी आदिरूपे ।। २ ।।

संग्राहिका : सौ. मालती दांडेकर

यल्लम्माला जाते घेते भंडारा समाईक
दोघी बहिणींचा देव एक

यल्लम्माला जाता लागे आडवं मोतीचूर
लिंबाला घेते पितांबर

अटंग्या वनात कोन कोयाळ गीत गाई
कारंडी यल्लम्मा परशुरामाला झोका देई

मंगळवारा दिशी करू साकरेचे लाडू
यल्लू तुला जोगव्याला वाढू

यल्लम्माच्या डोंगरावर कोण पिवळ्या पातळाची
कारंडी यल्लम्मा हवा पाही जतरेची

यल्लूच्या डोंगरावर झगाला झग दाट
माझ्या देवीवर चवरी डुलते तीनशेसाठ

मंगळवारादिशी येते कोन तांब्याच्या घागरीची
कारंडी यल्लम्मा वाणीण डोंगरीची

देवा मंदी देव यल्लम्मा किती काहारी
हिनं पुरुषाची केली नारी






**परशुरामाची आई**

इंद्रायणीच्या भव्य खोऱ्यातील पाचसहाशे फूट उंचावरील डोंगरमाथ्याचं भाग्य उजळून टाकणारी देवी एकवीरा म्हणजे जगन्माता रेणुका. परशुरामाची आई. भगवती आदितीनं तप केल्यानंतर भगवान शंकरांनी वर दिलेली मानिनी. भूलोकावरील इक्ष्वाकू कुलात रेणुका नाव धारण करणारी वरदायिनी. संतश्रेष्ठ एकनाथांची कुलस्वामिनी.

> **ते शिवशक्तिरूपें दोनी । नेऊन मिरवें एकपणीं ।**
> **एकपणें जाली गुर्विणी । प्रसवे एकपणीं 'एकवीरा' ॥**
>
> **ते एकरूपें एकवीरा । प्रसवली बोध-फरशधरा ।**
> **जयाचा कीं दरारा । महावीरां अभिमानियां ॥**
>
> **तेणें उपजोनि निवटिली माया । आज्ञा पाळूनि सुख दे पितया ।**
> **म्हणोनि तो जाहला विजया । लवलाह्यां दिग्मंडळीं ॥**
>
> **जो वासनासहस्रबाहो । छेदिला सहस्रार्जुन-अहंभावो ।**
> **स्वराज्य करूनियां पहा हो । अर्पी स्वयमेवो स्वजातियां ॥**

एकनाथी भागवताचा हा मंगलाचरण देवी एकवीरेसंबंधीचा,संत एकनाथांनी प्रकट केलेला सहभाव आहे.

देवी एकवीरेची मूर्ती खडकावर कोरलेली असल्यानं तिचं वास्तव्य गुहेतलं आहे. त्यामुळं तिच्याभोवती प्रदक्षिणेचा मार्ग नाही. देवीच्या शेजारीच कार्ल्याची प्रसिद्ध लेणी आहेत. तिथलं शिल्पसौंदर्य अप्रतिम असून ते फार प्राचीन काळातील आहे.

'हे चैत्यगृह जंबुद्वीपातील अद्वितीय शैलगृह आहे' असा उल्लेख इथल्या शिलालेखांनी केला असून या चैत्यासमोरच्या भव्य सभामंडपाला एक आगळीच

लागतात. डोंगर चढून वर गेले की, एक फाटक लागते. तेथे भारत सरकारच्या पुराणवस्तु संशोधन खात्याचे अधिकारी रहातात. देवीच्या दर्शनाबरोबरच येथील कोरीव लेणी पहायची असतील तर माणसी दोन आणे कर द्यावा लागतो.

फाटक ओलांडले की, दर्शनीच एक दुमजली टुमदार इमारत लागते. तो देवीचा नगारखाना होय. येथे रोज तिन्ही-त्रिकाळी देवीचा नगारा झडत असतो. या नगारखान्याची नेमणूक पुण्याच्या पेशवे सरकारने केली होती. या नगारखान्याच्या इमारतीतून आत गेले की, कार्ल्याच्या लेण्याच्या उजव्या अंगाला एक भव्य सिंहस्तंभ लागतो. या सिंहस्तंभाच्या पायथ्याशी देवीचे वाहन असलेला छोटासा सिंह आहे. सिंहस्तंभासमोरच म्हणजे लेण्यांच्या द्वाराच्या डाव्या अंगाशी एका दगडी चबुतऱ्यावर श्रीएकवीराचे सुप्रसिद्ध देऊळ आहे. ही देवी ठाणे व पुणे जिल्ह्यातील व कोकणातील धीवरांची आणि प्रभु लोकांचीही कुलदेवता असल्याने हे सारे लोक या देवीचे अनन्य उपासक आहेत.

देवीमंदिराच्या द्वाराशी एका भक्कम कमानीला एकूण नऊ लहानमोठ्या घंटा टांगलेल्या आहेत. त्यांपैकी एका मोठ्या घंटेवर १८५७ असा आकडा कोरलेला आहे व तो इंग्रजीत आहे. या जंगी घंटेचा आवाज मधुर आहे. ही घंटा



कार्ल्याची
श्रीएकवीरा देवी

१०६ वर्षांपूर्वीची असावी. तसेच एकवीरा देवीच्या पुढचा छोटासा सभामंडप-सुद्धा सुमारे शंभर वर्षांपूर्वीचा आहे. त्याच्या वरचा शिलालेख असा: 'हें एकवीरा भवानीचे जुने देऊळ मुंबईचे नागा पोसू वरळीकर आणि हरिप्पा चरणवीर यांनी बाबुराव कुळकर्णी यांच्या सल्ल्याने इ.स. १८६६ साली जीर्णोद्धार केला.'

सभामंडपात देवीच्या भक्तांनी देवीची असंख्य छायाचित्रे लावलेली आहेत. देवीच्या भक्तांनी नवस फेडण्यासाठी देवळाच्या उंबरठ्यावर आणि दरवाजात चांदीचे किती तरी रुपये ठोकले होते. त्या चांदीचा उपयोग करून देवीच्या मागची बाजू आणि गाभाऱ्याचा दर्शनी भाग चांदीच्या पत्र्याने मढविलेला आहे. त्यावर नक्षीही काढण्यात आलेली आहे.

कार्ल्याच्या या एकवीरा देवीसंबंधाने फारशी माहिती आज उपलब्ध नसली तरी या देवीचे स्थान प्राचीन असावे असा उल्लेख सापडतो. फार फार वर्षांपूर्वी भारतवर्षात वावरणाऱ्या हरिवर्मा नामक राजास विष्णु प्रसादाने प्राप्त झालेला पुत्र हा वाजीरूपधर विष्णूपासून वडवारूप धारण केलेल्या लक्ष्मीच्या ठायी उत्पन्न झाला होता. म्हणून त्यास हैहय असे नाव ठेवण्यात आले. हा हैहय यदुकुलोत्पन्न हैहय राजापासून अगदी भिन्न आहे. या हैहय राजाला एकावली व यशोवली अशा दोन स्त्रिया होत्या आणि त्यांची उपास्यदेवता ही एकवीरा होती असा स्पष्ट उल्लेख आहे. यावरूनच या देवीचे येथले हे स्थान किती जुने आहे याची चांगलीच कल्पना येते. काही तज्ज्ञांच्या मते ही देवी येथील विहारांच्या म्हणजे लेण्यांच्याही पूर्वीची असावी. कदाचित तिच्या या भागातील प्रसिद्धी-मुळेच येथे बौद्धांनी लेणे कोरले असावे असे वाटते, असा स्पष्ट उल्लेख 'पूना गॅझेटियर' मध्ये आणि कै. श्री. व्यं. केतकर यांच्या ज्ञानकोशात मिळतो.

ख्यातनाम इतिहाससंशोधक आणि 'सह्याद्री' हा संग्राह्य संदर्भग्रंथ लिहिलेले विद्वान लेखक कै. स. आ. जोगळेकर लिहितात, 'कार्ले चैत्यासमोर डाव्या अंगाला सुमारे पंचेचाळीस फूट उंचीचा एकसंधी सिंहस्तंभ आहे. त्याची बैठक वर्तुळाकार असून तो अंगी सोळा कोनी आहे. अग्रभागी वाटोळा कंगोरेदार कळस असून त्यावरील बैठकीवर पाठीला पाठ लावून उकिडवे बसलेले चार सिंह आहेत. महारथी अग्निमित्रज्जनक याने हा स्तंभ खोदविला असा त्यावर लेख आहे. याच्यासमोर म्हणजे चैत्याच्या उजव्या अंगालाही असाच आणखीन एक स्तंभ असावा असे आजूबाजूच्या खुणांवरून वाटते. हा स्तंभ आज संपूर्णतया नष्ट झालेला असून त्या जागी श्रीएकवीरा देवीचे देऊळ बांधलेले दिसते आहे.'

या देवीला एकवीरा हे नाव कसे काय पडले यासंबंधीच्या दोन कल्पना आहेत. काही संशोधकांच्या मते 'अक्का अव्वेयार' म्हणजे 'पूजनीय माता' या द्रविडी नावावरून 'एकवीरा' हे नाव झाले असावे. दुसरे म्हणजे असे की, सर्व क्षत्रियांचा

## अनुक्रम



# कार्ल्याची श्री एकवीरादेवी

लेखक : श्री. सदानंद चेंदवणकर

आमचा महाराष्ट्र ही तीर्थक्षेत्रांची पावनभूमी आहे. येथे अनेक देवदेवतांची परमपवित्र मंदिरे आहेत. त्यांमध्ये कोल्हापूरची अंबाबाई, तुळजापूरची देवी भवानी, माहूर ऊर्फ मातापूरची रेणुका, सप्तशृंगीची महिषासुरमर्दिनी, औंधची यमाई, राशीनची तुकाई या देवतांची मंदिरे तर परमपवित्र समजली जातात. यांमध्येच कार्ल्याच्या श्रीएकवीरा देवीचा समावेश करावा लागतो.

मुंबईहून मुंबई-आग्रा रोडने सुमारे ८० ते ८२ मैल गेले की, डाव्या हाताला कार्ल्याच्या लेण्याकडे जाण्याचा रस्ता फुटतो. हा रस्ता थेट पायथ्यापर्यंत गेला आहे. येथून उत्तरेला बुरुजासारखा डोंगराचा जो एक विशिष्ट भाग दिसतो तिथेच कार्ल्याचे लेणे आणि देवी श्रीएकवीराचे ठाणे आहे. इंद्रायणीच्या खोऱ्यात असलेल्या उंचच उंच पहाडावर अनेक बौद्धकालीन विहार असल्यामुळेच की काय या गावाला फार फार वर्षांपूर्वी विहारगाव असे म्हणत असत. इंद्रायणीच्या खोऱ्यात हा कार्ल्याचा डोंगर आहे. पायथ्यापासूनच डोंगरावर चढायला पायऱ्या केलेल्या आहेत. अपंग, वृद्धांना वर नेण्यासाठी पायथ्याशी डोल्या पण भाड्याने विकत मिळतात. डोंगरावर कित्येक ठिकाणी दाट झाडी आहे, तर कित्येक ठिकाणी झाडी साफ करून उघडी जागा दृष्टीस पडते. कार्ल्याचा डोंगर चढताना सभोवताली लोहगड आणि विसापूर हे किल्ले, तुंग आणि भोरगिरी हे गड व साखरपठार ही नयनमनोहर स्थळे दिसतात. वर्षा ऋतूत डोंगरपठारावरून झुळझुळ वहात येणारे पाणी रुप्याच्या प्रवाहासारखे भासमान होते.

कार्ले हे ठिकाण बऱ्याच वर्षांपूर्वीपासून उभ्या महाराष्ट्रात मशहूर आहे. याचे कारण तिथे असलेली कोरीव लेणी आणि श्रीएकवीराचे देवालय हे होय. सह्याद्री पर्वताच्या ज्या फाट्यावर मंदिर आणि लेणी आहेत त्या फाट्याची उंची जमिनीपासून सुमारे ४०० फूट आहे. डोंगर चढण्यास सुमारे ४० ते ५० मिनिटे

शोभा प्राप्त झालेली आहे. या मंडपाला अनेक खांब असून त्या सर्वांचेवर निरनिराळी सुंदर चित्रं कोरलेली आढळून येतात. ४५ फूट उंचीच्या येथील एका सिंहस्तंभास सोळा बाजू असून शेजारच्याच एका भिंतीवर तीन भव्य हत्ती कोरलेले दिसतात. स्त्रीपुरुष नर्तकांच्या चित्रांची कोरीव देखणी रूपं मनाला भूल पाडीत सर्वत्र आपलं ध्यान खेचून घेतात आणि त्यामुळं देवीच्या रंगभोगाची व अंगभोगाची आपोआपच सांगता झाल्याचं सुख अनुभवता येतं.

चैत्र शु. ८ पासून पौर्णिमेपर्यंत या देवीचा यात्रा उत्सव चालू रहातो. त्यासाठी लांबलांबच्या गावचे कायस्थ, पाठारे प्रभू आणि कोळी लोक कुळधर्मासाठी म्हणून इथे येतात.

या डोंगराच्या पायथ्याशीच देवीचं माहेरघर मानलं जाऊन तिथवर देवीच्या वार्षिक उत्सवातील पालखी वाजत गाजत मिरवणुकीनं नेऊन आणतात. त्यावेळी या देवीच्या अनेक भक्तांच्या अंगात येतं. देवीचं वारं अंगात संचारलेल्या लोकांना 'झाड' म्हणतात. पालखीच्या मिरवणुकीच्या अग्रभागी ही 'झाडं' नाचतात आणि त्यांच्यासह सर्वांच्या मुखी होतेल्या जयघोषानं सारं आसमंत दणाणून जातं!



पराभव करणारा परशुराम हा एकच एक वीर जिच्या पोटी जन्माला आला ती एकवीरा, म्हणजे परशुराममाता रेणुका होय असे काहीजण म्हणतात.

गाभाऱ्यातली एकवीरा देवीची मूर्ती पाषाणाची असून ती डोंगराच्या दगडात कोरलेली आहे. सध्या तर ती बरीच झिजलेली दिसते. ही देवी खडकातले स्वयंभू-स्थान आहे. देवीच्या अंगावर शेंदराची अनेक पुटे चढलेली आहेत. देवीचे डोळे खोल असून त्यात भिंगाचे डोळे बसविलेले आहेत. देवीचे नाक आणि तोंड खोल आहे. यामुळे देवीचे मूळ रूप काहीसे भयानक दिसते. पण मूर्तीला चोळी आणि पातळ नेसविल्यावर आणि देवीच्या मुखावर चांदीचा मुखवटा बसविल्यानंतर मात्र देवीचे रूप सौम्य, हसरे आणि मोठे प्रेमळ दिसते. देवीच्या गळ्यात मंगळसूत्र, हार इत्यादी अलंकार असतात व या अलंकारामुळे ती मोठी खुलून दिसते. देवीच्यासमोर मोठा चौरंग असून त्यावर पूजासाहित्य असते. समोरच दोन मोठ्या समया तेवत असतात व त्या अखंड जळत असतात. देवीच्या डाव्या हाताला असलेल्या कोनाड्यात जोगेश्वरीची शेंदूरचर्चित अशी एक मूर्ती आहे. भाविक देवीची ओटी भरतात. ही देवी नवसाला खात्रीने पावते असा समज या देवीच्या भक्तांचा असल्याने कार्यपूर्तीनंतर भाविक कृतज्ञता म्हणून मोठ्या आदराने नि भक्तिभावाने तिच्यावर दागदागिने घालतात किंवा मुखवटे चढवितात. त्यांनी देवीला नजर केलेल्या किती तरी वस्तू देवळात आहेत. देवीला कोंबडा किंवा बकरी बळी देण्याची प्रथा आहे, परंतु तो बळी डोंगराच्या पायथ्याशी दिला जातो. वरती मंदिरापाशी नव्हे. इतकेच काय पण मंदिराच्या आसपास मांस, मासे भक्षण करण्याची सक्त मनाई आहे. देवीला प्रदक्षिणा करण्यास मात्र येथे जागा नाही. कारण मूर्ती डोंगरातच खोदलेली आहे. यात्रेच्या दिवसात चांगली हजार बाराशे बकरी व कोंबडी देवीला नजर केली जातात, भेट म्हणून दिली जातात, बळी देतात.

श्रीएकवीरा देवीची जत्रा वर्षातून दोन वेळा भरते. एकदा चैत्रात आणि दुसरी आश्विनात. चैत्रातली यात्रा मोठी असते. ही यात्रा चैत्र शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत चालते. आश्विनात नवरात्र यात्रा भरते. यात्रेच्या वेळी तळ-कोकणातून कोळी, प्रभू आणि सोनार लोक मोठ्या प्रमाणावर यात्रेस येतात. कोळी लोक यात्रेला येताना देवीच्या पालख्या आणतात. त्यात एकवीरा देवीचे चांदीचे ताट व मुखवटे असतात. कार्ल्याच्या लेण्याच्या नैऋत्येला काही अंतरावर एक छोटासा तलाव आहे. तिथे एक क्षेत्रपालाचे देऊळ आहे. त्या भागाला देवघर असे म्हणतात. हे देवीचे माहेर होय. चैत्र शुद्ध अष्टमीस ही देवी माहेराहून सासरी म्हणजे कार्ल्यास परत येण्यास निघते. येथे प्रथम यात्रेकरू जमतात व मग गडावर येतात. यावेळी कित्येकांच्या अंगात देवीचे वारे शिरते. जर वारे शिरलेली व्यक्ती

नवीन असेल तर तिला 'नवे झाड' आणि जुनी असेल तर तिला 'जुने झाड' असे संबोधण्यात येते. जुन्या झाडापेक्षा नवीन झाडास फार मान दिला जातो. तेव्हा अनेक भाविक त्या मिरवणुकीत सामील होतात. आणि त्यास शांत करण्या-करिता सर्वतोपरीने यत्न करतात. दिवसातून चार वेळा देवीची षोडशोपचारे पूजा केली जाते आणि तिला अनन्यभावे ओवाळले जाते. देवीची पूजा करणारे ब्राह्मण खालून विहीरगावाहून येतात. त्यांच्याकडे ही पूजापाठाची व्यवस्था फार पूर्वीपासून आहे. देवीपुढे धुपारती करणे व देवीच्यापुढील उत्पन्न घेणे या कामी गुरवाची नेमणूक केलेली आहे व तो तिथे गडावरच रहातो.

या मंदिराच्या आसपासच्या लेण्यांबद्दल पांडवांच्या कथा प्रसृत असल्या तरी येथे सापडलेल्या एका शिलालेखावरून असे सिद्ध होते की, येथील शिल्पकलेस उसवदत्त नामक शकाधिपतीने आरंभ केला. इ.स. पूर्व १२० वर्षी तो या इलाख्याचा सर्वाधिपती असून त्याचा मंत्री वत्स गोत्र नामक एक ब्राह्मण होता. मंदिरालगतच असलेल्या विशाल चैत्य भवनाची निर्मिती नहपन्न नामक शासकाने केली. या नहपन्नचा काल इ.स. पूर्व ४० वर्षे असावा असे समजले जाते. तेव्हा आज या शिल्पकलेस २००० वर्षे झाली असली तरी ती सुस्थितीत आहेत हे विशेष होय. सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे या एकवीरा देवीचे वसतिस्थान तिथे यापूर्वीही होते. यावरून तिचे निवासस्थान किती जुने असावे याची कल्पना येते. या देवीची महाराष्ट्रात अशी पुष्कळ ठिकाणे आहेत. छत्रपती शिवाजीमहाराजांच्या पदरी असलेले व त्यांचे 'शिवभारत' हे संस्कृत श्लोकबद्ध चरित्र लिहिणारे कवींद्र परमानंद यांची कुलदेवता एकवीरा ही होती असा उल्लेख शिवभारतात आलेला आहे. संत एकनाथांची हीच देवी कुलदेवता होती. नाथांनी आपल्या एकनाथी भागवतात याच कुलदेवतेला ग्रंथारंभी वंदन केलेले आहे. माहूर ऊर्फ मातापूरचे रेणुकाभक्त विष्णुदास यांच्या कवितेत एकवीरा असे देवीचे उल्लेख आलेले आहेत.

❀ ❀

आई तुला वलवाया नाय कोनी गो
डोक्या गुरध्या वरी गो आईने शिरे वलविल्या
आई तुझं देऊल कोनी बांधिलं गो
पाचे पांडवानी गो अर्जुन बंधवानी
आई तुझा डोंगर कोनी बांधिला गो
पाचे पांडवानी गो भिमा बंधवानी
साता रातीची केली एक रात गो
आई माझे कोंबुरे आरवली गो
आई तुझे दाराशी सोपारी गो
आई तुझी भेट घेईन दोपारी गो
आई तुझे दाराशी आवूली गो
आईवं नीट पर सावूली गो
आई तुझा गुल्लालू डोंगरू गो
आई तुझा भंडाऱ्या डोंगरू गो
आई माझी उभी टेकरीवरी गो
आई तुझी नंदर दुनियेवरी गो
आई माझी बालगोपालाची गो
आई तुझा उदे उदे बोला गो उदे उदे बोला



भिमानी लातू जे मारीली गो लातू जे मारीली
आय माझी कलथी पारिली गो कलथी पारिली
भीमा बांधवाली आयनी सरापु गो दिला गो सरापु दिला
भीमा तुज्या कीरे परती रे कीरे परती रे
भीमाज्या कीरे से परले गो कीरे से परले
आय माजी दयावंतु जाली, दयावंतु जाली
कीरे टीपावाला लागली गो टीपावाला लागली

अशा तऱ्हेने भीमाने आपल्या गदेने एक डोंगर फोडून आईसाठी देऊळ बांधले व आईला देवळात नेऊन बसविली. तीच ही एकवीरा देवी.

कार्ल्याच्या सुप्रसिद्ध स्तूपासमोरच देवीचे हे देऊळ आहे. दर्शनी दुमजली इमारतीत तिन्ही त्रिकाल न चुकता न थांबता रोज नगारा झडतो. कार्ल्याच्या लेण्याच्या उजव्या अंगाला भव्य सिंहस्तंभ आहे. त्याच्या पायथ्याशी देवीचे वाहन असलेला छोटासा सिंह आहे. सिंहस्तंभासमोर दगडी जोत्यावर एकवीरा देवीचे देऊळ आहे. देवीसमोरच्या दारावरील भक्कम कमानीला नऊ घंटा टांगलेल्या आहेत. घंटानाद करीतच भक्तगण देवळात प्रवेश करतात.

देवीची सकाळची पूजा विहीरगावाचा पुरोहित करतो. त्याजकडे फार पूर्वी-पासून ही वहिवाट आहे. प्रत्यक्ष पूजा करणे, कपडे चढविणे, मुकुट घालणे, धुपारती करणे वगैरे कामे गुरवाकडे आहेत.

देवीची ही मूर्ती स्वयंभू आहे. देवीच्या अंगावर शेंदराची अनेक पुटे आहेत. खोल डोळ्यांत मिन्याचे डोळे बसविले आहेत. देवी दिसायला ओबडधोबड आहे. मूर्तीला चोळीपातळ, चांदीचा मुखवटा बसवल्यावर देवीचे एरवीचे खडबडीत रूप सौम्य व प्रेमळ दिसते. गळ्यात मंगळसूत्र व इतर अलंकार घालतात. देवीसमोर एक मोठा चौरंग व त्यावर उपकरणी असतात. समोर नंदादीप असतो. भक्त देवीची ओटी भरतात, प्रसाद घेतात.

देवीची चैत्रात व आश्विनात यात्रा भरते. कोकणातील 'पोवे' (भक्तजनांचा समुदाय) पालखीतून देवीचे मुखवटे आणतात. अलीकडे पालखीऐवजी पूजा-साहित्य व मूर्ती आपणाबरोबर भक्तगण आणतात. प्रथम जवळच्या देवघर गावी (हे देवीचे माहेर आहे) जमतात व मग गडावर जातात.

देवीला गडावर कोंबडी, बकरी देतात. देवी बरीच जुनी असावी. पूना गॅझेटियरमध्ये व ज्ञानकोशात लेण्यांच्या पूर्वीही देवी होती व तिच्या या प्रांतातील प्रसिद्धीमुळे येथे बौद्धांनी लेणी कोरली असावी असा उल्लेख आला आहे.

'सह्याद्री'कार कै. स. आ. जोगळेकर यांनी कार्ले चैत्यासमोरच्या सिंहस्तंभा-वरील महारथी अग्निमित्रज्जनक याच्या लेखाधारे एकवीरा देवीचे देऊळ हे अलीकडचे आहे, असे मत मांडले आहे.




लेखक : श्री. बाळकराम वरळीकर

कोळी जमात एकवीरा देवीला नवस केल्याशिवाय कोणतेही महत्त्वाचे कार्य करीत नाही. मग ते मासेमारी असो, सत्यनारायणाची पूजा असो वा घरात मंगल कार्य असो, देवीला आरास (कळी) लावल्याशिवाय ही मंडळी पुढचे पाऊल उचलणार नाहीत. रात्रीच्या गाडीने निघतील, बरोबर दुसऱ्या दिवसाचे जेवण घेतील व एकवीरा देवीच्या दर्शनासाठी जातील.

कार्ल्यापासून दोन मैलांवर वसलेले एरगाव आणि डोंगरपठारावर असलेले हे लहानसेच पण एकवीरा देवीचे सुंदर मंदिर पाहिले की, मन कसे प्रसन्न होते. तिथेच बौद्धकालीन शिल्पाकृती व स्तूपही आहे. शिवाय महाराष्ट्रात कुठेही न सापडणारा अशोकस्तंभ हा इथेच पहावयास मिळतो.

चैत्र शुद्ध सप्तमीला एकवीरा देवीची यात्रा असते. त्याच्या एक दिवस आधी म्हणजे चैत्र शुद्ध षष्ठीला भैरी देवाची यात्रा असते. अशी आख्यायिका आहे की, भैरी देव हा एकवीरा देवीचा भाऊ. तेव्हा आदल्या दिवशी त्याची पालखी असते व ती संपली की, सारी मंडळी एकवीरास येतात. दुपारपासून डोंगरावर लोकांची रांग लागते. त्यातच दर्शन घेण्यास माणसे आतुर असतात. याच वेळेस भक्तगणांच्या अंगात देवीचे वारे येते. सर्व लोक देवीचे वारे आलेल्या भक्तांचे दर्शन घेतात. देवळात भक्तगणांची एकच गर्दी उडालेली असते. सर्वजण आईची खणानारळाने ओटी भरतात. असा सतत दोन दिवस जल्लोष चाललेला असतो. अष्टमीला देवीचा मान असतो. कोणी कोंबड्याचा, बकऱ्याचा आणि कोहोळ्याचा मान देत असतात. अशाच वेळी पुढील गीत म्हटले जाते :

**आई माझी एकली रानीवनी गो**
**आईनी [illegible] शेनी**



# एकवीरा

लेखक : श्री. संभाजीराव टिकम

मुंबई, दांडा, वेसावे येथील सोनकोळ्यांचा एक मोठा 'पोवा' लोणावळ्यावरून एकवीरा देवीच्या दर्शनास चालत येतो. पंढरपुरास जाणारे ज्याप्रमाणे अभंग गात 'ग्यानबा-तुकारामा'च्या बेहोशीत वाट चालतात, किंवा नागपुराकडे पंचमढीच्या चवऱ्या महादेवाला 'अगा माझ्या महादेवा गा'... म्हणत भक्तगण जातात त्याप्रमाणेच कोळीही एकवीरेच्या दर्शनाला जाताना गाणे म्हणतात—

**उबी हाय पांचा पायऱ्यांव गो पांचा पायऱ्याव**
**वाट पाते कोकनच्या पोव्याची गो कोकनच्या पोव्याची**
**कंदी येतील कोकनची बालं गो कोकनची बालं**
**कोकनच्या बालांची आयला काय गोरी लागली गो काय गोरी लागली**
**कोकनची बालं आयच्या चरनाला लागतात गो चरनाला लागतात गो**

त्याच श्रद्धेने विचार करताना त्यांना वाटते की, आपल्यावर, कोकणच्या बाळांवर आईची नजर आहे. आईला निजलेले समुद्र दिसतात व या तिच्या कृपादृष्टीमुळे चोरांचे काळीज फाटते.

**उबी हाय उंचा शिलीवरी गो उंचा शिलीवरी**
**आयची नंदार बालावरी गो नंदार बालावरी**

आईचा डोंगर गुलालाचा, जणू गुलालाच्या नद्यांनी, अबिराच्या नद्यांनी, भरलेला. देवीच्या देवळाच्या दाराशी आवळ्याचे व सोनचाफ्याचे झाड आहे. चाफ्याची फुले सुईने रेशमी दोऱ्यात ओवून आईच्या गळ्यात घातली त्यावेळी माळ्याचे तोंडून—

**आयचे सीर दिसे सोबितु गो सीर दिसे सोबितु**

असे आनंदोद्गार निघाले.

पुणे-मुंबई रस्त्यावर कार्ल्याच्या लेण्यापाशीच एकवीरा देवीचे देऊळ आहे. अनेक पायऱ्या चढून वर जावे लागते. डोंगर सुमारे चारशे फूट उंच असल्याने

वर गेल्यावर सभोवतालचे लोहगड, विसापूर किल्ले, तुंग व भोरगिरी गड आणि पायथ्याची विहीरगावादी खेडी रम्य दिसतात.

एकवीरा देवीचे भक्त म्हणजे मुंबई, ठाणे येथील कोळी, प्रभू व सोनार जमातींचे लोक. आपले हे एक फार जुने उपास्य दैवत आहे असे अभिमानाने सांगताना कोळी लोकांनी अगदी थेट पांडवांपर्यंत एकवीरा देवीचा संबंध जोडला आहे ! हे देऊळ पांडवांनी बांधले हे सांगताना कोळी लोक सांगतात :

**अग माजे येकुयेरे बाई गो येकुयेरे बाई**
**तुजं म्हालु वणामंदी गो बाई वणामंदी**
**म्हाल बाई बांदिलं पंडवानं गो बांदिलं पंडवानं**

या महालाचा इतिहास सांगताना कोळी लोक म्हणतात की, आईने (एकवीरा देवीने) पत्र पाठविले. त्या घटकेला पांडव कचेरीत बसले होते. कुणाचे पत्र, कशा कारणे आले म्हणून ते वाचले. आणि एका रात्रीत आईसाठी (देवीसाठी) महाल बांधून देऊ असे ठरवून पाचही पांडव उठले. त्या संदर्भातील लोकगीत असे :

**साता गो रातीची त्यांजु एकु राती केली गो एकु रातु केली**
**डोंगर कन्यावरी करा डोंगर चरवू लागले गो डोंगर चरवू लागले**
**आय माजि कोंबराई जोली गो कोंबराई जोली**
**कोंबरा आरवला लागली गो आरवला लागली**
**पाची न गो पांडव बोलाया लागले गो बोलाया लागले**
**येतु गो रातीचा कोंबरा कुठून आला गो कुठून आला**

पांडव लेणे





# एकवीराई
## (दंतकथा)

निवेदक : **श्री. गोविंद हरि दंडवते**

तडवळे येथील डोके घराण्याची कुलस्वामिनी ही एकवीराई देवी आहे. एकवीराईचे मूळ स्थान माहूरचे.

डोके घराण्याचा मूळपुरुष एकवीराईचा परमभक्त होता. तो प्रतिवर्षी माहूरला जावयाचा. तिथे तीन रात्री मुक्काम करावयाचा. आईची मनोभावे पूजा करावयाचा. सेवा करावयाचा. निरोप घ्यावयाचा आणि परत गावी यायचा. हा त्याचा नेम कधी चुकला नाही.

भक्त आता उतार वयास लागला. गात्रे शिथिल झाली. देहशक्ती क्षीण झाली. चरणी चालवेना. मुखी वदवेना, तसाच तो भक्त माहूरला आला. तीन दिवस तेथे राहिला. यात्राविधी यथासांग पार पडला. निरोप घेण्यासाठी देवीसमोर आला. नेत्रांतून अश्रू ओघळू लागले. ओठ थरथरू लागले. कापऱ्या आवाजात भक्त बोलू लागला, 'माझे भगवती, आता तुझे हे अखेरचेच दर्शन आई. शरीर थकले. मनीचे त्याच्यापुढे काही चालत नाही. आता माहूरला येणे होणार नाही. आई! तुझे हे नयनमनोहर रूप पुन्हा दिसणार नाही. मायलेकरांची ताटातूट होणार आई! आई!! मला सांभाळ.'

मूर्च्छा येऊन भक्त धरणीवर कोसळला. त्याची शुद्ध हरपली त्याच्या दृष्टी-समोर त्यास एक तेजोगोल दिसला. सहस्रसूर्यही त्यापुढे फिक्के पडले. त्यातून आदिमायेची—रेणुकेची मूर्ती बोलू लागली. 'वत्सा! घाबरू नकोस, धीर धर. भक्ताला मजकडे येता येत नसेल तर मी भक्ताकडे येईन. माता लेकराकडे जाईल, तू व्यर्थ चिंता का करतोस? ऊठ, गावाकडे चल. तुझ्यामागे मी येतेच. अगदी तुझ्या घरी येऊन तुझ्या देवघरात बसेन. मात्र तू मागे बघू नकोस.'

भक्त शुद्धीवर आला. पडशी घोड्यावर घातली व तो तडवळ्याकडे निघाला. घोडा चालू लागला. आई मागून येत होतीच. तिच्या पावलांचा नाद त्याच्या

कानांवर आला. तो हरखला. आता आई घरी येणार. आपल्या देवघरात बसणार. त्याचा आनंद ओसंडू लागला. आईच्या पावलांचा आवाज काहीसा अस्पष्ट झालासा त्याला वाटले. अन् त्याने एकदम मागे वळून पाहिले.

'बसले रे बसले, आता इथेच बसणार, इथेच माझी स्थापना कर. हेच आता माझे देवघर.' भक्त खाली उतरला. आईच्या पाया पडला. तो तिथे आईचा तांदळा ! त्याला हर्षही झाला आणि खेदही. आई देवघरात आली नाही पण आपल्या मळ्यात आली. त्याने तिथेच देवालय बांधून आत आईचा तांदळा स्थापिला आणि मग तडवळ्यात मोहरगड आले.



संग्राहक : प्रा. अनंत काणेकर

साता रातीची एक रात केली गो
रातीची एक रात केली
आय माजि कोंबूरे आरवली गो
कोंबूरे आरवली
भिमानी लातू जे मारीली गो
लातू जे मारीली
आयनी सरापुसा दीला गो
सरापुसा दीला
भिमा तुज्या कीरे परती रे
कीरे परती रे
भिमाच्या कीरेसे परले गो
कीरेसे परले
आयला दया उत्पन् झाली गो
दया उत्पन् झाली
आपल्या देऊलात बसयीली गो
देऊलात बसयीली
आय तुजा धरमाचा डेरा पाव गेलू
धरमाचा डेरा पाव गेलू
डेरा हाय एकतीस खांबाचा ग
बत्तीस वाकाचा
बत्तीस वाकाचा ग वरू
चकीरू फिरायाचा

आय तुजे धरम डेरे कोनी बांधीले गो
धरम डेरे कोनी बांधीले
पाची पांडवाशी ग आई
अरजुन बंदवाशी

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

## एकवीरा देवीचे गीत

अग माजे येकुयेरे बाई गो येकुयेरे बाई
तुजं मालु वणामंदी गो बाई वणामंदी
माल बाय मांदिलं पंडवानं गो मांदिलं
माला दोरवा उपजला गो दोरवा उपजला
माय वसे दोरयाच्या मालानु गो दोरयाच्या मालानु
माल बाय टाकुनिये दिलं गो टाकुनिये दिलं
माला काणेरी बसविली गो काणेरी बसविली
नंदानं काणेरीला दिलं गो काणेरीला दिलं
आय माजी विचारान् परली गो विचारान् परली
पतर लिवाला लागली गो लिवाला लागली
पतर नेलं उरणायावतीला गो उरणायावतीला
पांडव कचेरे बैसले गो कचेरे बैसले
पतर कनाचं आले गो कनाचं आले
पतर भोवाने मातेचं गो भोवाने आयेचं
पतर कशा कारणे आले गो कशा कारणे आले
पतर वाचावा लागले गो वाचावा लागले
पाचा पांडवाजू इचारू करीला गो त्यांजू इचारू करीला
आयला रातीनु माल भांदु गो माल भांदु
साता गो रातीची त्यांजु एकु रातु केली गो त्यांजु एकु रातु केली
डोंगर कऱ्यावरी करा डोंगर चरवू लागले गो डोंगर चरवू लागले
आय माजी इचारान् परली गो इचारान् परली
बोलावा-लागली आय माजी पाची पांडवांना गो पाची पांडवांना
अरे माज्या भीमा रे बंधवा रे नकुला बंधवा
अरे माज्या धर्मा रे बंधवा रे अर्जुना बंधवा
अरे माज्या सहदेवा रे बंधवा रे सहदेवा बंधवा
येतील लानी तानी बालं रे लानी तानी बालं
येतील बालती सालती रे बालती सालती
कैसी डोंगरी चरती रे डोंगरी चरती

आंठवरी नागरू धुरधुर धावती रे धुरधुर धावती
बालती सालती दादा लयालयान् चालती
कन्यावरी करा दादा केशाला चरवीता रे केशाला चरवीता
आय माजी रागाबू भरली गो रागाबू भरली
आय माजी कोंबुराई जाली गो कोंबुराई जाली
कोंबरा आरवला लागली गो आरवला लागली
पाची न गो पांडव बोलाया लागले गो बोलाया लागले
येतु गो रातीचा कोंबरा कुटून आला गो कुटून आला
भीमानं गो बंधु आईचा रागानु भरला गो रागानु भरला
मारिली कोंबऱ्याचे लातु गा कोंबऱ्याचे लातु
आय माजी कलथी पारिली गो कलथी पारिली
भीमा बंधवाला आयनी सरापु गो दिला
भीमा बंधवाला पारिलं शेपाचे गो किर
आय माजी दयावंतु जाली गो दयावंतु जाली
कीरे टीपावाला लागली गो टीपावाला लागली
उबी हाय पाच पायेऱ्याव गो पाचा पायेऱ्याव
वाट पाते कोकनच्या पोव्याची गो कोकनच्या पोव्याची
कंदी येती कोकनची बालं गो कोकनची बालं
कोकनच्या बालांची आयला काय गोरी लागली गो काय गोरी लागली
कोकनची बालं आयच्या चरनाला लागतान् गो चरनाला लागतान्
कोकनचे बालांची आयला हौस मोठी भारी गो हौस मोठी भारी
उबी हाय उंचा शिलीवरी गो उंचा शिलीवरी
आयची नंदार बालावरी गो नंदार बालावरी
आय माजी खिरक्या मालान् बसे गो खिरक्या मालान् बसे
आय तुला निजले समुंदर दिसे गो निजले समुंदर दिसे
आय माजी खिरक्या मालान् बसे गो खिरक्या मालान् बसे
खिरक्या मालान् बसे गो चोरांचं कालीज फाटे गो चोरांचं कालीज फाटे
आय तुजा गुलुल्या डोंगर लालू गो गुलूल्या डोंगर लालू
येती गुलुलाच्या नंदी गो गुलुलाच्या नंदी
येती अबीराच्या नंदी गो अबीराच्या नंदी
आय तुज्या दारावरून जाती गो तुज्या दारावरून जाती
आय तुज्या दाराशी सुपारी गो तुज्या दाराशी सुपारी
आय तुजी भेट घेऊ दुपारी गो भेट घेऊ दुपारी
आय तुज्या दाराशी आवुली गो तुज्या दाराशी आवुली
आय तुजेवर परे सावुली गो तुजेवर परे सावुली
आय तुझे दाराशी सोनचापा गो तुझे दाराशी सोनचापा
चापा कोनी गो लाविला गो कोनी गो लाविला

आय तुज्या माल्यानी लाविला गो तुज्या माल्यानी लाविला
शिपन कोनी गो घातिलं गो कोनी गो घातिलं
आय तुज्या माल्यानी घातिलं गो तुज्या माल्यानी घातिलं
चापी कोनी गो वोरिली गो कोनी गो वोरिली
चापी माल्यानी वोरिली गो माल्यानी वोरिली
माला कंवनाक ओयिल्या गो कंवनाक ओयिल्या
माला सुयेवयनी ओयिल्या गो सुयेवयनी ओयिल्या
माला रेसमात ओयिल्या गो रेसमात ओयिल्या
आयचं सीर दिसे सोबितु गो सीर दिसे सोबितु
आय तुजा सकाराम सोनारू गो तुजा सकाराम सोनारू
घरविते बांगऱ्याचे जोरू गो बांगऱ्याचे जोरू
घरविते मुंगऱ्याचे जोरू गो मुंगऱ्याचे जोरू
आयच्या हाताला झाले घटु गो झाले घटु
मुंगऱ्या कानाला झाल्या खरू गो कानाला झाल्या खरू
आय माजी आदिमाया पारवती गो आदिमाया पारवती
तिची नंदार बालावरी गो नंदार बालावरी





# अंबाबाई (महालक्ष्मी)

**महादेवी महालक्ष्मी**

'देवापुढची सहाण घ्यायची. सहाणेवर चंदनाचं खोड उगाळायचं. त्या गंधानं महालक्ष्मी काढायची. शेजारी सोळा दोरे एकत्र करून सोळा गाठी मारलेला दोरक ठेवायचा. देवीची षोडशोपचारे पूजा करायची. त्यावेळी सोळा पत्री वहायच्या. फुलं माळायची. सोळा घारग्यांचा नैवेद्य दाखवायचा. पिठाचे सोळा दिवे पाजळून आरती करायची. गंधाक्षतांनी त्या दोरकाची पूजा करायची. तो डाव्या हाताच्या मनगटात बांधायचा. त्यावेळी मंत्र म्हणायचे. सोळा दूर्वा घ्यायच्या. सोळा अक्षता घ्यायच्या. देवीची कहाणी सांगायची. असा वसा घ्यायचा. आश्विनातल्या शुद्ध पक्षातल्या अष्टमीची वेळ साधायची. देवी मग प्रसन्न होते...'

लहानपणी कुणाकडून तरी ऐकलेली ही गोष्ट आठवणीत घोळवीत त्या दिवशी महाद्वारातून आम्ही तीनचार पायदंड्या उतरून खाली गेलो. तशी नवरात्रातल्या उत्साहानं महालक्ष्मीचं सारं आवार फुलून गेलंवतं. हळदकुंकवाच्या सड्यानं सजविलेल्या पायघड्यांच्या वाटेनं नटूनथटून आलेल्या बायकांची खच्चून गर्दी जमलीवती. पाजळलेल्या शिखरांच्या उत्सवात देवीच्या दर्शनासाठी आलेल्या पुरुष माणसांची वेगळी रांग लागलीवती.

बायकांच्या हातात देवीच्या ओटीचं सामान घेतलेली तबकं होती. पुरुषांच्या हातात पूजेचं सामान होतं. त्याच गर्दीत आम्ही पण आमचं ध्यान घुसडलं. गेलो तशाच पुढं पुढं वाट काढीत. गाठला गाभारा. प्रसन्नवदना महादेवीचं मनसोक्त दर्शन घेतलं. गाभाऱ्यात वाकून देवीच्या चरणी फुलं न् हळदकुंकू वाहिलं. ओटी दिली. नमस्कार घातला. प्रसाद घेऊन अंगारा ल्यालो न् प्रदक्षिणेची वाट मळीत सभामंडपाशी येऊन टेकलो...

ही कुलस्वामिनी रहातेलं हे करवीरनगर म्हणजे दक्षिणेतील काशी ! एक पवित्र तीर्थक्षेत्र. छत्रपती शिवाजीराजांनी या देवीला वस्त्रालंकारांचा महान साज घातलेला. राजेरजवाड्यांनी दानपत्रं देऊन हिच्या पूजेची व्यवस्था केलेली. तिचं दर्शन घेऊन तिला महानैवेद्य दाखविण्यापलीकडं आम्ही काय करणार होतो ? हा विचार मनात आला न् भुलल्यागत झालं. म्हणताना पाच प्रदक्षिणा घालीत स्वत:शीच सुखसंवाद साधला...

कोल्हापूरला जाऊन अंबाबाईला जायचं म्हणजे चुडा ल्यायचा. हळदकुंकवाचे पुडे घ्यायचे. लाह्या बत्ताशांचा प्रसाद धारण करायचा. चैती पुनवेच्या वेळी देवीची पितळी मूर्ती रथात बसवून निघणाऱ्या मिरवणुकीत सामील व्हायचं. साधता येईल त्या आरतीला हजर रहायचं. केसाची चवरी करून देवीचं अंगण झाडतेल्या नवस फेडणारांची धांदल पहायची. घरच्या मंगलकार्यानंतर आवश्यक असणाऱ्या 'मारग मळणे' हा कुळधर्म करणारांबरोबर गावाच्या बाहेर जायचं. एखाद्या बागेत कुलदेवीची पूजा होतेली बघून त्या वेळचं उद्यान भोजन घ्यायचं. देवी ज्या दिशेला असेल त्या दिशेनं पूजा करीत दंडवत घालायचा...

मनातली इच्छा पुरी व्हावी म्हणून दर मंगळवारी 'जोगवा' मागायचा. घरच्या मुलाबाळांना उदंड लाभावं म्हणून त्या जोगव्याचा नैवेद्य आपल्या मुलांबरोबरच्यांना प्रसाद म्हणून वाटायचा...

देवीचा कुळधर्म म्हणून जिथं देवता स्थापन, नंदादीप, मालाबंधन, देवतापूजा, पाठवाचन, सवाष्णी न् कुमारी भोजन, उपवास, कथाकीर्तन अशा कार्यक्रमांत सहभागी व्हायचं. पुरणावरणाचा महानैवेद्य देवीला दाखवून तृप्त व्हायचं...

म्हणजे मग देवीला आमचा सगळा श्रद्धाभाव जाणता येऊन ती प्रसन्न होते... तिच्याएकी आमच्या मुखी असतेल्या 'उदयोस्तु'नं आकाश ठेंगणं होतं न् मग त्या मंडपाखाली पृथ्वीच्या आसनावर बसून आपल्याशीच बोलत बसताना ब्रह्मानंदी टाळी लागते...



## अनुक्रम




लेखिका : डॉ. सरोजिनी बाबर

प्राचीन महाराष्ट्राची एक उल्लेखनीय राजधानी, देवीच्या औट पीठांतील एक लोकप्रिय पीठ आणि मंदिरांच्या नगरांमधील एक प्रशंसनीय नगर म्हणून प्रसिद्धीस आलेल्या कोल्हापूर शहरातील महालक्ष्मीचे मंदिर प्रेक्षणीय आहे. जुन्या राजवाड्यापासून वायव्य दिशेस दोन-तीनशे फुटांवर असलेले महालक्ष्मीचे हे निवासस्थान भव्य आणि सुंदर आहे. मंदिराचे आवार प्रशस्त असून सर्व बाजूंनी बंदिस्त आहे. या मंदिराची बांधणी त्रिशूलाच्या आकाराची असून येथील शिल्प-सौंदर्य देखणे आहे. या मंदिराच्या वरच्या भागाला महालक्ष्मी आहे आणि डाव्या-उजव्या अंगांना आमोरासमोर महाकाली व गरुडमंडप आहे. महालक्ष्मी, महाकाली आणि महासरस्वती ही देवीची त्रिविध रूपे म्हणजे समृद्धी, शौर्य आणि विद्या यांची प्रतीके होत. समाजाला वैभव वाढविणाऱ्या उद्योगसमूहांची, शौर्य गाजविणाऱ्या क्षत्रियांची आणि ज्ञानदान करणाऱ्या आचार्यांची नितांत गरज आहे, असा या त्रिविध रूपांच्या उपासनेचा अर्थ होतो.

मंदिरातील अंदाजे तीन फूट उंचीच्या काळ्याभोर आरसपानी शिलासनावर ही आदिमाया, जगन्माता महालक्ष्मी अंबिका उभी आहे. तिची उंची दोन अडीच फूट असून ती सायुध चतुर्भुजही आहे. देवीच्या वरच्या दोन हातांपैकी उजव्या हातामध्ये लांब गदा धारण केलेली असून डाव्या हातात पुढे केलेली ढाल आहे. खालच्या बाजूच्या दोन हातांपैकी उजव्या हातावर मातुलिंग (महाळुंग) असून डाव्या हातात पानपात्र (पाणी पिण्याचे भांडे) आहे. मस्तकावरील मुकुटा-वर देवीने शिवलिंग धारण केलेले असून त्यावर नागफणा आहे. त्यामागे प्रभावलयाची शोभा आहे. देवीच्या या रूपामध्ये देवत्रयींचा समावेश झालेला आहे. भगवान विष्णू देवीच्या सर्वांगात सामावले गेले असून महेश मस्तकावर विराजमान झाले आहेत. ब्रह्मदेवांनी नागरूपाने तिच्या मस्तकावर छत्र धरले

आहे. देवीचे वाहन असलेला सिंह तिच्यामागे उभा आहे. देवीच्या कपाळी कुंकवाचा मळवट असून नाकात नथ आहे. गळयात रत्नमाला व पायांत सुवर्णाच्या साखळ्या आणि तोडे आहेत. अंगावर भरजरी पैठणी व चेहऱ्यावर तेज आहे.

महालक्ष्मीचे हे ध्यान पाहून आजवर अनेकांनी तिचे मोठे सुंदर वर्णन केलेले आहे. नित्यकर्मसंग्रह नावाच्या ग्रंथामध्ये प्रकाशित झालेले देवीचे वर्णन असे आहे—

**धृत्वा श्रीमातुलिंगं तदुपरि च गदां खेटकं पानपात्रम् ।**
**नागं लिंगंच योनिं शिरसि धृतवती राजते हेमवर्णा ।।**
**आद्याशक्तिस्त्रिरूपा त्रिगुणगणयुता ब्रह्मणो हेतुभूता ।**
**विश्वाद्या सृष्टिकर्त्री मम वसतु गृहे सर्वदा सुप्रसन्ना ।।**

ही आदिशक्ती विश्वजननी महालक्ष्मी फार प्राचीन काळापासून कोल्हापुरी नांदत असल्याचेही उल्लेख अनेक ठिकाणी आढळून येतात.

हेमाद्रीने आपल्या चतुर्वर्गचिंतामणी ग्रंथाच्या व्रतखंड विभागामध्ये विश्वकर्मशास्त्रातले म्हणून या महालक्ष्मीचे वर्णन केले आहे ते असे—

**क्षेत्रे कोल्लापुरादन्ये महालक्ष्मीर्यदोच्यते ।**
**लक्ष्मीवत्सा तदा कार्या रूपाभरण भूषिता ।।**
**दक्षिणाधःकरे पात्रमूर्ध्वे कौमोदकी ततः ।**
**वामोर्ध्वे खेटकं धृते श्रीफलं तदधः करे ।।**
**बिभ्रती मस्तके लिंगं पूजनीया विभूतये ।।**

या हेमाद्रीचा काल इ.स. १२६० ते १३०९ हा आहे.

कोल्हापूरचे अंबाबाई मंदिर



मेवाडचा राणा कुंभाचा आश्रित सूत्रभृन्मंडन याने इ.स. १४५० च्या सुमारास लिहिलेल्या रूपावतार आणि रूपमंडन या नावाच्या मूर्तिकांडावर लिहिलेल्या ग्रंथामध्येही याच प्रकारचे महालक्ष्मीचे वर्णन थोडयाफार फरकाने आलेले आहे.

मार्कण्डेय पुराणापैकी देवीमाहात्म्यामधील मूर्तिरहस्यामध्ये महालक्ष्मीचे वर्णन आढळते ते असे––

**सर्वस्याद्या महालक्ष्मीस्त्रिगुणा परमेश्वरी ।**
**लक्ष्यालक्ष्यस्वरूपा सा व्याप्या कृत्स्नं व्यवस्थिता ।।**
**मातुलिंगं गदा खेटं पानपात्रंच बिभ्रति ।**
**नागं लिंगं च योनिंच बिभ्रती नृप मूर्धनि ।।**
**तप्तकांचनवर्णा सा तप्तकांचनभूषणा ।**
**शून्यं तदखिलं स्वेन पूरयामास तेजसा ।।**

बृहत्स्तोत्ररत्नाकर नावाच्या ग्रंथामध्ये महालक्ष्मीच्या संबंधीचे एक अष्टक आलेले आहे. त्या अष्टकात महालक्ष्मीच्या ध्यानाबाबत ग्रथित झालेला एक महत्त्वाचा श्लोक आढळतो तो असा––

**शंखचक्रगदा हस्ते महालक्ष्मी नमोस्तु ते ।**
**नमस्ते गरुडारुढे कोलासुरभयंकरि ।।**

हाच मजकूर काहीशा क्रमभेदाने संस्कृतातील करवीर माहात्म्य ग्रंथातही आलेला आहे. महालक्ष्मी ही विष्णुपत्नी मानली गेल्याने तिच्या हातातील शंख, चक्र, गदा ही विष्णूची आयुधे या श्लोकात स्वाभाविकपणेच आलेली असली पाहिजेत. अशा नेमक्या वर्णनाची महालक्ष्मी दोड्ड गद्दवळ्ळी गावी आढळून येते.

महालक्ष्मीचे निवासस्थान म्हणून कोल्हापूर नगरीच्या प्रसिद्धीचे उल्लेख बाराव्या शतकाचे पूर्वीपासून आढळून येतात.

राष्ट्रकूट घराण्यातील पहिला अमोघवर्ष किंवा वीरनारायण या राजाने प्रजेला होणारा त्रास कमी करण्यासाठी म्हणून आपल्या स्वतःच्या डाव्या हाताचे एक बोट कापून ते महालक्ष्मीला अर्पण केल्याचा उल्लेख शके ७९३ मधील एका कोरीव लेखात आलेला आहे. कोल्हापूर येथे राज्य करणाऱ्या शिलाहार राजांची कुलदेवता ही महालक्ष्मी हीच होती. या घराण्यातील गंडरादित्य राजा (इ.स. १११५) स्वतःला 'श्रीमन्महालक्ष्मी लब्धवर प्रसादादि राजावली विराजितः' असे बिरुद लावून घेत असे. याच घराण्यातील पराक्रमी भोज (दुसरा) राजाने देवीच्या त्रिकाल नैवेद्याच्या व्यवस्थेसाठी म्हणून कोप्परवाड या गावची जमीन इ.स. ११९० मध्ये इनाम दिलेली होती.

महालक्ष्मीच्या देवालयाच्या आवारात असणाऱ्या गणेश मंदिरातील सिंघण यादवांच्या शिलालेखात (इ.स. १२१८) महालक्ष्मीसंबंधीचा आलेला मजकूर असा आहे---

**शुभयास्तु महालक्ष्मीर्भवतां भवतारिणी ।**
**बिभ्रती शिरसा लिंगमशेषाघोघहारिणी ।।**

या श्लोकामध्ये शिरावर लिंग धारण करणारी, सर्व पापांच्या समूहाचा नाश करणारी व भक्तांना भवसागरातून तारणारी महालक्ष्मी आमचे कल्याण करो अशी प्रार्थना व्यक्त झालेली आहे. याच शिलालेखामध्ये सिंघणाने महालक्ष्मीस उत्तम भूषणे अर्पण केली व आपल्या तैलण नावाच्या चाकराकरवी देवीपुढे फारच मोठ्या उंचीचे सुंदर तोरण बांधविले असा उल्लेख आलेला आहे.

सध्या औंध येथील पंतप्रतिनिधींच्या वस्तुसंग्रहात असलेल्या एका कानडी शिलालेखामध्ये महालक्ष्मीचा उल्लेख आलेला आहे. या लेखात कल्याणचा चालुक्य राजा त्रिभुवनमल्ल (सहावा विक्रमादित्य) हा मन्नेकेरे येथे राज्य करीत असता त्याच्या हाताखालील अधिकारी सोभनेय्य हा कोल्हापुरावर प्रभुत्व गाजवीत असे. या त्रिभुवनमल्लाच्या राज्याच्या ३१ व्या वर्षी म्हणजे शके १०२८, व्यय संवत्सर, या साली (इ.स. ११०७) माघ पौर्णिमेस, शुक्रवारी, सोमग्रहण समयी, सोभनेय्य, त्याची बायको लखुमादेवी, त्याचा मुलगा भेडग्य व मुलगी भेडकय्ये या सर्वांनी कोल्हापूरच्या महालक्ष्मीच्या अंगभोगासाठी म्हणून कापिल गावातील चार एकर जमीन आणि एका घराची जागा कुबेरनायक नावाच्या गृहस्थास दान केल्याचे नमूद झालेले आहे.

देवीभागवतात महालक्ष्मी व कोल्हापूर यांचेसंबंधी आलेल्या एका उल्लेखात करवीर क्षेत्रातील पार्वतीच्या रूपास महालक्ष्मी हे नाव असून दुसऱ्या उल्लेखामध्ये 'कोल्हापूर महास्थानं यत्र लक्ष्मी: सदा स्थिता।' असा निर्देश केला गेला आहे.

राष्ट्रकूट, यादव आणि शिलाहार या कर्तबगार राजघराण्यांच्या कारकिर्दीमध्ये कोल्हापूरचे आणि महालक्ष्मीचे वैभव कळसास जाऊन पोहोचले होते. परंतु इस्लामी आक्रमणानंतर स्वातंत्र्यलक्ष्मी लुप्त झाली आणि मूर्तिभंजकांपासून सुरक्षितता लाभावी म्हणून महालक्ष्मीला देवालयातून नेऊन पुजाऱ्यांनी आपल्या घरी लपविली. देवीचा हा अज्ञातवास इ.स. १७१५ मध्ये संपला. इ.स. १७२३ मधील शंभु छत्रपतींच्या एका राजपत्रात देवीच्या पुनर्स्थापनेसंबंधीचा उल्लेख आलेला आहे. या राजपत्रातील महत्त्वाचा मानला जातो तो या संदर्भातील मजकूर असा---

'श्रीमहालक्ष्मी वास्तव्य करवीर हे अनादी क्षेत्र त्यास आवांतराचे योगास्तव बहूत दिवस पूर्वील देवालय सांडून पुजारियांचे घरी होती त्यास पूर्वी राज्य

विजापूर आदिकरून स्वस्त होते थोर थोर नामांकित ग्रहस्त होते परंतु पूर्वस्थळी श्रीची स्थापना कोणी केली नाही सांप्रतकाळी देश उद्वस राज्य स्वस्त नसतां श्रीने आपणास (सावगांवकर) साक्षात्कारे प्रेरणा करून आपले स्थळी बैसावे हे इच्छा जाली हे व्रत स्वामीस पूर्वी आपण विदित केले त्यावरून स्वामीनी राजेश्री सिदोजी हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यास श्रीचे स्थापनेविषयी आज्ञा केली त्यावरून राव मशारनिले करवीरास येऊन मन्मथनाम संवत्सरी आश्विन शुद्ध विजयादशमी इंदुवासरी (इ.स. १७१५ सप्टेंबर २६) श्रीची स्थापना पूर्व स्थळी देवालयात सुमुहूर्तावर केली.'

दुसऱ्या शिवाजीच्या एका राजपत्रात (इ.स. १७१२ नोव्हेंबर २९) कोल्हापूर तर्फेतील उचगाव हा गाव करवीर येथील देवीस मोकासा दिल्याचे सांगून त्याची लावणी-संचणी महालक्ष्मीचे पुजारी करतील व देवीची नित्य पूजा उत्सव चालवितील असे नमूद केलेले आहे.

महालक्ष्मीच्या मंदिराची घडण 'सर्वतोभद्र' शिल्प पद्धतीने केलेली असून हे मंदिर नक्षत्राकार आहे. मंदिरातील प्रदक्षिणेची वाटही तशीच नागमोडी आहे. या मंदिराच्या बांधकामासाठी चुना न वापरता घडीव दगड एकमेकांत बसवून हेमाडपंती पद्धतीने मंदिराची उभारणी केलेली आहे. मंदिराच्या तळीचा बराचसा भाग जमिनीत खचलेला दिसून येतो. मंदिराच्या बाहेरील सर्व भिंती शिल्पसौंदर्याने नटलेल्या अशा आहेत. सुंदर चौकटींच्या उठावाच्या देवळ्या या भिंतींतून तयार केलेल्या असून त्यामध्ये भरतनाट्य शास्त्राप्रमाणे विविध प्रकारचा मुद्राभिनय करणाऱ्या नृत्यांगना बसविलेल्या आहेत. या नृत्यांगनांना सामान्य लोक 'चौसष्ट योगिनी' या नावाने ओळखतात.

महालक्ष्मीच्या नक्षत्राकार देवळाच्या आतील सर्व दर्शनी असा भाग नक्षीदार स्तंभांनी सजविलेला आहे. पण बाहेरचा दर्शनी भाग मात्र तारकाकारी, विविध प्रकारची नक्षी आणि मदनिका यांनी सुशोभित केलेला आहे. या मदनिकांमध्ये नर्तकी, मृदंगी, वंशी, टाळकरी, वीणावादी, काटाकाढी, आरसादेखी असे अनेक प्रकार आहेत. महालक्ष्मीचा गाभारा हा पश्चिमाभिमुख असल्याने त्याच्या उत्तर, पूर्व आणि दक्षिण अशा तिन्ही भागांमधील तीन देवळ्यांमध्ये व्यंकटेश, कात्यायनी व गौरीशंकर या देवता आहेत. महाकालीचा गाभारा दक्षिणाभिमुख असून त्याच्या पूर्व, पश्चिम व उत्तर विभागातील देवळ्यांत भरत, शत्रुघ्न (चवरी व महाळुंग धारण करणारे द्वारपाल) व वासुदेव (विष्णू) या देवता मूर्तिरूपाने आहेत. महासरस्वतीचा गाभारा मात्र अशा देवळ्या नसल्याने अर्वाचीन भासतो.

या महालक्ष्मी देवीच्या मंदिराच्या बांधणीत दिशासाधन तंत्र अवलंबिले आहे. माघ शुद्ध पंचमीच्या सुमारास सूर्यास्ताचे वेळी सूर्याचे किरण देवीच्या 

मुखावर पडतात. ही पर्वणी साधण्यासाठी शेकडो दर्शनार्थी मंडळी मंदिरात गर्दी करून सोडतात.

कोल्हापूर नगरी ही 'दक्षिण काशी' मानली गेल्यामुळे महालक्ष्मीच्या मंदिराच्या आवारात देवदेवतांची अनेक लहान लहान मंदिरे आहेत. याच आवारात काशी कुंड व मणिकर्णिका कुंड अशी तीर्थ कुंडेही आहेत. मणिकर्णिका कुंडाच्या परिसरात केदारलिंग, कुंडलेश्वर, सिद्धेश्वर, शाकंभरी, मुक्तेश्वरी, हरिहरेश्वर, दत्तात्रेय इत्यादी देवतांची स्थाने आहेत. मणिकर्णिका तीर्थाच्या उत्तर भिंतीस लागूनच पूर्वार्धात अशा पाण्यालगत पाच ओवऱ्या दिसून येतात. पैकी पूर्वेच्या ओवरीत पश्चिमाभिमुख अशी उभी, चतुर्भुज, मुरलीधर मूर्ती असून दोन्ही बाजूंनी दोन चवरीधर स्त्रिया आहेत. शिवाय देहुडचा चरणांचा गदापद्मशंखधारी असा उभा विष्णू व मारुती यांच्याही मूर्ती आहेत. या तीर्थाची बांधणी मराठेकालीन असून त्याच्या दक्षिण, उत्तर व पूर्व दिशांना भिंतीत अंदाजे पन्नास वीरगळ, तीन बैठे ऋषी, दोन कीर्तिमुखे आणि एक शिवपार्वती अशी शिल्पे आहेत.

महालक्ष्मीच्या आवारातील मुख्य दरवाजा हा पश्चिमाभिमुख असून त्याला महाद्वार असे म्हणतात. या दरवाजाने आत गेल्यानंतर डाव्या अंगाला खांबावरील अधिक चिन्हरूप बैठक, दीपमाळ, एडका, मकर, हत्ती असले काही अवशेष नजरेत येतात. त्यानंतर पुढे गारेच्या गणपतीचे, सिद्धिविनायकाचे मंदिर येते.

महालक्ष्मीच्या मंदिरावरील नक्षीकाम



या गणपतीची मूर्ती उभी व उजव्या सोंडेची आहे. या मूर्तीच्या दोन्ही बाजूंनी लहान मोठ्या चवरीधर स्त्रिया व ऋद्धिसिद्धी आहेत. या मंदिराच्या पूर्वेस एक उंच चबुतरा असून त्यावर चारी बाजूंना चार लहान व मध्ये एक मोठी अशा दीपमाळा आहेत. चबुतऱ्याच्या चारी भिंतींमध्ये चार मोठे कोनाडे असून त्यांत छोटा नाग, पाच फण्यांचा मोठा नाग, बैठा चतुर्भुज भैरव, शिवलिंग, वगैरे मूर्ती आहेत.

महालक्ष्मी मंदिराचे महाद्वार



मणिकर्णिका तीर्थानंतर उत्तरेचा घाटी दरवाजा येतो. या दरवाजाच्या माथ्यावर मोठी घाट असून ती महालक्ष्मीच्या विशिष्ट पूजेच्या वेळीच वाजविण्याचा रिवाज आहे. तेथे असलेल्या सध्याच्या घंटेवर J. W. Benson, LIM : Clock Makers, Ludgate Hill, London E.C. 1902 असा मजकूर आहे. या दरवाजावरील जुनी घंटा मुंबईच्या टाऊन हॉलमधील वस्तुसंग्रहालयात असून

तिच्यावर AVE MARIA GRATIA PLENA DOMINUS TECUM असा पोर्तुगीज लेख आहे. महालक्ष्मीच्या आवारातील हाच सर्वांत जुना दरवाजा असून दरवाजाबाहेर एक दीपमाळ आहे.

काशीविश्वेश्वराचे मंदिर हे महालक्ष्मीच्या आवारातील एक प्रमुख तीर्थस्थान आहे. या मंदिराच्या गाभाऱ्यात शिवलिंग असून पूर्वेच्या भिंतीमध्ये बैठी, माला, अंकुश, पाश व पोथी धारण केलेली अशी चतुर्भुज हंसवाहिनी सरस्वती, अभय, डमरू, नाग व आलिंगन या प्रकारच्या मुद्रा आणि आयुधे धारण करणारी शिवपार्वती आणि अतिशय सुबक दिसणारी अष्टभुजा महिषासुरमर्दिनी या मूर्ती आहेत. काशीकुंडात बैठी शिवपार्वती व गणपती यांच्या मूर्ती आहेत.

महालक्ष्मीच्या आवारात याखेरीज शेषशायी विष्णू, नवग्रह, नृसिंह, लक्ष्मी-नारायण, काळभैरव, खंडोबा, भवानी आणि तत्सम इतर देवदेवता यांची अनेक मंदिरे आहेत.

कोल्हापूर हे दत्तात्रेयाचे भिक्षास्थान असल्याचा उल्लेख श्रीधरस्वामींच्या रामविजयात* आला असून महानुभावपंथी लोक येथे यात्रेला येत असत असे लीलाचरित्रावरून दिसून येते. तथापि लीलाचरित्रातील आचार स्थळांपैकी त्याग प्रकरणामध्ये पंचविसाव्या सूत्रात 'मातापुरा कोल्हापुरा न वचावें : तिथे साभिमानिये स्थानें साधकांसि विघ्न करीति :' अशी चक्रधराने आज्ञा दिल्याचे दिसून येते.

महालक्ष्मीसंबंधी उपलब्ध असलेल्या कागदपत्रांवरून या देवस्थानाच्या जमा-खर्चाबद्दलची माहिती मिळते. या संदर्भात उपलब्ध झालेली सनदापत्रे दीडशे ते दोनशेच्या आसपास असून ती संकण, गंगाधर, शिवराम, नरहरी, कमलाकर, आपाभट अशा सावगावकर घराण्यात होऊन गेलेल्या पुरुषांना मिळालेल्या देणग्यांसंबंधीची आहेत. हे निरनिराळे पुरुष कुटुंबवत्सल, अग्निहोत्री, क्षेत्रात पुराण सांगणारे आणि नवरात्रांत अन्नसंतर्पण करणारे असल्याकारणानेच त्यांना ही दानपत्रे मिळालेली आहेत. ही दाने जमीन, हक्क व रोख पैसे अशा प्रकारची असून ती कोणत्या कारणाने व कोणासाठी दिली गेली आहेत तेही स्पष्ट रीतीने नमूद केले गेलेले आहे. या लोकांना महालक्ष्मीचे नोकर मानण्यात येई. कुरडू, बेलवडी, चिकोडी, बागेवाडी, रायबाग, हुकेरी, बुध्याळ, वेंगणमुर्डी, सदलगे, एकसंबे इत्यादी गावांची जमीन इनाम किंवा स्थावर मिळकतीच्या रूपाने महालक्ष्मीकडे कायमची चालू असे. तसेच कित्येक गावांमधून नगदी उत्पन्नही देवीला मिळे. महालक्ष्मीचा हिशोब, जमाखर्च व ताळेबंद वार्षिक असे.

*ज्यासी प्रयागीं प्रातःस्नान । पांचालेश्वरी अनुष्ठान ।
करवीरपुरांत येऊन । भिक्षाटण मध्यान्हीं ।।

पैकी पहिला सुहूर सन ११७८चा सापडतो. त्यामध्ये जमेच्या बाजूला देवीपुढे येणारी रोख रक्कम, दागिने, सनगे, सोने, चांदी, धान्य, नारळ इत्यादींची नोंद होई आणि खर्चाचे बाजूला लक्ष्मीकडील अनावश्यक वस्तू विकून आलेल्या रकमेची किंवा पैसे खर्च करून घेतलेल्या तेलधान्यादी वस्तूंची नोंद असे.

मूर्तीच्या मोडतोडीबाबतचे, दुरुस्तीचे अगर नैसर्गिक झिजावटीचे काही निर्देश जुन्या कागदपत्रांवरून लक्षात येतात. इ.स. १७७८–७९ मध्ये 'श्रीचे प्रभावल व सिंह यास मोले बैसविले' असा उल्लेख सापडतो. तसेच इ.स. १७८८–८९ मध्ये 'जयविजये याच्या मूर्ती जाया जाहल्या होत्या त्यास किटण (वज्रलेप) करणे-बद्दल ११८। खर्च आला होता. लोखंड व पोलाद मोले करून हातापायात घालून बैसविणेबद्दल किर्तापा कासार यास २८११ दिले. यासाठी पोलाद दोन शेर आणि मालवणी लोखंड एकोणीस शेर लागले. किटणासाठी कोळसे दोन शेर, साधी लाख एक शेर, सोनलाख अर्धाशेर, राळ पावशेर, गूळ सहा शेर, तीन हजार बिब्यांचे तेल एवढ्या वस्तू वापरलेल्या दिसतात.'*

देवालयाच्या काही भागांस व शिखरास चुना लावण्याबद्दल एक रुपया खर्ची पडल्याची आणि चित्रांसाठी डिंक, हरताळ, हुरमोज, हिंगूळ, सफेती, नीळ, लाख, मध, साबण, जंगल, पिवडी, शेंदूर इत्यादी जिन्नस खरेदी केल्याची नोंद इ.स. १८३१–३२ च्या ताळेबंदात केली गेलेली आहे.

नवरात्राचे वेळी द्यावी लागणारी बिदागी आणि इतर खर्च यांची नोंद इ.स. १७९३–९४च्या ताळेबंदात दाखविली गेली आहे. हा खर्च हरिदास १५, डवरी गोसावी २, गोंधळी २, कलावंतीण ताफा २५, मृदंगे ५, टाळकुटे १, सलग-संमधी २५, पानसुपारी-विडे २५ असा एकूण शंभर रुपयांचा नोंदविलेला आहे. तसेच या ठिकाणी त्यावेळी रोज उडविण्यास तोफ लागत असल्याचेही म्हटले आहे.

अगदी अलीकडच्या काळात म्हणजे जानेवारी १९५५ मध्ये देवीवर वज्रलेप करण्यात येऊन काही जीर्ण भागांची डागडुजीही करण्यात आलेली आहे. हे काम दीड-दोन महिने चालू होते.

कोल्हापूरची महालक्ष्मी–अंबाबाई ही नवसाला पावणारी देवी असल्याचे उल्लेखही काही जुन्या कागदपत्रांमधून आलेले आहेत. त्यांपैकी नमुन्यादाखल म्हणून काही उल्लेख असे—

बाळाजी बाजीराव पेशवे यांची बायको गोपिकाबाई हिने कोल्हापूरच्या महालक्ष्मीस नवस केला होता. तो करण्याच्या मुळाशी असलेला हेतू स्पष्ट केलेला नाही. परंतु जुन्या मोहरा मोडून पावणेचोवीस तोळे दोन गुंजा वजनाचे सोन्याचे चार चुडे केले व ते नारो बाबाजी भावे याजकडील रामाजी विश्वनाथ

*महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, पान २४.

याजकरवी आणि चिटको अनंत वाईकर यांच्या हस्ते पाठविले असा मजकूर सु. (११) ५५ रबिलावल ११, शके १६७६, पौष शुद्ध १२, इ.स. १७५४ डिसेंबर २६ या कालच्या नोंदीत आहे. (पेशवे दप्तर २२/१५९)*

खाजगीवाले घराण्यापैकी अव्वल इंग्रजीतील पुरुष श्री. गोविंदराव यांची स्त्री रमाबाई हिने पुत्र व्हावा म्हणून आंब्याची जोगाई, तुळजापूरची भवानी, पंढरपूरचा विठोबा, विजापूरचा रवळनाथ, जेजुरीचा खंडोबा व कोल्हापूरची महालक्ष्मी या देवतांस नवस केला होता. त्याप्रमाणे पुत्र झाला. पण नवस फेडण्यासाठी रमाबाई मुलाचे लग्न झाल्यावर मुलगा नीळकंठराव व सून यांसह या सर्व ठिकाणी गेली होती. ती शके १७४६ माघ शुद्ध ७, बुधवार, इ.स. १८२५ जानेवारी २६ रोजी यात्रेस निघाली आणि शके १७४७, चैत्र शु. १०, मंगळवार, इ.स. १८२५ मार्च २९ रोजी परत आली. (रा. १४ ले. ८२ पृ. ६६)†

देवस्थानाबद्दल यात्रेकरूंच्या मुखी अनेक दंतकथा रुळलेल्या असतात. कोल्हापुरातही अशा दंतकथा अनेकदा ऐकायला मिळतात. त्यांपैकी एक दंतकथा अशी की, देवीच्या जोड मंडपातील व त्या मंडपाच्या आजूबाजूच्या मंडपांतील खांब किती आहेत ते मोजू गेल्यास मरण ओढवते. अशा वेळी माणूस चक्रव्यूहात सापडतो. ही मोजदाद त्याच्या शक्तीबाहेरची ठरते.

महालक्ष्मीचा सहाय्यक म्हणून असलेला रंक भैरव जेथे नांदत असे तेथे सध्या रंकाळा तलाव आहे. या तलावाच्या काठाजवळच एका ओबडधोबड घुमटीत एक जीर्ण झालेला पण प्रचंड असा नंदी आहे. तो खोलगट भागात असल्याने अर्धा-अधिक पाण्यातच असतो. या नंदीबद्दलची दंतकथा सांगताना स्थानिक लोक म्हणतात की, हा नंदी रोज गहूभर पुढे सरकतो आणि तीळभर पुन्हा मागे येतो. तेव्हा या गतीने तो जेव्हा रंकाळ्यात मध्यभागी प्रवेश करील तेव्हा जलप्रलय होईल.

सातारकडील एका गृहस्थास पोटशूळ झालेला होता. त्याने महालक्ष्मीची भक्ती सुरू केली तेव्हा त्याला स्वप्नात येऊन महालक्ष्मीने सांगितले की, पुण्यास जाऊन पेशव्यांचे तीर्थ घ्या. इकडे पुण्याच्या पेशव्यांनाही साक्षात्कार झाला की, पोटशूळ झालेला जो कोणी येईल त्याला तीर्थ देण्यात यावे. रोगी आला. तीर्थ मिळाले. त्यामुळे पोटशूळ बरा झाला.

तीर्थक्षेत्र म्हणून शेकडो वर्षे प्रसिद्धीस आलेल्या कोल्हापूरच्या लोकांच्या मनात देवीचे माहात्म्य सांगताना अशा प्रकारच्या अनेक गोष्टी घोळत असतात दंतकथेच्या रूपाने त्यास वाच्यता फुटते.

---

*महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, पान २६.

†महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, पान २५.

देवदर्शनाबरोबरच संतश्रेष्ठांच्या व सत्पुरुषांच्या सहवासानेही कोल्हापूरचे महत्त्व वाढलेले आहे. या संदर्भात उपलब्ध झालेल्या माहितीवरून बंगालचे प्रसिद्ध संत महाप्रभु चैतन्य आपल्या दक्षिण यात्रेच्या वेळी कोल्हापुरी आले असले पाहिजेत असे त्यांच्या प्राचीन चरित्रग्रंथातील 'कोलापुरे लक्ष्मी देखि क्षीरभगवती' या उल्लेखावरून लक्षात येते. महाराष्ट्रातील प्रसिद्ध संत कवयित्री बहिणाबाई हिने आपली सर्व भक्तिसाधना कोल्हापुरीच पार पाडली आहे. घरदार सोडून आई, वडील, भाऊ आणि पती यांचेसह कोल्हापुरी येऊन राहिलेल्या बहिणाबाईने जयरामस्वामींच्या कीर्तनात तुकोबांची अभंगवाणी ऐकली व त्यांना आपले गुरू मानले. तुकोबांच्या अभंग श्रवणाने याच क्षेत्री तिला साक्षात्कार झाला व तिने कवित्वही केले.

प्रतापगडच्या युद्धानंतर पन्हाळ्याला येताना वाटेत थांबून शककर्ते राजे शिवछत्रपती हे श्रीजगदंबेच्या दर्शनासाठी कोल्हापुरी आले होते असे इतिहास सांगतो.

या देवीसंबंधीची उपलब्ध असलेली कागदपत्रे, ग्रंथ व ताम्रशिलासने लक्षात घेता तिला महालक्ष्मी, लक्ष्मी, रमा, भवानी या नावाने संबोधिल्याचे लक्षात येते तथापि, सध्या बहुजन समाजाचे बोलण्यात मात्र ती अंबाबाई याच नावाने परिचित आहे.

महालक्ष्मीस चैत्री पौर्णिमेला, नवरात्रात आणि दिवाळीच्या वेळी मूल्यवान किरीट कुंडले, पिंपळपान, लफ्फा, मोत्यांचा कंठा, मणी, मंगळसूत्र, तन्मणी, सोन्याचा हार, चिंचपेटी, मासपट्टा, मोहनमाळ, नथ इत्यादी अलंकार व भरजरी वस्त्रे घालतात. यावेळी देवीच्या हातातील गदा सोन्याची असते. आश्विन पौर्णिमेस देवीच्या नावाने मोठा भंडारा होतो व सर्व जाति-जमातींना निरपेक्षपणे अन्नसंतर्पण केले जाते. विजयादशमीच्या दिवशी देवीची पालखी सीमोल्लंघनास जाऊन परत येताना महारवाड्यातून पूजा घेऊन येते.

या तीर्थक्षेत्राची वारी करण्याचा प्रघात नाही. त्यामुळे यात्रेचे ठरलेले दिवस येथे नसतात. या देवीला कुलदेवता मानणारे लोक घरात लगीन निघाल्यावर नवदंपतीला घेऊन व नव्याने मूल झाल्यावर मुलाला घेऊन वडील मंडळी देवीच्या दर्शनासाठी येतात. येथे बडवे, पंडे अगर भोपे अशा प्रकारचे यात्रेकरूंची व्यवस्था करून त्या धंद्यावर जगणारे लोक नाहीत. देवीचे पुजारीच सर्व पहातात.





# महालक्ष्मी
## देवदर्शन-कुळाचार

लेखिका : ज्योतिष महापंडिता कु. इंदुमती पंडित

**सर्व मंगल मांगल्ये शिवे सर्वार्थ साधिके ।**

**शरण्यो त्र्यंबके गौरी नारायणी नमोस्तु ते ।।**

जगच्चालक सच्चिदानंद स्वरूप परमात्मा जगाच्या कल्याणाकरिता आणि उद्धाराकरिता कालमानानुसार वेगवेगळे अवतार घेत असतो. परंतु हे सर्व अवतार जरी वेगवेगळे दिसून येत असले तरी तो धारण करणारा मूळ परमात्मा मात्र एकच आहे.

कोल्हापूरची महालक्ष्मी हा विष्णूचा अवतार आहे की शिवाचा अवतार आहे असा एक वाद आहे. देवीच्या मूर्तीच्या मस्तकावर लिंग योनी आहे, गाभाऱ्याच्या वरती शिवलिंग आहे, समोर गणपती आहे तेव्हा ती शिवशक्तीच आहे असे एक पक्ष मानतो. तसेच बाहेर गरुड मंडप आहे म्हणजे ती विष्णुशक्तीच आहे असेही काही मानतात. शिवाय काही लोक असेही सांगतात की, ही तिरूपतीची पत्नी आहे व त्याच्यावर रुसून ती कोल्हापूरला येऊन राहिली आहे.

महालक्ष्मीचे मंदिर पश्चिमाभिमुख आहे आणि त्याची बांधणी अशा तऱ्हेने करण्यात आलेली आहे की वर्षातून दोन वेळेला म्हणजे सूर्य दक्षिणेला जाताना (९ नोव्हेंबर ते १२ नोव्हेंबर) व परत येताना (३१ जानेवारी आणि १ व २ फेब्रुवारी) त्याचे किरण देवीच्या अंगावर पडतात. पहिल्या दिवशी पावलावर पडतात, दुसऱ्या दिवशी सर्व शरीरावर आणि तिसऱ्या दिवशी सबंध मूर्तीवर किरण पडतात. हे किरण पडतात त्यावेळी देवीची आरती व घंटाही होते.

हे सूर्याचे किरण म्हणजे सूर्यदेव देवीला तिच्या नवऱ्याच्या म्हणजे तिरूपतीच्या दुसऱ्या लग्नाला बोलावण्याकरिता येतो अशी एक कथा काही लोक सांगतात !

## देवालय

*करवीर क्षेत्रनिवासिनी श्रीमहालक्ष्मी हे अत्यंत प्राचीन शक्तिपीठ आहे. पुराणमताप्रमाणे याला १०८ कल्पे झाली. काशीखंड, पद्मपुराण, देवीभागवत, हरिवंशपुराण, स्कंदपुराण, मार्कंडेय पुराण वगैरे ग्रंथांत या क्षेत्राचा उल्लेख आहे.

असे हे अत्यंत पवित्र मानले जाणारे व ज्याचा काशीखंडात दक्षिण काशी असा उल्लेख आहे असे देवालय जुन्या कोल्हापूर शहराच्या साधारण मध्यावर जुन्या राजवाड्याचे नजीक आहे. पंचगंगा (शिवा, कुंभी, भोगावती, भद्रा व सरस्वती अशा या पाच नद्या आहेत) ही या क्षेत्राची मुख्य नदी आहे. ती शहराच्या उत्तरेला आहे. ही नदी कश्यपादी मुनींनी पापनाशनार्थ महाप्रयासाने येथे आणली आहे असे पुराणात वर्णन आहे. या शहराच्या आठ दिशांना आठ शिवलिंगे आहेत. वायव्य भागात प्रयाग आहे. रुद्रपद-हारकेश्वर हे एकापुढे एक असून विशाल तीर्थही आहे. (शिंगणापूर—विशाळी). श्रीमहालक्ष्मीने दुष्टांना शासन करण्याकरिता नेमलेला रंकभैरवही आहे. नैऋत्येस नंदवाळ क्षेत्र आहे. तेथे पांडुरंग आहे. पूर्वेस उजळांबा (उजळाई) देवी असून पश्चिमेस सिद्धबटुकेश आणि दक्षिणेस कात्यायनी आहे. उत्तरेस रत्नेश्वर असून युद्धकलेत निष्णात असलेली त्र्यंबोली पूर्वेस आहे.

श्रीमहालक्ष्मीच्या मंदिराला चारही दिशांना चार मोठे दरवाजे आहेत. त्यातील पश्चिमेचा मुख्य दरवाजा (महाद्वार) आणि उत्तरेचा घाटी दरवाजा. या घाटी दरवाजावर मोठी घंटा लावलेली आहे व ती प्रत्येक आरतीच्या पूर्वी वाजविली जाते.

हे चारही दरवाजे बहुतेक एकसारखेच आहेत. साधारण मध्यम हत्ती माहुतासहित असा या दरवाजातून आत जाऊ शकतो. याच दरवाजाचे वरती दक्षिणेस नगारखाना आहे. येथे रोज सकाळी व सायंकाळी सनई व नगारावादन आजही चालू आहे. महाद्वारातून आत आल्यावर डाव्या हातास गणपतीचे देवालय आहे. त्याच्या मंडपातील खांबावर सुंदर नक्षीकाम आहे. तसेच एका खांबावर संस्कृत शिलालेखही आहे. महाद्वाराचे मध्यास उभे राहिल्यास महालक्ष्मीची मूर्ती स्पष्ट दिसते. पूर्वी देवळात सरमाळा किंवा मशाली होत्या. त्यामुळे मूर्ती स्पष्ट दिसत नसे. परंतु आता विजेचे दिवे असल्यामुळे देवीचे महाद्वारातूनही स्पष्ट दर्शन होते.

महाद्वारातून आत गेल्यावर समोर दिसतो तो गरुड मंडप. हा एकोणिसाव्या शतकात बांधण्यात आला. या मंडपामध्ये पूर्वेस तोंड करून एक चौथरा आहे,

* करवीर हा कोल्हा या राक्षसाचा मुलगा. महालक्ष्मीने जेव्हा कोल्हावरती स्वारी केली त्यावेळी त्याचा हा मुलगा रुद्राच्या हातून मारला गेला. मरते समयी त्याने आपले नाव या गावाला दिले जावे अशी विनंती केली आणि महालक्ष्मीने ती मान्य केली म्हणून कोल्हापूरला करवीर असेही एक नाव पडले.

त्यावर देवीची पालखी मंदिराभोवती फिरून आल्यानंतर बसते. या मंडपाचा कीर्तन, भजन वगैरेकरिताही उपयोग केला जातो. हा मंडप मोठ्या कमानीवर उभारला असून त्याला सर्व बाजूंनी लहानसा कठडा आहे व त्याचा दरवाजा उत्तरेस तोंड करून आहे.

महालक्ष्मीचे मुख्य मंदिर काळ्या दगडाचे आहे. या बांधकामास चुना, दगड वगैरे काहीही वापरण्यात आलेला नाही. मंदिराला खूप मोठे कोनेकोपरे आहेत. मंदिर बांधले त्यावेळी त्याला शिखर नव्हते ते अलीकडेच बांधण्यात आले आहे. मंदिराच्या भिंतीवर सभोवार मूर्ती कोरलेल्या आहेत. ह्यांत काही नृत्यांगनाही



महालक्ष्मी देवालयाचे दुरून होणारे दर्शन

आहेत. त्यांच्या हातांत विविध वाद्ये आहेत. तसेच काहींच्या हातांत शस्त्रेही आहेत. मंदिराच्या वरच्या बाजूस चारी दिशांना दगडी जाळ्या आहेत.

महालक्ष्मीच्या उजव्या हातास महाकालीचे व डाव्या हातास महासरस्वतीचे अशी दोन मंदिरे आहेत. ती दोन्हीही मुख्य मंदिराला जोडूनच आहेत. महासरस्वतीच्या मंदिराचे बांधकाम अगदीच खराब झाले आहे. सध्या ते साध्या दगडांनी चुन्यात बांधलेले दिसते.

मंदिराच्या आवारात आणखी बरीच मंदिरे आहेत. मंदिरात जाण्याच्या दरवाजाचे समोर दत्त मंदिर आहे. त्याच्या जरा पुढे मणिकर्णिकेचे तळे होते. यात पूर्वी देवीच्या स्नानाचे पाणी आणून सोडलेले होते परंतु त्यात बरेच अपघात होऊ लागल्याने ते बुजवून टाकले व त्यावर छोटीशी फुलबाग करण्यात आली.

त्यानंतर घाटी दरवाजाचे बाहेर एक दीपमाळ आहे आणि तिच्या कट्टयावर अगस्ती-लोपामुद्राच्या मूर्ती आहेत. याच्या उजव्या हाताला काशी कुंड आहे. तेही आता बांधून काढले आहे आणि त्यावर जाळी टाकली आहे. या कुंडाशेजारी काशीविश्वेश्वराचे मंदिर आहे. त्यासंबंधी माहिती देतात ती अशी :

एकदा काशीचा विश्वेश्वर व कोल्हापूरची महालक्ष्मी यांच्यामध्ये कोणते क्षेत्र जास्त पुण्य देणारे आहे याबद्दल वाद निर्माण झाला. बरेच दिवस या वादाचा निकाल लागेना. शेवटी एक दिवस श्रीविष्णूंनी हातामध्ये तराजू घेऊन या वादाचा निकाल लावण्याचे वचन दिले. श्रीविष्णूंनी एका तराजूमध्ये काशी ठेवली व दुसऱ्या तराजूमध्ये कोल्हापूर ठेवले. तराजू उचलल्याबरोबर कोल्हापूरचे पारडे खाली गेले व काशीचे वर गेले ! तेव्हा त्यांनी कोल्हापूरचे माहात्म्य काशीपेक्षा जास्त आहे असा निर्णय दिला. दोघांनीही तो निर्णय मान्य केला आणि नंतर काशीविश्वेश्वर काशी सोडून कोल्हापुरास येऊन राहिले. 'या करवीर क्षेत्रामध्ये पाच-सहा आठवडे राहिल्यास सर्व पापे नाहीशी होतात.' हे माहात्म्य भगवान श्रीविष्णूंनी ब्रह्मदेवाला सांगितले, ब्रह्मदेवांनी नारदाला सांगितले. नारदांनी मार्कंडेय ऋषी आणि अगस्ती ऋषींना सांगितले.

अल्प काळ तप करून पुण्यलाभ कोठे होईल असा मार्कंडेय ऋषींनी प्रश्न विचारला असता त्यांना नारदांनी करवीर हे महालक्ष्मीचे आद्यपीठ असल्याचे सांगून तेथे जलरूपाने महादेव, पाषाणरूपाने श्रीविष्णू, वृक्षरूपाने देवता आणि वालुकारूपाने मुनिवृंद रहातात असेही सांगितले.

तसेच काशी येथे श्रीशिव रहातात. ते फक्त मुक्ती देतात पण दक्षिण काशी करवीर येथे श्रीशिव आणि श्रीमहालक्ष्मी हे दोघेही रहात असल्यामुळे भक्ती मुक्ती दोन्ही येथे मिळतात असे मानले जाते.

घाटी दरवाजाचे शेजारी नवग्रहांचे मंदिर आहे. तेथील खांबांवर आणि छतावर अत्यंत सुंदर नक्षीकाम केलेले आहे. येथील एका खांबावर २२ जानेवारी (इ.स. १२६६) चा एक शिलालेख आहे.

यानंतर पूर्वेला निघाले असता पूर्व दरवाजाचे उत्तरेस राम मंदिर व दक्षिणेस शेषशाई मंदिर आहे. या शेषशाई मंदिरातील शिलालेखावरून हे मंदिर नेमीनाथ (जैनधर्मीयांचे बाविसावे तीर्थंकर) यांना अर्पण केलेले दिसते. या मंदिराच्या मंडपात सभोवार जैनांच्या नग्न मूर्ती आहेत. येथील खांबांवरील कोरीव काम अत्यंत सुंदर आहे.

यानंतर पुढे श्रीविष्णु मंदिर व लक्ष्मीनारायण मंदिर अशी दोन मंदिरे आहेत. तेथून पुढे गेल्यावर महासरस्वतीच्या मंदिराच्या भिंतीला लागून शनीचे देऊळ आहे.

आपण मंदिरात येताना प्रथम गणपती मंडपात येतो. येथे एक मोठा गणपती महालक्ष्मीकडे तोंड करून आहे. हा मंडप बऱ्याच खांबांवर उभा आहे. या मंदिरात आपल्याला मोठमोठे नक्षीने भरलेले पुष्कळ खांब दिसतात.

यानंतर मधला मंडप लागतो. हा मंडप प्रशस्त आहे व येथील खांब खूप जाड आहेत. त्यावर अत्यंत सुंदर नक्षी आहे, तसेच छतावर अत्यंत नाजूक काम असलेला सुंदर पेंडंट आहे.

या मंडपात देवीकडे तोंड करून उभे राहिल्यास उजव्या हातास महा-सरस्वतीचे मंदिर व डाव्या हातीस महाकालीचे मंदिर आहे. या मंडपातून पुढे निघाले म्हणजे मंदिराचा पहिला दरवाजा व उंबरा लागतो. या दरवाजाचे दोन्ही बाजूंस जय, विजयाच्या दोन भव्य मूर्ती आहेत. या जय, विजयांनी महालक्ष्मीचे मंदिर एका रात्रीत बांधले अशी आख्यायिका आहे. या मूर्तीच्या शेजारी कुदळ खोरे वगैरे जरूर ती उपकरणेही दाखविण्यात आली आहेत. या दरवाजाचे दोन्ही बाजूंस दगडी जाळी कोरण्यात आली आहे.

या दरवाजाचे उंबऱ्यावर नमस्कार करून नंतर आंतरमंडपात जाण्याची प्रथा आहे. या मंडपात डाव्या हातास एक खोली आहे तीत देवीचा जामदारखाना आहे. येथे देवीचे वस्त्रालंकार ठेवलेले असतात. म्हणून त्या खोलीबाहेर पोलिसांचा जागता पहारा असतो.

देवीच्या गाभाऱ्याजवळ एक उंबरा आहे. त्याचे आत पुजाऱ्याशिवाय दुसऱ्या कुणालाही जाण्यास परवानगी नाही. येथे एक मोठी कमान आहे आणि याच कमानीत दोन्ही बाजूंस देवीचे पुजारी बसतात. देवीला हळदीकुंकू, प्रसाद, ओटी वगैरे जे काही अर्पण करावयाचे असेल ते येथूनच करावे लागते. पुजारी देवीचे तीर्थ येथेच देतो. त्याचे शेजारीच अंगाऱ्याचे कुंड आहे.

या कमानीचे आत देवीचा गाभारा आहे. गाभाऱ्यात मूर्तीचे दोन्ही बाजूंस व पाठीमागे अशा तीन लहान खोल्या आहेत. त्यांपैकी देवीच्या डाव्या हाताची खोली हे देवीचे शेजघर आहे. बाकीच्या दोन खोल्यांत पूजेचे सामान ठेवले आहे.

या गाभाऱ्यात देवीचे मूर्तीपासून थोड्या अंतरावर एक चांदीची कमान आहे, तिचे खांबही चांदीचे आहेत. देवीच्या स्नानाचे वेळी व नैवेद्याचे वेळी याच कमानीच्या खांबाधारे पडदा सोडण्यात येतो. देवीची उत्सवमूर्ती देवीच्या उजव्या हातास ठेवलेली असते.

देवीची मूर्ती दोन फूट नऊ इंच उंचीची असून ती एका चबुतऱ्यावर उभी आहे. ही वालुकामय पाषाणाची असल्याने ती गुळगुळीत व चकचकीत नसून थोडीशी ओबडधोबड आहे. मूर्तीच्या मागे सिंह उभा आहे. मूर्ती चतुर्भुज असून तिच्या वरच्या उजव्या हातात गदा व डाव्या हातात ढाल आहे. खालील उजव्या

हातात महाळुंग असून डाव्या हातात पानपात्र आहे. मस्तकाच्या मध्यावर लिंग व योनी दोन्ही असून नागही आहे. महालक्ष्मी हा शिवाचा अवतार आहे. भारतात साडेतीन शिवशक्ती आहेत त्यांपैकी कोल्हापूरची ही एक आहे. दुसऱ्या दोन म्हणजे कलकत्त्याची महाकाली, तुळजापूरची भवानी आणि काश्मीरची सरस्वती. या सरस्वतीला अर्धी मानतात म्हणून त्या साडेतीन आहेत.

महालक्ष्मीचे दर्शन घेतल्यानंतर तिला प्रदक्षिणा करण्याची वाट या ठिकाणाहूनच आहे. प्रदक्षिणेच्या वाटेवरही मंदिराला खूप मोठे कानेकोपरे आहेत.

मध्यमंडपातून डाव्या हाताला महासरस्वतीला जातात. या मंदिरात येण्याकरिता पूर्व व पश्चिमेस वाट आहे. तेथून सरळ महाकालीच्या दर्शनाकरिता जावयाचे. महाकालीच्या मंदिरात जाण्यापूर्वी उजव्या हातास श्रीयंत्र आहे आणि त्याच्यासमोर एका लहान कोनाडयात गणपती आहे.

महाकालीच्या मंदिरात येण्याकरिता पूर्वेकडून व पश्चिमेकडूनही वाट आहे. या मंदिराच्या पूर्वेच्या कोपऱ्यात एक जिना आहे. तेथून वरती जाता येते. या ठिकाणी बरोबर महालक्ष्मीच्या मूर्तीच्या डोक्यावर एक शिवलिंग आहे व त्याच्यासमोर एक नंदी आहे. हे मंदिर मोठे प्रशस्त आहे. तसेच येथील खांबावरही नक्षीकाम आहे.

**दैनंदिन कार्यक्रम**

देवीच्या नित्याचा कार्यक्रम म्हटला म्हणजे पहाटे साडेचार वाजता देवीची उत्तर दरवाजावरील घंटा होते व पहारेकरी देवीचा मुख्य दरवाजा जो आतून बंद करण्यात आलेला असतो तो उघडतो.

देवीची काकड आरती पाच वाजता होते. त्यापूर्वी तिच्या दासदासी मंदिर साफ करतात व सेवेकरी देवीचा गाभारा स्वच्छ करतात. या वेळी देवीला स्नान नसते. फक्त ओल्या फडक्याने देवीचे तोंड व पाय पुसून घेतात. गंध, कुंकू लावून डोळे लावले जातात. देवीच्या पायावर दूधपाणी घालून तिची पाद्यपूजा केली जाते. यावेळी देवीला येणारी मंडळी भूपाळ्या म्हणत असतात.* ज्यावेळी पुजारी देवीची पाद्यपूजा करीत असतात त्यावेळी सेवेकरी गणपती, महाकाली आणि महासरस्वतीची पूजा करून येतात. यानंतर देवीची काकड आरती करतात.†

*भूपाळी .. उठि उठि हो मायभवानी अंबे कोल्हासुरमर्दिनी ।
जय जय परब्रह्मरूपिणी सुखदायिनी भक्तांची ।
उठी आदिमाते देई दर्शन भक्तातें देई दर्शन दासातें ।
झाला अरुणोदय आतां सोडी निद्रेतें ।।

†काकड आरती .. तुजला जगदंबे शांते, तुजला जगदंबे शांते ।
महाकाली, महालक्ष्मी जय सरस्वती माते ।।

नंतर कापूर आरती होते. ही आरती झाल्यानंतर हा काकडा महाकाली, मातुलिंग, महासरस्वती व गणपतीला जाऊन येतो. येताना जय-विजयांचीही आरती होते. परत आल्यावर हा काकडा व कापूर आरती लोकांना घेण्याकरिता गाभाऱ्याच्या दरवाजात ठेवण्यात येते.



घाटी दरवाजावरील घंटा

देवीच्या रोज पाच पूजा होत असतात. त्यापूर्वी प्रत्येक वेळी घाटी दरवाजातील घंटा वाजविली जाते. महापूजा सकाळी साडेआठला सुरू होते. यावेळी पंचामृत पूजा असते (दूध, दही, तूप, साखर, मध). याच वेळी भक्तांचेही अभिषेक असल्यास तेही केले जातात. पंचामृतानंतर गरम पाण्याने देवीला स्नान घालून ती पुसल्यावर तिला पुसट तेलाचा हात फिरविला जातो. या वेळी पुरुषसूक्ताचा किंवा रुद्राचाही अभिषेक असतो. रुद्राभिषेक बहुधा भक्तांचा असतो. देवीचे स्नानाचे वेळी तिच्यासमोर पडदा सोडलेला असतो. परंतु अभिषेक चालू असताना तो बाजूला करतात. म्हणजे ज्यांचा अभिषेक असेल त्यांना तो पहाता येतो.

यावेळी देवीला खिरीचा नैवेद्य दाखविला जातो.*

याच वेळी देवीला साधा एक रुद्राचा किंवा अकरा रुद्रांचा अभिषेक केला जातो. कारण फक्त याच वेळेला देवीला संपूर्ण स्नान घातले जाते. म्हणून एखाद्या भक्तास यावेळी अभिषेकाचे जर शक्य झाले नाही तर तो अभिषेक अकरा वाजताच्या पूजेच्या वेळी होतो. पण त्यावेळी तो देवीच्या फक्त पायांवरच केला जातो.

बहुतेक अभिषेक नवसाचे किंवा ज्यांची महालक्ष्मी कुलस्वामिनी असते त्यांचे असतात. महा अभिषेकाला पंचामृत असते. महानैवेद्य (पुरणपोळी) आणि देवीच्या ओटीला नवी कोरी साडीचोळी व नारळ असतो.

सर्व अभिषेक संपल्यानंतर मूर्ती स्वच्छ पुसून साधी साडी नेसवितात व एखादा दागिना घालतात. यावेळी प्रथम धूप घालण्यात येतो व एकारती ओवाळतात. त्यानंतर खिरीचा नैवेद्य दाखविण्यात येतो. नैवेद्यानंतर पंचारती होते. नंतर मंत्रपुष्प होऊन आरती बाहेर येते व ती महाकाली, श्रीमातुलिंग, महासरस्वती, गणपतीला जाऊन येते. आरती परत आल्यावर कापूर आरती होते आणि त्या दोन्ही आरत्या गाभाऱ्याच्या दरवाजात लोकांना घेण्याकरिता ठेवल्या जातात. यानंतर शंखात पाणी घेऊन ते मंत्र म्हणून देवीला ओवाळून धूपावर टाकतात. नंतर ते पाणी लोकांच्या अंगावर शिंपडले जाते.

हे शंखोदक घेण्याकरिता बरीच मंडळी येतात. या शंखोदकाने रोग जातात तसेच ज्यांना पिशाचबाधा आहे त्यांनाही बरे वाटते अशी समजूत आहे.

देवीची दुपारची आरती साडेअकराला होते, ती सुरू करण्यापूर्वी घंटा होते. या वेळेला होणारी पंचामृत पूजा फक्त देवीच्या पायांवर होते परंतु एखाद्याची अडचणच असेल तर त्याच्या महा अभिषेकाकरिता देवीला यावेळी संपूर्ण स्नान घालतात. परंतु हे अगदीच प्रासंगिक असते.

या वेळीही सकाळप्रमाणेच धूप आणि एकारती होते. नंतर महानैवेद्य (पुरणपोळी) दाखविला जातो. नैवेद्यानंतर पंचारती, कापूर आरती व शंखतीर्थ होऊन हा कार्यक्रम संपतो.

यानंतर दुपारी दोन वाजता देवीची अलंकारपूजा असते. यावेळी फक्त देवीचे तोंड पुसून कुंकू सारखे करतात व तिला प्रसंगानुसार जरीची साडी अथवा शालू नेसवितात. नंतर दागिने घातले जातात. ते रोज बहुधा नुसते सोन्याचे असतात परंतु नवरात्रात आणि मुख्य सणांचे दिवशी जडावाचे व मोत्यांचेही दागिने असतात. तसेच कवड्यांची माळही असते.

* देवीच्या तीन त्रिकालच्या नैवेद्याकरिता मंदिराच्या आवारातील एका खोलीत देवीचा मुदपाकखाना आहे व तो करण्याकरिता आचारी अथवा बाई असते. देवीचा शागीर्द नैवेद्य घेऊन येतो.

ही महालक्ष्मी शिवशक्ती असूनही सौम्य आहे. ती सकाळी बाला, दुपारी तरुणी, सायंकाळी प्रौढा व रात्री माता असते. दुपारची अलंकारपूजा ही देवीची संध्याकाळी येणाऱ्या भक्तांच्या भेटीची पूर्वतयारीच असते.

रोज दुपारी देवीला येणाऱ्या लोकांची गर्दी साधारण चार वाजल्यापासून रात्री आठ वाजेपर्यंत जास्त असते. त्यात विशेष गर्दी मंगळवारी व शुक्रवारी असते. कोल्हापुरात देवीचा वार शुक्रवार मानला जातो. अद्यापही जुनी मंडळी त्या दिवशी देवीच्या गावातून बाहेर जात नाहीत.

रात्री आठ वाजता देवीच्या पूजेची घंटा होते. यावेळी फक्त धूप घालून एकारती ओवाळतात. नैवेद्याला फक्त फळेच असतात. यानंतर पंचारती होते व शंखतीर्थही असते. संध्याकाळी देवीच्या दर्शनाला येणारी बरीच मंडळी यावेळी हजर असतात. शंखतीर्थ संपल्यानंतर देवीची अलंकारपूजा उतरण्यात येते व तिला साधी साडी-चोळी नेसविण्यात येते. तसेच लोकांनी देवीला आणलेले हारही यावेळी तिला घालण्यात येतात.

देवीची प्रत्येक आरती महाकाली, मातुलिंग, महासरस्वती व गणपती यांना जाऊन येते. संध्याकाळी गर्दी जास्त असल्याने आरतीला जाऊन यायला बराच वेळ लागतो. यावेळी सेवेकरी आरती बाहेर घेऊन गेला असता सामुदायिक मंत्रपुष्प म्हणतात. त्यानंतर देवीसूक्त, रात्रीसूक्त आणि सप्तशतीचा पाठ (अकरावा अध्याय) म्हणतात. देवीची शेजारती रात्री दहा वाजता होते. त्या वेळीही घंटा होते. यावेळी देवीचा आतील व बाहेरील गाभारा स्वच्छ लोटून पाण्याने पुसून घेतला जातो. यावेळी 'निर्गुण निश्चल' ही कापूर आरती म्हणतात. आरती प्रथम आतील गाभाऱ्यात सुरू करतात व नंतर ती पुरी होण्यापूर्वीच पुजारी बाहेरील गाभाऱ्यात येतो व तिथे तिचा शेवट होतो.

आरतीपूर्वी देवीला दुधाचा नैवेद्य दाखविण्यात येतो. यावेळी काही लोक देवीच्या नैवेद्याकरिता दूध घेऊन येतात. निद्रा संपल्यानंतर हे नैवेद्याचे दूध लोकांना प्रसाद म्हणून दिले जाते.

देवीची पूजा, अलंकार वगैरे कार्यक्रम चालू असताना देवीसमोरील गणपती मंडपात गवयांचे गाणे चालू असते. पूर्वी गाण्याला कोण बसत असत माहीत नाही. परंतु कधीकधी अल्लादियाखाँ बसत असत व त्यानंतर त्यांचे दोन्हीही मुलगे हजेरी देत असत. सध्याही हिराबाई बडोदेकर जेव्हा कोल्हापूरला देवीला जातात तेव्हा देवीसमोर गाणे म्हटल्याशिवाय परत येत नाहीत.

देवीपुढे कुणाचा नवसाचा गोंधळ असेल तर तो याच वेळी घातला जातो. तो गणपती चौकात असतो. तो आरती सुरू झाल्यावर सुरू होतो आणि शंख-तीर्थानंतर संपतो.

शेजारतीपूर्वी देवीच्या शेजघरात पलंगावर गादी घातलेली असते. शेजारी पाण्याचे तांब्या भांडे व दोन गोविंद विडे ठेवलेले असतात.

आरतीनंतर शेजगृहाशेजारी उभे राहून 'निद्रा करी मंची। जगदंबे निद्रा* करी मंची ॥' ही निद्रा म्हणतात. निद्रा चालू असताना कापूर आरती महाकाली वगैरेंना जाऊन येते. नंतर ती गाभाऱ्यात ठेवतात. निद्रा संपल्यानंतर गाभाऱ्याचा दरवाजा बंद करून त्याला कुलूप घालण्यात येते व त्याची किल्ली पुजाऱ्याजवळच रहाते. पुजारी बाहेर गेल्यानंतर पहारेकरी मुख्य दरवाजाला आतून कुलूप लावून घेतात. हा दरवाजा दुसऱ्या दिवशी काकड आरतीचे वेळीच उघडण्यात येतो.

*ही निद्रा कोल्हापूरच्या पहिल्या छत्रपती शिवाजीमहाराजांचे गुरू पंडित सिद्धेश्वरमहाराज यांचे दुसरे चिरंजीव नारायण ऊर्फ नानामहाराज यांनी पुजाऱ्यांचे आग्रहावरून करून दिली आहे. त्याची हकिगत अशी :

नानामहाराजांचा रोजची स्नान पूजा आटोपून सकाळी देवीला जाण्याचा नियम होता. त्यावेळी देवीला पुजाऱ्याव्यतिरिक्त इतरांना सोवळ्याने पूजा करता येत असे. नानामहाराज सोवळ्याने देवीला जाऊन तिची स्वतः पूजा करीत असत व शेवटी नमस्कार करून तिच्यापाशी प्रसाद मागत असत. प्रसाद मागितल्यानंतर देवीला वाहिलेल्यापैकी एक फूल खाली पडत असे. तेच फूल पुजारी त्यांना प्रसाद म्हणून देत असत. हा कार्यक्रम कित्येक दिवस चालू होता. एकदा पुजाऱ्यांमध्ये याबद्दल चर्चा होत असता त्यातील काहींनी देवीच्या अंगावरून फूल पडण्याची ही एक सहज घटना आहे त्यात विशेष अथवा चमत्कार असे काही नाही, असा दावा केला तर काहींनी त्याच्या उलट बाजू घेतली. शेवटी एक दिवस त्यांनी त्या गोष्टीची शहानिशा करण्याचे ठरविले. त्या दिवशी पुजाऱ्यांनी देवीची पूजा बांधून झाल्यावर तिला वाहिलेली सर्व फुले काढून घेतली व फक्त एक गुच्छ तिच्या डोक्यावर दोऱ्याने बांधून ठेवला.

अर्थात नानामहाराजांना याची काहीच कल्पना नव्हती. ते नेहमीप्रमाणे सकाळी देवीला आले व पूजा वगैरे करून नमस्कार केला व तिचा प्रसाद मागितला. त्याबरोबर डोक्यावर बांधलेला गुच्छ खाली पडला. तेव्हा पुजाऱ्यांनी तो प्रसाद म्हणून त्यांना दिला व त्यांची क्षमा मागून सर्व हकिगत त्यांना सांगितली व त्याच वेळी त्यांनी देवीची एखादी आरती करून द्यावी अशी विनंती केली. त्यावेळी नानामहाराजांनी ही निद्रा करून दिली. या गोष्टीला आज शंभर वर्षे होऊन गेली पण आजही ती निद्रा देवीला रोज म्हटली जाते :

**निद्रा करी मंची जगदंबे । निद्रा करी मंची ॥**
**साधन चतुष्टय खुर चार । गाये अर्थ रूचिर ॥**
**विणिला सत्संगे सुंदर । श्रद्धा तुलीतर ॥ निद्रा . . . ॥**

**अद्वय भक्ती हे कुसुमाली । अंबे वर अंथरली ॥**
**अद्‌भुत बोध उशी लघु तुली । विवेक विरक्त भरली ॥ निद्रा . . . ॥**

**अनुभव दीप महा सोज्वळ । अभ्यास हे तैल ॥**
**वाती अहंममता प्रकाश । भासे अपगत मल ॥ निद्रा . . . ॥**

**षड्रिपू सुपारी फोडून । सत्वात्मक मान पान ॥**
**अहंता जाळनी लाविले । जगदंबे वरि चूर्ण ॥ निद्रा . . . ॥**

**शुद्ध बुद्धि हे जायफळ । लवंगा तुर्या हे विमल ॥**
**सत्व हा खादिर अति धवल । अर्क गुणांचा निर्मल ॥ निद्रा . . . ॥**

**अंबे तांबुल हा घेणे । सर्वा आज्ञा देणे ॥**
**श्रीरामचरण सहरायने । विनवी नारायण ॥ निद्रा . . . ॥**

## शुक्रवार

कोल्हापूरच्या महालक्ष्मीचा शुक्रवार हा मुख्य दिवस मानला जातो. ज्यांची ही देवी कुलस्वामिनी आहे ते बरेच लोक या दिवशी उपवास करतात. नवस बोललेले लोक याच दिवशी तो फेडण्यास उत्सुक असतात. या दिवशी बाकीचा इतर सर्व कार्यक्रम रोजच्याप्रमाणेच होत असतो. फक्त आठच्या आरतीनंतर देवीची पालखी असते.

आठ वाजता देवीची आरती संपवून ती महाकालीकडे गेली म्हणजे देवीची पालखी (ही महालक्ष्मीच्या अंतरमंडपात ठेवलेली असते) निघण्याची तयारी करतात. शुक्रवारी देवीची आरती महाकाली वगैरे देवदेवतांनंतर देवीच्या आवारातील सर्व देवांना जाऊन येते. पालखी सुरू होण्यापूर्वी देवीचे भालदार, चोपदार व पालखीचे भोई तसेच पूर्वी पालखीपुढे नाच करणारी नायकीण ही सर्व मंडळी हजर होतात. हे सर्व देवीचे पिढीजात सनदी नोकर आहेत. देवीचे पुजारीही सनदी नोकर आहेत.

देवीची उत्सवमूर्ती गाभाऱ्यातून आणून ती पालखीत ठेवण्यात येते. यावेळी मूर्तीला जरीचे वस्त्र व दागिने घातलेले असतात. पालखी पूर्व-पश्चिम ठेवलेली असते आणि त्यात उत्सवमूर्ती देवीकडे तोंड करून ठेवली जाते. यानंतर भालदार ललकारतो, पालखी उचलली जाते. ती गणपती मंडपातून उत्तरेच्या पायऱ्यांवरून खाली उतरते व प्रथमच समोर असणाऱ्या दत्त मंदिरापाशी उभी रहाते.

पूर्वी संस्थान असताना पालखीकरिता हत्ती, घोडे वगैरे सर्व लवाजमा सरकारातून येत असे. तसेच पालखीच्या सर्व टप्प्यांवर नायकिणींचे गाणे व नाच होत असे. शिवाय पालखी फिरून येऊन गरुड मंडपात ठेवल्यावर तेथे नायकिणीचे गाणे असे. गाणारी व नाचणारी अशा पूर्वी दोन नायकिणी पिढीजात होत्या. आता गाणारी बंदच झाली आहे व नाचणारी फक्त नवरात्राचे वेळी दहा दिवस येते.

पालखीचा पहिला टप्पा दत्त मंदिरापाशी असतो. या ठिकाणी आता भजन म्हणतात. अथवा गाणेही म्हणतात. हे कोणी म्हणावे याला काही बंधने नाहीत अथवा काही विशिष्टच भजन म्हणावयाचे असेही नाही. येथून पालखी मणिकर्णिकेपाशी थांबते. तेथून ती घाटी दरवाजातून बाहेर पडून अगस्ती-लोपामुद्रेला प्रदक्षिणा करून आत आल्यावर नवग्रहांचे मंदिरापाशी थांबते. प्रत्येक वेळेला पालखी थांबल्या वेळी भजन होते.

नंतर रामाचा पार, शेषशाईचे मंदिर, शनीचे मंदिर व शेवटचा टप्पा जो महाद्वाराजवळ डाव्या हातास आहे तेथे थांबते. तेथून गरुड मंडपाचे उत्तर दरवाजाने आत जाऊन तिला तेथील चबुतऱ्यावर ठेवले जाते. येथे पुन्हा भजन होते व ते संपल्यानंतर पालखी मंदिरात परत येते. या वेळी तोफ होते. पालखी

अंतरमंडपात आल्यानंतर पुजारी उत्सवमूर्ती उचलून तिला गाभाऱ्यात देवीपाशी नेऊन ठेवतात. त्यानंतर पालखी परत महाकालीच्या मंडपाकडे जाते.

शुक्रवारी पालखी असल्यामुळे शेजारतीला साधारण एक तास उशीर होतो. आरती, जयजयकार, उदयोस्तु वगैरे झाल्यावर देवीच्या शेजघरात पाण्याने भरलेला एक तांब्या, नागवेलीच्या पानाचे दोन विडे व एक उदबत्ती नेऊन ठेवतात. इतके झाल्यावर पहारेकरी दरवाजा बंद करतो व कुलूप घालून किल्ली



गरुड मंडप :
महालक्ष्मी मंदिर

पुजाऱ्याजवळ ठेवतो. तसेच बाहेरील दरवाजा बंद करून आतील बाजूने पहारेकरी कुलूप घालून घेतात. पहाटेची काकड आरतीची घंटा वाजेपर्यंत हा दरवाजा कोणत्याही कारणासाठी उघडला जात नाही असा रिवाज आहे.

अशीच पालखीप्रदक्षिणा आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष व माघ या चारही पौर्णिमेस व चैत्र वद्य प्रतिपदेस होते. यावेळी शिखरावर दीपज्योती लावण्यात

येतात. या दीपोत्सवाचा थोडाफार खर्च भक्तमंडळीही करतात. शिखरे पाजळणे हा शब्द या दीपोत्सवाला रूढ आहे. या कार्याला तैलदान करणे महापुण्यासारखे मानले जाते.

## नवरात्र

मानवाला संकटातून सोडविण्याकरिता परमेश्वराने वेगवेगळ्या वेळी वेगवेगळे प्रसंगानुसार अवतार घेतले त्याचेच स्मरण म्हणून आपण नवरात्रात पूजापाठ, यज्ञ वगैरे करीत असतो. नवरात्र म्हणजे देवीने घेतलेली नवदुर्गेची रूपे आहेत.

हे नवरात्र बऱ्याच लोकांच्या घरीही असते. याला कारण म्हणजे या नऊ अवतारांपैकी एक अवतार त्यांची कुलदेवता असते. पण या पूजेत फक्त कलश, त्याला वाहिलेली रोजची फुलांची एक माळ व एका पत्रावळीवर काळ्या मातीत पेरलेले धान्य एवढेच सामान आढळते.

देवीच्या नवरात्रात कोठे कोठे ब्राह्मण सवाष्ण, मुंजा व कुमारिका रोज जेवायला असतात. परंतु सर्वांच्या घरी फक्त बहुतेक ब्राह्मण सवाष्णच असतात व शेवटच्या दिवशी सवाष्णीची खणानारळाने ओटी भरतात.

नवरात्राची पूर्वतयारी म्हणून भाद्रपद वद्य एकादशी दिवशी देवीचे सर्व देऊळ धुऊन काढले जाते. ज्यांच्या घरी आश्विनाचे नवरात्र असते तेथेही सर्व लोक आपले घर नवरात्रापूर्वी स्वच्छ करतात.

आश्विन शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी सकाळी साडेसात वाजता नवरात्राच्या पूजेस सुरुवात होते. इतर पूजेप्रमाणेच याही पूजेला गणपती पूजेपासून प्रारंभ होतो. पुण्याहवाचन झाल्यानंतर घटस्थापना होते. नंतर देवीची स्थापना होऊन देव बसल्याची तोफ होते.

देवीची षोडशोपचारे पूजा करून देवीला वस्त्र नेसवल्यानंतर पुन्हा देवीची नवार्ण पूजा (नाममंत्राने) होते. नंतर आरती होते. आरतीपूर्वी देवीची घाट होते. ही आरती नेहमीच्या आरतीप्रमाणेच असते व ती महाकाली वगैरेंना जाऊन येते. या दिवशीही साडेअकरा वाजता पंचामृत पूजा होऊन महानैवेद्यानंतर आरती होते.

नवरात्रात नऊ दिवस देवीची रोज निरनिराळी आरास अगर वाहन करून पूजा बांधली जाते, रथात बसलेली, सिंहावर बसलेली, झोपाळ्यावर बसलेली वगैरे. तसेच देवीला रोज भरजरी साडी नेसवून जडावाचे दागिने घातले जातात. नवरात्रात देवीच्या दर्शनाकरिता येणाऱ्या लोकांची अतिशय गर्दी असते.

रात्रीची साडेआठची आरती झाल्यानंतर नवरात्रात देवीची पालखी रोज असते. त्याकरिता चांदीची पालखी आणतात. पालखी परत गरुड मंडपात

येऊन बसल्यानंतर देवीपुढे गाण्याचा कार्यक्रम असतो. पूर्वी नवरात्रात यावेळी नायकिणीचे गाणे असे परंतु आता फक्त पालखीपुढे नायकीण नाचते.

हा कार्यक्रम गरुड मंडपात चालू असताना देवळात मंत्रजागर होतो. हा मंत्र-जागर संपल्यानंतर तोफ होते व देवीची पालखी गरुड मंडपातून उठून देवळात येते. देवीची अलंकारपूजा शेजारतीपूर्वी उतरण्यात येते. नंतर शेजारती होऊन मंदिराचा दरवाजा बंद होतो.

प्रतिपदेचाच हा कार्यक्रम चतुर्थीपर्यंत असतो. पंचमी दिवशी देवीची पालखी सर्व लवाजम्यासह त्र्यंबोलीला भेटण्याकरिता सकाळी साडेनऊ वाजता मंदिरा-मधून निघते. प्रथम ती कोटीतीर्थावर थांबते. तेथे देवीची पूजा होते व तीर्थाचे प्रोक्षणानंतर पालखी तर्कतीर्थावर येते. तेथे पुन्हा पूजा झाल्यानंतर मग ती त्र्यंबोलीस येते.

त्र्यंबोलीच्या भेटीकरिता देवी तिच्यासमोर असते. तेथे दोघींची पूजा केली जाते. पूजा झाल्यावर देवी बाहेरील मंडपात येते आणि तेथे कोहाळा फोडण्याचा समारंभ होतो. यानंतर हा कोहाळा बावडयाच्या पाटील घराण्यातील कुमारि-केच्या हातून फोडण्यात येतो. यानंतर पुन्हा देवी आत गाभाऱ्यात जाते. तेथे आरती झाल्यानंतर शंखोदक होऊन मग पालखी परत येते. देवीची पालखी मंदिरातून निघाली म्हणजे व परत आल्यानंतरही देवीची तोफ होते.

श्रीमहालक्ष्मीचे नवरात्रातील अष्टमीला नगर प्रदक्षिणेकरिता निघालेले वाहन



बाकीचे सर्व कार्यक्रम रोजच्याप्रमाणेच असतात. पण अष्टमीचे दिवशी रात्री साडेनऊ वाजता देवीचे वाहन नगर प्रदक्षिणेस निघते. त्या संदर्भात हकिगत सांगतात ती अशी :

'कोल्हासुराचा मुलगा करवीर याचा पराभव करून त्याला देवीने मारल्याची बातमी ऐकल्यावर त्याला फार राग येतो व तो आपले सर्व राक्षस सैन्य जमा करून कोल्हापूरवर स्वारी करतो. यावेळी देवीने आपल्या सहकाऱ्यांना सांगितले की तुम्ही कोल्हासुराचे सर्व सैन्य नष्ट करा तोपर्यंत मी त्याला झुलवत ठेवते. अष्टमी दिवशीचे रात्री देवी युद्धाची परिस्थिती पहाण्याकरिता कोल्हापुरातून फिरून आली व सर्व राक्षसांचा संहार झाला आहे याची खात्री झाल्यानंतर तिने नवमी दिवशी पहाटे कोल्हासुरास मारले.'

देवीचे हे अष्टमीचे वाहन परत आल्यानंतर शेजारती होते. शेजारतीनंतर देवीची जागरपूजा होते. या पूजेचे वेळी फक्त पुजारीच असतो व देवीच्या गाभाऱ्याचे दार बंद असते. नवरात्रात देवी नऊ दिवस झोपत नाही.

मंदिरात जागरपूजा सुरू झाल्यानंतर महाकालीसमोर यज्ञाला सुरुवात होते. देवीचे मुख्य पुजारी पुण्याहवाचनाला बसतात. यावेळी बहुतेक रात्रीचा एक दीड वाजलेला असतो. नंतर गणपतीपूजा होते व सर्वसाधारण अडीचच्या सुमारास होमाला प्रत्यक्ष सुरुवात होते. त्याला दोन एक तास लागतात व त्यानंतर चार-साडेचारच्या सुमारास आहुतीस प्रारंभ होऊन साडेसहाला पूर्णाहुती होते.

दुसऱ्या दिवशी म्हणजे नवमी दिवशी पहाटे चार वाजता महाकालीसमोर नव-चंडी होमास सुरुवात होते. तो साधारण सात वाजेपर्यंत चालतो. नंतर तेथे कोहाळा फोडण्यात येतो. या कोहाळ्याबद्दलची हकिगत ऐकायला मिळते ती अशी :

'कोल्हासुराचे देवीशी युद्ध चालू असताना त्याने आपल्या मंत्राने देवदेवतांना बेशुद्ध केले आणि त्यामुळे देवीने कोल्हासुराला मारलेले ते पाहू शकले नाहीत. तेव्हा शुद्धीवर आल्यावर त्यांनी देवीला विनंती केली की तिने कोल्हासुराला कसे मारले ते त्यांना दाखवावे. तेव्हा एक कोहाळा आणावयास सांगितला तो आणल्या-वर तिने त्याला आपल्या हाताने स्पर्श केला व देवांना तो फोडण्यास सांगितले. परंतु कोणालाच तो फोडता आला नाही. तेव्हा देवीने आपल्या तरवारीने तो कापला. म्हणूनच आजतागायत यज्ञानंतर कोहळा फोडतात.'

होमाची सात वाजता पूर्णाहुती झाल्यानंतर देवीची पूजा होते. यावेळीही गाभाऱ्याचा दरवाजा बंद असतो. हा दरवाजा आठनंतर उघडतात व नित्याचे कार्यक्रम होतात.

नवमीचे दिवशी दोन प्रहरची पूजा व आरती झाल्यानंतर घट उचलतात. त्यावेळी तोफ होते. म्हणजेच देव उठले व नवरात्र संपले असा त्याचा अर्थ होतो.

विजयादशमी दिवशी सायंकाळी पाच वाजता देवीची पालखी सीमोल्लंघनाकरिता दसरा चौकात जाते. तेथे आपट्याची पूजा झाल्यानंतर पालखी पंचगंगा तीरावर जाते. तेथे पूजा होऊन साधारणपणे साडेआठच्या सुमारास ती देवळात येते. तेथे आल्यावर आरती होते.

आश्विन पौर्णिमेस देवीचा महाप्रसाद असतो. त्या दिवशी दुपारी एकारती झाल्यावर देवीचा महानैवेद्य होऊन महाप्रसादास सुरुवात होते. प्रसादाला खीर, भात, पोळी, बुंदीचे लाडू वगैरे असण्याचा प्रघात आहे. या दिवशी साधारणपणे वीस ते पंचवीस हजार लोक प्रसादाला येतात. या दिवशीही रात्री पालखी असते व त्यावेळी देवीची पाचही शिखरे पाजळतात.

**दुग्धस्नान**

नवरात्रामध्ये नऊ दिवस वेगवेगळी सुंदर वाहने देवासाठी बांधण्यात येतात. ती पहाण्याकरिता संध्याकाळी लोकांची अत्यंत गर्दी होते. या वाहनपूजा दुपारी बांधल्या जातात. देवीला कार्तिक महिन्यात जेव्हा दुधाचे स्नान घालतात तेव्हाही बरीच गर्दी होते.

आश्विन वद्य १४ पासून कार्तिक पौर्णिमेपर्यंत हा उत्सव चालतो. या दिवशी काकड आरतीची घंटा पहाटे तीन वाजता होऊन त्याच वेळी काकड आरती होते.

यानंतर पहाटे साडेपाच वाजता दुसरी घंटा होते. कार्तिक स्नानाला नदीवर जाणारी बरीच मंडळी असतात. ती आपले स्नान आटोपून यावेळी मंदिरात हजर होतात. यावेळी लोक येताना देवीला स्नानाकरिता आपले घरचे दूध घेऊन येतात. यावेळी प्रथम देवीचे पंचामृत स्नान होते व नंतर गरम पाण्याने देवीची मूर्ती स्वच्छ केली जाते. त्यानंतर एक दोन तांबे दुधाने मूर्ती स्वच्छ करतात. हे पहिले दूध तीर्थाकरिता धरीत नाहीत. मूर्ती दुधाने धुतल्यानंतर मुख्य दूधस्नानाला सुरुवात होते. सर्वसाधारणत: रोज दहा ते बारा घागरी म्हणजे अंदाजे दीडशे लिटरपेक्षा जास्त दूध या स्नानासाठी असते. या दुग्धस्नानाचे वेळी देवी अत्यंत शांत व सुंदर दिसते. तिला पहाण्याकरिता फारच गर्दी होते. पुष्कळ लोक शेजारतीनंतर रात्री घरी न जाता देवळातच आपली जागा धरून बसतात. कारण स्नानानंतरचे दूध प्रसाद म्हणून सर्व लोकांना वाटण्यात येते.

**विशेष उत्सव**

हिंदुस्थानातील इतर देवस्थानांप्रमाणेच कोल्हापूरच्या महालक्ष्मीचेही काही विशेष उत्सव असतात. यांपैकी शारदीय नवरात्राचा उत्सव मोठा असतो व तो दहा दिवस चालतो. बाकीचे सर्व बहुतेक एकच दिवसाचे असतात.

यापैकी पहिला चैत्र पौर्णिमेचा. या दिवशी देवीचा रथ असतो. देवीचा लाकडी दोन मजली रथ महादरवाजात दुपारी आणतात व तेथे त्याला केळीचे खांब व फुलांच्या माळांनी सजविण्यात येते.

सायंकाळी सात वाजता देवीची उत्सवमूर्ती रथात बसविण्यात येते. रथ साधारणपणे साडेनऊच्या सुमारास महाद्वारातून हलतो. पूर्वी रथापुढे हत्ती, घोडे वगैरे लवाजमा तर असे पण त्याचबरोबर छत्रपतीही रथाबरोबर जात असत. हा रथ सर्वसाधारण महाद्वार रस्ता, गुजरी भाऊसिंगजी रोड, जुना राजवाडा, तुटूची बाग, मिरजकर तिक्टी, बिनखांबी गणेश मंदिर व परत महाद्वारात येतो. वाटेत बरेच नागरिक देवीला आरती देतात. तसेच यावेळी ज्योतिबाची यात्रा आटोपून आलेले बहुतेक सर्व लोक देवीचा रथोत्सव करूनच घरी जातात. त्यामुळे रथाला खूप गर्दी असते. रथ परत महाद्वारात आल्यावर उत्सवमूर्ती पालखीत ठेवण्यात येते. ही पालखी शुक्रवारप्रमाणेच फिरून येऊन गरुड मंडपात येते. यावेळी देवीची पाचही शिखरे पाजळण्यात येतात.



महालक्ष्मी
मंदिरातील
दीपोत्सव

### अक्षय्य तृतीया

आपल्याकडे चैत्र महिन्यात हळदीकुंकू करण्याची पद्धत आहे. आणि ते अक्षय्य तृतीयेपर्यंत चालते. कोल्हापुरात या दिवशी देवीचे हळदीकुंकू असते.

या दिवशी दुपारी दोन वाजता देवीची उत्सवमूर्ती शालू नेसवून दागिने घालून गरुड मंडपात झोपाळ्यावर बसविली जाते. या दिवशी दुपारी तीनपासून रात्री साडेआठ वाजेपर्यंत पुरुषांना देवीला जाता येत नाही. ही एकच दुपार फक्त बायकांच्याकरिता असते. या दिवशी सर्व जातींच्या व सर्व थरांतील बायका देवीला हळदीकुंकू देण्याकरिता व घेण्याकरिता येतात. यावेळी उसाचे गरे, हरभऱ्याचे घाटे, गव्हाच्या लोंब्या, पावटयाच्या शेंगा व भुईमुगाच्या शेंगा एकत्र करून त्याने ओटी भरण्याची पद्धत आहे.

प्रथम देवीची ओटी भरून झाल्यानंतर बायका एकमेकींना हळदीकुंकू लावून ओटी भरतात. या दिवशी येथे निदान पाच तरी सवाष्णींची ओटी भरतातच. यावेळी ओळखदेख लागत नाही. कोणीही कोणालाही हळदीकुंकू देतात.

### हळदीकुंकवाचा सडा

आपले सौभाग्य कायम रहावे म्हणून काही बायका देवीला हळदीकुंकवाचा सडा घालतात. एका पातेल्यात हळद आणि एका पातेल्यात कुंकू घेऊन ते पाण्यात कालवतात. देवीच्या गाभाऱ्याच्या उंबरठ्यापासून सुरुवात करून प्रदक्षिणेच्या सबंध वाटेवरून देवीच्या मुख्य दरवाजापर्यंत हा सडा घालतात.

### कुंकुम अर्चन

हेही सौभाग्याकरिताच करतात. एक किलो कुंकू घेऊन ते पुजाऱ्यापाशी देतात व ते तो देवीचे अष्टक म्हणत असताना प्रत्येक नावाबरोबर कुंकवाची चिमूट देवीच्या पायावर वहातो व सर्व संपल्यावर ते वाहिलेले कुंकू प्रसाद म्हणून देतो.

### गंधपूजा

माझ्या घरी सतत शांती नांदू दे, मी तुला शांत करीन, असाही एक नवस करतात. यात देवीला शांत करावयाचे म्हणजे उन्हाळ्यात तिची गंधाने पूजा बांधावयाची. या पूजेला साधारण पाच किलो गंध लागतो. हा गंध उगाळताना त्यात अत्तर घालतात. म्हणजे तो वाळत नाही व त्याला चिराही पडत नाहीत.

दुपारी देवीची अलंकारपूजा करण्याचे वेळी तिला या गंधाचेच वस्त्र तयार करतात. प्रथम सबंध मूर्तीला गंध लेपतात व नंतर त्यात ओचापदर कोरतात. केशर बुक्का, अष्टगंध घेऊन त्याने साडीचे काठपदर व चोळीचा काठ दाखवितात.

ही पूजा बांधायला बराच वेळ लागतो व बराच खर्च येतो. तसेच गंध उगाळायला साधारण एक आठवडा लागतो. ही पूजा वर्षातून तीन चार वेळेलाच बांधली जाते. अशी पूजा बांधणारे पुजारीही आता फारच थोडे आहेत. अशा वेळी देवीला



कोल्हापूर महालक्ष्मी (गंधपूजा)

गंधाची साडी नेसविली आहे हे सांगूनदेखील कोणाला खरे वाटत नाही. एवढी ही गंधपूजा अप्रतिम साधलेली असते.

### अभिषेक

देवीला कमी अधिक प्रमाणात दररोज अभिषेक असतोच. अनेक लोकांची महालक्ष्मी ही कुलस्वामिनी आहे. त्यांचा वर्षातून एक अभिषेक असतो. दुसरे

अभिषेक असतात ते नवसाचे असतात. नवस बोलणारे सर्व जातींतील तसेच सर्व थरांतील लोक असतात. ज्याची जशी ऐपत असेल तसा तो अभिषेक करतो.

अभिषेक पुजाऱ्यामार्फतच करावा लागतो कारण दुसऱ्या कोणाला देवीला शिवता येत नाही. कोणत्याही अभिषेकाला पंचामृत, ओटीला खणनारळ व नैवेद्य इतके तरी असावेच लागते. नैवेद्य हा साध्या खडीसाखरेपासून, पेढ्यापासून तो पुरणपोळीपर्यंत असतो. तसेच ओटीला साध्या खणानारळापासून तो शालूपर्यंतही सामान आढळून येते. ओटीचा नारळ बहुतेक प्रसाद म्हणूनच परत घेतात. परंतु त्याकरिता सोडवणूक ठेवली पाहिजे. म्हणजे सर्वसाधारण नारळाच्या किंमतीइतके पैसे देवीसमोर ठेवावे लागतात. हा प्रसादाचा नारळ नेहमी आख्खा दिला जातो. तो कधीही फोडत नाहीत. कारण काही तरी हेतूने नारळ ठेवलेला असतो व तो प्रसाद म्हणून दिला जातो. म्हणजे जो इच्छित हेतू असेल तो संपूर्ण पुरा व्हावा म्हणून आख्खा नारळ ठेवतात. तो नारळ जर फोडला तर हेतू संपूर्ण पुरा होणार नाही हा समज असतो.

**प्रसाद**

देवीचा प्रसाद म्हणून दर शुक्रवारी देवीला फुटाणे नेण्याची पद्धत आहे. दुसरे म्हणजे देवीच्या मळवटाचे कुंकू देवीला कपाळावर मळवट भरीत नाहीत. देवीच्या कपाळावर प्रथम गंधाचा मळवट सबंध कपाळभर असतो व त्यावर कुंकू लावतात. मळवटाचे कुंकू पायावर वहातात. हा प्रघात पहिल्यापासून चालू आहे. ज्यांना कुंकवाने कपाळावर जखम होण्याचा त्रास होतो त्या बायका देवीच्या प्रसादाचे कुंकू लावतात व त्याने त्यांचा त्रास नाहीसा होतो असे सांगतात.

**वरवलक्ष्मी**

हे एक महालक्ष्मीचे व्रत आहे. हे श्रावण महिन्यात असते. श्रावण महिन्यातली पौर्णिमा शुक्रवारी आली तर त्या दिवशी नाही तर पौर्णिमेपूर्वीचा जो शुक्रवार येईल त्या दिवशी हे व्रत पाळतात.

या दिवशी देवीला नेहमीप्रमाणे सकाळी साडेआठ व साडेअकरा वाजता स्नानपूजा असतेच पण शिवाय सायंकाळी साडेचार वाजताही स्नानपूजा असते. त्यानंतर पंचामृत पूजास्नान असते. यावेळी सहस्रनाम आवर्तन मंत्र म्हणून तिला तुळशी वहातात आणि १०८ अक्षता तिच्या पायावर वहातात. याच दिवशी देवीला दूर्वा वहातात. सबंध वर्षात फक्त याच दिवशी देवीला दूर्वा वहातात. एरवी नाही. या पूजेनंतर महानैवेद्य असतो. या दिवशी देवीची अलंकारपूजा नसते.

**देवीचा ध्यानमंत्र**

> **नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः ।**
> **नमः प्रकृत्यै भद्रायै नियतः प्रणताः स्मृताम् ।।**

**देवीचा वज्रलेप**

गेल्या शतकात बऱ्याच वर्षांपूर्वी देवीला स्नान घालीत असताना पुजाऱ्याचे हातून तांब्या निसटला व तो देवीच्या डाव्या हातावर पडला त्यामुळे स्वाभाविकच तो हात दुखावला गेला. आता ही भंगलेली मूर्ती ठेवावी किंवा नाही असाही एक वाद त्यावेळी निर्माण झाला. परंतु तो तिथेच थांबला.

पुढे छत्रपती राजारामहाराज कोल्हापूरच्या गादीवर असताना देवीला वज्र-लेप करून तो हात बसवावा या विचाराने त्यांनी प्रयत्न सुरू केले. पण त्यामध्ये महाराजांना फारसे यश आले नाही. त्यावेळी त्या हाताला फक्त चांदीच्या पट्टीने सांधून ठेवण्यात आले.

पुन्हा एकदा १९५४ मध्ये कोल्हापूरच्या काही प्रमुख मंडळींनी वज्रलेपाची कल्पना पुढे आणली. त्यावेळी संस्थान विलीन झालेले होते व मंदिराची व्यवस्था सरकारकडे होती. सरकारने वज्रलेपाचे हे काम पुरे केले, त्यावेळी देवीच्या हाताला जोडणारी चांदीची पट्टी काढून टाकून तिथे पितळेची पट्टी लावून तिला खालून आधार देण्यात आला. परंतु दोन वा चार वर्षांतच त्या वज्रलेपाला पोक आले व शेवटी सरकारने ते घासून काढले. सध्या थोडासा तोंडाचा तेवढा वज्रलेप बाकी आहे, बाकीचा सर्व निघून गेला आहे.

**श्रीयंत्र**

मातृचक्रविवेक नावाचा एक ग्रंथ काशी (वाराणशी) येथील संस्कृत सरस्वती-भवन ग्रंथमालेत प्रसिद्ध झाला असून त्यात श्रीयंत्राची विस्तृत माहिती देण्यात आलेली आहे.

सर्वसाधारणपणे श्रीयंत्राला देवीचे निर्गुण स्वरूप मानतात. ज्या ठिकाणी देवीची सगुण मूर्ती नसेल त्या ठिकाणी हे श्रीयंत्र काढतात आणि त्याची पूजा करतात.

कोल्हापूरच्या महालक्ष्मीला १९५४ मध्ये जेव्हा वज्रलेप केला तेव्हा देवीच्या मूर्तीची पूजा करणे शक्य नव्हते तेव्हा या श्रीयंत्राची देवीचे निर्गुण स्वरूप मानून सर्व पूजा केल्या जात होत्या.

देवीच्या मंदिरामध्ये सध्या रोज म्हटली जाणारी भूपाळी व आरती खाली देत आहोत :

### भूपाळी

उठि उठि वो मायभवानी । अंबे कोल्हासुरमर्दिनी ॥
जय जय परब्रह्म रूपिणी । सुखदायिनी भक्तांची ॥
झाला उषःकाल सुंदर । गाती भक्त तुझे सुस्वर ॥
होतो स्नानासी उशीर । उठि सत्वर माऊलिये ॥
दारी चौघडे गर्जती । नाना वाजंत्री वाजती ॥
सनया सुस्वर आलापिती । तुज संप्रती सुखवाया ॥
भाविक नारी नर पातले । द्वारी उभे सुचिर ठाकले ।
दर्शनी उत्सुक मनि जाहले । उघडी डोळे माय गे ॥
अवघे अर्चक जन पातले । पूजा साहित्यहि आणिले ॥
सांडी निद्रासुख चित्कले । दीनदयाळे अंबिके ॥
देऊनि दर्शन सकळा निके । करि वो पावन जगदंबिके ॥
भक्तभीप्सित वर दायिके । भवतारिक भयभंगे ॥
पायी लीन तुझिया होऊनी । आलो शरण तुज स्वामिनी ॥
पुरवी दासांची विनवणी । देऊनी चरणी ठाव गे ॥

### आरती

निर्गुण निश्चल निष्कल जे ते तू त्रिगुणा ।
सर्वसयादया तुजला म्हणती जन सगुणा ॥
दिसतो जग तव अंगी मणिगुण जेवि गुणा ।
जाणुनि मुनिजन योगी जाणति याचि खुणा ॥
जय देवी जय देवी जयचित्सुखसदने ।
हे करवीरनिवासिनी कमले शशिवदने ॥ जय देवी ॥
फिरती रविशशि गगनी करि अंबुद वृष्टी ।
तुझे आज्ञे निर्मित कमलोद्भव सृष्टी ।
स्वरकर लेखन हरिहर विधिच्या अदृष्टी ॥ जय देवी ॥
मस्तकि लिंग महीधर मस्तकि दिव्य गदा ।
खेटक हाटक मात्रस मातुलुंग सदा ।
विलसे श्रीमुख सुंदर पाहत मो मदा ।
वारूनि हे सुख शाश्वत भवभय नाही कदा ॥ जय देवी ॥
व्युत्पत्ति गर्व विसर्जुनि त्वत्पद जे ध्याती ।
तत्पर होती सत्पथि चित्पद ये हाती ।
उत्पत्ति प्रलया विरहित अखंड ते राहाती ।
तत्पर शंकरनंदन स्तविती दिनराती ॥ जय देवी ॥



# त्र्यंबोली-टेंबलाई

लेखिका : **ज्योतिष महापंडिता कु. इंदुमती पंडित**

करवीरच्या श्रीमहालक्ष्मीशी अत्यंत संलग्न असलेले असे त्र्यंबोलीचे मंदिर कोल्हापूरच्या पूर्वेस त्याच नावाच्या एका टेकडीवर आहे. त्र्यंबोलीबद्दल करवीर खंड पुराणामध्ये अशी कथा आहे:

त्र्यंबोली ही महालक्ष्मीची दासी. मांगलाचे रहिवासी भार्गव व त्याची पत्नी विशालाक्षी यांची ही कन्या. भार्गवांची सर्व मुले लहानपणीच वारली तेव्हा त्याने महालक्ष्मीला नवस केला की मला आता जे मूल होईल ते मी तुझ्या सेवेला अर्पण करीन. देवीच्या कृपेने लवकरच त्यांना एक कन्या झाली व त्यांनी नवस केल्याप्रमाणे व वचन दिल्याप्रमाणे ती दोन वर्षांची झाल्यानंतर तिला देवीच्या सेवेला अर्पण केली.

ही मुलगी मोठी झाल्यानंतर ती रोज तीन वेळेला स्नान करून देवीचे मंदिर झाडून देवीची सेवा करीत असे. नंतर देवीने तिला कोल्हापूरमध्ये असलेल्या मलाल तीर्थातील सुगंधी सोनेरी कमळांची रक्षक नेमली. ही कमळे दक्षिणेकडील राक्षस येऊन चोरून नेत असत. हे लक्षात आल्यानंतर त्र्यंबोली पाण्यात उतरली व पोहून दक्षिण तीराला गेली. तेथे तिने सर्व राक्षसांचा नाश केला. ही बातमी ऐकून देवीला अत्यंत आनंद झाला. तिने या मुलीला ती तीन वेळेला स्नान करते म्हणून त्र्यंबोली असे नाव दिले. त्याचाच अपभ्रंश आता टेंबलाई असा झाला आहे.

कोल्हासुर राक्षसाचा पराभव झाल्यानंतर त्याच्या अनुयायांमध्ये अत्यंत घबराट पसरली व ते कोल्हासुराच्या गरोदर पत्नीला बरोबर घेऊन दक्षिणेस आसऱ्याकरिता पळाले. काही दिवसांनंतर कोल्हासुराच्या पत्नीला मुलगा झाला व त्याचे नाव कमलाक्ष असे ठेवण्यात आले.

कमलाक्ष मोठा झाल्यानंतर आपल्या बापाचा वध महालक्ष्मीने केला हे समजल्याने त्याला अत्यंत राग आला. देवदेवतांचा नाश करण्यास असुरांचे गुरू

शुक्राचार्य यांनी त्याला मदत केली. इतकेच नव्हे तर त्यांनी त्याला एक जादूची काठी दिली. ही जादूची काठी उजवीकडून डावीकडे फिरविली की समोर असलेल्या देवमानवांना शेळचा-मेंढचा बनविण्याचे तिच्यात सामर्थ्य होते ! तीच काठी पुन्हा डावीकडून उजवीकडे फिरविली की त्या शेळचा-मेंढचा झालेले देव-मानव पूर्वस्वरूपाला येऊ शकत.

या जादूच्या काठीने सिद्ध होऊन आणि आपले सर्व राक्षस सहकारी बरोबर घेऊन कमलाक्षाने कोल्हापूरला वेढा दिला. यावेळी महालक्ष्मी देवदेवतांसमवेत उत्सवामध्ये मग्न होती. कमलाक्षाने वेढा दिल्याची बातमी मिळताच महालक्ष्मी आपल्या देवदेवतांसह रणांगणावर आली. कमलाक्ष आपल्या जादूच्या काठीचा उपयोग करण्याच्या क्षणाची वाट पहात होता. थोडयाच वेळात राक्षसांचा सैन्यव्यूह भेदण्याकरिता देवांचे सैन्य एकत्र आले. त्याबरोबर कमलाक्ष पुढे आला व त्याने आपली जादूची काठी उजवीकडून डावीकडे फिरविली त्याच क्षणी सर्व देवदेवता शेळचा-मेंढचा बनले. तेव्हा राक्षसांनी त्यांची बिनाप्रतिकार कत्तल केली. विजयाच्या आनंदात ते राक्षस त्यांचा गुरू शुक्राचार्य यांचीही आठवण विसरले.

यावेळी त्र्यंबोली कुबेराचा मुलगा मानीग्रीव याच्या सेवेस होती. कोल्हापूर येथील कमलाक्षाच्या यशाची बातमी नारदांने मानीग्रीव व त्र्यंबोलीस सांगितली. मानीग्रीवाने तावडतोब त्र्यंबोलीस देवांच्या सुटकेकरिता पाठवून दिले.

त्र्यंबोलीने प्रथम कमलाक्षाची बहीण रक्ता हिला ठार केले व मगच ती शुक्राचार्यांकडे निघाली. त्यानंतर त्र्यंबोलीने एका वृद्धेचे स्वरूप घेतले व ती कोल्हापुरास आली. गावात न जाता ती जंगलात शेणी गोळा करण्याकरिता गेली. परंतु तिने प्रथम आपल्या पाटीत दगड भरले व वरती ते शेणींनी झाकले. नंतर ही पाटी उचलण्याचा ती प्रयत्न करू लागली. म्हातारी असल्यामुळे आपल्याला पाटी उचलता येत नाही असा बहाणा करून तिने कमलाक्षाला मदतीला बोलावले. म्हातारीची कीव येऊन कमलाक्षाने ती पाटी उचलण्यास मदत केली. परंतु त्या धूर्त म्हातारीने ती पाटी डोक्यावर न घेता कमलाक्षाच्या छातीवर फेकली आणि तिच्या भाराखाली कमलाक्ष ठार झाला. लागलीच त्र्यंबोलीने ती जादूची काठी त्याच्यापासून घेतली व डावीकडून उजवीकडे फिरविली त्याबरोबरच राहिलेल्या शेळचा-मेंढचांचे देवदेवतांमध्ये रूपांतर झाले.

कमलाक्षाच्या वधानंतर त्याचा आनंद साजरा करण्याकरिता मेजवानीचा बेत योजला गेला. त्यासाठी सर्व देवदेवतांना आमंत्रण देण्यात आले. परंतु त्र्यंबोलीला आमंत्रण मिळाले नाही. त्र्यंबोलीला त्याचा फार अपमान वाटला. ती गावाबाहेरील टेकडीवर जाऊन कोल्हापुराकडे पाठ करून बसली.

इकडे महालक्ष्मीला त्र्यंबोली कोठे दिसेना म्हणून तिने चौकशीला सुरुवात केली व आपल्या सेवकांना त्र्यंबोलीला शोधून आणण्यास सांगितले. काही सेवकांना त्र्यंबोली सापडली तेव्हा त्यांनी तिला महालक्ष्मीकडे येण्याची विनंती केली. त्र्यंबोलीने ती विनंती धुडकावून लावली. इतकेच नव्हे तर ते सेवक तिथून गेले नाहीत तर त्या जादूच्या काठीने त्यांना शेळ्या-मेंढ्या बनविण्याचा धाकही दिला.

श्रीमहालक्ष्मी व श्रीटेंबलाई यांची भेट



सेवकांनी परत येऊन ही सर्व हकिगत सांगितल्यावर महालक्ष्मी स्वतः एक कोहाळा घेऊन त्र्यंबोलीला बोलावण्यास गेली. कारण महालक्ष्मीची त्र्यंबोली फार लाडकी होती. शेवटी महालक्ष्मीने तो कोहाळा तिच्या समोर फोडून तिचा राग शांत केला. परंतु त्र्यंबोलीने कोल्हापूर शहरात येण्याचे कबूल केले नाही. ती आजही त्या टेकडीवर कोल्हापुराकडे पाठ करूनच बसली आहे.

आजतागायत तो कोहाळ्याचा समारंभ नवरात्रातल्या पंचमीच्या दिवशी होतो. आता तो कोहाळा बावड्याच्या पाटील घराण्यातील कुमारिकेच्या हातून फोडण्यात येतो.

❀ ❀



# महालक्ष्मीची व्रते व कुळाचाराची पूजा

लेखिका : सौ. इंदुमती फाटक

कुठून तरी त्या दिवशी गोड सनईचे सूर ऐकू आले. आणि अगदी भल्या पहाटे मला जाग आली ! मग आठवलं उद्या लग्न आहे ना त्यांच्याकडे—आज घाणा भरायचा—आल्या होत्या लक्ष्मीकाकू बोलवायला.

घाणा भरायचा म्हणजे साऱ्यांनी हात लावून दुरडीत मुसळाने धान्य कांडायचं ! मला वाटतं कोकणात लग्नाची पहिली तयारी म्हणजे भात कांडून पाहुण्यांची जेवणाची व्यवस्था करायची. त्यांत मग दळणाचा पण विधी असतो. म्हणजे दळूनकांडून कोठी भरायची ही लग्नाच्या तयारीची सुरुवात ! बरोबर आहे ! गावोगावचे पाहुणे वस्तीला यायचे तेव्हा दळणाकांडणापासून सुरुवात हवीच.

**घाणा भरियेला विडा ठेवियेला**
**आधी नमियेला गणेऽराज**
**घाणा भरियेला सव्वा खंडिये भाताचा**
**उवंड गोताचा गणेराज**
**आधी मूळ धाडा घुंगुरांची गाडी**
**शालजोडीचे वऱ्हाडी गणेराज**
**आधी मूळ धाडा दूरी दूरीचिये**
**आम्हां कुळीचिये जोगेश्वरी**
**आधी मूळ धाडा चिपळूण गावा**
**परशुराम देवा नमस्कार**

म्हणजे ही अंबाबाई नुसती कुलाची देवी नव्हे तर जणू आमच्या कुळातलीच एक आहे.

लग्नातली पहिली अक्षतसुद्धा गावदेवी जोगेश्वरीला द्यायची. पहिले विवाहाचे निमंत्रण तिला ! आणि ह्या जोगेश्वरी कुलस्वामिनीचे, अंबाबाईचें आमच्यात

फारच प्रस्थ. गौरीहर पूजताना ह्याच गौरीची आराधना करायची. एक पाट मांडायचा, त्यावर कुंकवाने लाल अक्षता करून त्यावर जगदंबेची मूर्ती मांडायची, भोवताली तांब्याचा, मातीचा, चांदीचा असा गौरीहर मांडायचा. लग्नाची घटका भरायला येईपर्यंत गौरीची थोडे थोडे तांदूळ वाहून प्रार्थना करायची. 'गौरी गौरी सौभाग्य दे. दारी आलेल्या वराला उदंड आयुष्य दे.' लग्न ठरणं आणि होणं ह्यात फरक आहे. ऐन लग्नाच्या वेळी नववधू बावरते, घाबरते, अस्वस्थ होते. सारा भविष्य काळ तिला अज्ञात असतो. अंतरपाट बाजूला झाल्यावर तिचा पती तिला दिसणार असतो. ह्या नवख्या माणसाबरोबर पुढचे सारे आयुष्य घालवायचे असते. कसा असेल त्यांचा स्वभाव. कसं असेल सासर, ह्या दोलायमान अवस्थेत ह्या अजाण नववधूला गौरीचाच आधार वाटतो. म्हणून ती मनापासून प्रार्थना करते. 'गौरी गौरी सौभाग्य दे.' हळूहळू तांदळाची रास वाढत असते. लग्नघटिका भरते व विवाह लागतो. वरात झाली की पाटा-वरील जगदंबेच्या मूर्तीला बरोबर घेऊनच वर वधूसह गृहप्रवेश करतो. जणू ही माहेरून आणलेली अंबाबाई सासरी आलेली पाठराखीणच ! स्त्रियांच्या जीवनात ह्या कोल्हापूरच्या अंबाबाईची हरेक व्रतवैकल्ये व पूजाअर्चा सासरी येता क्षणीच सुरू होतात.

लग्न झाल्यापासून पहिली पाच वर्षे मंगळागौरीचे व्रत व महालक्ष्मीचे व्रत घ्यायचे. ही अंबाबाईचीच पूजाअर्चा असते.

पूर्वीच्या समाजजीवनात स्त्रीला वेगळे अस्तित्व नव्हते. म्हणून ह्या व्रतात ती मागते काय तर सौभाग्य. अखंडित सौभाग्य. कारण तिच्या सौभाग्याचा भाग्यविधाता तिचा पती असतो. त्याच्या जीवनाने ती जगते. त्याच्या भाग्याने भाग्यवती होते, व त्याच्या वंशवृद्धीसाठी पुत्राची याचना करते. ह्याव्यतिरिक्त तिला वेगळे अस्तित्व नसते, जीवनही नसते.

आता ही अंबाबाईची व्रते म्हणजे हरितालिका, मंगळागौर, महालक्ष्मी, श्रावणी शुक्रवार व जिवतीची पूजा. शिवाय प्रत्येक कुळाचे कुळाचार म्हणून अंबाबाईची पूजा असतेच. चैत्रात गौर बसविणे व वासंतिक हळदीकुंकू, श्रावणात मंगळागौर, भाद्रपदात गौरी आणणे, आश्विनात नवरात्र, महालक्ष्मी बोडण अशा हरेक प्रकारे ह्या देवतेचे पूजन घरोघरी चालू असते.

**हरतालिकेचे व्रत** हे वयाच्या तिसऱ्या वर्षापासून करावयाचे व्रत आहे. हे व्रत मुख्यत्वे कुमारिकेने करावयाचे व धरलेले व्रत सोडावयाचे नाही म्हणून पुढे लग्न झाल्यावरही करायचे असते. पार्वतीने कडक तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले. तिच्या तपश्चर्येने संतुष्ट होऊन शंकराने तिच्या इच्छेप्रमाणे तिच्याशी लग्न केले. त्या पार्वतीची व तिच्याबरोबर रानात रहाण्यास गेलेल्या सखीच्या

मूर्ती शंकराच्या पिंडीसह विकत आणायची, भाद्रपद तृतीयेला सकाळी स्नान करून सोवळे नेसून सखी पार्वतीची व शंकराची पूजा करायची. पूजा करताना प्रथम सुपारीचा गणपती मांडायचा व त्याची हळद, कुंकू, दूर्वा, गंध, फूल, कापसाची वस्त्रे वाहून पूजा करायची व गूळ खोबऱ्याचा नैवेद्य दाखवायचा, मग मुख्य पूजेला सुरुवात करायची.

हे गणपतीपूजन प्रत्येक पूजेच्या आधी असते. आपली पूजाअर्चा निर्विघ्नपणे पार पाडावी म्हणून ह्या विघ्नहर्त्या गणपतीची पूजा प्रत्येक पूजेच्या वेळी असते. भाद्रपदात प्रत्यक्ष गणपतीची मूर्ती घरी आणून तिची जरी स्थापना करायची असली तरी प्रथम सुपारीचा गणपती मांडायचा व त्याची पूजा करायची मग मुख्य गणपतीची प्राणप्रतिष्ठा करायची!

ह्यावरून एक गोष्ट सुचली, एकदा एका बाईच्या घरी तिच्या मुलीचे लग्न जमले. बाईला कार्यप्रस्थाचा अनुभव असा काही नव्हताच. ती अगदी गडबडून गेली. घाबरली. तेव्हा शेजारणीने उपाय सुचवला. 'हे बघ, चिमूटभर गूळ घे त्याचा इवलासा गणपती कर, कोठी घरात ठेव. त्याला गुळाचाच नैवेद्य दाखव व सांग, "गणराया, आमचे मंगल कार्य निर्विघ्न पार पडू दे. तूच सारे सांभाळ." बघ सारे कसे छान होईल. आहे की नाही गंमत? गुळाचाच गणपती त्याला गुळचाच नैवेद्य!'

हरितालिकेची पूजा करताना सखी पर्वतीला व शंकराच्या पिंडीला दही, दूध, तूप, मध, साखर ह्या पंचामृताने व वासाचे तेल लावून गरम पाण्याने स्नान घालायचे, शंकराला जानवे घालायचे व सखी पार्वतीला बांगड्या व काळ्या पोतीचे गळेसर घालायचे. हळदकुंकू, गंध, बुक्का, अष्टगंध, अक्षता, वहायच्या, सोळा प्रकारची पत्री घ्यायची. त्यात शंकराला बेल व केवडा मुख्य, हरेक तऱ्हेची वासाची फुले व कापसाची वस्त्रे वहायची, दूध व फळांचा नैवेद्य दाखवायचा. नंतर खणानारळाचे वाण, पूजा सांगणाऱ्या ब्राह्मणाला द्यायचे. त्याची पूजा करून त्याला विडा, दक्षिणा देऊन संतुष्ट करायचे. सर्वच पूजांना तीन चार विडे म्हणजे दोन विड्यांची देठासहित पाने घेऊन त्यावर दक्षिणा, सुपारी व एखादे फळ ठेवून त्यावर पाणी सोडायचे असा विधी असतो. अशी पूजा केल्यावर आरती करायची, दिवसभर उपास करायचा, कडकडीत. पाणीसुद्धा न पिता, अर्थात ज्यांना जमत नाही त्या चहा व फळे खाऊन उपवास करतात, पण सर्वांत योग्य उपवास कडकडीत व निर्जला. त्यापेक्षा जरा कमी चुलीवर न शिजवलेले म्हणजे फळे, निरसे दूध, खारीक वगैरे खाणे व त्याहून कमी चहा व फराळाचे खाणे होय.

दिवसभर उपवास, दुपारी हरितालिकेच्या कथेचे वाचन, मग सायंकाळी आरती, दूध साखरेचा नैवेद्य व रात्री बारापर्यंत जागरण, नंतर सकाळी पहाटे

स्नान करून दहीभाताचा नैवेद्य व उत्तरपूजा करून त्या मूर्तीचे नदीमध्ये विसर्जन करायचे व उपवास सोडायचा.

हे व्रत स्त्रिया चांगला पती मिळावा व अखंड सौभाग्य लाभावे म्हणून करतात. ह्यावरून आठवले, कुणी एकाने म्हणे लोकमान्यांना प्रश्न विचारला की, काय हो चांगला पती मिळावा म्हणून बायकांनी हे व्रत करायचे मग पुरुषांसाठी का नाही असले एखादे व्रत? पुरुषांना काय चांगली पत्नी नको असते? तेव्हा लोकमान्यांनी सांगितले की, पुरुषांना या व्रताची गरज नाही कारण स्त्रिया पतीवर प्रेम करणाऱ्या व चांगल्याच असतात. पण चांगले पुरुष मात्र समाजात थोडेच सापडतात.

ह्यानंतर लग्न झाल्याबरोबर स्त्रियांनी पाच वर्षे **मंगळागौरीचे व्रत** करायचे असते. श्रावणातल्या दर मंगळवारी आपल्यासारख्याच व्रत करणाऱ्या मिळतील तेवढ्या वसाळ्या सुवासिनी जमवून साऱ्यांनी मिळून गौरीची पूजा करायची. चौरंग मांडायचा, त्यावर कणकेचे आसन खांब व मंगळसूत्र, बांगड्या, वेणी वगैरे सारे अलंकार तयार करायचे. त्या आसनावर गौर बसवायची, साऱ्यांनी मिळून पूजा करायची. कापसाची वस्त्रे, बांगड्या, गळेसर, कणकेचे दागिने, पंचामृती स्नान सारे करायचे. पुरणावरणाच्या चांगल्या पक्वान्नांचा स्वयंपाक करून नैवेद्य दाखवायचा. आरती करायची, कहाणी वाचायची. शेवटी जेवणाच्या आधी प्रत्येक वसाळीने देवीला भंडारा वाहून मुक्याने जेवायचे. या पूजेच्या वेळी चौरंगाभोवती केळीचे, कर्दळीचे खुंट लावून मखर करतात. हरेक तऱ्हेची फुले वाहून गौर सजवितात. गौरीपुढे तऱ्हेत-ऱ्हेच्या रांगोळ्या काढतात. कोरा करा कोऱ्या खणांनी बांधून ठेवतात. दिवसभर नंदादीप ठेवतात. सायंकाळी आपल्या इष्ट मैत्रिणी व नातेवाइकांना फराळाचे देतात. हळदकुंकू असते. रात्री पुन्हा आरती व वसाळ्या मुलींच्यासाठी धान्य फराळ असतो. म्हणजे भाजलेल्या धान्याचे पदार्थ उसाच्या रसात अगर दुधात भिजवलेल्या दशम्या असतात.

रात्री वसाळ्या व इतर नातेवाईक बायका, लहान मुली वगैरे साऱ्याजणी जमून मंगळागौरीची सारी रात्र जागरण करतात. त्यांत साधारणत: पहिल्या रात्री फुगड्या, झिम्मा, गोफ, खुर्ची का मिर्ची, अग अग सुने, जात्याची फुगडी, लाटण्याचा झिम्मा, पिंगा, खिस् बाई खिस् वगैरे हरेक खेळ लहानमोठ्या सर्व बायका मोठ्या हौसेने खेळतात. उत्तर रात्री गाणी, कोडी, उखाणे, नाट्यप्रवेश अशा तऱ्हेचे बैठे कार्यक्रम करतात. दुसरे दिवशी सकाळी चहाकॉफी पिऊन बायका घरोघरी जातात. श्रावणातल्या चारी मंगळवारी कुठे ना कुठे मंगळागौरींचा उत्सव असतो.

ह्यानंतर **महालक्ष्मीचे व्रत.** हे आश्विन अष्टमीला सकाळी सोळा गाठींचा दूर्वांचा तातू आणायचा, रेशमाचा सोळा गाठींचा तातू तयार करायचा, सकाळी

दूर्वाच्या तातूची व रेशमाच्या तातूची पूजा करायची, दूर्वाचा तातू, तुळशी वृंदावनात ठेवून त्यावर तीळ, तांदूळ, हळदकुंकू, गंध व पाणी घालून सोळा अर्घ्य वहायचे. रेशमाच्या तातूचे कंकण करून हातांत घालायचे व ज्या घरी महालक्ष्मी असेल त्या घरी जाऊन ही पूजा करायची. आपण शिधा देऊन पूजेनंतर स्वतःच्या पानाचा नैवेद्य दाखवायचा व जेवण करून घरी यायचे.

सायंकाळी त्या घरी महालक्ष्मीची मूर्ती उभी करतात. खालील सांगाडा लाकडी अगर कापडी असतो. त्यावर तांदुळाच्या पिठीचा उकडीचा मुखवटा तयार करतात. नाक डोळे कोरतात. डोळे, केस वगैरे रंगवून व हुबेहूब माणसाच्या चेहऱ्यासारखा मुखवटा तयार करून तो त्या सांगाड्यावर बसवतात. मग भारी शालू नेसवतात. जरीबुट्टयांची चोळी घालतात. नथ, कुड्या, बुगड्या, पोतपेट्या, चंद्रहार, कमरपट्टा, गोठ, पाटल्या, वाकी, तोडे वगैरे खरे दागिने घालायचे असतात. पुढे मापावर तपेले ठेवून त्याला पागोटे, कोट व उपरणे घालून शंकर तयार करतात.

ह्या महालक्ष्मीची आरती करून पूजा करायची व उत्सवाला सुरुवात करायची, तांब्या पितळेच्या पण मुख्यत्वेकरून मातीच्या घागरी विस्तवावर ऊद घालून उदवायच्या. देवीला हळदकुंकू घालून त्या घागरी उभ्याने वाकून फुंकत नाचायचे, फेर धरायचे. ह्या घागरी सगळ्यांच सुवासिनी फुंकतात. वसोळ्या मुलींनी कमीत कमी पाच वेळा तरी घागर फुंकायची आणि रेशमाचा तातू देवीच्या पायावर वहायचा. गर्भार स्त्रियांनी हे व्रत करायचे नसते. एवढेच नव्हे तर देवीचे दर्शनसुद्धा घ्यायचे नसते. ह्या घागरी फुंकणाऱ्या काही स्त्रियांचे अंगात प्रत्यक्ष महालक्ष्मीचा संचार होतो असे मानतात. अशा स्त्रिया रिकाम्या घागरीतून कुंकू काढतात. भविष्यकाळची उत्तरे सांगतात. आणि काही इच्छा सांगितल्यास त्या पूर्ण होण्यासाठी उपाय सांगतात. हा सोहळा रात्री १२ ते १२॥ वाजेपर्यंत चालतो. नंतर आरती होते व ही जागती माय कोल्हापुरास जाते. उत्तर रात्री मुखवटा उतरवून पातेल्यात झाकून ठेवतात आणि सकाळी तो नदीत सोडून देतात.

प्रत्येक कुळात चैत्रगौर, गौरीगणपती वेळच्या गौरी, श्रावणातील शुक्रवारची जिवतीची पूजा, आश्विनातील नवरात्र महोत्सव हे होत असतात.

चैत्रातली गौर चैत्रात पहिल्या तृतीयेला येते. हिची प्रतिष्ठापना करताना चांदीचा देव्हारा घेऊन त्यातल्या चांदीच्या झोपाळ्यावर गौर बसवायची असते. तिला अलंकार घालून उत्तम वस्त्र नेसवायचे. नुकताच वसंत ऋतु सुरू झालेला असतो. हवेत उकाडा सुरू होतो. तर गौरीला सारे शीतल उपचार करायचे. वाऱ्यावरील, झोपाळ्यावरील आसन, सुवासिक व शीतल मोगऱ्याच्या

फुलांची माळ, नैवेद्याला द्राक्षे, चिकू, खरबूज, कलिंगडे इत्यादी एकेक फळांचा नैवेद्य. पिण्यासाठी चांदीच्या लोटी भांड्यात पाणी. रोज सकाळी स्नान घालून देवीची पूजा करायची. सुवासिक मोगरा, मदनबाण इत्यादी फुलांचा हार माळायचा, फळ व दुधाचा नैवेद्य दाखवायचा, गार पाणी ठेवायचे. एका तृतीयेला सवाष्ण सांगायची. धावन घाटल्याचा नैवेद्य करायचा. वासंतिक चैत्रगौरीचे हळदीकुंकू करायचे. कच्ची कैरी घातलेली ओली हरभऱ्याची डाळ, हरभऱ्याची उसळ, करंजी व कैरीचे गार पन्हे नैवेद्याला करायचे. तेच सुवासिनींनाही द्यायचे. अक्षय तृतीयेपर्यंत म्हणजे वैशाखातल्या पहिल्या तृतीयेपर्यंत रोज गौरीची पूजा करायची व अक्षय तृतीयेला परत देवी देव्हाऱ्यात ठेवून द्यायची. नेहमीप्रमाणे कोणी ह्या चैत्रातल्या गौरीपूजनाला गौरीचे दोहद कौतुक किंवा गौरीचे डोहाळे असेही म्हणतात.

श्रावणातील दर शुक्रवारी **जिवतीची पूजा** लेकुरवाळी स्त्रीने करायची. नागोबा नरसोबाच्या पटातच जिवतीचे चित्र असते. मुले असलेल्या स्त्रीने आपल्या मुलांचे संगोपन, संरक्षण, व्हावे म्हणून हे जिवतीचे व्रत करायचे असते. दर श्रावण शुक्रवारी स्नान करून ह्या जिवतीची पूजा करायची. गंध, फूल, अक्षता वहायच्या. फुलांची माळ करायची. त्यात दूर्वा, अघाडा व तुळस पण असायला हवी! हातात अक्षता घेऊन प्रार्थना करायची 'हे माते जेथे माझी मुलेबाळे असतील तेथे त्यांना सुखी ठेव, सुरक्षित ठेव. साऱ्यांचे कल्याण कर.' हातातील अक्षता वहायच्या आणि आरती करून दूध साखरेचा नैवेद्य दाखवायचा. असे दर श्रावणी शुक्रवारी करायचे. त्यातीलच एका शुक्रवारी सवाष्ण जेवायला बोलवायची, विशेषतः आपल्या साऱ्या मुलालेकरांना, नातवंडांना जेवायला बोलवायचे. पुरण घालायचे. भाज्या, चटण्या, कोशिंबीर, पुरणाची पोळी, गव्हल्याची खीर असा साग्रसंगीत स्वयंपाक करायचा. पुरणाचे दिवे करायचे, त्यात वाती घालायच्या व ह्या जेवणाच्या ताटाचा नैवेद्य दाखवायचा. पुरणाच्या दिव्याने गौरीची व आपल्या मुलालेकरांची आरती करायची, आधी सवाष्णीला वाढून सर्वांनी जेवण करायचे. सवाष्णीला विडा, फूल, अक्षता अर्पण करायचे. संध्याकाळी पाच तरी सुवासिनींना हळदीकुंकवाला बोलवायचे, फुटाणे व दूध द्यायचे व श्रावण संपताच ह्या जिवतीच्या पटाची बोळवण करायची.

श्रावण संपला की, भाद्रपदात आधी हरितालिका येतात, नंतर गौरी-गणपती येतात. गणेश चतुर्थीला गणपती आणतात. पाठोपाठ एक दोन दिवसांत गौरी आणायची तिथी येते.

बहुधा संध्याकाळी नदीच्या काठी जाऊन सात खडे धुवायचे व याच गौरी समजून त्यांची तेथे तबकात ठेवून पूजा करायची. नंतर एकीने घंटा वाजवीत

निरांजन दाखवीत गौरींना घरी आणायचे. दारापासून रांगोळीची आत येणारी पावले काढलेली असतात. दारात आल्यावर गौरी आणणाऱ्या बाईच्या पायांवर दूधपाणी घालावयाचे. गौरीला हळदकुंकू वाहून आरती करायची. मग रांगोळीच्या पावलांवरून घरात आणून गणपती शेजारी ते तबक ठेवायचे. दुसरे दिवशी पूजा करायची. गोडधोड करायचं, सवाष्ण बोलवायची. विडा, फूल, दक्षिणा द्यायची आणि तिसऱ्या दिवशी आपले सारे घर गौरीला दाखवायचे. एकीने गौरीचे तबक हातात घ्यायचे व अक्षता घ्यायच्या, दुसरीने तबकात निरांजने व हातात घंटा वाजवीत सारे घर दाखवावयाचे. गौरी घेतलेल्या स्त्रीने तेथे अक्षता टाकावयाच्या व तोंडाने 'उदंड उदंड' म्हणजे पुष्कळ असू दे, विपुल असू दे, असे म्हणायचे. सारे घर दाखवल्यावर नदीवर विसर्जन करायचे. बरोबर दहीभात व तिळाच्या लाडवाची शिदोरी द्यायची. ह्या गौरी घरात वैभव, विपुलता व सुबत्ता आणतात, असा समज आहे.

आश्विनात शुद्ध प्रतिपदेला कोल्हापूरची अंबाबाई, म्हैसूरची चामुंडा, कलकत्त्याची काली, प्रतापगडची देवी भवानी, कोणीही म्हणा हिचे नवरात्र सुरू होते, नवरात्राचा उत्सव नऊ दिवस असतो. कुठे कुठे तो नवमीला संपतो तर कोठे विजयादशमीला म्हणजे दसऱ्याला संपतो.

ह्या प्रतिपदेला देवी घटी बसते. म्हणजे तपश्चर्येला बसते. पुढे ती जो महिषासुराचा वध करते त्यासाठी ती महान तपश्चर्या करून शक्तीची उपासना करते. ही सर्व जगताची आदिमाया व आदिशक्ती आहे असेही म्हणतात.

देवी तपश्चर्या करीत असते म्हणून अहोरात्र नंदादीप ठेवायचा. घरच्या घरधनिणीने उपास अगर धान्यफराळ करून व्रतस्थ रहायचे. रोज गौरीला माळ करून तिच्या डोक्यावर टांगायची. पहिल्या दिवशी सवाष्ण ब्राह्मण कुंवारीण इत्यादींना पुरणाचे जेवण घालायचे. रोज सप्तशतीचा पाठ म्हणायचा. देवीची तपश्चर्या नववे दिवशी पूर्ण झाली की, तिला शांत करण्यासाठी बोडण भरायचे, तिला रिझविण्यासाठी गोंधळ घालायचा. आता बोडण दरवर्षी भरतात. त्यासाठी दूध, तूप, मध, साखर, दही भरपूर लागते. घरची सवाष्ण, बाहेरील दोन अगर तीन सुवासिनी व एक कुवारीण एका बोडणाला लागतात.

पुरणाचा व इतर पक्वान्नांचा चारी ठाव स्वयंपाक लागतो व हे बोडण १२ चे आत भरावे लागते.

स्वयंपाकघर सारवून एक विशिष्ट प्रकारची रांगोळी घालून त्यावर परात मांडायची, केळीच्या छोटया छोटया पानावर मंगळागौरीप्रमाणेच गौरीचे दागिने, बैठक व कणकेचा दिवा मांडायचा, प्रत्येकीचा स्वतंत्र नैवेद्य मांडायचा. मधोमध कणकेच्या गादीवर गौर मांडायची, भोवताली खांब, एक बोळक्यात दूध व

कणकेचा दिवा ठेवायचा. आलेल्या सुवासिनी कुवारणीचे दुधाने, गरम पाण्याने पाय धुऊन त्यांना हळदकुंकू, पानसुपारी व दक्षिणा देऊन खोबऱ्याच्या वाटीने ओटी भरायची, मग सर्वांनी पाटावर परातीभोवती बसायचे. आपले नैवेद्य, दिवा व पानसुपारी, दक्षिणा परातीत आपल्यापुढे ठेवायची. मध्ये गौर ठेवल्यावर प्रथम मालकिणीने पूजा करायची. लेणाव्रत वाहायचे, घरचा महानैवेद्य दाखवायचा. मग बाकीच्यांनी तेच करायचे. नंतर कुवारणीने चांदीच्या पळीला सोन्याचा अलंकार घालून त्या पळीने दिव्यावर दूध घालून त्यांना शांत करायचे. मग साऱ्यांनी भराभर बोडण कालवायचे. परत दही, दूध, मध, साखर, तूप घालायचे व कुवारणीला 'धालीस का' (तृप्त झालीस का म्हणून विचारायचे) तिने आणखी मागितले तर आणखी पंचामृत घालायचे व तिने 'धाले' म्हटले की बोडण थांबवायचे. कधीकधी अशा वेळेलाही काही सुवासिनींच्या अंगात देवीचा संचार होतो व त्या मनाप्रमाणे बोडण घालून घेतात. कुवारणीने आपली दक्षिणा शोधून काढून घ्यायची, देवी गरम पाण्याने व पुरणाने धुऊन, हळदकुंकू लावून व तोंडाला पुरण लावून देव्हाऱ्यात ठेवायची सवाष्णीच्या हातांवर गरम पाणी घालायचे व पुरणाने परातीत हात धुवायचे, हा बोडणाचा अंगारा सर्वांनी कपाळी लावायचा.

पहिल्या दिवसाप्रमाणे दररोज सवाष्ण ब्राह्मण व कुवारीण ह्या सर्वांना जेवण घालायचे आणि विडा दक्षिणा द्यायची. नऊ दिवसांच्या नऊ माळा उलटून टाकायच्या.

ह्या नवरात्रातील अष्टमीलाच महालक्ष्मीचे व्रत असते. शिवाय गावातील बहुतेक देवींच्या देवळात उत्सव असतो. निरनिराळी रूपे देवीला देऊन आरास करतात व बायका नवरात्रात देवीच्या दर्शनाला जातात.

काही ठिकाणी बोडणाप्रमाणे गोंधळही असतो. नवव्या दिवशी सकाळी गोंधळी येतात, त्यांची जेवणे होतात व रात्री देवीच्या पुढे निरनिराळी आख्याने लावून गोंधळ करतात. त्यांच्याजवळ सव्वा शेर, सव्वा पाव शेर मापनाची तेल असणारी एक मशाल असते. ती ठराविक तेलात जितका वेळ तेवेल तेवढा गोंधळाचा वेळ ठरलेला असतो.

असे हरेक देवीचे उत्सव वर्षभर चालू असतात. हा कुळाचार कुलदेवीला आवश्यक असतो.






लेखक : **श्री. सदानंद चेंदवणकर**

मुंबई हे आजच्या नव्या महाराष्ट्राच्या राजधानीचे शहर आहे. या शहराच्या चोहो बाजूंनी समुद्र वेढलेला असल्यामुळे या शहराला बेट असे म्हटल्यास चुकीचे ठरणार नाही.

या मुंबई बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावर चर्चगेटपासून सुमारे पाच मैलांवर हिंदूंचे एक परमपवित्र देवस्थान आहे. हे देवस्थान अरेबियन समुद्राला लागूनच असलेल्या एका टेकडीवर वसलेले असून, त्या टेकडीवरून सभोवतालची निसर्ग-शोभा मोठी नयनरम्य वाटते. लांबच लांब दूरवर पसरलेला तो अथांग सागर,



श्रीमहालक्ष्मी मंदिर, मुंबई

त्यावर सदानकदा उसळत असणाऱ्या त्यांच्या त्या ऊर्मी, सूर्योदय आणि सूर्यास्ताच्या सुमारास वाहणारा तो शीतल आल्हादकारक पवन या साऱ्या गोष्टींमुळे कोणत्याही ऋतूत नि कोणत्याही वेळी तिथे गेलेल्या रसिकाला तेथून हलूच नये असे वाटते. या टेकडीवर एकुलत्या एका देवतेची सत्ता आहे. तिचे नाव आहे देवी महालक्ष्मी. मुंबापुरीतील सारे सारे भक्त नि भाविक जिचा वारंवार उदो उदो करून महिमा गातात ती ही देवता.

या महालक्ष्मी देवतेची स्थापना या टेकडीवर निश्चित केव्हा झाली याची माहिती उपलब्ध नसली तरी इ.स. १७६१ ते इ.स. १७७१ च्या दरम्यान केव्हा तरी तिची पुनर्प्रतिष्ठापना तिथे झाली असली पाहिजे, असे अनेक विद्वानांचे मत आहे.

आज ज्या ठिकाणी मंदिर आहे त्याच ठिकाणी फार फार वर्षांपूर्वी या देवतेचे मंदिर होते. शिलाहार राजाच्या काळात या मंदिरावर जेव्हा म्लेंच्छांचे आक्रमण झाले तेव्हा भाविक भक्तांनी त्या देवालयातील तिन्ही मूर्ती मध्यरात्री हलविल्या व त्या आक्रमकांच्या हाती पडू नयेत म्हणून त्या जवळच्याच समुद्रात नेऊन बुडविल्या. त्यानंतर बराच काळ त्या क्षीरसागरात होत्या.

पुढे इ.स. १७५०च्या सुमारास इंग्रज सरकारकडून वरळीचा बांध बांधण्यास सुरुवात झाली त्यावेळी मात्र या मूर्ती सापडल्या!

इ.स. १७६०ची गोष्ट असावी. त्यावेळी हॉर्नबी नावाच्या गोऱ्या राज्यपालाची मुंबई शहरावर सत्ता होती. या हॉर्नबीसाहेबाने असे ठरविले की, वरळी गाव आणि त्याच्या आसपासची ठिकाणे ही सारी मुंबईशी जोडून पक्की गाडीवाट करावी व त्यासाठी वरळीच्या समुद्राला किनाऱ्याकिनाऱ्याने पक्का बांध बांधला जावा. आपली ही कल्पना मूर्त स्वरूपात किंवा प्रत्यक्षात आणण्यासाठी त्याने बांध घालण्याचे काम काही ठेकेदारांकरवी सुरू केले. परंतु पाण्याचा अतिशय जोर म्हणा किंवा आणखीन काही दुसरे म्हणा, केलेले बांधकाम कोसळून पडत असे. काही केल्याने बांधकाम म्हणून टिकेना. या कामी अर्थातच बरेचसे श्रम आणि पैसा खर्च झाला होता. अखेरीस हॉर्नबीने कंटाळून जाऊन ही बांधकामाची योजना तशीच सोडून देण्याचे ठरविले. तेव्हा याच सुमारास सरकारी ठेकेदारांच्या यादीत नाव असलेले रामजी शिवजी नावाचे एक सुशिक्षित प्रभू ठेकेदार गव्हर्नरकडे जाऊन म्हणाले, 'महाराज, काल रात्री माझ्या स्वप्नात देवी महालक्ष्मी आली होती. तिची आणि तिच्या दोन बहिणींच्या मूर्ती कोसळून पडणाऱ्या बांधकामाच्या जवळच्याच पाण्यात आहेत, त्या काढून त्यांचे देऊळ बांधले तर आपला हा बांध पूर्ण होईल असे देवीने मला दिलेल्या दृष्टांतात कथन केले आहे. तर त्याप्रमाणे त्या मूर्ती शोधून काढून मी त्यांचे देऊळ बांधू काय?' त्यावर गव्हर्नरने रामजी शिवजी प्रभूस ह्या कामी संपूर्ण संमती दिली.

सरकारकडून संपूर्णपणे परवानगी मिळताच रामजी प्रभूंनी एका शुभ मुहूर्तावर समुद्रात जाळे टाकले, आणि मोठी आश्चर्याची गोष्ट की, त्या जाळ्यात पाषाणाच्या तीन मूर्ती लागल्या ! रामजींनी जाळ्यातल्या त्या पाषाणमूर्ती ओढून घेतल्या. त्यांचे ते जाळे साध्या बारीक सुतळीचे होते. त्या मूर्ती पाषाणी होत्या, परंतु असे असूनसुद्धा खोल तळास बसलेल्या त्या पाषाणमूर्ती जाळ्यात आपोआप आल्या आणि त्यांच्या वजनाने त्या जाळ्याची कोणत्याच प्रकारे नुकसानी झाली नाही. ज्या ठिकाणी या मूर्ती रामजींच्या हाती लागल्या त्याच ठिकाणी रामजी यांनी त्यांची स्थापना केली. मग वरळीचे बांधकाम सुरू केले. त्यानंतर मात्र बांधाचे काम पूर्ण करण्यात काहीसुद्धा व्यत्यय आला नाही ! ठराविक मुदतीत त्यांनी ते काम पुरे केले. या बांधाचे नाव हॉर्नबी व्हेलार्ड असे ठेवण्यात आले.

रामजी प्रभूंनी बांधकाम करताना केलेल्या श्रमात जो काही पैसा मिळविला त्या पैशाचे त्यांनी या देवीचे सुंदरसे देऊळ बांधले. तेच आजचे हे महालक्ष्मीचे मंदिर होय. या कामी सरकारकडून त्यांनी मंदिराची जागा बक्षीस मिळविली. या देवळाच्या कामी ८०,००० रुपये त्यावेळी खर्च झाले असावेत असा अंदाज आहे. देवळाच्या बांधणीनंतर एका सोनाराने व कोळ्याने नजीकच एक धर्मशाळा बांधली ती अजूनही अस्तित्वात आहे.

मुंबई शहरासंबंधीच्या जुन्या कागदपत्रांतून असा उल्लेख आढळतो की, ही महालक्ष्मी व तिच्या दोन बहिणी महाकाली व महासरस्वती यांची परकीयांच्या अमदानीत खूपच नासधूस झाली. अखेरीस आणखीन त्यांची नासधूस नि विटंबना होऊ नये म्हणून त्यांना जलसमाधी देण्यात आली. मुंबई बेट पोर्तुगिजांकडून इंग्रजांकडे येईतोपर्यंत त्या समाधिअवस्थेतच होत्या. पुढे या वरळीच्या बांधकामाच्या वेळी त्यांनी असा स्वप्नात दृष्टांत देऊन आपली पाण्यातून सुटका करून घेऊन योग्य त्या स्थळी त्या पुन्हा येऊन राहिल्या आहेत. अशा प्रकारे भक्तांच्या रक्षणासाठी त्या क्षीरसागरातून अवतीर्ण झाल्या आहेत, असे म्हणावयास हवे. मुंबईतील अनेक जमातींची ही देवता कुलदैवत आहे.

काही पिढीजाद पुजारी असे म्हणतात की, या देवळाची स्थापना कृष्णाजी भैरोजी ऊर्फ कृष्णा मोरया नावाच्या आपल्या पूर्वजांनी इ.स. १७५९च्या सुमारास केली.

हे महालक्ष्मीचे मंदिर टेकडीवर असून मंदिरात चढून जाण्यासाठी बत्तीस पायऱ्या लागतात. त्या ओलांडून पुढे गेले की देवालयाचा विशाल सभामंडप लागतो. ह्या सभामंडपात हंड्या नि झुंबरे लटकलेली आहेत. हा सभामंडप भनसाळीशेट मुरारजी पुरुषोत्तम यांनी बांधला. या सभामंडपापासून सरळ आत

गेले की, गर्भागार लागते व या गर्भागाराच्या मध्यभागी एक लहानशी सुमारे दीड हात उंचीची पेढी असून त्यावर सुंदर मखरात रुपेरी चौरंगावर अधिष्ठित होऊन मुंबापुरीतील साऱ्या लोकांना दर्शन देत असलेल्या या पूर्वाभिमुख धनदेवता महालक्ष्मीचे दर्शन होते. या देवी महालक्ष्मीच्या उजव्या बाजूस श्रीमहाकाली आणि डाव्या बाजूस श्रीमहासरस्वती अशा तिच्या दोन बहिणी आहेत. श्रीमहालक्ष्मी व्याघ्रावर आरूढ झाली असून, श्रीमहाकाली महिषासुरावर बसली आहे आणि श्रीमहासरस्वती ही मयूराधिष्ठित आहे. देवीची ही आसने स्पष्ट दिसत नाहीत, पण साधारण दगडाचा आकार दिसावा तसा दिसतो. देवीच्या मूर्तींचे कामही जेमतेमच आहे.



मुंबईची श्रीमहालक्ष्मी

श्रीमहालक्ष्मी, श्रीमहाकाली व श्रीमहासरस्वती ह्या पाषाणमूर्तींना नेहमीच मुखवटे आणि अलंकार घातलेले असत. त्यामुळे वर उल्लेखिलेल्या मूळ मूर्तींचे स्वरूपदर्शन क्वचितच होते. श्रीमहालक्ष्मी ही चतुर्भुज असून, तिची उंची सरासरी सव्वादोन हात आहे तर श्रीमहाकाली आणि श्रीमहासरस्वती या अनुक्रमे अडीच व दोन फूट उंचीच्या आहेत. या तिन्ही मूर्ती स्वयंभू आहेत असे सांगतात.

या मूर्तीवर सोन्याचे मुखवटे चढविलेले असतात. विविध प्रकारच्या अलंकारांनी त्यांना सजविले, नटविले, सुशोभित केले जाते. डोक्यावर छानदार मुकुट असतात.

नाकात नथ, हातांत कांकणे, गळयात मोत्यांचे हार असा शृंगार असतो आणि उंची साडया त्यांना नेसविल्या जातात.

देवीचा संपूर्ण देव्हारा लाकडी असून त्यावर ठोकलेला चांदीचा पत्रा सुबकतेने कोरलेला आहे. देव्हाऱ्यासभोवतालच्या लाकडी मखरास ॲल्युमिनियमचा चकचकीत रुपेरी रंग दिलेला आहे. देवीच्या या खोलीस उत्तरेकडे एक व दक्षिणेकडे एक असे दोन दरवाजे आहेत. पाठीमागे मात्र दरवाजा नाही. हे देऊळ पूर्वाभिमुख आहे.

सभामंडपात गर्भगाराच्या द्वारापासून काही अंतरावर चांदीच्या पत्र्याने मढविलेला एक पाषाणाचा सिंह आहे. याशिवाय सभामंडपात गर्भगाराच्या दाराच्या उजव्या बाजूस व डाव्या हाताला कोनाडयात दत्त व गणेश या देवता अधिष्ठित आहेत. देवळाच्या सभामंडपाच्या उजव्या बाजूस ध्वजस्तंभ असून, उत्सवकाळात शुभ्र किंवा भगवा ध्वज तिथे फडकत असतो. सभामंडपाच्या डाव्या बाजूस एका कोपऱ्यात दीपमाळ असून, उत्सवकाळात दीपमाळेची शिखरे पाजळण्यात येतात. देवळाचे शिखर सुमारे ८० ते ९० फूट उंचीचे आहे.

या महालक्ष्मी मंदिराच्या आवारातच मयक धाकजी दादाजी या नामांकित प्रभू गृहस्थाने बांधलेले मोठे देऊळ आहे. पाऊण लाख रुपये खर्च करून त्याने हे धाकलेश्वराचे देऊळ बांधले. या देवळात श्रीविनायकादित्य, श्रीहरिनारायण, धाकलेश्वर, रेमेश्वरी, मयूरेश्वर अशा पाच स्वतंत्र मूर्ती आहेत. देवळाच्या आवारातच धाकजी दादाजी यांची समाधी पण आहे.

या महालक्ष्मी मंदिराच्या अलीकडेच सुमारे पन्नास हातांवर पण थोडेसे खालच्या बाजूस एक फरसबंदी असून तिथे एक फरसबंदी तलावही आहे. हा तलाव इ.स. १८२४ साली तुळशीदास गोपाळदास यांनी ४०,००० रुपये खर्च करून बांधला. त्याची आकृती जहाजासारखी आहे. हा तलाव पस्तीस फूट खडक फोडून तयार केला असून भायखळा दगडांनी बांधलेला आहे. त्यावर दिलेला शिलालेख असा आहे--

**एतावत् जन्मसाफल्यं देहिनामिह देहिषु ।**
**प्राणैरर्थैधि यावाचा श्रेय एवाचरेत सदा ।।**

या तलावाच्या पश्चिमेस शंकर व रणछोडजी यांची मंदिरे आहेत. जवळच्या काही धर्मशाळांतून लोक हवेसाठी येऊन रहातात. महालक्ष्मी देवळाजवळच अगदी अलीकडे एक धर्मशाळा बांधली गेली असून, तीवर साधुबेला आश्रम अशी पाटी लटकते आहे.

या महालक्ष्मीचे देऊळ जेव्हा बांधले गेले तेव्हा कोळी आणि दक्षिणी लोक देवीच्या दर्शनास अधिक येत असत. परंतु गेल्या सुमारे ३०-३५ वर्षांपासून

गुजराती भाविकांचीही देवीच्या दर्शनास मनस्वी गर्दी लोटत असते. गुजराती लोक श्रीमंत असल्याने त्यांनी अनेक देणग्या व मौल्यवान चिजा देवीस व देवालयास दिलेल्या असल्याने देवळाच्या उत्पन्नात पडणारी भर वाढली आहे.

दर दिवशी देवी महालक्ष्मीची चार वेळा षोडशोपचारे पूजा केली जाते आणि चार वेळा तिला अनन्यभावे ओवाळले जाते. देवालय सकाळी ५ वाजता उघडण्यात येते. नंतर पूजा करण्यात येऊन पहिली आरती सकाळी ७-३० च्या सुमारास होते. दुसरी धुपारती सूर्यास्ताच्या वेळी होते. तिसरी दीपारती संध्याकाळी ७-३० वाजता व रात्री १०-३० वाजता शयनारती केली जाते. या चारही आरत्यांच्या वेळेला गुजराती श्लोक म्हटला जातो.

**जय जय आद्या शक्ति मां**
**अखंड ब्रह्मांड नि पाया पडवे पंडित मां**
**जयो जयो मां जय जगदंबे ॥**

या त्या गुजराती मंगल श्लोकाच्या सुरुवातीच्या पंक्ती होत.

प्रतिवर्षी चैत्र पौर्णिमेला येथे मोठा उत्सव होतो. पण सर्वांत मोठा व प्रेक्षणीय असा उत्सव आश्विन महिन्यात नवरात्राचा होत असतो. या उत्सवांसाठी देऊळ रंगवून सुशोभित करतात आणि आश्विन शुद्ध प्रतिपदा ते दशमीपर्यंत देवालयात व देवालयासभोवती मोठी आरासही केली जाते. तसेच हवनही होत असते. या नवरात्रातील उत्सव प्रसंगी मोठी यात्रा भरून देवीच्या दर्शनार्थ हजारो भक्त-भाविकांची एकच तुफान गर्दी होत असते. विशेषतः आश्विन शुद्ध अष्टमीच्या दिवशी नवविवाहित वधूंची होणारी गर्दी तर पहाण्याजोगी असते. महाराष्ट्रीय चित्तपावन ब्राह्मण समाजात नवविवाहित वधूचे लग्न झाल्यापासून पहिली पाच वर्षे सौभाग्यादी ऐश्वर्य प्राप्तीसाठी आश्विन शुद्ध अष्टमीच्या दिवशी श्रीमहा-लक्ष्मीचे व्रत करण्याचा प्रघात आहे. तो आज शेकडो वर्षे चालू आहे. हे व्रत काम्यव्रत असल्याने ज्याचे त्यानेच करावयाचे असते. या व्रतात प्रदोष काळी श्रीमहालक्ष्मीची पिष्टमय म्हणजे तांदळाच्या पिठाच्या मूर्तीची पूजा करून रात्री पूजोत्तर देवीपुढे धूप जाळून देवता जागृती करणे आणि घागरी फुंकून नृत्य करणे हा व्रतोत्सवाचा महत्त्वाचा भाग समजला जातो. दारिद्र्य विनाश व संपत्ती लाभ हा या व्रताचा हेतू आहे.





# कोळवणची महालक्ष्मी



लेखिका : कु. रतन ठाकूर

ठाणे जिल्ह्यात डहाणू तालुक्यात डहाणू रोड स्थानकापासून पंधरा-सोळा मैलांवर उंच पर्वत पहाड आहे. त्या पहाडाच्या शिखरावर श्रीमहालक्ष्मी देवीचे मंदिर आहे. सध्या या पर्वतशिखरावरील मंदिरापर्यंत कोणी जात नाही. ह्याच पहाडाच्या पायथ्याशी महालक्ष्मीचे दुसरे मंदिर बांधले गेले आहे याबद्दल अशी दंतकथा आहे :

कोणी एक गर्भवती स्त्री महालक्ष्मी देवीच्या दर्शनाकरिता पर्वतशिखरावर गेली असता अत्यंत थकून गेली. तेव्हा श्रीमहालक्ष्मीने पुजाऱ्याच्या स्वप्नात येऊन सांगितले की, माझ्या भक्ताला अशा प्रकारे कष्ट झालेले मला सहन होत नाहीत. तुम्ही मला खाली घेऊन चला. तेव्हा त्या देवीची प्रतिष्ठापना खाली करण्यात आली.

भक्ताबद्दल अनुकंपा दर्शविणाऱ्या या देवतेने फसवेगिरीचाही उपयोग केला होता. अशी लोककथा आहे. तीर्थयात्रा करण्यासाठी पांडव या भागातून जात होते. त्यावेळी भीमाच्या मनात आले की स्थानदेवता महालक्ष्मीशी आपण विवाह करावा. त्याप्रमाणे त्याने आपली इच्छा तिला बोलून दाखविली. महालक्ष्मीने एका अटीवर कबुली दिली. ती म्हणाली की, येथून काही कोसांवर जी सूर्यानदी वाहत आहे तिचा प्रवाह जर तू माझ्या या पहाडाच्या पायथ्यापाशी घेऊन आलास तर मी तुझ्याशी विवाह करीन. पण हे सर्व काम एका रात्रीत पूर्ण झाले पाहिजे. जर पहाटेचा कोंबडा आरवला आणि तुझे काम अपुरे राहिले तर माझा तुझ्याशी विवाह होणार नाही. भीमाने तत्काळ कबुली दिली. आपल्या शारीरिक सामर्थ्यावर त्याने नदीचा प्रवाह अडविला. थोडीशी जागा उरली होती तिच्यासाठी दगड मिळेनात तेव्हा त्याने आपली पाठच तेथे टेकवून पाणी अडविले. नदीचे पाणी अडून हळूहळू महालक्ष्मीच्या पहाडाकडे वळू लागले. भीमासारख्या

आडदांड मानवाबरोबर विवाह करावा लागणार म्हणून महालक्ष्मी घाबरून गेली. पण लगेच तिने धूर्तपणे मार्ग शोधून काढण्याचे ठरविले.

इकडे भीम बांधाच्या दगडामध्ये पाठ टेकवून पाणी पहाडाच्या पायथ्याशी केव्हा पोहोचते याची वाट पहात बसला होता. इतक्यात महालक्ष्मीने कोंबडयाचे रूप धारण केले व पहाट होण्यापूर्वीच कोंबडयाच्या आरवण्याची नक्कल केली. बिचारा भीम ठरल्या वेळेपूर्वी आपला पण पूर्ण होऊ शकला नाही म्हणून निराश झाला. त्वरित तो बसल्या जागेवरून उठला. तो उठताच तितकी जागा मोकळी होताच तुंबलेले पाणी जोरात वाहू लागले आणि वाहत्या पाण्याबरोबर भीमाचे मनोरथही वाहून गेले.

पावसाळ्यात भीमबांधाच्या डोक्यावरून जेव्हा सूर्या उडी घेते तेव्हा मनोहर दृश्य दिसते.

महालक्ष्मीचा डोंगर एखाद्या सुळक्यासारखा आहे. अगदी वर शिखरावर कोणी जाऊ शकत नाही इतका तो सुळका कठीण व उंच आहे. पण चैत्र पौर्णिमेला रात्री दहा अकरा वाजता देवीचा वर असलेला एक पुजारी फक्त वर जाऊ शकतो. हातात एक मोठा वासा, त्यावर लावण्याकरिता एक मोठी पुरुषभर उंचीची पताका, देवीच्या ओटीचे साहित्य, पूजेचे साहित्य, तेवता दिवा इतके साहित्य घेऊन एकटा वर जातो. तेथे महालक्ष्मीचे मूळचे स्थान आहे. तिची मध्यरात्री पूजा करून खणानारळांनी ओटी भरून मोठी मशाल लावून व ती पताका लावून उजाडण्यापूर्वी परत येतो, दिवा रात्री लागलेला दिसतो. सकाळी उजाडल्यावर पताका फडकत असलेली लोकांना दिसते. यावरून मध्यरात्री तो पुजारी तेथे गेला होता हे निश्चित. पण तो पुजारी वर जातो तेव्हा शुद्धीतच नसतो व येतो तेव्हाही शुद्धीत नसतो. ही पताका, ओटीचे सामान आणि पूजासाहित्य जव्हारच्या राजाकडून येते. हे सर्व साहित्य घेऊन जाण्यापूर्वी तो एक तासभर घुमत असतो. देवीचा संचार झाला म्हणजे लोक त्याला प्रश्न विचारतात. विशिष्ट नवस घेतले जातात. विशेषतः आदिवासी स्त्रिया असा चमत्कारिक नवस घेतात की, मी माझ्या नवऱ्याशी तुझ्या समक्ष पुन्हा लग्न लावीन अशी पाच पाच मिनिटांनी येथे पुष्कळ लग्ने होतात.

हे नवस पूर्ण झाले, विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे दिली गेली म्हणजे तो मनुष्य त्याची वेळ झाली की धावतच वर निघतो. लोक त्याच्या पाठी जातात. वर जाण्याचा अधिकार देवीच्या पुजाऱ्यांच्या कुटुंबात फक्त एकासच असतो. तो मृत झाल्यावर देवीच्या प्रसादाने त्याच्या कुटुंबातील ज्याच्याबद्दल साक्षात्कार होईल व ज्याच्या स्वप्नात ती येईल त्याला तो अधिकार येतो. दर्शनाची यात्रा गेल्यावर पंधरा दिवस व्यापारी यात्रा रहाते.



# डहाणूची जागृत देवी महालक्ष्मी



लेखक : **श्री. ब. के. राऊत**

डहाणू तालुक्यात डहाणूपासून सोळा मैलांवर पूर्वेस आदिवासी भागात डोंगर-पायथ्याशी मुंबई-अहमदाबाद या राजमार्गावर महालक्ष्मीचे एक जागृत देवस्थान आहे. प्रतिवर्षी चैत्र पौर्णिमेपासून वद्य अष्टमीपर्यंत येथे भव्य यात्रा भरते. महाराष्ट्र व विशेषत: गुजराथ राज्यातून लक्षावधी भाविक मंडळी दरवर्षी देवीच्या दर्शनासाठी येतात. ही देवी आदिवासींची असल्यामुळे आदिवासी आपल्या बायकामुलांसह नवस फेडण्यासाठी येथे येतात. ठाणे जिल्ह्यात एवढी प्रचंड यात्रा इतरत्र कोठेच भरत नाही.

सन १९०० च्या दरम्यान सुरतचे भाविक गृहस्थ कै. श्री. आत्माराम रामचंद्र बंदरिया या भागात आले असता महालक्ष्मी देवी त्यांच्या स्वप्नात येऊन देवीने त्यांना दर्शन दिले व त्यांची इच्छा पूर्ण होईल असा वर दिला. दुसऱ्या दिवशी श्री. बंदरिया यांनी त्यावेळी घनदाट जंगलात असलेल्या महालक्ष्मी देवीच्या ठिकाणाला भेट देऊन नवस केला. त्या नवसाला देवी प्रसन्न होऊन श्री. बंदरिया यांना मुलगा झाला. देवीने आपली इच्छा पूर्ण केल्याने सन १९०१ मध्ये श्री. बंदरिया यांनी देवीचे भव्य मंदिर व भाविकांना उतरण्यासाठी मंदिराशेजारी धर्मशाळा बांधून दिली. आज त्याच मंदिरात देवीची महापूजा होत असते.

त्यापूर्वी पालघरच्या दांडेकर घराण्याने देवीच्या स्थानाजवळ लहानसे मंदिर बांधले होते. त्याच दरम्यान डहाणूला श्री. देव मामलेदार होते, त्यांनाही मूल-बाळ नव्हते; त्यांचीही इच्छा देवीने पूर्ण केल्याने श्री. बंदरिया यांना मंदिर बांधण्याचे कामी श्री. देव यांनी व महालक्ष्मी येथील पुजारी कै. श्री. काना धर्मा सातवी यांनीही खूप श्रम घेतले. आफ्रिकेतील धोबी या व्यापारी गृहस्थाला देवीच्या नवसामुळे व्यापारात भरपूर फायदा झाला. म्हणून त्यांनी आणखी एक धर्मशाळा बांधून दिली. त्यानंतर मुंबईच्या पांचाळ घराण्याने दोन व सुरतच्या

एका गुजराथी कुटुंबाने एक अशा एकूण तीन व सर्व मिळून आज पाच धर्मशाळा भाविकांसाठी बांधल्या असून त्या सर्वांना खुल्या असतात.

देवीचे मुख्य स्थान मंदिराचे पश्चिमेस डोंगरावर सुमारे ४०० फुटांवर आहे. या डोंगराचे शिखर जमिनीपासून सुमारे १,००० फूट उंच असून दरवर्षी या शिखरावर चैत्री पौर्णिमेला ध्वज लावला जातो. वाघाडी (ता. डहाणू) येथील कै. श्री. पांड्या सातवी ऊर्फ पाटील या पोलिस पाटील घराण्यातील मनुष्य यात्रेपूर्वी एक महिना सात्त्विक व पवित्र भावनेने मांस मासे न खाता, कुटुंबापासून दूर राहून देवीची मनोभावाने भक्ती करतो. तोच मनुष्य शिखरावर ध्वज लावतो. इतरांना शिखरावर चढता येत नाही. मात्र इतरांनी वरीलप्रमाणे पालन करून भक्तिभावाने चढण्याचा प्रयत्न केल्यास तो यशस्वी होतो. गेल्या १५–२० वर्षांत दोन-चार प्रयत्न झाले व त्यात ते यशस्वी झाले. मात्र एक-दोन अपयशी ठरून अपघाती मरण पावल्याची उदाहरणे घडली आहेत.

दरवर्षी चैत्र पौर्णिमेला लावण्याचा ध्वज जव्हारचे माजी राजे श्री. यशवंतराव मुकणे यांच्या घराण्याकडून दिला जातो. हा ध्वज पाच मीटर लांबीचा असतो. ध्वजाबरोबर प्रतिवर्षी साडी-चोळी व ध्वजनीला मानधन श्री. राजे मुकणे यांचेकडून देण्याची व्यवस्था आहे.

ध्वज लावणारा मनुष्य चैत्र पौर्णिमेला रात्री बारा वाजता देवीच्या मंदिरापासून ध्वज व पूजेचे साहित्य (सोबत १२ नारळ असतात) घेऊन निघतो. त्या मध्यरात्री तो प्रथम चारशे फूट उंचीवर असलेल्या देवीच्या मुख्य स्थानी जातो. देवीच्या स्थानाजवळ वाघाची गुहा असून तेथे वाघोबा वास करीत असतो. ध्वजनीला प्रथम दर्शनी वाघोबाचे दर्शन घडते. त्यानंतर मात्र पुन्हा तो वाघ दिसत नसतो. गुहेशेजारी सुमारे २०० फूट लांबीचे भुयार असून भुयाराचा रस्ता अत्यंत अवघड आहे. भुयारातून जाताना काही ठिकाणी सरपटत तर काही ठिकाणी मांड्याने, तर काही ठिकाणी उभ्याने दाट अंधारात बत्तीच्या सहाय्याने जाता येते. भुयाराच्या शेवटी शुद्ध व थंड पाण्याचे कुंड असून ते बाराही महिने वहात असते.

देवीच्या स्थानापासून ध्वज लावण्याचे ठिकाण सुमारे सहाशे फूट उंचीवर आहे. हा रस्ता अत्यंत अवघड, एक पावलाचा, भीतिदायक आहे. रस्त्यात प्रचंड अजगर, इतर जंगली जनावरे, भावर जातीच्या मोठ्या मधमाश्यांची पोळी जागजागी पहावयास मिळतात !

वेळ पडल्यास ध्वजनीला अजगराच्या अंगावर कांबळे अगर फडके टाकून जावे लागते. मात्र दैवशक्तीमुळे एकाही जनावराचा ध्वजनीला कोठेही त्रास होत नाही ! शिखरावर सुमारे २५ फूट व्यासाचा वर्तुळाकार भाग सपाट असून

मध्यभागी लाकडी स्तंभावर ध्वज लावला जातो. हा प्रवास सुमारे ३ ते ३॥ तासांचा आहे. रात्रौ १२ वाजता निघालेला ध्वजनी सकाळी ७ वाजता ध्वज लावून परत येतो. प्रतिवर्षी चैत्र पौर्णिमेला मोठा होम (यज्ञ) व वद्य अष्टमीला लहान होम होतो.

सातवी घराण्यातील पूर्वापार देवीची पूजा करणारे सात पुजारी असून आळीपाळीने आठ वर्षांनी प्रत्येक पुजाऱ्याची एकदा पाळी येते. ज्याची पाळी येते त्याने वर्षभर देवीच्या पूजेची व्यवस्था पहावयाची असते. भाविक मंडळी वर्षभर देवीच्या दर्शनाला येत असतात. देवीचा वर्षातून एकदा येणारा यात्रेचा उत्सव सोडून आश्विन शुद्ध १२, माघ शुद्ध १२, व भाद्रपद शुद्ध १२ असे तीन मोठे दुसरे उत्सवही होतात. या उत्सवांत विशेषतः आदिवासी मोठ्या संख्येने भाग घेतात. तारप्याच्या तालावर रात्रभर त्यांचा नाच व उत्सव चालू असतो. गरीब आदिवासींच्या नवसाला पावणारी ही देवी असल्यामुळे मूलबाळ होणे, उद्योग मिळणे व दुःखे नाहीशी होणे इत्यादी गोष्टींचा लाभ झाल्यामुळे घेतलेल्या नवसाची फेड चैत्र पौर्णिमेला केली जाते. घेतलेल्या नवसाप्रमाणे देवीच्या समोर आदिवासी आपल्या पत्नीसोबत पुनश्च लग्नही लावतो. चैत्र पौर्णिमेला भाविक मंडळी देवीच्या समोर काही वस्तू व पैशाच्या रूपाने देणग्या मोठ्या प्रमाणात ठेवतात. त्याचे उत्पन्न दरवर्षी पुजाऱ्याला हजारोंनी मिळते. मात्र इथला वार्षिक खर्चही त्याच प्रमाणात आहे. शासनाकडून पूजेच्या व्यवस्थेकरिता दरवर्षी ११० रुपये देण्याची व्यवस्था आहे. मात्र या देवस्थानाला इतर देवस्थानाप्रमाणे जमीन दिलेली नाही.

हे निसर्गरम्य ठिकाण डोंगराळ भागात शोभून दिसत असून या परिसरात फुलझाडे, कारंजी इत्यादी सोयी उपलब्ध झाल्यास या ठिकाणाचे महत्त्व आगळे होईल.

दिनांक २१ एप्रिल १९७० रोजी चैत्री पौर्णिमेला येथे विधिपूर्वक होमहवन झाले. या होमात हजारो नारळ अर्पण करण्यात आले. चालू वर्षी भाविक मंडळी दरवर्षीपेक्षा अधिक प्रमाणात येत आहेत. काही भाविक नवसाप्रमाणे बकरे, कोंबडेही देवीला अर्पण करीत होते, मात्र जीव न घेता ते जिवंत सोडले जात होते. अशा बकऱ्या-कोंबड्यांसाठी मंदिराचे समोर एक खोली बांधण्यात आली आहे.

देवीच्या मंदिराजवळ येताच कित्येक स्त्रिया आपले केस मोकळे सोडून थरथरत्या शरीराने सारख्या घुमताना दिसत होत्या. या स्त्रियांत वरिष्ठ वर्गाच्याही स्त्रिया आढळून येत होत्या. त्यांच्या अंगात देवी येते असे मानले जाते.

दिनांक २१ एप्रिलला अशाच थरथरत्या अंगाने आलेल्या एका भाविकाने देवीच्या मंदिरात प्रवेश करताना आपल्या जिभेवर ब्लेडने पाच-सहा वार केले व रक्त दिले. रक्ताची धार या प्रसंगी लागली होती. हे दृश्य पाहून इतर भाविक या भाविकाच्या पायी लागत होते !

महिन्यातून भक्तिभावाने या देवीचे पाच ते सहा वेळा दर्शन घेतल्यास देवीच्या चेहऱ्यावर निरनिराळे भाव दिसून येतात.






**(मंडला जिल्हा गॅझेट,** पृष्ठ २५०)

डहाणू (जि. ठाणे) जवळ अठरा मैलांवर बिवळवेढे नावाचे गाव आहे त्या ठिकाणी हे स्थान आहे. हा रहदारीचा मोठा राजमार्ग असल्याने येथे रहदारीतील वाहने मंदिराजवळ थांबतात. मूळपीठ डोंगरावर असून त्याची उंची सुमारे १,४०० फूट वाहे. वर चढून जाण्यास पायवाटेचा मार्ग आहे पण तो फार कठीण आहे. या ठिकाणी देवीचा लहानसर तांदळा असून पाण्याचे टाकेही आहे आणि वरील भागी सुळक्याप्रमाणे दिसणारे शिखर आहे. नीट निरीक्षण केले तर हा सुमारे ५०-६० फूट उंचीचा सुळका दक्षिणेतील देवालयाप्रमाणे गोपुराच्या कंगोऱ्याप्रमाणे दिसतो. चैत्री पौर्णिमेला रात्री याच शिखरावर निशाण लावण्याचा प्रमुख कार्यक्रम होतो.

पण या वरील अवघड जागी सहसा कोणी जात नाहीत. या शिखराच्या पायथ्याला सांप्रतच्या मुख्य देवीचे मंदिर आहे. सुमारे २००-२५० वर्षांपूर्वी कोणी तरी याची स्थापना केली आणि आता जीर्णोद्धार होऊन ते चांगल्या स्थितीत दिसते. आजूबाजूला दोनतीन मोठ्या धर्मशाळा आहेत. पण यात्रेच्या दिवसा-व्यतिरिक्त त्या बहुधा मोकळ्या असतात. या मंदिराचा गाभारा पश्चिमाभिमुखी आहे, म्हणजेच मुख्य टेकडीवरील मंदिराकडे मुख आहे. सभामंडप, यज्ञकुंड, दीपमाळा वगैरे सर्व काही येथे आहे.

देवीचा मुखवटा दर्शनी आहे. तो सुमारे दोन फूट उंचीचा लांबट चेहऱ्याचा असून शेंदूरचर्चित आहे. अंगचे नेत्र आणि कान आहेत. मस्तकावर चांदीचा मुकुट आणि कुंडले शोभेसाठी ठेवतात. मागील बाजूस भव्य पाषाण आहे. तो सुमारे तीन फूट उंचीचा व तितक्याच रुंदीचा असा ओबडधोबड आहे. याच पाषाणाला दर्शनी मुखवटा कोरून काढलेला आहे. मुखवट्याशिवाय मागील पाषाणाचा भाग वस्त्रांनी झाकलेला असतो. या मुखवट्यासमोर चांदीचे सिंह

व जय-विजय मूर्ती मांडलेल्या असतात. पण मुख्य मूर्तीबरोबर त्यांचा संबंध नाही. देवीच्या छायाचित्रात मात्र ते सर्व मूळचेच असावे असे दिसते.

या मंदिरापासून- टेकडीवरील ठिकाण सुमारे तीन मैल लांब असावे. पौर्णिमेच्या रात्री १२ वाजता पुजारी या मंदिरापासून निशाण घेऊन एकटा निघतो. वरच्या मंदिरात धार्मिक विधी करतो आणि नंतर शिखरावर निशाण रोवतो. हा सर्व विधी होण्यास सुमारे तीन तास लागतात. वरचा मार्ग बिकट असल्याने दिवसाही तिकडे सहसा कोणी जात नाही. त्यामुळे रात्री एकट्याने जाऊन निशाण लावणे हा दैवी चमत्कार समजला जातो.

मूळस्थान टेकडीवर असताना पायथ्याजवळ मंदिर का असावे याची चौकशी करता भक्तमंडळी सांगतात की, पूर्वी आदिवासी गरोदर स्त्री वार्षिक यात्रेच्या वेळी नियमाप्रमाणे वर दर्शनाला जात असता पोटात कळा आल्या आणि तिला पुढे जाणे अशक्य झाले. देवीचे दर्शन चुकणार म्हणून तिने मातेचीच प्रार्थना केली, त्यावेळी दृष्टांताने देवीने तिला सांगितले की, पायथ्यापाशी मी आहे, तेथे दर्शनास ये. श्रमाने थकून गेलेली असताना तिला हा दृष्टांत झाला. खडबडून ती शुद्धीवर आली आणि पायथ्याजवळ येताच तिला वरील मूर्तीप्रमाणे तेथे दर्शन झाले. पुढे या ठिकाणी मंदिर उभारले गेले.

वणी येथील सप्तशृंगी, औंध येथील यमाई, मार्डीची यमाई, पुण्याची चतुःशृंगी या देवींचा इतिहास या संदर्भात पाहिला तर तोही वर नमूद केल्या-प्रमाणेच आढळून येतो. ज्या देवींची मूळस्थाने चढण्यास कठीण अशा उंच डोंगरावर आहेत त्या देवींची मंदिरे त्याच डोंगराच्या पायथ्याजवळ आढळतात. त्यासंबंधीही अशाच दंतकथा ऐकायला मिळतात.

या देवींच्या भक्तांची अशी भावना आहे की, कुंडामध्ये समोर ज्या ज्वाळा दिसतात त्यापैकी पहिल्या तीन महालक्ष्मी, महाकाली, महासरस्वतीची रूपके असून बाकीच्या या नवदुर्गास्वरूपी होत. त्या संदर्भात अशी एक दंतकथा प्रचलित आहे की, यावनी आक्रमकांच्या भीतीमुळे एके वेळी क्षेत्र सुरक्षित राखण्याच्या दृष्टीने भक्तांनी देवीचे कुंड व गाभारा पाण्याने पूर्ण भरून टाकला. परंतु आदिमायेची शक्ती इतकी प्रचंड ठरली की, तेवढ्या पाण्यातूनही ज्वालांचे वरती उफाळणे चालूच राहिले.

एका काळी हे देवस्थान अतिशय श्रीमंत होते, ह्याचा उल्लेख अनेक इतिहास-कारांनी केलेला आहे. प्रसिद्ध बखरकार फेरिस्त म्हणतो, सन १००८मध्ये सुलतान महंमुदाने ज्यावेळी हे देवस्थान लुटले त्यावेळी त्या लुटीत सात लक्ष सुवर्ण दिनार, सातशे मणांचे सोन्याचांदीचे पत्रे (१ मण = ८० पौंड) दोनशे मण शुद्ध सोन्याच्या लगडी, दोन हजार मण अशुद्ध चांदीचे पाट आणि सर्व

जातींची वीस मण रत्ने, ज्यामध्ये हिरे, मोती पाचू माणिक इत्यादींचा समावेश होता.

प्राचीन काळी या क्षेत्री अश्वमेध यज्ञ झालेला होता. त्या वेळी वज्रेश्वरी देवीची स्थापना केलेली होती. ती मूर्ती अद्याप पहावयास मिळते. गझनीच्या महंमदाने मंदिराची लूट केल्यावर ते उद्ध्वस्त केले होते आणि त्यावर मशीद उभारली होती. पण देवीच्या भक्तगणांनी मुसलमानांचा जोर कमी झाल्यावर मशीद पाडून पुन्हा मंदिर उभारले आहे. राजा तोडरमलबरोबर अकबर बादशहानेसुद्धा या क्षेत्राला भेटी दिल्याचा आणि तिला वंदन केल्याचा उल्लेख मिळतो. रणजितसिंहाने पंजाब प्रांत स्वतंत्र केल्यावर मंदिराचे कळस पुन्हा सोन्याच्या मुलाम्याने बनविले. याप्रमाणे अन्यधर्मीय सहिष्णु राजांनीदेखील या देवीचे महत्त्व मानल्याचा उल्लेख आढळतो.

रजपुतांपैकी कोटच वंशाने या प्रांती काही दिवस राज्य केले आणि तेथे ते वस्ती करून कायमचेच राहिले. म्हणून त्या वंशास तेथील रहिवासी कोटच ब्राह्मण या नावाने संबोधू लागले.

ज्वाला देवीच्या ठिकाणी सतीची जिव्हा पडली म्हणून या क्षेत्री काही श्रद्धावान भक्त आपली जिव्हा देवीला अर्पण करीत असतो. काहींना त्यांची जिव्हा लगेच परत मिळे, म्हणजे त्वरितच दुसरी जिव्हा त्यांना प्राप्त होई. तर इतरांना ती दोनचार दिवसांनी मिळे. सांप्रत मात्र जिव्हा अर्पण करण्यास बंदी करण्यात आली आहे. याचे कारण असे दिले जाते की, लोक भक्तिभावाने श्रद्धेने पूर्वीप्रमाणे जिव्हा अर्पण न करता केवळ देवतेची परीक्षा पाहण्याच्या दृष्टीने वागू लागले आणि साहजिकच देवतेला हे न आवडून तिने दृष्टांताने सांगितले की यापुढे जीभ अर्पण केल्यास परत मिळणार नाही. म्हणून ही बंदी करण्यात आली आहे.

या क्षेत्राच्या ठिकाणी ज्वालामुखी वज्रेश्वरी व चिंतपूर्णी ही देवीची स्थाने १५ ते २० मैलांच्या परिसरात असल्याने जो त्रिकोण घडतो तो शक्तिस्थानामध्ये महत्त्वाचा समजला जातो. येथील रूढी अशी आहे की, या त्रिकोणात कोठेही केलेले नवस चिंतपूर्णीचे मंदिरात फेडले जातात पण चिंतपूर्णीचा नवस मात्र याच ठिकाणी फेडावा लागतो. ज्वाला व वज्रेश्वरी यांना आराम करण्यासाठी पलंग आहेत पण चिंतपूर्णी ही कुमारीरूप असल्याने तिला लहान मुलाप्रमाणे टोपलीत निजवितात. या ठिकाणी भक्तमंडळी जो प्रसाद वाटतात तो एखाद्या भव्य कढईत शिरा तयार करून वाढण्याची रूढी आहे.

तुकाराममहाराजांचे परात्पर गुरू राघवचैतन्य यांनी या देवीचे स्तोत्र रचले आहे. त्याचा भावार्थ असा की, कोटयवधी देवांचे दैदीप्यमान मुकुट जिच्या चरणी सदैव झुकलेले आहेत, कोटयवधी चलसूत्रीप्रमाणे तेजस्वी मण्यांमुळे

जिची वेणी शोभिवंत झालेली आहे, कल्पांतीच्या क्षोभामुळे जिने जांभई देताच सहस्रावधी ज्वाला वर उफाळून निघालेल्या आहेत आणि त्या भयंकर ज्वाला-मुळे आक्राळविक्राळ दिसणाऱ्या मुखात सकळ भूतमात्र लहानशा घासाप्रमाणे सामावलेला आहे अशी ही देवता आमचे रक्षण करो.

या ठिकाणी ज्याप्रमाणे खडकाच्या भेगांतून ज्वलनशील वायूचा उद्रेक होतो आणि ज्वाला सदैव ज्वलनशील असतात तसाच प्रकार अमरकंटक क्षेत्री ज्वालेश्वर या ठिकाणी पहावयास मिळतो. भूभागातून वायू सतत येत असतो आणि काडी पेटवून लावली असता तो पेट घेतो. मत्स्यपुराणांतरीची कथा अशी की, शंकराने जी तीन पुरे जाळली त्यांपैकी एक या क्षेत्री पडले म्हणून असा चमत्कार घडत असतो. या क्षेत्री स्नान केल्याने स्वर्गप्राप्ती आणि प्राणदान केल्यास जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका होते असे पद्मपुराणात वर्णन मिळते.

अबुल फझल आपल्या ऐने अकबरीमध्येही याचा उल्लेख करतो. मंडला शहरी (वऱ्हाड) गुडु धीमर पंडा यांच्या घरी सिंहवाहिनी देवीची मूर्ती बसविलेली आहे. पूर्वी हा पंडा आपली जीभ कापून देवीला रक्त अर्पण करीत असे. काही दिवसांनी ती कापलेली जीभ पुन्हा सांधून जाई, पण कालांतराने ही पद्धत बंद पडून आता तो पंडा आणि त्याचे काही वंशज आपल्या मनगटातून रक्ताचे काही थेंब काढून ते देवीला अर्पण करीत असतात.






लेखक : श्री. मधुसूदन फाटक

रविवारची एक रम्य सकाळ. वसई स्टेशनवर लोकल गाडी संपूर्णपणे थांबण्याच्या अगोदरच शेकडो लोकांनी फलाटावर उड्या घेतल्या. आणि मिळेल त्या वाटेने बाहेर जाऊन एस.टी. थांब्यावरील रांग पकडली. आम्ही रमतगमत बाहेर येतो, तो वज्रेश्वरीकडे जाणाऱ्या थांब्यावर हजारो लोकांनी आधीच रांग धरलेली. मुंबईच्या सान्निध्यातील वज्रेश्वरी या तीर्थस्थानाची लोकप्रियता येथेच कळून चुकली. महत्प्रयासाने एस.टी. बसमध्ये तासाभराने प्रस्थान ठेवले. भरधाव निघालेली बस पाऊण एक तासात वसईपासून सुमारे वीस मैलांवर असलेल्या या आरोग्य व तीर्थक्षेत्री वज्रेश्वरी येथे येऊन थडकली. उतरल्याबरोबर तीर्थक्षेत्राच्या सर्व खाणाखुणा जाणवल्याच. 'नवस फेडायचे आहेत का' म्हणून विचारणा करणारी भिक्षुक मंडळी, उतरण्यासाठी खोली पाहिजे का म्हणून भाडोत्री आस्थेने चौकशी करणारे तथाकथित गाईड्स; हारफुलं, उदबत्त्या असे पूजेचे साहित्य एकत्र विकणारी छोटी पोरं; प्रसादासाठी म्हणून मिठाई विकणारी भडभुंज्यांची दुकानं; अशा फेऱ्यातून वाट काढीत वज्रेश्वरी मंदिराच्या दिशेने चालू लागलो.

**ऐतिहासिक महत्त्व**

समोरच किल्लेवजा दगडी वास्तू दिसली. देवळाच्या नेहमीच्या नाजुकपणाशी थोडीशी विसंगत पण हेच होते सुप्रसिद्ध वज्रेश्वरी मंदिर. एका तीनशे साडेतीनशे फुटांच्या टेकडीवर आहे हे देवस्थान; याचा पूर्वेतिहास विचारला असता हे मंदिर सुमारे २०० वर्षांपूर्वीचे जुने आहे असे समजले. आताची त्याची दगडी बांधणी चिमाजी आप्पाने केली असे नमूद आहे. वसईहून फिरंग्यांना हुसकावण्याचा विडा उचलून पुण्याहून निघालेला चिमाजी आप्पा येथे विश्रांतीसाठी थांबला असता



श्रीवज्रेश्वरी मंदिर



श्रीवज्रेश्वरी दर्शन

त्याला स्वप्नात देवीने दृष्टांत दिला. वसईच्या अभेद्य किल्ल्यावर कोठल्या दिशेने हल्ला केला असता त्याच्या अभेद्यतेला खिंडार पडेल त्याची सूचना त्याला दृष्टांतात मिळाली अशी आख्यायिका आहे. वसई सर करून परतताना चिमाजी आप्पाने आताचे भक्कम देऊळ बांधून काढले आणि वज्रेश्वरी देवीची शिखरावर प्रतिष्ठापना केली.

## रमणीय परिसर व मंदिर

वज्रेश्वरी देवळाचा परिसर मोठा रमणीय आहे. उत्तरेस टेकडीच्या तळाशीच तानसा नदी वहात आहे. पश्चिमेस गणेशपुरी हे स्वामी नित्यानंद व स्थायी एक नावाने श्रद्धास्थान मुक्तानंद यांच्या वास्तव्याने झालेले आहे. दक्षिणेस वाडे तालुक्याची हिरवीगार जंगलपट्टी पसरली आहे. हे मंदिर पूर्वाभिमुख आहे. सुमारे ५० दगडी पायऱ्या चढून गेल्यानंतर मंदिराचा प्रमुख कमानीवजा दरवाजा लागतो. येथून मंदिराच्या चारी बाजूंस बळकट कोट बांधला आहे आणि त्यात गवाक्षे ठेवली आहेत. कदाचित त्या काळी जवळच असलेल्या फिरंगी राजवटीपासून देवीचे रक्षण करण्यासाठी ही रचना केलेली असणार. कमानी दरवाजातून प्रवेश केल्यावर भव्य सभामंडप लागतो व त्या पलीकडे विस्तीर्ण असा देवीचा गाभारा लागतो. या प्रमुख गाभाऱ्यात मधोमध मेघडंबरी वज्रेश्वरी देवीची सुबक मूर्ती उभी आहे. एका हातात गदा, दुसऱ्या हातात 'वज्रवजा खड्ग' घेतलेली मूर्ती बघून मन प्रसन्न होते. या प्रमुख दैवताच्या दोन्ही बाजूंला आणखी काही मूर्ती बसविल्या आहेत. गाभाऱ्याच्या चोहो बाजूंला भव्य प्रांगण लतावेलींनी युक्त असे आहे. दुपारच्या कडक उन्हातसुद्धा याच्या छायेत पश्चिमेकडून येणारा सुसाट वारा पीत बसले असता येथपर्यंत मजल मारल्याचा सर्व शीण नाहीसा होतो. विश्रांतीसाठी दक्षिणेस छोटीशी धर्मशाळा आहे. वज्रेश्वरी येथे खूपच भाविक नवस करतात आणि फेडतात. त्याचा पुरावा म्हणून देवीच्या समोर कठड्यावर चांदीची नाणी ठोकलेली दिसतात. पायऱ्या उतरताना समोर एक प्रचंड दीपमाळ बांधलेली दिसते. सणासुदीला ही दिव्यांनी शोभिवंत केली जाते.

## गरम पाण्याची कुंडे

वज्रेश्वरीचे लोकप्रिय आकर्षण म्हणजे सुमारे अर्ध्या मैलावर अकलोली या गावी असलेली गरम पाण्याची कुंडे हे होय. तानसा नदीच्या पात्रातील निरनिराळ्या तपमानाची ही गरम कुंडे म्हणजे एक निसर्गाचे आश्चर्यच आहे. चर्मरोग आणि गात्रांचे विकार यांचेवर उत्तम औषधी म्हणून ही कुंडे प्रसिद्ध असल्यामुळे तेथे नेहमीच लोकांची रीघ असते. सुमारे १५०° चे जास्तीत जास्त तपमान असणाऱ्या



सूर्यकुंडाजवळील
शिव मंदिर

कुंडाला अग्निकुंड असे यथार्थ नाव दिले आहे. इतर कुंडे जी कमीअधिक उष्णतेची आहेत त्यांना सूर्यकुंड, चंद्रकुंड, वायुकुंड, ब्रह्मकुंड अशी नावे दिली आहेत. सूर्य-कुंडाच्या काठावर श्रीशंकराचे एक टुमदार छोटेसे मंदिर आहे. जगभर साधारण ज्वालामुखीच्या प्रदेशातच अशी गरम कुंडे आहेत. पण एकाच ठिकाणी नदीच्या पात्रात असलेली ही वज्रेश्वरीची उन्हाळी एकमेव म्हणावी लागतील. येथील गंधकमिश्रित औषधी पाण्याच्या उपयुक्ततेमुळे हजारो पीडित उपचारासाठी येथे येत असल्यामुळे आजूबाजूला असंख्य निवासस्थाने भाड्याने मिळण्याची सोय आहे. महाराष्ट्र शासनाच्या पर्यटन विभागानेही अकलोली येथे नवीन विश्राम-धाम नुकतेच बांधून पुरे केले आहे.

वज्रेश्वरी येथे आल्यानंतर पलीकडील गणेशपुरी या श्रद्धास्थानाला भेट देणे अपरिहार्य ठरेल. वंदनीय नित्यानंदस्वामींचा आश्रम येथेच आहे. स्वामींचे हजारो भक्तगण तर या आश्रमाला नियमित भेट देत असतातच. पण इतरही प्रवासी मोठ्या भक्तिभावाने येथे येऊन जातात. स्वामीजींनी जेथे समाधी घेतली ते स्थान आता कलात्मक रीतीने बांधले आहे. त्याशिवाय अलीकडेच संगमरवरी दगडाचे संपूर्ण बांधकाम असलेला उत्तम नक्षीकाम केलेला आश्रम नव्यानेच बांधण्यात आला आहे. या आश्रमातील निर्मळ धीरगंभीर वातावरणाने मन प्रसन्न होऊन जाते. शेकडो परदेशी गौरवर्णीयसुद्धा अस्सल भारतीय वेषात येथे चिंतन करण्यात मग्न असलेले पाहून साश्चर्य आनंद होतो.




लेखक : श्री. सदानंद चेंदवणकर

आज महाराष्ट्रातील प्रमुख देवस्थानांत वणीच्या सप्तशृंगनिवासिनी महिषासुर-मर्दिनीचा उदो उदो केला जातो. इतकेच नव्हे तर कोल्हापूर, तुळजापूर व माहूर ऊर्फ मातापूर येथल्या तीन देवता म्हणजे या सप्तशृंगनिवासिनीच्या प्रतिमाच समजल्या जातात अशी श्रद्धा आहे.

वणी हे गाव नाशिक जिल्ह्यात आहे आणि सप्तशृंगीचा डोंगरही याच जिल्ह्यात मोडतो. नाशिकहून कळवण रस्त्याने नांदुरी हे गाव सुमारे तीस मैलांवर लागते व हेच गाव या सप्तशृंग डोंगराच्या पायथ्याशी वसलेले आहे. या डोंगराला सात शिखरे किंवा टोके असल्यामुळे त्याला सप्तशृंग असे म्हणतात. हा डोंगर वणीचा डोंगर म्हणूनही ज्ञात आहे. नाशिकहून वणी येथे जाण्यासाठी एस.टी.च्या बसस मिळतात. समुद्रसपाटीपासून ४,६५९ फूट उंचीवर असलेल्या चांदोर पहाडावर ही देवी सप्तशृंग निवास करून आहे. दिंडोरीपासून हे ठिकाण अवघे पंधरा मैलांवर आहे. सह्याद्री पर्वत हा दक्षिणोत्तर पसरला आहे. त्याचा उत्तरेकडील शिरोबिंदू म्हणजेच मांगेतुंगे पहाड होय. येथपासून दक्षिणेस सुमारे साठ मैलांवर पूर्व-पश्चिम गेलेली सप्तशृंग पर्वताची लांबच लांब (चांगली दहाहून अधिक मैलांची) अशी ओळ मिळालेली आहे. याचा जो मीलनबिंदू तोच केमचा (वणीचा) डोंगर होय. हा डोंगर गिरणा (गिरजा) नदीचे उगमस्थान असून गिरिजा पुराणात त्याचा उल्लेख आलेला आहे.

वणीच्या या सप्तशृंगी देवीसंबंधीची जी कथा आहे ती थोडक्यात अशी :

एके काळी पृथ्वीतलावर दैत्यांचेच जणू साम्राज्य पसरलेले होते. असुरांच्या छळणुकीने या पृथ्वीवरचे देवलोक अगदी त्रस्त होऊन गेले, अक्षरशः गांजले. या राक्षसांचे पारिपत्य करण्यासाठी ब्रह्मा, विष्णू व रुद्र यांनी एक महान शक्ती निर्माण केली. या शक्तीने चार ठिकाणी आपले रूप प्रकट केले. त्यांपैकीच एक



श्रीसप्तशृंगी, वणी, नाशिक

ठिकाण म्हणजे हा सप्तशृंग पर्वत होय. अन्य ठिकाणे म्हणजे तुळजापूर, कोल्हापूर व माहूर ही होत.

दिंडोरी, कळवण आणि आसमंतातील भागात महिषासुर नावाच्या दैत्याने आणि त्याच्या दोघा भावांनी मिळून देववृत्तीच्या लोकांना दे माय धरणी ठाय करून सोडले होते. देवीने दोघा दैत्यांना ठार केल्यावर महिषासुराचा वध करणे तिला त्रासदायक वाटू लागले. कारण रेड्याच्या शरीरात प्रवेश करून हा बलाढ्य राक्षस रहात होता! दोघा दैत्यांना ठार केल्यावर हा तिसरा राक्षस रेड्याच्या शरीरात रहातो हे देवीने हेरले व त्या रेड्याचे शरीर उडवून लावले. त्याबरोबर महिषासुर रेड्याच्या शरीरातून एवढ्या शीघ्र गतीने निघाला की, त्या उड्डाणामुळे डोंगराला खिंडार पडले. देवीच्या रोखाने चाल करून आपले सैन्य घेऊन तो आला. देवीने आपली विविध आयुधे महिषासुरावर फेकली. तिने वाजविलेल्या रणघंटांच्या भयंकर आवाजाने किती तरी असुर मूर्च्छित पडले. तिच्या गदेच्या घावाने सैन्यातले कित्येक राक्षस घायाळ झाले. तिच्या मुसळाच्या माराने अनेक रक्त ओकू लागले, अनेकांच्या माना तुटल्या, डोकी फुटली. आपल्या सैन्याची अशी वाताहात झाल्यावर महिषासुर देवीच्या सिंहावर धावून आला.

तो रेड्यावर आरूढ झाला होता. देवीची व त्याची भयंकर लढाई झाली. देवीने महिषासुरावर पाय देऊन दाबून धरले. त्याची दोन्ही शिंगे धरून ठेवली आणि आपल्या हातातील तलवारीने तिने त्याचा शिरच्छेद केला. नंतर मोठ्या कष्टाने त्या महिषासुराचाही तिने वध केला.

अशा प्रकारे महिषासुराचा वध केल्या दिवसापासून आजतागायत देवीने सप्तशृंगावर निवास केला आहे. डोंगराच्या पायथ्यापासून पठारावर जाण्यास चांगल्या तरण्याताठ्या माणसास सुमारे पावणेदोन तास सहज लागतात. डोंगरावरचा पहिला चढ चढत असता दिसणारे राक्षसाने पाडलेले उंचच उंच पर्वतावरील ते अजस्त्र खिंडार एखाद्या बोगद्याप्रमाणे वाटते.

वणीच्या सप्तशृंगनिवासिनी देवीचे दर्शन घेण्यासाठी डोंगर चढून वर जावे लागते. हा डोंगर चढणे मोठे कष्टाचे आहे. परंतु देवीचे दर्शन घेण्यासाठी चालताना जेवढे कष्ट अधिक तेवढे पुण्य जास्त पदरी पडते अशी भाविकांत श्रद्धा आहे. डोंगरावर जाण्यासाठी बरेच मार्ग आहेत. पूर्वेकडून पायऱ्यांचा मार्ग आहे. परंतु त्या पायऱ्या उंच असल्याने चढताना फार दम लागतो. दक्षिणेकडून डोंगरातून ३५० पायऱ्या खोदून मार्ग केलेला आहे व तो पूर्वेच्या रस्त्यापेक्षा विशेष सोयीचा आहे. या पायऱ्या इ.स. १७६८त नाशिकच्या कान्हेरे, रुद्राजी व कृष्णाजी या तीन भावंडांनी बांधल्या. या तिघा भावांचे आडनाव रायाराव असे होते. या पायऱ्यांचे बांधकाम इ.स. १७१८ ते इ.स. १७६९ पर्यंत चालू होते. इ.स. १७६८ पासून पायऱ्यांचा वापर करण्यास सुरुवात झाली. पायऱ्यांच्या पायथ्याशी वरील तिघा भावांनी एक धर्मशाळा, त्याच्याजवळ एक गणपतीचे देऊळ व रामतीर्थ नावाचे एक कुंड यांची बांधणी केली. पायऱ्या चढून पठारापर्यंत जाताना वाटेत अधेमधे एक संस्कृत व पाच मराठी असे शिलालेख आहेत. त्यामध्ये बांधकामासंबंधीची माहिती दिलेली आहे.

पहिला ३५० पायऱ्यांचा टप्पा चढून वरती गेल्यावर ४७२ पायऱ्यांचा दुसरा टप्पा चढून वर जावे लागते. या पायऱ्या तळेगाव-दाभाडे येथले पेशवाईतील एक प्रसिद्ध सरदार खंडेराव दाभाडे यांच्या पत्नी उमाबाई दाभाडे हिने इ.स. १७१० मध्ये बांधल्या.

सप्तशृंगीचा पहिला चढ चढून गेल्यावर मात्र रस्ता सोपा आहे. आवतीभोवतीचा निसर्गही नितांत रम्य आहे.

सप्तशृंगीचा डोंगर ४,६५९ फूट उंच असून त्यावर सर्व बाजूंनी जणू काटकोनात कापावा असा ९०० फूट उंचीचा उंच डोंगर आहे. सप्तशृंगीचा डोंगर चांदोर म्हणजे डोंगराचा एक अर्धा मैल लांबीचा भाग आहे. त्याच्या तीन बाजूंनी सरळ कडे असून, चौथ्या बाजूने त्याची थोडीशी पडझड झालेली दिसते.

सीतेच्या मुक्ततेसाठी प्रभु रामचंद्राने लंकेचा राजा जो रावण याच्याबरोबर लढाई केली त्यावेळी इंद्रजिताच्या दिव्य शक्तीने रामचंद्राचा बंधू लक्ष्मण घायाळ झाला. लक्ष्मणाला पुन्हा कसा जिवंत करता येईल याकडे साऱ्यांचेच लक्ष होते. त्याला जिवंत करण्यास सहाय्य करणारी वनस्पती मेरु पर्वतावर होती व ती आणण्याची कामगिरी प्रभूचा एकनिष्ठ सेवक हनुमानजी याच्यावर पडली. भुभुःकार करीत हनुमान पर्वतावर गेला खरा, परंतु नेमकी वनस्पती कोणती ते ओळखता न आल्याने त्याने पर्वतशिखरच उपटले व ते लंकेकडे चालविले. वाटेत त्यातला एक शिलाखंड पडला तोच हा सप्तशृंगीचा डोंगर होय !

या सप्तशृंगीच्या पठारावर फारशी लोकवस्ती नाही. पंचवीस तीस घरे असतील नसतील तेवढीच काय ती. पठारावर भरपूर पाण्याने भरलेली आणि काळ्या दगडांनी बांधलेली अशी एकापेक्षा एक सरस अशी आठ कुंडे आहेत. त्यांपैकी पाच छोटी आहेत व तीन मोठी आहेत. सरस्वती, लक्ष्मी, तांबूल, अंबालय आणि शीतला ही पाच कुंडे लहान आहेत तर कालिकुंड, सूर्यकुंड व दत्तात्रेय ही तीन कुंडे मोठी आहेत. या आठ कुंडांबरोबरच शिवालय नावाचे आणखीन एक कुंड तिथे आहे. ते चांगले मोठे असून त्याची खोली चार फूट आणि क्षेत्रफळ चाळीस चौरस वार आहे. ते दगडाने बांधलेले असून यात्रेकरू येथेच स्नान करतात. या कुंडात उतरण्यास पायऱ्या आहेत. कुंडातील पाणी गोड व स्वच्छ आहे. या कुंडाजवळच सिद्धेश्वर महादेवाचे हेमाडपंती पद्धतीचे मंदिर आहे.

दररोज देवीला सूर्यकुंडातील पाण्याने स्नान घातले जाते. शिवालय तीर्थाच्या पलीकडे खोल सरळ कडा असून त्याची खोली सुमारे १,२०० फूट आहे. पूर्वी येथून नरबळी दिले जात असत. सध्या फक्त बोकडाचा बळी देवीला दिला जातो. देवीच्या मंदिरात जाईतोपर्यंत पायऱ्या आहेत, परंतु डोंगरशिखरावर जाण्यास मात्र पायऱ्या नाहीत. तेथे जाण्यास सोयीचा रस्ताही नाही. डोंगरमाथ्यावर एक पांढरा खांब आहे व त्यावर चैत्री पौर्णिमेला देवीचा ध्वज लावला जातो. डोंगर-माथ्यावर जाण्यासाठी सरळ कडा वर चढून जाणे म्हणजे अक्षरशः एक प्रकारचा प्राणाशी खेळ खेळणे होय. पण हे बिकट काम डोंगराच्या पायथ्याजवळील बुटीगाव नामक गावच्या पाटलाची मुले वंशपरंपरेने करीत आलेली आहेत. हा माणूस चैत्री पौर्णिमेस रात्री वरती चढतो व पहाटे देवीचा ध्वज फडकावतो. तो कसा काय वर चढतो हे एक गूढ आहे. या रहस्याचा छडा लावण्याचा कुणी प्रयत्न केला तर त्याची दृष्टी साफ जाते अशी समजूत आहे. मि. डब्ल्यू. रॅम्से या एका पाश्चात्य संशोधकाने दुर्बिणीतून या माणसास चढताना पाहिले तेव्हा त्याला असे दिसले की, तो उभ्या खोदीव पायऱ्यांच्या रस्त्याने वर वर चढतो. हा मार्ग अतिशय बिकट आहे. देवीच्या कृपेमुळेच त्याला हे काम करता येते अशी भावना आहे.

चढावाच्या दुसऱ्या टप्प्याच्या ४७२ पायऱ्या चढून गेल्यावर दोन शिखरांच्या मध्ये गुहेसारख्या भागात आत गेल्यावर देवीचे मंदिर लागते. देऊळ लहानसेच आहे व ते डोंगराच्या भिंतीतच कोरलेले आहे. देवळाच्या समोरच कोळचा दगडाची फरसबंदी असून, तिथे शेंदूरचर्चित त्रिशूल उभा आहे. पायऱ्या चढून देवळात प्रवेश करताच महिषासुरमर्दिनी सप्तशृंगीची भव्य व उग्र मूर्ती दिसते. ती नैसर्गिक डोंगरी दगडात कोरलेली असून तिची उंची आठ फूट आहे. तिच्या सर्वांगाला शेंदूर फासलेला आहे. मस्तकावर जडाव काम केलेला उंच मुकुट आहे. प्रत्येक बाजूला नऊ नऊ असे एकंदर अठरा हात तिला आहेत व प्रत्येक हातात काही ना काही तरी आयुध आहे. रुद्राक्षांची माळ, कुऱ्हाड, गदा, बाण, वज्र, कमल, धनुष्य, जलयंत्र, दंड, शक्ती, तलवार, ढाल, शंख, घंटा, मद्यपात्र, शूल, पाश आणि चक्र अशी अठरा आयुधे तिने हातात घेतलेली आहेत. देवीची पूजा शिडी लावून करावी लागते. मूर्तीला रोज थंड पाण्याने स्नान घातले जाते. फक्त दर मंगळवारी व शुक्रवारी तिला गरम पाण्याने स्नान घातले जाते. देवीला अभिषेकाचा विधी झाल्यावर तिला नखशिखांत शेंदूर फासण्यात येतो. पापण्या व भुवया रंगाने कोरण्यात येतात, कपाळावर ठसठशीत कुंकू लावण्यात येते. नंतर कोरलेल्या देवीच्या अंगात चोळी व कटीला वस्त्र व डोक्यावर मुकुट चढविण्यात येतो.

नाकात चांदीची नथ व गळ्यात गळसरी हे तिचे रोजचे अलंकार होत. उत्सवाच्या प्रसंगी मात्र अनेक अलंकार तिच्यावर चढवितात. वस्त्र आणि अलंकार यांनी अशा प्रकारे सजविलेली देवी मंदस्मित करीत आहे असेच पहाणाऱ्या भक्ताला वाटते. देवीला रोज खीर आणि पुरीचा नैवेद्य दाखविला जातो. देवीच्या सभोवती समया तेवत असतात. वरती घंटा आणि झुंबरे टांगलेली आहेत. घंटा आणि झांजांच्या निनादात देवीची आरती रोज तीनदा होत असते.

सप्तशृंगीचे माहात्म्य फार जुने आहे. तिचा महिमा ज्यात वर्णिलेला आहे त्याला 'सप्तशृंग पाठावली' असे म्हणतात. सध्याचे देवीचे मंदिर श्री. विंचूरकरांनी बांधले व दुसऱ्या बाजीरावाने देवीच्या उत्पन्नासाठी चंडकपूर नावाचे गांव इनाम दिले. ज्या सौभाग्यवतींना अपत्यप्राप्ती नाही त्या या देवीजवळ नवस करतात व त्यांना मनोवांच्छित अपत्यप्राप्ती होते. आजारी माणसे रोगमुक्त होण्यासाठी देवीच्या दर्शनास येतात. देवी जागृत असून ती नवसाला पावते अशी भाविकांची गाढ श्रद्धा आहे.

देवीची यात्रा चैत्र पौर्णिमेपासून आठवडाभर व नवरात्रात आश्विनात दहा दिवस भरते. महाराष्ट्रातील अनेक कुटुंबांची ही देवी कुलदेवता आहे. विशेषत: वारली, कोळी व खानदेशातील शेतकरी या देवीचे मोठे भक्त असून त्यांचाच 

मेळावा यात्रेच्या वेळी दिसतो. नवस फेडण्यासाठीसुद्धा या प्रसंगी भाविक येतात व देवीच्या दर्शनाने कृतकृत्य होतात. चैत्री पौर्णिमेची देवीची यात्रा अर्ध्या लाखावर जाते.

या सप्तशृंगनिवासिनीच्या पठारावर पूर्वेच्या बाजूला काही अंतरावर समुद्र-सपाटीपासून ४,२८४ फूट उंचीचा मारकिंडा ऊर्फ मार्कंडेय नावाचा डोंगर आहे. येथे मार्कंडेय मुनी पवित्र अंतःकरणाने महालक्ष्मी सप्तशृंगीची मोठ्या भक्तिभावाने प्रार्थना करीत असतात अशी समजूत आहे. मारकिंडा डोंगराचे व सप्तशृंगीचे पठार एकाच पातळीत दिसत असले तरी मारकिंडा कमी उंचीचा आहे. मार्कंडे-यांनी येथे तपश्चर्या केली व भीमासुराला देवीने मारावे यासाठी येथे सप्तशृंगीचा पाठ म्हटला अशी पुराणकथा आहे. आजही मुनिमहाशय तो पाठ म्हणत असतात व तो देवी ऐकते असे मानले जाते. देवीने एक हात मानेशी धरला असून, ती काही तरी ऐकत उभे रहावे अशा थाटात आहे.

देवीचे माहात्म्य वर्णन करणारा जो ग्रंथ आहे त्याचे नाव 'सप्तशती' असे आहे. या ग्रंथात देवीचा पराक्रम वर्णिलेला असून मार्कंडेय ऋषीचे अस्तित्वही सांगितलेले आहे. ही देवी काली, महाकाली, भद्रकाली, कपालिनी, चामुंडा, दुर्गा, चंडिका इत्यादी नावांनी प्रसिद्ध आहे. 'सप्तशती'तील तिच्यासंबंधीची कथा थोडक्यात अशी :

सुरथ नावाचा राजा प्राचीन काळी होऊन गेला. तो मोठ्या नीतीने वागणारा व सदाचरणी राजा होता. या राजावर एकदा जबरदस्त संकट ओढवले. त्याच्या-वर परचक्र आले आणि अगदी याच वेळी त्याचे प्रधान शत्रूला सामील झाले. राजाचा अर्थातच पराभव झाला आणि त्याला परागंदा व्हावे लागले. परंतु अशाही परिस्थितीत त्याला आपल्या प्रधानांच्याबद्दल आदर आणि आपुलकी वाटत होती. दारुण परिस्थितीत तो हिंडत फिरत असताना त्याला समाधी नावाचा एक वैश्य भेटला. तो चांगला श्रीमंत होता, परंतु पैशाच्या अतिलोभामुळे बायका-मुलांनी त्याला घराबाहेर हाकलून दिले होते. तथापि असे असूनही समाधीला आपल्या बायको-मुलांबद्दल मोठे प्रेम वाटे. अशा प्रकारे समाधीला आणि सुरथ राजाला ते समदुःखी होऊन हिंडत असताना मार्कंडेय मुनी भेटले. त्या उभयतांनी आपली व्यथा, दुःख मुनिमहाशयांना कथन केले. मुनींनी त्यांना या पर्वतावरील सप्तशृंगी देवीची उपासना करण्याचा उपदेश केला. ती त्यांनी अनन्यभावे केली व ते संकटातून अल्प काळातच मुक्त झाले.

सुप्रसिद्ध संत श्रीएकनाथ यांच्या काळात होऊन गेलेल्या बालबोधकर्ते त्र्यंबकराज यांच्या ग्रंथात श्रीसप्तशृंगीचा उल्लेख आहे. त्र्यंबकराज हे देवीचे अनुष्ठान करण्यासाठी तुळजापूर येथील भवानी मंदिरात जाऊन बसले.

उपासनेच्या सोळाव्या रात्री देवीने त्र्यंबकराजांना दृष्टांत दिला. पाच वर्षांच्या मुलीचे रूप घेऊन ती आली व त्यांना म्हणाली, 'तू आता सप्तशृंगीस जाऊन उपासना करावीस हे चांगले.' तेव्हा त्र्यंबकराज सप्तशृंगीस आले व उपासना करू लागले. तिसऱ्या दिवशी सप्तशृंगी त्यांना प्रसन्न झाली व वर माग म्हणाली. त्र्यंबकराजांनी तिच्यापाशी ब्रह्मज्ञान मागितले. सप्तशृंगीने त्र्यंबकराजांच्या मस्तकाला स्पर्श करून शुभ आशीर्वाद दिला. तेवढ्यात भगवान शिवशंकर तिथे वृद्धाच्या रूपाने आले. त्यांनी त्र्यंबकराजांना पाच वचने सांगितली. त्यांचाच विस्तार पुढे त्र्यंबकराजांनी आपल्या बालबोध या ग्रंथात केलेला आहे. हा ग्रंथ शके १५०० च्या आसपास लिहिण्यात आला. त्र्यंबकराजांनी सप्तशृंगीच्या कृपेची ही हकिगत आपल्या बालबोध ग्रंथात विस्ताराने कथन केली आहे.

महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर यांच्या महानुभाव वाङमयातूनही सप्तशृंगीबद्दलचे उल्लेख आढळतात. कवि मुकुंद व अव्वल इंग्रजी जमान्यातील कवि संत श्रीनिरंजन रघुनाथ यांनीही देवीची स्तुतिपर गीते रचलेली असून तिला त्यातून आळविले आहे. महानुभाव वाङमयात सप्तशृंगी हा द्रोणागिरीचा एक भाग आहे, असे उल्लेखिलेले आहे.

इ.स. १७२० ते १७४० या काळात देवीची सेवा करण्यासाठी गौडस्वामी नामक एक बंगाली गृहस्थ येथे येऊन राहिले होते. त्यावेळी किती तरी सरदार त्यांचे शिष्य होते. त्यांचा छत्रसिंग नावाचा एक पट्टशिष्य होता. डांगमधल्या मेहवासी टोळ्या येथे येणाऱ्या यात्रेकरूंना लुटत असत. त्यांचे पारिपत्य करण्याकरिता म्हणून पेशव्यांनी छत्रसिंगाच्या वाडवडिलांकडे ही कामगिरी सोपविली होती. वेतन म्हणून त्यांना बावीस गावचे उत्पन्न दिले होते. पण का कुणास ठाऊक छत्रसिंग बिथरला व तोच टोळीकरांचा पुढारी बनला. १७८५ मध्ये त्याने अनेक यात्रेकरूंना लुबाडले व देवीची दौलतसुद्धा लांबविली. हिंमतराव नाईक नावाचे सरदार त्याचे पारिपत्य करण्यासाठी गेले असता शिवालय तीर्थाजवळ ते जखमी झाले. शेवटी देवीच्या रक्षकांनी छत्रसिंगाबरोबर तह केला व ४६ मंगळवार, १२ पौर्णिमा, नवरात्राचे नऊ दिवस व चैत्र एकादशी ते पौर्णिमा हे पाच दिवस असे मिळून ७२ दिवस देवीच्या पुढ्यात जे उत्पन्न येईल त्यातले निम्मे छत्रसिंगास देण्याचे ठरविले. पुढे छत्रसिंगाचा मुलगा देवीसिंह हा निपुत्रिक मरण पावला आणि तो हिस्सा आपोआप थांबला. याही पूर्वी शके १५३२ म्हणजे इ.स. १६१० मध्ये देवीच्या उत्पन्नाबद्दल त्या वेळचे पुजारी गोपाळ भट व भोपे गुरव यांच्यामध्ये जोरदार भांडण झाले होते असा दाखला सापडतो.





लेखिका : **श्रीमती कमलाबाई जोशी**

नाशिक जिल्ह्यात नांदुरी या गावापासून या ठिकाणी पायाची वाट आहे. वणी या गावातूनही आणखी एक रस्ता आहे. पण दोहोतून सोपा असा हा नांदुरीकडचा रस्ता आहे.

या भागात वारली जातीच्या आदिवासी लोकांची वस्ती आहे. लोक जंगली असले तरी सात्त्विक वाटतात, क्रूर नाहीत.

मुख्य म्हणजे सप्तशृंगी मातेचे स्थान विंध्य पर्वतात आहे. हिलाच विंध्याचल-वासिनी म्हणतात. सात डोंगर चढून गेल्यावर साडेसातशे पायऱ्या चढल्यानंतर या देवीचे दर्शन होते. सात डोंगर चढल्यानंतर दोन फर्लांगावर एक मोठे तळे आहे. त्या तळयावर आंघोळ करून मग देवीच्या दर्शनाला जायचे असा रिवाज आहे.

तळी दोन आहेत. एक पिण्याच्या पाण्याचे व एक आंघोळीचे मोठे तळे आहे. हे सात डोंगर चढून गेल्यानंतर एका बाजूस पठार आहे तिथेच ही तळी आहेत. या ठिकाणी शेदीडशे मनुष्यवस्ती आहे. त्यात पाच-सहा घरे ब्राह्मणांची आहेत. यात्रेकरूंची सर्व व्यवस्था इतर क्षेत्रांप्रमाणे या ठिकाणी हे लोक करतात. पण एकंदर या लोकांचे जीवन फार कष्टाचे असे आहे. पाणी आणावयाचे ते दोन फर्लांगावरून, रेशन किंवा बाजार आणावयाचा तो सात डोंगर उतरून, डोंगरा-तून उतरण्यास बऱ्याच वर्षांपूर्वी कोणी तरी रस्ता केलेला आहे. याबाबत देवी अहिल्याबाईचेच नाव सांगितले जाते. पण दरवर्षीच्या पावसाने जी रस्त्याची नासधूस होते ती दुरुस्ती न केल्याने दिवसेंदिवस रस्त्याची अगदी नासाडी होत आहे. त्यामुळे काही ठिकाणी अगदी जपून चढावे लागते. काही ठिकाणी चढही बराच आहे. विंध्याद्री पर्वतच आहे तो ! पण त्यातसुद्धा जाताना दोन तीन पाण्याचे ओहोळ लागतात. आश्विनी पौर्णिमेला जत्रेला गेल्यास सर्व वनस्पती हिरव्यागार

दिसतात. अनेक तऱ्हेची रंगीबेरंगी फुले आपले मन वेधून घेतात. अनेक तऱ्हेच्या औषधी वनस्पती तेथे निर्माण होतात. आपल्याला लागणारी सालंमिसरी आणि सफेद मिसरी तेथे भरपूर प्रमाणात मिळते. हे सात डोंगर चढायला साधारण दोन तास लागतात. तुम्ही नांदुरीला उतरलात की तुमच्याभोवती २५-३० बायका-मुले गोळा होतील. तुम्ही ज्याला सांगाल ते तुमचे सामान हे लोक विश्वासाने तुमच्या आधी जाऊन वर नेऊन ठेवतील. तिथे रहाणारे लोक तुमची सगळी व्यवस्था करतील.

तळ्यावर आंघोळ करून चहा घेऊन तुम्ही देवीचे दर्शनाला जाऊन येईतोपर्यंत जेवण तयार असेल.

या ठिकाणी मैराळ नावाचा बडोद्याचा कोणी सावकार देवीभक्त होता. त्याने आपल्याला उठल्याबरोबर देवीचे दर्शन व्हावे म्हणून पाच मजली इमारत बांधली होती. आता त्याचे फक्त अवशेष शिल्लक आहेत.

या देवस्थानाचे वर्षाचे उत्पन्न २५,००० रुपयांचे आहे. मूळ पुजारी जहागीरदार आडनावाचे आहेत. देवस्थानाची काहीही व्यवस्था न करता ते नुसतेच उत्पन्न घेत असत. मध्यंतरी अनेक वर्षे या देवीची रोजची पूजासुद्धा होत नव्हती. या ठिकाणी गायत्रीबाबा म्हणून एक सत्पुरुष आले आणि त्यांनी जगदंबेची पूजाअर्चा करावयास सुरुवात केली.

मूळ पुरुषाच्या वागणुकीने आणि इतरांच्या हक्कासंबंधीच्या भांडणामुळे सरकारी हस्तक्षेप झाला आहे. या देवीची सर्व व्यवस्था सरकारकडून होते. त्यासाठी सरकारी मनुष्यही नेमला आहे. तरी पूजेची व्यवस्था गायत्रीबाबांचे वंशज नानासाहेब आणि बाळासाहेब देशमुख यांचेकडेच आहे.

सुरुवातीच्या पायरीजवळ एक दगडी दिवा आहे. तिथे एका गोएंका नामक बाईंनी मेघडंबरी बांधली आहे. त्याच्या डाव्या बाजूला देवीला नवरात्रात रेडा बळी देत असत ती जागा आहे.

पायऱ्या चढायला सुरुवात करताना, येथे साडसातशे पायऱ्या आहेत म्हणून, घाबरून जाण्याचे कारण नाही. आधी आपण सात डोंगर चढून आलो आहोत आणि पायऱ्या चतुःशृंगीपेक्षाही लहान लहान आहेत. उजव्या बाजूस प्रथम गणराज बसलेले आहेत. त्यांना सुवर्णहरळी वाहून नमस्कार करतात. वर जाईपर्यंत राम, लक्ष्मण, सीता व मारुती यांचे दर्शन घडते. राधा-कृष्णाचेही दर्शन घडते. शेवटी देवीच्या मंदिराच्या अगदी अलीकडेच पुन्हा एकदा गणराज दर्शन देतात आणि आठ दहा पायऱ्या चढण गेली की आपल्याला त्या महिषासुर-मर्दिनीचे दर्शन घडते. १५-१८ फूट उंच आणि १०-१२ फूट रुंद आणि १८ हात असलेल्या या भव्य तेजस्वी मूर्तीचे दर्शन झाले की सगळा शीणभाग नाहीसा

होतो. पाठीमागे वळून पाहिले म्हणजे देवीच्या समोर त्रिशूल उभा केलेला आहे तो दिसतो, समोरच्या डोंगराकडे नजर टाकली तर एक खूप मोठे गोल असे भोक दिसते. असे सांगतात की, महिषासुराने तेथून पळून जाण्याचा प्रयत्न केला होता! या स्थानाचे माहात्म्य असे सांगतात :

महिषासुर नावाचा एक राक्षस अतिशय माजला होता. त्याने त्रैलोक्याला गांजले होते. सर्व देवसुद्धा त्याच्यापुढे हतबल झाले होते. त्यावेळी आदिमायेने भीमरूप धारण करून त्याचा वध केला. अनेक दिवस हे युद्ध चालले होते आणि जगदंबेच्या अचाट पराक्रमाने त्याचा वध होऊन त्रैलोक्यात शांतता निर्माण झाली.

महिषासुराच्या वधाचे वेळी देवीला अतिशय क्रोध आला होता. अत्यंत रागावलेली देवी विश्रांतीसाठी या ठिकाणी येऊन बसली. तेव्हा अठरा पुराणे लिहिणारे आणि येथूनच सात-आठ मैलांवर एका गुहेत असणारे मार्कंडेय ऋषी यांनी तिची स्तुती केली. नंतर देवी प्रसन्न झाली, वरदायिनी झाली. पृथ्वीपासून आकाशापर्यंत भीमरूप धारण करणारी, अठराही हातांत अनेक शस्त्रास्त्रे धारण करणारी व अन्यायाची, अधर्माची चीड येऊन दुष्टांचा निःपात करण्यासाठी उग्र रूप धारण केलेली जगदंबामाता जर आमची पाठीराखी असेल तर कुठल्याही परिस्थितीत आम्हाला भिण्याचे कारण नाही असे ते म्हणाले.

एकंदर शेंदूरचर्चित अशा त्या मूर्तीचे दर्शन फारच मनोहारी आहे. मोठ्याशा वाटीएवढे डोळे आहेत, तिला खणांची चोळी लागते, नऊ वारी लुगडे आवडते. काही वेळेला ती तुमच्याकडे प्रेमळ आणि हसतमुखाने पहाते आहे असे वाटेल, तर कधी दमलेली दिसेल, क्वचित ही कधी उग्र वाटेल, तर एखादे वेळी अगदी लहान मुलीसारखे भाव तिच्या मुखावर दिसतील. कधीकधी ती प्रौढही वाटेल, पण तिच्या दर्शनात जिवंतपणा खास आहे. देवीच्या प्रदक्षिणेची वाट डोंगरातून पाच-सहा मैलांची आहे. प्रदक्षिणेच्या वेळी कोणी प्रत्येक पायरीवर कापूर लावीत जाताना दिसतील, तर कोणी अंगात येणाऱ्या बायकांच्या बरोबर ढोलक घेऊन गाणी म्हणत येतील. जत्रेच्या वेळी येथे काही लोक त्र्यंबकेश्वरला जाऊन पंचगंगेचे पाणी घेऊन, तर कोणी नाशिकला रामकुंडाचे पण पाणी घेऊन येतील. अशा पवित्र पाण्याच्या कावडी खांद्यावर घेऊन अनवाणी पायी प्रवास करून ते आश्विनी पौर्णिमेला जगदंबेच्या स्नानासाठी म्हणून येथे येतात.

या कावडीत मध्ये एक रंगवलेली काठी, त्याच्या दोन बाजूंला दोन शिकाळी व त्यात दोन तांब्याचे तांबे असतात. तांब्यांना हळदकुंकू लावलेले असते आणि शिकाळ्याच्या दोऱ्या फुलांनी सुशोभित केलेल्या असतात. ही कावड तीन-तीन दिवस प्रवास केला तरी खाली ठेवायची नसते. ठेवायची झाल्यास ती झाडाला

टांगून ठेवतात आणि तोंडाने जगदंबा माता की जय, सप्तशृंगीनिवासिनी की जय असा जयघोष करतात. तसेच—

**जगदंबावाणी वदो जगदंबा कानी पडो**
**पायी तीर्थयात्रा घडो देह गडावरी पडो**

अशा तऱ्हेची अनेक स्तुतिस्तोत्रेही गायिली जातात. या देवीच्या मंदिराचा गाभारा ३०-४० माणसे बसण्याइतकाच आहे. आणि बाहेरची जागा फक्त ७०-७५ माणसे बसण्याइतकीच आहे. देवीच्या मंदिराच्या वर ४००-४५० फूट उंच पर्वतशिखर आहे. कडा अगदी सुळक्यासारखा सरळ आहे. या ठिकाणी एक भगवा ध्वज दिसेल आणि वाटेल हा कोणी वर लावला असेल! हा मात्र एक चमत्कार आहे. या गडाजवळ रामवाडी म्हणून एक गाव आहे, या गावात एक गवळी आहे. चैत्री पौर्णिमेच्या आदले दिवशी हा मनुष्य गडावर येतो, याची रात्री १२ वाजता ओटी भरतात, त्यावेळी त्याचा पोषाख म्हणजे पिवळ्या काठाचे पांढरे चोळी पातळ असा असतो. ओटी भरली की, हा मनुष्य हातात निशाण घेऊन वर चढू लागतो. फक्त चार-पाच पावले जातानाच तो दिसतो आणि पुढे दिसत नाही. पण जगदंबेचा जयजयकार तो सारखा करीत रहातो तेवढाच ऐकू येतो. दुसऱ्या दिवशी सकाळी पहावे तो शिखरावर निशाण लागलेले आणि हा मनुष्य खाली. असे म्हणतात की ही शक्ती त्या घराण्यात फक्त एकाच माणसाला असते. तो मनुष्य वृद्ध झाला म्हणजे तो आपला अधिकार दुसऱ्याला विधिपूर्वक देतो अशी परंपरा चालू आहे.

मच्छींद्रनाथांनी भगवतीला प्रसन्न करून घेऊन अनेक दैवतांकडून ज्या शक्ती प्राप्त करून घेतल्या त्या इथेच. भगवान शंकराचार्य पण येथे येऊन गेले आहेत. प्रभु रामचंद्राचे पाय येथे लागल्याच्या अनेक खुणा आहेत. पुराणकालापासून असलेली ही शक्तिदात्री भगवती आहे.





# सप्तशृंग देवी



लेखक : **श्री. नि. छो. लोहार**

नाशिक जिल्ह्यात कळवण तालुक्यात सप्तशृंग जगदंबा देवीचे एक सुप्रसिद्ध स्थान आहे. सदर देवीच्या दर्शनाकरिता दरवर्षी चैत्र पौर्णिमेला मुंबई, बडोदा, पुणे, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, इंदूर, अहमदाबाद, नगर, नागपूर आणि खानदेश या भागांतून लक्षावधी लोक येतात. हे एक पूर्वीपासूनचे महाराष्ट्रातील मोठे तीर्थक्षेत्र आहे.

याच सप्तशृंगीच्या दर्शनाकरिता नवनाथदेखील आले होते व त्यांना सुप्रसिद्ध साबरी विद्या याच देवीकडून मिळाली असे नवनाथ ग्रंथात दर्शविले आहे.

देवीचे देऊळ पर्वतावर असून तो पर्वत सह्याद्रीचा एक फाटा आहे. पर्वतीच्या पायथ्यापासून देवीचे देऊळ सुमारे तीन ते चार मैल उंचीवर आहे. सदर ठिकाणी परमेश्वराने संपूर्ण कलाकौशल्य ओतून सृष्टिसौंदर्यात भर टाकली आहे. उन्हाळ्यात त्या ठिकाणी जंगलचा मेवा (करवंदे, उंबरे, टेंभरे, आवळे) खाण्यास मिळतो. सदर पर्वतावर औषधी वनस्पतीही फार आहेत. त्यामुळे वैद्य लोक ही वनस्पती मिळविण्यास येथे येतात.

तेथे अनेक हेमाडपंती देवळे आहेत. तळी आहेत. गवळी, कोकणी व ब्राह्मणांची घरे आहेत. अशा या सर्व सोयींनी संपन्न असलेल्या क्षेत्रास दर मंगळवारी, शुक्रवारी, पौर्णिमेला, अमावास्येला, नवरात्रात, दसऱ्याला भाविकांची गर्दी असते. पण सर्वांत मोठी यात्रा चैत्र पौर्णिमा या दिवशी भरते. लाखो लोक या देवीच्या यात्रेला येतात. वाटेल त्या दगडाच्या आड, वाटेल त्या कुरपुडाखाली, वाटेल त्या झाडाखाली असे ते झोपतात. पण देवीचे इतके सत्त्व की कोणत्याच माणसाला कधीही काहीच धोका होत नाही. यात्रेत लोक देवीसाठी होम हवन व अभिषेक करतात. नवसी लोक नवस फेडतात. देवीचा नवस पाळणा वाहणे, प्रत्येक पायरीला नारळ फोडणे, प्रत्येक पायरीला कापूर लावणे, प्रत्येक पायरीला वात

लावणे, निम नेसणे, खोडाबेडी घालणे, बोकड मारणे, कोंबडा सोडणे असा असतो. त्यातला निम नेसवणे हा नवस जास्त प्रमाणात असतो.

**निम नेसवणे**

नवस करणारा माणूस देवीजवळच्या तळ्यात आंघोळ करतो. त्याच्या कमरेला ओले वस्त्र असते. त्या ओल्या वस्त्रावरच कमरेला निरगुडीच्या पाल्याचे डहाळे बांधतात. डोक्यावर निरगुडीच्या पाल्याचा टोप घालतात व एका हातात नैवेद्याचे ताट व दुसऱ्या हातात पूजेचे ताट असते. पुढे डफ व संबळवाले वाद्य वाजवून गाणे म्हणतात व हा निम नेसलेला माणूस नाचत चालतो. डफवाले व संबळवाले गाणी म्हणतात. त्यांच्या मागून देवीचे भक्तगणही ही गाणी म्हणतात.



# हुणाची व्हरी देवी

लेखक : **डॉ. दामोदर जोशी**

बेळगाव शहरापासून उत्तरेस सहा मैलांवर काकती म्हणून एक ५,००० लोक-वस्तीचे खेडे आहे. काकती गावच्या पूर्वेकडे रस्त्यालगत सह्याद्री डोंगराचा एक लहान फाटा आहे. या डोंगराच्या दक्षिण दिशेस एका लहान डोंगरातून गाडीचा रस्ता गेला आहे. हा डोंगर साधारणतः तीन मैल वर चढून गेल्यावर त्याच्या मध्यभागी थोडा सपाट भूभाग लागतो. त्या सपाट जमिनीवर एक छोटेसे व्याघ्राधिष्ठित देवीचे देऊळ लागते. ही देवी म्हणजे महिषासुरमर्दिनी देवी होय. काकती भागातील कानडी लोक या देवीला हुणची व्हरी देवी असे म्हणतात. या जंगलात जिकडे तिकडे चिंचेचीच झाडे वैपुल्याने आहेत. कानडीत चिंचेला हुणची म्हणतात आणि पुष्कळ चिंचेच्या झाडांच्या समूहाला हुणची व्हरी असे म्हणतात. या घनदाट चिंचवृक्षांच्या समूहात या महिषासुरमर्दिनी देवीचे देऊळ आहे. म्हणून या देवीला कर्नाटकात हुणची व्हरी देवी म्हणतात. या देवीची दरवर्षी उन्हाळ्यात चैत्र मासात जत्रा भरते. त्या जत्रेला कानडीत 'हुणची व्हरी जात्री' म्हणतात. मराठीत याच जत्रेला 'हुणची व्हरी देवीची जत्रा' असे म्हणतात.

या देवीच्या देवळासमोर विस्तीर्ण व खूप लांब रुंद असा एक तलाव आहे. तलावाचे पाणी स्वच्छ, गोड व थंड असून या अमृततुल्य पाण्याच्या प्राशनाने जत्रेस आलेल्या हजारो यात्रिकांचे श्रम परिहार होऊन मन संतुष्ट होते. याच तलावात भाविक यात्रेकरू स्नान करून ताजेतवाने होतात. या तलावाच्या पली-कडे पूर्व दिशेस श्रीशंकराचे एक पुरातन देवालय आहे. यात्रेच्या दिवशी येथे २५–३० लहानमोठी दुकाने नारळ, कापूर, खडीसाखर, उदबत्ती, हळद, कुंकू, खण, चुरमुरे, फुटाणे, भेंडबतासे, मेवामिठाई, केळी, लहान मुलांची खेळणी वगैरे विविध सामान मिळणारी दुकाने थाटलेली आढळून येतात. जत्रा सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत चालू असते. या जत्रेस बेळगाव, शहापूर, अनगोळ, फणबरगी,

काकती, होनगे वगैरे सुमारे दहा मैल परिसरातील सुमारे १०,००० पर्यंत भाविक भक्त जमतात. देवीस हळद, कुंकू वाहून तिची खणानारळांनी ओटी भरणाऱ्या बायकांची गर्दी मोठी प्रेक्षणीय असते.

या महिषासुरमर्दिनी देवीच्या समोर जत्रेच्या दिवशी खणानारळांचा अक्षरशः खच पडलेला असतो. देवीच्या गळयात गुलाबपुष्पांच्या माळा शोभून दिसतात. देवीच्या अंगावर हळद-कुंकवाचा सडा पडलेला असतो. त्या उग्रमंग देवीच्या रौद्र स्वरूपाकडे पाहून आपणांस कळिकाळाची मुळीच भीती वाटत नाही. ही देवी आपले व आपल्या भारताचे संरक्षण करण्यास पूर्ण समर्थ आहे अशी आत्म-विश्वासाची भावना त्या शस्त्रधारी अष्टभुजा देवीच्या दर्शनाने सर्व यात्रेकरूत उत्पन्न झाल्यास नवल नाही.





कवळ्याची

# श्रीशांतादुर्गा



लेखक : **श्री. सदानंद चेंदवणकर**

गोवा हे महाराष्ट्राचे नंदनवन किंवा दक्षिणेचे काश्मीर म्हणून ओळखले जाते. गोमंतकाचे सृष्टिसौंदर्य पुरातन कालापासून प्रसिद्ध असून, भारतदर्शन करण्यास निघणाऱ्या प्रवाशाला या भूमीविषयी नेहमीच आकर्षण वाटत असते. या भूमीत देवादिकांची अनेक प्रेक्षणीय आणि जागृत अशी देवस्थाने आहेत. माशेल, मंगेशी, म्हाळसा, वेर्लिंग, नागेश, महालक्ष्मी, रामनाथ, शांतादुर्गा, कामाक्षी व सप्त-कोटीश्वर ही विख्यात मंदिरे म्हणून ओळखली जातात. आर्थिक परिस्थिती व मानसन्मान या दृष्टीने गोव्यातील सर्व देवस्थानांत श्रीमंगेश देवस्थानचा क्रमांक पहिला असून, दुसरा क्रमांक श्रीशांतादुर्गा संस्थानचा व तिसरा श्रीरामनाथ देवस्थानाचा आहे, असे मानण्यात येते. गोमंतकात गेलेला प्रत्येक भारतीय भाविक निदान या तीन देवस्थानांचे दर्शन घेतल्याशिवाय रहात नाही.

श्रीशांतादुर्गादेवीची जन्मकथा मोठी रंजक आहे. स्कंद पुराणातील अंबिका खंडात ती देण्यात आलेली आहे. ती थोडक्यात अशी :

एकदा शंकर आणि विष्णू एकमेकांवर भयंकर रागावले. मनस्वी चिडले. इतके की, त्यांनी आपापली शस्त्रे रागाच्या भरात एकमेकांवर सोडली. भगवान विष्णूने शंकरावर सुदर्शन चक्र सोडले तर शंकराने पाशुपत नावाचे अस्त्र सोडले. दोन्ही अस्त्रे मोठी भयंकर होती. उभयतांच्या चाललेल्या युद्धात कुणी कुणाला हार म्हणून जाईना. त्यांच्या या भांडणामुळे पृथ्वीवर प्रलयकाळ होईल की काय अशी भीती उत्पन्न झाली. सुदर्शन-पाशुपताच्या भयंकर धुमश्चक्रीत आगीचा डोंब भूतलावर उसळला आणि जग पेटू लागले. आपण निर्माण केलेले जग दोन महान योद्धयांच्या हट्टापायी आता जळून खाक होणार असे दिसताच बिचारा ब्रह्मदेव घाबरला आणि त्याने आदिमाया शक्तिदेवता जगदंबेची आराधना केली. तेव्हा ती प्रसन्न झाली आणि ब्रह्मदेवासमोर उभी राहिली. ब्रह्मदेवाने

लागलीच विष्णूकडे व शंकराकडे बोट दाखविले व ते म्हणाले, 'देवते, पाहा हे दोघे कसे हमरीतुमरीवर येऊन भांडताहेत. त्यांना आता आवर.' आदिमाया लगेच त्या भांडखोरांच्या मधोमध येऊन उभी राहिली आणि एका हाताने तिने विष्णूला आणि दुसऱ्या हाताने शंकरास पकडले. त्या दोघांची तिने चांगलीच कानउघाडणी केली. जगन्मातेचा हस्तस्पर्श होताच दोन्ही देव भानावर आले. त्यांना समज आली. आपली चूक कळून आली व त्यांनी आपापली शस्त्रे परत घेतली. आपण दोघे श्रेष्ठ देव असून भांडत आहोत आणि ते इतक्या क्रूरपणाने याबद्दल त्यांना लाज वाटली व ते जगदंबेला म्हणाले, 'हे दुर्गे, भयंकर संतापाने आम्हाला ग्रासले आणि त्यामुळेच आमच्यात अशी भांडणे झाली. तू अगदी वेळेवर आलीस, नाही तर या भांडणाचे परिणाम आणि हत्यारफेकीत घात-आघात किती भयंकर झाले असते याची कल्पनाच करवत नाही. संतप्त झालेल्या आम्हाला तू शांत केलेस म्हणून आजपासून लोक तुला "शांतादुर्गा" असे म्हणू लागतील.' तेव्हापासून आदिमाया शक्तिदेवता 'शांतादुर्गा' या नावाने ओळखली जाऊ लागली. विष्णू आणि शंकर शांत झाल्यामुळे साऱ्या जगाने सुटकेचा निःश्वास टाकला.



श्रीशांतादुर्गा

श्रीशांतादुर्गा गोमंतकातील कौशिक गोत्रीय गौड सारस्वत ब्राह्मणांचे कुलदैवत आहे. त्याचप्रमाणे सारस्वतापैकी कौंडिण्य, भारद्वाज, वत्स गोत्रांची घराणी, साताऱ्याकडील काही देशस्थ ब्राह्मण आणि गोव्यातील व कर्नाटकातील काही ब्राह्मणेतर शांतादुर्गेला आपली कुलदेवता समजतात.

श्रीशांतादुर्गेचे मूळ स्थान सासष्ट प्रांतातील कर्दलीपूर ऊर्फ केळोशी हे गाव होते. केळोशी येथे देवीचे छोटेसेच प्राचीन पद्धतीचे, पण रम्य असे देऊळ होते. परंतु कालांतराने ते मोडकळीस आले त्यामुळे अनू शेणवी नामक एका धनाढ्य व्यापारी भक्ताने या देवळाचा जीर्णोद्धार केला. हा अनू शेणवी मोठा धर्माभिमानी होता. त्याने तत्कालीन गोमंतकात बाटवून ख्रिश्चन झालेल्या लोकांना, त्यांचे शुद्धिकरण करून, हिंदु धर्मात आणले होते. तत्कालीन राजवटीला ही गोष्ट पसंत पडली नाही. आणि म्हणूनच की काय पोर्तुगीज सरकारने त्याला शिक्षा दिली असा उल्लेख सापडतो.

इ.स. १५४१ पासून गोव्यात सर्वत्र अंदाधुंदी चालू होती. पोर्तुगीज पाद्री जुलुमाने हिंदूंना ख्रिश्चन करीत होते. त्यांनी जर न ऐकले तर ते त्यांच्यावर अत्याचार करीत, त्यांचा अनन्वित छळ करीत असत. या पोर्तुगिजांनीच हिंदु देवदेवतांवर—त्यांच्या मूर्तींवर—मंदिरावर धाड घालण्यास, त्यांचा विध्वंस करण्यास कमी केले नाही. अशा प्रकारे बाटवाबाटवीचे, मोडतोडीचे, जाळपोळीचे व हिंदूंच्या छळाचे प्रकार गोव्यात चालू होते.

इ.स. १५६४ मध्ये जेव्हा सासष्टी भागावर धाड आली तेव्हा मात्र तेथल्या हिंदूंचे धाबे दणाणले आणि आपल्याला जे काही नेण्यासारखे होते तेवढे घेऊन ते जिवानिशी वाट मिळेल तिकडे पळू लागले. इतर देवळांवर जशी ख्रिस्त्यांनी धाड घातली तशी या शांतादुर्गेच्या मंदिरावरही त्यांची धाड आली आणि इ.स. १५६६ मध्ये ते जाळण्यात आले. परंतु मोठ्या भाग्याची गोष्ट की, तेथील महाजन मंडळींनी श्रीशांतादुर्गेची मूर्ती अगोदरच पळवून ती सौंधेकरच्या अंत्रुज (फोंडा) प्रांतात नेली. गोमंतकाचा हा केंद्र भाग फोंडा महाल त्यावेळी राजे सौंधेकर यांच्या ताब्यात होता. सौंधेकर हे कर्नाटकातील शिरली सौंध्याचे लिंगायत राजे. या सौंधेकरांच्या राज्यात केळशीनिवासी महाजन मंडळींनी फोंड्यापासून मैल सव्वा मैल अंतरावर असलेल्या कैवल्यपूर गावात देवी आणली आणि त्या गावच्या महारवाड्यात देवीच्या मंदिरासाठी जागा निवडली. तिथे रहाणाऱ्या महारांनी मोठ्या आनंदाने आपली वस्ती हलवून देवीच्या मंदिरासाठी जागा करवून दिली, आणि मग देवीचे देऊळ तिथे उभारण्यात आले. देवीच्या मूर्तीची स्थापना करण्यापूर्वी महारवाड्यातील महारांनी एक अट घातली की,

 'वर्षातून एकदा आम्हांला हक्काने मंदिरात जाऊन देवीचे दर्शन घेता आले

पाहिजे.' ही त्यांची मोठी प्रेमाची आणि भक्तीच्या भावनेची अट केळशीकर महाजनांनी तावडतोब मान्य केली व त्या जागेवर श्रीशांतादुर्गेचे एक छोटेसे मंदिर बांधून त्यात इ.स. १५६७ मध्ये मूर्तीची स्थापना केली गेली. तेव्हापासून तो आजपर्यंत वर्षातून एकदा माघ शुद्ध षष्ठीच्या दिवशी सायंकाळी अस्पृश्य लोक श्रीशांतादुर्गेच्या मंदिरात प्रवेश करून आपली पंचवाद्ये वाजवितात व देवीचे दर्शन घेतात. त्यावेळी त्यांना तांदूळ, नारळ, विडयावर काही पैसे व देवीचे एक लुगडे देऊन त्यांचा मानसन्मान केला जातो. माघ मासातील जत्रेची समाप्ती याच हरिजन प्रवेशाने होत असते. दक्षिण भारतातील काही मंदिरांतूनही वर्षातून एकदा हरिजनांना प्रवेश देण्याची प्रथा आढळते. अनार्यांची मने राखण्यासाठी आर्यांनी ज्या काही युक्त्या योजल्या त्यांपैकीच ही एक होय. असे इतिहासतज्ज्ञ या बाबतीत सांगतात.

केळशीकर महाजनांनी कैवल्यपूर ऊर्फ कवळे येथे इ.स. १५६४ ते १५६७ च्या दरम्यान शांतादुर्गेचे अगदी लहानसेच देऊळ बांधले आणि रोज देवीची पूजा-अर्चा, नैवेद्य, आरती इत्यादी उपचार चालू केले. केळशीहून आलेले काही लोक देवीच्या देवळासभोवताली राहू लागले तर काही उदरनिर्वाहासाठी म्हणून भारतभर पांगले गेले.

या पांगल्या गेलेल्या मंडळींतच नारोराम शेणवी रेगे या नावाचे एक भाविक गृहस्थ होते. ते देवीची पूजाअर्चा नित्य नियमाने करीत असत. आपल्या परि-स्थितीत बदल व्हावा, आपणाला बरे दिवस यावेत अशीच इच्छा त्यांच्या या पूजेमागे होती. परंतु आपली इच्छा फळाला येत नाही म्हणून कंटाळून जाऊन त्यांनी आत्महत्या करण्याचे ठरविले व ती करण्याच्या आदल्या दिवशी ते देवीच्या देवळात कीर्तनास येऊन बसले. त्यातच त्यांना डुलकी लागली. तीत देवीने त्यांना दृष्टांत दिला आणि आत्महत्येपासून निवृत्त होण्याची आज्ञा केली. 'यापुढे तुला चांगले दिवस येतील. तू जिथे जाशील तिथे तुझा विजय होत जाईल. तू फक्त देशाटन कर' असे बजावून सांगितले. लागलीच नारोजींना जाग आली. त्यांनी आत्महत्येचा विचार सोडून दिला आणि देवीच्या सांगण्या-प्रमाणे देशाटन करण्याचे ठरविले. महाराष्ट्रात त्यावेळी हिंदुपतपादशाहीच्या दोन गाद्या होत्या. एक कोल्हापूर आणि दुसरी सातारा. सातान्याच्या गादीवर त्यावेळी श्रीछत्रपती शाहूमहाराज होते. त्यांच्या आश्रयास नारोजी येऊन राहिले. शाहू छत्रपतींचा त्यांनी विश्वास संपादन केला आणि आपल्या अंगच्या गुणांनी आणि वर्तनाने प्रधानमंडळात त्यांचा समावेश होऊन पुढे ते मंत्री पण बनले. देवींनी त्यांना दिलेला आशीर्वाद हा असा खरा ठरला. याच नारोराम शेणवी रेगे यांनी इ.स. १७०८ ते १७३८ दरम्यान हल्लीचे श्रीशांतादुर्गेचे भव्य देऊळ

बांधले आहे. इ.स. १७२९ मध्ये श्रीमंत बाजीराव पेशवे यांचेकडून कवळे गाव देवीस इनाम देवविला आणि पुन्हा या देवीची पूजाअर्चा मूळच्या इतमामाने होऊ लागली. याशिवाय अनेकांनी शक्यतेनुसार देणग्या दिल्या. सध्या या देवळाचे वार्षिक उत्पन्न २० ते २२ हजार रुपये असून १५ ते १६ हजार रुपये खर्चही होत असतो. इ.स. १८९८ मध्ये या देवळावर पठाणांचा दरोडा पडला होता आणि देवीचे अलंकार, रोकड मिळून लाखाचा माल लांबविला गेला. या दरोडेखोरांना पकडण्यासाठी पोर्तुगीज सरकारचे शिपाई बँड वाजवीत वाजवीत गोवा सरहद्दीपर्यंत गेले होते. परंतु त्यात त्यांना मुळीच यश आले नाही.

आज मुंबईहून गोव्याला आगबोट, रेल्वे व विमान या मार्गांनी जाता-येता येते. मुंबईहून निघालेली आगबोट रत्नागिरी, मालवण, वेंगुर्ले ही बंदरे घेऊन गोव्याला जाते. या प्रवासाला सुमारे २० तास लागतात. आगगाडीने पुण्याहून सदर्न मराठा रेल्वेने मिरज-बेळगाववरून पुढे लोंढा जंक्शनवर उतरून दुसऱ्या गाडीने गोव्यातल्या मुरगाव बंदरापर्यंत जाता येते. या प्रवासालाही २० ते २२ तास लागतात. मुंबई ते त्रावणकोर विमान वाहतुकीचे विमान गोव्याला काही वेळ थांबते, या विमानातून मुंबईहून गोव्यास १ तास ८० मिनिटांत जाता येते. अलीकडे गोवा स्वतंत्र झाल्यापासून मुंबई ते गोवा एस.टी. सर्व्हिस पण चालू झाली आहे. गोव्यातील फोंडे महालात फोंड्यापासून मैल सव्वा मैल अंतरावर श्रीशांतादुर्गा देवस्थान आहे. फोंड्याहून तिथे जाण्याकरिता मोटारी, बसेस यांची सोय आहे. फोंड्याचे कपिलेश्वराचे मंदिर सोडले की, दोन खांब लागतात. तेथून डाव्या बाजूला वळले की, शांतादुर्गेचे मंदिर दिसते. समोरच रस्ता रामनाथीला जातो. आणि देवळासमोरचा रस्ता नागेशीला जातो. जवळच्या परिसरात नागेश, महालक्ष्मी, रामनाथ व शांतादुर्गा ही चार मंदिरे जवळजवळ आहेत. त्यामुळे धडधाकट माणसाला दोन चार तासात पायीसुद्धा ही मंदिरे अगदी सहज पहाता येतात.

श्रीशांतादुर्गेचे मंदिर छोटयाशा उंचवटयावर आहे. त्यामुळे काहीशी चढण चढावी लागते. ती चढण चढून झाली की, देवळाचे आवार लागते. दाराजवळ तलाव, प्रवेशद्वारावर नगारखाना, प्रशस्त आवार, मंदिरासमोरील खांब ऊर्फ दीपस्तंभ, मंदिराच्या सभागृहात हंड्या, झुंबरे इत्यादी सर्व त्या गोष्टी, वस्तू, जिनसा गोमंतकातील इतर मंदिरांत दिसतात त्याप्रमाणेच आहेत. मात्र मंदिरावरील घुमट जरा निराळ्या पद्धतीचा आहे. आधुनिक पाश्चात्य स्थापत्याने तो प्रभावित झालेला असल्यामुळे प्रवाशांचे लक्ष तो अधिक आकर्षून घेतो.

केळोशीहून आलेली आणि आज कैवल्यपूर ऊर्फ कवळे येथे कायमची अधिष्ठित केलेली श्रीशांतादुर्गेची मूर्ती मोठी मनोहारी आहे. तिचे आधुनिक काळातले नाव शांतादुर्गा असे जरी असले तरी तिचे मूळ नाव सांतेरी. केळोशीला तिचे हेच

नाव रूढ होते. 'माय' असेही तिला संबोधतात. केळोशीला जिथे तिचे देऊळ होते ती जागा पोर्तुगिजांनी उद्ध्वस्त करून टाकली. परंतु गोमंतकीय आद्य कवी सारस्वत ब्राह्मण कृष्णदास शामा याने 'कृष्णचरित्रगाथा' या आपल्या मराठी ग्रंथाचा आरंभ इ.स. १५२६त या देवळात बसून केला होता. ही देवता केळोशीहून कवळ्याला आली खरी, परंतु कवळ्याला येण्यापूर्वी तिचे वास्तव्य बंगालला होते. कोकणचा पाया रचणाऱ्या श्रीपरशुरामाने बंगालहून जे ब्राह्मण गोमंतकात आणले त्या दशगोत्रातील ब्राह्मणांपैकी कौशिक गोत्री ब्राह्मणांची ही देवता. या कौशिक गोत्री ब्राह्मणांस केळशी हे गाव अग्रहार मिळाले तेव्हा त्यांनी तिथे आपली वर्णी केली व आपल्याबरोबर नेलेल्या देवदेवतांची पण तिथे स्थापना केली. त्यांपैकीच श्रीशांतादुर्गा ही होय.

फोंड्याहून कपिलेश्वराचे मंदिर मागे टाकून गेल्यावर श्रीशांतादुर्गेचे मंदिर लागते. देवळात जाण्यासाठी थोडीशी चढण चढावी लागते. देवळाच्या आवारात एक तलाव व तुळसी वृंदावन आहे. देवळाच्या प्रवेशद्वाराजवळच चौघड्यासाठी एक खास घरकूल बांधलेले आहे. त्यामुळे चौघड्याचा आवाज आसमंतात दुमदुमतो. येथे त्रिकाल नौबतीचा चौघडा मुंबईचे दानशूर गृहस्थ कै. नारायणराव दाभोळकर यांनी ठेवला आहे. देवळाचा प्राकार विस्तीर्ण असून, देवळाच्या उभय बाजूस इमारती आहेत. तिथे महाजन मंडळी रहातात. देवळाजवळ दीपस्तंभ असून अग्रशाळा आहे. एक अग्रशाळा रामचंद्र मल्हार सुखटणकर यांनी बांधून दिलेली आहे. प्रत्यक्ष देवळात शिरल्यावर जोडे काढून ठेवण्याची एक चौकोनी खोली आहे. तिथे एक जंगी आरसा असून तुताऱ्या वगैरे वाद्ये व्यवस्थित लावून ठेवलेली आहेत. ही खोली ओलांडली की भव्य सभागृह लागते. त्याला चौक असे म्हणतात. या चौकातल्या पटईवर झुंबरे नि हंड्या यांनी एकच गर्दी करून सोडलेली आहे. चौकात जंगी समया आणि त्याखाली परातीदेखील आहेत. चौकाच्या एका कडेला मध्यभागी श्रीशांतादुर्गेची छानदार मूर्ती असून एका हातात तिने विष्णू आणि दुसऱ्या हातात शंकराला घेतलेले आहे अशा थाटात ती आहे. देवीची मूर्ती मोठी मोहक, शांत, सौम्य व सुहास्यवदना आहे. देवी इतकी सुंदर आहे की, मूर्तीवरून नजर हलवूच नये असे वाटते. मूर्तीच्या शेजारीच एक शिवलिंगही आहे. देवीच्या देवळाजवळ श्रीनारायण व श्रीगजाननाचे मंदिर आहे.

देवीची दर दिवशी आरती करण्यात येते त्यावेळी पन्नाससाठ निरांजनांनी तिला ओवाळले जाते. या आरतीला 'झाड' असे म्हणतात. त्या आरतीनंतर कापराची आरती करण्यात येते. दर पंधरवड्यास पंचमीस देवीची पालखीतून मिरवणूक काढली जाते. या मिरवणुकीची सुरुवात रात्री साडेदहाला होते. याशिवाय वैशाख शुद्ध पंचमी, दसरा, कोजागिरी यावेळीही तिथे उत्सव होतो.

माघ शुद्ध प्रतिपदेपासून षष्ठीपर्यंत देवीचा मुख्य वार्षिक उत्सव होत असतो. याला जत्रा उत्सव असेही म्हणतात. प्रतिपदेपासून रोज निरनिराळ्या वाहनांतून देवीची मिरवणूक निघते. पंचमीचा महारथोत्सव हा त्यांतील सुवर्णकळस होय. षष्ठीच्या दिवशी हरिजन मंडळी मंदिर प्रवेश करतात आणि नंतरच या महोत्सवाची समाप्ती होते. देवीची नवीन आद्यपीठ मूर्ती शके १८२३ फाल्गुन शुद्ध दशमीस प्रतिस्थापित करण्यात आली व फाल्गुन शुद्ध सप्तमीस नूतन प्रसादपट्टा स्थापन केला. त्याबद्दल दर वर्षी फाल्गुन सप्तमीपासून दशमीपर्यंत उत्सव साजरा केला जातो. नवरात्रात देवीच्या दर्शनास अतोनात गर्दी होते.

गोमंतकातल्या बहुतेक सर्व गावांत शांतादुर्गा ही जाऊन पोचलेली आहे, कवळे येथे असलेले तिचे देवालय हे मुख्य असले तरी गोव्यात खंडेपार, कुंकळ्ये, गोठण, माशेल, तिवरे, पालये, धारगळ, कांदोळी, नेरूल, बांदोडे, मूळगाव, आमोणे, कातरपे, वरडे, घुडा, पारोडे, कोळंब, कालापूर इत्यादी ठिकाणी या देवतेची लहान मोठी मंदिरे आहेत.

गोमंतकातल्या या सर्वांगसुंदर देवतेला नमस्कार असो.



## अनुक्रम



# महालक्ष्मी (दंतकथा)

निवेदिका : **सौ. कुमुदिनी पवार**

गरुडाचल नावाचा एक ब्राह्मण होता. तो भृगुकुलोत्पन्न असून त्याला माधवी या नावाची कन्या होती. एकदा तो तिच्याकरिता वरसंशोधनार्थ हिंडत असता सहजगत्या विष्णूच्या राजवाड्यात आला. विष्णूने त्याचे यथोचित स्वागत करून त्याला बसायला आसन दिले. तेवढ्यात काय गंमत झाली की, ती मुलगी भाडभीड विसरून विष्णूच्या शेजारी पलंगावर जाऊन बसली. विष्णुपत्नी लक्ष्मी ही तेथेच होती. तिला हे सहन झाले नाही. त्यावेळी रागाच्या भरात त्या मुलीच्या बालवयाकडे न पहाता त्या मुलीला लक्ष्मीने शाप दिला की, 'तू अश्वमुखी होशील.'

गरुडाचलाला लक्ष्मीचे हे वागणे रुचले नाही. मोठ्या माणसांनी गरिबांची अशी छळणूक करणे योग्य नव्हे असे त्याला वाटले. कोणतेही कारण नसताना त्या मुलीला लक्ष्मीने शाप दिला असल्याने त्याला राग आला आणि त्याने लक्ष्मीलाही उलट शाप दिला की, तू हत्तीण होशील. त्या शापाचा त्वरित परिणाम होऊन लक्ष्मी हत्तिणीच्या स्वरूपात भूतलावर अवतरली. तशीच ती मग गरुडेश्वर तीर्थाच्या ठिकाणी गेली आणि ह्या शापातून मुक्त होण्यासाठी तपश्चर्या करू लागली. होता होता देहाची शुद्धी झाल्यावर तिला ब्रह्मदेव प्रसन्न झाले आणि त्यांनी तिला शापमुक्त केले. त्यानंतर त्यांनी लक्ष्मीचे नाव महालक्ष्मी असे ठेवले.

एकदा इंद्र आणि महिषासुर यांचे युद्ध शंभर वर्षांपर्यंत चालले होते. शेवटी महिषासुर इंद्रपद बळकावून बसला. आपली ही दुर्दशा शंकराला सांगितल्यावर तो क्रोधाने थरथरू लागला. त्यावेळी त्यांच्या नेत्रांमधून अतिदिव्य असे तेज बाहेर पडून त्याने देहरूप धारण केले ती एक रूपवान अशी स्त्री निर्माण झाली. सर्व देवांनी आपापली शस्त्रे तिच्या हातात अर्पण केली. यानंतर देवी मोठ्याने हसली. ह्या हास्याच्या आवाजाने दशदिशा दुमदुमल्या, पृथ्वी कंपायमान झाली,

आणि पर्वतही थरारले. ही भयंकर गर्जना म्हणजे आपल्याला दिलेले आव्हान समजून महिषासुर सुसज्ज होऊन या देवतेबरोबर दोन हात करण्यासाठी रणांगणात उतरला. त्यावेळी त्या देवतेने महिषासुर आणि इतर उरल्यासुरल्या दैत्यांनाही ठार केले. ही जी देवता या ठिकाणी उत्पन्न झाली तिचेही महालक्ष्मी असेच नाव ठेवले गेले.

या देवीला अठरा भुजा असून तिच्या हातात पुढीलप्रमाणे आयुधे असतात :

(१) अक्षमाला, (२) परशु, (३) गदा, (४) बाण, (५) वज्र, (६) कमळ, (७) धनुष्य, (८) कुंडिका, (९) शक्ती, (१०) खड्ग, (११) चर्म, (१२) शंख, (१३) घंटा, (१४) सुधापात्र, (१५) शूल, (१६) पाश, (१७) सुदर्शन चक्र, (१८) एक हात अभय आहे.






निवेदक : श्री. गोविंद हरि दंडवते

दुर्गादेवी ही मूळ कोकणातील. तिला वाटले आपण देशावर जावे पण वास कोठे करावा? स्थान कोणते निवडावे? तिला काही कळेना. तरीही तिने देशावर जाण्याचे ठरविले.

एकदा काय झाले की, लमाण लोकांचा तांडा कोकणातून देशावर निघाला. खूपच खूप बैल होते. बैलांच्या पाठीवर धान्याच्या गोण्या लादल्या होत्या. बैल हाकीत हाकीत लमाण कोकणातून देशावर निघाले. त्यातच एक मोठा धष्टपुष्ट बैल आपली बाकदार शिंगे व डौलदार मान डोलवीत डोलवीत मोठ्या ऐटीने चालत होता. त्याला देवीने पाहिले. तिने एका बारीक खड्याचे सूक्ष्म रूप घेतले आणि ती रस्त्यावर आली. या बैलाचा पुढचा उजवा पाय या खड्यावर पडला. खडा खुरात रुतला. बैलाला काहीच समजले नाही. तो आपल्याच नादात निघाला. त्याच्याबरोबर खड्याच्या रूपाने देवीही निघाली.

कडेकपारी मागे पडल्या. डोंगरपठार ओलांडले. नद्यांची खोरी मागे सरकली. इंद्रायणी, पवना, मुळा, मुठा, भामा, वेळवंडी, घोड, कऱ्हा, निरा, सर्वच नद्या पवित्र. पण देवीला पुढेच जावेसे वाटले. तांडा पुढे सरकतच होता. अखेर भीमेचा काठ आला..देवीने समोर पाहिले. भीमेचा प्रशांत प्रवाह, बाजूला डोंगर, त्यातच एक रम्यशी कपार, वर शंकराचे स्थान, समोर प्रशांत डोह. देवीला हे स्थान आवडले. ती बैलाच्या पायातून सटकन सटकली व त्या कपारीत जाऊन बसली.

जवळच्याच निरानृसिंहक्षेत्री ब्राह्मणांच्या स्वप्नी गेली. म्हणाली, 'मी येथे आले आहे, तुम्हीही या.'

दुसरे दिवशी ब्राह्मण तिथे गेले. पहातात तो देवीचा भव्य तांदळा.

'ही तर कोकणची दुर्गामाता' एक ब्राह्मण म्हणाला.

'तिच्या समोरचे हे पवित्र असे दुर्गातीर्थ.' दुसरा म्हणाला.

दुर्गातीर्थी स्नान करून त्या सर्वांनी देवीची मनोभावे पूजा केली. हीच ती दुर्गादेवी तथा ईवराई. रम्य स्थानी वास करण्यासाठी कोकणातून देशावर आली. भीमेच्या काठी विसावली. भक्तांच्या नवसाला पावली.






निवेदक : **प्रा. ग. रा. बोरसे**

पंढरपुरापासून महाळुंग गाव ३५ मैलांवर आहे. सभोवताली उसाचे हिरवेगार मळेच्या मळे पहावयास मिळतात. पूर्वेस व पश्चिमेस एक-दोन मैलांच्या अंतरावर दोन साखरेच्या गिरण्या आहेत. या गावचे प्रसिद्ध जागृत दैवत श्रीअंबिकादेवी आहे. देवीचे भव्य असे मंदिर असून पुढे विस्तीर्ण मंडप आहे. सभोवताली भक्तगणास उतरण्यासाठी धर्मशाळा आहेत. दर मंगळवारी-शुक्रवारी दूरदूरचे बरेचसे लोक या देवीच्या दर्शनार्थ येतात. या देवीच्या मंडपासमोर 'संवदड' नावाचा एक पुराण वृक्ष आहे. तो पूजनीय आहे. ज्याच्या शरीरात वात-प्रकोपाभुळे जर चमका निघत असतील, तर त्याने त्या वृक्षास आलिंगन दिल्यास आणि मंदिराच्या दाराची लोखंडी कडी त्या जागेवरून फिरविल्यास त्या चमका एका मिनिटात नाहीशा होतात. या वृक्षास लागून एक पाण्याची बारव (चौकोनी विहीर, जिला चारही बाजूंनी आत उतरण्यास पायऱ्या असतात) आहे. ही बारव बारा पुरुष खोल आहे. पण पाणी अगदी वर आहे. यातील पाणी पवित्र मानतात. या पाण्याने स्नान केल्यास खरूज, नायटे, गजकर्ण इत्यादी त्वचारोग बरे होतात. अद्यापही शेकडो लोक या बारवेतील पाण्याने स्नान करतात आणि रोगविमुक्त होतात. या बारवेत नैऋत्य कोपऱ्यात खालून एक झरा आहे. त्यासंबंधी अशी आख्यायिका आहे की, तेथून खूप लांब असे एक भुयार आहे. पण त्या कोपऱ्यातून वर्षाच्या काठी एकदा खालून गंगेचे पाणी या बारवेत येते. एक मिनीटभरच! सर्व पाणी ताकासारखे पांढरे शुभ्र होते. हे पाणी घेण्यासाठी लोकांची अगदी तोबा गर्दी उसळते. पाणी येण्याची खूण अतिशय विस्मयजनक आहे. जवळच्या संवदडीच्या वृक्षाची सर्व पाने अगदी स्थिर असतात आणि एकच पान हलत असते. वर्षातून ही अगदी ठराविक वेळ असते.

श्रीअंबिकादेवीची या गावात सुमारे १,५०० ते २,००० माकडे आहेत. ही सर्व माकडे या महाळुंग गावातच रहातात. मंगळवारी व शुक्रवारी देवीच्या दर्शनासाठी येणारे लोक फुटाणे, शेंगदाणे, ऊस, भाकरी, ज्वारी, हरभरे इ. पदार्थ टाकतात. हे पदार्थ माकडांच्या टोळयाच्या टोळया येऊन सामुदायिकपणे खातात. प्रत्येक माकडाच्या गालात सुमारे अर्धा ते पाऊण शेर धान्य मावते. नंतर हा साठा माकड पुन्हा थोडया वेळाने खाऊन टाकते. माकडांचे एकूण पाच-सहा कळप आहेत. हे कळप अगदी बाणेदार स्वरूपाचे आहेत. ते कट्टर स्वाभिमानी आहेत. जर एखादे लहान मोठे माकड चुकून दुसऱ्या एखाद्या कळपात गेले तर सर्वजण त्याच्यावर तुटून पडतात आणि त्यास रक्तबंबाळ करतात. प्रसंगी ठारही मारतात. ही माकडे घराघरांतून चोऱ्याही करतात. त्यांच्यांतील एखादे माकड मेल्यास सारेजण त्याच्याजवळ बसून रहातात. त्या प्रेतास वास आला की, मग त्यास सोडून जातात. एखादा माणूस जर त्या माकडाच्या प्रेताजवळून गेला तर सगळेजण त्याच्या अंगावर धावून जातात. ही सर्व माकडे अंबिकादेवीची संताने समजतात. त्यांना कोणी धरून नेऊ शकत नाही. जर कोणी नेण्याचा प्रयत्न केला तर त्याचा निर्वंश होतो असे मानतात.

या सर्व माकडांचा एक मुख्य माकड आहे. त्यास माकडांचा पाटील म्हणतात. या देवीची यात्रा वद्य अष्टमीस भरते. त्यावेळी सुमारे एक लाख लोक जमतात. त्यावेळी या पाटील माकडास आहेर करतात. नंतर हा आहेर माकड पाटील फाडून फाडून त्याचे लहान लहान तुकडे करतो आणि तो आपल्या भाऊबंदांना वाटतो. सर्वजण पुन्हा त्या तुकडयाचे तुकडे करतात.

अंबिकादेवी ही जागृत देवता आहे. दररोज सकाळ-संध्याकाळ नगारे वाजवून पुजारी लोक आरती करतात. दररोज अभिषेक करतात. देवीला नवी वस्त्रे घालतात. नंदादीप रात्रंदिवस पाजळला जातो. देवीच्या अंगावर सोन्याचांदीचे दागिने आहेत. एकदा काय झाले ! एक गृहस्थ भर दिवसा ऐन दुपारच्या वेळी देवळांत आला. त्यावेळी देवळांत फक्त पुजाऱ्याची एक मुलगी बसलेली होती. त्या गृहस्थाने सदर पुजाऱ्याच्या मुलीस पाणी आणण्यासाठी घरी पाठविली आणि तो देवळात गेला. देवीच्या अंगावरील फक्त सोन्याचे दागिने त्याने भरभरा काढले आणि पोबारा ठोकला. थोडयाच वेळात तेथे ती मुलगी पाणी घेऊन आली. पहाते तो तिला देऊळ एकदम भकास दिसू लागले. मुलीने घरी जाऊन ही बातमी सांगितली. गावचे पाटील आले. महार, रामोशी, वेसकर आले. काही घोडेस्वार आले आणि सर्वजण दाही दिशांनी धावत सुटले. त्या चोराचा शोध करू लागले. इकडे काय चमत्कार झाला ? तर तो मनुष्य आंधळा झाला आणि गावाच्या शिवेच्या आसपास हिंडू लागला. त्याला पुढे जाताच येईना. तो तेथेच

ाला. इतक्यात तेथे महार व रामोशी गेले आणि त्यांनी त्याला
ांचा गिल्ला दिसल्याबरोबर त्याने त्या सोन्याच्या दागिन्यांपैकी
चे मणी गिळून टाकले! लोकांनी त्यास पकडून महाळुंग गावात
र खूप झोडपले. शेवटी त्याने सर्व दागिने दिले आणि काही मणी
बूल केले. दुसरे दिवशी त्याच्या मलातून हे मणी सापडले. नंतर ते
दही यांनी धुतले. सर्वांचे एक सोन्याचे छत्र-चामर बनविले आणि
ते देवीच्या अंगावर घातले. ते अद्यापही देवीच्याच अंगावर आहे.
त्या चोरास दृष्टी आली. अशा रीतीने ते जागृत दैवत अद्यापही
तास प्रसन्न होत आहे. येथे महाराष्ट्रातून सर्व भक्तगण मोठ्या
ेतात. नवस फेडतात आणि परत जातात. अशी जागृत देवस्थाने
ाराष्ट्रात किती तरी आहेत.






निवेदक : श्री. वासुदेव र. वर्तक

या केळशीच्या देवीची यात्रा चैत्र शुद्ध एकादशी ते पौर्णिमेपर्यंत चालते. या देवीच्या उत्पत्तीची दंतकथा गावचे लोक सांगतात ती अशी :

केळशीची महालक्ष्मी हे लागू घराण्याचे कुलदैवत आहे. तेथील मंदिर पण त्यांच्या पूर्वजांनी बांधले. त्यांच्या घरचा नैवेद्य पुष्कळ वर्षे दररोज देवीला दाखविला जात असे. महालक्ष्मी सागरातून आली आणि आल्यावर तिने आपले केस पिळले व एका ठिकाणी अंगठा टेकला. तिसऱ्या पावली मंदिरात आली. नंतर लागू घराण्यातील एका पुरुषाच्या स्वप्नात येऊन तिने मंदिर बांधावयास सांगितले असे म्हणतात. आजही भाविक लोक या गोष्टीवर विश्वास ठेवतात. चैत्रातील तिच्या उत्सवाचे वेळी आमच्या गावी कधी चोरी होत नाही असे आमचे वाडवडील सांगतात. बाळंतिणीने तिच्या यात्रेच्या काळात बारशानंतर दर्शनाला गेले तरी चालते. नाही तर सामान्यपणे लोक दर्शनाचा समारंभ महिन्याने साजरा करतात.



# अनुक्रम

संग्राहिका : **सौ. शांता पाटील**

पंचगंगेचा पंचरंगी थाट
अंबाबाईची वाजते घाट
पंचगंगेला येई नव्या पाण्याची भरती
अंबाबाईला चालते सांज सकाळ आरती
अंबारखान्यावर वाजती वाजंत्री चौघडा
अंबाबाईच्या देवळात हळदीकुंकवाचा सडा
अंबाबाईच्या देवळात हळदीकुंकवाच्या राशी
करवीर शहराला म्हणतात दक्षिण काशी
अंबाबाईच्या पुजेची घाई होई पुजाऱ्याला
पुरणपोळीचा नैवेद्य येई बाराच्या घडीला
नवीन साडी चोळी नेसूनी हळदीकुंकू भाळी
दागिन्याच्या भाराने अंबाबाई वाकली
नवरात्राच्या पूजेचा काय सांगू मी थाट
रोज नवीन रूप घेऊनी येई अंबाबाई देवळात
नवरात्राच्या पूजेची उडते घाई घाई
माझी ग अंबाबाई नवस पुरवूनी जाई
नवस करू किती ग माझ्या अंबाबाईला
नवस पुरविता खणानारळांची ओटी भरू तिला
पंचमीच्या सणाला उडाली सर्वांची घाई
टेंबलाईच्या भेटीला निघाली अंबाबाई
सोन्याचा कळस अंबाबाईच्या देवळाला
हळदी कुंकवाचा मळवट तिच्या कपाळाला

अंबाबाईचे कवतिक करू ग किती आणखी
कार्तिकी पौर्णिमेला निघे थटात पालखी

कळस देवीचा पाजळला असंख्य दिव्यांनी
पालखी चालली डौलात पायघड्यावरूनी

मालदार चोपदार मागे पुढे असती
पालखीमध्ये असे देवीची मूरती

स्वप्नामध्ये येई अंबाबाई माउली
तिच्या भेटीसाठी नगरी व्याकूळ झाली

स्वप्नामध्ये येई माझी अंबाबाई माउली
तिची असू द्यावी आम्हावरी साउली

मंगलकार्य घरी पहिली अक्षदा अंबाबाईला
आशीर्वाद मागूनी घेई नवीन जोडीला

रात्रीच्या सपनाची किती सांगू मी कहानी
माहेराची देवी अंबिका आलीया पावनी

मंगळवारी जीव उगीच माझा भ्याला बाई
देवी अंबाबाई समाचाराला माझ्या आली

पालखीचा दांडा दांडा लागला आर्डभिंती
अंबिका देवी रात्री माझ्या गुजाला आली व्हती

देवा मी जातो जरा संगं नेतो मी आईला
पंचगंगेच्या काठावरी चारा घालीतो गाईला

देवाजीला जातो बहीणभावंडं आम्ही दोघं
काशी तीर्थ घडलं मनीजोगं

देवाजीला मी जातो माझ्या गाडीला पाच ऊस
इथून अंबाबाई बारा कोस कसं राहातील ताजं ऊस

अंबाबाईच्या देऊळा सोन्याच्या शिखरात
अंबाबाई बसे मोत्यांच्या मखरात

अंबाबाईच्या देवळाला जोत बांधले चिरेबंदीचे
अंबाबाईच्या देवळाला गवंडी आलेत मिरजेचे

देवीला जाते मी चुडा माझाही पुनवंती
लेक बाळ ही संगं घेती भागीरथी

अंबाबाईच्या देवळात नवस करतात जावा जावा
शंभर झाडं उदबत्तीची लावा

संग्राहिका : **श्रीमती पार्वतीबाई जोशी**

जाईच्या फुलाचा कुठं दरवळ सुटला
अंबामातेचं देऊळ आहे पाण्याच्या वाटला

जाईच्या फुलानं माझी आई घाभेजली
सख्या माझ्या भक्तानं पूजा तिची केली

जाईच्या फुलाचा बाई करते उगा निगा
आई अंबाबाई तुझ्या गळाभार झाला

अंबामातेचं देऊळ ओल्या केसाने झाडिते
माझ्या सख्याचे केले नवस फेडिते

आई अंबाबाई तुझं सोन्याचं कंबाळ
सखा गेला दूर देशा त्याला आई संभाळ

गावाला गेल्याचा मला नाही घोर
माझ्या सख्याच्या अंबा गेली बरोबर

लोकांला पाव त्यांचा टाकीन उसासा
अंबाबाई पावलं चित्ता मला भरवसा

संग्राहिका : **सौ. निर्मला धारप**

कोल्हापूर शहर दोन्ही बाजूंनी तांबट
अंबाबाईच्या नैवेद्याला रोज लागे नवं ताट

कोल्हापूर शहर दोन्ही बाजूंनी सोनार
अंबाबाईला घडविती रोज नवा चंद्रहार

कोल्हापूर शहर चहू बाजूला ग हांडे
अंबाबाईच्या गस्तीला राजा जातीनं ग हिंडे

शेर सोनियाचं अंबाबाईचं कंबळ
आता दीन लेकरं आई तू संभाळ

शेर सोनियाची अंबाबाईची कंबर
हिरव्या पैठणीची निरी पडली शंभर

कोल्हापूर शहर आहे विंचवाची पेटी
आई अंबाबाई वस्ती केली तुझ्यासाठी

कोल्हापूर शहर आहे विंचवाचं तळं
आई अंबाबाई वस्ती केली तुझ्यामुळं

देवळात जाता उजवी आहे अंबाबाई
सावळ्या बाळाच्या यशाला उणं नाही

संग्राहक : श्री. ना. ना. शिंदे

पाह्याला नाही पैस महाळुंग गावीच्या रासबिदी
दयाळू अंबाबाई म्होरं छबीना चाले मधी

महाळुंग गाव खेडं ओळखू येईना भिकाऱ्याला
सोन्याचा कळस हा अंबाबाईच्या शिखराला

अंबाबाईच्या देवळात वाजते झांज टाळ
अंबिका बाईला विनवी गुरवाचं बाळ

अंबाबाईच्या देवळात वाजंत्र्याची गर्दी झाली
माझ्या वाणीच्या बाळाची सावकाराची भोगी आली

कल्हुळाच्या पायऱ्या कशानं ओल्या झाल्या
बाई माझ्या अंबिकेच्या तिच्या भोपिणी पाणी गेल्या

कल्हुळाचं पाणी कशानं झालं पिवळं
बाई माझ्या अंबिकेनं तिनं धुतलं सवळं

कल्हुळाचं पाणी कशानं काळं निळं
बाई माझ्या अंबिकेनं तिनं धुतलं काजळ

अंबाबाईची न्हाणी कशानं उदासली
दह्या दुधानं अंबा न्हाली

अष्टमी जत्रेला तिचा छबीना आला पेठं
मारुतीराया माझ्या गादीवरल्या राजा ऊठ

अष्टमी जत्रेला पालाला पाल भिडे
बाई माझ्या अंबिकेच्या पतिव्रतेचा शालू उडे

संग्राहक : श्री. प्रताप हिंदुराव साळुंखे

कोल्हापूर शहर पाख्याच्या डबक्यात
अंबा फुलांच्या झुबक्यात अंबाबाई

कोल्हापूर शहर पेठोपेठी सोनार
नवा घडविते चंद्रहार अंबाबाई

कोल्हापूर शहर पेठोपेठी पटवेदार
बाजूबंदोला गोंडे चार लाल अंबाबाई

कोल्हापूर शहर भोवती तांबट तांबट
निरी पडली तिनशेसाठ पैठणीची अंबाबाई

कोल्हापूर शहर बुरजोबुरजी भांडी
वेशीच्या पहिल्या तोंडी अंबाबाई

संग्राहक : श्री. प्र. रा. भामरे

आई अंबाबाई गडावरली पुतळी
तिले देवीशोभा आठरा भोजले काचोळी

आई अंबाबाई गडावरली रतन अशी
देती शोभा तिला आठरा भोजने काकनं कशी

अंबाबाई गडावरी उभी राही
खांदेशी माहेर वाट मुराळीनी पाई

आई अंबाबाई वाकडी तुनी मान
खांदेशी माहेर उजवा देती कान

देवामध्ये देव अंबाबाई आक्रंताळी
मारिला दईत घातला पायदळी

आई अंबाबाई तुलं खडके बसन
कोन राजानं नवस तुले निंबनं नेसनं

आई अंबाबाई आनंद कर मना
बैल पतरी घट सवारस तुना

संग्राहिका : कु. लता देशमुख

अंबा हो नांदते ज्योत माव्हरात
देवी हो नांदते ज्योत माव्हरात

मैराळ दैवत कर कुमळात हो कर कुमळात
अंबा हो नांदते ज्योत माव्हरात

आठा दिवसाच्या मंगळवारी
दर महिन्याची पुनव करी

अहो आनंदकुती देवी तुझ्या रावळात
हो तुझ्या रावळात
अंबा हो नांदते ज्योत माव्हरात

नवा दिसाचे हो नवरातर
घट स्थापिले फुलांचे हार

पापड्या फुलवन्याचा व्हतो गजभार
हो व्हतो गजभार
अंबा हो नांदते ज्योत माव्हरात

परसराम गोंधळी गाणं गातो
राहतो माव्हर गडात हो राहतो माव्हर गडात

अंबा नांदते हो ज्योत माव्हरात
देवी हो नांदते ज्योत माव्हरात

संग्राहिका : सौ. उषा रेमजे

नव्या दिवसाचं नवरात्र अंबाबाई रातचंडी
हिच्या ग दिपमाळी तेल जळे सव्वा खंडी
नव्या दिवसाचं नवरात्र दहावे दिवशी दसरा
शिव हे ग ओलांडून अंबा निघाली उशीरा
दसऱ्या दिवशी आपट्याचं झालं सोनं
माझ्या समर्थ सख्याला बोलावनं
सोन्याची ग अंबाबाई चांदीचं सिंहासन
झाली भक्ताला प्रसन्न
नऊ दिवस नवरात्र नऊ दिवस नऊ माळा
अंबाबाई तुझी बाई फुलाची चंद्रकळा
नऊ दिवस नवरात्र अंबा बसली नवचंडी
हिच्या दिपकाला तेल जळे सव्वा खंडी
जाईच्या फुलांचा कोठे दरवळ सुटला
आई अंबाबाईचं देऊळ पाण्याच्या वाटेला
नऊ दिवस नवरात्र अंबा बसली वाघावर
नारंगी झेंडूचे तिला चढविले हार
सोन्याची अंबाबाई पातळ नेसे पाचूचं
दूर ग देशात रक्षण कर दासाचं
जाईच्या फुलाचा वास येतो दूर दूर
देवी ग अंबिकेचं माझ्या ओसरीला देवघर
सोन्याची अंबाबाई हिला रुप्याचे कमळ
नेनंत्या त्या बाळाला दूर देशी संभाळ
सोन्याची ही अंबाबाई सिंहासनी बसे
इच्या फराळाला दूध पेढे अनारसे
देवी अंबाबाई तू गडावरील पुतळी
अशी शोभा देते अठरा भुजांस काचोळी
देवी अंबाबाई गडावरील रतन
अशी शोभा देते अठरा भुजांस कांकणं
देवी अंबाबाई तुझी वाकडी मान
युद्ध करता करता ऐके मार्कंडेयाचे पुराण

संग्राहक : श्री. रमजानखान महंमदखान

१

मैनाचे मनोरथ अंबाबाई पुरवित गेली
शेर सोनियाची याने देव्हाऱ्यात केली

लग्नाचे वेळी निनांत माझा विचार
आई अंबाबाई मांडवी तुझा भ्रतार

नऊ दिवस नवरात्र नऊ दिवस माळा
आनंदी अंबाबाई तुझा मंडप पिवळा

नऊ दिवस नवरात्र नऊ दिवस माळा
अंबाबाई तुझी फुलाची चंद्रकळा

आली हे मुळी चिठ्ठी शिवशेजारी लाडिला
आता अंबाबाईच्या वाघ जुंपे गाडीला

माझ्या गरीबाच्या घरी हो नेणता विचार
दयाळू अंबाबाई लावी तुझा तो भ्रतार

आई अंबाबाई देवळाच्या झाल्या इटा
नादान माझा बंधू जावळाच्या झाल्या जटा

आई अंबाबाई दह्याच्या खोऱ्यात
नादान माझा भाऊ निरीच्या घोळात

आई ग अंबाबाई तुझी तांदळाची ओटी
नवस बोलली बहीण भावासाठी

आई ग तू अंबिका आनंद फार माझा
नवरात्रमध्ये घट सावरीन तुझा

आई अंबिकेचा गोंदळ माझ्या घरी
पाच पासुड्यांचा मंडप देते दारी

२

अंबाबाई सिंहासनी भक्त बसला आसनी
आता ओवाळीते देव भक्त अन मी दोन्ही

गावाला गेली याची काळजी नाही मला
आई अंबाबाई हवाला दिला तुला

नऊ दिवस नवरात्र घाटशीळ उभी राहे
आई अंबाबाई भक्ताची वाट पाहे

घोड्याला दाणापाणी देते खोबरे किसूनी
आता अंबाबाई आली रथात बसूनी

येथूनी नमस्कार पुण्यापासूनी झरंडचाला
आता अंबाबाईच्या मोती दुहेरी करंडचाला

बुधवार पेठ नऊ लाखाची गुजरी
लक्ष्मी राज्य करी देवा इठ्ठला शेजारी

कोल्हापूर शहर दोन्ही रस्त्याला पानमळा
अंबाबाईची पूजा होती तीन वेळा

कोल्हापूर शहर दोन्ही रस्त्यांनी पटवेकर
अंबाबाईच्या बाजूबंदाला गोंडे लावा सत्वर

आई अंबिकेचा गोंदळ माझ्या इथं
पाच पासुडयाचा मंडप देऊ कुठं

नऊ दिवस नवरात्र अंबिका बसली न्हायाला
झाला उशीर भाऊ तुला शिलंगण खेळायला

मंडपाच्या दारी तुम्ही दूरदूर सरा
आई अंबिकेच्या रथाला जागा करा



# अनुक्रम

१. सौ. शरदिनी मोहिते
२. सौ. सिंधु वारनूळकर

संग्राहिका : सौ. शरदिनी मोहिते

वारा ग मंदी वार–वार मंगळवार केला
आंबे, उंबरवटा सारवीला।
वारा ग मंदी वार–वार बुधवार केला
आंबे, कृष्णराजा जन्मला।
वारा ग मंदी वार–वार बिस्तेरवार केला
आंबे, अगरबत्ती दत्तातीला।
वारा ग मंदी वार–वार सुक्किरवार केला
आंबे, सेंदुर लक्ष्मीला।
वारा ग मंदी–वार शनिवार केला
आंबे, कापूर मारुतीला।
वारा ग मंदी वार–वार आईतवार केला
आंबे, भंडार मल्हारीला।
वारा ग मंदी वार–वार सोमवार केला
आंबे, दवना संभूजीला।

संग्राहिका : सौ. सिंधु वारनूळकर

कोल्हापुर करविर क्षेत्री। गेले मी अवचित बाई
पाहिली चतुर्भुज मूर्ति। साक्षातचि अंबाबाई
वक्रतुंड गणनाथ हे। अंबेच्या सन्मुख बाई
पाहुनिया अंबाबाई। मन माझे तल्लिन झाले
ठाई ठाई पुराणे वसती। किती कथा कीर्तने श्रवती
दर्शनासि बहुजन आले ॥

देवळाची अघटित रचना । अवलोकन केले नयना।
खांबाचा गणती नाही । नेसुनी पितांबर पिवळा
भरजरीची घालुनि चोळी । नाकीचा निर्मळ मोती
मळवट सदोदित भाळी । पाहुनिया अंबाबाई
महाळूंग उजवे हाती । शिवलिंग मस्तकावरती
सूर्यकिरण मुखावरि आले । पाहुनिया अंबाबाई
मन माझे तल्लिन झाले ।।

कैलासी शिखरी जाता । बहुजनासि भय हे वाटे
पशुपती सांभ शिव भोळा । अक्षय ही वसती तेथे
कवियली अंबिका पुराणी । लक्ष्मी लोळते चरणी
शरण मी तुला बहु आले । पाहुनिया अंबाबाई
मन माझे तल्लिन झाले ।।






**श्रद्धास्थाने**

सर्वांना बसायला पृथ्वीचं आसन. सावलीला आभाळाचा मंडप. पण प्रत्येकाचा ठावठिकाणा वेगळा. घराणं निराळं. कुळीतला कुळधर्म फरकातला. घरातलं कुलदैवत परंपरेतलं. गावाजवळचं. मोजक्या लोकांमधलं. त्यांच्या त्यांच्या पुरतं. ग्रामदैवतांत मोडणारं. विशिष्ट विस्तारक्षेत्रांत येणारं. तर अशाच काही कुल-दैवतांची ओळखदेख इथं जाणकारांनी करून दिलेली आहे. त्याआधी देवाच्या देवळाचीही माहिती सांगितली आहे. म्हणून यातलं सांगावं तेवढं थोडं न् ऐकावं तेवढंही कमीच. अशी दैवतं पुष्कळ. त्यातलाच हा केवळ वानवळा.

## अनुक्रम



लेखक : **डॉ. म. श्री. माटे**

मी ऐकलेले एक लोकगीत मोठे अर्थपूर्ण आणि मार्मिक आहे. 'तुमी दार, मी चौकट, तुमापरास मी बळकट, सभेशी दोघं.' पती आणि पत्नी यांच्या संबंधाचे, शिव आणि शक्ती यांच्या नात्याचे, इतके चपखल वर्णन अन्यत्र सापडणे कठीण. ही दाराची चौकट नुसत्या अलंकाराने नव्हे तर वाच्यार्थानेसुद्धा राउळाचा संसार सांभाळते आणि ती खरोखरीच इतकी बळकट की दार जागेवर असो वा नसो. राऊळ ठिकाणी असो वा नसो चौकट घट्ट उभी असलेली दिसते.

देवळात गेले तर सगळी गडबड दर्शनासाठी. कोणाची पूजेची. कोणाची महा-पूजेची. त्यातही भाविकांची झुंबड नाही तर दर्शनोत्सुकांची रांग असली म्हणजे संपलेच. पण जरा निवांत वेळ गवसला, या निवांत वेळात देवाला जाण्याची बुद्धी झाली, तिथल्या म्हाताऱ्या गुरवाबरोबर चार गोष्टी केल्या, तर देवळाकडे लक्ष जाणार—त्याच्या अंतरंगाकडे तसेच बहिरंगाकडे. राजे महाराजे यांनी उठविलेले प्रचंड, डौलदार देव-प्रासाद सगळ्याच गावांच्या वाटयाला कसे येणार? पण ग्रामदेवतेची जाखाई-जोखाईची, खंडोबाची, मारुतीची छोटी छोटी देवळे तर गावोगाव आहेतच. इथेच ती चौकट दिसते. अगदी गद्य स्वरूपात साधीसुधी. हिला उंबरा असेलच असे नाही. कोण्या भाविकाने फरशी घातली तर त्याखाली लपूनही गेला असेल. पण गणेशपट्टी असणारच. चौकटीच्या वरच्या बाजूला मधोमध एक लहानसा कोनाडा आणि त्यात गणरायाची साधीसुधी मूर्ती. दरवर्षी शेंदूर पिऊन जाडजूड झालेली, आपला मूळ आकार विसरलेली. फरक इतकाच की, रामचंद्राचे देऊळ असले तर गणपतीऐवजी मारुती दिसतो. त्यालाही भक्ताकडून शेंदराचा खुराक खूपच मिळालेला असतो. डोक्यावर कमानीसारखे धरलेले शेपूट दिसते. त्यावरून फरक कळावयाचा, एरवी गणपतीचा मारुती झाला ही म्हण का आली असावी हे सहज कळावे अशाच या मूर्ती असतात.



कोणा तालेवाराने हे देऊळ बांधले असेल तर चौकटीला थोडी शोभा आणलेली. दोन्ही बाजूंना काहीशी बोजड वेलपत्ती कोरलेली दिसेल. चुन्याने, सफेदीने भरून गेलेली असली तरी मधूनच एखादे फूल, पान डोकावते, एखादा अंकुर डोके वर काढतो. दरवाजाच्या दोन्ही बाजूंना पहारेकरी उभे केलेले दिसतात (द्वारपाल). सगळ्या जगताचे पालन करणारा तो परमात्मा, पण त्याच्या रक्षणासाठी हे ओबडधोबड दगडी पहारेकरी गदा, तलवारी सरसावून चोवीस तास खडे आहेत. एखाद्याच्या डोक्यावर मुकुट दिसेल तर कोणी भारदस्त शिंदेशाही पगडी घालून मिरवितील. अंगरखे, दागदागिने यांच्यात मात्र नाव घेण्याजोगे काही दिसणार नाही.

गावातला एखादा पोरगा तलवार मारून येतो, नाव काढतो, गाठीशी चार पैसे जमा होतात. जहागिरी मिळते, सरदार म्हणून चार लोक मान देऊ लागतात. तो चौसोपी वाडा बांधीलच. सागाचे भक्कम खांब आणि तुळया. समोर तसाच दरवाजा. त्याच्याभोवती अंगापिंडाने मजबूत चौकट. फक्त गणेशपट्टीवर सुरेख वेलबुट्टी काढलेली. मधल्या छोट्याशा कोनाड्यात गणेश, त्याच्या दोन्ही बाजूंला सुरूचे खांब आणि त्यावर मेहरपीची कमान. दोन्ही बाजूंना पसरत जाणाऱ्या वेलींच्या जाळ्यात बारीक बारीक फुले चांदण्यासारखी डोकावतात. कोठे ही वेल मकराच्या तोंडातून बाहेर पडते तर कोठे कुंभातून. त्यातच मधेमधे नाजूकसे मोरही कोरलेले दिसतात. मराठेशाहीतील आज तग धरून असलेल्या वाड्यात चौकटीचे, गणेशपट्टीचे किती तरी प्रकार अजूनही पहावयास मिळतात. पण आपल्यासाठी वाडा उठवून सरदाराचे समाधान होणार नाही. गावाच्या देवळासाठी काही तरी केल्याखेरीज रहाणार नाही तो. पडले असेल तर नवे बांधून देईल. आपल्याला घर बांधले तर देवाला का नको? जुने देऊळ बऱ्या स्थितीत उभे असले तर त्याला रंगरंगोटी करावी, नवा कळस बसवावा. पण त्याहीपेक्षा मानाची गोष्ट म्हणजे दगडी चौकट पितळी नाही तर चांदीच्या पत्र्याने मढवावी. वेलपत्ती, गणेशपट्टी, द्वारपाल, सगळा बारीकसारीक तपशील पत्र्याने मढविण्यात येतो. बाकी कोठे काही केले नाही तरी चालेल पण चौकटीचे कौतुक करावयास हवेच.



प्राचीन कालातील दरवाजा



कोरीव काम : दरवाजा

अगदी अलीकडच्या काळापर्यंत ही पद्धती रूढ होती. पण ती अलीकडे जन्माला आलेली नाही, आज दोन हजार वर्षे तरी अस्तित्वात आहे. जैन, बौद्ध, हिंदू सगळ्या पंथांना ती मान्य होती. तोरणे उभी केल्याचे, गोपूर बांधविल्याचे उल्लेख फार प्राचीन काळच्या शिलालेखातही सापडतात. इ.स.च्या पूर्वीच्या खारवेल राजाने राजधानीचा पुनरुद्धार केला त्यावेळी तोरणे, गोपुरे पुन्हा उभारली. याच वास्तूतील काही काही भाग उचलून चौकटीचा आराखडा तयार झाला. या रूपातही फेरफार होत गेला. काळाप्रमाणे चौकटीला पालटावे लागले. नव्या गावी गेले तर तिथल्या माणसांप्रमाणे आवडीचे दागिने ल्यावे लागले. इतकेच काय पण मंदिर आणि देवमूर्ती यांचा दुरूनसुद्धा संबंध येऊ न देणाऱ्या इस्लामी राज्यकर्त्यांच्या इमारतीत या चौकटीला स्थान मिळाले. अगदी मशिदी वा थडगी यांच्यापर्यंत ती पोचली. त्याच्यातील मूर्तींना काट मिळाली, सगळी जागा नाजूकशा वेलबुट्टीने व्यापली. पण चौकटींचा मूळ आराखडा कायम राहिला. मूळच्या स्वरूपाचे आकर्षण कायम राहिले.

चौकटीचे अस्सल रूप बघावयाचे असेल तर जायला हवे हेमाडपंती देवळात. खास मराठी देऊळ म्हणजे हेमाडपंती. एका रात्रीत किती सहस्र देवालये उभारणारा यादवांचा पंतप्रधान हेमाद्री. हे पुण्य त्याच्या गाठी कोणी व केव्हा बांधले कोणास ठाऊक? पण आज अशी स्थिती आहे की जुने दगडी देऊळ दिसले की हेमाडपंती म्हणावयाचे. खरे म्हणजे पंढरपूरच्या विठोबाच्या देवळाच्या पुनरुद्धारासाठी त्याने पैसा दिला एवढाच हेमाडपंताचा देवळाच्या बांधणीशी संबंध! चौऱ्यांशीच्या लेखात, यादव नृपती रामचंद्र यादव याच्या-बरोबर हेमाद्रीचेही नाव आहे. पण यापलीकडे त्याचा आणि देवळांचा काही संबंध नाही. त्याच्या किती तरी आधी हेमाडपंती घाटाची मंदिरे उभी झाली होती. अंबरनाथ आणि बलसाणे येथील शिवालये ही या घाटाचे अत्यंत देखणे आविष्कार. माळव्यातून ही मंदिरशैली आपल्याकडे आली. मराठेशाहीतल्या मंदिरांपेक्षा या देवालयाचे रूप अगदी निराळे. साध्यासुध्या सपाट भिंती, चुनेगच्ची कमानीचे शिखर यांना त्यात जागा नाही. खांद्याइतके उंच जोते, त्यावर भक्कम दगडी भिंती, नजर पोचेल तेथपर्यंत भिडणारे डौलदार शिखर. प्रत्येक भागावर नाजूक कोरीव काम. गंधर्व-अप्सरा आणि देवदेवता यांच्या कमनीय मूर्ती सर्वांगावर बसविलेल्या. मंडपातील खांब वेगवेगळ्या आकारांचे. त्यांच्यावर नजर ठरणार नाही असे पैलू पाडलेले. त्यांच्या अंगावर दगडी साखळ्या, मौक्तिकमाला यांचा साज चढविलेला. अंधारातच रहाणार पण मुद्दाम बघावा असा मंडपाच्या छताचा घुमट. कमळाच्या फुलासारख्या आकृती एकमेकात गुंफून इतकी वैचित्र्यपूर्ण आकृती तयार केलेली की हे काम दगडाचे का हस्तिदंती

अशी शंका मनात यावी ! हा सगळा पसारा मनोहर तर खराच पण यात आपल्या रूपाने उठून दिसणारी वस्तू म्हणजे दरवाजाची चौकट—द्वारशाखा.

चौकटीचा आकार खूप मोठा आहे. देवाच्या द्वारी नतमस्तक होऊन जाण्याचे बंधन येथे नाही. मान ताठ करून आत जाऊ पहाणारासुद्धा आपल्या रूपानेच नमवील अशी ही चौकट. ते रूप पहायला, डोळ्यांत, मनात साठवून घ्यायला, कितीही वेळ खर्च केला तरी पुरणार नाही. चौकट एकच नाही. तीन, पाच, सात चौकटीही एकमेकींना सांभाळून उभ्या आहेत. या प्रत्येकीला जुन्या शास्त्रात नाव आहे. शाखा किंवा द्वारशाखा. या ओबडधोबड, खडबडीत नाहीत. आखीव, कातीव, दृष्ट लागेल अशा देखण्या आहेत. काळ्याशार पाषाणाच्या. आपले पत्थररूप विसरून देवपण घ्यावयाला सिद्ध झालेला हा पाषाण. याच्यावर रुप्याचा पत्रा नको की सोन्याचा नको.

उंबऱ्याच्या मधल्या भागाला चंद्रासारखा अर्धवर्तुळाकार दिलेला आहे. फार पूर्वी उंबऱ्यालगतच्या पायरीला हा आकार देण्यात येई. त्याच्या भोवती बारीक वेलीची किनार कोरीत मध्येच हंस किंवा मोर गुंफीत. दोन्ही बाजूंला दगडातच सुबक शंख घडविण्यात येत. या पायरीला नाव होते चंद्रशिला. आकाराप्रमाणे नाव. जुन्या जुन्या मंदिरात आणि त्याहीपेक्षा बौद्ध चैत्य मंदिरात चंद्रशिलेचे फार रेखीव नमुने पहावयास सापडतात. ही पद्धत हळूहळू कमी झाली. पण तिची आठवण म्हणून उंबऱ्याचा मधला भाग गोलाकार करू लागले. याच्या दोन्ही बाजूंला दोन तोंडे कोरलेली. शिरे आहेत पण धडे नाहीत. पसरट कानाच्या बटबटीत डोळ्यांच्या या चेहऱ्यांवरचे हास्य मोठे प्रसन्न आहे. त्यांना नाव आहे कीर्तिमुख. ही तोंडे आहेत यक्षांची. ठेंगण्या, अंगाने गरगरीत आणि प्रसन्न मुद्रेच्या किती तरी यक्षमूर्ती सांची, पिळखोरे, मथुरा, इथल्या शिल्पांत दिसतात. प्राचीन काळी धनधान्य लाभावे, लक्ष्मी प्रसन्न रहावी, यासाठी या यक्षांची पूजा करीत. आता मात्र कोणी त्यांची पूजा बांधीत नाही. त्यांना देवाच्या द्वारीच बसवून ठेवतात. अशी यक्षमुखे नसली तर वेलपत्ती कोरतात. कित्येकदा त्यांची जागा पूर्ण कलश किंवा हत्ती यांची आकृती घेतात. विशेषतः कानडी मुलखातील देवळांच्या उंबरठ्यावर या आकृती कोरलेल्या असतात.

सगळ्यात आतल्या चौकटीवर वेलपत्ती. जोमाने वर वर जात थेट गगनाला भिडणारा वेल. त्याला 'अतिबारू' आलेलाच आहे. नाजूक पाकळ्यांची किती तरी फुले त्यावर डोलत आहेत. त्यांना फुटणाऱ्या गोल गोल धुमाऱ्यांतून त्यांचा जोम (गती) व्यक्त होतो. मध्येच कोठे तरी एखादी यक्षाची आकृती या धुमाऱ्यांना लोंबकळताना दिसेल. पण हा वेल फुटतो मात्र फारच अनपेक्षित ठिकाणी. बहुधा एखाद्या बाळसेदार यक्षाच्या मुखातून, क्वचित त्याच्या नाभीतूनही. हे यक्ष ८०१

म्हणजे त्या वेलींच्या देवताच म्हटल्या पाहिजेत. सातव्या-आठव्या शतकात मध्य प्रदेशातील मंदिरात हे वेल कुंभातून वर आलेले दिसतात. दोन्ही बाजूंनी वर येत येत हे वेल भेटतात. ते चौकटीच्या कपाळावर. येथेच 'ललाट बिंब' भाळीचा टिळा येतो. ह्या बिंबावर गणेशाची मूर्ती कोरण्याची पद्धत पुढे रूढ झाली. या पट्टीला नाव मिळाले 'गणेशपट्टी.' पहिल्यापहिल्यांदा मात्र हा मान काही



नक्षीकाम : प्रवेशद्वार

गणरायाचा एकट्याचा नव्हता. महादेवाचे मंदिर असले तर शिवाचीच लहान मूर्ती असे. भुमरा इथल्या गुप्तकालीन मंदिरावर जटाधारी शिवाची फार सुंदर अशी रेखीव मूर्ती दिसते. पुढे शिवाऐवजी त्याचा पुत्र गणपती आला. मंदिर विष्णूचे असले तर विष्णूचीच बारकीशी प्रतिमा कोरण्यात येई. देवगडच्या
 मंदिरावर शेषशायी विष्णूच ललाट बिंबावर आहे. थोड्याशा नंतरच्या काळात

त्या ठिकाणी पंख फडकावीत उड्डाण करणारा गरुडराज येऊन बसला. ऐहोळे बदामी अशा कानडी मुलखातील सहाव्या शतकातील मंदिरातून यातच आणखी बारकावा आणलेला असतो. गरुडाच्या दोन्ही पायांत दोन नागांची शेपटे देऊन त्यांना खालपर्यंत सोडण्यात आले आहे व चौकटीच्या जवळजवळ तळाशी, अर्धपुरुष रूप असे नाग विष्णूची करुणा भाकताना दिसतात. देवीचे देवालय असले तर त्यावर बहुधा गजलक्ष्मीची मूर्ती असे. दोन्ही हातांत कमळे घेऊन कमळावरच बसलेली देवी. तिच्या दोन्ही बाजूंला उभे असणारे गजराज आपल्या सोंडेतील कळशीतून तिच्यावर अभिषेक करतात. स्वतःला हारितीपुत्र म्हणविणारे कल्याणीचे चालुक्य राजे आपल्या मंदिराच्या ललाट बिंबावर ही गजलक्ष्मीच खोदवीत. हीच देवता श्री किंवा पद्मा नावानेही ओळखली जाई. बौद्धानुयायांनी तर ती मायादेवीचीच मूर्ती आहे असे ठरविले होते. गौतमाचा जन्म झाल्या-बरोबर त्याच्या मातेला, मायादेवीला, दोन गजांनी स्नान घातल्याची आख्या-यिका आहे व तीच येथे मूर्तिमंत स्वरूपात पहावयास सापडते अशी समजूत. भारहूत, सांची, अमरावती यांसारख्या ठिकाणी दोन हजार वर्षांचे जुने स्तूप आहेत. त्यांची तोरणे व कठडे यावर या गजलक्ष्मीची किंवा मायादेवीची अनेक रेखाटणे आहेत. म्हणूनच मंदिराच्या गणेशपट्टीवर दिसणारे गजलक्ष्मीदेवीचे चिन्ह कोरतात.

दुसरी चौकट गंधर्व व अप्सरा यांची. गणेशपट्टीच्या वर जी आडवी पट्टी येते तिच्यावर सहसा आकाशगामी गंधर्व दिसतात. हातात माळा घेऊन ते ललाट बिंबाकडे जाताना दाखविलेले असते. इतर ठिकाणी कोणी सनईसारखे वाद्य वाजविती, कोणी मृदंग तर कोणी झांजा. कोणी अप्सरा नृत्य करण्यात मग्न तर कोणी आपल्या सख्याला बिलगलेली. इंद्रदरबारचे सारे वैभव इथे उभे केले आहे. आकाशीचा स्वर्ग आणि तिथली सुखे यांची साक्षात कल्पना यावरून यावी. सगळ्या मूर्ती ठसठशीत, कमनीय बांध्याच्या, चौकटीच्या नावाला शोभणाऱ्या. या शाखेला म्हणतात रूपशाखा.

डोळ्यांत सहज भरावे असे घडीव खांब याच्या बाहेर कोरलेले असतात. चौकोनी, अष्टकोनी, गोल असे आकार वेगवेगळ्या भागांना दिलेले. त्याच्याच मध्ये कोठे तरी दिसतो पूर्णघट, हा पाण्याने काठोकाठ भरलेला आहे आणि ह्या जीवनावर पोसलेली नाजूक पालवी चारी बाजूंनी बाहेर ओसंडत आहे. समृद्धीचा निदर्शक असा हा कलश. प्रत्येक मंगल कार्यात हटकून असणारा. या खांबाच्या आधारानेच एक छपरासारखा दिसणारा भाग थोडासा पुढे डोकावतो. छप्पर म्हणण्यापेक्षा याला मजला म्हटले तर जास्त शोभून दिसेल. याच्या माथ्यावर सुबक अशा देवळ्या किंवा कोनाडे कोरतात. बारीकसे स्तंभ आणि

त्यांना शोभेशी छोटेखानी शिखरे एवढा पसारा. यात शंकर, पार्वती, विष्णू, लक्ष्मीदेवी, ब्रह्मा, नरसिंह अशा देवदेवतांच्या प्रतिमा बसविलेल्या असतात. गाभाऱ्यात कोणाही देवाला बसविलेले असले तरी इतर देवदेवतांचा विसर न व्हावा म्हणून ही योजना. स्वर्गीच्या सगळ्या देवतांना इथे आणून बसविले आहे. खानदेशातील बलसाण्याच्या मंदिरातील हा देवलोक अत्यंत प्रेक्षणीय आहे.

दाक्षिणात्य म्हणजे द्रविड शैलीचा थोडाफार प्रभाव असणारी जी मंदिरे त्यांत थोडासा बदल केलेला आढळतो. स्तंभावर देवलोक उभारण्याऐवजी मकर-तोरण बसविण्यात येते. खांबाच्या माथ्यावर मकर (मगर), पण या मगरीचे पुच्छ काटयांनी भरलेले नाही तर तिला मोरासारखा मऊसूत लांब पसरत जाणारा पिसारा असतो. असा प्राणी प्रत्यक्षात दिसणार नाही एवढीच तक्रार असली तर त्याची जडणघडण इतकी बेमालूम केलेली आहे की, यातले खोटे जाणवेनासेच होते. त्या पिसाऱ्याच्या लहरी आणि वलये नजर खिळवून टाकतात. मकरांनी आपला प्रचंड जबडा उघडून धरलेला असतो आणि त्यातून बाहेर पडणाऱ्या वेली दाराच्या माथ्यावर एकत्र मिळतात. या संगमावर कीर्तिमुख कोरतात. क्वचित कोठे, मकराच्या पाठीवर छोटेसे यक्ष माहुतासारखे बसलेले दिसतात. सध्या स्वागतासाठी कमानी उभारतात तशीच ही मकर-तोरणे देवालयाच्या प्रवेशद्वारावर उभारण्याची प्रथा होती. गुजराथेत आणि ओरिसात आजही अशी तोरणे काही ठिकाणी टिकून आहेत. पुढे पुढे स्वतंत्र तोरणे उभारण्याऐवजी ही दरवाजाच्या चौकटीतच सामावून घेण्यात येऊ लागली. मकर-तोरणाच्या

नक्षीकाम : चौकट





खांबावरील नक्षीकाम

खालच्या बाजूला तोरण व गणेशपट्टी यांच्या मधोमध जो अर्धचंद्राकार भाग रिकामा रहातो त्यात देवतांच्या मूर्ती कोरण्यात येतात. बदामी चालुक्यांनी बांधविलेल्या पट्टडकल येथील मंदिरात मकर-तोरणयुक्त चौकटी आहेत. अशी तोरणे असली म्हणजे त्यांच्या बाहेरच्या बाजूला स्तंभशाखा घडवीत.

याच्या बाहेरची चौकट असते तिला रत्नशाखा म्हणतात. ही थोडीशी अरुंद असते. गोल चौकोनी अष्टकोनी अशा आकारांची रत्ने कोरावयाची व त्यांची एक अखंड माला या चौकटीच्या सजावटीसाठी योजावयाची.

सगळ्यात बाहेरच्या बाजूला जी चौकट यावयाची ती सगळ्यात निराळी वाटेल अशी. पुढचे पाय उराशी घेऊन जोराने पुढे झेप टाकणारे व्याल यावर कोरतात. व्याल हा एक सिंहासारखा दिसणारा काल्पनिक प्राणी. त्याला अनेक रूपे देतात. केव्हा त्याचे तोंड माणसासारखे असेल तर केव्हा हत्तीसारखे. परंतु

रूप कोणतेही असले तरी एक गोष्ट सगळ्यांना समान असते. ती म्हणजे त्यांच्या उसळीत असणारा जोम.

इतक्या थोरल्या चौकटी असल्या तरी भागत नाही. दर वेळी हाच क्रम ठेवता येईल असेही नाही. कोठे कमळाच्या पाकळ्यांची माळ दिसेल, कोठे पास वृक्षांच्या पानांचा हार दिसेल तर काही जुन्या देवळांच्या चौकटीवर माडाच्या झाडासारखे खवले कोरलेले दिसतील. एकमेकांवर उखळे रचून ठेवलेली आहेत असे वाटावे असेही काही स्तंभांचे रूप असते. पण ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, हे सगळे वैविध्य चौकटीचे मूळ रूप कायम ठेवूनच आणण्यात येते, त्याच्या बदल्यात नव्हे.

चौकटीचा व्याप इतका वाढल्यावर एकच पहारेकरी कसा पुरणार? प्रत्येक चौकटीच्या पायाशी त्यांच्यापैकी एकेक उभा केला आहे. मधल्या खांबासमोर त्यांचा नायक, हातात गदा किंवा त्रिशूल घेतलेला. उभे रहाण्याचा सगळ्यांचा थाट सारखाच—एक पाय गुढग्यात मोडून दुसऱ्यासमोर ठेवलेला, अंगाखांद्यावर मोत्यांच्या माळा, कानांत कुंडले, माथ्यावर रत्नजडित मुकुट, डाव्याउजव्या हाताला देवावर चवरी ढाळणाऱ्या सेविका पुष्ट देहाच्या, गोंडस बांध्याच्या, त्यांचा कमरेत किंचित वाकून उभे रहाण्याचा डौल तर असा की, लालित्य म्हणजे काय ते एकदम कळावे. इथेही दागदागिन्यांचा सोस नाही. कमतरता असलीच तर फक्त एकाच गोष्टीची आणि ती म्हणजे वस्त्रांची. यांपैकीच एखाद्या मूर्तीच्या पायाखाली मकर नाही तर कासव असले की, ती झाली गंगा किंवा यमुना. त्यांच्या वाहनावरूनच त्यांना ओळखावयाचे. बाकी शरीरयष्टी अलंकरण यात काहीच भेद नाही. गुप्त राजघराण्याच्या काळातील मंदिरात गंगा आणि यमुना यांच्या या मूर्ती खूपच मोठ्या असत. चौकटीच्या पायथ्याऐवजी वरच्या कोपऱ्यानजीक त्या असत. पुढे मंदिराच्या दरवाजाऐवजी सबंध मुखदर्शनाच्याच दोन्ही बाजूंला अशा मूर्ती कोरण्यात येत. वेरूळला 'रावण की खाई' या नावाने ओळखण्यात येणाऱ्या गुंफेसमोर गंगा यमुनांच्या अशा फार नयनमनोहर प्रतिमा आहेत. नंतरच्या काळात त्यांचे महत्त्व कमी होत गेले. अनेकांपैकी एक एवढेच स्थान शिल्लक राहिले.

वर्णन करताना या प्रत्येक चौकटीचे व तिच्या वरच्या रूपकांचे स्वतंत्र वर्णन करावयास हवेच. प्रत्यक्ष बघताना मात्र ही पृथगात्मता जाणवत नाही. सगळे मिळून एकच चौकट आहे असे वाटावे अशीच कलाकाराची किमया आहे.

हा सगळा पसारा कशासाठी मांडला आहे? निव्वळ कलाकुसर म्हणून? डोळ्यांना सुख व्हावे म्हणून? वरवर पाहिले तर वाटेलही तसे. पण मनाची खात्री पटणार नाही. थोडा खोल खोल विचार करावा असे वाटते. सगळ्यांची

संगती जुळविता येते. पण नुसत्या नजरेने ती जुळणार नाही. मनाने, बुद्धीने उमजून घ्यावयास हवी. रत्ने, माणके ही भूदेवीच्या पोटातील अमोल संपत्ती, चैतन्याने बहरलेले वेल आणि वनस्पती, जोराने उसळ्या मारणारे वाघ, सिंह, व्याल, आकाशगामी गंधर्व आणि अप्सरा, धनाचे, स्थलाचे, जलाचे, रक्षण करणारे यक्ष आणि यक्षी, स्वर्गातील देव आणि देवता यांच्या पुढे नतमस्तक झालेला मानवप्राणी हा सर्व चराचराचा पसारा या चौकटीत नीटपणे सामावून घेतला आहे. त्यांच्या जोडीला पावित्र्याची-मांगल्याची प्रतीके आहेत. पूर्णकलश, गंगा-यमुना अशी, अशा या चौकटीच्या ललाटी सौभाग्याचे देखणे बिंब आहे.

पूजा बांधावयाची तो देव कोणता का असेना, त्याला देवपण लाभले आहे ते या सृष्टीच्या चौकटीत, कोंदणात.






लेखक : **श्री. गोपाल नीलकंठ दांडेकर**

काही दैवते प्रादेशिक असतात. काही देशभराची. राम, कृष्ण, महादेव इत्यादी दैवते सर्वत्र पूजिली जाणारी. यांवेगळी काही दैवते कर्नाटक आणि महाराष्ट्र याच प्रदेशांमध्ये पूजिली जातात. उदाहरणार्थ खंडोबा, भैराळ. अन्यत्र पूजिली जाणारी काही ग्रामदैवते महाराष्ट्रात पूज्य मानिली जातात पण त्यांची नावे आणि स्वरूप यात थोडा भेद आढळतो. नावांतील भेद हे कदाचित भाषाभेदामुळे असावेत. जसे मरीआई हे दैवत मरीमाता या नावे उत्तरेत ओळखले जाते. उत्तरेत मरीआईचे स्वरूपही थोडे वेगळे. बलिदानाच्या पद्धतीतही थोडा फरक.

अप्सरा या जलदेवता. महाराष्ट्रामध्ये त्या साती आसरा म्हणून ओळखल्या जातात. कोकणात मानाय, झोलाय, सातमाय अशा काही स्थानदेवता आहेत. रवळनाथ हे दैवत केवळ कोकणातच लोकप्रिय आहे.

कित्येक महाराष्ट्रिक दैवते उंच डोंगरात, अतिशय दुर्गम स्थळी विराजली आहेत. त्यांच्यापर्यंत जाऊन पोचणेच कष्टाचे काम आहे. पन्हाळ्याजवळची मेसाई पठाराच्या अगदी एका टोकाला, ऐन कड्यावर वसली आहे. वाई आणि सातारा यांमधील भैरुलिंग असेच अवघड डोंगरात आहे. जरंड्याच्या मारुतीचे दर्शन घ्यायचे म्हणजे अशातशाच्या तोंडी फेस येतो.

तोरण्याहून रायगडाकडे मधल्या वाटेने निघाले, म्हणजे डोंगरदऱ्यांच्या दाटीत शिंगापूर नामक गाव लागते. त्याच्या माथ्यावर, ऐन दऱ्याच्या तोंडाशी मरीआईचे ठाणे आहे. ही मरीआई त्या रहाळात अतिशय लोकप्रिय आहे.

श्रीशिवछत्रपतींनी बालपणीच महाराष्ट्र राज्य स्थापनेची शपथ ज्या रायरेश्वरी केली होती, ते स्थान अशीच एक मुश्कील स्थलयात्रा आहे. रायरेश्वराच्या दक्षिणेस केंजळगड आहे. कड्यात आडव्या पायऱ्या तासून त्या किल्ल्यावर चढायची वाट तयार केली आहे. सगळेच काम थक्क करून टाकणारे.

तिथून उत्तरेकडल्या रायरेश्वराची वाट डोंगरमाथ्यावरून जाते. ऐन रायरेश्वराचा माथा सुरू होतो, तिथे वाट बिकट आहे. पूर्वी या सर्व प्रदेशावर भोरकरांची सत्ता होती, तोवर तिथं कड्यावर लोखंडी गज लावले होते, त्यांना धरून वर चढता येत असे. आता स्वराज्य झाले असल्याने भोरकर विलीन झाले. गजबीज सगळे पडून गेले. जीव मुठीत धरून तिथून चढावे लागते. रायरेश्वराकडून पूर्व दिशेला उतरणारी वाघदऱ्यातली वाट तर केवळ परीक्षा पहाणारी आहे.

वायदेशचा मांढरदेव, फलटणजवळचे शिखर शिंगणापूर, डाकिनी क्षेत्रातले भीमाशंकर, कुंवारगडावरची कुमारीदेवी इत्यादी सर्व स्थळं यात्रिकाच्या हिंमतीची परीक्षा पहाणारी.

खास महाराष्ट्रिक रंगरूप लेऊन बसलेली आणखी काही स्थळे एक तर स्वभावाने उग्र आहेत किंवा त्यांची ठावठिकाणे स्वभावापेक्षाही दुर्गम आहेत.

राहुरी तालुक्यात वरवंडी नामक एक खेडे. एरवी अगदी दुर्लक्ष करावे असे. अगोदरच नगर हा दुष्काळी जिल्हा. त्यात राहुरी तालुका म्हणजे दुष्काळाचे गर्भगृह. हिवर, सौंदड, खुरटी, बाभूळ असल्या क्षुद्र झाडांपलीकडे रानात काहीही उगवायचे नाही. आता मुळा धरणाने त्या तालुक्याची कळा अजिबात बदलून टाकली आहे, ती गोष्ट निराळी. ते वरवंडी गाव त्या रहाळात प्रसिद्ध आहे. तिथल्या मरीआईच्या स्थानासाठी. ते ठाणे जागृत आहे, असा तत्रस्थांचा समज आहे. मरीआई वसली आहे उघड्याबोडक्या माळावर.

देऊळ नव्हेच ते. एक ओटा आहे आणि त्यावर एक देवळी. त्या देवळीत अंगी शेंदूर माखलेली मरीआई. एकच नाही, साताठ रूपे आहेत. या स्थानिक देवतांचा हा एक विशेष आहे. मूर्ती नसते, असतात शेंदूर माखलेले दगड, मात्र संख्येने ते अनेक असतात.

मरीआईला खारा नवस बोलावा लागतो. म्हणजे कोंबड्याबकऱ्यांचा. देवीचे पुजारी भिल्ल आहेत. मारलेल्या कोंबड्याबकऱ्यांत त्यांचा वाटा असतो. बकरे कापले की मुंडके, एक फरा आणि पावली, इतके पुजाऱ्याला द्यायचे.

नवसकरी बैलगाड्यांमधून येतात. ज्या मुलासाठी नवस बोलला गेला होता ते मूल, आईबाप, इष्टमित्र, शेजारीपाजारी. गाडीत स्वयंपाकाचे साहित्य असते. नवसाचे बकरे गाडीमागे बांधलेले असते. आपली ही मिरवणूक कशासाठी निघाली आहे, याची त्याला लवमात्र जाणीव नसते.

मरीआईपाशी पोचल्यावर मुलाला देवीच्या पायांवर घालतात. म्हणजे देवीसमोर नमस्कार करायला लावतात. पुजारी त्याच्या भाळी देवीचा अंगारा लावतात. तंवर मुलाणी तयार असतो. तो बकरे 'लावतो'. म्हणजे त्यास खाली पाडून, मान पिरगळून ती चरचरा चिरतो. नवसकरी रक्ताचा टिळा देवीवर

लावतो. फरा अन् मुंडके पुजाऱ्याचे. लगेच बकरे सोलले जाते. साफ करणे, तुकडे करणे.

तंवर स्वयंपाकाच्या चुली पेटतात, सरपण बरोबर आणलेलेच असते. तीन दगडांच्या चुलीवर भाकरी भाजल्या जाऊ लागतात. वरासा दगड पाहून मसाला वाटला जातो. भल्या थोरल्या बोगोण्यात बरबट शिजते. तिखटजाळ.

मग पंगती पडतात. मंडळी धापेस्तंवर जेवतात. दिवस कलतो. आवरासावर करून मंडळी गावाकडे परतू लागतात. हे असे शेकडो हजारो नवस मरीआईपुढे दरवर्षी फेडले जातात.

संत गाडगेबाबांनी या बलिदानाविरुद्ध खूप प्रचार केला. कीर्तने करून त्यांनी सगळा रहाळ जागवला. त्यांच्याच प्रेरणेने मरीआई शेजारीच पांडुरंगाचे एक देऊळ उभारले गेले. बाबांच्या प्रचाराचा परिणाम होऊन देवीपुढे पडणाऱ्या बकऱ्यांच्या संख्येत काही थोडी घट झाली. पण बाबा गेले आणि आता मरीआईपुढे पुन्हा बकरी लागतात. पांडुरंगाच्या देवळात भजन होते.

मरीआईचे खाणे असे उग्र, तर गडदेच्या बहिरीचा मुक्काम डोळे फिरवणाऱ्या ठिकाणी.

खंडाळा घाटातून कर्जतकडे उतरू लागले की अगोदर उजव्या हातास दिसतात राजमाचीचे दोन बालेकिल्ले. पश्चिमेकडला मनरंजन आणि पूर्वेकडील श्रीवर्धन. या बालेकिल्ल्यांपलीकडे उभा सुळका दिसतो, त्याचे नाव मांजरसुम्याचा डोंगर. त्याच्या ईशान्येकडे एक प्रचंड आडवा डोंगर पसरला आहे. दक्षिणेच्या अंगास, माथ्यापाशी एक बारका आणि निम्म्यात एक डगळ असे दोन सुळके आहेत. हा ढाकचा किल्ला.

त्याचा पश्चिमकडा अदमासे साडेतीन हजार फूट उंच आहे. मैलभर लांबीचा. दक्षिणेकडील सुळका आणि हा कडा, यांच्या चिंचोळ्या सापटीतून अनगड वाट उतरते, ती कड्याच्या पोटात पोचते. पुढे ती त्या उभारातच अदमासे दोनशे फूट आडवी धावते आणि तिथे संपते. तिथून ऐन कड्यात खोदलेल्या, माथ्यावर चढणाऱ्या खोबणी. अदमासे पन्नास ते साठ फूट. त्या संपतात, तिथे कड्यात एक वाळले झाड उभे करून ठेवले आहे. वर चढण्यासाठी त्याला खोबणी ठेवल्या आहेत. ते झाड संपते, तिथे एक वेल टांगलेला वरून उतरला आहे. अदमासे पंचवीस फूट लांबीचा. त्याला लोंबकळून वर येंगावे. तो संपतो, तिथे आपला पाय एका गुहेत ठेवला जातो.

आडवी गुहा अदमासे तीस फूट लांब, पंधरा फूट रुंद आणि दहा फूट उंच. हिच्या शेजारी याच मापाची आणखी एक गुहा. पैकी अलीकडील गुहेत उत्तर बाजूस बहिरी या ग्रामदेवतेचे ठाणे आहे. शेंदूर माखलेले चारसहा धोंडे. शेजारी

खोचून ठेवलेले काही त्रिशूल. पूर्वेकडे, आतील बाजूस आहेत दोन पाण्याची टाकी. थंडगार, निवळ शंख पाण्याने भरलेली.

गुहेच्या तोंडाशी येऊन उभे रहावे आणि पायांतळी पहावे. क्षणभर मन शहारून येते. त्या तीन हजार फुटी कड्यात आपण उभे असतो. एक पाय तळ्यात, एक पाय मळ्यात, अशा वाटेने वर चढून आलेले असतो. क्षणभरानंतर दृष्टी स्थिरावते आणि ज्याने या बिकट ठिकाणी या दैवताची स्थापना केली, त्याच्याविषयीच्या आदराने मन भरून येते. कसे अलौलिक ठिकाण निवडले त्याने? या ठिकाणी बहिरीचे ठाणे मांडावे, ही कल्पना तरी त्याच्या मनी कशी निर्माण झाली?

दृष्टी समोर फेकावी, तो केवढा प्रचंड प्रदेश पसरलेला आढळतो. डाव्या हातास खंडाळ्याचे नागफणीचे नाकाड. त्याच्या उजवीकडे माणिकगड. त्याच्या उजव्या बाजूस कर्नाळा. उत्तरेकडे माथेरानचा प्रचंड डोंगर. मागे प्रबळ आणि पेब ही किल्ल्यांची जोडी. अगदी उत्तर-पश्चिमेस मलंगगड. पायथ्याशी विस्तारलेला कर्जत तालुका. झिलमिल वहाणारी उल्हास नदी. समोरच्या डोंगरातून कर्जतकडे उतरणारी रूळवाट.

अशा या दुर्गम पोहोचे पलीकडील स्थळी बहिरी विराजतो आहे.

बहिरी म्हणजे भैरव. गडदेतला बहिरी म्हणजे गुहेतला भैरव.

भैरव हे दैवत मोठे कडक. स्त्रिया त्याच्या दर्शनाला जात नाहीत. केवळ पुरुषांनीच जायचे. तेही स्नान करून, शुद्ध होऊन. कुणाच्या घरी बायको बाहेरची असली, तर त्यानेही बहिरीला जायचे नाही. गेले तर चढता-उतरता अपघात होतो. माणूस तीन हजार फूट खाली एखाद्या धोंड्यावाणी गडगडत जातो.

बहिरीला गोडा आणि खारा दोन्ही नैवेद्य चालतात.

गोड्या नैवेद्याला खीरभोजन असे नाव आहे. दुधातांदळाची खीर करायची आणि निवद दावायचा. दूध, स्वयंपाकाचे साहित्य, लाकूडफाटा, सगळे त्या अवघड वाटेने स्वतःच्या डोक्यावरून न्यायचे. त्या लाकडावरून त्या वेलाला लोंबकळून.

पण याहून अधिक तऱ्हा आहे ती खाऱ्या नैवेद्याची. बकऱ्याचा नवस असेल, तर त्याचे चारी पाय बांधायचे, ते गळ्यात अडकवायचे. त्या जीवघेण्या वाटेने दोन जीव वर चढवायचे. एक आपला आणि दुसरा बकऱ्याचा.

वरच कापायचे, सोलायचे, सगळे संस्कार करायचे.

आणि शिजवायचे कशात?

पाण्याची दोन टाकी असल्याचा उल्लेख वर केला, त्यांपैकी एका टाक्यात कधी काळीची तांब्याची भली थोरली भांडी ठेवली आहेत. पराती, बोगोणे, हंडा, ताटे, पळे, कळशा—अन् काय काय! कुणी ती ठेवली ते माहीत नाही!

ती टाक्यांतून बाहेर काढायची. अन्न शिजवायचे. जेवण करायचे. मग पुन्हा घासून ती तिथल्या तिथे ठेवून द्यायची !

आज कित्येक वर्षे हा नेम पाळला जातो आहे. त्या भांड्यांना हात लावायचे कुणी मनातही आणीत नाही.

त्याला ठावे असते, की हा महाराष्ट्र देश उग्र आहे आणि त्याची दैवते परम उग्र आहेत. त्याच्या डोंगरदऱ्यांसारखी !





# नरसिंहपूरचा नारसिंह

लेखक : **श्री. कृ. भा. बाबर**

नारसिंह हा देवाचा एक अवतार आहे. जेव्हा धर्माला ग्लानी येते, उतरती कळा लागते आणि अन्याय माजू लागतो, तेव्हा धर्माची पुन्हा स्थापना करण्यासाठी आणि अन्याय दूर करण्यासाठी देव अवतार घेतो, अशी हिंदु लोकांची समजूत आहे. आजवर नऊ वेळा असा अवतार देवाने घेतलाही आहे. मत्स्य, कूर्म, वराह, नारसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण आणि बौद्ध असे हे नऊ अवतार प्रसिद्ध आहेत. नारसिंह हा ह्यांपैकी चौथा अवतार आहे.

नारसिंह शब्द नृसिह असाही वापरतात. नृ किंवा नर म्हणजे पुरुष—मनुष्य. नृसिंह किंवा नारसिंह म्हणजे मनुष्य आणि सिंह यांचे एकत्र रूप. देवाचा नारसिंह हा अवतार अशाच प्रकारचा होता. त्याचे शरीर माणसाचे होते पण वरचे डोके सिंहाचे होते.

देवाने असा अवतार धारण करायला कारणही तसेच झालेले होते. फार पूर्वीच्या काळी हिरण्यकश्यपू नावाचा एक दैत्य होता. ह्या हिरण्यकश्यपूने उग्र म्हणजे अगदी कडक तपश्चर्या करून एकदा शंकराला प्रसन्न करून घेतले होते. महादेवाने त्याला वर मागायला सांगितले. तेव्हा त्याने वर मागितला की मला माणसाकडून किंवा जनावराकडून मरण येऊ नये, मला घरात किंवा दारात मरण येऊ नये आणि मला दिवसा किंवा रात्री मरण येऊ नये तसेच कोणत्याही हत्याराने मला मरण येऊ नये. देवाने 'तथास्तु' म्हणजे तसे होवो म्हणून सांगितले.

झाले, तेव्हापासून हिरण्यकश्यपू हा दैत्य फार प्रबळ झाला. आता आपण कधीच मरणार नाही, अशी त्याची खात्री झाली व त्यामुळे तो माजला. कोणालाच जुमानीनासा झाला. पृथ्वीवरील सर्व लोकांना त्याची भीती वाटायला लागली. देवसुद्धा त्याला घाबरायला लागले.

ह्या हिरण्यकश्यपूला प्रल्हाद नावाचा मुलगा होता. तो दैत्यकुळात जन्माला आला असला, तरी तो देवाच्या बाजूचा होता. तो विष्णूचा भक्त होता. देव आणि दैत्य यांचे सततचेच वाकडे. अशा स्थितीत आपला मुलगाच आपल्या शत्रूच्या बाजूला गेलेला बघून हिरण्यकश्यपूला वाईट वाटले, रागही आला. त्याने प्रल्हादाला शिकविण्यासाठी एका गुरुजीची नेमणूक केलेली होती. त्या गुरुजीने प्रल्हादचे मन वळविण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केले, पण उपयोग झाला नाही.

शेवटी हिरण्यकश्यपूने प्रल्हादाला ठार मारून टाकण्याचे ठरविले. त्याने त्याला आपल्या नोकराकडून डोंगराच्या कड्यावरून लोटून दिले, पण देवाने–विष्णूने त्याला अलगद झेलले. नंतर त्याला समुद्रात बुडविले, तरी देवाने त्याचे रक्षण केले आणि शेवटी त्याला अग्नी पेटवून त्यात ढकलून दिले, तरी त्याला काही झाले नाही. तेव्हा हिरण्यकश्यपूला आश्चर्य वाटले व त्याने प्रल्हादाला विचारले की, 'तू ज्याचा जप करीत असतोस तो तुझा विष्णू, तो तुझा देव आहे तरी कोठे?' तेव्हा प्रल्हाद म्हणाला, 'तो माझा देव सगळीकडे भरलेला आहे, तो नाही असे ठिकाणच नाही.' तेव्हा हिरण्यकश्यपूने समोरच्या खांबाला लाथ मारली आणि 'ह्यात तुझा देव आहे का?' म्हणून विचारले. प्रल्हादाने 'होय, आहे.' म्हणून सांगितले. त्याबरोबर एकदम चमत्कार झाला. कडाड असा आवाज झाला आणि खांब दुभंगून त्यातून नारसिंह प्रकट झाला. त्याने हिरण्यकश्यपूला उचलून आपल्या मांडीवर घेतले व उंबऱ्यावर बसून आपल्या तीक्ष्ण नखांनी त्याचे पोट फाडून त्याला ठार केले.

ही वेळ संध्यासमयाची होती म्हणजे सूर्य मावळत होता. धड रात्र नव्हती आणि धड दिवसही नव्हता. नारसिंह उंबऱ्यावर बसलेला होता, त्यामुळे तो धड घरात नव्हता आणि बाहेर दारातही नव्हता. शिवाय तो स्वतः धड माणूस नव्हता किंवा धड जनावरही नव्हता. आणि त्याच्या हातात हत्यार नव्हते. तेव्हा देवाने हिरण्यकश्यपूला दिलेला वर काही मोडलेला नव्हता.

अशा प्रकारचा हा पराक्रमी नारसिंह देवाचा अवतार होऊन राहिलेला आहे. जगाला भारी झालेल्या सगळीकडे अन्यायाचे थैमान घातलेल्या हिरण्यकश्यपू राक्षसाला मारून त्याने जगात समाधानाचे वातावरण निर्माण केलेले आहे.

ह्या नारसिंहाचे देऊळ आजच्या सांगली जिल्ह्यातील वाळवे तालुक्यात नरसिंहपूर या गावी आहे. ह्या गावाला बहे नरसिंहपूर म्हणतात किंवा कोळे नरसिंहपूर म्हणतात. कारण ह्या गावाच्या दक्षिणेला बहे हे गाव आहे व उत्तरेला कोळे हे गाव आहे.

नरसिंहपूर हे गाव कृष्णा नदीच्या काठावर पूर्वेच्या बाजूला वसलेले आहे. नदीला ह्या गावाजवळ मोठा डोह आहे, तथापि गावाला एक चांगला घाट

बांधलेला असल्याने चांगली सोय झालेली आहे. ह्या घाटाला लागूनच वरच्या बाजूला नारसिंहाचे देवालय आहे.

ह्या देवालयाचे वर्णन नरसिंहपूरच्या रहाणाऱ्या पण इस्लामपूर येथे वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या डॉ. श्री. भगवंतराव कुलकर्णी यांनी आपल्या 'श्रीक्षेत्र कोळे नरसिंहपूर' ह्या पुस्तकात पुढीलप्रमाणे केलेले आहे :

येथील श्रीनृसिंहाचे देवालय अत्यंत जुने म्हणजे इ.स. १२७३ च्या सुमाराचे हेमाडपंती धाटीचे असून त्यास पूर्व, पश्चिम व उत्तर असे तीन दरवाजे आहेत. उत्तर द्वारावर छोटासा दुमजला असून त्यावर नगारखाना आहे. पश्चिम दरवाजा-जवळ भुयारात जाण्याचा रस्ता आहे. नेहमी जाणाऱ्या माणसासही दिव्याशिवाय भुयारातून देवापर्यंत जाणे कठीण पडते. परंतु हल्ली गावात विजेचे दिवे आल्या-मुळे व देवालयातही भुयारातून विजेचे दिवे देवापर्यंत नेले असल्यामुळे ही अडचण दूर होऊन देव व देवालय ह्यांना एक आगळीच शोभा निर्माण झाली आहे. भुयारात उतरताना प्रथम नऊ पायऱ्या उतराव्या लागतात. त्यांपैकी अगदी प्रथम दर्शनी पायरीवर एक शिलालेख आहे. त्यावर फक्त तीन पिढ्यांतील लोकांची नावे आहेत. यापेक्षा जास्त उल्लेख काहीही नाही. पण हा उल्लेख लक्षात घेतला तर देवालयाचे बांधकाम तीन पिढ्यांपर्यंत चालले असावे किंवा बांधकामात तीन पिढ्यांनी भाग घेतला असावा, अशी कल्पना करता येते.

पायऱ्या उतरल्यानंतर एक दरवाजा लागतो व त्यानंतर २८'×२८'×२०' असा एक दगडी मंडप लागतो. त्यास 'श्रीअंबाबाई मंडप' म्हणतात. कारण ह्या मंडपातील एका कमानीत जगदंबेची सुबकशी गारेची मूर्ती बसविलेली आहे. चार भव्य दगडी खांबांवर ह्या भूमिगत मंडपाची उभारणी केली आहे. उजेड व हवा येण्यासाठी ह्या मंडपाच्या भिंतींत ९'×१०' उंचीवर दक्षिणेस व उत्तरेस असे दोन झरोके ठेवले आहेत. मंडपाच्या ज्या बाजूच्या भिंतीतील दरवाजातून आपण आत उतरतो, त्याच्या समोरच्या भिंतीस परंतु विरुद्ध दिशेच्या कोपऱ्यात, पुढे जाण्याचा मार्ग (दरवाजा) आहे. त्यातून आत गेल्यावर ३' रुंदीचा व ६' उंचीचा रस्ता लागतो. त्यातून थोडे पुढे गेल्यावर दोन फूट लांबी रुंदीचा भुयारात उतरण्याचा, आडाच्या तोंडासारखा, एक दरवाजा लागतो. त्यास सहाणे म्हणतात. ह्या सहाण्याशेजारी असलेल्या भिंतीतील एका कोनाड्यात एक भंगलेली मूर्ती आहे. ती मुसलमानी अमलातील एका मूर्तिभंजक राजाने फोडलेली असल्याची एक दंतकथा प्रचलित आहे. दुसऱ्या कोनाड्यात असलेल्या गवाक्षातून (व्हेंटीलेटर-मधून) अगदी शुद्ध हवा आत घेतली आहे. सहाण्यातून आत उतरल्यावर चार पायऱ्या उतरून जाव्या लागतात. नंतर पुन्हा वरीलप्रमाणे ३' रुंदीचा व ६' उंचीचा रस्ता लागतो. त्या मार्गाने काही अंतर चालून गेल्यावर व एक दोन

वळसे घेतल्यावर आणखी एक दरवाजा लागतो. त्यातून आत जाताना दरवाजाच्या डोक्यावर एक कोनाडा आहे. त्यातही वर उल्लेखिल्याप्रमाणे दुसऱ्या एका गवाक्षाचे तोंड आहे. या दरवाजातून थोडे पुढे गेल्यावर प्रत्यक्ष देवाच्या गाभाऱ्याचा दरवाजा लागतो. त्यातून आत गेल्यावर दहा फूट लांबी रुंदीचा व बारा फूट उंचीचा असा गाभारा लागतो. या गाभाऱ्याच्या भिंतीत एक मोठी कमान असून तीमध्ये 'नृसिंहप्रभू'ची भव्य मूर्ती आहे. मूर्तीच्या डोक्यावरही एका गवाक्षाचे तोंड आहे. शिवाय मूर्तीच्या समोरच्या भिंतीतही एक गवाक्ष आहे. प्रत्यक्ष देवाची मूर्ती भुयारात ज्या ठिकाणी आहे, त्याच्या बरोबर वरच्या बाजूच्या सभामंडपात दोन तुळशी वृंदावने आहेत. पैकी एक वृंदावन भुयारात प्रत्यक्ष देवाची मूर्ती आहे त्याच्यावर आहे व दुसरे देवाच्या समोरच्या भिंतीत आहे. हे दुसरे वृंदावन वरपासून खालपर्यंत पोकळ आहे. हेच वर उल्लेखिलेले एक गवाक्ष होय. याची विशिष्ट रचना अशी आहे की, यातून वरच्या बाजूने सुपारी टाकली तर एक-दोन टप घेऊन देवाच्या पायावर जाऊन पडते. अशा तऱ्हेचे विस्मयकारक बांधणीचे व खालपर्यंत शुद्ध हवेचा पुरवठा करणारे हे भुयार जमिनीच्या पृष्ठभागापासून सुमारे १५-१६ फूट खोल आहे. भुयाराच्या वरच्या बाजूस मंदिराची भूपृष्ठावरील इमारत लागते. ही इमारत म्हणजे दगड-विटा-चुना यांची चुनेगच्चीची असून मध्ये एक चौक आहे. अशा रीतीने मंदिराचे भूमिगत व भूपृष्ठावरील असे दोन भाग पडतात. उत्सवाचे होणारे कथा पुराण, अन्नदानादी सर्व कार्यक्रम येथेच वरील भागात होतात.

डॉ. भगवंतराव कुलकर्णी यांनी देवाच्या मूर्तीचे वर्णन केले आहे ते असे :

भुयारातील प्रत्यक्ष नृसिंहाची मूर्ती सुमारे पाच फूट उंचीची एकाच शाळिग्राम शिळेची असून तीवरील कोरीव काम फारच उत्कृष्ट आहे. उजवा पाय लोंबता सोडून त्यावर डाव्या पायाची मांडी घातलेली आहे. मांडीवर हिरण्यकश्यपूस आडवे घेतले असून डाव्या पायाच्या लवणीत दैत्याचा ढाल धरलेला हात पकडून, डाव्या हातांपैकी एका हाताने दैत्याचा उजवा पाय व उजव्या पायाच्या लवणीत दैत्याचा डावा पाय दाबून धरलेला आहे. अशा रीतीने दैत्याला सर्व प्रकारे जखडून दोन्ही हातांच्या नखांनी त्याचे उदर विदारण केले आहे. प्रभूची नखाग्रे दैत्याच्या उदरात रुतलेली दाखविली आहेत. अशा तऱ्हेची सोळा हातांची शाळिग्राम शिळेची प्रभूची मूर्ती आहे. मूर्तीच्या अंगावरील कोरलेले वेगवेगळे दागिने, किरीट, नखे, हातांवरील रेषा वगैरे कोरीव काम पाहिले म्हणजे आर्यावर्तातील शिल्पकला किती पूर्णतेला गेली होती, याची बरोबर कल्पना येते. मूर्तीच्या भोवतालची जी शिळेची कमानी-बैठक आहे, तिच्यावर अत्यंत सुबक असे दशावतार कोरलेले आहेत. तसेच मूर्तीच्या उजव्या पायाजवळ 'भूदेवी

व गरुड' यांच्या मूर्ती व डाव्या पायाजवळ 'प्रल्हाद व लक्ष्मी' यांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत.

येथील मुख्य उत्सव वैशाख शुद्ध ७ पासून सुमारे १० दिवस असतो.

हा नारसिंह देव पुष्कळ लोकांचा कुलस्वामी आहे.

संतशिरोमणी नामदेवमहाराज यांनी आपले आयुष्य पंढरपूरच्या विठ्ठलाच्या चरणी वाहिलेले होते, तरी त्यांच्या घराण्याचा कुलस्वामी हा नरसिंहपूरचा नारसिंह किंवा नरहरी देवच होता. नामदेवाचे वडील नरसिंहपूरलाच शिंप्याचा धंदा करून रहात होते. त्यांचे नाव दामाशेटी. ह्या दामाशेटीच्या अगोदरचे सहावे पुरुष यदुशेट हे शिराळे तालुक्यातील रिळे गावाहून नरसिंहपूरला येऊन राहिले होते, असा इतिहास डॉ. भगवंतराव कुलकर्णी यांनी दिलेला आहे.





लेखक : **श्री. पुरुषोत्तम बेंकर**

देवदैत्यांनी जेव्हा समुद्रमंथन केले तेव्हा समुद्रातून चौदा रत्ने निघाली. प्रथम कामधेनू निघाली. होमहवनास लागणारे दूध, तूप तिच्यापासून उत्पन्न होते म्हणून वेदवेत्त्या ऋषींनी तिचा स्वीकार केला. नंतर पांढरा शुभ्र असा उच्चैःश्रवा नामक अश्व निघाला. दैत्यराज बळीने तो मागितला म्हणून त्यास तो दिला. नंतर शुभ्र वर्णाचा व चार दातांचा असा ऐरावत नामक हत्ती निघाला. त्याचा इंद्राने स्वीकार केला. नंतर पद्मनाभ जातीचे कौस्तुभ रत्न निघाले ते भगवान विष्णूला अर्पण करण्यात आले व ते त्याने आपल्या वक्षःस्थलावर धारण केले. नंतर पारिजातक वृक्ष निघाला, त्याची स्वर्गलोकी स्थापना केली. याजपासून तेथील लोकांस इच्छित वस्तू प्राप्त होतात. नंतर अत्यंत रूपवान अशा अप्सरा निघाल्या त्या देवांना अर्पण केल्या. यानंतर लक्ष्मी व सुरा निघाल्या. त्यांच्या वाटणीबद्दल बराच वाद झाला. शेवटी लक्ष्मीने स्वतःच विष्णूची निवड केली व सुरा दैत्यांना देण्यात आली. यानंतर भवसागरातून एक अद्भुत पुरुष निघाला. तो वयाने अत्यंत लहान असून त्याची शरीरयष्टी सुदृढ व अंगकांती सुंदर होती. त्याच्या हातात अमृताचा कलश होता. हा धन्वंतरी होय. तो विष्णूचा अंश असून वैद्यशास्त्रात निपुण होता. त्याच्या हातात असलेला अमृताचा कलश हिसकावून घेऊन, दैत्य दंडकारण्यात पळून गेले. दैत्यांनी अमृत नेले हे पाहून देव खिन्न झाले व ते ईश्वराला शरण गेले. देवांची ती स्थिती पाहून भगवंताने त्यांना धीर दिला व दैत्यांकडून अमृत मिळवून देण्याचे आश्वासन दिले.

इकडे दैत्यांनी अमृताचा कलश नेला, परंतु अमृतप्राशनाबद्दल त्यांचा आपापसात कलह सुरू झाला. एक म्हणे मी आधी पिणार, दुसरा म्हणे मी आधी पिणार. असा प्रकार सुरू झाला. त्यांपैकी जे अशक्त होते त्यांना वाटले की, दांडग्या लोकांपुढे आपला निभाव लागणे शक्य नाही व आपल्याला अमृत मिळणे

कठीण आहे. तेव्हा त्यांनी युक्तिवाद करण्यास सुरुवात केली. ते म्हणाले, 'दैत्य हो, उगाच भांडण करू नका. अमृत मिळविण्यासाठी देवांनी व आपण सारखेच श्रम केले आहेत, तेव्हा अमृतावर आपला एकट्याचा हक्क नसून त्यांनाही त्याचा भाग मिळाला पाहिजे.' अशा रीतीने त्यांचे भांडण चालू आहे हे पाहून भगवान विष्णू स्त्रीवेष धारण करून त्यांच्यापुढे प्रकट झाले. हाच 'मोहिनी अवतार' होय.

यावेळी भगवान विष्णूने घेतलेले रूप अवर्णनीय होते. त्या स्त्रीचा रंग नील-कमलाप्रमाणे श्यामल असून सर्व अवयव रेखीव व गोंडस होते. तिच्या कानांत जी भारी किंमतीची कुंडले होती, त्यांचा प्रकाश तिच्या गालावर पडल्यामुळे तिचे मुखकमल फारच सुंदर दिसत होते. त्या तरुण स्त्रीने आपल्या अंबाड्या-भोवती फुलांचा सुवासिक गजरा घातला होता. कंठातील अलंकारांनी तिची मान फारच सुंदर दिसत होती. तिने नेसलेले वस्त्र पांढरेशुभ्र असून इतके नाजूक होते की, दुरून पहाणारास तिच्या अवयवांची ठेवण स्पष्ट दिसत होती. नूपुरांच्या मधुर आवाजाने सर्वांची मने तिच्याकडे आकृष्ट झाली. अशा तऱ्हेच्या त्या स्त्रीने आपल्या नेत्रकटाक्षाने सर्व दैत्यांना आपल्याकडे आकर्षिले होते.

दैत्य ज्या ठिकाणी भांडत होते ते ठिकाण अत्यंत निबिड असे अरण्य होते. अशा ठिकाणी त्या तरुण व सुंदर अशा स्त्रीला पाहून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटले. ती स्त्री कोण आहे हे जाणण्यासाठी ते सर्वजण त्या स्त्रीचे भोवती जमा झाले व ते तिला म्हणाले, 'हे कमलनयने, ह्या निबिड अरण्यामध्ये कोणाचीही वस्ती नसताना तू येथे कोठून आलीस ? तू कोणाची कोण आहेस ? येथे कशासाठी आलीस ? आम्ही अमृतासाठी भांडत असता तू येथे प्राप्त झालीस, तरी आमच्या-मध्ये उत्पन्न झालेला तंटा तू मिटवावास असे आम्हाला वाटते.' स्त्रीरूप विष्णूने आपली छाप जास्त बसविण्याकरिता ते त्यांच्याकडे पहात हसत हसत म्हटले, 'हे कश्यपपुत्रहो, तुम्ही हे महत्त्वाचे काम माझ्यावर सोपविता हे चांगले नव्हे. कारण स्त्री ही चंचल बुद्धीची असल्यामुळे तिच्यावर विश्वास ठेवू नये असे सुज्ञ म्हणतात. तेव्हा हे काम मजवर सोपवू नये.' या भाषणामुळे दैत्यांचा तिच्यावर पूर्ण विश्वास बसला व त्यांनी अमृताचा कलश तिच्या स्वाधीन केला. ते अमृत देव-दैत्यांना वाटण्यास त्यांनी सांगितले. मोहिनीने तो कलश आपल्याजवळ घेतला व ती दैत्यांस म्हणाली, 'दैत्यहो, मी नको नको म्हणत असता हे काम तुम्ही मजवर सोपवीत आहा, पण हे काम करताना माझ्या इच्छेप्रमाणे तुम्ही मला वागू दिले पाहिजे. हे कबूल असेल तर हे काम मी करते.' मोहिनीचे हे भाषण ऐकताच दैत्यांनी काही एक विचार न करता होकार दिला.

नंतर त्यांनी अमृतप्राशनास सुरुवात केली. मंडपामध्ये देवही बसले होते. त्यावेळी मोहिनी आपल्या हातात अमृताचा कलश घेऊन आली. तेथे आल्यावर 

तिने देवांना व दैत्यांना निरनिराळ्या पंक्तींत बसविले. दैत्यांना तिच्या रूपाचा इतका मोह पडला की, ती जे बोलेल, तेच अमृत आहे, असे त्यांना वाटे. मोहिनीने आधीच त्यांच्यापासून वचन घेतले होते की, मी काही जरी केले तरी तुम्ही ते कबूल केले पाहिजे. तिने विचार केला की, देवांना अमृतपान करविणे हेच योग्य. कारण दैत्यांनी आसपास यथान्याय वाटणी करण्यास सांगितले आहे. तेव्हा न्याय म्हटला की, दैत्य हे क्रूर असल्यामुळे त्यांना अमृत पाजणे अनिष्ट आहे. यासाठी फक्त देवांनाच अमृत पाजले पाहिजे. पण असे केल्यास दैत्य दंगा करतील, म्हणून तिने दैत्यांची गोड शब्दांत समजूत केली की, देव हावरे आहेत, त्यांना दम निघणार नाही, यासाठी त्यांनाच अगोदर अमृत पाजते, म्हणजे त्यांचा त्रास रहाणार नाही. अशा रीतीने तिने दैत्यांस चढवून देवांस अमृत पाजण्यास सुरुवात केली. दैत्यांना तिचे हे कपट समजून आले, परंतु ते वचनबद्ध झाले असल्यामुळे ते सर्वजण गप्प बसले.

अशा वेळी त्यातून राहू नावाचा दैत्य उठला व देवाचा वेष घेऊन चंद्र व सूर्य यांच्यामध्ये बसला आणि सर्वांबरोबर अमृत पिऊ लागला. पण त्याचे हे कपट चंद्र-सूर्य यांनी ओळखून मोहिनीला खुणेने सांगितले तेव्हा राहूने प्राशन केलेले अमृत त्याच्या घशाखाली उतरले नाही तोच त्याचा शिरच्छेद करण्यासाठी तिला चक्राची जरुरी लागली. परंतु विष्णुरूपाशिवाय चक्राचे आवाहन करता येत

अर्धनारी नटेश्वर (नेवासे)



नव्हते व पूर्ण विष्णुरूप प्रकट केल्यास दैत्य पळून जातील, किंवा मोठा संग्राम माजेल म्हणून विष्णूने अर्धे विष्णू आणि अर्धे स्त्रीरूप ठेवून राहूचा शिरच्छेद केला आणि या रूपाने अर्धनारी नटेश्वर म्हणून पुढे विष्णू प्रसिद्ध झाले. तोच मोहिनीराज अवतार होय.

भगवान विष्णू आता प्रकट रूपाने तेथे रहावेत म्हणून शांडिल्य या नावाच्या ब्राह्मणास वाटले म्हणून त्याने मधु (प्रवरा), मालती (मावा) या नद्यांच्या संगमावर दीर्घकालपर्यंत खडतर तप केले. या तपाने भगवान विष्णू प्रसन्न झाले व त्यांनी ब्राह्मणास तपाचे कारण विचारले. तेव्हा त्याने आपली इच्छा त्यांना सांगितली व विष्णूनेही तसे कबूल केले. त्यांनी त्यास देवांचा कारागीर जो विश्वकर्मा त्याचेकडून आपली प्रतिमा तयार करून घेण्यास सांगितले. त्याप्रमाणे शांडिल्याने विश्वकर्म्याकडून श्रीविष्णूची महालयारूपाची मोहिनीराजाची अर्धनारी नटेश्वर मूर्ती तयार करून घेतली व तिची स्थापना ह्या क्षेत्रात केली.

या देवाची यात्रा नेवासे येथे माघ महिन्यात भरत असते. माघ शुद्ध ८ पासून शुद्ध १४ पर्यंत भागवत सप्ताह होत असतो व १५ ला कुळधर्म व गोंधळ होतो. माघ वद्य १ ला महापूजा होऊन देवाची भोगमूर्ती पालखीत घालून मिरवत मिरवत नदीकाठी पाकशाळा आहे तेथे नेण्यात येते. तेथे पाच दिवस मूर्ती ठेवतात व त्या ठिकाणी पाच दिवसपर्यंत सर्व हिंदूंना अन्नरूपाने प्रसाद मिळतो. पाचवे दिवशी म्हणजे माघ ५ ला देव परत पालखीतून मिरवत मिरवत मुख्य देवालयात आणतात व काला वाटण्यात येतो. त्याच दिवशी रात्री पुन्हा १२ वाजता गावातून छबिना निघतो व लोक देवास ओवाळून कानगी करतात. सर्व गावातून देव मिरविल्यावर ज्ञानेश्वर मंदिराजवळ नेण्यात येतात व तेथून परत पाकशाळेतील घाटावर पालखी येते. तेथे पहाटेच्या वेळी प्रेक्षणीय असे दारूकाम होते व त्यानंतर देव परत देवळात आणून उत्सव समाप्त होतो. उत्सवाकरिता मुख्य मंदिरापुढे मोठा मंडप उभारण्यात येतो व तेथे दुपारी गायन व रात्री कीर्तन असा कार्यक्रम पाच दिवस होतो. अशा रीतीने उत्सव होतो. त्याकरिता आसपासचे, दूरदूरचे असे सुमारे पाच-सहा हजार लोक येतात.

ज्यांचे हे कुलदैवत आहे त्यांनी श्रीची उपासना पुढीलप्रमाणे करावी. रविवार हा श्रीचा वार आहे. त्या दिवशी उपवास करावा व रात्री भोजन करावे. पूजा-आरती करावी. दर साल माघ शुद्ध ८ पासून १५ पर्यंत नवरात्र बसवून दिवा लावावा. पौर्णिमेस कुळधर्म करून ब्राह्मण सुवासिनी घालून उपवास सोडावेत.






लेखिका : **सौ. प्रभावती ग. पाटील**

सोमवंशी क्षत्रिय (वाडवळ) हा समाज ठाणे जिल्ह्याच्या डहाणू, पालघर व वसई तालुक्यांतील प्राधान्याने शेतकरी समाज असून ह्या समाजातील काही घराणी फार पूर्वीपासून मुंबईत स्थायिक झाली आहेत. ह्या समाजाचेही इतरांप्रमाणेच सामाजिक, कौटुंबिक व कृषिविषयक अशा प्रकारचे पूजाविधी प्रचलित आहेत.

**घरजत्रा**

हा कुलदेवतेच्या पूजेचा मोठा सोहाळा असतो. चैत्र महिन्यात विशेषत: वद्य पक्षात अष्टमीपासून अमावास्येपर्यंत एकवीरा, महालक्ष्मी, वज्रेश्वरी आदी कुलदेवतांच्या वार्षिक पूजनाचा विधी घरोघर पार पाडतात. त्या त्या कुटुंबाची कुलदेवता ठरलेली असते आणि त्या त्या देवतेची तिथी ठरलेली असते. इतर काही समाजांत ज्याप्रमाणे चैत्रगौरीच्या हळदीकुंकवाच्या निमित्ताने देवीची पूजा केली जाते, त्या प्रकारचाच हा एक समारंभ असतो. घर बांधताना पहिला खांब रोवतात ती मुहूर्तमेढ व तेथेच देव ठेवावयाची जागा (देवघर नव्हे पण देव्हारा) असे मानले जाते व ती मुहूर्तमेढ म्हणजेच कुलस्वामिनीचे प्रतीक होय. चैत्रात ज्या कुलस्वामिनीच्या पूजनाची तिथी असेल त्या दिवशी नुसते हळदकुंकू नव्हे तर मोठे जेवणच असते. शेजारीपाजारी, आप्तसंबंध, लेकीबाळी, इष्टमित्र वगैरे सर्वांना भोजनाचे अत्याग्रहाचे आमंत्रण असावयाचेच आणि जेवणाचा थाट तर काय विचारूच नका.

नारळाचे दूध (शिरे) घालून केलेली राताळ्याची खीर, वडे, सांदण, आमखंडी (कच्चे आंबे व करंदीर म्हणजे लहान झिंगे घालून केलेली पातळ भाजी), मटण, कोंबडी, भात हे तर मुख्य पदार्थ; शिवाय चटणी, पापड,

कोशिंबीर वगैरे असतेच. कधीकधी कुलस्वामिनीच्या नावाने कोंबडा बळी देतात. मात्र तो आरवताच असावा लागतो. लहान बच्चा चालत नाही.

सकाळी देवीची पूजा करावयाची म्हणजे त्या मुहूर्तमेढीला हळदकुंकू लावायचे, शेंदूर भरायचा, वेणी, बांगड्या, नाडा वगैरे सर्व सौभाग्य अलंकार वाहायचे, धूप करायचा, आरती करायची आणि सर्व पक्वान्न भरपूर भरलेले केळीचे पान पुढे ठेवून नैवेद्य दाखवावयाचा. ते पान दिवसभर तसेच ठेवावयाचे आणि सायंकाळी माहेरवाशिणीनेच ते मोडायचे म्हणजे त्यातील पदार्थ सर्वांना प्रसाद म्हणून थोडे थोडे वाटायचे. अजूनही काही घरांतून देवीला कच्ची कैरी म्हणजे आमखंडी दाखविल्याशिवाय खात नाहीत. पण नोकरीनिमित्ताने तरुण माणसे बाहेर पडतात अगर अन्य कारणाने त्यांना नियम पाळणे शक्य होत नाही म्हणून फक्त म्हातारी माणसेच हे नियम नित्य चालू ठेवतात. एरवी उंबऱ्याची पूजा करीत नसतील पण ह्या दिवशी कटाक्षाने ती पूजा केली जाते. माहेरवाशिणीला हक्काने माहेरी रहायला मिळते, म्हणून तिच्या आनंदाला भरती येते.

पूर्वी लग्न प्रसंगी मुंडावळी आणि बाशिंग बांधीत असत. लग्नानंतर ती नवरा-नवरीची बाशिंगे मुहूर्तमेढीला बांधून ठेवीत आणि लग्न वैशाखात झाले असले तरी पुढच्या चैत्रावळीपर्यंत म्हणजे घरजत्रेपर्यंत ती राखून ठेवीत. घरजत्रेच्या दिवशी नवरानवरीला पुन्हा ती बाशिंगे बांधून पूजा करीत आणि मग त्या बाशिंगांचे महत्त्व जाई. कुलस्वामिनीच्या पूजनाचा हा विधी थाटाचा असतो.

**लग्नविधी**

लग्नविधीच्या वेळी कुलदेवतेचे स्मरण तर येतेच. तिच्यानिमित्ताने खणानारळाची ओटी देवाजवळ काढून ठेवली जाते. पण शिवाय वास्तुदेवता, स्थानदेवता, ग्राम-देवता यांची पण पूजा होते. त्या घरात देवक मांडण्यापूर्वी गणपतीची पूजा तर करावीच लागते. देवक बसते तेथेच आंब्याची एक डहाळी रोवून तात्पुरती मुहूर्त-मेढ करतात. तिची पूजा करावी लागते. त्या त्या वाडीची अगर भागाची एखादी स्थानदेवता असते. तिचे पूजन करून वर अगर वधू नंतरच लग्नाला उभे रहातात. तत्पूर्वी कुलदेवतेच्या दर्शनाला जाऊन तिची पूजा करण्याचा प्रघात आहे. वधू अगर वर यांच्या स्नानासाठी ज्या विहिरीचे पाणी आणावयाचे त्या विहिरीच्या ठिकाणी पण जलदेवतेची कृपा संपादन करावी लागते. फार काय ज्या चुलीवर लग्नाचा स्वयंपाक व्हावयाचा त्या चुलीची पण पूजा केल्या-शिवाय पुढे पाकसिद्धी करीत नाहीत. लग्नात विवाहविधीपूर्वी गौरण्यांचे म्हणजे सवाष्णी स्त्रियांचे खास जेवण असते. त्यावेळी त्या सुवासिनींची पण पूजा करावी

लागते. परमेश्वराच्या अस्तित्वाची जी जी खूण अगर प्रतीके मिळणे शक्य असेल अगर त्याची कल्पना करणे संभवनीय असेल त्या सर्व ठिकाणी पूजा करावयाची असा मोठा विविध रूपदर्शनाचा प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो.

कुलदेवतेच्या जत्रेच्या दिवशी तिची पूजा गावातील सर्व भाविकांकडून होते. नवस फेडले जातात. खणानारळांनी देवीची ओटी भरतात आणि आनंदोत्सव साजरा करतात. जत्रेला जाण्याची हौस आणि जत्रेत फिरण्याचा आनंद यांची कल्पना 'जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे' अशीच असते.

अंगात येणे अगर वारे घेणे हा एक देवतोपासनेचा जुना प्रकार आहे. एखाद्या माणसाच्या अंगात एखाद्या देवीचे अगर देवाचे वारे येते. त्याचे भगत असतात. पाट मांडून समई लावली जाते. पूजासाहित्य तयार असते, भगत स्नान करून येतो. धुमटाच्या वादनाबरोबर त्या त्या देवतेची गाणी गायिली जातात. गोवळा घुमू लागतो व मग त्याच्या अंगात येते. छडी घेऊन तो स्वतःला मारतो व कधीकधी इतरांना पण प्रसाद मिळतो. मग त्याला प्रश्न विचारले जातात व तो उत्तर देतो. उतारे, अंगारे, धुपारे केले जातात. नंतर कुलदेवतेची उपासना संपते.






लेखक : **प्रा. वसंत दत्ताराम देसाई**

सृष्टिसौंदर्याने नटलेला प्रदेश म्हणून जशी गोमंतकाची ख्याती आहे तशीच देवदेवतांच्या सुंदर सुंदर मंदिरांनी शोभायमान आणि पावन झालेला भूभाग म्हणूनही त्याची प्रसिद्धी आहे. शक्तिदेवतेची गोमंतकातील ही मंदिरे निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेली असली तरी त्यांतील सुप्रसिद्ध आणि सुंदर अशी निवडक मंदिरे मात्र एका विशिष्ट भागामध्येच एकवटून उभी असलेली दिसतात. पोर्तुगिजांची राजवट या प्रदेशावर चालू असताना प्रारंभीच्या काळामध्ये त्यांनी बाटवाबाटवीचे जे सत्र सुरू केले आणि हिंदूंच्या दैवतांची जी क्रूर विटंबना केली, हिंदु मंदिरांची जी मोडतोड आणि जाळपोळ केली, हिंदूंच्या धार्मिक सणाउत्सवांवर जी गंडांतरे आणली त्यांना कंटाळून आणि वैतागून काही भाविक भक्तांनी आपापल्या देवदेवता उचलल्या. पोर्तुगिजांच्या अधिसत्तेखाली असलेल्या प्रदेशातून स्थलांतर केले आणि पोर्तुगिजांचा अंमल नसलेल्या अंत्रुज महालाचा आश्रय घेऊन त्या ठिकाणी त्या देवदेवतांची पुनर्स्थापना केली. त्यामुळे एका विशिष्ट भागामध्येच प्रसिद्ध देवतांची मंदिरे एकत्र आल्याचे आज दिसते.

गोमंतकातील हिंदु कुलदैवतांचा विचार करताना आपणांस प्रामुख्याने श्रीमंगेश, श्रीशांतादुर्गा, श्रीसांतेरी आणि श्रीदत्त या देवतांवरच आपले लक्ष विशेषेकरून केंद्रित करावे लागते. या देवतांचा भक्तगण गोमंतकातच केवळ नव्हे तर भारतामध्येही विखुरलेला आहे. महाराष्ट्रातील काही कुटुंबे या देवतांची भक्तिभावाने उपासना करताना दिसतात ; जागृत दैवते म्हणून त्यांना मान देताना आढळतात. या प्रमुख देवतांखेरीज ज्या अन्य देवतांची उपासना गोमंतकामध्ये चालते त्या देवता एक तर या प्रमुख देवतांच्या उपदेवता वा सहदेवता तरी आहेत किंवा त्या स्थानिक महत्त्व असलेल्या, मर्यादित भक्तगण असलेल्या तरी आहेत. यांपैकी श्रीमंगेश, श्रीशांतादुर्गा, श्रीसांतेरी या देवता जुन्या काळच्या असून, श्रीदत्ताची

प्रतिष्ठापना त्यामानाने अलीकडील काळातली आहे. श्रीमंगेश, श्रीशांतादुर्गा, श्रीदत्त या देवतांचा भक्तगण हा प्रामुख्याने सारस्वत समाजापैकी आहे. श्रीसांतेरी ही ग्रामदेवता असून साधारणत: प्रत्येक गावामध्ये या ना त्या स्वरूपामध्ये या देवतेचे मंदिर उभे असलेले दिसते. गोमंतकातील बहुजन समाजाची ही उपास्य-देवता आहे असे म्हणता येईल. याखेरीज बहुजन समाजाची अन्य किती तरी दैवते गावोगावी आहेत. शिव आणि शक्तीचीच ती सारी रूपे आणि स्वरूपे आहेत. या सार्‍या देवतांचा खात्रीलायक इतिहास उपलब्ध नसल्याकारणाने त्यांच्या-विषयी निश्चितपणाने काही सांगता येत नाही. श्रीमंगेश, श्रीशांतादुर्गा, श्रीदत्त या दैवतांचा इतिहास मात्र त्यांच्या भक्तांनी उपलब्ध करून ठेवलेला आहे.

**श्रीमंगेश**

सासष्टी महालामध्ये अघनाशिनी नदीच्या काठी वसलेल्या कुठ्ठाळ (कुशस्थळी) या गावची श्रीमंगेश ही देवता. कान्यकुब्जाहून अगदी शेवटी शेवटी निघालेले गौड सारस्वत गोमंतकातील कुशस्थळी (कुठ्ठाळ) स्थायिक झाले व तेथेच त्यांनी बरोबर आणलेल्या आपल्या कुलदेवतेची, श्रीमंगेशची त्याच्या उपदेवतांसह विधि-पूर्वक प्रतिष्ठापना केली. एवढी माहिती आज मिळू शकते. आज कुठ्ठाळीला या देवतेच्या मंदिराबाबतच्या काही खाणाखुणा सापडत नसल्या तरी या देवतेच्या तळीची म्हणून एक जागा मात्र दाखविली जाते.

इ.स. १५४६ च्या सुमाराला गोमंतकातील पोर्तुगिजांच्या राजवटीने हिंदु-धर्मियांचा छळवाद मांडला आणि त्यांच्या देवदेवतांची विटंबना सुरू केली. हिंदूंना बाटवून ख्रिस्ती बनविणे, त्यांच्या देवतांची मंदिरे मोडून, तोडून, जाळून, उद्ध्वस्त करून नष्ट करणे, देवतांच्या मूर्ती छिन्नभिन्न करून फेकून देणे, हिंदूंचे धार्मिक उत्सव बंद पाडणे असा उद्योग तेथील धर्मप्रसारकांनी सरकारच्या मदतीने अखंडपणे सुरू केला. या भयंकर सत्रामध्ये हिंदूंची कैक मंदिरे अग्निमुखी पडली ; किती तरी देवदेवतांना नदी-नाल्यांचा, विहीर-बावड्यांचा नाइलाजाने आसरा घ्यावा लागला. काही भक्तांनी आपल्या देवतांच्या रक्षणार्थ पोर्तुगीज अंमल नसलेल्या प्रदेशामध्ये घरदार सोडून स्थलांतर केले आणि त्या ठिकाणी आपल्या देवतांची प्रतिष्ठापना केली.

पोर्तुगिजांच्या या धर्मवेडाची झळ कुठ्ठाळच्या ग्रामदेवतांना आणि त्यांच्या भक्तगणांना लागली. कुठ्ठाळच्या श्रीमंगनाथावर (श्रीमंगेश) आणि त्याचबरोबर सांतेरी, केसोबाब, वीर, कपिलेश्वर, नारायण, भगवती, गोपीनाथ या तेथील अन्य देवतांवरही संकट कोसळण्याची वेळ आली. स्थलांतर करून शेजारच्या प्रदेशा-मध्ये जाऊन या देवतांची त्या ठिकाणी स्थापना करण्याखेरीज भक्तमंडळींसमोर

अन्य मार्गच उरला नाही. इ.स. १५६० ते १५६५च्या दरम्यान काही ग्रामस्थ उठले आणि कुटुंबासह आपल्या देवदेवता घेऊन शेजारच्या अंत्रुज महालात आले. फोंडा तालुक्यातील प्रियोळ गावी त्यांनी शके १४८२ मध्ये रौद्रनाम संवत्सरी श्रीमंगेशाची त्याच्या परिवार देवतांसह विधिपूर्वक स्थापना केली. पुढे त्या स्थानाला मंगेशी हे नाव प्राप्त झाले. तत्पूर्वी हा भाग 'गणपती वाडा' या



श्रीमंगेश, गोवा

नावाने ओळखला जाई असे सांगतात. श्रीमंगेश आणि कुठ्ठाळची अन्य दैवते यांची प्रतिष्ठापना होण्यापूर्वी तेथे श्रीसांतेरी, क्षेत्रपाळ, जय, श्रीगणपती ही दैवते होती. पहिल्या तीन देवतांची पूजाअर्चा श्रीमंगेश देवस्थानामार्फत चालविली जाते. श्रीगणपतीची पूजाअर्चा प्रियोळ येथील ग्रामसंस्थेमार्फत चालते.

श्रीमंगेश देवस्थानचा सर्व खर्च प्रारंभीच्या काळामध्ये देवस्थानचे महाजन आपल्या शक्ती-कुवतीनुसार चालवीत असत. धुमे घराणे सहा महिने, नाईक

करंडे घराणे तीन महिने, काबाडी घराणे दीड महिना व उरलेला दीड महिना इतर महाजन याप्रमाणे हा खर्च चालवीत. परंतु पुढे पेशवाईतील एक कर्तबगार मुत्सद्दी रामचंद्र मल्हार सुखठणकर यांनी या देवस्थानास पेशव्यांचे मांडलिक राजे सौंदेकर यांच्याकडून प्रियोळ गावचा एक वाडा (मंगेशी) मोकासा करून देवविला आणि सालिना अडीचशे रुपयांचे रोख इनामही देण्यास सांगितले. ऐतिहासिक कागदपत्रांवरून यासंबंधीची माहिती मिळते ती अशी :

'राजश्री रामचंद्र मल्हार यांची कुलदैवते अंत्रुज प्रांती आहेत. तेथील उर्जेस तेल, फुले आणि द्रव्ये पाहिजेत. त्यास खर्चाबद्दल रफायतपन्हा सदाशिव नाईक, इमडी राजे सौंदे याजकडून कवळे ग्राम श्रीशांतादुर्गादेवीस व मौजे प्रियोळ येथील म्हाळसादेवीस एक वाडा व श्रीमंगेशदेवास एक वाडा व नगदी महाल-मजकुरी अडीचशे रुपये इनाम संपादून घेऊन सनदी हांस केलेल्या आहेत. त्याप्रमाणे आम्ही ती इनामे करार करून सरकारची पत्रे दिलेली आहेत."

इनाम मिळाल्यावर कमावीसदार नेमला गेला व त्याने महाजन मंडळींस हिशेब सादर करावयाचा असे ठरविण्यात आले. देवस्थानच्या कारभारात अधिक सुव्यवस्था निर्माण करण्याच्या दृष्टीने १८४० साली एक शिफारस समिती नेमण्यात आली आणि या समितीच्या शिफारशी लक्षात घेऊन एक कायदा करण्यात आला आणि एका कमिटीमार्फत देवस्थानचा सर्व कारभार पहाण्यात येऊ लागला. ही कमिटी चौवा महाजनांची असते. कमिटीमध्ये अध्यक्ष, खजीनदार, मुखत्यार व चिटणीस असे पदाधिकारी असतात या देवस्थानची नियमावली सरकार संमत झालेली असून कमिटीच्या कारभारावर देवस्थानच्या कायद्याप्रमाणे सरकारी नियंत्रण असते.

श्रीमंगेश देवस्थानच्या महाजनांनी दिलेल्या देणग्यांमधून देवस्थानच्या वास्तूला आकार येऊ लागला आणि हळूहळू तिला आजचे सुंदर आणि भव्य असे स्वरूप प्राप्त झाले. या देवस्थानची एकंदर रचना पुढीलप्रमाणे आहे :

स्थळाच्या मुख्य दरवाजात प्रवेश केला म्हणजे थोड्या अंतरावर पिंपळाचा पार आणि पुढे बाजूस इमारत दिसते. तिच्या मागच्या बाजूस श्रीनाईक स्वामी यांची समाधी आहे. वनभोजनादी उत्सव प्रसंगी श्रीची स्वारी तेथे येत असते. प्रवेशद्वारापासून प्राकाराच्या दरवाजापर्यंत कठडा बांधून पक्का रस्ता केलेला आहे. प्राकाराच्या पूर्वेकडील बाजूस चौघड्याची दुमजली इमारत आणि खाली सुंदर तलाव पायऱ्यांसहित आहे. तलावाच्या मध्य भागी तुळशी वृंदावन आहे. प्राकारात उत्तर, दक्षिण व पश्चिम भागी दुमजली अग्रशाळा असून उत्तर भागात रथ ठेवण्याची जागा आहे. साधारणत: मध्य भागी श्रीमंगेशाचे देऊळ पूर्वाभिमुख असून देवळासमोर दीपस्तंभ आहे.

गर्भागारात मुख्य स्थानी श्रीमंगेश, पुढे चौकावर श्रीनंदिकेश्वर, त्याच्याजवळ श्रीग्रामपुरुष, चौकावरील दरवाजाच्या उजवीकडे श्रीगणपती व डावीकडे श्रीभगवती असून या देवालयाच्या पाठीमागे असलेल्या देवालयात श्रीमुळकेश्वर आहे. त्याच्या उजवीकडील अग्रशाळेत पहिल्या देवस्थानात श्रीलक्ष्मीनारायण, श्रीसूर्यनारायण व श्रीगरुड, त्याच्या लगतच्या देवस्थानात श्रीसांतेरी आणि श्रीवीरभद्र; पूर्वेकडच्या बाजूस श्रीकालभैरवाचे स्थान आहे. पुढे तळीच्या उजव्या बाजूस श्रीसांतेरीचे (मूळच्या वाडयाच्या देवतेचे) देवालय असून समोर क्षेत्रपाळ अशी देवस्थाने आहेत.

कुठ्ठाळीहून श्रीमंगेश व जी परिवारदैवते प्रियोळास आणली गेली, त्यांची तात्पुरती स्थापना ज्या जागेवर केली गेली ती जागा प्रस्तुत देवालयाच्या प्राकाराबाहेर दक्षिण बाजूस आहे. त्या ठिकाणी तुळशी वृंदावन असून तेथे प्रतिवर्षी कार्तिक शुद्ध द्वादशीस तुळशीविवाह प्रसंगी श्रीमंगेश देवाची पालखी जात असते.

या देवस्थानचे जे मूळ महाजन त्यांच्या कुळांची मूळ नावे चोवीस आहेत. त्यांतील कित्येकांस श्रीम्हाळसा (म्हाडदोळ) व बहुतेकांस श्रीमहालक्ष्मी (बांदिवडे) ही पालवी दैवते म्हणजे सहदैवते आहेत. या चोविसांशिवाय इतरही महाजन आहेत.

### नित्य आणि नैमित्तिक देवकृत्ये

सकाळी पाच वाजता एक तास चौघडा व अर्धा तास इतर वाद्यांची नौबत चालू असते. सूर्योदयानंतर पुजाऱ्याकडून निर्माल्य विसर्जन होत असते. आठ वाजल्यापासून अकरा वाजेपर्यंत निरनिराळी देवकृत्ये चालू असतात. नंतर नैवेद्य व दुपारचा चौघडा होतो. यावेळी महाआरती, पूजा बांधणे वगैरे कृत्ये होत असतात. संध्याकाळी पाच वाजता एक तास चौघडा व सहा वाजता नौबतीची इतर वाद्ये वाजू लागतात. याच वेळी पंधरा मिनिटे नृत्य गायन होत असते. प्रदोषकाळी निर्माल्य विसर्जन होते. तदनंतर नित्यावर्तने व संध्याकाळच्या नैवेद्याचा विधी होतो. रात्रौ आठ वाजता पुराणकथन आणि त्यानंतर हरिकीर्तन होते. साडेदहा वाजता आरती आणि आरतीनंतर मंत्रपुष्प, वेदघोष, प्रार्थना व प्रसाद वाटणे हे कार्यक्रम होतात.

नित्य सकाळी श्रीची षोडशोपचारे पूजा व रुद्रावर्तनाने अभिषेक (एकावर्तन, एकादशिनी, लघुरुद्र, महारुद्र, अतिरुद्र इत्यादींसह) होतो. हा येथला नित्याचा पूजा प्रकार आहे.

दर सोमवारी श्रीचा शिबिकोत्सव होत असतो. शिवाय बाराही महिने अभिषेक, लघुरुद्र, महारुद्रादी देवकृत्ये तसेच लालकोत्सव, रथोत्सव वगैरे काहीना

काही दरदिवशी सुरूच असते. माघी पौर्णिमा हा येथील उत्सव फार महत्त्वाचा असतो. माघ महिन्यात एकादशीपासून पाचही दिवस हरिदास व पुराणिक यांस मुक्तद्वार असते. द्वादशीस पंचमूर्ती दर्शन घडते व रात्रौ तळीत नौकारोहणोत्सव होत असतो. या दिवशी पहाटेला महारथातून श्रीची मिरवणूक निघते आणि ह्या महोत्सवाचा पर्वणीचा उत्सव समाप्त होतो.

महाजनांकडून अगर अन्य भक्तांकडून पुढीलप्रमाणे देवकृत्ये करण्याचा येथील परिपाठ आहे. धूळभेट, आवर्तन, अभिषेक-नैवेद्य, एकादशणी, बेडचाचा लघुरुद्र, शिंगाचा लघुरुद्र, बेडचाचा महारुद्र, शिंगाचा महारुद्र, एकदारी पूजा, तीनदारी पूजा, घूड भरणे, संतर्पण, श्रीग्रामपुरुषास पायस व मुळकेश्वरास खिचडी, श्रीकौंडिण्य पुरुषास अभिषेक-नैवेद्य, कालभैरवास वडयांची माळ, श्रीमुळकेश्वरास तंबाखूची विडी, कांबळ, कोयती, गाठवळ, तुलाभार.

श्रीच्या गर्भागारात मुख्य स्थानी बावन्न नंदादीप सतत तेवत असतात. याखेरीज परिवारदेवतांच्या समोर आणि अन्य स्थळी आणखी बरेच नंदादीप तेवत ठेवलेले असतात.

श्रीमंगेशाच्या महाजनांच्या उपदेवता म्हणजे श्रीमहालक्ष्मी (बांदिवडे), श्रीमहालसा (म्हाडदोळ) व श्रीकामाक्षी (शिरोडा) या होत. या देवतांशिवाय श्रीमंगेशाच्या पंचक्रोशीमध्ये श्रीनारसिंह, श्रीनागेश व श्रीरामनाथ ही दैवतेही प्रसिद्ध आहेत.

या देवस्थानची वेगवेगळी कामे करण्यासाठी घैसास, अभिषेकी, पुजारी, जोतकार, ब्राह्मण, पुराणिक, हरिदास, शिपाई, देवळी, कलावंतीण, मृदंगी, टाळदार, चौघडा, वाजंत्री, इनामतदार, मशालजी, परीट, न्हावी, भाविका, इत्यादी सेवकवर्ग आहे.

### श्रीशांतादुर्गा

श्रीमंगेश देवस्थानापासून अवघ्या सात-आठ किलोमीटरांच्या अंतरावर श्रीशांतादुर्गेचे देवालय आहे. सारस्वतांनी गोमंतकात येताना आपल्याबरोबर ज्या सहा देवता आणल्या त्यांपैकी ही एक देवता. अघनाशिनी नदीच्या काठावरील केळोशी या गावी, निसर्गरमणीय पर्वताच्या पायथ्याशी, देवळाचे भाट म्हणून प्रसिद्ध असलेल्या जागेत श्रीशांतादुर्गेची, नारायण, ईश्वर, ग्रामपुरुष, गणेश, भगवती व क्षेत्रपाळ या तिच्या अधिष्ठित देवतांसह प्रथम प्रतिष्ठापना करण्यात आली होती. श्रीमंगेश कुठ्ठाळला तर श्रीशांतादुर्गा केळोशीला. परंतु पोर्तुगिजांनी हिंदूंचा जो धर्मछळ मांडला त्याला कंटाळून आणि धाबरून इतरांप्रमाणेच केळोशीच्या श्रीशांतादुर्गेच्या भक्तगणांनीही विजापूरकरांच्या ताब्यात असलेल्या

अंत्रुज महालातील कपिलेश्वर या स्थानी आपल्या देवतांसह स्थलांतर केले. समकालीन ऐतिहासिक कागदपत्रांवरून स्थलांतराची ही घटना १४ जानेवारी १५६६ ते २९ नोव्हेंबर १५६६ च्या दरम्यान घडली असावी असे दिसते. या कपिलेश्वर गावी श्रीशांतादुर्गेची प्रतिष्ठापना मार्गशीर्ष शुद्ध ५ शके १४८८ रोजी झाली. हेच कपिलेश्वर आज कवळे या नावाने ओळखले जात असून श्रीशांतादुर्गेच्या महिमानामुळे या स्थानालाही मंगेशीप्रमाणेच फार मोठे महत्त्व प्राप्त झालेले आहे.



श्रीशांतादुर्गा, गोवा

प्रारंभीच्या काळी श्रीशांतादुर्गेची मूर्ती एका लहानशा देवळामध्ये होती. परंतु पुढे दीडशे वर्षांनंतर वैभवाचा काळ आला आणि या देवस्थानची उत्तरोत्तर

भरभराट होत गेली. संपन्न लोकांनी मुक्त हस्ते देणग्या दिल्या. त्याचप्रमाणे सामान्य जनांनीही शक्तीप्रमाणे मदत केली आणि देवस्थानाला समृद्धी प्राप्त करून दिली. श्रीशांतादुर्गेच्या देवस्थानच्या वैभवासाठी आणि संपन्नतेसाठी श्रीशाहू-महाराजांच्या प्रधानमंडळातील 'मंत्री' सरदार नारो राम रेगे आणि पेशवाईतील थोर मुत्सद्दी व शूर सेनानी रामचंद्र मल्हार सुखठणकर या दोन कुळाव्यांनी फार मोठे साह्य केले. आपणास जे मंत्रिपद आणि त्याचबरोबर मोठेपण लाभले ते शांतादुर्गेच्या कृपेचेच फळ आहे अशी भावना राखून नारो राम रेगे यांनी देवीचे मंदिर बांधले. १७४० साली नारो राम रेगे देवीच्या जत्रेसाठी कवळ्याला आलेही होते. रामचंद्र मल्हार सुखठणकर यांनी फार मोठी संपत्ती देवीच्या चरणी अर्पण केली. विजापूरकरांकडून हा प्रदेश मराठ्यांकडे आल्यावर श्रीशाहूछत्रपती आणि दुसरे पेशवे बाजीराव यांच्याकडून मराठेशाहीच्या प्रमुखांनी या मंदिरास मोठमोठ्या जमिनी इनाम करून दिल्या, कवळे गाव मोकासा म्हणून मिळवून दिला. या सगळ्या देणग्या इनामांमधून, मदतीतून देवस्थानाला वैभवाचे दिवस प्राप्त होत गेले.

कवळे येथील श्रीशांतादुर्गेचे देवालय पूर्वाभिमुख आहे. त्याच्या दोन्ही बाजूंना प्रशस्त अशा अग्रशाळा आहेत. तटाच्या समोर एक मोठा तलाव आहे. समोर नगारखाना आहे. देवालयाच्या पुढे उंच मनोऱ्यासारखा भव्य असा दीपस्तंभ आहे. देवालयाच्या गाभाऱ्यात पट्टासनावर श्रीशांतादुर्गा देवीची पंचलवी रमणीय मूर्ती आहे. तिच्या समोरच लहानसे शिवलिंग आहे. ते केळोशीच्या अधिष्ठित देवतांपैकी आहे.

मुख्य देवालयाच्या लगतच डावीकडे श्रीनारायण देवाचे देऊळ आहे. तेथेच गणपतीची मूर्तीही आहे. समोर डावीकडे पारिजातक वृक्षाचा पार आहे. त्या पारावर वीर भगवतीची मूर्ती असून जवळच एका अज्ञात संन्याशाच्या दोन पादुका आहेत. दीपस्तंभाच्या समोर क्षेत्रपाळाची शिला आहे. देवालयाच्या पाठीमागे म्हारवाची शिला आहे. डोंगरावरच्या बाजूस म्हारवाचा पेड आहे. देवालयाच्या समोर लोमशर्माचे देऊळ आहे. देवालयाच्या दक्षिण बाजूस मठ आहे.

बंगालची दुर्गा ही देवता कालीस्वरूप असून ती तमोरूपाचे प्रतीक आहे. ती अष्टभुजा असून शस्त्रधारिणी आहे. तिच्या एका हातात राक्षसाचे मुंडके आहे. ती उग्ररूपा असून युद्धोन्मादिनी आहे. परंतु गोमंतकातील कवळे येथील श्रीशांता-दुर्गा ही मात्र शांततेचे, स्नेहाचे प्रतीक आहे. ती द्विभुजा आहे. तिने हातात शिव आणि विष्णू धरून ठेवले आहेत. अन्यत्र कोठेही पहावयाला न मिळणारे असे हे तिचे रूप आहे.

या दुर्गेला शांता हे नाव पडण्याची बरीच कारणे सांगितली जातात. पुराणातून एक कारण असे सांगितले जाते की, पूर्वी एकदा श्रीशिव व श्रीविष्णू यांच्यामध्ये भयंकर युद्ध झाले. दोघेही सारखेच पराक्रमी असल्याकारणाने कोणी कोणास हार जाईना. उभयतांच्या या संग्रामात जगाचा प्रलय होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. तेव्हा ब्रह्मदेवाने जगाचा नाश होऊ नये म्हणून आदिशक्ती जगदंबेला, दुर्गेला मध्यस्थी करण्याची विनंती केली. तेव्हा ती त्या दोन्ही योद्धयांच्या मध्ये अकस्मात उभी राहिली. एका हाताने श्रीविष्णूला आणि दुसऱ्या हाताने श्रीशिवाला बाजूला करून तिने हा संग्राम मिटवला. अशा रीतीने उभयतांना शांत करण्यात तिने यश मिळविले म्हणून तिला श्रीशांतादुर्गा हे नाव प्राप्त झाले.

**नित्य आणि नैमित्तिक देवकृत्ये**

श्रीमंगेशाप्रमाणेच श्रीशांतादुर्गेच्या ठिकाणी अभिषेक, आवर्तन, एकादशिनी, लघुरुद्र, महारुद्र, इत्यादी देवकृत्ये होत असतात. यांखेरीज नवचंडी (जपद्वारा), नवचंडी (होमद्वारा), शतचंडी (जपद्वारा), पंचिष्ट देवतांस नैवेद्य, अन्नसंतर्पण, दांपत्यस्नान, बारांची पूजा, देवालयाचा घूड पेटविणे, खांब पेटविणे यांसारखी देवकृत्ये पार पाडली जातात.

येथे पाक्षिक पंचमी हा महत्त्वाचा दिवस मानला जातो. शुद्ध आणि वद्य दोन्ही पंचमींना शिबिकोत्सव होतो. या दिवशी पुराणकीर्तनादी कार्यक्रम झाल्यावर श्रीची पालखीतून मिरवणूक निघत असते. मिरवणुकीच्या वेळी विवक्षित ठिकाणी रथावर नारळ फोडण्याची वहिवाट आहे. तुलाभाराचा कार्यक्रम येथेही चालू आहे.

माघ शुद्ध १ पासून माघ शुद्ध ५ पर्यंत देवस्थानच्या मुख्य जत्रेचा उत्सव चालतो. त्या जत्रोत्सवाकरिता पूर्वी पंचदेवतांचे लाकडी मुखवटे करून प्रत्येक वर्षी माघ शुद्ध ६ च्या दिवशी श्रीची पालखी मंडपात असताना तिच्या सान्निध्यात पावणी होत असे. या पावणीतून जमलेली रक्कम पुढील वर्षीच्या जत्रेकरिता खर्च करीत असत. ही वहिवाट अजूनही चालू आहे. या उत्सवाच्या वेळी नौकारोहण आणि पाचही अन्नसंतर्पणासारखे कार्यक्रम पार पाडले जातात. याखेरीज लहान-मोठी अशी अनेक कृत्ये वर्षभर चालू असतातच.

लोकशाही पद्धतीने महाजनांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या द्वारा श्रीशांतादुर्गा देवस्थानचा कारभार सुरुवातीपासून आजतागायत चालू आहे. या समितीवर महाजनांपैकी विश्वासू, प्रतिष्ठित आणि निष्ठावंत व्यक्ती असतात. समितीच्या पदाधिकाऱ्यांच्या निवडीमध्ये आवश्यकतेनुसार फेरफार होत गेले आहेत. पूर्वी खजीनदार, मुखत्यार व कमावीसदार हे महाजन मंडळींतून महाजन निवडीत

असत व अध्यक्ष मात्र महाजन मंडळींपैकीच पण सरकारनियुक्त असे. १९६२ पासून हे चारही पदाधिकारी महाजनांनीच आपल्यापैकी निवडावेत असे ठरविण्यात आले.

देवस्थानातील सेवकवर्गामध्ये अभिषेकी, पुजारी, जीनकार, नारायण देवस्थानचा पुजारी, पुराणिक, नित्य कीर्तनकार, कलावंत, मृदंग-टाळ-वादक, भावीण, पैरेकर, सोनार, सुतार, लोहार, परीट आदींचा समावेश होतो.

### श्रीसांतेरी

गोमंतकातील प्रत्येक गावामध्ये एक देवी मंदिर असते. ह्या मंदिरातील देवता विशेषेकरून श्रीसांतेरी या नावाने सर्वत्र ओळखली जाते. काही गावांतून मात्र तिला भूमिका, भगवती, माउली, वनदेवी या नावांनीही संबोधिले जाते. गावाचे रक्षण करणारी जागृत देवता म्हणून तिचा प्रत्येक गावी महिमा वर्णन करण्यात येतो. या स्त्रीस्वरूपी दैवताबरोबरच ग्रामदेव म्हणून पुरुषस्वरूपातील वेताळ, रवळनाथ, भूतनाथ, भैरव, काळभैरव ह्यांचीदेखील उपासना काही गावांतून चालू असते. प्रत्येक देवळामध्ये असलेले वारूळ हेच श्रीसांतेरीचे प्रतीकात्मक स्वरूप मानले जाते व त्याची पूजाअर्चा नित्यनेमाने करण्यात येते. प्रतिवर्षी या देवतेचा उत्सव मोठ्या उत्साहाने गावामधून साजरा करण्यात येत असतो. ज्या ठिकाणी श्रीसांतेरीची मूर्ती (कळस) असेल त्या ठिकाणी मूर्तीची (कळसाची) मिरवणूक काढण्यात येते, देवीचा अवसर काढण्यात येतो आणि देवीचे तीर्थ भक्तांना देण्यात येते. उत्सवाच्या वेळी रात्री नाटकासारखा एखादा करमणुकीचा कार्यक्रमही आवर्जून योजण्यात येतो. श्रीसांतेरीला कौलही लावण्यात येतो. पूजाअर्चा गावामार्फत नेमाने चालू असते.

या ग्रामदेवतेची मंदिरे संपन्न नाहीत, वैभवशाली नाहीत, भव्य, दिव्य आणि सुंदर नाहीत. जी मंदिरे आहेत ती छोटी आहेत, साधीसुधी आहेत. काही मंदिरे तर पोर्तुगिजांनी विध्वंसून नष्ट करून टाकली.

### श्रीदत्त

साखळीतील श्रीदत्ताचे देवस्थान हे गोमंतकामध्ये सर्वपरिचित असून एक जागृत दैवत म्हणून त्याचा लौकिक सर्वदूर पसरलेला आहे. या देवस्थानच्या क्षेत्राला प्रति गाणगापूर असे म्हणतात.

या मंदिराच्या प्रवेशद्वारातून आत शिरताच दोन्ही बाजूंना अश्वत्थाचे दोन वृक्ष उभे असलेले दृष्टीस पडतात. बाजूला नगारखाना असून त्याच्यासमोर पुजारी व इतर सेवकवर्ग यांच्यासाठी म्हणून एक अग्रशाळा आहे. देवळासमोरच

दीपस्तंभ आहे. देवालयाचा मंडप विस्तीर्ण असून त्याच्या दोन्ही बाजूंला दोन तुळशी वृंदावने आहेत. मंडप ओलांडून पुढे येताच गर्भागारातील नंदादीपाच्या सौम्य प्रकाशामध्ये शोभणारी श्रीदत्ताची मूर्ती दृष्टीला पडते आणि मन एकदम प्रसन्न होऊन जाते. देवालयाचे दालन तर हंड्याझुंबरांनी अत्यंत शोभायमान करण्यात आलेले आहे. देवळाच्या बरोबर मागे एक औदुंबराचा पार असून त्यावर श्रीदत्ताची पूर्वीची एकमुखी मूर्ती आहे. बाजूला नव्याने बांधलेली भव्य अग्रशाळा असून एक सुंदर असे उद्यानही त्या ठिकाणी आहे.

या देवस्थानची व्यवस्था पाहण्याचे काम श्रीमंगेशी, श्रीशांतादुर्गा यांच्या देवस्थानांप्रमाणेच एका निवडून दिलेल्या समितीमार्फत चालते.

**नित्य आणि नैमित्तिक देवकृत्ये**

चौघडा, निर्माल्य विसर्जन, रुद्राभिषेक, महापूजा, अलंकरण, आरत्या, महानैवेद्य, तीर्थप्रसाद, माधुकरी देणे, नौबत, धुपारती, मंत्रपुष्प, भजन, तीर्थप्रसाद हे नित्य कार्यक्रम नेमानुसार चालूच असतात. याखेरीज शिबिकोत्सव, अन्नसंतर्पण, एकादशिनी, आवर्तन, लघुरुद्र, लघुविष्णू, महारुद्र, महाविष्णू, सुवासिनी, नवचंडी, वसंतपूजा, दीपाराधना, प्रदोषपूजा, पुराण, कीर्तन, ललित, आदी कार्यक्रम भक्तिभावाने पार पाडले जातात. श्रीरामनवमी, अक्षयतृतीया, श्रावणमास, नवरात्र, श्रीगुरुद्वादशी, श्रीदत्तजयंती, श्रीगुरुप्रतिपदा, महाशिवरात्री इत्यादी उत्सव मोठ्या उत्साहाने पार पाडतात.

गोमंतकामध्ये अनेक देवदेवता आहेत. साखळी येथील श्रीविठ्ठल, नार्वे येथील सप्तकोटीश्वर, आमोणे येथील श्रीवेताळ, हरवळे येथील श्रीशंकर या देवतांची देवस्थानेदेखील गोमंतकामध्ये सुप्रसिद्ध आहेत.





# राजस्थानची प्रमुख कुलदैवते

लेखिका : डॉ. सौ. सविता जाजोदिया

भारताच्या आध्यात्मिक संस्कृतीत एकेश्वर वादाबरोबरच बहुदेव वाददेखील आढळतो. वैदिक, पौराणिक देवीदेवतांची पूजा तर बहुतेक सर्वत्र आढळतेच. पण त्याच्याच जोडीला लोकदैवतांनीदेखील जनमानसात स्थान पटकावलेले दिसून येते. या लोकदैवतांपैकी काही दैवते पौराणिक देवतेचेच पण लोकांना आपल्या कल्पनेने दिसलेले रूप घेऊन ठाण मांडून बसलेली दिसतात. यांपैकीच कित्येकांनी कुलदैवताचाही मान पटकावलेला आहे.

**सतीमाता**

राजस्थानचा इतिहास रक्तरंजित असल्याने, जोहार करून हसतमुखाने मृत्यूला सामोऱ्या जाणाऱ्या, शत्रूशी दोन हात करून देह धारातीर्थी ठेवणाऱ्या किंवा पतीस वीरगती प्राप्त झाल्यावर त्याचे मस्तक मांडीवर घेऊन अग्निप्रवेश करणाऱ्या स्त्रियांची संख्या तेथे अगणित आढळते. त्यामुळे राजस्थानातील प्राय: सर्व घरांमधून सतीपूजा आढळते.

सतीपूजेचा दिवस कुलपरंपरेनुसार भिन्न भिन्न असला तरी सर्वसाधारणपणे माघ व भाद्रपद महिन्यातील कृष्ण पक्षाच्या अष्टमी, त्रयोदशी किंवा अमावास्येला ही पूजा करण्यात येते. पूजेमध्ये कोरडे कुंकू, काजळ आणि मेंदी या सौभाग्य वस्तूंचा समावेश आवश्यक असतो. शिवाय त्या दिवशी घरात शिरापुरीचा स्वयंपाक असतो. सतीचे एक विख्यात देवालय जयपूरजवळच्या झुनझुनू या गावी आहे. भाद्रपद महिन्याच्या अमावास्येला तेथे मोठी जत्रा भरते व दर्शनासाठी अवघ्या भारतातून राजस्थानी लोक तेथे येतात. ही क्षत्रियांची कुलदेवी नसून व्यापारउदीम करणाऱ्या वैश्य समाजाची देवता आहे. राजस्थानीतील अग्रवाल कुळांमध्ये तर या देवीची विशेष आराधना असते.

या देवीविषयीची दंतकथा अशी आहे : हिचे खरे नाव होते नारायणी. हिच्या वडिलांचे नाव होते गुरसामल, महर्क या गावी तिचा जन्म झाला होता. हिच्या पतीचे नाव तनधनदास आणि सासऱ्याचे नाव जालानसीदास होते. सासरच्या घराण्यात हिसार जिल्ह्याच्या नबाबाची दिवाणगिरी होती. पण एका विशिष्ट नवलाखी घोडीवरून नबाबाशी त्यांचा बेबनाव झाला आणि त्याच धकाधकीत नबाबाचा पोरगा त्यांच्या हातून मारला गेला. तेव्हा घाबरून, प्राण वाचविण्यासाठी ते सर्व हिसार सोडून रातोरात झुनझुनू गावी आले. झुनझुनू व हिसारच्या नबाबामध्ये वैमनस्य असल्याने या ठिकाणी त्यांना सुरक्षितपणा वाटत होता. पण हिसारचा नबाब सूड घेण्याची संधी पहात असतानाच त्याला तशी संधी मिळालीदेखील ! एकदा तनधनदास आपल्या बायकोला—नारायणीदेवीला—आणण्यासाठी म्हणून सासुरवाडीस गेला होता. तेथून परत येत असताना हिसारच्या सैनिकांनी त्यांना घेरले. युद्ध झाले. त्यात तनधनदास मारला गेला. नारायणीदेवी सती झाली. तीच ही झुनझुनूची 'राणी सती' होय.

झुनझुनूच्या या देवालयात तेरा सतींचे देव्हारे आहेत. त्यात मुख्य देव्हारा 'राणी सती'चा आहे. नवस फेडायला इथे दूरदूरहून लोक येतात आणि सौभाग्यदर्शक लाल रंगाची चुंदडी देव्हाऱ्याच्या दारावर बांधतात. शिवाय लग्नानंतर नवदंपतीला आणि पुत्र झाल्यावर त्याला या देवीच्या दर्शनासाठी आणतात. या प्रथेला 'जात देना' असे म्हणतात.

ज्या लोकांना झुनझुनू गावी जाणे शक्य नसते ते घरीच देवीची पूजा करतात. त्यासाठी शेणाने जागा सारवून मातीने त्यावर दोन चौकोन तयार करतात. एका चौकोनात दही व एका चौकोनात दूध भरतात. मध्ये वाट ठेवून दूध दही एकमेकात मिसळू देतात. याच्यासमोर कुंकू, काजळ व मेंदी यांचे प्रत्येकी सात ठिपके जमिनीवर देतात. धूप दीप लावतात, नारळ वाहतात, हळदकुंकवाने रंगविलेले कच्चे सूत वाहतात आणि तीन प्रदक्षिणा घालून जोडीने नमस्कार करतात. मुलाबाळांना सर्वांना देवीचे स्मरण करून नमस्कार करायला लावतात.

'राणी सती' नवसाला पावते अशी दृढ श्रद्धा लोकांमध्ये आहे. घरावर काही संकट येणार असले तर ती स्वप्नात येऊन त्याची सूचना देते, कुळाचे रक्षण करते व वंशवृद्धीसाठी पुत्र प्रदान करते अशी समजूत आहे. घरातील कोणतेही मंगल कार्य असो सतीच्या पूजेखेरीज ते पुरे होत नसते. विशेषतः मंगल कार्याच्या प्रसंगी देवीचे जे रात्रजागरण (रातिजोगा) करतात त्या वेळीही कुटुंबातील सतीचे गाणे हमखास गातात. उदा०—

**राणळ सती ए महासती राणी। सत दे नोकर, थारा जी . . .**

हे महासती, राणी सती, आम्ही तुझे दास आहोत. आम्हास चांगली बुद्धी दे.

गीतात पुढे वर्णन आहे : गावात कोष्टी कापड विणतोय. कोष्टीबाबा, माझ्या पतिदेवांसाठी फेटा आणि माझ्यासाठी चुंदडी विणून दे. गावात रंगारी कपडे रंगवतोय. रंगारीबाबा, माझ्या पतिदेवांचा फेटा आणि माझी चुंदडी रंगवून दे. गावात सोनार दागिने करतोय. सोनारबाबा, माझ्या पतिदेवासांठी सलकडी आणि माझ्यासाठी नवलाखी हार तयार करून दे. . . . गावात खजुराचे उंचच उंच झाड आहे. त्यावर चढून सतीमातेने पाहिले तर स्वर्ग जवळ दिसला, घर दूर दिसले. सतीने नगारे वाजवणाऱ्याला म्हटले, 'बाबा, इतक्या जोरात नगारा वाजव की तो माझ्या माहेरी व आजोळी ऐकू गेला पाहिजे.'

आईला वाटते लेक सासरी आहे. सासूला वाटते सून माहेरी आहे. पण सतीने तर वाटेतच पतिसवे घर बांधले. अर्थात ती सती गेली. सतीने सासर-माहेर दोन्ही कुळांचा उद्धार केला आणि दूर जाऊन राहिली.

'हे सतीमाते, तुझी चुंदडी मंगळवारी रंगविली होती. तू ती एकदाच परिधान केलीस आणि सवाष्ण लेकीबाळींनी ती काढून घेतली. तुझ्या पायांतील जोडवी मंगळवारी तयार करण्यात आली होती. तू ती एकदाच घातलीस आणि ब्राह्मणींनी ती काढून घेतली.'. . .

गीतात पुढे म्हटले आहे :

**सतीमाता, तेरो चुड़लो, राणी, चित-यो छै वार सु-वारां जी**
**भल पहऱ्यो भल तन चढ्यो, राणी, तऱ्यो छै राजीड़ रे साथ जी ॥**
**मांडा पोवत दाझियो, राणी, ज्यूं र वासदेहा जी**
**ज्यूं जळ निगळे माछली, राणी, ज्यूं र वासदेहा जी ॥**

सतीमाते, शुभ वार पाहून तुझे सौभाग्य चुडे चितारण्यात आले होते. धन्य आहे. तू ते असे दृढ घातलेस की पतिसवेच ते अग्नीत जळाले. स्वयंपाक करताना अंग भाजते तसे तुझे अवघे शरीर आगीत जळतेय. मासा ज्याप्रमाणे पाणी गिळून टाकतो त्याप्रमाणे अग्नी तुला गिळून टाकीत आहे.

दुसऱ्या एका गीतात देवीला विचारले आहे : 'सतीमाते, तू धनदौलत व रंगमहाल यांचा त्याग कसा केलास ? गरम दूध जरी अंगावर सांडले तरी आग होऊ लागते, तर तू प्रत्यक्ष अग्नीतच प्रवेश कसा काय करणार?' यावर सती उत्तर देते, 'मी अगदी सहज हसत धनसंपदा व रंगमहाल सोडला. कारण मला घर दूर व स्वर्ग जवळ दिसतोय आणि भगिनींनो, मासोळी जशी पाण्यात आनंदाने पोहते तशी मी आनंदाने अग्नीत प्रवेश करीन. माझे चित्त हरीकडे लागले आहे.'

अशा प्रकारची, सतीच्या अलौकिकत्वाचे वर्णन करणारी गीते लग्नघरातील
 दोन्ही पक्षांच्या मंडळींकडे गातात. तसेच लग्न लागल्यावर नववधूच्या गळयात

चांदीच्या नऊ टिकल्या, हळदकुंकवाने रंगविलेल्या सुतात ओवून घालतात. त्याला 'सती माँ का झालरा म्हणतात.' आणि लग्नानंतर निदान सव्वा महिना तरी तो झालरा सतत गळ्यात घालायचा असतो. सौभाग्याशी संबंधित कोणतेही कार्य देवीच्या स्मरणाखेरीज करीत नसतात. मेंदी ही तर सौभाग्यसूचक ! म्हणून मेंदी लावायच्या अगोदर सतीच्या नावाने मेंदीचे सात ठिपके भिंतीवर एखाद्या ठिकाणी लावून मगच मेंदी हातांना लावतात.

**सुसाणी देवी**

सुसाणीदेवी ही सुराणा लोकांची कुलदेवी असून हिच्या विषयीची दंतकथा अशी आहे :

सुसाणी ही नागौरच्या सुराणांची लेक होती. रूपाने अप्रतिम! तिच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन नबाब तिच्या मागे लागला. तेव्हा आपल्यामुळे पित्याच्या घराण्यावर संकट येऊ नये तसेच आपले शीलही सुरक्षित रहावे म्हणून सुसाणी घर सोडून निघाली. पण ती मोरखाणा गावी पोहोचेपर्यंत नबाबाच्या सैन्याने तिला गाठले. बचावाचा अन्य काही मार्ग दिसेना तेव्हा ती पृथ्वीस शरण गेली व तिच्यात सामावून गेली.

**हरस जीण**

हरस जीण या देवतांपैकी 'जीणमाता' या कुलदेवीचे देऊळ जयपूरजवळ असलेल्या खोसा गावापासून तीन कोसांवर एका टेकडीवर आहे. वर्षातून दोन वेळा नवरात्रीत तेथे जत्रा भरते. एरवीदेखील तेथे 'जात-जडूला' म्हणजे लग्नानंतर आणि पुत्रप्राप्तीनंतर दर्शनाला व मुलाचे जावळ काढायला येणाऱ्या लोकांची सतत वर्दळ असते. देवीची मूर्ती अष्टभुजा असून तिचे नाव 'जयंती' असावे असे तेथील लोक म्हणतात. देवालयाचे सभागृह दहाव्या शतकाइतके प्राचीन असून त्यातील बहुतेक शिलालेख चव्हाण—चौहान राजांच्या कारकिर्दीतील आहेत. गाभाऱ्यात देवीसमोर एक तुपाचा आणि एक तेलाचा असे दोन दिवे सतत तेवत असतात. दिव्यांच्या वातीचा सारा खर्च जयपूरच्या राजदरबारातून मिळतो. देवीचे पुजारी स्वतःला पाराशर ब्राह्मण म्हणवितात. याशिवाय चौहान रजपूतांचादेखील देवीपुढे येणाऱ्या भेटींमध्ये हक्क असतो. काही विद्वानांच्या मते 'जीणमाता' ही चौहान कुलातील होती आणि अष्टभुजा देवीची भक्त होती. साधनेच्या बळावर तिने सायुज्यपद प्राप्त केले व अभेदभावापन्न झाल्याने अष्टभुजा देवीच्याच रूपात तिची पूजा करण्यात येऊ लागली.

एका लोकगीतामध्ये हिची कहाणी सांगण्यात आलेली आहे ती अशी :

'हरस (हर्ष) आणि जीण नावाचे दोघे बहीणभाऊ होते. मरताना त्यांच्या आईवडिलांनी हर्षकडून बहिणीचा नीट सांभाळ करण्याचे वचन घेतले होते आणि हर्षाने ते वचन पाळलेदेखील. पण त्याच्या बायकोला काही बहीणभावांचे ते प्रेम बघवले नाही. एके दिवशी ती नणंदेला बोलू नये ते बोलली. ती गोष्ट जीणच्या मनाला इतकी लागली की ती तत्काळ घर सोडून निघाली आणि पर्वतावर जाऊन तप करायला बसली. आईवडिलांना दिलेल्या वचनाला जागून तिला घरी आणण्याचा हर्षाने खूप प्रयत्न केला. पण जीण निश्चयापासून ढळली नाही. अखेर हर्षानेदेखील घर सोडले आणि तोसुद्धा समोरच्याच दुसऱ्या पर्वतावर तप करायला बसला. तप करता करता जीण स्वतः दुर्गादेवी बनली आणि हर्ष भैरवाची उपासना करता करता भैरवरूप होऊन गेला.'

जीणमातेच्या देवालयापासून दोन कोसांवर असलेल्या हर्षनाथाच्या देवळाविषयी शिलालेखांमधून जी माहिती मिळते ती वेगळी आहे. 'सिकर'च्या संग्रहालयात सुरक्षित ठेवलेल्या या शिलालेखात प्रारंभी हर्ष या नावाने शंकराची, मग हर्ष पर्वताची व आराधनेसाठी निर्माण करण्यात आलेल्या देवालयाची प्रशंसा करण्यात आलेली आहे. त्यानंतर या देवालयाच्या नावावर प्रकाश टाकण्यात आलेला आहे तो असा : 'त्रिपुर राक्षसाचा संहार केल्यानंतर महादेवाला अतिशय हर्ष झाला. तेव्हा इंद्रादिक देवांनी हर्षरूप भगवान शंकराची या पर्वतावर पूजा केली. त्यावरून आशुतोष भगवानाचे नाव हर्षदेव, या पर्वताचे नाव हर्षगिरी आणि जवळच्या नगरीचे नाव हर्षनगरी असे पडले.' शिलालेखात पुढे चौहान राजांची वंशावळी दिली असून सांभरच्या चौहान नरेशांनी या देवालयाला प्रचुर संपत्ती दान केली असल्याचे म्हटले आहे. मेवाडच्या गुहिलोत राजवंशाचे एकलिंगजी हे जसे कुलदैवत होते तसेच या चौहानांचे हर्षनाथ हे कुलदैवत होते. जवळच्याच रणपल्लिका (हल्लीचे राणौली) गावच्या अल्लट नावाच्या ब्राह्मणाने हर्षदेवाच्या उपासनेत आयुष्य घालविले आणि त्यानेच देवालय बांधून घेतले असे म्हणतात. देवालयाचे बांधकाम चंडशिव नावाच्या शिल्पकाराने केल्याचा उल्लेख आहे.

हल्ली 'हरस' एक छोटेसे गाव आहे. प्राचीन काळी हे एक अत्यंत वैभवसंपन्न नगर असावे असे तेथे आढळणाऱ्या भग्नावशेषांवरून वाटते. गावातून पुढे गेल्यावर हर्षगिरी पर्वताची तीन मैलांची चढण लागते. पहिले विसाव्याचे स्थान लागते त्याचे नाव आहे चोर चौकी. असे म्हणतात की, पूर्वी तेथे एक जाते असायचे. हर्षनगरीत कुणी चोर शिरला तर ते जाते आपोआप चालू व्हायचे आणि लोकांना चोर आल्याचे कळायचे ! दुसरे विश्रामस्थान गोमंढी नावाने प्रसिद्ध आहे. तेथे

गाईंचे गोठे होते असे म्हणतात. चढ संपल्यावर साधारण मैलभर चालावे लागते. अखेरीस देवालयाचे भग्नावशेष लागतात. मुख्य मंदिराच्या पायाचे दगड अजूनही दिसतात. आजूबाजूला विखुरलेल्या दगडांच्या पसाऱ्यावरून त्या काळी तेथे आणखीही कित्येक मंदिरे असावीत आणि हे देवस्थान अतिशय भव्य व समृद्ध असावे असे स्पष्टपणे दिसून येते. जुन्या उद्ध्वस्त मंदिराच्याच पायावर, विखुरलेल्या शिळा व दगड मांडून नव्या मंदिराचे रूप त्यास देण्यात आलेले आहे. या कामी प्राचीन मूर्तींचादेखील उपयोग करण्यात आलेला आहे. या सर्व मूर्ती कलेच्या दृष्टीने तर उल्लेखनीय आहेतच शिवाय पुराणवस्तु संशोधनाच्या दृष्टीनेही महत्त्वपूर्ण आहेत. कॅप्टन ए. डब्ल्यू. टी. वेबने त्यांचे हे महत्त्व ओळखून त्यांच्यासाठी एक खास संग्रहालय सिकर या गावी निर्माण केले. भिन्न भिन्न प्रतिमा व शिलालेख वगैरेंचे तीनशे नमुने तेथे ठेवण्यात आलेले आहेत.

या देवस्थानाचा जो विध्वंस झाला त्याविषयीही एक दंतकथा प्रचलित आहे ती अशी :

'या देवस्थानापासून जवळच असलेल्या गावचा एक ब्राह्मण रोज पर्वतीखालच्या तळ्याच्या पाण्याने कावड भरून आणून नेमाने हर्षनाथाला अभिषेक करीत असे. अखेरीस महादेव त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्यास वर मागण्यास सांगितले. पण तो काही वर मागेना. असे बरेच वेळा झाल्यावर एकदा तो कावड घेऊन पर्वतावर चढत असताना हर्षनाथाने त्यास अडविले आणि वर मागण्यास सांगितले. पण तो हट्टी ब्राह्मण काही केल्या वर मागेना. तेव्हा रागावून महादेव म्हणाले की, पुढच्या वर्षी तू दिल्लीचा बादशहा होशील आणि तुझी इतकी श्रद्धा असलेल्या या माझ्याच देवस्थानाचा विध्वंस करून टाकशील. घडलेही तसेच. देवळाची सोन्याची शिखरे पाहून बादशहाचे या देवळाकडे लक्ष वेधले आणि मोठे सैन्य घेऊन त्याने आक्रमण केले. त्यावेळी भयंकर युद्ध झाले. हर्षनाथाच्या देवळाच्या रक्षणार्थ साक्षात देव लढू लागले. अखेर बादशहाचा पराजय झाला व तो जायला निघाला. त्यावेळी एका म्हातारीने बादशहाला सल्ला दिला की, गाई पुढे घालून युद्ध केल्यास गोहत्येच्या भयाने देव लढणार नाहीत. बादशहाने तसे केले. त्याचा जय झाला आणि त्याने हर्षनाथाचे देवालय उद्ध्वस्त केले.'

**करणीदेवी**

राजस्थानातील राठोड क्षत्रिय–रजपूत–हे करणीदेवीला आपली कुलदेवी मानतात. विशेषतः जोधपूर व बिकानेरच्या राजघराण्यात करणीदेवीची उपासना अधिक आहे. करणीदेवीचा जन्म विक्रम संवतच्या पंधराव्या शतकात चारण कुलात झाला होता. तिच्या वडिलांचे नाव होते 'मेहा चारण' आणि आई होती

'देवलबाई'. देपाजी बिठूशी तिचे लग्न झाले होते. आईवडिलांनी हुंडा म्हणून तिला खूपशी गाईवासरे दिली होती. पण सासरच्या गावी त्यांना पिण्यासाठी पुरेसे पाणी मिळेना तेव्हा करणीदेवी आपली गाईवासरे घेऊन सासरचे गाव सोडून निघाली. ज्या ठिकाणी सूर्यास्त होईल त्याच जागी मुक्काम करायचे तिने ठरविले आणि दिवसभर ती चालत राहिली. अखेरीस सूर्यास्ताच्या सुमारास सध्याचे बिकानेर आहे त्यापासून दहा कोसांवर असलेल्या 'देशनोक' या जागी ती पोहोचली व तेथेच राहू लागली. तिच्याच कृपेने बिकानेर राज्याचा पाया घातला गेला. सध्या या देशनोक गावची वस्ती आठ हजारांच्या घरात असून तेथे कसाई, वेश्या, कलाल, धोबी आणि कुंभार या जातींच्या लोकांना वस्ती करण्यास मनाई आहे. या मंडळींपैकी कुंभार वा धोबी जरी तेथे येऊन राहिले तरी कुंभाराने आवा पेटवायचा नाही व धोब्याने कपडे आपटायचे नाहीत असे बंधन आहे. देशनोकच्या सीमेवरील रानात हिरव्या झाडाचे लाकूड तोडण्यास मनाई आहे. तसेच सुकलेला लाकूडफाटा जरी कुणी उचलला तरी धार्मिक कार्याखेरीज अन्य कामांसाठी तो वापरण्यावर बंदी आहे. जुन्या काळापासून हे नियम तेथे अस्तित्वात आहेत.

करणीजीची स्तुती करणारी अनेक पदे आढळतात. राजस्थानच्या प्राचीन पद्य साहित्यात, डिंगल भाषेत देवीचे स्तोत्र आहे—

**वेदाँ बरन्नी अलोका भेदाँ**
**तुलज्जा तरन्नी बाला**
**रंगी सूल ओका तोका**
**धरन्नी रमत्त।**
**अधोका राकेस शीश,**
**धरन्नी परन्नी ईश**
**शरन्नी त्रिलोका नमो**
**करन्नी सगत्त ॥ १ ॥ . . .**

अशी अनेक पदे डिंगल पद्य साहित्यात आढळतात. शिवाय या देवीवर राजा-महाराजांची इतकी श्रद्धा आहे की अल्वर राज्याचे महाराज बख्तावरसिंह यांच्या तर तलवारीवरच करणीदेवीची प्रार्थना करणारे दोहे कोरलेले आहेत. ते असे—

**घम घम बाग नमागलाँ, हुवैं नकीबाँ हल्ल**
**सादाँ आजे संभली, किनियाणी करनल्ल ॥ १ ॥**
**बाढ़ाली बहताँह, राढ़ाली लम्बक रुड़ै**
**साढ़ाली सहताँह, डाढ़ाली ऊपर करैं ॥ २ ॥**

याशिवाय प्रचलित लोकभाषेतही देवीची स्तुती करणारी, तिचे चमत्कार वर्णन करणारी गाणी विपुल आढळतात. भक्तमंडळी मोठ्या श्रद्धेने ही गाणी गातात व ऐकतात. एक गाणे आहे—

**कालै कालै नाग आई जी**
**गाय निनाणी ए माय**
**चरूड़ी में दूध दूह्यो ए मोटी माय**
**म्हे तो सुमरां सुमरां जी ओ**
**ध्यावां ध्यावां जी ओ**
**करणा दे मोटी माय ॥. . .**

संपूर्ण गीत बरेच लांबलचक असून त्यात करणीदेवीचे स्मरण केले आहे व तिच्या अद्‌भुत शक्तीचे वर्णन केलेले आहे. करणीमायच्या प्रतापाने निम्म्या भाकरीत साऱ्या फौजेचे पोट भरले आणि तांब्याभर पाण्याने सर्वांची तहान भागली. समुद्रात बुडणारे जहाज तिचा धावा करताच बचावले. गीताच्या अखेरीस देवीला विनंती करण्यात आलेली आहे—

**देसां परदेसां थारा जी**
**छोरूड़ा सुमरै ए माय**
**छोरूड़ां री रिछ्या करज्यो ए मोटी माय**
**हे तो सुमरां सुमरां जी ओ**
**ध्यावां ध्यावां जी ओ**
**करणा दे मोटी माय ॥**

देशी परदेशी असलेली मुले तुझा आठव करतात. मुलांचे रक्षण कर माय. आम्ही तुझे स्मरण करतो, ध्यान करतो.

असाच चमत्कार 'आवडजी' या कुलदेवीच्या गीतातही वर्णिलेला आहे.

### रायमाता

'राय'माता या कुलदेवीच्या गीतात देवीला 'भवानीदेवी' असेच संबोधिले असून तिला नमस्कार करण्यासाठी येणाऱ्यांचे वर्णन केलेले आहे. ते गीत असे आहे—

**ऊँचो सो टीबो ए माता धमधमो, मेरी माय**
**ए जठै बिराजै गांग्यासर की राय**
**आद भवानी बिराजै**
**गढ़ गांग्यासर कै गोर वै, मेरी माय ॥**

उंच टेकडीवर देऊळ आहे. तेथे गांगासर गडाची रायमाता विराजमान आहे, आद्य भवानी विराजमान आहे. माते, तुला नमस्कार करायला दूरदूरहून पुरुष मंडळी येतात. शिवाय—

**जातण आवै थारै कुल बहू, मेरी माय**
**ए गोद जडूलै पूत. . .**

नमस्कार करायला कुलवधू येतात. त्यांच्या कडेवर जावळ काढण्यासाठी बरोबर आणलेली मुले आहेत. प्रसाद म्हणून कणकेचे लाडू (चुरमा) आणि जटा असलेला नारळ त्या वाहताहेत.

गांगासर या गावी देवीचे देवालय असल्याचे या गीतात नमूद केलेले आहे.

**जमवायमाता**

क्षत्रियांच्या आणखी एका शाखेची कछवाहा रजपुतांची कुलदेवी जमवायमाता ही आहे. या कछवाहा रजपुतांचे 'आंबेर'वर राज्य होते आणि 'जमवायमाते'नेच आपल्याला राज्य दिले अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. जयपूर राज्यातील रामगढ येथे हिचे मंदिर असून आंबेर-जयपूरच्या राजघराण्यात याच देवीच्या देवळात मुलाचे जावळ काढण्याची तसेच लग्नानंतर व पुत्रप्राप्तीनंतर दर्शनाला जाण्याची प्रथा अजूनही आहे.

**सकरायमाता**

जयपूरच्याच सिकर जिल्ह्यात खंडेला गावापासून पाच कोस अंतरावर 'सकराय-माता' हिचे देवालय आहे. काही लोक हिला 'शाकंभरी माता' असेही म्हणतात. पण देवालयातील एका प्राचीन शिलालेखानुसार देवीचे नाव शाकंभरी नसून 'शंकरा' आहे. शिलालेखातील मूळ संस्कृत शब्द 'शंकराय' त्याचाच अपभ्रंश होऊन 'सकराय' हा शब्द रूढ झाला असावा. या देवीला पशुबळी देत नसतात. गोडाचाच नैवेद्य देवीला दाखवितात. देवीच्या गाण्यातही याचा उल्लेख आलेला आहे. गीताची सुरुवात अशी आहे—

> **काहे को तेरो भवन भवानी**
> **मेरी जै जै मैया काहे को दरवाजो**
> **सकंभरी माता काहे को दरवाजो**
> **महापत राखल्यो भगतां की**
> **सदापत राखल्यो सेवग की ॥ . . .**

'भवानीमाते, तुझा जयजयकार असो. तुझे देऊळ कशाचे आहे व दरवाजे कशाचे आहेत? शाकंभरी माते, भक्तांची, सेवकाची पत राख.' पुढे याचे उत्तर दिलेले आहे 'सोन्याचे तुझे देऊळ आहे व चांदीचे दरवाजे आहेत.'

त्यानंतर म्हटले आहे: 'आईच्या देवळात चुल्यावर कढई चढविलेली आहे. शाकंभरी मातेला शिऱ्याचा नैवेद्य दाखविण्यात येत आहे. मातेच्या देवळात ब्राह्मणभोजन चाललं आहे. दक्षिणा म्हणून प्रत्येकाला रोख रुपाया मिळतोय. देवीच्या देवळात दिवा तेवत आहे. त्याची ज्योत नेहमीपेक्षा अधिक प्रखर आहे.

देवीच्या देवळात पोथी वाचली जात आहे. शाकंभरी दुर्गादेवीची पोथी श्रवणीय आहे. देवीच्या देवळावर ऊन पडत आहे. मेघांची सावली शीतल आहे. माते, तुझ्या मंदिरावर पाऊस पडत आहे. पावसाचे थेंब जणू मोत्यांचेच आहेत. देवी माते, तुझ्या देवळात लग्न झालेले जोडपे नमस्कार करायला येते. माते, तुझा जयजयकार असो. भक्तांचे, सेवकांचे रक्षण कर, त्यांची पत राख.'

या देवीच्या देवळातील शिलालेखामध्ये गणपती, चंडिका आणि कुबेर यांचीही प्रार्थना करण्यात आलेली असून देवालयाचे सभागृह बांधणाऱ्या धरकट्ट घराण्यातील सावकारांची नावे दिलेली आहेत. सध्या हे धरकट्ट लोक जैन ओसवाल जातीचे असल्याचे आढळते. त्यावरून असे वाटते की देवीला बळी अर्पण न करण्याच्या प्रथेमागे जैन धर्ममताचा प्रभाव असावा. देवालयाचे पुजारीदेखील ही सकरायमाता म्हणजे महिषासुरमर्दिनीच असल्याचे सांगतात. याच प्रांतात असलेल्या लोहार्गल तीर्थस्थानास प्रदक्षिणा घालण्याच्या वाटेवर 'सकरायमाता'चे तीर्थस्थान लागते. ही प्रदक्षिणा भाद्रपद कृष्ण एकादशी ते अमावास्येपर्यंत चालते.

**सच्चियामाता**

महिषासुरमर्दिनीचेच सौम्य रूप असलेली आणखी एक देवी म्हणजे 'सच्चियामाता' (सच्चिकादेवी) होय. हीदेखील जैन ओसवाल लोकांची कुलदेवी असून जोधपूरपासून सुमारे ३९ मैलांवर असलेल्या ओसियाँ (प्राचीन काळचे उपकेश व उकेश) येथे तिचे देवालय आहे. देवालय बरेच विख्यात असून एका टेकडीवर आहे. दरवर्षी हजारो यात्रेकरू देवीच्या दर्शनार्थ येथे येतात. पण विचित्र गोष्ट म्हणजे देवीला असलेल्या शापामुळे कोणीही येथे कायमची वस्ती करून रहात नाही. इतकेच नव्हे तर देवीचे दर्शन घेतल्यावर रात्रभर तेथे मुक्काम करण्याचेही कुणाला धाडस होत नाही. तसे केल्यास देवीचा कोप होण्याची लोकांना भीती वाटते.

या देवीच्या देवळात गाभाऱ्याच्या बाहेर तीन मुख्य कोनाड्यांमध्ये चामुंडा, महिषमर्दिनी व शितळा यांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. सर्वांत अखेरच्या मुख्य कोनाड्यात महिषमर्दिनीची मूर्ती आहे. मूर्तीच्या खाली एक शिलालेख आहे: 'सच्चिकादेवी प्रासादकर्मणि चण्डिका, शीतला, श्रीसच्चिकादेवी, क्षेमंकरी, श्रीक्षेत्रपाल प्रतिमाभिः सहितं जंघाधरं आत्मश्रेयार्थं कारितम् ।' या शिलालेखावरून या देवीचा संबंध चंडिका, भैरव तसेच महिषासुरमर्दिनी इत्यादी देवीदेवतांशी असल्याचे सिद्ध होते. पण मग ही मांसभक्षीदेवी जैनांनी कशी काय कुलदेवी म्हणून घेतली? याचा उलगडा आचार्य रत्नप्रभसूरि यांनी 'उपकेश गच्छपट्टावलि'मध्ये सांगितलेल्या एका कथेवरून होतो. ती कथा अशी आहे की, एकदा देवी आचार्यांच्या समोर प्रकट होऊन खायला मागू लागली. तेव्हा

आचार्यांनी तिला फळे, मिठाई वगैरे अर्पण केली. पण देवीला पशुबळी हवा होता. तिने आचार्यांच्या नैवेद्याचा स्वीकार केला नाही. त्यावर आचार्य म्हणाले—

**त्वया वधो याचितः स तु लातुं दातुं न बुध्यते ।**

तुला हवा असलेला बळी देण्यास मी असमर्थ आहे. तेव्हा देवीने आपले रौद्ररूप टाकून जैन धर्माची दीक्षा घेतली आणि तेव्हापासून ती जैनांची कुलदेवी झाली.

**आईजी**

आईजी ही खारडिया सिरवी नावाच्या जातीने रजपूत असलेल्या पण शेती करणाऱ्या लोकांची कुलदेवी आहे. मारवाडच्या बिलाडा नावच्या गावी हिचे देवालय आहे. 'आईजी'च्या देवळात तुपाचा दिवा अखंड तेवत असतो. त्या दिव्यावर जी काजळी धरते ती पिवळसर रंगाची असते. तिला केशर म्हणतात. पिवळसर रंगाची काजळी ही केवळ 'आईजी'चाच प्रताप समजतात. भाद्रपद शुक्ल द्वितीया हा आईजीच्या उत्सवाचा दिवस असतो. 'आईजी'च्या देवळाला दरगा म्हणतात आणि तेथील पुजाऱ्याला दिवाण म्हणतात. सिरवी जातीच्या बायका दळायला बसल्या म्हणजे अगोदर आईजीच्या नावाचे मूठभर धान्य वेगळे काढून एका गाडग्यात घालतात. प्रत्येक दळणाचे वेळी त्यात धान्य घालीत गेल्याने बरेच धान्य गोळा होते. ते सर्व देवळातर्फे बैलगाड्या पाठवून गोळा करण्यात येते. अशा तऱ्हेने शेकडो मण धान्य आईजीच्या दरग्यात जमा होते. त्या धान्याचा स्वयंपाक करून अन्नछत्र घालतात. सिरवीच्या घरातील माणसांची किंवा जनावरांची संख्या वीस झाली म्हणजे त्यापैकी एक जनावर किंवा एक माणूस आईजीला अर्पण करण्यात येतो. त्यानंतर पैसे देऊन त्या माणसाला वा जनावराला सोडवून आणतात.

**दधिमतीमाता**

जोधपूरच्याच नागौर तालुक्यात दाहिमा ब्राह्मणांची कुलदेवी 'दधिमतीमाता' हिचे देवालय आहे. आश्विन शुक्ल अष्टमीला तेथे जत्रा भरते. राजस्थानच्या प्राचीनतम स्थानांपैकी हे एक स्थान आहे. या देवीविषयी सांगतात की, ती अथर्वण ऋषींची कन्या व दधीची ऋषींची बहीण होती. दधीची मुनींनी जेव्हा वृत्रासुराशी युद्ध करण्यासाठी आपली हाडे इंद्राला दिली व ते मरण पावले तेव्हा हिने दधीची ऋषींचा पुत्र पिप्पलाद याचे पालनपोषण केले होते.

**नागनेचियाँ**

राजस्थानातील राठोड क्षत्रियांची जी कुलदेवी आहे ती 'नागनेचियाँ' म्हणून ओळखली जाते. राठोडांच्या या कुलदेवीचे नाव मुळात 'मनसा' (आपल्या

मनाप्रमाणे सृष्टीची रचना करणारी) असे होते. पुढे ती विंध्याचलावर राहू लागली म्हणून तिचे नाव 'विंध्यवासिनी' असे पडले. एकदा तिने बहिरी ससाण्याचे रूप धारण करून राष्ट्राचे रक्षण केले म्हणून 'राष्ट्रश्येना' या नावाने ती विख्यात झाली. मेवाडचे कुलदैवत एकलिंगजी यांच्याविषयीच्या 'एकलिंग माहात्म्य' या प्राचीन ग्रंथात म्हटले आहे:

राष्ट्रश्येनेति नाम्नीयं मेदपाटस्य रक्षणम् ।
करोति न च भङ्गोऽस्य यवनेभ्यः मनागपि ।।

—अध्याय ११, श्लोक २२

अर्थ : राष्ट्रश्येना नावाची ही देवी मेवाडचे रक्षण करते. म्हणूनच यवन शत्रूदेखील या देशाची हानी करू शकत नाही.

मेवाडमध्ये एकलिंगजीच्या देवळापासून सुमारे दोन कोसांवर या राष्ट्रश्येना देवीचे देऊळ आहे. याच 'राष्ट्रश्येना' शब्दाचा अपभ्रंश होऊन 'राठासण' या नावाने ही देवी ओळखली जाऊ लागली. या 'राष्ट्रश्येना' कुलदेवीचे प्रतीक म्हणून राठोडांच्या ध्वजेवर ससाण्याचे चित्र असते. या देवीचे सर्वांत प्राचीन मंदिर मारवाडमध्ये पंचभद्र परगण्याच्या 'नागाना' गावी आहे. ते देऊळ राव धुहड यांनी बांधले होते. 'नागाना'ची या अर्थी देवीला 'नागनेचियाँ' हे नाव पडले. त्यानंतर जोधपूर राज्याचे संस्थापक राव जोधा यांनी जोधपूरच्या किल्ल्यात दुसरे मंदिर बांधले. 'नागनेचियाँ' देवीचे स्थान बहुधा राठोडांच्या गावात निंबाच्या झाडाखाली असते. म्हणूनच राठोड क्षत्रिय निंबाचे झाड कधीही तोडीत नसतात की त्याचे लाकूडही जळणासाठी घेत नसतात.

### पिरथीराज

राजस्थानातल्या 'जाट' लोकांमध्ये पिरथीराज या कुलदैवताची पूजा करण्यात येते. पिरथीराजचे देवालय 'नीमका थाना' या परगण्यातील सिरोही गावी आहे. श्रावणातल्या व चैत्रातल्या तिजेला येथे जत्रा भरते. जत्रेच्या आदल्या रात्री जागरण करतात. त्यावेळी रात्रभर पिरथीराजचे गीत गातात. हे लोकगीत बरेच विस्तृत असून त्यात पिरथीराजची कथा सांगण्यात आलेली आहे. हरस-जीणप्रमाणेच बहीणभावांच्या प्रेमावर आधारलेली ही कथा थोडक्यात अशी आहे:

पिरथीराज व सुरजा हे दोघे बहीणभाऊ होते. पिरथीराजच्या मागे बारा वर्षांसाठी शनीची ग्रहदशा लागली तेव्हा गाव सोडून सर्वजण निघाले. वाटेत एक बाग लागली. बाग सुकलेली होती. पिरथीराजच्या वडिलांचे नाव घेताच बाग फुलली. तेव्हा बागेच्या मालकिणीने—माळिणीने त्यांना तेथेच रहाण्याचा आग्रह केला. सर्वजण सुखासमाधानाने तेथे राहू लागले. माळीण त्यांची सेवाचाकरी

करू लागली. पुढे त्या माळिणीच्या गाई चोरांनी पळविल्या. माळिणीने राजाकडे दाद मागितली. पण चोरांचे नाव ऐकून राजा घाबरला. त्याने चोरांशी लढायचे नाकारले. तेव्हा माळिणीने पिरथीराजला विनंती केली आणि पिरथीराजने शौर्याने चोरांशी मुकाबला करून गाई सोडवून आणल्या. पण एक गाय राहून गेली. तेव्हा तिला सोडवून आणायला पिरथीराज पुन्हा निघाला. यावेळी त्याच्या बहिणीला बरेच अपशकुन झाले. म्हणून भावावर काही अरिष्ट आले तर जवळ असावे या हेतूने त्याची बहीणदेखील बरोबर निघाली. पिरथीराजने आपले मस्तक कापून बहिणीपाशी सांभाळायला दिले आणि त्याचे नुसते धड लढत राहिले. लढाईत जय झाला तेव्हा अत्यानंदात ते शिर घ्यायचे तसेच विसरून दोघे बहीणभाऊ गडबडीने माघारी जायला निघाले. असे ते दोघे जात असताना वाटेत पाणवठ्यावर काही बायकांनी त्यांना पाहिले. पिरथीराजच्या शरीरावर डोके नसल्याने तो कोण हे न उमगून त्या बायका बोलल्या–'ती दोघे नवराबायको पहा कशी चालली आहेत.' ही गोष्ट त्या बहीणभावांच्या मनाला इतकी लागली की, आता जिणे व्यर्थ आहे असे वाटून त्यांनी धरणीमायला आपल्याला पोटात घेण्याची प्रार्थना केली. त्याप्रमाणे पृथ्वी दुभंगली आणि ते जमिनीत अदृश्य झाले

ज्या ठिकाणी पिरथीराज जमिनीत अदृश्य झाला त्या ठिकाणी एक वृक्ष उगवला. एकदा एक लाकूडतोड्या ते झाड तोडायला गेला असता त्याचे हातच त्या झाडाला चिकटले व त्याची कुऱ्हाड वरच्यावर राहिली. तेव्हा घाबरून त्याने देवऋषीला विचारले. त्यावर उत्तर मिळाले की, पिरथीराजला देवपण मिळाले असून त्या लाकूडतोड्याला तो सोन्याच्या चार विटा देईल. त्यांपैकी दोन त्याने स्वतः ठेवाव्यात व दोन विटांपासून पिरथीराज व सुरजाची दोन देवालये बांधावीत. पण लाकूडतोड्याच्या मनात पाप आले. सोन्याच्या चारी विटा ठेवून घेण्याचा मोह त्याला झाला. त्याबरोबर त्या विटांचे कोळसे झाले. तेव्हा पश्चात्ताप होऊन त्याने पिरथीराजची मनापासून क्षमा मागितली. पिरथीराजने पुन्हा सोन्याच्या चार विटा दिल्या, मात्र वंशवृद्धी होणार नाही अशी अट घातली. लाकूडतोड्याने त्या सोन्याच्या विटांपासून दोन देवालये बांधली, तेव्हापासून सिरोही गावी पिरथीराज व सुरजा यांची पूजा होऊ लागली. चैत्रातील गणगौरीच्या उत्सवाच्या सुमारास आणि श्रावणातील तिजेच्या सुमारास तेथे जत्रा भरू लागली. नाना जातींचे लोक नवस फेडायला व 'जात' द्यायला तेथे येऊ लागले. त्यात जाट जातीचे लोक प्रामुख्याने येत. पिरथीराज व सुरजाचे लोकगीत बरेच लांबलचक असून संपूर्ण गीत मुखोद्गत असणारा माणूस क्वचितच आढळतो. पिरथीराज हे कुलदैवतच असल्याने पिरथीराजच्या कहाणीचा वा प्रार्थनेचा थोडा तरी भाग पाठ असणे आवश्यक समजले जाते.

### श्यामजी

'श्यामजी' हे राजस्थानातील लोकांचे आणखी एक कुलदैवत होय. जयपूर राज्यांतर्गतच 'खाटू' नावच्या गावी याचे देवालय आहे. असे म्हणतात की, भीमाला हिडिंबा राक्षसीपासून बर्बरीक नावाचा मुलगा झाला होता. महाभारत युद्धाच्या अगोदर रणांगणाची पूजा करण्यासाठी श्रीकृष्णाने बळी मागितला तेव्हा बर्बरिकाने आपले मस्तक कापून पूजेसाठी अर्पण केले. तेव्हा श्रीकृष्ण अतिशय प्रसन्न झाले. पुढे बर्बरिकाला महाभारताचे युद्ध पाहण्याची इच्छा झाली तेव्हा कृष्णाने बर्बरिकाच्या त्या मस्तकाला युद्ध पाहण्याची शक्ती प्रदान केली आणि एका उंच पर्वतावर त्याचे मस्तक ठेवले. बर्बरिकाच्या त्या मस्तकाचीच पूजा कृष्णस्वरूप श्यामजीच्या नावाने करण्यात येते. संवत १७३५त औरंगजेबाने या मंदिराचा विध्वंस करून त्यावर मशीद बांधली. मंदिराची जी तोडफोड झाली त्या संबंधात एक जुनी म्हण प्रचलित आहे :

**देवी चढगी डूंगरां, देव धडधडा खाय।**
**खाटू वालो श्यामजी, पडयो देडादंड खाय ॥**

अर्थ : देवी (जीणमाता) पर्वतावर चढून बसली, देव (हर्षनाथ भैरव) बोरं खातो आणि 'खाटू' गावचा श्यामजी मात्र पडल्या पडल्या घाव खातो.

खाटूमधील श्यामजीच्या जुन्या देवळापाशी 'श्यामकुंड' नावाचा एक तलाव फक्त उरलेला आहे. तेथे भाविक यात्रेकरू स्नान करतात. श्यामजीचे नवे देऊळ संवत १७७७ मध्ये बांधण्यात आले आणि आता तर त्याला संगमरवर वगैरे लावून भव्य रूप देण्यात आले आहे. देवळात चंदनाच्या कलेवरावर मस्तकाच्या जागी मुकुट घातलेला शाळिग्राम ठेवण्यात आलेला आहे. श्यामजीचे पुजारी चौहान रजपूत असतात. त्यावरून असे अनुमान करण्यात येते की, श्यामजी हे चौहान वंशाचे क्षत्रिय वीर असावेत. संवत १०३० च्या विग्रहराज चौहानच्या शिलालेखात या 'खाटू' गावचा उल्लेख 'खट्टकूप' या नावाने केलेला आढळतो. त्यावरून या स्थानाचे प्राचीनत्व दिसून येते. प्रत्येक महिन्याच्या शुक्ल द्वादशीला, ज्या घराण्यांचे हे कुलदैवत आहे त्यांच्या घरी प्रसाद करण्यात येतो आणि तुपाचा दिवा लावून त्याच्यापुढे निखारे ठेवून त्यावर तूप टाकून अग्निज्योत प्रज्वलित करण्यात येते. याला 'जोत लेना' म्हणतात. घरचे लहानथोर सर्वजण ज्योतीला नमस्कार करतात. ज्येष्ठ, कार्तिक आणि फाल्गुन महिन्यांच्या शुक्ल द्वादशीला श्यामजीला नमस्कार करायला येणाऱ्या जोडप्यांची आणि जावळ काढण्यासाठी आणलेल्या मुलांची 'खाटू' मध्ये एकच गर्दी उसळते.

राजस्थानात अशी असंख्य कुलदैवते आहेत. शिवाय गौरी, गणपती, महादेव, हनुमान, विष्णू इ.च्या वेगवेगळ्या रूपांचीही कुलदैवते म्हणून पूजा होते. ❦ ❦




लेखक : श्री. सोपानदेव चौधरी

जेथे माझे भक्त गातात तेथे मी तिष्ठत उभा असतो. 'मद्भक्ता यत्र गायन्ते तत्र तिष्ठामि नारद:' भगवद्गीतेतील या अनुष्टुप ओवीमध्ये 'गायन्ते' या क्रियेला जास्त महत्त्व आहे. पूजंते असा शब्दप्रयोग नाही. पूजेत ज्यावेळी संगीत विलीन झाले त्यावेळी ते भजन बनले असावे. बाळपणापासून मी देवालयातील भजने, आरत्या, स्वरांकित जयजयकार, रामधून, गोपालधून ऐकत आलो आहे. अशी काही देवस्थाने पाहिली आहेत की, त्यांच्या भिंतीवर थाप मारली तरी ती कान भरून नादमय साथ देऊन जाते. देवालयाचा गाभारा तर विचारायलाच नको. आज आपण ज्याला 'साऊंड इफेक्ट' म्हणतो त्याच्याही पलीकडे नुसता इफेक्ट म्हणजे परिणाम नव्हे तर पूर्तता ! ती पूर्तता प्राचीन भारतीय वास्तुशास्त्रज्ञांनी जाणली होती. देवालयाच्या या गाभाऱ्यात नुसता 'षड्ज' उच्चारला की त्या घुमटाच्या घुमाऱ्यातून गंधार साद देतो. ॐकाराने भक्ताला दिलेली ती साद असते. गाभाऱ्यातील तो नाद कानाकोपऱ्यांत घुमतो एवढेच नव्हे तर त्याची बाणे जणू आकाशी उमटत असतात. या ॐकारातून भक्ताचा जो हुंकार तोच गंधार असावा असे मला वाटते. येथे ॐकार हुंकार एकमेका साद देती या दोहोंची ज्यांना ओळख झाली असेल त्यांनाच देवालयातील संगीताचे माहात्म्य कळून येईल.

देवालयात प्रवेश करताना ज्या घंटा आपण वाजवितो त्याही बहुधा सा ग म, सा ग प अशा नादलहरी निर्माण करणाऱ्या अशाच असतात. त्या नादलहरींबरोबरच दर्शनेच्छू भक्त देवालयात प्रवेश करतो. देवाचे दर्शन घेतो. भजनाची सुरुवात होते. 'रूप पाहतां लोचनीं। सुख जालें वो साजणी ॥' या अभंगाने, ज्या रागात तो आळविला जातो त्या जोगियाने, शांत रसाने ओथंबलेली अशी ही सुरुवात असते. भजनकऱ्यांमध्ये उभा असलेल्या विणेकरी बुवाच्या गळ्यात

वीणा असतो. तो अगदी हृदयाशी टेकलेला. त्या वीण्याच्या चारी तारा म्हणजे 'तेणे मुक्ति चारी साधियेल्या' या साधनेची जाणीव करून देणाऱ्या असाव्यात. विशेषतः भजनी धुमाळी या तालातच भजन होत असते. भजनी धुमाळी हा ताल भक्तांना आणि श्रोत्यांना डोलविणारा असा आहे. या तालाची सर्वच मुळी जागविणारी, पेंगलेल्यांनाही जागृती देणारी अशी! देवालयात नाना तऱ्हेची भजने गायिली जातात. या परंपरेने चालत आलेल्या भजनांतून जे राग ऐकायला मिळतात ते बघून खरोखरी आश्चर्य वाटते. प्रथमच मी सांगितले की 'रूप पाहतां लोचनीं' हा अभंग जोगियाच्या स्वरात आळविलेला असतो. शंकरा, यमन, बिहाग, बागेश्री, पिलू, झिंझोटी एवढेच नव्हे तर दरबारी कानडाही ह्या भजनांतून मिरविला जातो. लोकांनी गायिलेल्या सहजपणे त्यांच्या मुखी आलेल्या चाली भारतीय संगीताचे इंगित सांगून जातात. भूपाळ्या गायिल्या जातात. त्यावेळी एखाद्या गीतात 'म ग रे सा नि' या स्वरापासून सुरुवात होताच गौरी या रागिणीचे रूप उभे ठाकले. 'गमनी तीव्र जरि, मृदुल भाव धरी' (गमनी म्हणजे आरोहात जाताना किंवा गंधार, मध्यम, निषाद आणि धरी म्हणजे धरतांत किंवा धैवत रिषभ) कै. गोविंदराव टेंबे यांनी वर्णन केलेल्या गौरी रागिणीच्या या लक्षणाकडे लक्ष वेधते. साध्या साध्या श्लोकांच्या चालींचे उगमही अशा रागांतून शास्त्रीय संगीतातून निर्माण झालेले आहेत. त्या लोकांना संगीत शास्त्र माहीत नसूनही ते त्यात उतरले आहेत. दिंडी या श्लोकाची सुरुवात नि रे ग म अगदी यमन रागाने होते. शार्दूलविक्रीडित पिलू रागात आळविला जातो. देवालयातील भजनाला अशा या संगीताने निरनिराळ्या चालींनी रंग भरत असतो. भक्त हे परमेश्वराची करुणा भाकत असतात. या करुणाकराचे भजन गाता गाता ती करुणा आर्ततेचे रूप धारण करते. अंतःकरणात आर्तता निर्माण होते. भजनाच्या शेवटी तीच 'आरती' म्हणून गणली जाते. आर्ततेने गायिलेली ती आरती! पंच प्राणज्योती ओवाळून केलेली ती आरती असते. देवालयातून असे हे भजन निनादत असते.

भारतातील निरनिराळ्या प्रांतांत भजनाची, त्यातील संगीताची, निरनिराळी वैशिष्टये असतात. 'हरिबोल, हरिबोल, हरिबोल भगवान' या गौरांग महाप्रभूंच्या बंगाली भजनाची धून तर देहभान विसरायला लावणारी अशी असते. ह्या भजनानंदात त्यांना गोविंदाचे, त्या हरीचे, रूप दिसायला लागते. ग ग म ग रे ग रे सा रे सा नि सा या साध्या स्वरसमुच्चयातील या भजनाची ठाय लयीत सुरुवात होते. नंतर वाढता वाढता ती इतकी द्रुत गतीला जाते की, भक्तजनांची अक्षरशः ब्रह्मानंदी टाळी लागून ते भूमीवर लोळण घेतात. अशा तऱ्हेने हे भजन चाललेले असते.

आपल्या महाराष्ट्रातील पांडुरंगाच्या दिंडीचे माहात्म्य मीच सांगावे असे नाही. नादात रंग आणि रंगात नाद! ती टाळमृदंगाची धून ऐकून ज्याला गहिवर येत नसेल, ज्याचे अंतःकरण हलत नसेल तो या मराठी मातीत जन्मलेला नसावा असे मला वाटते. 'धीं धी धा, धा नीं तिनक्' या दादऱ्याच्या लयीने समुद्राच्या लाटा पुढे पुढे जाव्यात ह्याप्रमाणे दिंडी पुढे पुढे झेपावत जात असते. देवालयातूनच हे संगीत उगम पावलेले असते. या भजनानंदात पंढरीच्या वारकऱ्याला कष्टाची जाणीव होऊ शकत नाही.

**अरे वारकऱ्या तुला । नाही ऊन वारा थंडी ।**

**क्षुधारत अवध्यांना । चाले पंढरीची दिंडी ॥**

सकाळच्या रामप्रहरी गवई स्वरसाधना करीत असतो. ते श्रवण ऐकण्यासारखे व दृश्य बघण्यासारखे असते. ती परमेश्वराची नादब्रह्माची पूजाच असते. त्यावेळी हा भक्त देवालयातच परमेश्वराची आराधना करतो आहे असे वाटते. भाव तेथे देव. भावनेतूनच श्रद्धा निर्माण झालेली असते. त्या श्रद्धेमध्ये भाव तसोच प्रभावही असतो. या जगात श्रद्धा नसती तर कोणतेही कार्य होऊ शकले नसते. श्रद्धेवरच हे जग चाललेले आहे. ती श्रद्धा या देवालयातील संगीतात ओतप्रोत भरलेली असते. अखिल विश्व व्यापून परमेश्वर दशांगुळे उरला तसाच तो सप्तस्वरांतही उरलेला आहे. हे अखिल विश्वच गाते आहे. दिवसरात्रीच्या 'टाळचां'मध्ये रात्रीची 'खाली' संपली की, उदय सीमेवर उषादेवी झांज वाजविते आहे असे हे विश्व-संगीत! या विश्वसंगीताचे प्रतीक म्हणजेच 'देवालय'! नाद-निनादांनी ते भरलेले आहे.

**तुका म्हणे नाद । अवघा भरलासे गोविंद ॥**



# उल्लेख-सूची

८६१